# श्रीशिवसूत्रे

(स्थूल, सूक्ष्म, पर व परात्पर उच्चतम पातळीवरील
सिद्धयोगसाध्यसाधनशास्त्ररहस्य दर्शन)



संकलक : डॉ. केशव रामचंद्र जोशी
एम्. ए; पीएच्. डी.

।। श्रीगुरू:शरणम् ।।
।। श्रीमद् अमृतमूर्तये श्रीशिववामनाय नमः।।

ॐ

महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्त विरचित

# श्रीशिवसूत्रे

( स्थूल, सूक्ष्म, पर व परात्पर उच्चतम पातळीवरील
सिद्धयोगसाध्यसाधनशास्त्ररहस्य दर्शन )




-: संकलक :-

डॉ. केशव रामचंद्र जोशी
एम्. ए. पीएच. डी.

।। श्रीगुरुःशरणम् ।।

।। श्रीमद् अमृतमूर्तये श्रीशिववामनाय नमः ।।



महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्त विरचित

# श्रीशिवसूत्रे

(स्थूल, स्क्षूम, पर व परात्पर उच्चतम पातळीवरील सिद्धयोगसाध्यसाधनशास्त्ररहस्य दर्शन)

शक्तिपात




संकलक

डॉ. केशव रामचंद्र जोशी

एम्. ए; पीएच्. डी.

※
प्रकाशक
व्यवस्थापक,
सिद्धयोग प्रकाशन,
३,गौरीशंकर रेसिडेन्सी,
सर्व्हे न. १४/२/३, वडगाव बुद्रुक,
आनंदनगर, सिंहगड पथ,
पुणे ४११०५१.

※
संगणकीय अक्षरजुळणी
"संजीवनी,"
७, न्यू संजोग, राधानगर,
तुळिंज, नालासोपारा पूर्व,
ता. वसई, जि. ठाणे.
पिन कोड ४०१२०९.

※
मुद्रक
प्रसाद मुद्रणालय,
७०४, मनःशांती,
मेहुणपुरा, शनिवार पेठ,
पुणे. ४११०३०

※
प्रकाशनकाल
प्रथमावृत्ती - इ. स. २००४

※
मूल्य - ४०० रुपये

# अनुक्रमणिका

## विषय सूची

# ग्रंथ विषय
## प्रथम उन्मेष
## शांभवोपाय

## द्वितीय उन्मेष
## शाक्तोपाय

## तृतीय उन्मेष
## आणवोपाय

# श्रीशिवसूत्रानुक्रमणिका

## प्रथम उन्मेष
## शांभवोपाय



।। इति प्रथमोन्मेषसूत्राणि।।



## द्वितीय उन्मेष
## शाक्तोपाय



।। इति द्वितीयोन्मेषसूत्राणि।।



## तृतीय उन्मेष
## आणवोपाय

**।। इति तृतीयोन्मेषसूत्राणि।।**

**।। सम्पूर्णोऽयं शिवसूत्रविमर्शिनी सूत्रपाठः।।**



# परिशिष्ट विभाग





।। श्रीगुरुःशरणम्।।
।। श्रीमद् अमृतमूर्तये शिववामनाय नमः।।

# श्रीशिवसूत्रे

## प्रस्तावना

माझ्या हृदयसिंहासनावर अखंड विराजमान झालेले माझे परमपूजनीय प्रातःस्मरणीय सद्गुरुनाथ श्रीसंत वामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज हे आसेतुहिमाचल पसरलेल्या भारतवर्षातील एक अनुपायप्रक्रियासंपन्न, अनुत्तर महासिद्धयोगी, औत्तरआम्नायक्रमदर्शनपारंगत, अद्वयात्मक श्रीशिवशक्तिसामरस्यानुभूतियुक्त, शक्तिपाताचार्य व महामाहेश्वराचार्यवर्य असे लोकोत्तर, अलौकिक व एकमेवाद्वितीय महान् साधुपुरुष होते. त्यांच्या अपार कृपाबलाने श्रीमन् महामाहेश्वराचार्यवर्य श्रीमद् वसुगुप्तपाद यांना श्रीशिवांनी स्वप्नात जी सूत्रे शिकविली ती "**श्रीशिवसूत्रे**" या नावाने प्रसिद्ध असून हा ग्रंथ मूळ संस्कृत "**श्रीशिवसूत्रे,**" त्यांचा शब्दार्थ, सरलार्थ, श्री. जानकीनाथ कौल "कमल" विरचित श्रीशिवसूत्रविमर्शात्मक विशेष व्याख्या, श्रीक्षेमराजाचार्यकृत श्रीशिवसूत्रविमर्शिनी (काश्मीरग्रंथावली, प्रथम खंड, इ. स. १९११), श्रीभट्टभास्कराचार्य विरचित वार्तिक (काश्मीरग्रंथावली, चतुर्थ-पंचम खंड, इ. स. १९१६), श्रीभट्टकल्लटाचार्य विरचित वृत्ती (काश्मीरग्रंथावली, चतुर्थ-पंचम खंड इ. स. १९१६), श्रीवरदराजाचार्यकृत वार्तिक व श्रीकृष्णानंदसागरकृत शिवरंजनी (महामाहेश्वराचार्य श्रीवसुगुप्तपाद विरचितं "**श्रीशिवसूत्रम्,**" प्रकाशक, आचार्य श्रीकृष्णानंदसागर, श्रीमाधवानंद आश्रम, मु. पो. धर्मज, जि. खेडा, गुजरात राज्य), श्री. जयदेवसिंग यांनी इंग्रजीत लिहिलेल्या "**Shri Shiva-sutras, The Yoga of Supreme Identity,**" या ग्रंथातील काही महत्त्वाच्या टीपा (प्रकाशक, श्री. मोतिलाल बनारसीदास, दिल्ली) आणि प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज विरचित "**श्रीशिवसूत्रप्रबोधिनी**" शक्तिपात भाग दुसरा, यातील विवरण (प्रकाशक, योगश्री पीठ ट्रस्ट, मुनीकीरेती, मु. पो. श्रीशिवानंदनगर, हृषिकेश, जि. टिहरी गढवाल, उत्तर प्रदेश) या सर्व टीकांचे सुबोध मराठी भाषांतर व प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज यांनी "**श्रीशिवसूत्रप्रबोधिनी**" या ग्रंथाला लिहिलेली भूमिका,

प्राक्कथन व उपसंहार, श्रीकृष्णानंद सागर यांनी संपादित केलेल्या "**श्रीशिव-सूत्रम्**" या पंचटीकात्मक ग्रंथाला लिहिलेली भूमिका, श्री. जयदेवसिंग यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या इंग्रजी ग्रंथाला लिहिलेली प्रस्तावना आणि श्री. ग. वा. तगारे यांनी अनुवादिलेल्या महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्तपाद विरचित "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाची प्रस्तावना या सर्व प्रस्तावनांसह सिद्धयोगाच्या सर्व साधकभक्तवाचकांना मराठी भाषेत प्रथमच उपलब्ध होत आहे, ही परमभाग्याची गोष्ट आहे.

प्रातःस्मरणीय परमपूजनीय महासिद्धयोगी श्रीसंत गुळवणीमहाराज यांनी परमहंस परिव्राजकाचार्य श्रीगंगाधरतीर्थस्वामीमहाराज, परमहंस परिव्राजकाचार्य श्रीनारायणतीर्थस्वामीमहाराज, परमहंस परिव्राजकाचार्य श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थ-स्वामीमहाराज आणि परमहंस परिव्राजकाचार्य श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराज यांच्याकडून परंपरेने प्राप्त झालेला सिद्धयोगसाधनगंगेचा पवित्र व निर्मळ प्रवाह प्रवाहित करून आसेतुहिमाचल पसरलेल्या भारतवर्षातील हजारा-हजार साधकांना अनुपायप्रक्रियासंपन्न व अनुत्तर अर्थात् सर्वश्रेष्ठ अशी शक्तिपातयोगदीक्षा देऊन कृतार्थ केले होते. त्यांच्या अनुज्ञेनेच या सिद्धयोग-साधनपरंपरेची अक्षुण्णधारा "**ना आदिगुरु शंकरा। लागोनि शिष्यपरंपरा। बोधाचा हा संसरा। जाला जो आमुतें।।१८.१७५९।। तो हा तूं घेऊनि आघवा। कळीं गिळितयां जीवां। सर्व प्रकारी घांवा। करीं पां वेगीं।।१७६०।।**" या संतश्रेष्ठ श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरी**" या ग्रंथात सांगितलेल्या न्यायाने शब्दब्रह्मात्मक किंवा तात्त्विक अगर सैद्धान्तिक (Theoretical) आणि साधनात्मक किंवा कृतिशील म्हणजे प्रयत्नाभ्यासात्मक (Practical) अशा उभयविध पद्धतीने माझ्याकडून प्रवाहित होत असून, या सिद्धयोग किंवा शक्तिपातयोगसाधनगंगेत अनेकानेक साधक-भक्त-योगी-मुमुक्षुजन सुस्नात होऊन आपले जीवन धन्य व कृतार्थ करण्यासाठी मार्गस्थ होत आहेत, ही परमानंदाची व चिरस्मरणीय अशी गोष्ट आहे.

सिद्धयोगसाधनपरंपरेतील व इतरही परंपरेने प्रवाहित झालेल्या साधक-भक्तयोगिशिष्यांना शब्दब्रह्मात्मक सिद्धयोगांतर्गत उच्चस्तरीय तत्त्वांचा किंवा सिद्धान्तांचा लाभ व्हावा म्हणून आजपर्यंत श्रीमन् महामाहेश्वराचार्यवर्य महायोगी श्रीअभिनवगुप्तपाद संग्रहित "**श्रीतंत्रवटधानिका,**" "**श्रीबोधपञ्चदशिका**" व "**श्रीपरमार्थचर्चा,**" महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्तपाद संग्रहित "**श्रीस्पंदशास्त्र**" किंवा "**श्रीस्पंदकारिका**" अर्थात् "**उच्चस्तरीय सिद्धयोग**

**साधन पद्धती,**" श्रीमन् महामाहेश्वराचार्यवर्य महायोगी श्रीसिद्धगोरक्षनाथ विरचित "**श्रीअमरौघप्रबोध,**" "**श्रीअमरौघशासन,**" "**श्रीयोगबीज,**" "**श्रीमहार्थमंजरी**" व "**श्रीअमनस्कयोग अर्थात् स्वयंबोध अमनस्कयोग**" हे सर्व ग्रंथ प्रसिद्ध केले. आता महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्तपाद यांना श्रीशिवांनी स्वप्नात सागितलेली व त्यांनी ग्रंथरूपाने विरचित केलेली "**श्रीशिवसूत्रे**" हा ग्रंथ उपरोक्त सर्व टीकांच्या भाषांतरासह प्रकाशित करीत आहोत. सिद्धयोगमार्गात किंवा शक्तिपातयोगमार्गात श्रीसद्गुरुप्रसादाने किंवा कृपेने म्हणजे परंपराप्राप्त शक्तिपातयोगदीक्षेने दैवीशक्तीचे दर्शनाने, स्पर्शाने, शब्दाने व नुसत्या संकल्पाने संक्रमण होऊन साधकभक्तयोगि-शिष्याची अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत झाल्यामुळे अंतरंग सिद्धयोगसाधन स्थूल, सूक्ष्म व परपातळीवर मनःप्राणक्रियांच्या द्वारा उपस्थित होऊन, ते सहजतेने आपोआप होऊन व अंतिमतः प्राणशक्ती कुंडलिनी सुषुम्नागामी होऊन व सहस्रारात श्रीशिवशक्तीचे अर्थात् जीव-शिवांचे मिलन होऊन सामरस्यसिद्धी प्राप्त होते. या अनुपायप्रक्रियायुक्त व अपुरुषार्थसंपन्न साधनाचे पर, उच्च व श्रेष्ठ पातळीवर स्वरूप काय आहे अर्थात् अनुत्तर पातळीवर सिद्धयोगसाधनाच्या अंतर्यात्रेचे स्वरूप काय आहे याची सर्व सिद्धयोगसाधनाश्रयी साधकभक्तयोगिशिष्यांना माहिती व्हावी म्हणून त्यांनी या ग्रंथाचा साक्षेपपूर्वक अभ्यास करून त्यातील सारग्रहण करावे.

श्रीसद्गुरुनाथमहाराज हे ज्याप्रमाणे बोधाच्या अर्थात् दीक्षेच्या ऐश्वर्याचा विस्तार आपल्या अमोघ संकल्पाप्रमाणे माझ्याकडून करवून घेत आहेत त्याचप्रमाणे त्यांच्याच इच्छेने या संप्रदायसिद्धपरंपरेने विभूषित झालेल्या सिद्धयोगसाधनगंगेचे निखळ शास्त्रीय स्वरूप साधकांना व अभ्यासू वाचकांना उपलब्ध व्हावे म्हणून त्यांनी कितीतरी ग्रंथ माझ्याकडून लिहून घेतले. आत्तापर्यंत प्रसिद्ध केलेल्या सर्व ग्रंथांपेक्षा या ग्रंथाचे स्वरूप सर्वस्वी निराळे असून ते शक्तिपातयोगाच्या किंवा सिद्धयोगाच्या उच्च स्तरावरील अभ्यासाने युक्त असे आहे. जरी हा सर्व अभ्यास किंवा त्याचे स्वरूप हे अत्यंत दुरूह असले तरी श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीअनुभवामृत**" या ग्रंथात "**शिवशक्तिसमावेशें। मियां नमन केलें ऐसें। रंभागर्भ आकाशें। रिगाला जैसा।।१.६४।।**" असे म्हणून श्रीशिव व शक्ती यांच्या समावेशाचा व तद्द्वारा नमनाचा म्हणजे अंतिम सामरस्यसिद्धीचा जो अनुत्तर, एकमेवाद्वितीय,

अलौकिक व अपूर्व सिद्धान्त मांडला आहे, त्याचा उलगडा करून घ्यावयाचा असेल व सिद्धयोगाचे किंवा शक्तिपातयोगाचे अनुत्तरस्वरूप आकळावयाचे असेल तर महामाहेश्वराचार्यवर्य श्रीअभिनवगुप्त, श्रीसोमानंद, श्रीशंभुनाथ, श्रीजयरथ, श्रीक्षेमेंद्र, श्रीउत्पलदेव, श्रीवसुगुप्तपाद इत्यादि आचार्यांनी काल, त्रिक, स्पंद, प्रत्यभिज्ञा, त्र्यंबक किंवा तत्सम मार्गांसंबंधी लिहिलेल्या ग्रंथांचा अभ्यास करणे नितांत आवश्यक असून या धारणेपोटीच हा ग्रंथ प्रसिद्ध करीत आहे. "**कानडेचि अभ्यासावे निरंतर।।**" या श्रीसमर्थरामदासस्वामी-महाराजांनी सांगितलेल्या न्यायाने साधक-भक्त-वाचकांनी या ग्रंथाचा आस्वाद घ्यावा. त्याचप्रमाणे सिद्धयोगात श्रीसद्गुरुकृपेने आत्मशक्ती कुंडलिनी जागृत होऊन योगसाधन सहजतेने आपोआप होत असल्यामुळे त्यात पुरुषार्थसंपन्न अभ्यासाचे कारण पडत नाही; मात्र साधकाला जागृत कुंडलिनी शक्तिरूप श्रीसद्गुरूंना शरणागतसंपन्न होऊन साधन करावे लागते. या दृष्टीने अनुपाय-प्रक्रियासंपन्न सिद्धयोगाच्या साधकांनी या ग्रंथाचा अभ्यास करून सार ग्रहण करावे.

सारांश, "**आहाच बोलाची वालीफ फेडिजे। आणि ब्रह्माचियाचि आंगा घडिजे। मन सुखेंसी सुरवाडिजे। सुखाचि माजीं।।श्रीज्ञानेश्वरी ६.२५।।**" याप्रमाणे शब्दाच्या लक्ष्यार्थभूत असलेल्या ब्रह्मस्वरूपाशीच तद्रूप होण्यासाठी आणि मग स्वस्थपणाने सुखामध्येच रंगून जाऊन सुखाची गोडी घेण्यासाठी वरवर असलेली शब्दरूपी टरफले किंवा कवचे दूर करणे आवश्यक आहे असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धान्तरूपाने स्पष्ट केले आहे. हा सिद्धान्त सिद्ध होण्यासाठी "**ऐसें हळुवारपण जरी येईल। तरीच हें उपेगा जाईल।। श्रीज्ञानेश्वरी ६.२६।।**" या त्यांनी कथन केलेल्या उपायाचाच अवलंब करणे आवश्यक आहे; कारण जर या उपायाचा अवलंब केला नाही तर "**एऱ्हवीं आघवी गोठी होईल। मुकिया बहिरयाची।। श्रीज्ञानेश्वरी ६.२६।।**" अशी स्थिती झाल्याशिवाय राहणार नाही. हा उपाय म्हणजे शब्दांची टरफले दूर करण्याचा जो हळुवारपणा तो साधनात्मक व तात्त्विक अशा द्विविध पद्धतींनी श्रीशैवशास्त्रदर्शनाचा अभ्यास करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यांना आपापल्या श्रीसद्गुरुपरंपरेने सिद्धयोगांतर्गत शक्तिपातयोगदीक्षेने प्राप्त झालेले होते. परार्थाने शब्द म्हणजे शक्ती होय. या शक्तीचे कवच, टरफल किंवा आच्छादन म्हणजे तिने धारण केलेला संकुचित जीवपणा होय. तो दूर करण्यासाठी आणि श्रीशिवरूप होण्यासाठी हळुवार-

पण आले पाहिजे म्हणजे श्रीसद्गुरुकृपेने शक्तिपातयोगदीक्षा होऊन काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हे षड्रिपू, जरा, मरण, काम, क्रोध, लोभ, मोह, अहंकार व अविद्या हे अष्टबंध, घृणा, लज्जा, भय, शोक, निंदा, कुल, शील व जाती हे अष्टपाश आणि मल, विक्षेप व आवरण यांनी जड झालेले प्राण शुद्ध व सूक्ष्म होऊन सुषुम्नेत गेले पाहिजेत. शब्दरूप शक्तीची टरफले दूर करण्याचा हा पहिला साधनात्मक मार्ग होय. सूक्ष्मार्थाने शब्दाचा अर्थ वेद किंवा सारस्वत अगर शास्त्र होय. त्याचा रहस्यभेद करण्यासाठी "**श्रीअहिर्बुध्न्य संहिता**" या ग्रंथावर आधारित असलेल्या "**श्रीरहस्यत्रयसार**" या ग्रंथात श्रीवेदान्तदेशिक यांनी "**परो नाम रहस्यशास्त्रप्रतिपादिताक्षरनिघण्टु-प्रक्रियया प्रतीयमानोऽर्थः।।**" असे म्हणून परार्थाचे जे लक्षण सांगितले आहे त्या दृष्टीने रहस्य अर्थात् तंत्रशास्त्रात प्रतिपादित केलेल्या अक्षरांच्या अर्थामुळे प्रतीत होणाऱ्या ज्या अर्थाला पर अर्थ असे म्हणतात, त्या परार्थाची प्राप्ती करणे आवश्यक ठरते. या परार्थप्राप्तीच्या आवश्यकतेपोटीच महायोगी श्रीसिद्धगोरक्षनाथ यांचे "**श्रीअमरौघप्रबोध**" इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध केले. शब्दरूप शास्त्राची टरफले दूर करण्याचा अर्थात् बुद्धिरूप प्राणांना हळुवार करण्याचा हा दुसऱ्या प्रकारचा सैद्धान्तिक किंवा तात्त्विक मार्ग होय.

माझे श्रीसद्गुरू महासिद्धयोगी श्रीगुळवणीमहाराज यांनी वर उल्लेखिलेली उपेक्षा व हेळसांड दूर व्हावी म्हणून आपल्या उभ्या आयुष्यभर साधनात्मक किंवा कृतिशील (Practical) आणि तात्त्विक किंवा सैद्धान्तिक (Theoretical) अशा द्विविध पद्धतींचा अवलंब करून शक्तिपातयोगाची किंवा सिद्धमहायोगशास्त्राची पायाभूत उभारणी करून "**कळीं गिळितयां जिवां।। श्रीज्ञानेश्वरी १८.१७६०।।**" या न्यायाने या घोर अशा कलीने त्रस्त झालेल्या व गिळल्या जाणाऱ्या जीवांना दुःखापासून सर्व प्रकारे मुक्त करण्यासाठी जे अलौकिक, अभूतपूर्व व एकमेवाद्वितीय असे कार्य केले त्याला उभ्या भारतवर्षात क्वचित्च तोड सापडेल असे जर म्हटले तर त्यात यत्किंचितही अतिशयोक्तीच्या, हेत्वाभासाच्या किंवा अर्थवादाच्या म्हणजे स्तुतीच्या दोषाचा स्पर्श झाला असे त्यांच्या उपरोक्त द्विविध कार्यपद्धतीचा मागोवा घेतला म्हणजे कोणासही वाटणार नाही, असा नितांत विश्वास वाटतो.

या विवेचनाच्या प्रकाशात "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाचे साररूप विवेचन जर पुढीलप्रमाणे स्पष्ट केले तर ते सर्व सिद्धयोगसाधकभक्तयोगिशिष्यांना

उपयुक्त होईल असे वाटते. "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाचे शांभवोपाय, शाक्तोपाय व आणवोपाय यांना टीकाकारांनी आपापल्या इच्छेप्रमाणे प्रथम, द्वितीय व तृतीय उन्मेष किंवा पहिला, दुसरा व तिसरा अध्याय अगर प्रथम, द्वितीय व तृतीय विकास अशी नावे दिली असून श्रीभट्टभास्कराचार्य यांनी आपल्या वार्तिकात शांभवोपायाला "**सामान्य चित्प्रकाशस्वरूप निरूपण,**" शाक्तोपायाला "**सहजविद्योदय**" आणि आणवोपायाला "**विभूतिस्पंद**" अशी नावे दिली आहेत. श्रीभट्टभास्कराचार्यांच्या विभूतिस्पंदात पंधराव्या सूत्रानंतर एक अधिक सूत्र आले आहे त्यामुळे त्यांच्या "**श्रीशिवसूत्रे**" या संहितेत अठ्ठ्याहत्तर सूत्रे आली असून इतर सर्वांच्या संहितेत सत्त्याहत्तर सूत्रे आहेत. श्रीशैवदर्शनशास्त्राचे सर्व साररूप रहस्य या "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात साठवलेले असल्यामुळे श्रीक्षेमराजाचार्य यांनी आपल्या विमर्शिनीत या ग्रंथाचे अलौकिक माहात्म्य स्पष्ट करताना असे म्हटले आहे की, "श्रीशिवांनी दयाळू होऊन क्रमज्ञानपूर्वक ही सूत्रे सांगितली आहेत. आपला आत्मा हाच चिदात्मा श्रीशिव आहेत. या व्यतिरिक्त आत्मा म्हणजे दुसरे काहीही नसून आदि व अंती ते श्रीशिवच आहेत. ही श्रीशिवता स्वानुभवसिद्ध असून ती परिपूर्णपणे लौकिककार्य-कारणात्मक ऐश्वर्याचा आश्रय करूनच असते. ही श्रीशिवता सर्वांचे विश्रांतिस्थान आहे. ज्यावेळी चिदणूता म्हणजे चैतन्यस्वरूप असलेल्या जीवाला प्रत्यभिज्ञा प्राप्त होते त्यावेळी त्याला आपल्या हृदयात या स्वातंत्र्ययुक्त श्रीशिवतेची अनुभूती येते. मात्र जीव मायेच्या आवरणामुळे व "इदंता" ज्ञानाने आवृत झाल्यामुळे आपली स्वस्वरूपयुक्त श्रीशिवत्वाची प्राप्ती करून घेऊ शकत नसल्यामुळे या आत्मस्वरूपप्राप्तीची म्हणजे श्रीशिवशक्तिसामरस्याची प्राप्ती व्हावी अर्थात् या अंतिम स्थितीची अनुभूती यावी अशी जिज्ञासा असणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यांकरिता श्रीशिवांनी दयाळू होऊन क्रमज्ञानपूर्वक ही श्रीशिवसूत्रे कथन केली आहेत. मंदशक्तिपात झालेल्यांना आणवज्ञानाने, तीव्रमध्यशक्तिपात झालेल्यांना शाक्तज्ञानाने व तीव्रतरशक्तिपात झालेल्यांना शांभवज्ञानाने क्रमशः ऊर्ध्व, ऊर्ध्वतर आणि ऊर्ध्वतम अशा पायरी पायरीने सर्वोर्ध्व पदवीचा व सिद्धीचा लाभ होतो अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्याची प्राप्ती होते. अशा जिज्ञासू व अधिकारी साधकभक्तयोगिशिष्यांसाठीच श्रीशिवांपासून या श्रीशिवसूत्रांचा अवतार झाला आहे."

अशा या महान् ग्रंथात सिद्धयोगसाधनाचे उच्चतम पातळीवरील स्वरूप

व तदंगभूत तत्त्वज्ञानाचे सिद्धान्त कसे प्रकट झाले आहेत, हे आता पाहवयाचे आहे.

जगातील सर्व दार्शनिकांनी कोणत्या ना कोणत्या रूपात संसाराच्या मूळ पदार्थाचा विचार केला आहे. भारतीय दर्शनात या पदार्थाचे "तत्त्व" म्हणून सर्व दार्शनिकांनी वर्णन केले आहे. मूळ तत्त्व जाणले अर्थात् त्याच्याशी समरस झाले की, मोक्ष किंवा स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती होते व मूळतत्त्वाच्या विकृत रूपात गुंतल्यामुळे प्राणी बंधनात पडतो. हे बंधन किंवा आवरण दूर होणे हेच तत्त्वज्ञानाचे खरे स्वरूप आहे. तत्त्व म्हणजे पद, ब्रह्म, पुरुष, स्वसंवेद्य आत्मरूप किंवा श्रीशिव होत व ज्ञान म्हणजे शक्ती, कुंडलिनी, सत्ता, प्रकृती किंवा माया होय. ज्ञान झाले की, तत्त्वाची प्राप्ती होते. "**अतोऽत्यन्तप्रसिद्धं ज्ञानं ज्ञाताऽप्यत एव प्रसिद्ध इति। तस्माज्ज्ञाने यत्नो न कर्तव्यः किं त्वनात्मबुद्धिनिवृत्तावेव तस्माज्ज्ञान-निष्ठा सुसम्पाद्या।।**" असे श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथाच्या अठराव्या अध्यायातील पन्नासाव्या श्लोकावर भाष्य करताना म्हटले आहे. याचा अर्थ असा आहे की, ज्ञान अत्यंत प्रसिद्ध आहे; कारण ज्ञात्यावाचून केवळ ज्ञानाची सिद्धीच होणे शक्य नाही. (याप्रमाणे ज्ञान सर्वथा सिद्धच असल्यामुळे त्याविषयी भावना, उपाय, मार्ग इत्यादि विधी नाही.) याकरिता ज्ञानाविषयी यत्न करावयाला नको; तर अनात्मबुद्धी निवृत्त करण्यासाठीच साधना करावयाला पाहिजे. त्यामुळे ज्ञाननिष्ठा अनायासाने संपादन करता येण्यासारखी आहे. ही ज्ञाननिष्ठा संपादन करण्याची जी साधने आहेत तीही ज्ञानरूपच आहेत असे "**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम्।।१३.११।।**" या "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथातील श्लोकावर टीका करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी, "तत्त्वज्ञानाचा अर्थ मोक्ष असा असून सर्व संसाराचा उपशम, त्याचे आलोचन करणे, हे तत्त्वज्ञानार्थदर्शन होय व या तत्त्वज्ञानासाठी सांगितलेले साधनजातही ज्ञानच होय; कारण ते ज्ञानासाठी आहे," असे म्हटले आहे.

अशा या तत्त्वज्ञानाची प्राप्ती झाली की, जीवाला मोक्षप्राप्ती होते; कारण "**तत्त्वज्ञानान्निश्रेयसाधिगमः।।**" असे शास्त्रवचन आहे. जीव हा मूळचा ब्रह्मस्वरूप आहे; पण त्याला आपल्या स्वस्वरूपाचे स्वसंकोचामुळे अज्ञान प्राप्त झाल्यामुळे तो जीवभावाला प्राप्त होऊन बद्ध झाला आहे. या अज्ञानाची निवृत्ती स्वस्वरूपाचे अपरोक्षज्ञान झाल्याशिवाय इतर कोणत्याही उपायांनी

होत नाही. ज्याप्रमाणे प्रकाशाशिवाय अंधकाराचा विनाश इतर कोणत्याही उपायांनी किंवा साधनांनी होत नाही त्याप्रमाणे तमोरूप अज्ञानाची निवृत्ती तत्त्वज्ञानाशिवाय इतर कोणत्याही साधनांनी होत नाही. अज्ञानाच्या व जन्ममरणचक्रपरंपरेच्या फेऱ्यातून मुक्त होण्याकरिता जीवाला तत्त्वज्ञानप्राप्ती अर्थात् स्वसंवेद्य आत्मस्वरूपाशी समरस होणे हा एकच उपाय आहे व हे सर्व जग प्रकाशयुक्त परमात्मस्वरूप अर्थात् **"म्हणोंनि जग असकी वस्तुप्रभा ।। अनुभवामृत ८.२१।।"** आहे अशी जाणीव होणे, हेच या तत्त्वज्ञानाचे स्वरूप आहे.

जीव, जगत् आणि ईश्वर यांचे खरे स्वरूप काय आहे? हे कळून येणे याला तत्त्वज्ञान असे म्हणतात. ज्यावेळी **"तरी गुरु दाविलिया वाटा। येऊनि विवेकतीर्थतटा। धुऊनियां मळकटा। बुद्धीचा तेणे।। श्रीज्ञानेश्वरी १८.१०११।।"** याप्रमाणे श्रीसद्गुरूंनी शक्तिपात करून दाखविलेल्या सिद्धयोग-मार्गाच्या वाटेने जाऊन साधक शुद्ध होतो त्यावेळी त्याला तत्त्वज्ञानरूप सामरस्याची प्राप्ती होते. या प्राप्तीमुळे जीव, जगत् व ईश्वर ही भिन्न नसून एकरस व परिपूर्ण आहेत असा बोध होऊन द्वैत प्रपंचाचा बाध होतो. असे झाले म्हणजे ब्रह्म सत्य आहे, जगत् प्रकाशरूप आहे व जीव आणि परमात्मा म्हणजे श्रीशिव आणि शक्ती ही समरस आहेत असा अनुभव येऊन वेदान्ताचा परम सिद्धान्त सिद्ध होतो. शेवटी एक अद्वितीय, निष्प्रपंच व सच्चिदानंदघन अशी श्रीशिवशक्तियुक्त व परब्रह्मरूप स्वसंवेद्य आत्मवस्तूच शिल्लक राहते. यालाच अद्वयावस्था किंवा समरसावस्था असे म्हणतात.

महामाहेश्वराचार्य श्रीवसुगुप्तपाद विरचित **"श्रीशिवसूत्रे"** या ग्रंथातील सर्व सूत्रे ही श्रीशैवसंप्रदायाचा अर्थात् सिद्धयोगसाधनशास्त्राच्या महार्थाचा किंवा परार्थाचा महिमा प्रकट करणारी असून तो अनधिकारी लोकांना सांगू नये अशी शास्त्राज्ञा आहे. याचे खरे कारण म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी **"भारतीय संस्कृति और साधना," "खंड पहिला"** या ग्रंथातील **"ईश्वरमें विश्वास"** या लेखात लिहिल्याप्रमाणे हेच असावे की, "साधन जगत् का जो निगूढ रहस्य है, जिसकी प्राप्ति के लिये दीर्घकाल तक सत्यस्वरूप सद्गुरुकी कृपा का अवलंबन कर तीव्र पुरुषार्थ का प्रयोग करना पडता है, तार्किक प्रकृति विशिष्ट तथा साधनहीन पुरुषके सामने उस रहस्य की आलोचना करना उचित नहीं है। वहाँ इस आलोचना का यथार्थ फल उत्पन्न नहीं हो सकता।"

त्याचप्रमाणे योगिराज श्रीश्यामाचरण लाहिडी महाशयांनी "**श्रीमद्-भगवद्गीता**" या ग्रंथावर लिहिलेल्या "**आध्यात्मिकदीपिका**" या ग्रंथाच्या पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेत महामहोपाध्याय श्रीगोपीनाथ कविराज यांनी उपरोक्त विषयाच्या दृष्टीनेच असे म्हटले आहे की, "आध्यात्मिक व्याख्येच्या औचित्याच्या संबंधामध्ये अनेक लोकांची भिन्न भिन्न मते आहेत. लौकिक व्यवहार क्षेत्रामध्ये अशा प्रकारची व्याख्या अत्यंत अप्रासंगिक होते याविषयी कोणतीही शंका नाही. याचे कारण असे आहे की, सामान्य मनुष्य आपल्या सामान्य दृष्टीने जे काही पाहत असतो ते जाणून घेण्यासाठी त्याला असाधारण उपायांचा आधार घेण्याची आवश्यकता भासत नाही. परंतु सत्यदर्शनाची एक असाधारण अशी दिशा आहे. विशेषज्ञाशिवाय अन्य कोणीही ही दिशा जाणून घेऊ शकत नाही. असाधारण किंवा असामान्य असल्यामुळे हिला अग्राह्य किंवा उपेक्षणीय असे म्हणता येत नाही. आपल्या चिरपरिचित विश्वाला आपण ज्या दृष्टीने पाहत असतो त्या दृष्टीने एक उच्च कोटीचा वैज्ञानिक विश्वदर्शन करीत नाही. या वैज्ञानिकाच्या सूक्ष्मदृष्टीला जगताचे जे चित्र प्रतिभात होते किंवा जगताच्या ज्या चित्राचे ज्ञान होते ते सर्वजनप्रसिद्ध चित्राहून पूर्णपणे भिन्न असूनही अधिकतर सत्य आहे."

याकरिता "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील तत्त्वज्ञानाचा म्हणजे जीव, जगत् व ईश्वर यांच्या रूपाने होणारी पिंडब्रह्मांडाची उभारणी व सिद्धयोगसाधनाने अर्थात् महार्थाने या सर्वांची संहारणी होऊन श्रीशिवशक्तिसामरस्यावस्थेची प्राप्ती कशी होते हे या ग्रंथाद्वारे पाहिले म्हणजे या ग्रंथाच्या वास्तविकस्वरूपाचे रहस्य लक्षात आल्याशिवाय राहणार नाही व आपण या महार्थाला, परार्थाला, सर्व रहस्यार्थाला, भावार्थाला, निगर्भार्थाला, कौलिकार्थाला, महातत्त्वार्थाला व संप्रदायार्थाला अर्थात् सिद्धयोगसाधनाला योग्य आहोत अशी खात्री पटेल.

प्रथमतः महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्तपाद यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात पिंडब्रह्मांडाच्या उभारणीतील पहिल्या घटकाचे म्हणजे जीवाचे किंवा पिंडाचे अर्थात् साधकभक्तयोगिशिष्याचे जे स्वरूप मूळ सूत्रांमधून प्रकट केले आहे व टीकाकारांनी त्याचे स्पष्टीकरण आपल्या विमर्शिनी, वार्तिक इत्यादींमधून जसे स्पष्ट केले आहे ते पाहणे इष्ट ठरेल. जीव हा मायेच्या आवरणामुळे व इदंता ज्ञानाने आवृत झालेला असतो (१ मंगलाचरण पृ.५), जीव किंवा पशुप्रमाता हा सर्वमय आहे (१.१ पृ.१२), जीव आणि जडस्वरूप प्रपंचाचा आत्मा श्रीपरमशिवच असून तेच आत्मा आहेत (१.१ पृ.१६), आणवमलामुळे

जीव स्वतःला विश्वापासून तोडलेला एक भाग अर्थात् अपूर्ण समजतो. या अवस्थेत श्रीशिवांची महानता लपलेली असते आणि जीव "स्व"स्वरूप विसरलेला असतो (१.१ पृ.२१), कार्ममलामुळे प्रत्येक जीव आपल्या कर्माने आणि वासनेने निर्माण केलेल्या मर्यादित स्थितीत असतो (१.१ पृ.२२), मायीयमलामुळे जीवाला स्थूल व सूक्ष्म शरीर प्राप्त होते (१.१ पृ.२२), आणवमलामुळे आत्मा हा अणू अर्थात् जीवस्वरूपाला प्राप्त होतो (१.२ पृ.२३), आत्मा ज्ञानस्वरूप आहे. चित्ताच्या संयोगाने चित्तावर आत्म्याच्या चैतन्याचा भाव व्यक्त होतो. तो बाह्य विषयांकडे किंवा जाणिवांकडे प्रवृत्त झाल्यामुळे ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान या त्रिपुटीच्या बंधनात येऊन पडतो अर्थात् ज्ञातृ म्हणजे जीवभावात चैतन्यरूप आत्मा चित्ताशी तादात्म्य पावून स्वतःलाच ज्ञाता समजू लागतो. अशा प्रकारे त्याच्यात अणुचित्ताशी तादात्म्य पावल्यामुळे अणुत्वाचे ज्ञान आणि चित्ताच्या विषयांचे अल्पज्ञान झाल्यामुळे अल्पज्ञत्व येते. हे दोन्हीही बंधनस्वरूप आहे (१.२ पृ.२७), योनिवर्ग म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या बहिर्मुख विविध शक्ती या जीवाला कामोपभोगाकांक्षाइच्छा-तृष्णासंकल्पादींनी संसारात गुंतविणाऱ्या असून त्याच तिच्या शरीररूपाने असणाऱ्या कला म्हणजे उपशक्ती आहेत. अंबादि देवता शक्तिस्वरूप असून कला या त्यांची किरणे होत. पशुस्वभावी जीवात्म्याला त्या शब्दांच्या अनुगमाने त्या त्या प्रत्ययांचे उद्भासन करून देतात. यामुळे हा जीवात्मा या कलांच्या भोग्यरूपतेला प्राप्त होतो अर्थात् तो त्या कलांकडून म्हणजे पर्यायाने शब्दां-कडून अर्थात् शक्तींकडून भोगला जातो. ज्या प्रत्ययामुळे हा जीवात्मा भोग-रूपत्वाला जातो त्याच्यापासूनच जीवात्म्याचे स्वाभाविक स्वरूप अर्थात् श्रीपरमशिवस्वरूप त्या प्रत्ययापासून उत्पन्न होणाऱ्या ज्ञानाच्या आभासामुळे लुप्त होते (१.३ पृ.३१,३६), मायीय, कार्म व आणव या तीन मलांच्या आवरणाने जीवाचे द्वैतज्ञान दृढ होते. त्यामुळे तो स्वात्मविश्रांतिरूप अंतर्मुख भावापासून वेगळा होतो आणि बहिर्मुखतेच्या ज्ञानात स्वतःला विसरून जातो. हे सर्व अज्ञात संवित्मुळे होते. त्यामुळेच जीव बंधनात राहतो (१.४ पृ.३७), शब्दराशीपासून अर्थात् "अ" पासून "क्ष"कारापर्यंतच्या वर्ण-समुदायापासून निर्माण होणाऱ्या श्रीब्राह्मी, श्रीमाहेश्वरी इत्यादि देवतासमूहाच्या वशीभूत असेलल्या स्वतंत्र पतिप्रमात्याला किंवा श्रीपरमेश्वराला किंवा श्रीशिवांनाच पशुप्रमाता अर्थात् जीव असे नाव दिलेले आहे (१.४ पृ.३९), पिंडस्थ व पदस्थ जीव हे अबुद्ध, बुद्ध, प्रबुद्ध आणि सुप्रबुद्ध अशा चार प्रकारचे



असतात. त्यांना जाग्रत, स्वप्न व सुषुप्ती अशा तीन अवस्था असतात. या तीन अवस्थांमध्ये पतिपशूंना स्वरूपावभास व अनवभास हे स्वभावसिद्ध आहेत. हा ज्ञानज्ञेयादि पदांचा अभिप्राय आहे (१.८,९ व १० पृ.७१ ते ८१), हा मायेने मोहित होऊन अंध झालेला संसारी आणि कर्मांनी बांधलेला असा प्रमाता म्हणजेच जीव विद्येने स्वतःचे ऐश्वर्य जाणवून घेतल्यानंतर चैतन्ययुक्त असा मुक्त म्हणविला जातो. जीव हा स्वांगरूप भावांमध्ये अर्थात् पदार्थांमध्ये पती म्हणविला जातो. तोच मायेमुळे भिन्न झालेला व क्लेशकर्मादींनी कलुषित झालेला पशू म्हणविला जातो (१.१५ पृ.११४), तीच कुंडलिनी शक्ती येथे बीजांमध्ये जीव म्हणून चैतन्यात्मक होऊन येते (२.७ पृ.२१८), खंडित म्हणजेच अज्ञानी जीवाला थोडेसे स्वातंत्र्य देणाऱ्या तत्त्वांना महामायारूपी मातृका खालून वर आणि वरून खाली जाऊ व येऊ देत नाही. व्यक्तिगत जीवात्मा म्हणजे चित्त होय किंवा जन्ममरणचक्रपरंपरेमध्ये अखंड फिरत राहिलेला व कामोपभोगविषयवासनातृष्णाइच्छासंकल्पनांमध्ये रंगून गेलेला जीवात्मा म्हणजे चित्त किंवा मन होय (३.१ पृ.२५४), निरंतर किंवा सतत विषयांच्या वासनांनी भरलेले, निश्चयादि व्यापारांनी युक्त असणाऱ्या बुद्धी, अहंकार व कर्तृत्व यांनी युक्त असे मनोरूप जे चित्त असते तोच आत्मा होय. तो आत्मा चिदात्मक अर्थात् चैतन्ययुक्त अशा स्वस्वरूपाचे ज्ञान न झाल्यामुळे प्रकाश, चंचलता आणि आवरण किंवा अज्ञान हे विशेष असणाऱ्या सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांच्या कतृत्त्वाच्या वृत्तींचे अवलंबन करून नाना योनींमध्ये भटकत राहतो (३.१ पृ.२५९), सत्त्वगुण, रजोगुण आणि तमोगुणांच्या विषयवृत्तींनी युक्त जीव विषयवासनांमध्ये रंगलेला असतो. त्यामुळे त्या जीवात्म्याला भेदमयज्ञानामुळे सुख-दुःख, राग-द्वेष आणि मोह आदि गोष्टींमुळे निश्चय आणि विकल्पात अभिमान होतो. त्यामुळे भेदप्रथेचे ज्ञानच जीवाला बंधनात टाकून ते त्याला जन्ममरणाच्या चक्रातील यातनादेह धारण करविते (३.२ पृ.२६४ ते २८५), संकोच व अवभासन पावणारा, शून्यप्रधान किंवा प्राणप्रधान किंवा पुर्यष्टक अर्थात् सूक्ष्मशरीररूपी देहाच्या अपेक्षेने आत राहणारा जीव होय. याला अंतरात्मा म्हणावे; कारण प्राण व पुर्यष्टक यांनी नियंत्रित केलेला जीव असतो. त्याचप्रमाणे जीवभावाचा पुर्यष्टकप्राणच मुख्य असतो. येथे म्हणजेच जीवात स्थिर झालेला साधकभक्तयोगिशिष्य स्वतःच्या इंद्रियांच्या हालचालींनी जगन्नाट्याचे आभासन करतो (३.१० पृ.३३७), शब्दराशीपासून अर्थात् "अ"कारापासून "क्ष"कारापर्यंतच्या वर्णसमुदायापासून

निर्माण होणाऱ्या श्रीब्राह्मी, श्रीमाहेश्वरी इत्यादि देवतासमूहाच्या वशीभूत असलेल्या स्वतंत्र पतिप्रमात्याला किंवा श्रीपरमेश्वराला अथवा श्रीशिवांनाच पशुप्रमाता अर्थात् जीव असे नाव दिलेले आहे. पशुप्रमाता या कलासमूहाला वश होण्यामागील कारण असे आहे की, कलासमूहाने श्रीपरमेश्वराच्या असीम वैभवाला किंवा स्वातंत्र्याला पूर्णपणे नष्ट भ्रष्ट केलेले आहे (३.१९ पृ.३८१), जो जीव अर्थात् साधकभक्तयोगिशिष्य मोहाने किंवा अज्ञानाने व्याप्त होतो म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या बाह्यसंसारोन्मुख गतीने अर्थात् कामोपभोगाकांक्षा-तृष्णावासनाइच्छासंकल्पनांनी व्याप्त होतो म्हणजे तो सुखदु:खांचा आश्रय घेऊन किंवा त्यांचे आगर होऊन शुभ व अशुभ कर्मांनी लिप्त किंवा कलंकित होतो अर्थात् कर्मात गुरफटला जातो (३.३५ पृ.४७४), हव्यास किंवा इच्छा अगर अभिलाषा वाटल्यामुळे एका जन्मातून दुसऱ्या जन्मात नेला जाणारा पशू अथवा जीव बहिर्मुख गतीने युक्त होतो अर्थात् सर्वात्मभावाचा विमर्श न केल्यामुळे कर्माचे म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या बाह्य संसारोन्मुखतेने कामोप-भोगाकांक्षाइच्छावासनातृष्णासंकल्पनादींचे ओझे वाहणाऱ्या पशुजीवाचा व्यक्तिगत अभिलाषेमुळे विषयांकडे प्रसर होतो व तो जीव वारंवार जन्म-मरणचक्रपरंपरा भोगतो (३.४० पृ.५०७) आणि आपल्या सहजस्वातंत्र्याने श्रीसंविद्देवींनी प्रपंचाची विचित्रता प्रकट करण्याच्या इच्छेने संकुचितता अथवा मर्यादितपणा स्वीकारला. तिने श्रीशिवदशेतून विसर्गरूपात येऊन सृष्टी, स्थिती आणि संहाररूप जीवदशेचे ग्रहण केले. नाद नावाचे श्रेष्ठ बीज आहे. या बीजालाच प्राण असे म्हणतात. असा हा प्राण जीव म्हणून ओळखला जातो (३.४३ पृ.५३०).

येथपर्यंत आपण "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात आलेले जीवाचे स्वरूप काय आहे हे पाहिले. महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्तपाद यांनी "**श्रीस्पंदकारिका**" लिहून "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाचेच विस्तृत व सांगोपांग स्वरूप प्रकट केले आहे. याकरिता आपण प्रथम "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात कथन केलेले जीवाचे किंवा पिंडाचे अगर पशूचे स्वरूप साररूपाने पाहू व नंतर "**श्रीस्पंदशास्त्र**" (सिद्धयोग प्रकाशन) या ग्रंथात व त्यावरील टीकांमध्ये आलेल्या जीवाच्या श्रीशिवसूत्रांतर्गत स्वरूपाचा विचार करू.

श्रीशिवच आपल्या स्वातंत्र्यशक्तीने स्वत:च स्वत:ला संकुचित करून जीव झालेले आहेत. या दृष्टीनेच "**श्रीप्रत्यभिज्ञाहृदय**" या ग्रंथातील "**चिति-सङ्कोचात्मा चेतनोऽपि सङ्कुचितविश्वमय: ।।४।।**" व "**चितिरेव चेतन-**

**पदादवरूढा चेत्यसङ्कोचिनी चित्तम्।।५।।**" ही दोन्ही सूत्रे पाहण्यासारखी आहेत. या सूत्रांचा अर्थ असा आहे की, चिती म्हणजे चैतन्याशी अर्थात् श्रीशिवांशी एकरूप किंवा समरस असलेली शक्ती ही संकुचित झालेला आत्मा अर्थात् जीवात्माच आहे. ही आत्मरूपाशी अभिन्न म्हणजे एकरूप किंवा समरस असलेली शक्ती चेतन अर्थात् प्रकाशमय असूनही संकुचित अवस्थेमध्ये विश्वरूप व जीवरूप धारण करते.।।४।। ज्यावेळी चितिशक्ती ही चेतनपदावरून खाली उतरून प्रत्यक्ष विषयांच्या द्वारा संकुचित होते त्यावेळी तिला चित्त अर्थात् जीव असे म्हणतात. या अवस्थेमध्ये विशुद्ध चित्तत्त्व हे आपलेच रूपांतर असलेल्या मायाशक्तीच्या द्वारा आपल्याच अभिन्न अशा ज्ञानशक्ती, क्रियाशक्ती आणि मायाशक्ती यांचा संकोच करून अर्थात् संकुचित करून सत्त्व, रज व तमोगुणात्मक किंवा बुद्धी, मन व अहंकार यांच्या समष्टिरूपाने चित्तरूप अर्थात् जीवरूप धारण करते.।।५।।

चैतन्य म्हणून सर्व ठिकाणी एकच आहे. या चैतन्यालाच प्रकाशरूप आत्मा असे म्हणतात. या दृष्टीनेच "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात "**चैतन्यमात्मा ।।१.१।।**" असे म्हटले असून "**श्रीज्ञानेश्वरी**" या ग्रंथात श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**ऐसें उपाधीचेनि पाडें। क्षणिकत्व यातें जोडे।।१५.५००।। एवं जीवचैतन्य आघवें। हे क्षर पुरुष जाणावे।।१५.५०१।।**" व "**जेणें चैतन्या ईश्वर ब्रह्मा। देहचि केले परमसीमा।।१८.३८२।।**" असे सांगून उपाधीमुळे सीमाबद्ध झालेल्या जीवाचे मूळ आत्मस्वरूप चैतन्यरूप आहे असे म्हटले आहे. हा आत्माच उपाधी, प्रतिबिंब, माया, संकल्प, कल्पना, स्फूर्ती, आभास किंवा अन्य पद्धतीने संकोचरूप धारण करून जीव होत असतो. ज्यावेळी चैतन्याला पूर्व संस्कार चिकटतात त्यावेळी त्याला जीव असे म्हणतात. चैतन्य हे व्यापक असल्यामुळे जीवही व्यापक असतो; परंतु अज्ञानामुळे, कल्पनेमुळे किंवा संकोचामुळे अगर पिंडब्रह्मांडाच्या उभारणीच्या तत्त्वज्ञानातील कोणत्याही प्रक्रियेमुळे आपण व्यापक आहोत हे जीव विसरून जातो. "**स एतमेव सीमानं विदार्येतया द्वारा प्रापद्यत।।ऐतरेयोपनिषद् १.३.१२।।**" अर्थात् "श्रीईश्वरच या शरीरात मस्तकातील छिद्रातून प्रवेश करून जीव बनतो." "**श्रीमद्भागवत**" या ग्रंथाच्या एकादश स्कंधातही आत्माच जीव बनतो हे सांगताना असे म्हटले आहे की -

**स एष जीवो विवरप्रसूतिः प्राणेन घोषेण गुहां प्रविष्ट।**

**मनोमयं सूक्ष्ममुपेत्य रूपं मात्रा**
**स्वरो वर्ण इति स्थविष्ठः।।११.१२.१७।।**

परमात्माच जीवरूपाने आधारादि चक्रांमध्ये अभिव्यक्त होतो. त्यामुळे तो अपरोक्ष अर्थात् साक्षात् व्यक्त होतो. सर्व जीवांना जीवन देत असल्यामुळे जीव या संज्ञेला प्राप्त झालेला श्रीपरमेश्वर "परा" संज्ञक नादयुक्त प्राणासह आधारचक्रामध्ये, "पश्यंती" वाणीच्या रूपाने मणिपूरचक्रात, "मध्यमा" वाणीच्या मनोमय सूक्ष्मरूपाने विशुद्ध चक्रात व "वैखरी" वाणीच्या रूपाने मुखात प्रविष्ट होऊन मात्रा, स्वर व वर्ण इत्यादींच्या रूपाने अत्यंत स्थूल होतो. या श्लोकावरील श्रीसंत एकनाथमहाराजांची "**श्रीएकनाथी भागवत**" या ग्रंथातील टीका पाहिली म्हणजे जीवाचे स्वरूप अधिक स्पष्ट होईल. ते असे म्हणतात की, "श्रीपरमेश्वराच्या स्वातंत्र्यशक्तीनेच स्वतःला संकुचित करून घेऊन जीवरूप धारण केलेले आहे. ही मूळ बीजशक्ती अविद्यात्मक आहे. तिला अव्यक्त ही संज्ञा आहे. श्रीपरमेश्वर हा तिचा आश्रय आहे. माया हे या शक्तीचे स्वरूप आहे. तिच्यामध्ये सर्व संसारी जीव आपले खरे स्वरूप काय आहे हे न समजता स्वस्थपणे घोरत पडतात. अशी ही महानिद्रा आहे."

"**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथात श्रीभगवंतांनी "**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः।।१५.७।।**" असे सांगून जीव हा आपला अंशच आहे असे स्वच्छच म्हटले आहे. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराज "**श्रीज्ञानेश्वरी**" या ग्रंथात असे म्हणतात की -

**ऐसें शरीराचि येवढें। जैं आत्मज्ञान वेगळें पडें।**
**तैं माझा अंशु आवडे। थोडेपणें।।१५.२४३।।**
**समुद्र कां वायुवशें। तरंगाकार उल्लसे।**
**तो समुद्रांशु ऐसा दिसे। सानिवा जेवीं।।३४४।।**
**तेवीं जडातें जीवविता। देहअहंता उपजविता।**
**मी जीव गमें पंडुसुता। जीवलोकीं।।३४५।।**
**पैं जीवाचिया बोधा। गोचरु जो हा धांदा।**
**तो जीवलोकशब्दा। अभिप्रावो।।३४६।।**

उपरोक्त सर्व ओव्यांमधून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जीव या शब्दाचा जो अभिप्राय प्रकट केला आहे त्यातील रहस्य प्रकट करताना म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "**भारतीय संस्कृती और साधना,**" "**खंड पहिला,**" या ग्रंथामधील "**जपसाधना**" या लेखात असे म्हटले आहे की -

"अशा प्रकारे आत्मा स्वरूपतः पूर्णप्रकाशात्मक, श्रीपरमेश्वररूप, स्वतंत्र व भोक्ता असूनही स्वेच्छापूर्वक जीवभाव ग्रहण करतो. त्यामुळे त्याचे स्वातंत्र्य व भोक्तृभाव लुप्त होऊन जातात. वास्तविक पाहता आत्म्यामध्ये सर्व शक्तींचा समावेश व समन्वय आहे. त्यामुळे आत्म्याचा पूर्ण अहंभाव स्वभावसिद्ध आहे. "अ" पासून "ह" पर्यंत सर्व वर्ण व कला एकमेकांशी व आत्म्याबरोबर अभिन्नरूपाने व अखंडभावाने स्फुरित होणे ही आत्म्याची पूर्ण अहंता आहे. चैतन्य, विमर्श, स्वातंत्र्य किंवा ऐश्वर्य ही त्याचीच दुसरी नावे आहेत. या सर्व अकारादि वर्णांचे वाच्य अनुत्तरादि विमर्श आत्माच असून तो आपल्या विमर्शाचेही स्वरूप आहे. अखंड स्थितीत हे सर्व एक व अभिन्न-रूपाने प्रकाशित होतात; परंतु आत्मा ज्यावेळी स्वेच्छापूर्वक सृष्टयुत्पत्तीला उद्युक्त होतो त्यावेळी त्याच्या स्वरूपाश्रित असणारे सर्व अकारादि वर्ण उद्भूत होतात. अद्वैत अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्यावस्थेत सर्व कला अभिन्न भावाने आंतर शब्द किंवा स्वभावरूपात राहतात. या सर्व कला तत्-स्वरूपात अक्षुण्ण राहिल्यावरही सृष्टीच्या उन्मेषदशेत जणू काही अंशतः विभक्तरूपाने क्रमशः ब्राह्मी-प्रभृती अष्ट-वर्ग शक्तींच्या आणि अ, आ इत्यादि पन्नास रुद्र शक्तींच्या रूपात अवतीर्ण होतात. अकारादि वर्ण आत्म्याशी स्वतःशी विमर्शरूप व एकरूप असूनही अज्ञानावस्थेमध्ये आत्म्यापासून भिन्नरूपात प्रतीत होतात. या स्थितीत त्या कला किंवा अंश या नावाने संबोधिल्या जातात. हीच मातृकाशक्ती होय. श्रीमदाद्यशंकाराचार्य यांनी "**श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्र**" या स्तोत्रात "महाविभूती" म्हणून ज्यांचा उल्लेख केलेला आहे त्यांच्या द्वाराच आत्म्याचे ऐश्वर्य किंवा वैभव लुप्त होते. कला आत्मस्वरूपापासून उत्पन्न होऊन आत्म्याचा ऐक्यभाव झाकून टाकतात. त्यामुळे श्रीशिवरूपी आत्मा हा जीव किंवा पशुरूपात उत्पन्न होतो. हाच आत्म्याचा स्वरूपसंकोच किंवा अणुभावाची प्राप्ती आहे. मग हा अणुरूपी प्रमाता किंवा जीव पूर्वी वर्णन केलेल्या अष्टवर्गीय ब्राह्मी आदि शक्ती, अकारादि रुद्रशक्ती व त्यापासून उत्पन्न झालेल्या पदवाक्यादिमय असंख्य क्षुद्रशक्तींच्या खेळाची वस्तू बनतो. मातृका अणुजीवाच्या प्रत्येक संवेदनेमध्ये अंतःपरामर्शनाच्या द्वारा स्थूल अगर सूक्ष्म असा शब्दानुवेध करतात आणि वर्ग-वर्गी इत्यादि देवतांच्या अधिष्ठानाच्या द्वारा चित्तामध्ये काम, क्रोध, लोभ, मोह, राग, द्वेषादि भाव किंवा वृत्तिसमूह उत्पन्न करतात. अशा प्रकारे आत्म्याचे असंकुचित स्वातंत्र्यमय चिद्घनरूप झाकून जाते व देहात्मभाव,

पारतंत्र्य आणि पाशबंधनाचा सूत्रपात होतो."

येथपर्यंत "**श्रीस्पंदशास्त्र**" किंवा "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथामध्ये व त्यावरील टीकांमध्ये आलेले जीवाचे स्वरूप सुसूत्रपणे कथन केले. या दृष्टीने या ग्रंथातील जीवाच्या स्वरूपासंबंधीचे पुढील सिद्धान्त "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाच्या विस्तृतीकरणाच्या दृष्टीने पाहणे अभ्यसनीय ठरेल.

**(१)** स्पंदशास्त्राच्या मान्यतेनुसार मूलतः पूर्णचेतन स्वस्वभाव असलेला असा वरपासून खालपर्यंत एकच प्रमाता अर्थात् जीव किंवा ज्ञाता विद्यमान आहे. स्वतंत्र व आनंदमय असल्यामुळे हा प्रमाता किंवा ज्ञाता किंवा ज्ञान करून घेणारा पुरुष पतिप्रमाता अर्थात् श्रीपरमेश्वर आणि पशुप्रमाता अर्थात् जीव या दोन रूपांमध्ये अवस्थित आहे अर्थात् श्रीशिव आणि जीव ही प्रमात्याची दोन रूपे आहेत. (पृ.२५,२६)

**(२)** प्रत्येक पशूच्या किंवा जीवाच्या हृन्मंडलामध्ये निगूढ अर्थात् खोल रूपामध्ये असलेल्या ज्ञानक्रियात्मक स्पंदशक्तीच्या खऱ्या, स्वतंत्र तसेच सामान्य रूपाचे विस्मरण हाच त्या जीवाचा पाश आहे. (पृ.२७)

**(३)** प्रमाता म्हणजे जीवाच्या अंतःकरणात, बाहेर आणि अन्य पदार्थात राहणारी पूर्ण व परिमित म्हणजे संकुचित श्रीवामेश्वरी आदि देवी सम्यक् ज्ञान आणि अज्ञानाने मुक्ती व बंध प्रदान करीत असतात. (पृ.११०)

**(४)** हा शाक्तवर्ग एकीकडे अज्ञानी पुरुषांना अर्थात् जीवांना अधोगतीच्या गर्तेमध्ये लोटीत असतो तर दुसरीकडे श्रीसद्गुरूंच्या कृपेने निर्मळ हृदय बनलेल्या पुरुषांना श्रीशिवभावावर आरूढ करण्याची क्षमता या शक्तिवर्गामध्ये असते. (पृ.११०)

**(५)** ज्यावेळी संकुचित म्हणजे परिच्छिन्न शक्तींच्या द्वारा जीव मोहित होत नाही त्यावेळी तो शरीरी श्रीपरमेश्वर "श्रीशिवभट्टारकच" असतो. (पृ.११०)

**(६)** तो प्रमाता म्हणजे जीव आपल्या अंगरूप पदार्थांचा स्वामी आहे असे म्हटले जाते. मात्र मायेच्या द्वारा या पदार्थांचा भेद झाल्यावर तो क्लेशकर्मादींमुळे पशू अर्थात् जीव होतो. (पृ.१२४)

**(७)** जीवाला स्वरूपाच्या अपूर्णतेची अनुभूती ही आणव, मायीय आणि कार्म या तीन रूपांमध्ये अभिव्यक्त होत असते. (पृ.१४०)

**(८)** मायेचा स्वीकार केल्याकारणानेच बोध मलिन होऊन पुरुष पशू होतो. हा पुरुष पशू काल, कला, नियती, राग व अविद्येने उत्तम रीतीने

बांधलेला असतो. (पृ.१४५)

**(९)** ज्यावेळी या आधी सांगितलेल्या आणि पुढे सांगितल्या **जाणाऱ्या उपपत्तींच्या घट्ट पकडीमुळे आणि** अनुभवामुळे अभिलाषांनी **विवश झालेल्या ग्राहकाच्या (जीवाच्या) अभिमानाने युक्त असा क्षोभ अनात्म्यामध्ये आत्माभिमानाची निवृत्ती करीत आत्म्यामध्ये अनात्माभिमानाची शांती प्रकर्षाने करतो त्यावेळी त्या जीवाला श्रेष्ठ असे स्पंदतत्त्वात्मक पद प्राप्त होते. (पृ.१४८)**

**(१०)** शास्त्रकारांनी आध्यात्मिक **संदर्भाने संसाराच्या प्रमातृवर्गाला** अर्थात् ज्ञातृवर्गाला किंवा जीववर्गाला अबुद्ध, बुद्ध, **प्रबुद्ध आणि** सुप्रबुद्ध या चार प्रकारांमध्ये विभक्त केलेले आहे. (पृ.२२६)

**(११)** श्रीभगवान् हे परमकारुणिक अर्थात् परमदयाळू आहेत. यामुळे या श्रीभगवंताच्या शक्तिपातामुळे किंवा कृपेमुळे कोणत्याही वेळी एखाद्या प्रमात्यामध्ये किंवा जीवामध्ये अकस्मात् अशी योग्यता निर्माण होते की, त्या जीवाच्या अंतःकरणातील तपामध्ये किंवा अंधकारामध्ये दिव्य अशा श्रीशांकरभक्तीची किरणे स्वयं प्रवेशतात. (पृ.२२७)

**(१२)** प्रबुद्ध योगी अर्थात् साधक जीव हाच श्रीगुरूपदेशासाठी उपयुक्त अर्थात् योग्य व पात्र आहे. (पृ.२२८)

**(१३)** गुणादि रूपाने प्रवाहमान् असणारे हे विशेषस्पंद प्रतिक्षण चिद्रूप असणाऱ्या स्वतःच्या वास्तविक स्थितीवर आवरण घालण्यासाठी अर्थात् चिद्रूपावस्था झाकण्यासाठी उद्युक्त किंवा टपलेले असतात. हे विशेषस्पंद ज्यांना स्पंदतत्त्वाचे ज्ञान झालेले नाही अशा प्रबुद्ध बुद्धीच्या जीवांना दुस्तर अर्थात् तरून जाण्यास अवघड अशा भयंकर संसारमार्गात पाडतात. (पृ.२५०)

**(१४)** सर्व रीतीने स्वतंत्र असलेले श्रीशिव हे स्वतःच्या शक्तीच्या विरोधामुळे अस्वतंत्र अर्थात् परतंत्र पशू बनत असतात. असे संकोच पावलेले श्रीशिव हे अशुद्ध संसाराचे किंवा मार्गाचे प्रवासी बनलेले असतात. (पृ.२५४)

**(१५)** हे कालतत्त्व पशूला अर्थात् जीवाला अर्थात् अणूला त्रुटी, क्षण इत्यादिरूप कालभेदाच्या परिधींमध्ये अर्थात् कक्षेमध्ये किंवा मर्यादेमध्ये अडकवीत असते. काळाच्या तथाकथित मर्यादेच्या संकोचामध्ये पडल्यामुळे जीव हा संसारामधील किंवा जगतामधील प्रत्येक कार्यकलापासाठी निश्चित क्षण किंवा प्रहर यांच्या कल्पनेमध्ये व्यस्त राहतो अर्थात् गढून गेलेला असतो. (पृ.२५८)

**(१६)** अज्ञानी माणसाला म्हणजे जीवाला हे स्पंदाचे अर्थात् शक्तीचे प्रवाह पतित करण्यासाठी नेहमीच उद्युक्त असतात. यासाठी आपल्या विस्तृत स्वभावाने स्पंदतत्त्वाचा विवेक करण्याकरिता नेहमी उद्योग-साधन करीत राहिले पाहिजे. त्यामुळेच स्वस्वरूपाची अभिव्यक्ती होते. (पृ.२६५)

**(१७)** जीव ज्या अवस्थेला जातो त्या अवस्थेत स्पंदतत्त्व प्रतिष्ठित असते अर्थात् जीव व स्पंद म्हणजे शक्ती ही एकरूप असते. (पृ.२७६)

**(१८)** शब्दराशीपासून अर्थात् "अ"कारापासून "क्ष"कारापर्यंतच्या वर्णसमुदायापासून निर्माण होणाऱ्या श्रीब्राह्मी, श्रीमाहेश्वरी इत्यादि देवता-समूहाच्या वशीभूत असलेल्या स्वतंत्र पतिप्रमात्याला किंवा श्रीपरमेश्वराला किंवा श्रीशिवांनाच "पशुप्रमाता" अर्थात् जीव असे नाव दिलेले आहे. पशु-प्रमाता या कलासमूहाला वश होण्यामागील कारण असे आहे की, कला-समूहाने श्रीपरमेश्वराच्या असीम वैभवाला किंवा स्वातंत्र्याला पूर्णपणे नष्ट-भ्रष्ट केलेले आहे. (पृ.४२२)

**(१९)** भिन्न भिन्न शक्ती मी स्वतः श्रीपरमशिवरूप आहे या जागृतीला आवरण टाकण्याकरिता व शब्दसृष्टी ही खरी आहे असे भासविण्याकरिता जीवाला पशू बनवितात. त्याची पशुकाया कायम ठेवण्यासाठी या सर्व शक्तींचा कायम प्रयत्न असतो. या प्रयत्नामुळे एकदा जीवाला स्वस्वरूपाचा विसर पडला की, तो परतंत्र बनतो व त्याचे स्वातंत्र्य नाहीसे होते. (पृ.४४९)

**(२०)** याप्रमाणे श्रीपरशिवांशी अभिन्न असणारी परमेश्वरी शक्ती जेव्हा अधोमुख होऊन क्रियारूप बनते त्यावेळेला ती जीवांना पशू बनवून क्षणोक्षणी भेदाचाच अनुभव देऊन त्यांना नेहमी परतंत्रावस्थेत राखते. त्याचप्रमाणे ही परमेश्वरी शक्ती अधोमुखाने कार्यरत झाली की, ती जीवांना जन्ममरणादि संसारात फेकून देते. (पृ.४५४)

आता "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्तपाद यांनी पिंडब्रह्मांडाच्या उभारणीतील दुसऱ्या घटकाचे म्हणजे जगताचे, ब्रह्मांडाचे किंवा विश्वाचे जे स्वरूप कथन केले आहे ते पाहू. चेतनता ही भूः, भुवः व स्वःरूप असून तेच सर्व जगताचे स्वरूप आहे (१.१ पृ.७), जो चेत्यमान अर्थात् प्रकाशयुक्त नाही असा कोणताही स्वभाव असू शकत नाही व अशी चैतन्यविरहित स्थिती कधीही असणे शक्य नाही. यामुळे चेत्यमान्, स्वप्रकाश व चिदेकरस चैतन्यच स्वभाव आहे आणि हा सर्व विश्वाचा स्वभाव आहे

(१.१ पृ.७), श्रीशिवांच्या स्पंदात्मक विमर्शभूमिकेत किंवा शाक्तभूमिकेत अथवा ज्ञानभूमिकेत किंवा श्रीशिवांच्या ठिकाणी हे सर्व कार्यरूप असलेले जगत् अभेदरूपाने अवस्थित असते किंवा राहते आणि त्या श्रीशिवांपासून बाहेर पडते किंवा उत्पन्न होते (१.१ पृ.१३), अचेतनाला चेतन किंवा चैतन्यच प्रेरक असल्यामुळे व चिद्रूपाच्या तादात्म्यामुळे चेतन होण्याला योग्य असलेल्या व नसलेल्या सर्वच गोष्टी चिन्मय होतात. या श्रीशिवांनी सांगितलेल्या नीती म्हणजे तत्त्वानुसार स्थावरजंगमरूप निखिल विश्वाचे खरे स्वरूप चैतन्यच आहे (१.१ पृ.१६), श्रीपरमेश्वराने स्वस्वातंत्र्यशक्तीने आभासित स्वरूपाचे गुप्तत्व राखण्यासाठी महामायेची निर्मिती केली. माया ही श्रीशिवतत्त्व सोडून सर्वांना झाकणारी व "मायोपरि महामाया" अर्थात् मायेच्यावर असलेली महामाया ही श्रीशिवतत्त्व व श्रीशिवस्वातंत्र्य यांचे गुप्तत्व ठेवणारी अशी आहे. महामायाही आकाशाप्रमाणे स्वच्छ अशा आत्म्याच्या ठिकाणी श्रीशिव ते मायाप्रमाता जो जीव येथपर्यंतचा संकोच भासविते. श्रीशिवांच्या निर्विकल्प स्वरूपामध्ये विकल्पज्ञानाचा उदय होणे अर्थात् प्रत्ययोद्भव होणे हेच श्रीशिवांचे परामृतरसापासून अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्य या अवस्थेपासून भ्रष्ट होणे होय. यामुळे श्रीशिव स्वतःचे स्वातंत्र्य गमवितात व परतंत्र बनतात. त्यामुळे श्रीशिवांना विकल्पज्ञानाविषयी अर्थात् पाच तन्मात्रांविषयी म्हणजे संपूर्ण जगताविषयी अभिलाषा निर्माण होते (१.२ पृ.२५), संसाराचा अंकुर उत्पन्न होण्यासाठी म्हणून ते अज्ञानरूपी मलाची इच्छा करतात अर्थात् मलरूप अज्ञान हेच संसाराला कारणीभूत होणारे आहे (१.३ पृ.२९), पूर्णरूप चिदात्मा श्रीशिवांच्या स्वस्वरूपाला चिकटून राहण्याची इच्छा करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याला भाव, उद्योग व उन्मेषरूप उद्यम सांगितला आहे (१.५ पृ.५०), ज्याप्रमाणे पाण्याच्या लाटा असतात, अग्नीच्या ज्वाळा असतात आणि सूर्याची प्रभा असते त्याचप्रमाणे माझ्या श्रीभैरवस्वरूपापासूनच हे सर्व विश्व बाहेर पडलेले आहे अर्थात् हे विश्व माझ्यापासूनच उत्पन्न झालेले आहे (१.१२ पृ.९४), इच्छाशक्ती म्हणजेच परारूप पारमेश्वरी स्वातंत्र्यशक्ती कुंडलिनी असून तीच विश्वाची सृष्टी म्हणजे उभारणी आणि संहाररूपी म्हणजे संहारणीरूप क्रीडा करण्यात तत्पर असते (१.१३ पृ.९५,९६), निरावरण अर्थात् आवरणरहित चिद्रूपाच्या आवेशामुळे इच्छाशक्ती ही सृष्ट्यादि सर्व व्यवहार करते. हीच त्या विभूचे म्हणजेच सर्वव्यापक श्रीपरमेश्वराचे अखंडित कारण आहे. या शक्तीत इतर सर्व उपशक्ती समाविष्ट असतात. इच्छाशक्तीच्या

योगाने सर्व जगत् दृश्यमान् होते म्हणजे पिंडब्रह्मांडाच्या रूपाने विश्वाची उभारणी होते हेच या शक्तीचे अप्रतिहत, अखंड व समस्त स्वातंत्र्य आहे. त्यामुळे ती जशी इच्छा करते तसे होते. तिच्या या सामर्थ्यामुळे अनाश्रितापासून म्हणजे श्रीशिवांपासून पृथ्वीपर्यंत ती स्वतःच्या संकल्पाने निरावरण व चिद्घनरूप सर्व गोष्टींची निर्मिती करते (१.१३ पृ.९८,९९), परा भट्टारिका संवित् म्हणजेच चैतन्यशक्ती कुंडलिनी ही इच्छाशक्तीपासून स्थूल अशा ज्ञेयविषयांपर्यंत सर्व सृष्टीचे वमन करते अर्थात् निर्मिती करते. ही संवित् खेचरी आदि चक्रांच्या सर्व प्रवाहांची प्रवर्तिका आहे व विश्वाचे प्रतिबिंब ती सहन करते म्हणून स्वच्छ आहे (१.२२ पृ.१५३), जगत् निर्माण करणाऱ्या श्रीपरमेश्वराची समवायिनी अर्थात् नित्य संबंधित अशी शक्ती सांगितली आहे. ती शक्ती म्हणजेच सृष्टिकर्त्याचे इच्छात्व अर्थात् श्रीपरमेश्वराची इच्छाशक्ती होय. ही इच्छादि शक्ती पन्नास भेदांनी म्हणजे "अ" ते "क्ष" पर्यंत पन्नास वर्णरूपांनी मातृकामालिनीच्या रूपात शक्तीचे विश्वमय रूप दाखवितात. मलते **"विश्वमन्तर्दर्पणवत् धत्ते।।"** अर्थात् "विश्वाला अंतर्दर्पणाप्रमाणे म्हणजे प्रतिबिंबाप्रमाणे धारण करते" म्हणून तिला **"मालिनी"** असे म्हटले आहे अर्थात् ही मालिनी विश्वस्वरूपिणी आहे (१.२२ पृ.१५४), पराहंतेने म्हणजे अत्यंत श्रेष्ठ तेजाने युक्त अशी जी मातृका आहे तिने अनाश्रित श्रीशिवांपासून ते स्थूलज्ञेयअखेरपर्यंत म्हणजे ब्रह्मासहित भुवनापर्यंतचे सर्व विश्व व्यापिले आहे. सब्रह्म म्हणजे भुवनान्तकम् म्हणजेच आश्रय न घेणाऱ्या अनाश्रित अशा श्रीशिवांपासून स्थूल प्रमेय अर्थात् ज्ञेय वस्तूपर्यंत सर्व प्रकारचे जगत् होय (२.३ पृ.१८१), जगताची उत्पत्ती ही अक्षररूप असून या अक्षररूप शक्तींनीच हे जगत् व्याप्त झालेले आहे. संक्षेपाने असे म्हणता येईल की, जगत् हे वर्ण, मंत्र आणि पद हे वाचक अथवा कर्तृत्वाच्या बाजूने व कला, तत्त्व आणि भुवन हे वाच्य किंवा कर्मत्वाच्या म्हणजेच जगताच्या बाजूने बनलेले असते. "अहम्"मधल्या "अ" या स्वराने अनुत्तर अर्थात् सर्वोच्च सत्य आणि "ह" या स्वराने विसर्ग शक्ती सूचित केली जाते. या "अहम्"मध्ये वाच्य आणि वाचक विश्व गूढ स्वरूपात स्थित असते (२.७ पृ.२११ ते २३४), **"ऐतरेयोपनिषदात"** सृष्टीनिर्मितीचा विचार मांडला आहे तो पाहण्यासारखा आहे (३.१ पृ.२६१), ज्याप्रमाणे पाणी व बर्फ हे एकरूपच असते त्याप्रमाणे श्रीशिव आणि त्यांच्या शक्तीचे रूप असणारे जगत् हे एकच आहे (३.१७ पृ.३६९), जगत् हे ज्ञानरूप आहे (३.३० पृ.४४७), हे जगत्

म्हणजे श्रीशिवांच्या चैतन्याचे एक घट्ट झालेले अथवा गोठलेले स्वरूप आहे (३.३१ पृ.४५०) आणि सृष्टी ही लिंग, भग अथवा वीर्य अर्थात् रेतस् या कशा-मुळेही होत नाही. आनंदाने उसळणारी शक्ती स्वतःनेच स्वतःला निर्माण करीत असते आणि आपल्या सहज स्वातंत्र्याने श्रीसंविद्देवी प्रपंचाची विचित्रता प्रकट करण्याच्या इच्छेने संकुचितता अथवा मर्यादितपणा स्वीकारते. तिने श्रीशिवदशेतून विसर्गरूपात येऊन सृष्टी, स्थिती आणि संहाररूप जीवदशेचे ग्रहण केले. अशा प्रकारे सर्व विश्वामध्ये प्राणनशक्तीचे ग्रहण करून ग्राह्यरूप जगतात ती भासमान होऊ लागली. आपल्या स्वातंत्र्यात प्रथम अवभासित झालेल्या संविद्देवींचा हा प्राणस्पंद आहे (३.४३ पृ.५२६).

येथपर्यंत आपण "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात आलेले जगताचे स्वरूप काय आहे हे पाहिले. आता आपण प्रथम शास्त्रकारांनी जगताचे किंवा ब्रह्मांडाचे अगर विश्वाचे जे स्वरूप कथन केलेले आहे त्याचे साररूप पाहू व नंतर महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्तपाद यांनी "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात श्रीशिवसूत्रांतर्गत जगताचे जे विस्तृत व सांगोपांग स्वरूप प्रकट केले आहे त्याचेही साररूप काय आहे ते पाहू.

"श्रीभगवान् हे सृष्टी, स्थिती, संहार, निग्रह किंवा तिरोधान व अनुग्रह या पाच कृत्यात नेहमीच मग्न असतात. ही त्यांची नित्यकृत्ये आहेत. त्यामुळे ते आपल्याशी अभिन्न असलेल्या शक्तीच्या द्वारा सृष्टीची किंवा विश्वाची निर्मिती करतात. श्रीभगवान् आपल्या स्वातंत्र्यशक्तीने सर्वात् प्रथम आपल्या स्वरूपाला आच्छादित करणाऱ्या महामाया शक्तीला प्रकट करतात. त्यामुळे आकाशवत् स्वच्छ व प्रकाशमान् आत्म्यात संकोचाचा आविर्भाव होतो. त्यावेळी प्रकाश म्हणजे मूळ आत्मस्वरूप व विमर्श म्हणजे सृष्टीचे प्रकटीकरण या दोन्हींचे स्वरूप विद्यमान असते. सृष्टीच्या सर्व व्यापाराच्या मुळाशी प्रकाश व विमर्श या दोहोंचीही सत्ता राहते हे प्रसिद्ध आहे. ज्यावेळी पराशक्ती स्वातंत्र्याच्या उन्मेषाने अंतर्लीन अवस्था सोडून देऊन अभिव्यक्त होते त्यावेळी विश्वरूप-चक्राचे आवर्तन सुरू होते. खरे पाहता सृष्टीची अभिव्यक्ती ही शक्तीची किंवा विमर्शाची होत असते. प्रकाश हा या स्थितीत केवळ उपचारमात्र असतो. या दृष्टीने पाहिले तर हे लक्षात येते की, तत्त्वमात्रच शक्तीच्या स्वातंत्र्योल्लासाची विशेष अशी अवस्था आहे. याकरिता श्रीशिवतत्त्व हृद्तत्त्व असल्यामुळे त्याची शक्तिकोटीत गणना होते. याकरिता प्रकाश व विमर्श हे एक प्रकारे परमविमर्शाचे केवळ रूपात्मक भेद आहेत. या स्थितीत शुद्ध परमात्मतत्त्व

यांमध्ये अंतर्लीन राहते. याकरिता तत्त्वांचा विचार करताना प्रकाश व विमर्श हे दोन्हीही विमर्शात्मक किंवा शक्त्यात्मक असल्यामुळे त्यांच्यात अंशांची कल्पना केली जाते.

"**श्रीवामकेश्वरतंत्र**" या ग्रंथाच्या मताने प्रकाशाचे चार अंश असून त्याच्याशी एकरूप असलेल्या विमर्शाचेही चार अंश आहेत. अंबिका, वामा, ज्येष्ठा व रौद्री या नावांचे प्रकाशाचे चार अंश असून शांता, इच्छा, ज्ञान व क्रिया या नावांचे विमर्शाचे चार अंश आहेत. अंबिका व शांता यांच्या सामरस्यावस्थेमध्ये शांतभावयुक्त पराशक्ती ही परावाक् या नावाने प्रसिद्ध आहे. हीच आत्मस्फुरणाची अवस्था आहे.

**आत्मनः स्फुरणं पश्येद्यदा सा परमा कला।**
**अम्बिकारूपमापन्ना परावाक् समुदीरिता।।**

**अर्थ :-** ज्यावेळी ही पराशक्ती आपल्या स्फुरणाला पाहते त्यावेळी ती अंबिकारूपाला प्राप्त झालेली "परावाक्" आहे असे म्हटले जाते.

या आत्मस्फुरणाच्या अवस्थेत संपूर्ण विश्व बीजरूपाने अर्थात् अस्फुट रूपाने आत्मसत्तेत विद्यमान असते. त्यानंतर शांतेपासून इच्छेचा उदय झाल्यावर विश्व अव्यक्त विश्वशक्तीच्या गर्भातून बाहेर येते. त्यावेळी इच्छाशक्ती वामाशक्तीशी एकरूप होते व पश्यंतिवाक् या नावाने ओळखली जाते. यानंतर ज्ञानशक्तीचा आविर्भाव होतो. ज्ञानशक्ती ही ज्येष्ठेबरोबर एकरूप असून मध्यमावाक् या नावाने ओळखली जाते. ही शक्तीच सृष्ट म्हणजे दिसणाऱ्या विश्वाच्या स्थितीचे कारण आहे. ज्ञानानंतर क्रियाशक्ती रौद्री-बरोबर एकरूप होऊन वैखरी या नावाने प्रसिद्धीला येते. प्रपंचात्मक वाग्-वैचित्र्य हे वैखरीचेच स्वरूप आहे. **(भारतीय संस्कृती और साधना, खंड पहिला, लेख - "तांत्रिक दृष्टि," पृष्ठ ३८ ते ४०)**

शक्ती अर्थात् प्रकृती हीच विश्वनिर्मितीला कारणीभूत आहे हे कथन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज यांनी "**श्रीज्ञानेश्वरी**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**मा इये प्रकृती तंव। गुणमयी हेंचि नांव।**
**किंबहुना सावेव। गुण तेचि हे।।१३.९८७।।**
**हे प्रतिक्षणीं नित्य नवी। रूपा गुणाचीच आघवीं।**
**जडातेंही माजवी। इयेचा माजु।।९८८।।**
**हे वाङ्मयाची वाढी। साकारपणाची जोडी।**

**प्रपंचाची धाडी। अभंग हे।।९८९।।**
**कळा येथून जालिया। विद्या इयेच्या केलिया।**
**इच्छा ज्ञान क्रिया। वियाली हे।।९९०।।**

अशा प्रकारे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सृष्टीच्या उन्मीलनात्मक किंवा उभारणीचे जे स्वरूपरहस्य प्रकट केले आहे ते वर वर्णन केलेल्या विवेचनाचे सारच आहे. या दृष्टीनेच शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की, "**अकार सर्ववर्णाग्र्यः प्रकाशः परमः शिवः। हकारोऽन्त्यकलारूपो विमर्शः कथितः प्रिये।।**" याचा अर्थ असा आहे की, "अ" म्हणजे श्रीशिव हे प्रकाशात्मक आहेत व "ह" म्हणजे शक्ती ही विमर्शात्मक असल्यामुळे "अ" व "ह" हे दोन वर्ण सर्व वर्णमालेचे द्योतक आहेत. ही सर्व वर्णमाला श्रीभगवंताच्या प्रकाश किरणांचे किंवा शक्तींचे प्रतीक आहे. "ह" हा प्राणवाचक आहे. चिच्छक्ती ही प्राणशक्तीच्या रूपात परिणत होऊन पुन्हा विलोमक्रमाने आपल्या मूळ श्रीशिवस्थानात परत येते. त्यावेळी पुन्हा क्रियेचा आविर्भाव होऊन "अ" किंवा अनुत्तराबरोबर म्हणजे श्रीशिवांबरोबर समरस होते. याचेच नाव "अहं" असे आहे. हा "अहं" सतत स्पंदमय असतो. यातूनच पुढे "इदं" भावाची उत्पत्ती होते म्हणजे सृष्टीची रचना होते. "इदं" भावच विश्वाचे प्रतीक आहे. या दृष्टीने पाहिले म्हणजे सर्व विश्व हे शब्दापासून उत्पन्न होणारे व शब्दातच राहणारे आहे. "**शब्देष्वेवाश्रिता शक्तिर्विश्वसास्य निबन्धनी।।,**" "**वागेव विश्वा भुवनानि यज्ञे वाच इत् सर्वाममृतं यच्च मर्त्यम्।।**" इत्यादि शास्त्रवचनांवरून हे स्पष्ट होते की, शब्दच म्हणजे शक्तीच जगत्-सृष्टीचे मूळ आहे व सृष्टीच्या बाहेर जाण्यासाठी शब्दच अर्थात् शक्तीच एकमात्र उपाय आहे." **(भारतीय संस्कृति और साधना, खंड पहिला, लेख - शक्तिका जागरण पृ. ३१७ व जप-साधना पृ. ३३०)**

येथपर्यंत "**श्रीस्पंदशास्त्र**" किंवा "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथात ग्रथित झालेले जगताचे, सृष्टीचे किंवा विश्वाचे स्वरूप थोडक्यात सूत्ररूपाने कथन केले. या दृष्टीने या ग्रंथातील जगत्सृष्टीसंबंधीचे पुढील सिद्धान्त लक्षात ठेवण्यासारखे आहेत.

**(१)** श्रीपरमेश्वराच्या स्वरूपाशी अभिन्न असणारी शक्तीच सर्व काही बनली आहे. (पृ.५)

**(२)** श्रीभगवंताच्या ज्या अनंत शक्ती आहेत तेच श्रीईश्वराचे ऐश्वर्य आहे. हे सर्व जगत् शक्तिरूप आहे. (पृ.५६)

**(३)** श्रीपरमेश्वर हा स्वतःच्या शक्तीने म्हणजे इच्छाशक्तीने जगाची उत्पत्ती व लय करतो. स्थिती अवस्थेमध्ये हे जगत् त्याच्या शक्तीचे वैभव असते अर्थात् जे जे काही दिसते ती ती शक्तीच आहे. जगत् असे मुळीच नाही. (पृ.६)

**(४)** या विश्व-व्यवहाराचे कारण वाणीच आहे. (पृ.७)

**(५)** जगताचा उदय व विलय शक्तीच्या प्रसाराशी व संकोचाशी बांधलेला आहे. (पृ. ८)

**(६)** हे प्रभो ! तुमच्या उन्मेष-निमेषाच्या केवळ आशयालाच सृष्टी व प्रलय असे म्हणतात. उन्मेषामध्ये ज्ञानक्रिया आदि गर्भित इच्छाशक्तीचा निवास असतो व तीच प्रसारित होते. इच्छेमुळे ज्ञान प्रवृत्त होते व क्रिया-शक्तीच्या साधनामुळे पदार्थांची उत्पत्ती होते. (पृ.८)

**(७)** संविन्मय अर्थात् शक्तिमान् विश्वाला हा याच स्पंदमय स्वातंत्र्यामुळे अर्थात् या स्पंदमय स्वातंत्र्याच्या साहाय्याने आपले स्वरूप लपवून आणि विद्युद्गतीने प्रकट करून अक्रमामध्ये क्रमाचे आणि क्रमामध्ये अक्रमाचे अवभासन अर्थात् प्रकाशन करण्याची क्रीडा करीत असतो. (पृ.१९)

**(८)** हीच स्पंदशक्ती विश्वातील प्रत्येक दृश्यमान् अथवा अदृश्यमान् पदार्थाला सत्ता देत असते. इतकेच नव्हे; तर ज्या वस्तूंच्या प्रत्यक्षरूपामध्ये पूर्ण अभाव असतो त्या वस्तूंनाही कल्पनेच्या द्वारा स्थिती प्रदान करीत असते अर्थात् आकाशपुष्प, वंध्यापुत्र आणि शशशृंगासारख्या कल्पना उत्पन्न करून व्याप्त होऊन राहतो. (पृ.१९)

**(९)** या विश्वामध्ये जितके पदार्थ आहेत ते सर्व पदार्थ शक्तिरूपच आहेत.

**(१०)** हा सर्व दृश्यमान् प्रपंच मौलिक स्वातंत्र्यशक्तीचाच विकास आहे. अशी अनंतरूपे असूनही ही स्वातंत्र्यशक्ती मुख्यतः इच्छा, ज्ञान आणि क्रिया या तीन रूपांमध्ये शाश्वतरूपाने स्फुरित होत असते. (पृ.२१)

**(११)** या विश्वामध्ये श्रीब्रह्मदेवांपासून गवताच्या काडीपर्यंत जितके असंख्य पदार्थ प्रत्यक्ष किंवा अनुभव यांचे विषय बनलेले असतात, ते सर्व पदार्थ श्रीपरमेश्वराच्या अनंत शक्तींचे स्रोत आहेत. (पृ.२५)

**(१२)** शक्ती ही आपल्या मौलिक विश्वोत्तीर्ण चिन्मात्र रूपामध्ये अवस्थित असली तरीही सर्व विभूतींना या शक्तीने आपल्या गर्भामध्ये ठेवलेले किंवा धरलेले असते अथवा विश्वमय शक्तिप्रसादाच्या रूपामध्ये अवस्थित असली

तरीही ही शक्ती कल्पनातीत विश्वाला साकार करण्याचे दुर्घट कार्य संपन्न करणाऱ्या वैभवाने परिपूर्ण असते. (पृ.२६)

**(१३)** हीच शक्ती स्वरूपाच्या आधाराने विश्वाच्या चित्राची रचना केल्यावरही स्वयं निर्मलरूपाला धारण करणारी असते. (पृ.२६)

**(१४)** श्रीपरमेश्वरच या जगताच्या सृष्टिसंहारादि क्रीडेला कारणीभूत असून तो त्याच्यामध्ये आधीपासून अस्तित्वात असणाऱ्या पदार्थांचे अवभासन किंवा प्रकाशन करीत असतो. त्याच्याशिवाय उत्पत्तीची इच्छाच शक्य होणार नाही. (पृ.३६)

**(१५)** भगवान् हे चिदात्मा असल्यामुळे एखाद्या योग्याप्रमाणे लौकिक सामग्रीशिवाय केवळ इच्छेनेच आंतर विमर्शरूपामध्ये अर्थात् विचारांच्या म्हणजे शक्तीच्या रूपामध्ये असलेल्या पदार्थवर्गाला बाह्यरूपामध्ये अवभासित करीत असतात. (पृ.४९, ५०)

**(१६)** ज्याप्रमाणे विचित्र नगर, गाव इत्यादि गोष्टी अविभक्त किंवा अभिन्न असल्या तरीही आरशात प्रतिबिंबित झाल्यावर मूळ रूपाहून किंवा बिंबाहून निराळ्या आहेत असे भासित होते त्याप्रमाणे अत्यंत निर्मल असलेल्या परमश्रेष्ठ श्रीभैरवांच्या संवित् म्हणजे शक्तीपासून अभिन्न म्हणजे एकरूप किंवा विभागशून्य असलेले हे जगत् एक-दुसऱ्यापासून आणि त्या परमतत्त्वापासूनही भिन्न आहे असे भासित होते. (पृ.५१)

**(१७)** जगताला प्रकाशित करणारे परमतत्त्व व जग यांच्यामध्ये भेद नाही. (पृ. ५६)

**(१८)** हे सर्व जग या तत्त्वाच्या अर्थात् श्रीशिवांच्या क्रियेचे साररूप प्रकाशन आहे. (पृ. ५७)

**(१९)** निळा, पिवळा इत्यादि रंगांमध्ये किंवा सुख-दु:खादि भावनांमध्ये म्हणजे सर्व गोष्टींमध्ये चित्स्वरूप अखंडित असते. चित्रविचित्र उपाधींचे नानाविध विकल्प चित्स्वरूप निरनिराळे आहेत असे फक्त भासविते.

**(२०)** ज्ञान हे नीलसुखादि रूपाने अंतर्बाह्य प्रकाशते. ज्ञानावाचून वस्तूला सत्ता किंवा अस्तित्व नाही. त्यामुळे जगत् हे ज्ञानरूपच आहे. (पृ.९६)

**(२१)** या सत्पासून बनलेला सर्व कार्यरूप प्रपंच हा संवृतिसत्य अर्थात् आवरण सत्य आहे. (पृ.९८)

**(२२)** ही सतत स्पंदमयी पारमेश्वर सत्ता नित्य असल्यामुळे आदि-अंतरहित असते. ही परमेश्वराची सत्ता विश्वाकृती असल्यामुळे स्वत:च

चेतनरूप, जडरूप आणि विश्वाच्या विचित्र आकारप्रकाराचे अवभासन करणारी आहे. सत्य गोष्ट अशी आहे की, या कारणांनी ही स्पंदमयी परमेश्वराची सत्ता स्वतः बहुरूपी अर्थात् अनेक रूपे धारण करणारी अशी आहे. (पृ.१२१)

**(२३)** श्रीशिवांच्या निर्विकल्प स्वरूपामध्ये विकल्पज्ञानाचा उदय होणे अर्थात् प्रत्ययोद्भव होणे हेच त्या श्रीशिवांचे परामृतरसापासून अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्य या अवस्थेपासून भ्रष्ट होणे आहे. यामुळे श्रीशिव स्वतःचे स्वातंत्र्य गमावतात व परतंत्र बनतात. यामळे श्रीशिवांना विकल्प-ज्ञानाच्या विषयी अर्थात् पाच तन्मात्रांविषयी अर्थात् संपूर्ण जगताविषयी अभिलाषा निर्माण होते. (पृ.४३८)

**(२४)** श्रीशिव प्रकाशरूप आहेत व शक्ती विमर्शरूप आहे म्हणून संपूर्ण विश्व हे प्रकाशविमर्शमय आहे. (पृ.४४४)

यानंतर "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्त यांनी पिंडब्रह्मांडाच्या उभारणीतील तिसऱ्या घटकाचे म्हणजे श्रीईश्वराचे, श्रीशिवांचे किंवा श्रीपरमेश्वराचे जे स्वरूप कथन केले आहे ते पाहू. आत्मा हा स्वात्मा श्रीशिव आहेत, विमोहिनीशक्तीमुळे हे श्रीशिव आच्छादित असल्यासारखे दिसतात; पण वस्तुतः ते आच्छादित नसून नेहमी प्रकाशमान आहेत (१ मंगलाचरण पृ.४), आपला आत्मा हाच चिदात्मा श्रीशिव आहेत. या व्यतिरिक्त आत्मा म्हणजे दुसरे काहीही नसून आदि व अंती तो श्रीशिवच आहे. ही श्रीशिवता स्वानुभवसिद्ध असून ती परिपूर्णपणे लौकिक कार्य-कारणात्म ऐश्वर्याचा आश्रय करूनच असते. ही श्रीशिवता सर्वांचे विश्रांति-स्थान आहे (१.१ पृ.५), उन्मेष म्हणजे श्रीशिवांच्या शक्तीचा प्रसार व निमेष म्हणजे श्रीशिवांच्या शक्तीचा संकोच, यावर सर्व अवलंबून आहे. चैतन्य अर्थात् चितिशक्ती म्हणजे कुंडलिनी हीच आत्मा आहे. त्यामुळे चैतन्य म्हणजे कुंडलिनीशक्ती आणि आत्मा म्हणजे श्रीशिव हे दोन्ही राहूचे शीर या कल्पनेप्रमाणे अभेदात्मक किंवा समरस आहेत. वास्तविक पाहता त्यांच्यात कोणताच भेद नाही (१.१ पृ.७), कुंडलिनीशक्तीच्या अनावृत श्रीशिवरूपाचे कोणालाही निराकरण किंवा ते दूर करता येत नाही (१.१ पृ.९), जी प्रमाणे वस्तूंच्या जीवनाचा विस्तार करतात त्यांच्यापेक्षाही श्रेष्ठ जीव अस्तित्वात असून तोच श्रीपरमेश्वर आहे. जीव हा प्रमाणांचा सिद्धिकर्ता असून तो प्रमाणांपलीकडे आहे व तोच श्रीपरमेश्वर आहे म्हणून प्रमाणांची गरज नाही

(१.१ पृ.१३), श्रीशिवांच्या स्पंदात्मक विमर्शभूमिकेत किंवा शाक्तभूमिकेत अथवा ज्ञानभूमिकेमध्ये किंवा श्रीशिवांच्या ठिकाणी हे सर्व कार्यरूप असलेले जगत् अभेदरूपाने अवस्थित असते किंवा राहते आणि त्या श्रीशिवांपासून बाहेर पडते किंवा उत्पन्न होते. त्या श्रीशिवांच्या किंवा सत्तेच्या अनाच्छादित अर्थात् आच्छादनरहित किंवा आवरणरहित स्वरूपामुळे स्वतंत्र प्रसारात कोठेही अडचण किंवा अडथळा असत नाही (१.१ पृ.१३), श्रीपरमशिवांचे चित्क्रियारूप चैतन्य हेच स्वातंत्र्य असून तेच आत्मा आहेत. यामुळेच श्रीशिव हे सर्वश्रेष्ठ आहेत (१.१ पृ.१६), स्वातंत्र्य हे फक्त सहा प्रकारच्या ऐश्वर्यांनी संपन्न अशा श्रीपरमशिवांचे असते (१.१ पृ १७), जीव हा स्वतःला विश्वापासून तोडलेला एक भाग अर्थात् अपूर्ण समजतो. या अवस्थेत श्रीशिवांची महानता लपलेली असते आणि जीव "स्व"रूप विसरलेला असतो (१.१ पृ.२१), पूर्ण परमात्म्याचे काहीही करण्याचे स्वातंत्र्य हे स्वाभाविक किंवा सहज असते अर्थात् ते कोणत्याही प्रकारे साधनात्मक कारणावर किंवा बाह्य वस्तूवर अवलंबून नसते (१.१ पृ.२२), श्रीशिवांच्या निर्विकल्प स्वरूपामध्ये विकल्पज्ञानाचा उदय होणे अर्थात् प्रत्ययोद्भव होणे हेच श्रीशिवांचे परामृतरसापासून अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्य या अवस्थेपासून भ्रष्ट होणे होय. यामुळे श्रीशिव स्वतःचे स्वातंत्र्य गमवतात व परतंत्र बनतात. त्यामुळे श्रीशिवांना विकल्पज्ञानाविषयी अर्थात् पाच तन्मात्रांविषयी अर्थात् संपूर्ण जगताविषयी अभिलाषा निर्माण होते (१.२ पृ.२५), विश्वाची उत्पत्ती, स्थिती व लय करणारे श्रीशिवतत्त्व म्हणजेच श्रीभैरव होत (१.५ पृ.४६), श्रीपरमशिवच सर्व वेद्याच्या आकाराने म्हणजे ज्ञेयवस्तूंच्या रूपाने नटलेले असतात. जरी ते स्फटिकाच्या शिळेप्रमाणे एकसंध असले तरी ज्याप्रमाणे निरनिराळ्या वस्तू स्फटिकशिळेच्या खाली ठेवल्यावर ती स्फटिकशिळा विभिन्न दिसते त्याप्रमाणे श्रीपरमशिव संकुचित भूमिका धारण केल्याप्रमाणे आत-बाहेर निरनिराळ्या भावाने दिसतात. असे जरी असले तरी श्रीपरमशिव आपला सत्ताप्रकाश सर्व वस्तूंना प्रदान करीत असल्यामुळे त्या सर्व वस्तू चेतनयुक्त व जीवित दिसतात व जीवभाव असलेल्या गोष्टी श्रीशिवच होत (१.१४ पृ.१०५), हे शरीर म्हणजे श्रीभगवान् शब्दराशी श्रीशिव होत. त्यांची सत्ता म्हणजे कुंडलिनी शक्ती ही त्यांच्याशी सर्व अध्वांमध्ये पूर्णाहंतारूपाने असते (२.३ पृ.१८९), जे श्रीसद्गुरू आहेत ते श्रीशिव असून श्रीशिव म्हणजे श्रीसद्गुरू होत. श्रीसद्गुरू आणि श्रीशिव यांच्यात कोणतेही अंतर, फरक किंवा

भेद असत नाही (२.६ पृ.२०६), निष्कल अर्थात् कलारहित किंवा श्रीपरमशिव हे सर्वश्रेष्ठ व उत्कृष्ट श्रीशिव आहेत. ते सर्व सृष्टीच्या पलीकडचे आहेत. श्रीशिव हे त्या श्रीपरमशिवांचे पहिले सृष्ट्यात्मक स्पंदन असून त्यांच्यातच "अहम्"ची उत्पत्ती होते. विमर्श या नावाने ओळखल्या जाणाऱ्या या "अहम्"-मध्ये एखाद्या प्रकाशरूप आरशाप्रमाणे सर्व वर्ण किंवा अक्षरे म्हणजे वाचक आणि वाच्य म्हणजे वस्तू गुप्त स्वरूपात असतात. ज्याप्रमाणे एखाद्या मोराच्या अंड्यामध्ये विविध रंगांनी युक्त पिसाऱ्याचा जीवनरस गुप्त रूपात असतो त्याप्रमाणे हे वर्णादि गुप्त आणि प्राथमिक स्वरूपात अहम्मध्ये स्थित असतात (२.८ पृ.२३४), स्वयंभू अर्थात् स्वतःसिद्ध, जन्मादि संस्कारांनी विरहित, विकल्प किंवा विचार यांनी रहित, सर्वश्रेष्ठ धाम असलेला, आदि व अंत नसणारा आणि सर्व जंतूंचे प्रत्यक्ष कारण असणारा भगवान् देव श्रीशंकर असून अशा श्रीशंकरांना मायेने मोहित झालेला जीव पाहू शकत नाही (३.७ पृ.३१६), आपल्या अंतरात लपविलेल्या आपल्या शुद्ध स्वरूपाच्या पकडीनुसार नाना अवस्थांचा प्रपंच आपल्याच परिस्पंद अर्थात् स्वातंत्र्य शक्तीच्या क्रीडेने आपल्याच भिंतीवर जे प्रकट करतात ते श्रीशिव स्वतःच नट आहेत. संसाररूप नाटकाचे प्रवर्तन करणारा एक श्रीपरमेश्वरच या झोपलेल्या जगात सजग किंवा सावध आहे (३.९ पृ.३३२), श्रीशिव हे महाह्रद अर्थात् महान् डोह आहेत (३.२१ पृ.३९३), श्रीशिव हे शाश्वत सिद्धी प्राप्त करून देतात (३.२२ पृ. ३९९), श्रीमहेश्वर हे सर्वशक्तिमान् असून हे सर्व जगत् म्हणजे त्यांच्या सर्व शक्तींचा समूहच आहे. देव अर्थात् श्रीपरमेश्वर हा ज्ञानयुक्त आहे. ज्ञान हे विविध प्रकारांनी स्थित आहे. त्याचप्रमाणे तो नियंत्रित आणि बंधनात बांधलेल्यांचे रक्षण करतो म्हणून त्याला नेत्र असे म्हणतात (३.३० पृ.४४६), श्रीशिवांना नेत्र म्हटले जाते याचे कारण ते लौकिक किंवा भौतिक नेत्र आहेत म्हणून नव्हे; तर ते त्यांच्याकडे उन्मुख किंवा प्रवृत्त झालेल्या जीवांना त्यांच्या तेजाद्वारा त्यांचे गुप्त रूप प्रकट करतात म्हणून त्यांना नेत्र म्हटले आहे. ते एकमेव श्रीशिव आहेत. ते स्वतःला लपवितात आणि परत प्रकटही करतात. आणि श्रीशिवांचे हे विश्व शक्तिमयच आहे (३.३० पृ.४४९).

येथपर्यंत आपण "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात आलेले श्रीईश्वराचे, श्रीशिवांचे किंवा श्रीपरमेश्वराचे स्वरूप काय आहे हे पाहिले. आता आपण प्रथम शास्त्रकारांनी श्रीईश्वराचे, श्रीशिवांचे किंवा श्रीपरमेश्वराचे जे स्वरूप कथन

केले आहे त्याचे साररूप पाहू व त्यानंतर महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्त यांनी "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाचेच जे विस्तृत व सांगोपांग स्वरूप प्रकट केले आहे त्याचेही साररूप काय आहे ते पाहू.

श्रीशैवशास्त्रानुसार श्रीईश्वराचे स्वरूप काय आहे हे कथन करताना म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "**भारतीय संस्कृती और साधना**", **खंड पहिला**, या ग्रंथातील "**ईश्वरमें विश्वास**" या लेखात असे म्हटले आहे की, "संसाराची सृष्टी अर्थात् निर्मिती, स्थिती आणि संहाराचा कर्ता व अनुग्रह आणि निग्रहाला हेतुभूत किंवा कारणस्वरूप सच्चिदानंदमय अनंतशक्ति-समन्वित सत्ता विशेष" म्हणजे "ईश्वर" होय. या सत्तेमध्ये ज्या शक्ती अंतर्निहित राहतात त्या शक्तींच्या साम्यावस्थेलाच ईश्वराचा "ब्रह्मभाव" असे म्हणतात. ज्यावेळी वैषम्यकालात कोणतीही शक्ती मुख्य होऊन इतर शक्तींना सामावून घेऊन प्रकाशित होते त्यावेळी केवळ त्या शक्तींची क्रिया दृष्टिगोचर होते. सृष्टीच्या शेवटी कोणतीही शक्ती शिल्लक राहत नाही; मात्र शक्ती व शक्तिमान् हे अभिन्नभावाने एकरस किंवा समरस होऊन प्रकाशित होत राहतात. संसारात जे काही आहे किंवा होईल, ते सर्व ईश्वरापासून उद्भूत झालेले असते, ईश्वरात स्थित असते व शेवटी ईश्वरातच विलीन होते. याकरिता जोपर्यंत जगत् आहे तोपर्यंत ज्याप्रमाणे समुद्र किंवा तलाव हे तरंगांचे आश्रयस्थान असते त्याप्रमाणे जगताच्या आश्रयरूप ईश्वरसत्तेचा साधनाभ्यासपूर्वक साक्षात्कार करून घेणे आवश्यक आहे. केवळ एवढेच नव्हे; तर सांसारिक सत्ता ही मूलतः ईश्वरीय सत्तेशी एकरूप किंवा अभिन्न असल्यामुळे तिचीही प्राप्ती करणे आवश्यक आहे. जगताच्या अस्तित्वाच्या वेळी त्याच्या संरक्षक, नियामक, दर्शक आणि भोक्त्याच्या रूपातही ईश्वराच्या सत्तेचे अनुसंधान करणे योग्य आहे. ज्या कला आणि विद्यारूप शक्ती प्रवाहरूपाने प्रवर्तित होऊन व्यावहारिक जगात कार्य-साधन करीत असतात त्यांची मूळ प्रवृत्ती जेथून सुरू होते, तोच ईश्वर आहे."

त्याचप्रमाणे म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "**तांत्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि**" या ग्रंथातील "**श्रीभगवान् का स्वरूप और कार्य (द्वैत शैवमत)**" या लेखात असे म्हटले आहे की, "श्रीभगवान् हे आगमशास्त्रानुसार नेहमी पंचकृत्यनिरत राहतात. त्यानुसार ते सृष्टी, स्थिती, संहार, निग्रह किंवा तिरोधान व अनुग्रह या गोष्टी नेहमीच करीत असतात. ही त्यांची नित्यकृत्ये आहेत. परंतु ईश्वराच्या स्वरूपाची एक अशीही अवस्था आहे की, ज्या

अवस्थेत ते काही करतात असे म्हणणेही शक्य होत नाही. द्वैतमतानुसार जीव किंवा पशू हा अनादि कालापासून मलाने झाकलेला आहे. जरी जीव हा स्वरूपतः श्रीशिवत्वसंपन्न असला तरीही या मलाच्या आवरणामुळे तो आपले श्रीशिवत्व विसरून, जीवाचे स्वांग धारण करून व कर्तृत्वभाव ग्रहण करून शुभाशुभ कर्मफलभोगाकरिता मायिक जगतातील विभिन्न लोकांमध्ये व देहांमध्ये संसारी होऊन निरंतर भ्रमण करीत राहतो. श्रीशिवांची किंवा जीवाची स्वतःची आत्मविस्मृती हीच या भ्रमणरूप व्यापाराच्या मुळाशी आहे. खरे पाहता; या आत्मविस्मृतीच्या मुळात मलाचे आवरण किंवा रोधशक्ती आहे. ही परमेश्वराच्या इच्छेनेच बनलेली आहे आणि ज्यावेळी त्याच्या इच्छेने किंवा अनुग्रहाने ही आवरणशक्ती दूर होते त्यावेळी जीव आपले श्रीशिवत्व प्राप्त करतो. हीच त्याची परामुक्ती आहे. जोपर्यंत ही मुक्ती होत नाही तोपर्यंत जीव कोणत्याही अवस्थेत जरी राहिला तरी ती त्याची सर्वश्रेष्ठ अंतिम अवस्था असत नाही. या निग्रहाच्या आणि अनुग्रहाच्या मुळाशी स्वतः श्रीभगवानच असतात आणि या दोन अवस्थांच्या मध्ये सृष्टी, स्थिती व संहाराचे चक्र फिरत राहते.

मात्र अद्वैतदृष्टीने आत्मा सर्व अवस्थांच्या वर असलेल्या साक्षात् श्रीपरमशिवदशेला प्राप्त होऊ शकतो. अशा प्रकारे हे लक्षात येते की, सच्चिदानंद हे परमेश्वराचे स्वरूप असून त्याची शक्तीही सच्चिदानंदरूपा आहे. त्याचप्रमाणे ते नित्य निष्क्रिय राहूनही नेहमीच पंचकृत्यकारी आहेत व अशी पंचकृत्ये करूनही ते नित्य स्वस्पंद स्वरूपात राहत असतात. ज्यावेळी जीव आपल्या श्रीशिवस्वरूपाला प्राप्त होतो त्यावेळी तोही तोच असतो. ज्याप्रमाणे जीवाला जीवरूपात आपल्यापासून दूर करणे हा जसा त्यांचा स्वभाव आहे त्याप्रमाणेच जीवाला आपल्या निजस्वरूपात लीन करून घेणे हाही त्यांचाच स्वभाव आहे. या स्वभावाचे अवलंबन करूनच त्यांची नित्यलीला निरंतर कालाच्या बाहेर प्रवर्तित होत राहते आणि कालाच्या आतही कर्मसूत्राच्या द्वारा त्यांचा छायाभिनय चालतच राहतो." (पृ.१३२)

उपरोक्त वर्णन केलेल्या श्रीईश्वरविषयक विचारांच्या प्रकाशात "**श्रीस्पंदशास्त्र**" किंवा "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथातील श्रीईश्वरासंबंधीची पुढील सूत्ररूप विधाने विचार प्रवर्तक ठरतील.

**(१)** श्रीपरमशिव आत्यंतिक मुक्ती देणारे आहेत. त्यांच्या परम अद्भुत

अशा मायाशक्तीच्या योगाने चित् व जड वगैरे अनंत पदार्थ आणि व्यक्ती निर्माण झालेल्या दिसतात. असे असले तरी तत्त्वदृष्ट्या परमेश्वराच्या स्वरूपाशी अभिन्न असणारी शक्तीच सर्व काही बनली आहे हे लक्षात घेतले म्हणजे पदार्थमात्र श्रीगुरुरूप आहे याची जाणीव अंतःकरणात होईल. (पृ.५)

**(२)** अनंत शक्ती या श्रीईश्वराचे ऐश्वर्य असून ते ज्याच्या ठिकाणी भासमान् होते तो परमेश्वर सर्वशक्तिमान् आहे. यामुळे परमेश्वर सर्व शक्तिचक्रांचे आदिकारण आहे. या अर्थानेच त्याला जगाचे उत्पत्तिकारण म्हणतात. श्रीपरमशिव किंवा श्रीमहेश्वर निव्वळ ज्ञानस्वरूप आहेत. ते या शक्तिचक्राचा आत्मा असल्याने ते शक्तिचक्र श्रीईश्वराशी तद्रूपच आहे. (पृ.६)

**(३)** परमेश्वर म्हणजेच प्रकाशरूप महादेव हे "अहं ब्रह्मास्मि" आदि शब्दसमूहांच्या परमार्थरूप पूर्णाहंतेच्या परामर्शाच्या म्हणजे विचाराच्या सारामुळे नेहमीच आनंदघन, स्फुरणात्मक, दैवी शक्ती आणि आसुरी शक्ती निर्माण करण्यासाठी मंथन करणाऱ्या अरणीप्रमाणे असणाऱ्या पराशक्तीने युक्त पूर्ण स्वातंत्र्यरूप असे आहेत. (पृ.३२)

**(४)** श्रीशिवांच्या निर्विकल्प स्वरूपामध्ये विकल्प ज्ञानाचा उदय होणे अर्थात् प्रत्ययोद्भव होणे हेच त्या श्रीशिवांचे परामृतरसापासून अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्य या अवस्थेपासून भ्रष्ट होणे आहे. यामुळे श्रीशिव स्वतःचे स्वातंत्र्य गमावितात व परतंत्र बनतात आणि पाच तन्मात्रांनी इंद्रियांना प्रत्यक्ष गोचर होतात. (पृ.३४)

**(५)** श्रीशिवांच्या स्पंदात्मक विमर्शभूमिकेत किंवा शाक्तभूमिकेत अथवा ज्ञानभूमिकेमध्ये किंवा श्रीशिवांच्या ठिकाणी हे सर्व कार्यरूप असलेले जगत् अभेदरूपाने अवस्थित असते किंवा राहते आणि त्या श्रीशिवांपासून बाहेर पडते किंवा उत्पन्न होते. त्या श्रीशिवांच्या किंवा सत्तेच्या अनाच्छादित अर्थात् आच्छादन किंवा आवरणरहित स्वरूपामुळे स्वतंत्र प्रसारात कोठेही अडचण किंवा अडथळा असत नाही. (पृ.४१)

**(६)** त्याचप्रमाणे ज्ञानरूप श्रीशंकर हे एकरूप व एकरस असून सुद्धा भिन्न वस्तूंमुळे भिन्न आहेत असे भासते; परंतु वस्तुतः तसे नाही. ज्ञान हे श्रीशंकरांचे स्वरूप आहे. ते त्यांच्या ठिकाणी स्थित आहे. या ज्ञानाच्या प्रकाशात नाना प्रकारचे भेद दिसले तरी ते सत्य नसून त्या त्या पदार्थांच्या ठिकाणी असणारे ज्ञान हेच सत्य आहे. ज्ञान म्हणजे श्रीशंकरच होत.

(पृ.४१, ४२)

**(७)** ज्ञानात्मक आणि क्रियात्मक असे चैतन्य हेच आत्म्याचे स्वरूप आहे असे सिद्धच आहे. हे चैतन्य कशानेही झाकले जात नसल्यामुळे त्याचे श्रीशिवत्व कोणाकडूनही नाकारले जाणार नाही.

**(८)** ते स्पंदतत्त्व अर्थात् श्रीशंकर हे तत्त्वतः अर्थात् वास्तविक स्वरूपात सत् व नित्य आहेत. या स्पंदतत्त्वाच्या ठिकाणी दुःख नाही, सुख नाही, ग्राह्यता अर्थात् ग्रहण होण्याचा धर्म नाही, ग्राहकता नाही आणि मूढभावही अर्थात् अचेतनत्वही नाही. (पृ.९२)

**(९)** ते तत्त्व (ईश्वर) सर्व आलंबन, धर्म, तत्त्व, क्लेश इत्यादि आशयांपासून संपूर्णतः शून्य आहे; परंतु परमार्थतः ते तत्त्व शून्य नाही. (पृ.९३)

**(१०)** श्रीशिवदशेमध्ये अभिव्यक्त होणारे हे व्यापक ज्ञातृत्व किंवा स्वस्वभाव याच्या ठिकाणीच सर्व वस्तू संपादन करण्याचे किंवा विश्वनिर्मितीचे स्वातंत्र्य आहे. (पृ.९४)

**(११)** श्रीशिव हे प्रभू असल्यामुळे सर्वव्यापक आहेत. ते नित्य असल्यामुळे अनादि व अनंत आहेत. ते श्रीशिव म्हणजे विश्वाकृतीच आहेत. त्यामुळे ते चिद्रूप व अचिद्रूपही आहेत. त्यांच्या सर्व विचित्रतांचे अवभासन म्हणजे प्रकटीकरण तेच करतात. ते श्रीशिव आपल्या शक्तीने बहुरूपत्व धारण करतात.

**(१२)** श्रीशिव हे आपल्याच स्वातंत्र्यशक्तीचे रूपांतर असलेल्या मायाशक्तीच्या द्वारा स्वरूपावरच आवरण टाकून स्वतःच्या आत्मरूपाच्या दर्पणामध्ये अनंत प्रकारच्या ग्राहकांचे आणि ग्राह्यांचे अवभासन करीत असतात.

**(१३)** सर्वव्यापी श्रीईश्वर किंवा चिन्मयमूर्ती आत्मा हा ज्ञान व ज्ञेय अर्थात् शब्द, रूप इत्यादि तसेच सुखादि अनंत विषयस्वरूपी असून अत्यंत श्रेष्ठ शक्तीने युक्त असतो. सर्वव्यापी श्रीईश्वर हा जागृती व स्वप्न या अवस्थांमध्ये प्रकाशतो. श्रीईश्वर हा ज्ञानरूपाने स्वप्न या अवस्थेत व ज्ञेयरूपाने जागृत या अवस्थेमध्ये अनुभवावयाला येतो. त्या व्यतिरिक्त इतर म्हणजे सुषुप्ती व तुर्या या अवस्थांमध्ये तो चिद्रूपत्वाने प्रतीतीस येतो. (पृ.२३१)

**(१४)** श्रीशिव हे प्रकाशदृष्टीने केवळ चिन्मय आहेत व विमर्शदृष्टीने विश्व आहेत. चिन्मयता हे त्यांचे आंतररूप आहे व विश्वात्मकता हे त्यांचे बाह्यरूप आहे. श्रीशिवांच्या या विश्वात्मक स्वरूपाकडे पाहिले म्हणजे तेथे ज्ञेयता आणि कार्यता हे दोन धर्म दिसतात. पण विश्वाची ज्ञेयता आणि

कार्यता हा श्रीशिवांच्या ज्ञानशक्तीचा व क्रियाशक्तीचाच विकास आहे. जेव्हा श्रीशिवांची ही ज्ञानक्रियारूपशक्ती निमिषित म्हणजे अंतर्मुख असते तेव्हा ती केवळ प्रकाशमयच असते व जेव्हा ती उन्मिषित होते तेव्हा ती बहिर्मुख होऊन विश्वरूपाने अवभासित होते. (पृ.४४५)

येथपर्यंत आपण "**श्रीशिसूत्रे**" या ग्रंथात महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्तपाद यांनी श्रीशिवच आपल्याशी समवायसंबंधाने, अनवच्छेद्यपणे, अविनाभावाने, लयप्रक्रियेने, अद्वयरूपाने, समभावाने, संघट्टपणे एकरसरूप, समव्याप्त व समरस असलेल्या प्रकाशयुक्त स्वातंत्र्यशक्तीच्या द्वारा जीव, जगत् व ईश्वर-रूपाने पिंडब्रह्मांडाची निर्मिती अर्थात् उभारणी कशी करतात हे पाहिले. आता ही शक्तीच बाह्यतः श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झाल्यावर अंतरतः श्रीसद्गुरुरूपानेच साधनरूप होऊन पिंडब्रह्मांडाची संहारणी करीत असल्यामुळे या शक्तीचे विविधनामयुक्त अंतर्बाह्य स्वरूप तिच्या श्रीसद्गुरू, साधकभक्तयोगिशिष्य, शक्तिपातयोगदीक्षा, सिद्धयोगसाधनमार्ग, विविध उपासना किंवा साधना आणि श्रीशिवशक्तीसामरस्यरूप अंतिम फलनिष्पत्ती या विविध अंगांचे दर्शन श्रीशिवसूत्रकारांनी कसे घडविले आहे ते पाहू.

प्रथमतः आपण "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील शांभवोपायात वर्णन केलेल्या शक्तीच्या स्वरूपाचा साररूपाने विचार करू. श्रीशिवांशी समरस व समव्याप्त असलेली ही शक्ती कुंडलिनी, माया, प्रकृती, स्वातंत्र्य इत्यादि विविध नावांनी प्रसिद्ध असून तिचे स्वरूप विविध अंगांनी स्पष्ट करताना महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्त यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात असे म्हटले आहे की, ज्ञानात्मक आणि क्रियात्मक असे चैतन्य म्हणजे कुंडलिनी शक्ती हेच आत्म्याचे स्वरूप आहे, असे सिद्धच आहे (१.१ पृ.१५), अनुभवजन्य स्वच्या प्रवृत्ती, स्थिती आणि संहार यांच्या शक्ती परम श्रीशिव किंवा परमात्मा यांच्यापासून निघालेल्या आहेत (१.१पृ.२२), अर्थात् योनिवर्ग म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या बहिर्मुख विविध शक्ती या जीवाला कामोपभोगाकांक्षाइच्छातृष्णासंकल्पादींनी संसारात गुंतविणाऱ्या असून त्याच तिच्या शरीररूपाने असणाऱ्या कला म्हणजे उपशक्ती आहेत. योनी म्हणजे वस्तुयुक्त जगाचा आरंभ म्हणजेच मूळ स्रोत अर्थात् माया कुंडलिनीशक्ती आणि वर्ग म्हणजे त्या शक्तीचा तत्त्वसमूह होय. त्यामुळे योनिवर्ग याचा एकत्रित अर्थ असा आहे की, माया ही ज्या तत्त्वसमूहाला निर्माण करते आणि त्याद्वारे या जगाचा मूळ स्रोत बनते ते कुंडलिनी तत्त्व होय (१.३ पृ.३१), योनी म्हणजे शक्ती होय. ती एकूण चार प्रकारची असून

सर्वांचे कारण (हेतुभूत) आहे. त्यांची नावे अंबा, ज्येष्ठा, रौद्री आणि वामा अशी असून त्या सर्व श्रीशिवांच्या मूर्ती आहेत. माता या दैवी शक्ती होत. त्यांची किरणे या कला मानल्या आहेत. या कला शब्दरूपाने पशूला म्हणजे जीवाला ज्ञान करून देतात (१.३ पृ.३२), माया शक्ती ही श्रीशिवांशी एकरूप किंवा अनवच्छेद्य अशी शक्ती असून तिच्यामुळे ते श्रीशिव निरनिराळ्या स्वरूपात प्रकट होऊ शकतात (१.३ पृ.३५), मातृका किंवा शब्दशक्ती ही विश्वजननी आहे. ही शब्दशक्ती सूक्ष्मशरीरी असल्यामुळे तिचे स्वरूप अज्ञात आहे. ज्ञानाच्या आभासाला, कलांना व प्रत्यक्ष ज्ञानाला मातृका अर्थात् शब्दशक्ती हीच कारण आहे. पराशक्ती ही परमात्म्याची शक्ती आहे. ही पराशक्ती कुंडलिनी या नावाने प्रसिद्ध असून ती परमात्म्याची स्वाभाविक अर्थात् अनादिसिद्ध अशी शक्ती आहे. ही ज्ञान, बल व क्रियायुक्त आहे. इच्छाशक्ती, ज्ञानशक्ती आणि क्रियाशक्ती अशी शक्तीची एकूण तीन रूपे आहेत. मातृका म्हणजे "अ"कारापासून "क्ष"कारापर्यंतची पन्नास वर्णांच्या समूहाने युक्त असणारी व विश्व निर्माण करणारी परावाक् शक्ती होय. जगज्जननी मातृकाशक्तीच ज्ञानाचे अधिष्ठान अर्थात् अधिष्ठात्री असते. मानवांना त्या अधिष्ठानाच्या ताब्यात गेल्यामुळे अविरत किंवा अखंड असे बहिर्मुख ज्ञान बंधनात टाकण्याला कारणीभूत होते (१.४ पृ.४३), शरीरातील शक्ती म्हणजे शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या शक्तींचा समूह होय (१.६ पृ.५५), श्रीभैरवांची एक श्रेष्ठ स्वातंत्र्यशक्ती आहे. ही शक्ती अंतर्लक्ष्य बहिर्दृष्टियुक्त असून ती विश्वाचे उत्पत्ती, स्थिती व संहारात्मक कार्य क्रमाने, क्रमरहित किंवा एकदम करू शकते. क्रम म्हणजे सृष्टी, स्थिती व संहार यांच्या आभासाचे विच्छेदन अर्थात् तो आभास नष्ट करण्याचा स्वभाव होय. अक्रम म्हणजे सृष्ट्यादींचा एकदम अवभास म्हणजेच मिथ्याज्ञान होय. त्या क्रम आणि अक्रमाला आक्रमिणारी म्हणून क्रमाक्रमी अशी ही स्वातंत्र्यशक्ती होय (१.६ पृ.५६), सृष्ट्यादि तीन क्रमांचे अवभासन करून त्यांचे अनिवार्यपणे परिस्फुरण करणारी अर्थात् प्रकट करणारी क्रम व अक्रमरूप शरीराची परा शक्तीच अनाख्या म्हणजेच वर्णन न करता येणारी पारमेश्वरी संविच्छक्ती कुंडलिनी ज्ञानरूप होते. या शक्तीला तिचे अंतःस्वरूप नीटपणे माहीत असूनही ती बाह्यदृष्टीने काही कामांमध्ये गुंतून राहिलेली असते. अशा प्रकारे सर्व शक्तींना आकर्षित करून घेऊन ती क्रम, अक्रम व क्रमाक्रमाच्या श्रेष्ठत्वामध्ये अतिरिक्त किंवा कृश म्हणजेच पूर्ण रिक्त, अरिक्त किंवा पूर्ण

अरिक्त व अतिरिक्त या दोन्ही स्वरूपात प्रकट होते. ती जरी इतक्या स्वरूपांमध्ये प्रकट होते असे सांगितले असले तरी वास्तविक ती या कोणत्याही स्वरूपाची नाही. या अनुत्तर म्हणजे सर्वश्रेष्ठ व परा स्वातंत्र्य-शक्तीच्या पडद्यावर म्हणजेच तिच्या स्वरूपावर उत्पत्त्यादींचा खेळ दाखविला जातो. हा उभारणी इत्यादींचा खेळ पृथ्वीपासून ते परप्रमातृविश्रांतीपर्यंतच्या म्हणजे श्रीशिवांशी किंवा श्रीपरमेश्वराशी सामरस्यापर्यंत उत्पत्त्यादि शक्तींच्या स्वरूपाचा असतो (१.६ पृ.५७) हीच पराशक्ती स्वात्मचैतन्यरूप भिंतीवर प्रपंचाचे चित्र काढते. ही पराशक्ती प्रमात्याच्या विश्रांतीपर्यंत स्पंदन पावणारी अर्थात् हालचाल करणारी आहे. अनेक प्रमेयांना ती उजेडात आणते व आपल्या पाच शक्तींचा प्रसार करते. त्या पाच शक्ती म्हणजे सृष्टिशक्ती, लयशक्ती, अनाख्याशक्ती म्हणजेच नामराहित्य व आभासशक्ती म्हणजे रूप-राहित्य या होत (१.६ पृ.६१), कालाग्नीप्रमाणे तेजस्वी असे हृदयस्थ महास्मशान म्हणजेच चिती अर्थात् कुंडलिनीशक्ती होय. ती उच्चाररहित वस्तू म्हणजेच परावाणी आहे (१.६ पृ.५८), श्रीभैरवांची एक महान् शक्ती आहे. ती क्रम आणि अक्रम अर्थात् विधी आणि निषेध यांच्या पलीकडे गेलेली आहे. ती चिच्छक्ती समुदायाला म्हणजे स्वतःच्या उपशक्तींना ओलांडून जाण्याच्या कामात नेहमी गुंतलेली असते. ती रिक्त म्हणजे मोकळी आणि अरिक्त म्हणजे पूर्ण भरलेली अशी उभय स्वरूपाची असूनही कोणत्याच स्वरूपाची नाही. अशा प्रकारे ती सर्वोत्तम आणि सर्वश्रेष्ठ पराशक्ती आहे (१.६ पृ.६०), या कुंडलिनी शक्तीमुळेच विश्वाची उभारणी व संहारणी होते (१.६ पृ.६२), इच्छाशक्ती म्हणजेच परारूप पारमेश्वरी स्वातंत्र्यशक्ती कुंडलिनी असून तीच विश्वाची सृष्टी म्हणजे उभारणी आणि संहारणीरूप क्रीडा करण्यात तत्पर असते (१.१३ पृ. ९५ ते १०२), स्वसंवित् म्हणजे चैतन्यशक्ती कुंडलिनी ही हृदयातील ओटा किंवा चौथरा आहे (१.१५ पृ.११३), स्वपद हीच शक्ती आहे (१.१६ पृ.११९), परा भट्टारिका संवित् म्हणजेच चैतन्यशक्ती कुंडलिनी ही इच्छाशक्तीपासून स्थूल अशा ज्ञेयविषयांपर्यंत सर्व सृष्टीचे वमन करते अर्थात् निर्मिती करते. ही संवित् खेचरी आदि चक्रांच्या सर्व प्रवाहांची प्रवर्तिका आहे व विश्वाचे प्रतिबिंब ती सहन करते म्हणून स्वच्छ आहे. विश्वप्रतिबिंब सहन करीत असूनही विश्वाने ती झाकली जात नाही. ती सृष्टीच्या टप्प्यात येत नाही म्हणून गंभीर म्हणजेच खोल आहे. असे बरेचसे धर्म तिच्या म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या ठिकाणी आहेत म्हणून संविच्छक्तीला महाह्रद असे

म्हटले आहे (१.२२ पृ.१५३).

यानंतर आपण "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील द्वितीय उन्मेषात आलेल्या शाक्तोपायांतर्गत शक्तीचे वर्णन साररूपाने पाहू.

कुंडलिनी शक्तीच्या अंतर्बाह्य जागृतीला उन्मेष असे म्हणतात. बाह्य-संसारोन्मुखाने ही शक्ती अखंड जागृत असून ती जीवाला त्याच्या कर्मा-प्रमाणे भोगाकांक्षादि वासनात लिप्त करून "**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति। भ्रामयन् सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया।। श्रीमद्भगवद्गीता १८.६१।।**" या न्यायाने सतत जन्ममरणचक्रपरंपरेत फिरवीत असते. याला बाह्य उन्मेष असे म्हणतात (२.१ पृ.१६१,१६२), विद्या म्हणजे पराद्वयप्रथेला कुंडलिनी शक्तिरूप शब्दराशीयुक्त श्रीभैरव असे म्हणतात. हे ज्याचे स्वरूप आहे व त्याची जी सत्ता म्हणजे शक्ती आहे ती सर्व विश्वाबरोबर अभेदरूपाने राहणारा पूर्णाहंतेचा विमर्शरूप विकास आहे आणि हेच मंत्राचे वीर्य आहे (२.३ पृ.१७६), कुंडलिनी शक्तीची साडेतीन वलये आहेत. प्राणापान संघर्षा-द्वारा पराशक्ती ज्यावेळेला दोन बिंदूंमध्ये अर्थात् मूलाधारचक्रात आणि ब्रह्म-रंध्राच्या मध्ये साध्या रेषेचे रूप धारण करते त्यावेळेला ती ज्येष्ठा शक्ती होते असे जाणून घेतले पाहिजे. अशा अवस्थेत ही शरीरदशेच्या बाहेर व्याप्त होते. ही सिद्धयोग्याची समाधिदशा आहे. हीच इच्छा, ज्ञान व क्रियारूप त्रिवेणीतीर्थ आहे. ही प्रकाशरूप दशा वीर्यामुळे प्राप्त होते. ही कुंडलिनी शक्ती सुप्तावस्थे-मध्ये मोक्षमार्गाचा निरोध करते म्हणून हिला रौद्रिशक्ती असे म्हणतात. ही शक्ती मोह आदि विघ्ने व अडथळे आणून साधकामध्ये पराशक्तीचा विकास होऊ देत नाही. ज्यावेळेला ही पराशक्ती साधनाभ्यास स्वाभाविक झाल्या-नंतर योग्याच्या व्युत्थान दशेतच अंतर्भूत होते त्यावेळेलाच ही चंद्राच्या कलेप्रमाणे असणारी पूर्णानंदमय अवस्थाच त्याची पूर्णसिद्धी असते. यालाच अंबिकाशक्ती असे म्हणतात (२.३ पृ. १७८), सर्व मंत्र हे "क"कारादि वर्णरूप आहेत. हे वर्ण शक्तीने युक्त असतात. शक्ती ही मातृका म्हणून जाणावी आणि ही मातृका श्रीशिवात्मक असते (२.३ पृ.१८०), ही जी कुंडलिनी नावाची शक्ती परा अर्थात् श्रेष्ठ, सूक्ष्म आणि आचारांपलीकडची आहे असे सांगितले जाते ती हृदयबिंदूला आत वेढून झोपलेल्या सापाच्या आकारासारखी आहे. तेथे म्हणजे मूलाधारात झोपलेली ही महाभाग्यवान् देवी कोणताही विचार करीत नाही. चंद्र, अग्नी, सूर्य, नक्षत्रे आणि भुवने यांना आपल्या उदरात ठेवून ही विषाने गुंगल्याप्रमाणे पडून असते. ही कुंडलिनी

शक्ती ज्ञानरूप परेच्या निनादाने म्हणजेच अनाहतनादाने अथवा ध्वनीने जागृत होते अर्थात् अनाहतनादरूपाने ही कुंडलिनी शक्ती अखंड जागृत असल्याचे प्रत्ययाला किंवा अनुभूतीला येते (२.३ पृ.१८१ ते १९१), श्रीसद्गुरू ही पारमेश्वरी अनुग्राहिका शक्ती म्हणजे कृपा करणारी शक्ती होय. श्रीसद्गुरूंपेक्षा श्रीसद्गुरुमुखात असणारी शक्ती अधिक सामर्थ्यवान् असते. ही कुंडलिनी शक्तीच अवकाश, प्रकाश अथवा ज्ञान देते. त्यामुळे हिला उपाय असे म्हटले आहे. श्रीसद्गुरू म्हणजे शक्तीच श्रेष्ठ प्रकारचा उपाय आहे; कारण ही नित्य अनुग्रह करणारी किंवा कृपा करणारी शांभवी शक्ती आहे (२.६ पृ.२०७), ज्या सामान्य माणसांना स्वरूपज्ञानाची जाणीव नसते त्यांना प्रतिलोमरूप अर्थात् निम्नबाजूकडे असलेली श्रीपरमेश्वराची जी शक्ती बहिर्मुख करून विषयांकडे धावावयाला लागते तिला मातृका असे म्हणतात (२.७ पृ.२११), अव्यक्तावस्थेत कुंडलिनी शक्ती ही बीज आहे. बीज म्हणजेच सर्व प्रकटीकरणाचे, उत्पत्तीचे कारण अथवा बी होय. अव्यक्तावस्थेत ही जीव म्हणजेच सर्वांचे जीवन असते. कुंडलिनी म्हणजे श्रीशिवांच्या संवित्‌ची दिव्य क्रियात्मक शक्ती होय. ही साडेतीन वेटोळे घालून बसलेली असते. एक वेटोळे सर्वश्रेष्ठ अहंतेच्या वस्तुयुक्त किंवा प्रमेयात्मक तत्त्वाचे अथवा दृष्टिकोणाचे प्रतिनिधित्व करते. दुसरे वेटोळे प्रमाण किंवा ज्ञात्याच्या बाजूचे व तिसरे वेटोळे प्रमाता अर्थात् कार्यात्मक तत्त्वाच्या बाजूचे आणि अर्धे वेटोळे प्रमा बाजूचे असते. त्यात कर्म आणि कर्ता अर्थात् जगत् आणि त्याचा ज्ञाता या दोन्ही बाजू अभिन्न अवस्थेत अतंर्भूत असतात (२.७ पृ.२२६), महामाया शक्ती स्वतंत्र आहे (२.७ पृ.२३०) आणि मातृकाशक्ती अर्थात् वाक्शक्ती जागृत झाल्यानंतर चक्रांचे ज्ञान करवून देतात (२.७ पृ.२३२).

यापुढे आपण "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील तृतीय उन्मेषात आलेल्या आणवोपायातील शक्तीचे वर्णन साररूपाने पाहू.

ज्यावेळी श्रीशिवांची उन्मनाशक्ती शून्य तत्त्वापासून पृथ्वीतत्त्वापर्यंत विश्वाच्या स्वरूपात विचाररूपाने प्रकट होते त्यावेळी तिला समनाशक्ती असे म्हणतात. या समनाशक्तीची व्याख्या करताना उद्योतकारांनी असे म्हटले आहे की, समनाशक्ती ही अशेष मननाच्या रूपाची असते (३.४ पृ.२८८), अहंकारापासून पृथ्वीपर्यंत सर्व तत्त्वे ही अव्यक्त शक्तीच्या महत्‌तत्त्वरूपी व्यक्त दशेचे परिणाम आहेत. त्यामुळेच सर्व तत्त्वे एकमेकांहून

वेगळी अशी अनुभवावयाला येत असूनही विभिन्न पातळ्यांवर ही तत्त्वे एकाच शक्तीचे रूपांतर आहे. अशा प्रकारे एकच शक्ती स्पंदित होऊन भिन्न भिन्न तत्त्वांच्या रूपांमध्ये परिणाम पावते आणि त्या सर्व तत्त्वांचे तारतम्यही तीच राखत असते. उपनिषदांमध्ये याच सूत्राला प्राण असे म्हटले आहे. हा प्राण आत्म्याची सच्छक्ती आहे. ज्यावेळी श्रीशिवांची उन्मना-शक्ती शून्यतत्त्वापासून पृथ्वीतत्त्वापर्यंत विश्वाच्या स्वरूपात विचाररूपाने प्रकट होते त्यावेळी तिला समना असे म्हणतात (३.५ पृ.२९४), उन्मना किंवा उन्मनी ही मनाच्या अतीत अशी श्रीपरमशिवांची शक्ती आहे. ही अमात्र म्हणजे मर्यादातीत व कलातीत असते (३.८ पृ.३२९), बीज म्हणजे विश्वाला कारणीभूत होणारी स्फुरत्तायुक्त पराशक्ती होय. ही अर्थात् पराशक्ती कुंडलिनी अनेक प्रकारांनी सर्व देवांची आणि शक्तींची मूळ स्रोत अथवा मूळ कारण आहे. हिचे स्वरूप अग्नी व चंद्राने युक्त असे आहे. हिच्यापासून सर्व गोष्टी प्रवर्तित होतात. या शक्तीलाच संहारसृष्टी, प्रमाणप्रमेय, प्राणापान व सूर्यचंद्र आदि नावे आहेत (३.१५ पृ.३५५), श्रीपरमेशाची स्वशक्ती ही ज्ञानरूप व कर्तृत्वरूप या स्वरूपाची आहे. हिचे वीर्य व बल संसारोत्पत्तीला कारण आहे. त्यामुळे या शक्तीला जगन्माता असे म्हटले आहे (३.१७ पृ.३६७), या शक्तीच्या साहाय्याने ज्याप्रमाणे श्रीपरमेश्वराला वस्तू उत्पन्न करण्याची रुची असेल त्याप्रमाणे श्रीपरमेश्वर त्या वस्तू निर्माण करू शकतो (३.१७ पृ.३६८), श्रीपरमेश्वराची जी विमर्शात्मक अर्थात् ज्ञानात्मक कुंडलिनी शक्ती आहे ती त्याच्याशी समवायसंबिधित अर्थात् परप्रमात्याशी अभिन्न रूपात स्थित असल्याने त्याच्याशी तादात्म्य पावलेली असून तीच त्या सृष्टी निर्माण करण्याची इच्छा असणाऱ्या श्रीपरमेश्वराची इच्छाशक्ती बनते; कारण बाहेर उल्लसित होण्याचा तिचा स्वभाव असल्याने ती पहिली उसळी घेते व अशा प्रकारे इच्छात्वाला प्राप्त होते. ही कुंडलिनी शक्ती बीज आणि योनी अशा दोन प्रकारची आहे. बीज म्हणजे स्वर मानले आहेत. कादि वर्ग हे नऊ प्रकारचे असून ते योनी मानले आहेत. येथे श्रीशिव म्हणजे बीज व कुंडलिनी श्रीशक्ती ही योनी आहे. आठ वर्गांच्या माहेश्वर्यादि आठ देवता आहेत. कुंडलिनी शक्ती ही पन्नास वर्णरूप किरणांनी तेजस्वी बनलेली आहे (३.१९ पृ.३७८, ३७९), शिरस्थ ब्रह्मरंध्रातील चिदाकाशात ब्रह्माच्या पाशांसहित असणाऱ्या पीठांच्या अधिपती शक्ती महाघोरा या नावाने ओळखल्या जातात व या शक्ती जीवांना अर्थात् पशूंना वारंवार

मोहात पाडतात अर्थात् विषयात खोल खोल नेतात (३.१९ पृ.३७९), परबोधस्वरूप अर्थात् श्रेष्ठज्ञानस्वरूप अशा सर्वश्रेष्ठ देवतांची सर्वज्ञ व ज्ञानशाली परमशक्ती कुंडलिनी म्हणजेच त्या सिद्धयोग्याचा सतत होणारा विमर्श होय (३.२७ पृ.४३०), व्यष्टिरूपाने जरी ज्ञानशक्ती आणि प्राणशक्ती दोन्ही वेगवेगळ्या आहेत तरीही त्या समष्टिमहत्मध्ये भेदरहित व एकात्म होऊन जातात (३.३० पृ.४५०), सर्व वेद्यवस्तुविषयक उन्मीलन व निमीलन प्रकाशविरहित नसल्याने संविच्छक्तिमयच समजावे (३.३१ पृ.४५३), जी चितिशक्ती आकाशाचा दागिना असणाऱ्या भगवान् श्रीसूर्यात भासते तीच चितिशक्ती पृथ्वीच्या बिळात असणाऱ्या एखाद्या किड्यातही अस्तित्वात असते (३.३७ पृ.४८४), संवित् भगवतींनी विश्ववैचित्र्याचे अवभासन करण्याच्या इच्छेने पहिल्यांदा प्राणांना निमित्त बनविले. कल्याणस्वरूप, निर्मल, व्यापक, अत्यंतसूक्ष्म व पराशक्तिरूप श्रीसंविद्देवी शक्तिचक्रांना जन्म देते. ही देवी प्राणांमध्ये परिणत झालेली जीवनशक्ती आहे आणि ती तीन छाया अथवा सावल्यांमधून सर्वत्र प्रभुत्व ठेवते (३.४३ पृ.५२६), जी परा अर्थात् सर्वश्रेष्ठ, सूक्ष्म, सर्वांना व्यापणारी, निर्मल, पवित्र किंवा शुभ, शक्तिचक्रांची माता, अमृतत्त्वांच्या श्रेष्ठ आनंदाने युक्त, महाघोरेश्वरी, चंडा म्हणजे भयानक आणि सृष्टी व संहार घडवून आणणारी शक्ती आहे ती तीन ठिकाणी वाहणाऱ्या तीन प्रकारच्या व तीन ठिकाणी राहणाऱ्या अशा काळाला बळेच खेचते (३.४३ पृ.५२८), भगवती संवित् विश्ववैचित्र्य भासविण्याची इच्छा करते व संकोचावभासपूर्वक संकुचित अशा सर्व विश्वाच्या स्फुरत्तात्मक प्राणनारूप अर्थात् जीवनाच्या ग्राहकभूमिकेचा आश्रय घेऊन ग्राह्यरूप जगताच्या आभासाने स्फुरण पावते (३.४३ पृ.५३१), ही पराशक्ती कुंडलिनी सूक्ष्म, व्यापक, निर्मल व कल्याणकारिणी आहे. हीच पूर्ण शक्तिचक्राला किंवा शक्तिमंडळाला उत्पन्न करते. ही परानंदरूप व अमृतयुक्त आहे (३.४३ पृ.५३२) आणि परबोधमय त्या देवांच्या देवांची विमर्श-मयता आणि सर्वज्ञतेच्या ज्ञानाने शोभित झालेली अशी परमशक्ती कुंडलिनी आहे (३.४४ पृ.५३४ ते ५३६).

येथपर्यंत आपण "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात आलेले शक्तीचे साररूप काय आहे हे पाहिले. आता आपण प्रथम शास्त्रकारांनी कथन केलेले शक्तीचे साररूप पाहू व नंतर महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्तपाद यांनी "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात श्रीशिवसूत्रांतर्गत शक्तीचे जे विस्तृत व सांगोपांग स्वरूप प्रकट

केले आहे त्याचेही साररूप काय आहे ते पाहू.

महामहोपाध्याय श्रीगोपीनाथ कविराज यांनी या दृष्टीने "**भारतीय संस्कृति और साधना," खंड पहिला,** या ग्रंथातील "**शक्तिसाधना**" या लेखात असे म्हटले आहे की, "आपण ज्या अनंत अशा वैचित्र्ययुक्त विश्वाचा निरंतर नाना प्रकाराने अनुभव घेत असतो ते सर्व विश्व खरे पाहता आत्म-प्रकाशाव्यतिरिक्त आणखी काहीही नाही. अत्यंत सुसूक्ष्म असे कारण जगत्, लिंगात्मक सूक्ष्म जगत् आणि इंद्रियगोचर स्थूल जगत् ही सर्व शक्तीचीच भिन्न भिन्न विकासाची रूपे आहेत. या विश्वाच्या मुळाशी जी पूर्ण सत्ता पारमार्थिक रूपाने राहत असते तेच शक्तीचे परमश्रेष्ठ स्वरूप आहे. या पूर्ण व परमश्रेष्ठ शक्तीच्या स्वरूपाला "**विशुद्ध चैतन्य शक्ती**" असे नाव देऊन त्याचे वर्णन केले तरी त्याचा योग्य परिचय होऊ शकत नाही आणि "**सच्चिदानंद**" या शब्दाने जरी त्याचे वर्णन केले तरीही त्या स्वरूपाचा पूर्ण निर्देश झाला असे वाटत नाही. अशा प्रकारे वाणी आणि मनाच्या पलीकडे असलेली व जिचा निर्देश करता येत नाही अशी जी एक अवर्णनीय परमार्थसत्ता आहे तिलाच शास्त्रामध्ये "**परमपद**" असे म्हटले आहे. हे परमपद सत् आहे की असत् आहे, या विषयाचा लौकिक विषयाच्या दृष्टीने विचार करण्याला योग्य असला तरीही ज्यावेळी या विषयाची चर्चा करण्याला व सूक्ष्म विचार करण्याला सुरुवात होईल त्यावेळी परमपदात प्रकाश व विमर्श हे दोन्ही अंश स्वभाव-सिद्धरूपाने स्थित असतात, हे स्वीकार करावे लागेल. प्रकाशाच्या शिवाय ज्याप्रमाणे विमर्श किंवा विचार असणे शक्य नाही त्याप्रमाणे विमर्शाचा किंवा विचाराचा त्याग केला तर प्रकाशाची स्थिती असणे शक्य नाही. या श्रीशिवशक्तिस्वरूप प्रकाश आणि विमर्श यांच्या नित्यसंबंधाचीच चैतन्य-रूपाने महापुरुषांना अनुभूती येते. या संबंधाचे व अनुभूतीचेच शास्त्रांमध्ये विस्ताराने वर्णन केलेले आहे. परंतु चैतन्य असले तरीही प्रकाश आणि विमर्शाच्या साम्यावस्थेत ते अव्यक्तच राहते. या अवस्थेचे दुसरे नाव "**परमपद**" असे आहे, यात काहीच शंका नाही. या साम्यावस्थेत महाशक्तिरूप अनादि शक्ती ही श्रीपरमशिवांच्या बरोबर सामरस्यभावयुक्त होऊन अद्वयस्वरूपात विराजमान राहते. स्वरूपाच्या दृष्टीने या अवस्थेला एक प्रकारे "**परब्रह्मभाव**" असे दुसरे नाव देता येईल. परंतु या अवस्थेत स्वरूपभूत स्वातंत्र्य नित्य स्थित राहत असल्यामुळे ही अवस्था ब्रह्मतत्त्वाहूनही विलक्षण असते. या महाशक्तिस्वरूप परमपदाची जी गोष्ट येथे कथन केली आहे, ती वाचल्यावर

हाच निष्कल अथवा पूर्णकल परमेश्वर आहे असे भ्रमाने कोणीही समजता कामा नये; कारण की, निष्कल, निष्कल-सकल आणि सकल या विश्वाच्याच तीन अवस्था आहेत. परंतु महाशक्ती सर्वातीत असल्यामुळे विश्वातीत परम-पदापासून तिच्या स्वातंत्र्यस्वरूप आत्मविलासामुळे नित्य साम्य कोणत्याही प्रकारे भग्न न होता, एक प्रकारे भग्नवत् अवस्था उत्पन्न होते आणि या वैषम्याचे फळ म्हणून गुणप्रधान भावात छत्तीस तत्त्वांनी युक्त असलेले विश्व निर्माण होते. अखंड परमार्थस्वरूप श्रीशिवशक्ती एकरूप, अभिन्न व एकरस किंवा समरस असली; तरी स्वातंत्र्यजनित विक्षोभामुळे तिच्या द्वारा किंवा तिच्यातच भेदमय विश्वप्रपंचाचा उदय होतो. यावरून हे स्पष्ट होते की, त्रिविध विभागांनी युक्त असलेले सर्व विश्व मूळ शक्तीचा फक्त विकास आहे, हे निश्चित सत्य आहे."

ज्याप्रमाणे चैतन्यशक्ती कुंडलिनी बहिर्मुख गतीने प्रसारित होऊन पिंड-ब्रह्मांडाची रचना करते त्याप्रमाणेच ती श्रीसद्गुरुकृपेने, श्रीईश्वराच्या कृपेने, कालाच्या परिपाकाच्या प्रभावाने, तीव्र संवेगाने किंवा इतर कोणत्याही कारणाने जागृत झाल्यावर पिंडब्रह्मांडाची संहारणी करून आपली मूळ साम्यावस्था प्राप्त करून घेते. या प्रक्रियेचे वर्णन करताना महामहोपाध्याय श्रीगोपीनाथ कविराज **"भारतीय संस्कृति और साधना," खंड पहिला**, या ग्रंथातील **"कुंडलिनी तत्त्व"** या लेखात असे म्हणतात की, "ज्यावेळी प्रसारणशक्ती अर्थात् उभारणीची क्रिया बाधित होते त्यावेळी संकोचशक्तीच्या क्रियेचा आरंभ होतो. सर्व ब्रह्मांडात सर्वत्र हीच व्यवस्था आहे. समस्त ब्रह्मांड या संकोचशक्तीच्या प्रभावाने स्वतःमधील वैषम्याचा परित्याग करून साम्यावस्थेला सामोरे जाते. निरनिराळ्या प्रकारे प्रयत्न न करताही प्रत्येक व्यक्ती ही ब्रह्मांडाच्या मुक्तीबरोबर महाप्रलयाच्या वेळी मोक्ष प्राप्त करते. जर जीवाने आपल्या मुक्तिकरिता निराळा प्रयत्न केला तर त्याला ब्रह्मांडाच्या मोक्षकालाची किंवा महाप्रलयाची अपेक्षा किंवा प्रतीक्षा करावी लागत नाही.

जीव स्थूल तत्त्वाच्या आवरणामुळे आवृत झालेला असल्यामुळे सूक्ष्म अशा सुषम्नामार्गात प्रविष्ट होऊ शकत नाही. पूर्वसंस्कार किंवा वासना, अभिमान किंवा कर्तृत्वबोध आणि फलाकांक्षा किंवा भोगाभिलाषा अर्थात् ज्याला कामना असे म्हणतात, अशा तीन आवरणांमुळे जीव स्थूलत्वसंपन्न होतो. विषयेंद्रियादि रूप हेच जीवावरील स्थूलावरण असून ते त्याला आपल्या मूळ स्वरूपाप्रत परत जाऊ देत नाही. प्रत्येक जीव हा ज्ञान, आनंद व

अमरत्वाची इच्छा करीत असतो, इतकेच नव्हे; तर तो ब्राह्मी स्थितीचीही आकांक्षा बाळगून असतो आणि ही विशेष आशा मनात ठेवूनच तो विषय-राज्यात परिभ्रमण करीत असतो. वास्तविक विषयादि गोष्टी या अपेक्षित किंवा आवश्यक नसून आनंदप्राप्तीच इष्ट आहे. मात्र या आनंदाच्या सिद्धी-साठी तो गौणसाधनरूपी विषयादिकांची आकांक्षा करीत राहतो. परंतु जीव युग-युगांतरात व कल्प-कल्पांतरात फिरूनही आपल्या आकांक्षांची तृप्ती करू शकत नाही. याचे एकमात्र कारण हे आहे की, तो सर्व ठिकाणी आपल्या वासना व कर्तृत्वादि अभिमान बरोबर घेऊन फिरत असतो. खरे पाहता शेवटी जोपर्यंत वासनेचा एक क्षणभरसुद्धा उच्छेद होत नाही तोपर्यंत सुषुम्नेच्या मार्गात जीवाला प्रवेश मिळू शकत नाही; कारण स्थूल वस्तू सूक्ष्ममार्गात प्रविष्ट होऊ शकत नाही. भूतशुद्धी, चित्तशुद्धी इत्यादि क्रियांचे तात्पर्य स्थूलतेच्या विसर्जनाशिवाय दुसरे काहीही नाही. ज्यावेळी पंचभूते शुद्ध होतात त्यावेळी पंचीकरणाची स्थिती राहत नाही. एवढेच नव्हे; तर पंचबिंदूही एका बिंदूच्या रूपात परिणत होतात. त्यानंतर चित्तशुद्धी होते. ज्यावेळी एकबिंदूही निर्मळ होतो त्यावेळी ज्ञानचक्षू किंवा तृतीय नेत्र उघडतो. हीच जीवाची विशुद्धावस्था आहे. यानंतर जीव ईश्वरतत्त्व समोर धारण करीत करीत क्रमाने अग्रेसर होतो. यालाच दुसऱ्या शब्दात उपासना असे म्हणतात. उपासनेच्या वेळी आज्ञाचक्रातील बिंदूत आणि सहस्रारातील महाबिंदूत भेद व अभेद या दोन्ही गोष्टी राहतात. ज्यावेळी क्रमाक्रमाने भेदाभेदाच्या मध्यातील भेदांश गळून जातो त्यावेळी अभेदाची प्रतिष्ठा होऊन ब्रह्मज्ञानाची प्राप्ती होते. यानंतर त्रिगुणातीत परम साम्यावस्थेमध्ये किंवा ब्रह्मत्वामध्ये साधक प्रतिष्ठित होतो. या सर्व विवेचनावरून हे स्पष्टपणे प्रतीत होईल की, कुंडलिनीशक्ती जागृत झाल्याशिवाय जीवाची ऊर्ध्वगती होऊ शकत नाही. ही जागृत झाली की, संकोचशक्ती अथवा ऊर्ध्व बिंदूतील आकर्षणशक्तीच्या प्रभावाने क्रमाक्रमाने अंतर्मुखगती वृद्धिंगत होते व शेवटी साम्यावस्था स्थिर होते. (पृ.३१०, ३११)

उपरोक्त चैतन्यशक्तीच्या अर्थात् कुंडलिनीशक्तीच्या बहिर्मुख व अंतर्मुख स्थिती-गतीच्या विचारांच्या अनुरोधाने सिद्धयोग प्रकाशनतर्फे प्रकाशित झालेल्या "**श्रीस्पंदशास्त्र**" किंवा "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथातील पुढील सिद्धान्त विषय आकलनाच्या दृष्टीने उपयुक्त होतील.

**(१)** ही स्पंदशक्ती अनंत सृष्टिसंहारांना आपल्यात समाविष्ट केलेली,

पूर्ण चैतन्यरूप आणि आनंदरूप आहे. त्याचप्रमाणे ही निःशेष (सर्व) शुद्ध आणि अशुद्धरूप जगतातील प्रमाता (जीव) आणि प्रमेय (ज्ञेय विषय) यांच्या संकोच आणि विकासाचे आभासन करणाऱ्या तत्त्वासहित असणारी, सर्व उपनिषदांमध्ये उपास्य म्हणून सांगितली गेलेली आणि एकाच वेळी उन्मेष आणि निमेष यांनी युक्त आहे. (अर्थात् हीच सृष्टी म्हणजे उभारणी आणि संहार घडवून आणणारी आहे.) (पृ.३२)

**(२)** ही ईश्वरीशक्ती नेहमीच आनंदात असणारी नेहमीच पूर्णरूपाने भासते. ही ज्ञानसागराची लाट असून ईश्वराची इच्छात्मक शक्ती आहे. (पृ.३३)

**(३)** प्रत्यक्षात श्रीपरमेश्वराची स्वातंत्र्यशक्ती अथवा स्पंदनशक्ती ही एकच आहे. ही अनंत तसेच अपरिमित अर्थात् अमर्यादित धारांमध्ये प्रवाह-मान होऊन विश्वाच्या अणू अणूचे रूप धारण करीत असते. (पृ.१०८)

**(४)** या शक्तिवर्गाचे खेचरी, गोचरी, दिक्चरी आणि भूचरी हे चार प्रधान विभाग केलेले आहेत. (पृ.१०८)

**(५)** श्रीपरमेश्वराची स्वातंत्र्यशक्ती विश्वाचे वमन करते अर्थात् स्व-रूपामध्ये केवळ "अहं" रूपामध्ये अवस्थित भावमंडळाचे बाह्य "इदं" रूपामध्ये अवभासन करीत असते. (पृ.१०९)

**(६)** ही स्वांतत्र्यशक्ती वाम अर्थात् विरुद्ध आचरण करणारी असते. या शक्तीचा भाव असा आहे की, स्वभावाच्या विरुद्ध रूपाला अर्थात् संसाराच्या रूपाला धारण करून सर्व विश्वाला अनंत आपत्तींचा आणि जन्ममरणाचा विषय बनवीत असते. (पृ.१०९)

**(७)** श्रीपरमेश्वराची स्वातंत्र्यशक्ती ही संसारभावाच्या विरुद्ध आचरण करीत असते. या शक्तीचा भाव असा आहे की, ही श्रीपरमेश्वराच्या शक्ति-पाताला अर्थात् कृपेला पात्र बनलेल्या व्यक्तींमध्ये श्रीशिवभावाचा विकास करीत असते. (पृ. १०९)

**(८)** या शक्तिवर्गाचे काम द्विमुखी आहे अर्थात् हा शक्तिवर्ग दोन मुखांनी म्हणजे संसारोन्मुखतेने व श्रीशिवोन्मुखतेने काम करीत असतो. (पृ.११०)

**(९)** प्रमाता म्हणजे जीवाच्या अंतःकरणात, बाहेर आणि अन्य पदार्थात राहणारी पूर्ण म्हणजे परिमित अर्थात् संकुचित श्रीवामेश्वरी आदि (देवी) सम्यक् ज्ञान आणि अज्ञानाने मुक्ती व बंध प्रदान करीत असतात. (पृ.११०)

**(१०)** हा शक्तिवर्ग एकीकडे अज्ञानी पुरुषांना अधोगतीच्या गर्तेमध्ये

लोटीत असतो तर दुसरीकडे श्रीसद्गुरूंच्या कृपेने निर्मळ हृदय बनलेल्या पुरुषांना श्रीशिवभावावर आरूढ करण्याची क्षमता या शक्तिवर्गामध्ये असते. (पृ.११०)

**(११)** चितिशक्ती ही प्रत्यवमर्शात्मक म्हणजे चेतनरूप, विचारात्मक किंवा "मी आहे" अशी असून हेच हिचे पारमार्थिक रूप आहे.

**(१२)** विमर्शात्मिका अर्थात् विचारमयता हाच या चितिक्रियेचा एक अविच्छेद्य अर्थात् अखंड स्वभाव आहे.

**(१३)** श्रीपरमेश्वराची स्वातंत्र्यशक्ती सतत उदीयमान असल्यामुळे अर्थात् उदय पावत असल्यामुळे प्रतिक्षणी चित्, आनंद, इच्छा, ज्ञान आणि क्रिया या पाच रूपांमध्ये स्पंदनशील अर्थात् स्फुरणशील आहे. यालाच दुसऱ्या शब्दांमध्ये सर्वकर्तृत्व, सर्वज्ञत्व, पूर्णत्व, नित्यत्व आणि व्यापकत्व असेही म्हणतात. हेच अनुत्तर अर्थात् ज्याहून अन्य काहीही श्रेष्ठ नाही असे सर्व-श्रेष्ठ तत्त्व याच शक्तिपंचकाच्या साहाय्याने प्रतिक्षण विश्वरूपामध्ये सृष्टी, स्थिती, संहार, पिधान आणि अनुग्रह ही पाच विराट् कृत्ये करीत राहत असते. विश्वरूपामध्ये प्रसृत अथवा अवभासित होणे किंवा प्रकाशित होणे हा चैतन्याचा स्वभाव आहे. (पृ.१३९)

**(१४)** ही दैदीप्यमान अशी महासत्ता आहे. हिला देश, काल इत्यादि विच्छेदांचा स्पर्श होत नाही. या परमेश्वराच्या सारतत्त्वयुक्त चितिशक्ती अर्थात् कुंडलिनी शक्तीला हृदय अर्थात् प्रतिष्ठास्थान असे म्हटलेले आहे. (पृ.२१६)

**(१५)** ही कुंडलिनी शक्ती महासत्ता, महादेवी व विश्वाचे जीवन आहे. अशा स्वरूपाची विमर्शमय किंवा विचाररूप किंवा ज्ञानरूप स्पंदना किंवा स्फुरण हे स्वयं अदेशकालरहित अर्थात् अयोग्यदेशकालरहित असते. ही विमर्शरूप स्पंदना विभिन्न आणि विचित्र प्रकारच्या देश, काल आणि आकार यांनी परिवलित अर्थात् वेष्टिलेल्या प्रमेयवर्गाला अर्थात् बाह्य जगताला जीवन देऊन स्वतः त्या त्या रूपामध्ये निरर्गल क्रीडा करीत राहते. (पृ.२१७)

**(१६)** श्रीशिवशक्तीचे जे यामलरूप अर्थात् समावेशात्मकरूप आहे यालाच संघट्ट असे म्हणतात. हीच आनंदशक्ती आहे. या शक्तीपासून विश्वाची निर्मिती होते.

**(१७)** प्रत्येक शब्द म्हणजे केवळ जड ध्वनी नसून स्पंदमयी चेतन-शक्ती आहे. आपल्या भोक्तृभावाची अर्थात् भोगणाऱ्या भावाची अनुभूती प्राप्त होईपर्यंत प्रत्येक जीव या शक्तीचा दास असतो. (पृ.४३३)

**(१८)** श्रीशिव नेहमीच निजाशक्तीला चिकटलेले अर्थात् तिच्याशी समरस स्थितीत असतात. त्याचप्रमाणे ते सृष्ट्यादि पाच कृत्ये करणारे, स्वतंत्र, आगमांमधून स्पंद, ललित, श्रीईश्वर इत्यादि शब्दांनी सांगितले गेले आहेत. यांची स्वातंत्र्यशक्तीच सनातन, पूर्णाहंतारूप, परा, मत्स्योदरी, महासत्ता, स्फुरत्तोर्मी (प्रकाशाची लाट), सार, हृदय, भैरवीदेवी, शिखा इत्यादि असंख्य प्रकारांनी त्या त्या ठिकाणी सांगितली गेली आहे. (पृ.४३३)

उपरोक्त रीतीने वर्णन केलेली श्रीशिवांशी समरस व समव्याप्त असलेली आत्मचैतन्ययुक्त व अनादिनिद्रिस्थ कुंडलिनी शक्ती ज्यावेळी बाह्य श्रीसद्गुरु-कृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने जागृत होते त्यावेळी ती अंतरतः श्रीसद्गुरु-रूपाने स्वतःच साधन करून व सुषुम्नामार्गाने सहस्रारात जाऊन तेथे श्रीशिवांशी समरस होते. श्रीशिवसूत्रकारांनी "**गुरुरुपायः।।२.६।।**" या सूत्रात श्रीसद्गुरूंचे हे द्विविध स्वरूप अत्यंत साक्षेपाने वर्णन केले आहे. त्याचप्रमाणे श्रीसद्गुरूंचे ज्ञानस्वरूप, सिद्धस्वरूप व त्यांची इतरही लक्षणे प्रकट करताना श्रीशिव-सूत्रकारांनी असे म्हटले आहे की, "**सोऽहं**" या मंत्राच्या तात्त्विक अर्थाचा जे कोणी उपदेश करतील त्यांना श्रीसद्गुरू असे म्हणतात. श्रीपरमेश्वरच श्रीसद्गुरुरूपात मनुष्यदेह धारण करून लपलेला असतो. श्रीसद्गुरू म्हणजे श्रीपरमेश्वराची अनुग्रह करणारी शक्ती आहे अर्थात् कृपा करणारी कुंडलिनी शक्ती आहे. श्रीसद्गुरू हे परमसिद्धीच्या उपायाला वाव देतात. ते तात्त्विक किंवा यथार्थ ज्ञानाचा उपदेश करतात म्हणून त्यांना श्रीसद्गुरू असे म्हटले जाते. ते श्रीसद्गुरू माझ्या म्हणजे श्रीशिवांप्रमाणे मंत्रवीर्याचे प्रकाशक म्हणून सांगितले आहेत. जे श्रीसद्गुरू आहेत ते श्रीशिव असून श्रीशिव म्हणजे श्रीसद्गुरू होत. श्रीसद्गुरू आणि श्रीशिव यांच्यात कोणतेही अंतर, फरक किंवा भेद असत नाही. तेज हे शक्तिचक्र असून श्रीसद्गुरुवाणी किंवा श्रीसद्गुरुमुखही तेच म्हणजे तेजच आहे. श्रीसद्गुरूंपेक्षा श्रीसद्गुरुमुखात असणारी शक्ती अधिक सामर्थ्यवान् असते. श्रीसद्गुरू म्हणजे शक्तीच श्रेष्ठ प्रकारचा उपाय आहे; कारण ती नित्य अनुग्रह करणारी किंवा कृपा करणारी शांभवी शक्ती आहे (२.६ पृ.२०६, २०७), श्रीसद्गुरू हे साधकभक्तयोगिशिष्याला तत्त्वार्थ सांगून हवे असेल ते मिळवून देतात. या सर्व गोष्टींमुळे उन्मनी अवस्थेत विश्रांती प्रदान करणारी अशी ही कुंडलिनी शक्तीच श्रीसद्गुरू होत. सम्यक् किंवा योग्य ज्ञान, चांगली क्रिया, प्राणायाम, मंत्र व मुद्रा या सर्वांचे यथायोग्य विवेचन करणे आणि या सर्वांचे सामर्थ्य सांगणे या सर्व गोष्टी

हेच सांगतात किंवा उपदेशितात म्हणून हेच श्रीसद्गुरू अर्थात् उपाय होत. हे श्रीसद्गुरूच मंत्र व मुद्रांचे सामर्थ्य आणि व्याप्ती यांचे प्रकाशन करतात व त्यांपासून परम उपेयप्राप्ती म्हणजेच परमतत्त्वाची प्राप्ती होण्यासाठी उपाय सांगतात (२.६ पृ.२०८), ज्ञान हेच श्रीसद्गुरूंचे मुख्य लक्षण आहे. याबाबतीत श्रीपरमेश्वराचे असे वचन आहे की, अशा ज्ञानित्वादि संबंधामुळे द्योतन-स्वभावाचा विश्वसमूह असलेला मीच सर्वांमध्ये पूज्य आहे. अशा प्रकारचे श्रीसद्गुरू केवळ स्वभावतःच परिस्फुरण पावणाऱ्या व शक्तीचे सामर्थ्य असणाऱ्या मंत्रांना जाणतात असे नाही; तर लौकिक श्लोकांनाही मंत्रात्मक म्हणूनच जाणतात. हे श्रीसद्गुरू खरोखर त्या निरतिशय सर्व ज्ञानाच्या योगा-मुळे किंवा संबंधामुळे सर्वबाह्य श्लोकांना अहं-परामर्शाने जाणून घेतात व सर्व ज्ञातृत्वयुक्त मनन म्हणजे सर्व ज्ञानयुक्त मननाने युक्त होऊन अर्थात् संसारात येणाऱ्या सर्व संकटांवर मात करण्यासाठी अनुग्रहाने युक्त होऊन रक्षण करण्याच्या रूपाने साक्षात्कार करतात; कारण ते ही आद्यमान्त्ययुक्त अहंपरामर्शाचे अर्थात् आदिम् म्हणजे "अ" व अंत्य म्हणजे "ह" अशा प्रकारच्या अहंपरामर्शाचे रूप आहे; कारण प्रकाशात्मपरप्रमात्याशिवाय काहीही स्फुरण पावणार नाही अर्थात् प्रकाशित किंवा व्यक्त होणार नाही. (२.७ पृ.२२०)

श्रीसद्गुरूंचे सिद्धस्वरूप श्रीशिवसूत्रकारांनी तृतीय उन्मेषातील सूत्र क्रमांक २५ ते ४५ येथपर्यंत अत्यंत विस्तृतपणे वर्णन केलेले आहे. ते साधकभक्त-योगिशिष्यवाचकांनी मुळातूनच वाचून अभ्यास करण्यासारखे आहे.

श्रीसद्गुरूंचा व त्यांच्या स्वरूपाचा असा अपरंपार महिमा असल्याने त्याचे विस्तृत वर्णन "**सिद्धयोग प्रकाशनातर्फे**" प्रकाशित झालेल्या "**श्रीज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शन**" या ग्रंथात प्रस्तुत संकलकाने "**श्रीज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाची शास्त्रीय प्रक्रिया**" या आठव्या प्रकरणातील "**श्रीसद्गुरुकृपेचा महिमा**" व "**श्रीसद्गुरुकृपेचा अर्थ**" या मुद्यात केले आहे. त्याचा आस्वाद साधकभक्तयोगिशिष्यवाचकांनी मुळातूनच घ्यावा.

येथपर्यंत आपण पिंडब्रह्मांडाच्या संहारणीला कारणीभूत होणाऱ्या अंतर्बाह्य श्रीसद्गुरूंचा विचार केला. आता आपण श्रीशिवरूप सद्गुरूंनी दिलेल्या शक्तिपात-योगदीक्षेने साधकभक्तयोगिशिष्याला आतून चालणाऱ्या सिद्धयोगसाधनाने सहस्रारात श्रीशिवशक्तिसामरस्याची प्राप्ती कशी होते हे श्रीशिवसूत्रकारांनी कथन केलेल्या शक्तिपाताच्या माहात्म्याच्या आधाराने पाहू. शक्तिपाताचा

महिमा वर्णन करताना ग्रंथकार असे म्हणतात की, शक्तिपाताने अर्थात् श्रीईश्वरानुग्रहाने माणूस श्रीसद्गुरूपर्यंत पोहोचतो (१ मंगलाचरण पृ.४), मंद शक्तिपात झालेल्यांना आणवज्ञानाने, तीव्रमध्य शक्तिपात झालेल्यांना शाक्त-ज्ञानाने व तीव्रतर शक्तिपात झालेल्यांना शांभवज्ञानाने क्रमशः ऊर्ध्व, ऊर्ध्वतर व ऊर्ध्वतम अशा पायरीपायरीने सर्वोर्ध्व पद्धतीचा व स्थितीचा लाभ होतो अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्याची प्राप्ती होते. अशा जिज्ञासू व अधिकारी साधकभक्तयोगिशिष्यांसाठीच श्रीशिवांपासून या श्रीशिवसूत्रांचा अवतार झाला आहे (१.१ पृ.६), त्या प्रणवाचा जप अर्थात् सिद्धयोगसाधनामुळे म्हणजे श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् त्याने शक्तिपातयोगदीक्षा दिल्यानंतर जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीमुळे आतून आपोआप होणारा ॐकाराचा जप व त्याच्या अर्थाचे चिंतन करणे हे श्रीईश्वरप्रणिधान होय (३.२८पृ.४३४), शिष्यांना किंवा साधकभक्तयोगिशिष्यांना शक्तिपातयोगदीक्षा देऊन त्यांची ज्ञानरूप कुंडलिनी शक्ती जागृत करणे हेच या सिद्धयोग्याचे आत्मज्ञानदान होय. जे तीव्रशक्तिपाताने युक्त आहेत आणि या आधी सांगितल्याप्रमाणे जपव्रतपरायण आहेत त्यांनी सांगितलेल्या आणि पुढे सांगण्यात येणाऱ्या प्रक्रियेने येथे वर्णन केलेल्या आत्मज्ञानाचेच पशूंमध्ये प्रकाशन करावे. हेच दान किंवा सर्वात श्रेष्ठ ज्ञान होय. या दानामुळे पशूंच्या म्हणजे संकुचित असणाऱ्या जीवांच्या पाशांचे छेदन करावे अर्थात् त्यांना शक्तिपातयोगदीक्षा देऊन त्यांची अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्ययुक्त व श्रीशिवस्वरूपयुक्त अशी कुंडलिनी शक्ती जागृत करावी आणि त्यांना त्याद्वारे आत्मज्ञानाचा लाभ करून द्यावा. हेच त्यांचे दान होय; कारण स्वरूपाचे ज्ञान करून देणाऱ्या या सिद्धयोगी लोकांना अनुग्राह्य जीवांना दानक्षपणरूप दीक्षा देण्याचा अधिकार प्राप्त होतो व या दीक्षेमुळे आणवमायीयादि मलांचा म्हणजेच बंधांचा नाश होतो (३.२८ पृ.४३७), श्रीशिवांचा शक्तिपात कोणावरही कोणत्याही वेळेला होतो. असा शक्तिपात होण्यासाठी अधिकारी किंवा अनधिकारी असा कोणताही विचार नसतो. हा शक्तिपात होण्यासाठी व्यक्ती, वेळ आणि स्थान आदींविषयी काहीही वैशिष्ट्यपूर्णता नसते; कारण श्रीशिव कर्मनिरपेक्ष असतात. त्यांच्या-मध्ये कर्मांचा कोणताही विचार नसतो. त्यामुळे शक्तिपात निरर्गल अर्थात् कोणताही अडथळा नसलेला असा आहे. ज्या कोणत्याही जीवावर श्रीशिव शक्तिपात करीत असतात त्यालाच संसारावस्थेचा स्वयमेव तिरस्कार वाटतो. त्याच्यात विश्वाची निर्मिती आणि लय अर्थात् नाश करण्याचे सामर्थ्य येते.

कुंडलिनी शक्ती हीच संसार आहे आणि ही कर्मसापेक्ष अर्थात् कर्माला अनुसरून आहे. जीव हा कर्म करण्याने मिळणाऱ्या फळांचा उपभोग घेणारा आहे. त्यामुळे संसार किंवा प्रपंचात कर्म केले असता त्यांची फळे मिळणे कर्मप्राप्तच असते; परंतु शक्तिपात झालेल्या साधकभक्तयोगिशिष्याला कर्मे करण्याची आवश्यकता असत नाही. जरी देहातला व्यवहार साधण्यासाठी त्याला कर्मे करावी लागत असली तरीही तो त्या कर्मांनी लिप्त होत नाही. तो साधारण जीवभाव आणि ज्ञेयभावाच्या पलीकडे जाऊन श्रीशिवरूपत्व प्राप्त करून घेतो (३.३६ पृ.४७७, ४७८), संवित् म्हणजे ज्ञानशक्तीच संकोच आणि प्रसरणपूर्व विश्ववैचित्र्य भासविते. ही संवित्‌च प्राणनात्मकता घेते. ग्राह्यरूप जगद्रूपाने हीच स्फुरण पावते आणि स्ववैभव स्मरण करून देहाच्या जीवित दशेत घडलेल्या शुभाशुभ मिश्र कर्मांनी पुण्यपापादि कर्म करून मनुष्य पश्वादि योनीतून भ्रमण करते. कदाचित् निरपेक्ष शक्तिपाताचे अधिष्ठान लाभून श्रीशैवज्ञानाचे क्रमशः आचरण करून ही श्रेष्ठ अशा ऊर्ध्व-मार्गांची अभिलाषा धरते. जरी ज्ञानरूप अग्नीने कर्मे दग्ध झाली तरी कुंभाराने दंड काढून घेतल्यावर चाक जसे फिरत राहते तसे प्रारब्धभोग भोगून संपेपर्यंत प्राण व त्याच्याशी संबंधित असणाऱ्या भूतकंचुकांपासून म्हणजेच देहापासून साधकभक्तयोगिशिष्य निवृत्त होत नाही.(३.४३ पृ.५३१)

येथपर्यंत आपण श्रीशिवसूत्रकारांनी शांभवोपाय, शाक्तोपाय व आणवोपाय या त्रिविध उपायांतर्गत वर्णिलेल्या सिद्धयोगसाधनाच्या सिद्धीसाठी तीव्र, मध्य व मंद शक्तिपातयोगदीक्षा श्रीसद्गुरूंकडून होणे किती आवश्यक आहे हे पाहिले. हेच तत्त्व सिद्धान्तरूपाने आपल्या शब्दात सांगताना महामहो-पाध्याय श्रीगोपीनाथ कविराज यांनी "**भारतीय संकृती और साधना,**" "**खंड पहिला,**" यातील काही लेखांच्या शेवटी असे म्हटले आहे की, "शक्तिपाताशिवाय म्हणजे भगवंताची कृपा झाल्याशिवाय कोणताही जीव पूर्णत्व प्राप्त करू शकत नाही; इतकेच काय तो पूर्णत्व प्राप्त करण्याच्या (सुषुम्ना) मार्गात प्रवेश देखील करू शकत नाही. जीवाच्या आधारशक्तीच्या अर्थात् धारणाशक्तीच्या भेदानुसार शक्तिपाताचे कमी जास्त प्रमाण दिसून येते. मात्र हेही तितकेच खरे आहे की, जीव जरी कितीही सामान्य कोटीतील असला आणि भोग, वासना, आकांक्षा इत्यादींनी कितीही गुरफटलेला असला तरी एकदा त्याच्यावर शक्तिपात झाला की, तो श्रेष्ठ अशा ब्रह्मपदाला अवश्य जाऊन पोहोचतो. मात्र भोगाकांक्षादि विक्षेपांमुळे जीवाच्या परमपदाला जाण्याच्या

गतीत अडथळा उत्पन्न होतो. जर शक्तिपाताची मात्रा तीव्रातितीव्र असेल व आडवे येणारे विक्षेप जर नसतील तर अत्यंत शीघ्र गतीने म्हणजे क्षणभरात-सुद्धा जीव परमपदाला जाऊन पोहोचतो. शक्तिपातयोगदीक्षेच्या वेळी योग्या-योग्यतेचा विचार केला जात नाही; मात्र जीवाच्या मुळातील योग्यतेनुसारच शक्तिपाताचे प्रमाण स्वाभाविकपणे निश्चित होत जाते. परंतु प्रमाण जरी काहीही असले तरी भगवंताच्या शक्तीचा महिमा इतका मोठा आहे की, एकदा का होईना श्रीसद्गुरूंकडून ही शक्ती साधकात संक्रमित झाली की, ती त्या जीवाला भगवंताच्या घरी अर्थात् सहस्रारातील श्रीशिवपदाला किंवा ब्रह्म-पदाला पोहोचविल्याशिवाय शांत होत नाही, हे अगदी नितांत सत्य आहे." (**शक्तिपातरहस्य** - पृ.२३७)

"शक्तिपात होऊन कुंडलिनीशक्ती जागृत झाल्याशिवाय ब्रह्मप्राप्तीच्या महान् मार्गाच्या वाटचालीला सुरुवातही होत नाही; मग ब्रह्मप्राप्तीची गोष्ट तर फारच दूरची आहे. शक्ती जागृत होणे हाच मनुष्य जीवनाचा खरा उद्देश आहे. केवळ अपूर्ण कैवल्य प्राप्त करून जन्ममृत्यूच्या चक्रात सापडून वरच्या दर्जाचे स्थान प्राप्त करणे हे मनुष्य जीवनाचे ध्येय असूच शकत नाही. आपली सुप्त भगवच्छक्ती जोपर्यंत पूर्णपणे जागृत होत नाही तोपर्यंत मनुष्य जीवनाचे खरे सार्थक होत नाही. कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय जड व चैतन्य यातील संघर्ष समाधानकारकपणे संपत नाही. विवेकज्ञानाचा उपयोग हा या मार्गाची वाटचाल सुरू करण्याची पहिली पायरी म्हणून ठीक आहे; परंतु शक्तीची साधना केल्याशिवाय श्रीशिवभावाची प्राप्ती होणे अत्यंत कठीण आहे." (**शक्ति का जागरण** - पृ.३२२)

येथपर्यंत आपण बाह्य श्रीसद्गुरूंनी कृपा म्हणजे शक्तिपातयोगदीक्षा दिल्यावर अंतरात जागृत होणाऱ्या कुंडलिनी शक्तिरूप श्रीसद्गुरूंचा महिमा पाहिला. या शक्तिजागृतीमुळे प्राणाद्वारे चालणारे सिद्धयोगाचे जे साधन अंतरंगात उपस्थित होते ते वृद्धिंगत होण्यासाठी मनाद्वारे होणाऱ्या किंवा करावयाच्या ज्या विविध साधनांचा उल्लेख श्रीशिवसूत्रकारांनी केला आहे त्याचा मागोवा घेणे इष्ट ठरेल. या दृष्टीने प्रथम आपण शांभवोपायात सांगितलेली साधने पाहू.

सर्व देहांमध्ये चैतन्यच भरलेले असून त्यात कोणताही विशेष भेद असत नाही. याकरिता सर्वकाही चैतन्यमयच आहे अशी भावना सतत करावी (१.१ पृ.११), जो मनुष्य आपले रूप श्रीभैरवमय आहे अशी भावना करील त्याचे मंत्र सिद्धिप्रद होतात. भावना करणे म्हणजे अंतर्मुख होऊन

अर्थात् इंद्रिये बाह्य विषयांकडून आत वळवून स्वरूप विचार करणे होय. एकाच चिंतनात राहणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याला जो श्रेष्ठ ज्ञानलाभ होतो व त्याचा उदय होतो त्याला उन्मेष म्हणावे (१.५ पृ.४९), पराशक्तीशी होणारी ही एकरूपता श्रीसद्गुरुचरणांची उपासना केल्यानेही प्राप्त होते. कुंडलिनी शक्तीचे प्रकटीकरण हे श्रीशिवांच्या स्वातंत्र्यशक्तीचे प्रकट रूप आहे ही धारणा किंवा अनुभूती आली म्हणजे विश्व हे आत्मस्वरूपापेक्षा भिन्न आहे असे भासणे संपते म्हणजे सूत्रात म्हटलेला विश्वसंहार होतो. श्रीसद्गुरु-चरणांच्या सेवेनेही ही अवस्था प्राप्त होते. अशा रीतीने श्रेष्ठ प्रतिभोन्मेषाने होणारे श्रीभैरवज्ञान हे अज्ञानबंधन दूर करणारे आहे असे सांगून याच्याच दृढाभ्यासाने भेदाचे प्रशमन करणारे व्युत्थानही होते (१.६ पृ.५६), सर्व देह व सर्व जगत् चिन्मय आहे अशी भावना निर्विकल्प अंतःकरणाने जो एकसमयावच्छेदाने करतो त्या साधकभक्तयोगिशिष्याला सर्वश्रेष्ठ लाभ होतो अथवा सर्वश्रेष्ठ अशा सिद्धपदाची प्राप्ती होते (१.१६ पृ.११८), अत्यंत शुद्ध, निरुपाधिक अर्थात् सर्व उपाधींनी रहित आणि ज्योती अथवा तेजोमय असे श्रीशिव नावाचे श्रेष्ठ तत्त्व आहे. त्याचे संधान केल्याने म्हणजेच ते तत्त्वच आत्मा आहे असा विचार केल्याने अज्ञानरूप अंधःकाराच्या आवरणाचा नाश होतो. परिपूर्ण एकरूपतेमुळे बाह्यवस्तूसंबंधी अहंभाव त्याग केल्याने द्वैतभावनेचा लोप होऊन अखंडित अर्थात् एकरस अशी निजस्थिती अथवा आत्मस्थिती किंवा श्रीशिवशक्तिसामरस्य प्राप्त होते (१.१६ पृ.११९), सर्वज्ञ, सर्वकर्ता, व्यापक व श्रीशैवधर्माने युक्त असा श्रीपरमेश्वर म्हणजे मीच आहे, अशी दृढ भावना केल्याने जीव हा श्रीशिव होतो (१.१७ पृ.१२२), दोन उपाधींमध्ये असलेल्या भेदाचे ज्ञान म्हणजेच वितर्क होय. विशेष तर्क म्हणजेच वितर्क होय. हा वितर्क स्वस्वभावाच्या एकघन विमर्शाने म्हणजे ज्ञानाने अथवा विचाराने युक्त असलेल्या श्रीशिवस्वरूपी आत्म्याला ओळखण्याच्या सर्व साधनांमध्ये मुख्य साधन होय. हे साधन आत्म्याचे ज्ञान करून देते व त्यामुळे शुद्ध आत्म्याच्या प्रतिभेचा उन्मेष होतो अर्थात् आत्मप्रतिभा जागृत होते (१.१७ पृ.१२३), त्यामुळे सिद्धयोग किंवा शक्तिपातयोगसाधन ही एक सर्वश्रेष्ठ विद्या असून हिच्याशिवाय अन्य कोणतीही विद्या अस्तित्वातच नाही. हिच्यामुळे साधकभक्तयोगिशिष्य एकदमच सर्वज्ञतादि श्रेष्ठ गुण प्राप्त करतो (१.२१ पृ.१४७), अनादिधर्म म्हणजे स्वातंत्र्यशक्तीने युक्त स्वभाव होय. त्याची वेदना म्हणजे विचारणा होय. आत्म्याचे जे परमात्मत्व आहे ते

म्हणजे श्रीशिवरूपत्व होय. त्याची बोधना म्हणजेच ते स्वरूप जाणून घेण्याचा हेतू होय. त्यामुळेच अपरमात्मत्वात म्हणजेच परमात्म्याशिवाय इतर सर्व विषयात ही सर्व वर्जना संपन्न होते. त्यामुळे "विद् विचारणे" (विद् = विचार करणे) व "विद् ज्ञाने" (विद् = जाणणे) या धातूंच्या अर्थाचा अनुगम करणारी ही श्रेष्ठ विद्या सांगितली आहे (१.२१ पृ.१४८), ज्यावेळी या शुद्ध विद्येचा म्हणजे मीच सर्व जगत् आहे, अशा बुद्धीचा उदय होतो त्यावेळी या शुद्ध विद्येच्या उदयाने व त्याच्या सतत विचाराने या चित्-शक्तीला सिद्धयोगी ज्यावेळेला सतत चिकटून राहतो त्यावेळेला त्याला आवेषोत्कर्षामुळे श्रीमहेश्वरांसंबंधी श्रेष्ठ चक्रेशता अथवा सिद्धी प्राप्त होते. (१.२१ पृ.१५०)

यानंतर आपण श्रीशिवसूत्रकारांनी शाक्तोपायात सांगितलेली साधने पाहू. आतून आपोआप होणारे मंत्राचे अनुसंधान अर्थात् मंत्रजप हा मंत्र-देवतेशी तादात्म्यरूपी फल देणारा असतो म्हणजे सिद्धयोगांतर्गत श्रीसद्गुरु-कृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने मूलाधारात जागृत झालेल्या अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्य कुंडलिनी शक्तीकडून स्वतःहून आतून आपोआप होणाऱ्या नानाविध मंत्रांचे अनुसंधान अर्थात् मंत्रजप हा मंत्रदेवतेशी तादात्म्यरूपी फलप्राप्ती करून देणारा असतो म्हणजे जो स्वाभाविक किंवा सहज प्रयत्न होतो तो अर्थात् ही कुंडलिनी शक्ती स्वतः स्वतःसिद्ध साधन करून मंत्रजप करणाऱ्या सिद्धयोगसाधकभक्तयोगिशिष्याचे मंत्रदेवतेशी तादात्म्य करते (२.२ पृ.१७१ ते १७६), ज्ञान होण्यासाठी मंत्र हा प्रमुख शाक्तोपाय आहे (२.४ पृ.१९१), मंत्ररूप कुंडलिनी शक्ती जागृत होऊन स्वतःच साधनरत झाली की, शरीर व तदंगभूत सर्व गोष्टी हविर्द्रव्याप्रमाणे जळून जातात (२.८ पृ.२३९), मातृकाचक्राचे ज्ञान आपल्याला सर्व वर्ण आणि पृथ्वीपासून श्रीसदाशिवांपर्यंतची सर्व तत्त्वे एकाच वेळेला अहंपासून कशी उत्पन्न होतात हे समजून देते. मातृकाशक्तींच्या समूहाचा अक्षय आणि वस्तूंची निर्मिती करणाऱ्या श्रीशिवांच्या इच्छा, ज्ञान आणि क्रियाशक्तींशी संबंध असतो. मातृकाचक्राचे पूर्ण ज्ञान किंवा संबोध हा जीवाला त्याचा यथार्थ अहं हाच आनंदयुक्त श्रीशिवांचे चैतन्य आहे याचे ज्ञान करून देण्याला त्याच्या खोट्या अहंच्या जाणिवेतून बाहेर काढते. त्यामुळे त्याला आपण श्रीशिव आणि त्याचे प्रकटिकरण हे एकच आहोत हे समजून येते (२.७ पृ.२३४), महाशून्यालयात म्हणजेच परतत्त्वाच्या अग्नीत पंचमहाभूते, इंद्रिये व विषयादि

सर्व गोष्टींचे मनासहित चेतनारूप पळीच्या योगाने हवन केले जाते (२.८ पृ.२३६), मननाने प्रदीप्त केलेल्या योगाग्नीत धर्म व अधर्मरूप हवी असतो म्हणजे या सर्वांची आहुती पडते (२.८ पृ.२४०), एकाच युक्तीत अथवा धारणेत राहणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यात दिवसेंदिवस जी भारिताकारिता उत्पन्न होते तिलाच येथे तृप्ती असे म्हटले आहे. तृप्ती म्हणजेच आत्यंतिक पूर्णता होय. (२.९ पृ.२४६)

यानंतर आपण श्रीशिवसूत्रकारांनी आणवोपायात सांगितलेली साधने पाहू. शून्यत्व किंवा पोकळीरूप अग्नीमध्ये पूर्वीच्या सर्व कर्तव्यांचे म्हणजे करण्याजोग्या कर्मांचे विसर्जन करून चित्तात विश्रांती घ्यावी (३.१ पृ.२५६), आनंदरूप इदम् हा ज्ञेयरूपाने भौतिक विकल्प संस्काराच्या पातळीवर मिळविण्यासाठी प्रथम भौतिक ज्ञानापासून वरती आले पाहिजे. नंतर विकल्पज्ञानाहून वर आणि मग संस्काराच्या पातळीपेक्षा वरच्या पातळीवर आले पाहिजे. हाच साधनाचा सोपानक्रम आहे (३.२ पृ.२७०), महाभूते, पुर्यष्टक आणि समनापर्यंत जी स्थूल, सूक्ष्म आणि कारण शरीरे आहेत त्यात पृथ्वीपासून श्रीशिवतत्त्वापर्यंत सर्व कलाभागांचा प्रतिलोमवृत्तीने एकाचा दुसऱ्यात व दुसऱ्याचा तिसऱ्यात, अशा प्रकारच्या लय भावाने ध्यान केले पाहिजे. जोपर्यंत मन स्वकारणात लय पावत नाही तोपर्यंत अशा प्रकारे ध्यान केले पाहिजे. याला लयचिंतनाभ्यास असे म्हणतात (३.४ पृ.२८६), "रं" बीजयुक्त कालाग्निरुद्राची ज्वाला डाव्या पायाच्या अंगठ्यापासून निर्माण होऊन आपल्या सर्व शरीराला जाळून टाकीत आहे असा विचार करावा. या ध्यानामुळे शेवटी शांत आभास प्रकट होतो (३.४ पृ.२८७), जोपर्यंत मनाचा लय होत नाही तोपर्यंत स्थूल, सूक्ष्म व पर स्थितीने व भुवनाध्वादिरूपाने क्रमशः सर्व विश्वाचे चिंतन करावे (३.४ पृ.२८८), ध्यान म्हणजे बुद्धि-व्यापार होय. हे जे सर्व तत्त्वांच्या अंतर्भूत स्वप्रकाशरूप परतत्त्व आहे त्याचीच निजहृदयज्ञानात भावना करावी (३.४ पृ.२८९), अनाहतनादावर चित्त एकाग्र करावे (३.४ पृ.२९०), (१) इडा व पिंगला या नाड्यांमधून वाहणाऱ्या प्राणांचे सुषुम्नानाडीत विलिनीकरण करावे अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेल्या अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्य-शक्ती कुंडलिनीकडून होणारे स्वतःसिद्ध असे सिद्धयोगसाधन होऊ देऊन तिचे सुषुम्नेत चालन करून सहस्रारात विलिनीकरण करावे व अंतिमतः सहस्रारात कुंडलिनी शक्तीचे श्रीशिवांशी समरसीकरण होऊ देऊन श्रीशिव-

शक्तिसामरस्य प्राप्त करून घ्यावे. (२) धारणाद्वारा पृथ्वी आदि पंचमहाभूतांवर विजय मिळवावा अर्थात् त्यांना आपल्या ताब्यात आणावे. (३) पंचमहाभूतांपासून मनाला किंवा आत्म्याला बाजूला काढून घ्यावे अर्थात् चित्ताला म्हणजे कुंडलिनी शक्तीला पंचमहाभूतांपासून प्रत्याहाराद्वारा दूर करावे. (४) पंचमहाभूतांपासून निराळेपणा अर्थात् पृथक्पणा साधावा आणि स्वच्छंदचिदात्म्यात समाधिद्वारा वास करावा (३.५पृ.२९६ ते ३०८), साधकभक्तयोगिशिष्याने मध्यम म्हणजेच सुषुम्ना नाडीतील उदान प्राणाचा आश्रय घ्यावा. हा मध्यमसुषुम्नामार्ग प्राण व अपान यांच्या मधील मार्ग आहे. त्याचप्रमाणे त्याने ज्ञानशक्तीचा आधार घेऊन व त्यात म्हणजे ज्ञानशक्तीतच म्हणजेच ज्ञानरूप कुंडलिनी शक्तीतच स्थिर होऊन आसन प्राप्त करावे (३.६ पृ.३१०), प्राणादि स्थूलभावांचा आणि सुषुम्नेत होणाऱ्या सूक्ष्म प्राणायामाचा त्याग करून सूक्ष्माच्याही पलीकडचे जे परम किंवा श्रेष्ठ स्पंदन मिळविले जाते त्यालाच प्राणायाम असे म्हणतात व त्यापासून च्युती होत नाही म्हणजेच परत पतन होत नाही (३.६ पृ.३११), ज्या शब्दादि गुणांच्या वृत्ती चित्ताद्वारा अनुभविल्या जातात त्यांचा त्याग करून श्रेष्ठ स्थानी स्वचित्ताच्या साहाय्याने प्रवेश करावा. त्यालाच प्रत्याहार असे म्हणतात व तो संसाराचे पाश कुरतडून टाकणारा आहे (३.६ पृ.३१२), बुद्धीच्या गुणांना ओलांडून जाणाऱ्या, श्रेष्ठ व व्यापक अशा, स्वसंवेद्य असलेल्या आणि कोणाच्याही ध्यानाचे ध्येय न होणाऱ्या अर्थात् ज्याचे ध्यान सहज करता येत नाही अशा ध्येयाचे अर्थात् श्रीपरमशिवांचे ध्यान करावे. त्यालाच ज्ञानी ध्यान असे म्हणतात (३.६ पृ.३१२), या जगात स्वतःमध्ये किंवा इतर भूतमात्रांमध्ये समानबुद्धीने मी श्रीशिव आहे व मी अद्वितीय आहे अशी जी भावना ठेवलेली असते तिलाच श्रेष्ठ समाधी असे म्हणतात (३.६ पृ.३१३), प्राणायामाहून श्रेष्ठ असे अन्य कोणतेही तप नाही. त्यामुळेच प्रकाशावरील अर्थात् यथार्थ ज्ञानावरील किंवा प्रकाशस्वरूप आत्म्यावरील आवरण नष्ट होते (३.७ पृ.३२६), जेथे जेथे इंद्रियांच्या मार्गाने श्रीपरमेश्वराचे चैतन्य व्यक्त केले जाते व त्या अभिव्यक्तीचा चैतन्य हेच एकमात्र आधार असते तेथे तेथे हे चैतन्य आहे असे जाणून चित् किंवा संवित्मध्ये बुडालेला जो साधकभक्तयोगिशिष्य असतो त्याच्यात श्रीभैरवभावाचा पूर्ण समावेश होतो (३.८ पृ.३२८), साधकभक्तयोगिशिष्याने विश्वाचे कारण असणाऱ्या स्फुरणस्वरूप परशक्तीत अर्थात् आत्मचैतन्यरूप अंतर्मुखाने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीत परत परत

चित्त वळविले पाहिजे आणि सर्व शब्द वाच्य ज्ञेयज्ञानाहून भिन्न नाही आणि प्रकाशक ज्ञान आत्म्याहून भिन्न नाही, अशा प्रकारे ऐक्याची भावना केली पाहिजे (३.१५ पृ.३५४) साधकभक्तयोगिशिष्याने मूलाधारापासून द्वादशांता-पर्यंत सूक्ष्माहून सूक्ष्मतर अशा किरणांप्रमाणे तेजस्वी वस्तूंचे ध्यान करावे. त्याचप्रमाणे शून्यतेचे अर्थात् अभावाचे ध्यान, सूर्याचे किंवा आकाशातील तेजाचे ध्यान, विहिरीत किंवा खोल खड्ड्यात उभे राहून वरती पाहून केलेले ध्यान, डोळे मिटून डोळ्यांसमोर कृष्णतेज अर्थात् अंधार पसरवून केलेले ध्यान, वृक्ष नसलेल्या पर्वतावर किंवा एखाद्या भिंतीवर केलेले ध्यान, अवलंब व निरालंब या दोन्ही ज्ञानांचा मध्य जाणून केलेले ध्यान आणि इंद्रिये, पंचमहाभूते व शब्दस्पर्शादि तन्मात्रा यांपैकी कशाचेही न केलेले ध्यान यांमुळे साधकाच्या ठिकाणी श्रीभैरवोदय होऊन तो श्रीशिवांशी तन्मयता प्राप्त करतो (३.१६ पृ.३६० ते ३६१), जर सिद्धयोग्याने अशा तऱ्हेने पराशक्ती कुंडलिनीचे अवधान ठेवले तर त्याच्या इतर सर्व बाह्य प्रयत्नांचा नाश होऊन तो आपल्या आसनावर स्थिर राहून सुखपूर्वक चिदाकाशरूप हृदयामध्ये अर्थात् जलाशया-मध्ये मग्न होतो. जर त्याने पराशक्ती कुंडलिनीचे अवधान पूर्णपणे प्रस्थापित केले तर त्याला इतर कोणत्याही औपचारिक ध्यान अथवा एकाग्रतेच्या प्रक्रियांमधून जावे लागत नाही. आत्म्याचे ज्ञान झालेला शरीरादींची कल्पना सोडून देऊन अमृतानंदात बुडून जातो (३.१६ पृ.३६५), त्याज्य व स्वीकार्य अशा प्रपंचाचा त्याग करून अर्थात् तृण म्हणजे गवत, पान, दगड, चर, अचर आणि श्रीशिव हे पृथ्वीपर्यंतचे भाव व अभावांनी पसरलेले सर्व काही श्रीशिवमय आहे असे जो ध्यान करतो त्याला परत परत जन्म प्राप्त होत नाही (३.१८ पृ.३७२), ज्याप्रमाणे तेलाचा आश्रय असलेला पदार्थ व्यापण्यासाठी तेलाचा अखंड पुरवठा करतात त्याप्रमाणे म्हणजे तेलाप्रमाणे (जागृत, स्वप्न आणि सुषुप्ती) या तीन अवस्थांमध्ये तुरीयावस्था ओतावी अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीने स्वतःसिद्ध-योगाचे साधन करून व सुषुम्नागामी होऊन सहस्रारात श्रीशिवांशी समरस होऊन प्राप्त केलेल्या श्रीशिवशक्तिसामरस्यसिद्धीने त्या अवस्था तुरीयावस्थेने व्यापाव्यात (३.२० पृ.३८६ ते ३९२), सिद्धयोगसाधनाने अंतरात्म्याच्या अंतरंगात विकल्परहित मनाने (जाणीवपूर्वक) प्रवेश करावा आणि अर्थात् चित्त म्हणजे श्रीशिवपदावरून खाली उतरून संकुचित झालेली जीवरूप कुंडलिनी शक्ती जागृत करून घेऊन व तिचा सिद्धयोगसाधनाने सुषुम्नेत

प्रवेश होऊ देऊन शेवटी सहस्रारात श्रीशिवसामरस्य प्राप्त करून घेऊन तेथेच मग्न व्हावे (३.२१ पृ.३९३ ते ३९९), प्राणशक्ती ही क्रियारूप आणि चित्त हे ज्ञानरूप असल्यामुळे प्राणनिरोधात चित्तालाही बरोबर ठेवले पाहिजे; नाहीतर केवळ प्राणांच्या साधनाने जड समाधीचा लाभ होईल (३.२२ पृ.४०४), चक्षूने रूप, पश्यंत्यादि वाणींनी वैषयिक वर्णन, मनाने चिंतन, बुद्धीने निश्चय आणि अहंकाराने ज्ञेय वस्तूंवरचे ममत्व, या सर्व विषयसमूहात जे नाहीसे भासतात तेच चित्प्रकाशरूप श्रीपरमशिव शोधून परमप्रयत्नाने ओळखावेत (३.२४ पृ.४१२), जग हे कुटील अथवा वाकडेपणेच चालते, भोगांच्या अभिलाषेने व्युत्थानाकडेच धावते व ते अभीष्ट पदाला कधीच पोहोचू शकत नाही. साधकभक्तयोगिशिष्याने चंचल असे मन बलात्काराने अथवा बळजबरीने पूर्ण ज्ञेय वस्तूकडे लावावे. (३.२४ पृ.४१२, ४१३), मायातत्त्व ते पृथ्वीतत्त्वापर्यंत ज्या तत्त्वकला आहेत त्या प्राणिशरीरांमध्ये उपादान कारण आहेत. त्यांना स्वात्म्याहून अभिन्न ज्ञानाच्या अनुसंधानाने चिद्रसयुक्त करावे म्हणजे ते चिन्मय समजावेत (३.२४ पृ.४१४), श्रीशिवभावनेच्या औषधीने मनोरूप पारा बद्ध झाला की, संसारातील कोणत्याही काष्ठपाषाणाला श्रीशिवरूप सुवर्णता येते (३.२४ पृ.४१६), साधकभक्तयोगिशिष्य मात्र सुषुम्नामार्गात हाच मंत्र उलट करून म्हणजे "सोऽहं सोऽहं" असा मंत्रजप नित्य करीत असतो. यालाच वास्तविक मंत्रयोग असे म्हणतात (३.२७ पृ.४२९), मीच सर्वश्रेष्ठ हंस, श्रीशिव व सर्वांचे आदिकारण आहे. तीच स्वस्वभावात म्हणजेच श्रीपरमशिवांमध्ये परत परत जी भावना अथवा विमर्शना कल्पिली जाते किंवा तिचे ध्यान केले जाते तोच जप होय. हा जप म्हणजे स्वतः नाद हा मंत्रयुक्त अकृतक किंवा सत्य अहं विमर्शात्मा जप्य म्हणजेच जपण्यास योग्य आहे. हाच स्वात्मदेव आहे. या जपाचे उच्चारण करणारा कोणीही नाही आणि तो बंद करणाराही कोणी नाही. हा जप प्राण्यांच्या हृदयात स्थिर होऊन स्वतःच उच्चारण करीत असतो इंद्रियांचा त्यांच्या विषयाकडे असणारा संचार नियमित करून आंतरिक नादाचा उच्चार किंवा प्रकटीकरण होणे हाच जप आहे. बाह्य जप हा खरा जप नाही. त्या भावअभाव पदविरहित स्वरूपाचा जप करावा. त्या प्रणवाचा जप अर्थात् सिद्धयोगसाधनामुळे म्हणजे श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् त्यांनी शक्तिपातयोगदीक्षा दिल्यानंतर जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीमुळे आतून आपोआप होणारा ॐकाराचा जप व त्याच्या अर्थाचे चिंतन करणे हे श्रीईश्वरप्रणिधान होय

(३.२७ पृ.४३४), उत्पत्ती, स्थिती व लय या तीन अवस्थांहून तुर्य नावाच्या मुख्य अवस्थेने अतंर्मुख होऊन या सर्व अवस्था तुर्यरूप आहेत अशा भावनेने त्या आनंदाचे पुनरुज्जीवन् करावे अर्थात् सृष्टी, स्थिती आणि संहाररूप अशा जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन अवस्था तुर्यानंदाने पुनरुज्जीवित कराव्यात म्हणजे प्रधान अशा चौथ्या तुर्यावस्थेने आत्मस्व-रूपाची अखंड सावधानता ठेवावी (३.३८ पृ.४९०) आणि निद्रेच्या आरंभी आणि जागेपणाच्या शेवटी ज्या शुद्ध आणि निर्विषय भावाचा अनुभव येतो तो जर अंत:करणात स्थिर होईल तर त्यामुळे अद्वयानंदाचीच प्राप्ती होईल. साधकभक्तयोगिशिष्याचा ज़ो सावधपणा मध्यदशेच्या क्षणभराच्या तुर्यचमत्कारात असतो तोच सावधपणा त्याने विषयभोगांच्या अवसरांच्या वेळेला अभ्यासात स्थिर ठेवला पाहिजे. हा अभ्यास त्याने अतंर्मुख होऊन स्वरूपविमर्शाच्या स्थितीच्या तारतम्याने वाढविला पाहिजे. हा अभ्यास शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध आदि भिन्न भिन्न विषयांच्या उपभोगाच्या वेळेला केला जातो. (३.३८ पृ.४९१)

येथपर्यंत आपण "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील शांभवोपाय, शाक्तोपाय व आणवोपाय या उपायांमध्ये आलेल्या प्राणात्मक व चित्तात्मक साधनांचा सारांशरूपाने विचार केला. या साधनांमुळे साधकभक्तयोगिशिष्य हाच दीर्घ-काल निरंतर व श्रद्धाभक्त्यादरसत्कारपूर्वक केलेल्या साधनाने सिद्धयोगी होत असल्यामुळे या दोन्ही अवस्थांमध्ये राहणाऱ्या जीवाला श्रीशिवसूत्र-कारांनी या साधनांसंबंधी पुढील सूचना केलेल्या आहेत. पूर्वी ऐकलेल्या अनुभवाने सिद्धयोगसाधनाभ्यास फलित होत नाही. त्यामुळे साधकभक्त-योगिशिष्याने सावधान राहिले पाहिजे. जोपर्यंत देहाभिमान दूर होत नाही तोपर्यंत धैर्य धारण करून अभ्यासपथावर नवीन अनुभव घेत घेत पुढे जाण्याचा उद्योग करणे आवश्यक आहे. जोपर्यंत परब्रह्मस्वरूपाची प्राप्ती होत नाही तोपर्यंत निश्चयाने ब्रह्मवेगसमाधीनेच शक्तिसमूहाचे मंथन करीत राहिले पाहिजे (१.५ पृ.४५), एखाद्या साधकभक्तयोगिशिष्याला स्वभावाचा अनुभव आल्याशिवायच अर्थात् जागरादि अवस्थांच्या योग्य ज्ञानाशिवायच उत्क्रांतिबलाने जरी कैवल्य अथवा मोक्ष प्राप्त झाला तरीही त्याने जर उद्बंधन अर्थात् शक्तिचक्रसंधानाचा त्याग केला तर तो मोक्षाचा उपभोग घेणारा असूनही प्रमूढ अर्थात् अत्यंत मूढ म्हणविला जातो (१.११ पृ.८४), परंतु ज्या साधकभक्तयोगिशिष्याला या तुर्यावस्थेची जाणीव झालेली असत नाही अर्थात्

ज्याला श्रीशिवशक्त्यात्मक सामरस्याचे ज्ञान झालेले असत नाही त्याला जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ती यांचे ज्ञान झालेले असूनही त्याच्या इंद्रियांवर पूर्णपणे ताबा मिळविता येत नाही. त्यामुळे त्याचे थोडेसे अध:पतन होऊन त्याला मोक्ष प्राप्त होत नाही (१.१२ पृ.९०), सहा प्रकारच्या सिद्धी या समाधीच्या सिद्धीमध्ये म्हणजेच ज्ञानप्राप्तीमध्ये विघ्न आहेत आणि व्युत्थानात सिद्धी आहेत. अशा साधकभक्तयोगिशिष्याची देहवासना संपलेली नसते. त्यामुळे त्याच्या बिंदू व नादाच्या शक्तींपासून उत्पन्न झालेल्या मितसिद्धी अस्थायी असतात आणि त्या साधकभक्तयोगिशिष्याला नेहमी क्षुब्ध करीत असतात. त्यामुळे साधकभक्तयोगिशिष्याने नेहमी सावध राहिले पाहिजे. हे सर्व श्रीसद्गुरूंचे कृपापात्र बनून राहण्यानेच होऊ शकते (१.४ पृ.१९३), शुद्ध विद्येचा एकदा उदय झाल्यावर साधकभक्तयोगिशिष्याचा अभ्यास नेहमी उत्थितच राहतो; परंतु एखाद्या वेळेला जरी साधकभक्तयोगिशिष्य बेसावध राहिला तरीही त्याच्या अभ्यासात अडथळे उत्पन्न होतात. साधकभक्तयोगिशिष्य त्यावेळेला स्वप्नरूप भेदाला प्राप्त होतो अर्थात् तो भेदमय विकल्प प्रपंचामध्ये डुंबून जाऊन त्रिशंकूप्रमाणे अर्धवट लटकत राहतो. तो जाग्रत अवस्थेच्या विकल्पमय भ्रमामुळे स्वप्नात जातो आणि पूर्णत्व मिळविण्यापासून वंचित राहतो. त्यामुळे साधकभक्तयोगिशिष्याने सावध राहूनच अभ्यासात मग्न राहिले पाहिजे (२.१० पृ.२४७), वासनेचा लाभ होऊनही जो साधकभक्तयोगिशिष्य सावध होत नाही त्याला विनायकगण अनित्य अशा भोगात रमवितात (२.१० पृ.२४८), सिद्धयोग्याने नित्यशुद्ध विचार करण्याला युक्त व्हावे आणि सिद्धीची अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्याची उत्तम इच्छा करणाऱ्याने आसक्ती धरू नये (२.१० पृ.२४९), प्रकाशात्मक शुद्ध विद्येच्या संहारामध्ये म्हणजे नाशामध्ये अवधान नसल्यामुळे विद्येचा नाश होतो व त्यामुळे त्यातून निर्माण होणाऱ्या अर्थात् क्रमश: विद्येच्या संहारातून जन्मणाऱ्या भेदात्मक आणि विकल्पप्रपंचरूप स्वप्नाचे दर्शन होते. त्यामुळेच सिद्धयोग्याने सतत शुद्धविद्येच्या विमर्शासाठी तत्पर राहावे. थोडीशीही विचारांची उपेक्षा करू नये (२.१० पृ.२५३), बीजात म्हणजेच परिशक्तियुक्त विश्वकारणात अवधान म्हणजेच वारंवार चित्ताला नेऊन ठेवावे. असा प्रयत्न साधकभक्तयोगिशिष्याने नेहमी करावा. एवढे सामर्थ्य जरी प्राप्त झाले तरी सिद्धयोग्याने उदासीन होऊ नये म्हणजे स्वत:ला कृतकृत्य समजू नये; कारण त्याने "**बीजावधानम्**" या सूत्राप्रमाणे बीजाविषयी सावध असावे अर्थात् जागृत कुंडलिनी शक्ती अखंड

साधनरत राहील असे पाहावे म्हणजे दीर्घकाल, निरंतर व श्रद्धाभक्त्यादर-सत्कारपूर्वक सिद्धयोगसाधन करीत असावे (३.१५ पृ.३५६), साधक-भक्तयोगिशिष्याला व शुद्धविद्यास्वरूप नाहीसे झालेल्या सिद्धयोग्याला "क"वर्गादि वर्णांमध्ये राहणाऱ्या माहेश्वर्यादि पशुमाता मोहित करतात व त्यांना खाली ढकलतात. याकरिता त्यांनी कायम सावधच राहिले पाहिजे आणि इंद्रियांच्या आनंदाच्या विनंतीला अजिबात बळी पडता कामा नये (३.१६ पृ.३७६ ते ३८५), चिदानंदरसाचा थोडासा लाभ झाला असताही जो सावध होत नाही त्याला विनायकादि शक्ती स्वर्गादि अनित्य विषय-भोगांकडे आकर्षित करतात. त्यामुळे उत्तमपदांची इच्छा करणाऱ्या साधक-भक्तयोगिशिष्याने त्या विषयांमध्ये आसक्ती ठेवू नये. अर्थात् सच्चिदानंदाने परिपूर्ण असणाऱ्या चमत्कारपूर्ण रसामृततेचा स्वाद घेत असताना समाधान-संस्काराच्या प्राप्तीत प्रमाद करणाऱ्याला किंवा मोहात पडणाऱ्याला माहेश्यादि म्हणजेच विघ्ने आणणाऱ्या सिद्धांकडून क्षणभंगुर म्हणजेच नष्ट होणाऱ्या भोग्य पदार्थांमध्ये प्रलोभन निर्माण होण्याची शक्यता असल्यामुळे तुर्यातीत पदात समारूढ होण्याची इच्छा असेलल्या साधकभक्तयोगिशिष्याने त्या कोणत्याही अवस्थेत आसक्त होऊ नये (३.२४ पृ.४०८), श्रीसद्गुरुमुखाने या अलौकिक योगाचे श्रवण करून त्याचे मनन आणि निदिध्यासन करण्याने शंकारहित होऊन साधकभक्तयोगिशिष्याने अविकल्प अर्थात् विचाररहित विमर्शाचा आश्रय घेऊन श्रीशिवमय भावनेने तुर्यातीत पदाचा जोपर्यंत श्रीशिवांशी साम्य प्राप्त होत नाही तोपर्यंत अभ्यास केला पाहिजे, ही गोष्ट स्वतः श्रीभगवान् श्रीभैरवांनी सांगितली आहे अर्थात् हा अटल निश्चय आहे (३.२५ पृ.४१७), हव्यास किंवा इच्छा अगर अभिलाषा वाटल्यामुळे एका जन्मातून दुसऱ्या जन्मात नेला जाणारा पशू अथवा जीव बहिर्मुख गतीने युक्त होतो अर्थात् सर्वात्मभावाचा विमर्श न केल्यामुळे कर्माचे म्हणजे कुंडलिनीशक्तीच्या बाह्यसंसारोन्मुखतेने कामोपभोगाकांक्षाइच्छावासनातृष्णा-संकल्पनादींचे ओझे वाहणारा जीव वारंवार जन्ममरणचक्रपरंपरा भोगतो (३.४० पृ.५०७) आणि शेवटी श्रीक्षेमराज पंडित असे म्हणतात की, हे लोकहो! संसारसागरातून लवकरात लवकर अथवा वेगाने तरून जा. शाश्वतप्रकाशानंदाने भरलेल्या या श्रेष्ठ स्थानावर आपले पाऊल स्थिर ठेवा बरे! अजिबात हलू नका, निश्चल राहा. श्रीशिवभगवंतांनी सांगितलेली ही रहस्याने उज्ज्वल अशी सूत्रे विचारात घ्या. ही "**श्रीशिवसूत्रे**" चांगल्या

उक्तींनी विलसणारी असून अंतःकरणाला आनंदाने नाचावयाला लावणारी आहेत व श्रीशिवपदाला एकाच झेपेत पोहोचविणारी आहेत. (३.४५ पृ.५४२)

येथपर्यंत आपण श्रीशिवसूत्रकारांनी कथन केलेल्या साधनांचा व साधकभक्तयोगिशिष्यांना दिलेल्या सूचनांचा विचार केला. आता "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाचेच विस्तृत रूप असलेल्या "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात यासंबंधी काय म्हटले आहे, ते पाहणे इष्ट ठरेल.

श्रीस्पंदशास्त्रकारांनी स्वभावोपलब्धी किंवा सहजविद्योदय होण्यासाठी अर्थात् चिच्छशक्ती कुंडलिनी जागृत होण्यासाठी व पिंडब्रह्मांडाची संहारणी घडून येण्यासाठी कोणत्या उपायांचा किंवा साधनांचा आश्रय साधकभक्त-योगिशिष्यांनी घ्यावा यासंबंधी जो निर्देश केला आहे तो संक्षेपतः पाहणे इष्ट ठरेल.

**(१)** अबुद्ध, बुद्ध, प्रबुद्ध व सुप्रबुद्ध असे चार प्रकारचे जीव असून (पृ.२२६) ज्यावेळी प्रबुद्ध या जीवाची आत्मजिज्ञासा तीव्रतर रूप धारण करते त्यावेळी भगवान् श्रीचंद्रमौळी स्वयं श्रीसद्गुरूंचे रूप धारण करून त्या जीवाला श्रीशांकरमार्गात दीक्षित करून देतात अर्थात् त्याच्यावर शक्तिपात किंवा कृपा करतात. (पृ.२२८)

**(२)** श्रीशिवांपासून (सहस्रारापासून) पृथ्वीपर्यंत (मूलाधारापर्यंत) हा जो विस्तीर्ण मार्ग (सुषुम्नापथ) आहे, तो चिद्वस्तूनेच (कुंडलिनी शक्तीनेच) सिद्ध होतो व त्या शक्तीमुळेच जाणला जातो. (अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने अनादिनिद्रिस्थ चैतन्यरूप आत्मशक्ती कुंडलिनी जागृत झाल्यावर ती स्वतः सिद्धयोगसाधनरूप होऊन साधकाला श्रीशिवांशी समरस करते.)

**(३)** स्पंदतत्त्वाची अर्थात् शक्तितत्त्वाची अभिव्यक्ती म्हणजे स्वरूपाचा अनुभव प्राप्त होण्यासाठी प्रयत्नशील असलेला प्रबुद्ध साधकयोगी आपल्या तुर्यावस्थेतील भोगात्मक, चमत्कारमय अशा स्पंदतत्त्वाची अर्थात् आपल्या चिन्मात्र स्वरूपाची अनुभूती जागृतावस्थेतच अत्यंत अल्प काळामध्येच अखंड प्राप्त करून घेत असतो. (पृ.३६४)

**(४)** प्रबुद्धाचा अभ्यास सतत जागृत राहिल्याने तो विशेष स्पंदाचा सामान्य स्पंदात लय करीत असतो. असा नित्य उद्योग म्हणजे अभ्यास-साधन तो करीत असल्यामुळे हे गुणादिक स्पंद त्याचा पराभव करू शकत

नाहीत. (पृ.२६४)

**(५)** जो प्रबुद्ध योगी स्वतःमध्ये स्पंदतत्त्वाच्या स्वरूपाची अनुभूती प्राप्त करून घेण्यासाठी प्रतिक्षण उद्योग करीत राहतो तो प्रबुद्ध योगी जाग्रत् अवस्थेमध्येच आपल्या भावाची अर्थात् तुर्यचमत्कारमय अशा स्पंदतत्त्वाची अनुभूती अत्यंत अल्प काळामध्ये प्राप्त करून घेत असतो. (पृ.२६८)

**(६)** ज्या भाग्यशाली साधकांवर तीव्रतम शक्तिपात होतो त्या व्यक्तींना श्रीसद्गुरू हे लोकोत्तर प्रातिभज्ञानाच्या द्वारा या मधल्या अवकाशातील म्हणजे दोन विचारांमधील संधिक्षण आणि या क्षणांमध्ये प्रकाशमान राहणारे स्पंदतत्त्व या सर्वांची अनुभूती करवून देतात. (पृ.२८५)

**(७)** विशेष स्थितींचे क्षण पकडल्यामुळे साधकाचे चंद्र व सूर्य म्हणजे मन व प्राण अकस्मात् लय पावतात. त्यावेळी जीव ब्रह्माची एकता होऊन तो साधक ब्रह्मस्थितिप्रत पोहोचतो. (पृ.२९९)

**(८)** अलौकिक मार्गाने म्हणजे सुषुम्नामार्गाने प्राण व मन लय पावतात. (पृ.२९०)

**(९)** प्रबुद्धाला श्रीईश्वर शक्तिपाताच्या प्रभावाने इतर लोकांहून निराळ्याच प्रकारची जागृती झालेली असते व त्याची ज्ञानदृष्टी चांगलीच उघडलेली असते. (पृ.२९०)

**(१०)** प्राणापानांची (सुषुम्नामार्गात) प्रशांती हीच आत्मदर्शनाची युक्ती आहे. (पृ.२९१)

**(११)** भगवती संविद् शक्तीच मध्य अर्थात् सुषुम्नेव्यतिरिक्त आणखी काही नाही; कारण की, ती सर्वांमध्ये समानरूपाने विद्यमान राहते. त्या सुषुम्नानाडीच्या आधाराशी संलग्न किंवा एकरूप अगर तिच्या अंतरातून गमन केल्याशिवाय (साधकाला आपल्या वास्तविक) स्वरूपाचे ज्ञान होत नाही. (पृ.२९७)

**(१२)** केवळ वर्णरूप मंत्र पशुभावात राहणारे असतात. सुषुम्नामार्गात त्यांचा जप-उच्चारण केल्यावर ते पशुपती होतात. खरे पाहिले तर सिद्ध-मार्गातच मंत्रांची सफलता आहे. (पृ.३०३)

**(१३)** हे मंत्र मायेच्या काजळीपासून अलिप्त होऊन, संसारातील भोगसिद्धीपासून निवृत्त होऊन, शुद्ध संविद्रूप किंवा शांतरूप अर्थात् ज्यांचे विशिष्ट देवतास्वरूप समाप्त झालेले आहे असे होऊन, भक्ताच्या किंवा आराधना करणाऱ्या व्यक्तीच्या चित्तासह त्याच ठिकाणी सामान्य स्पंदरूप

चिदाकाशात किंवा स्पंदतत्त्वात विलीन होतात. या कारणामुळे हे सर्व मंत्र श्रीशिवस्वरूप आहेत. (पृ.३०५)

**(१४)** दीक्षा देण्यासाठी प्रवृत्त झालेल्या आचार्यादींचे करणरूप सर्व मंत्र त्या स्पंदतत्त्वाच्या सामर्थ्याला प्राप्त करून अनुप्राणकत्वाने अर्थात् त्या स्पंदतत्त्वात समाविष्ट होऊन आचार्यादींशी संबधित झालेल्या आराधकाच्या चित्तासह मोक्ष आणि मोक्ष मिळविण्याच्या साधनाचा अधिकार मिळविण्यासाठी प्रवृत्त होतात.

आता आपण पिंडब्रह्मांडाची संहारणी होऊन साधकभक्तयोगिशिष्याला ज्या तत्त्वज्ञानाची म्हणजे अंतिम स्थितीची, मोक्षाची, कैवल्याची, अमात्रक स्थितीची, स्वस्पंद स्थितीची, जीवशिवैक्याची किंवा श्रीशिवशक्तिसामरस्याची प्राप्ती होते व तो सिद्धयोगी होऊन ज्या स्थितीत किंवा अवस्थेत राहतो त्याचे वर्णन महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्तपाद यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात कसे केले आहे ते पाहू.

श्रीशिवसूत्रकारांनी या श्रीशिवशक्तिसामरस्यरूप फलनिष्पत्तीचे वर्णन "श्रीभैरवसमाधी" किंवा "प्रतिमीलन" या शब्दात साररूपाने केले आहे. असे जरी असले तरी या फलनिष्पत्तीचे निरनिराळ्या कोनांनी व अंगांनी वर्णन करताना प्रथमतः शांभवोपायात श्रीशिवसूत्रकारांनी असे म्हटले आहे की, जो स्वयम्‌ला जाणतो त्यालाच इतर सर्व ज्ञान होत असते. जो चैतन्याच्या स्वप्रकाशात न्हाऊन निघतो तोच पवित्र आहे. चैतन्य म्हणजे तुमचा स्वभाव आहे. त्याला ओलांडून तुम्ही क्षणभरही राहू शकत नाही. त्यामुळेच माझ्या शिवाय चैतन्य आणखी कोणतेच असू शकत नाही हा भाव दृढ झाला की, संन्यास उत्पन्न होईल; कारण माझ्याशिवाय आणखी कोणी आहे हा भाव उदय होणे म्हणजेच संसार होय(१.१८ पृ.१७), स्वतःच्या आत्मगत अशुद्धीमुळे अर्थात् आणवमलामुळे संसारामधील वासनात्मक कर्मांच्या अभिलाषांमध्ये किंवा इच्छेमध्ये पडलेल्या अर्थात् कार्ममलाने लिप्त झालेल्या मर्यादित सामर्थ्याच्या अर्थात् पूर्ण सामर्थ्य नसलेल्या पुरुषाच्या क्षुब्धवृत्ती आणि माया अर्थात् मल, अहंकार व भेदबुद्धी नाहीशी झाल्यावर त्या पुरुषाला परमपद प्राप्त होत असते (१.३ पृ.३२), अशा रीतीने स्वसंविद्रूप म्हणजे श्रीशिवांशी अद्वयरूपाने समवायसंबंधाने, अविनाभावाने, संघट्टपणे, लोलीभावाने, यामलभावाने आणि अनवच्छेदपणे, एकरसरूप, समव्याप्त व समरस असेलल्या कालाग्नीने म्हणजे श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेल्या

कुंडलिनी शक्तीने ज्याचा भेदभाव अर्थात् भेददृष्टी पूर्णपणे होरपळून निघालेली आहे त्याची समाधी अवस्था व व्युत्थान अवस्था या सारख्याच होत. यांच्यात यत्किंचितही भेद असत नाही (१.७ पृ.६६), तुर्यातीत ही अवस्था पूर्ण, अखंड व दिव्य अशा स्व-चैतन्याने भरलेली असते. या अवस्थेत कोणत्याही यौगिक प्रयत्नांची आवश्यकता नसते. ज्ञानी सिद्धयोगी या अवस्थेला महाप्रचय असे म्हणतात. जो या अवस्थेत गेलेला असतो त्याला सर्व काही श्रीशिवच भासते (१.११ पृ.८२), असा सिद्धयोगी केवल चिन्मात्रच असतो. त्याच्याकडे संवित् साम्राज्याचे वैभव असल्याकारणाने तो भेदजगताचा ग्रास करणाऱ्या वीरांमध्ये उत्तम वीर असतो; कारण तो अंतर्गत त्याचप्रमाणे बाह्य प्रणवशील इंद्रियांचा अधीश्वर असल्यामुळे त्याची इंद्रिये भेदप्रथारूप संसारामध्ये ग्रस्त राहत नाहीत. त्यामुळे सर्व योग्यांमध्ये तोच उत्तम सिद्ध-योगी आहे आणि तोच तुर्यातीत आहे (१.११ पृ.८३), त्या योग्याला महाम्नायात मंथानभैरव असे म्हटले आहे. त्याला मंथानभैरव असे म्हणण्याचे कारण म्हणजे तो सर्व वेद्य जगत् आत्म्यात लीन करतो व एकत्र करून पुनः घुसळून वरही आणतो. या कारणामुळे त्याला स्वच्छंदभैरव असेही म्हणतात (१.११ पृ.८४), माझ्यात हे सर्व जगत् साठविलेले आहे किंवा या जगात् सर्वत्र मीच भरलेलो आहे या दोन्ही धारणांचा जर आवेश साधला तर साधकभक्तयोगिशिष्य त्रैलोक्याचे स्वामित्व झटकन् मिळवितो आणि तो सिद्धयोगी होऊन स्वच्छंदाच्या योगाने स्वच्छंद गतीत फिरणारा अथवा संचार करणारा होऊन स्वच्छंदपदात युक्त होतो व स्वच्छंदसमता प्राप्त करतो (१.११ पृ.८५), सुप्रबुद्ध योग्याला त्या चिद्रूप स्वभावाची उपलब्धी जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ती या तीनही अवस्थांच्या आदि, मध्य आणि अंत यांमध्ये समान आणि अखंड रूपात त्याचप्रमाणे प्रत्येक समयी येत राहते. बाह्यज्ञानेंद्रिये, बुद्धी, अहंकार, मन आणि सुषुम्ना यांच्या आश्रयाने चौदा मार्गातून जो जो अर्थात् साधकभक्तयोगिशिष्य जाईल, हे जननी! तेथे श्रीशिवांचे आश्रयस्थान असणारी अशी कला आहेच. ही अवस्था प्राप्त करणे हे या जगात देवांनाही दुर्लभ आहे (१.११ पृ.८६), शक्तिचक्रांच्या अनुसंधानामुळे तुर्यावस्थेच्या अनुभवाने पूर्ण भरलेली अभेदख्याती किंवा अभेदज्ञान स्फुरू लागते. हे अभेदज्ञान अख्यातीचे म्हणजेच अज्ञानाचे हरण करणारे आहे. या तुर्यावस्थेत योग्याला पूर्वी वर्णन केलेल्या चैतन्याचे ज्ञान होते. वर सांगितलेल्या शक्तिचक्राच्या अनुसंधानामुळे जाग्रदादि तीन

अवस्थांमधला भेद नाहीसा होतो आणि तुर्यानंदाच्या वृष्टीमुळे आनंदरसमग्र अशा परमाकाशाची भावना करीत करीत साधकभक्तयोगिशिष्य सिद्धयोगी होऊन या जाग्रदादि अवस्थांचा चमत्कारिक रीतीने भोक्ता होतो अर्थात् तो भोग भोगूनही निर्लेपच राहतो. जो त्रैकालिक म्हणजेच भूत, भविष्य आणि वर्तमानकाळी भोग्य विषय आणि भोगणारा यांना योग्य रीतीने जाणतो तो सिद्धयोगी सर्व विषयांचा उपभोग घेऊनही त्यात लिप्त होत नाही, या उक्ती-प्रमाणे तो सिद्धयोगी निष्कंटक ज्ञानसाम्राज्याच्या वैभवाचे भोग भोगतो, चिद्रूपात गढून जातो किंवा स्वात्मज्ञानरूप परमानंदात गढून जातो तो सिद्धयोगी भेदाचा ग्रास करणाऱ्या वीरांचा किंवा धैर्यवानांचा नायक अथवा स्वामी होतो. त्याचप्रमाणे आत बाहेर परसरणाऱ्या अथवा संचार करणाऱ्या इंद्रियांचा स्वामी होतो. त्याला या सर्व सामर्थ्यामुळे वीरेश ही पदवी मिळते (१.११ पृ.८८), हे श्रीशिवप्रभो ! माझ्यामध्येच हे सकल जगत् स्थित आहे आणि सर्वत्र मीच स्थित आहे या दोन धारणांच्या भावनांमुळे ज्याचे सर्व विकल्प व मोह नष्ट झाले आहेत असा सिद्धयोगी तुझी पूजा करून या तीनही जगताचे आधिपत्य तत्काल प्राप्त करतो (१.१२ पृ.८९), अशा प्रकारे तुर्यावस्थेशी समरस झालेला सिद्धयोगी जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ती या तीनही अवस्थांमध्ये श्रीशिवात्मक अहंज्ञानाचा अनुभव घेत राहतो आणि आपल्या इंद्रियांवर विजय मिळवितो (१.११ पृ.९०), सांसारिक सुख म्हणजे सत्त्व, दु:ख म्हणजे रज आणि मोह म्हणजे तम यांच्या अवस्थांमध्येही श्रीपरमशिवस्वरूपच आहे, अशी सिद्धयोग्याची अखंड व निरंतर स्थिती असते (१.१२ पृ.९२), सिद्धयोग्याचे विस्मय पावणे किंवा आश्चर्यचकित होणे म्हणजे योगातील समाधी आदि अवस्थाच होत. या अवस्था हा सिद्ध-योगी परतत्त्वाच्या भूमिकेवर आरूढ झाला आहे असे प्रतिपादन करतात; कारण तो चिद्धनस्वात्मावेशाने अर्थात् चैतन्याने परिपूर्ण अशा स्वात्म्याचा त्याच्यात प्रवेश झाल्याने नित्योदित व विकसित अशा आत्मविभूतीत अर्थात् वैभवात निमग्न असतो (१.१२ पृ.९३), हृदयाकाशात बुद्धींद्रियांना लीन करणारा आणि ऊर्ध्व व अधर पद्मसंपुटामध्ये राहून अनन्य अर्थात् एकाग्र चित्त झालेला सिद्धयोगी परमस्वातंत्र्य किंवा परमसौभाग्य मिळवितो. सिद्ध-योगी हा प्रमाण व प्रमेयसंपुटामध्ये म्हणजे प्रमाता होऊन सर्वेंद्रियांचा स्वामी होतो म्हणजेच स्वतंत्र होतो. श्रेष्ठ सौभाग्याला म्हणजेच सर्व विश्वाच्या नियामकत्वाला म्हणजेच स्वामित्वाला मिळवितो. तो सिद्धयोगी अचेतन

व सचेतन अशा स्थावरजंगमात्मक विश्वाला म्हणजेच संक्षेपानेच षड्विध मार्गांना व्यापून त्यात असणाऱ्या देवयोन्यादि चौदा लोक, धर्मघटादि भाव, पृथ्विव्यादि तत्त्वे व भोगसाधन इंद्रिये यांमध्ये अर्थात् सर्व पिंडब्रह्मांडामध्ये सर्वभावाने अर्थात् सामरस्याने स्थित असतो (१.१५ पृ.१०९, ११०), सहा मार्गांच्या अंतर्गत असणाऱ्या सर्व देवयोनींमध्ये, चौदा भूतांमध्ये, धर्म घटादि भावांमध्ये पृथ्वी आदि तत्त्वांमध्ये आणि भोगाचे साधन असणाऱ्या इंद्रियांमध्ये हा सिद्धयोगी सामरस्याने स्थित असतो अर्थात् सर्व अवस्थांमध्ये असूनही आपले ऐश्वर्य न गमवता श्रीपरमभैरवता अर्थात् श्रीशिवमय पूर्ण चैतन्यशक्ती प्राप्त करून स्थित असतो. हीच अत्यंत श्रेष्ठ रहस्याने युक्त अशी निर्व्युत्थान समाधी होय (१.१५ पृ.११०), ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य या तत्त्वात विश्वाचे अनुसंधान करतो म्हणजेच शुद्ध तत्त्व हे श्रीपरमशिव आहेत व हे विश्व श्रीशिवांशी युक्त आहे असे ज्ञान करून घेतो आणि या विश्वाला श्रीशिवमयच पाहतो त्यावेळेला ज्यांना पशू नावाची बंधशक्ती मुळीच असत नाही त्या श्रीसदाशिवांप्रमाणे तो साधकभक्तयोगिशिष्य संपूर्ण जगताचा पती अर्थात् नियामक किंवा सिद्धयोगी होतो (१.१६ पृ.११७), अंतःकरण आणि बहिष्करण अर्थात् आंतरिंद्रिये आणि बाह्येंद्रिये यांच्यामध्ये स्वात्माराम सिद्धयोग्याचे समाधिसुख आहे अर्थात् या जगातील सर्व दृश्ये अथवा वस्तुजात आणि ते पाहणारे सर्व म्हणजे दृश्ये व द्रष्टे या उभयतांचे ज्ञान असणे हा आपला स्थायी स्वभाव आहे, या जाणिवेने सिद्धयोग्याला होणारा जो आनंद ते समाधिसुख होय (१.१८ पृ.१२६ ते १३२) आणि सिद्धयोग्याला नानातऱ्हेच्या विभूती म्हणजे सिद्धी व श्रीशिवशक्तिसामरस्याची अंतिम सिद्धी प्राप्त होते. (१.१९ ते २१ पृ.१३२ ते १५१)

यानंतर शाक्तोपायात फलनिष्पत्तीचे वर्णन करताना श्रीशिवसूत्रकारांनी असे म्हटले आहे की, ज्यावेळी श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत होऊन सिद्धयोग साधनाने सुषुम्नागामी झाली असता श्रीईश्वरी इच्छेने आपोआप किंवा नैसर्गिक असे परमश्रेष्ठ ज्ञान उदय पावते म्हणजे कुंडलिनीशक्ती ही श्रीशिवस्वरूपात विकसित होते त्यावेळी भगवान् श्रीशिवांची, ज्ञानरूपी, अथांग, मर्यादातीत, विशाल व गगनात म्हणजे सहस्रारात विहार करणारी अशी जी आनंदोल्लासपूर्ण सामरस्यावस्था अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्यावस्था आहे ती सिद्धयोग्याला प्राप्त होते अर्थात् सिद्धयोग्याच्या ठिकाणी स्वाभाविक व सहज अशा शुद्ध-

विद्येचा उदय झाल्यावर त्याला चिदाकाशगामी खेचरी मुद्रा म्हणजे सहस्रारात परसंविद्रूप श्रीशिवावस्था प्राप्त होते (२.५ पृ.१९९ ते २०५), ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्याला मातृकाचक्रसंबोध अर्थात् वर्णसमुदायाचे ज्ञान होते त्यावेळेला तो सिद्धयोगी जे बोलेल ते मंत्रश्रेष्ठतेला पावते अर्थात् सत्य होते (२.७ पृ.२२८), मातृकाचक्राचे पूर्ण ज्ञान किंवा संबोध हा जीवाला त्याचा यथार्थ अहम् हाच आनंदयुक्त श्रीशिवांचे चैतन्य आहे याचे ज्ञान करून देण्याला प्रवृत्त होतो. हे यथार्थ चैतन्य हेच मंत्रांचे रहस्य आहे. हेच जीवाला त्याच्या खोट्या अहम्च्या जाणिवेतून बाहेर काढते त्यामुळे त्याला आपण, श्रीशिव आणि त्यांचे प्रकटीकरण हे एकच आहोत असे समजून येते (२.७ पृ.२३४), ज्यावेळेला क्षोभ म्हणजेच देहामध्ये आत्म्याचा अभिमान धरणारा अहम् पूर्णाहंतेमध्ये लीन होऊन जातो त्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्याची प्रतिष्ठा परमपदामध्ये होते (२.८ पृ.२३६), या शरीराला हविर्द्रव्य असे म्हटले आहे. या हवनामुळे ज्ञानरूप दिव्यदेहाची प्राप्ती होते. हाच चिद्व्यापक यजमानाचा पर अथवा श्रेष्ठ देह होय (२.८ पृ.२३८), कोणत्यातरी धारणेत स्थित असणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यात उत्तरोत्तर निर्विकल्प समावेश-दशेच्या रसास्वादामुळे जी अद्वयस्वरूप अर्थात् द्वैतरहित आत्मोपलब्धिरूप अत्यंत पूर्णता प्राप्त होते तिलाच येथे तृप्ती असे म्हटले आहे (२.१० पृ.२४६) आणि वृत्तीचा म्हणजेच विद्येचा उदय झाला की, तीच प्रबुद्धता होय आणि असा प्रबुद्ध झालेला साधकभक्तयोगिशिष्य निरंकुश म्हणजे स्वतंत्र होतो. तो स्वप्रकाशात्मा होतो अर्थात् ध्येयाशी एकरूप होतो. त्यामुळे त्याला नित्य-तृप्ती कधीही सोडून जात नाही. (२.१० पृ.२५१)

शेवटी आणवोपायात फलनिष्पत्तीचे वर्णन करताना श्रीशिवसूत्रकारांनी असे म्हटले आहे की, ज्यावेळेला परमार्थरूप सूर्याचा उदय होतो त्यावेळेला अविद्यारूप समस्त अंधाराचा नाश होतो व ज्ञानी मनुष्य त्याच्या निर्मल झालेल्या दृष्टीने किंचित्ही संसार पाहत नाही (३.३ पृ.२७७), ज्ञानरूप देहाची प्राप्ती म्हणजेच श्रेष्ठ प्रकारच्या ज्ञानाचा उदय होय (३.४ पृ.२९२), हृदयापासून नाभीत प्राणाच्या आणि विषयांपासून मनाच्या संचारणामुळेच भूतांपासून वेगळेपणा होतो व निरुपाधिक स्वच्छस्वच्छंद चिदात्मत्वही साधते आणि उन्मनापर्यंतच्या सर्व गाठी पूर्वी सांगितलेल्या लक्षणांनी तोडून व त्या सर्वांचा त्याग करून साधकभक्तयोगिशिष्य स्वच्छंदता प्राप्त करतो (३.५ पृ.३००), सिद्धयोगी आत्मबलाने स्वतःवर भासणाऱ्या भूतांच्या सामर्थ्याने

युक्त असणाऱ्या प्रत्येक भूताला आभासाचा आभास करून छत्तीस तत्त्वांच्या सार्मथ्याने युक्त असणाऱ्या प्रत्येक भूताला वेगळे वेगळे करतो किंवा तो सिद्धयोगी त्या भूतांना समूहात किंवा संघातात ठेवतो. आत्म्यात म्हणजेच स्वतःत ठेवतो किंवा त्या भूतांमध्ये विकार उत्पन्न करू शकतो. हीच सर्वत्र अखंडित स्वरूपात राहणाऱ्या सिद्धयोग्याची व्यापक प्रभुशक्ती आहे (३.५ पृ.३०३), सिद्धयोगसाधनाने बुद्धी नसतानाही ज्ञान होते; कारण ज्ञान हे अखंड अथवा निरंतर उदितच असते. स्वतःच्या ज्ञानशक्तीत स्थिर झालेला सिद्धयोगी चैतन्ययुक्त श्रीमहेशस्वरूपच होतो (३.६ पृ.३१०,३११), आत्मव्याप्ती होईपर्यंत मोहावर विजय मिळविल्याने उन्मना अर्थात् श्रीशिवव्याप्तिरूप सात्त्विक विद्या सिद्धयोग्याला प्राप्त होते. ही सहजावस्था आहे व या अवस्थेत सिद्धयोग्याचे अनायासानेच स्वभाविक रूपात समाधी किंवा व्युथान दशेत संकोचरहित श्रीपरमशिवरूपतेचे ज्ञान स्थित राहते (३.७ पृ.३२०), मोहमयी मायेवर अमर्याद विजय मिळविल्यामुळे साधकभक्तयोगिशिष्य आतून स्फुरण पावणाऱ्या सहजविद्येवर विजय मिळवितो (३.७ पृ.३२३), ज्ञान मिळवून विश्व हीच भिंत झालेल्या चित्तातच जो लीन होतो त्याला श्रीपरमभैरवता प्राप्त होते (३.९ पृ.३३१), नेहमी सावध असणाऱ्या जीवन्मुक्त सिद्धयोग्याचा मोक्षलक्ष्मी चिरकाल आश्रय घेते अर्थात् सिद्धयोग्याचा मोह कायमचा निघून जातो. आत्मविचारात गुंतलेला म्हणजे आत्मज्ञानी असा सिद्धयोगी आत्मरूप होतो. हा सिद्धयोगी अंतःपरिच्छिन्न अर्थात् आपल्या शरीरगत वृत्तींच्या स्वरूपाचे अवलंबन करणारा स्वेच्छेने स्वपरिस्पंदाची क्रीडा करून स्वात्मरूप चैतन्यभिंतीवर नाच करतो (३.९ पृ.३३४,३३५), जो सिद्धयोगी उन्मनावस्थेपर्यंत पोहोचला आहे तो निवृत्त होऊन जंगल अथवा गुहेत जाऊन बसत नाही; तर तो वैश्विक नाट्यातील स्वतःची भूमिका ओळखतो आणि जीवनातील कर्तव्ये निभावीत राहतो (३.१० पृ.३३६), सिद्धयोग्याला आंतरचैतन्य शक्तीची अभिव्यक्ती ऋतंभरा प्रज्ञेमुळे सफलतापूर्वक होते (३.१२ पृ.३४४), सर्व जगत् हे श्रीशिवांशी अभिन्न आहे अशा स्वात्म्याच्या झालेल्या ऐक्यज्ञानाने जल, अग्नी इत्यादि तत्त्वे, हिंसा करणारे जीव आणि शरीरात स्थिर असणाऱ्या शब्दराशी सिद्धयोग्याच्या ताब्यात असतात (३.१३ पृ.३४७), परमयोग्याची ही सत्त्वसिद्धी म्हणजे सहजज्ञातेपण व कर्तेपण असलेले स्वातंत्र्यच होय. हे स्वातंत्र्य विश्वाला स्वतःच्या ताब्यात आणण्याला समर्थ असणारे असे असते. जी सर्व तत्त्वे, प्राणिमात्र, मंत्र व वर्ण आहेत ते सर्व

अखंड श्रीशिवभावनेने नित्यच सिद्धयोग्याच्या ताब्यात असतात (३.१४ पृ.३४८,३४९), सिद्धयोगी हा स्वच्छंद होऊन सुरुवातीला, मधल्या अवस्थेत आणि अंतीही विचरण करतो अर्थात् सिद्धयोगाच्या सततच्या अभ्यासामुळेच तो नित्य स्वच्छंदभैरवावस्था स्फुरणरूपाने उपभोगतो. कालोपाधिरहित स्थानाच्या आश्रयामुळे या सिद्धयोग्याला उपाधियुक्त पदार्थांचा धर्म स्पर्शू शकत नाही. तात्त्विक स्वरूप कळलेल्या सिद्धयोग्याला धर्मी आणि धर्म या उपाधी कधीही लागत नाहीत (३.१४अ पृ.३५२), श्रीशिवाभिन्न अवस्था प्राप्त झालेल्या योगनिष्ठ व सुप्रबुद्ध सिद्धयोग्याला जेथे म्हणजेच स्वाभाविक देहात ज्याप्रमाणे स्वरूपाची अभिव्यक्ती करवून देणारी स्वतंत्रता स्पष्टपणे जाणवत असते त्याप्रमाणेच अन्यत्र देहातही लक्ष देणाऱ्या सिद्धयोग्याला ही पूर्णा-हंतारूप अवस्था स्पष्टपणे कळत असते (३.१४अ पृ.३५३), पूर्वावस्थेत दृढ राहिल्यामुळे त्याचप्रमाणे निरंतर अभ्यास करण्यामुळे सिद्धयोग्याला आत्म्याबरोबरचे हे एकत्व स्वाभाविकपणे अनुभवाला येते. त्यामुळे त्या अवस्थेत त्याला ध्यानादींचे प्रयत्न करावे लागत नाहीत. अशा प्रकारे तो सुखस्वरूप होऊन विश्वाचा प्रवाह म्हणजे प्रसर अर्थात् निर्मळपणा आणि उत्पत्ती यांना कारण म्हणून परमामृतरूप समुद्रात देहादींमधील आत्माभिमान, स्वरूप संकोच आणि त्याच्या संबंधातील सर्व संस्कारांपासून निवृत्त होऊन तन्मय होऊन जातो (३.१६ पृ.३५८), परमात्मा श्रीशिवांशी ही परम किंवा अत्यंत श्रेष्ठ अवस्था असून तेच निराभास अर्थात् जगत्, तू, मी इत्यादि कोणत्याही आभासांनी रहित पद असून त्याची प्राप्ती झाली असता सिद्धयोगी परत जन्ममरण परंपरेत येत नाही (३.१६ पृ.३६१,३६२), सिद्धयोगी हा सहस्राररूपी आसनात श्रीशिवशक्ती सामरस्यात स्थित होऊन परमसुखाच्या शाश्वत डोहात बुडून जातो. ज्ञानी योग्यांना उदानवायू हा एखाद्या डोहा-प्रमाणे आहे; कारण सद्रूप मासा ज्यात संचार करीत असतो त्या उदानरूप डोहामध्ये सिद्धयोगी सुखाने संचार करीत असतो (३.१६ पृ.३६२,३६३), श्रीसद्गुरुपरंपरेतून आलेले श्रेष्ठ व शुद्ध असे स्वनिर्वाण जाणून साधक-भक्तयोगिशिष्य मुक्त होतो व देहातून निघून गेल्यानंतर तो परत जन्म घेत नाही (३.१८ पृ.३७२), सहजविद्येचा किंवा शुद्धविद्येचा उदय झाल्यानंतर अशुद्धविद्येचा नाश होतो. हे आत्म्याचे परम स्वातंत्र्य अभिव्यक्त होते. अशा प्रकारे सिद्धयोग्याने आत्मबलाचा आश्रय घेतल्यामुळे त्याचा पुनर्जन्म होत नाही (३.१९ पृ.३७४), ज्या अवस्थेत सिद्धयोग्याच्या मन, बुद्धी, प्राणापान

शक्ती आणि जीवात्मभाव अर्थात् परिमित किंवा संकुचित प्रमाता नष्ट होतो अर्थात् त्याला चित्ताच्या चमत्कार दशा प्राप्त होतात त्याच दशेत सिद्धयोगी श्रीभैरवस्वरूप किंवा श्रीशिवसायुज्य होतो (३.२१ पृ.३९४), हे जननी! विचार, स्मरण आदि प्रकारच्या सर्व मानसिक क्रिया तसेच करण म्हणजे दिव्य करण नावाच्या ऊर्ध्व रेचकादि मुद्रादि खटपटींना टाकून, तुझ्या प्रभावाने प्रभावित होऊन राहिलेल्या सिद्धयोग्यांकडून सदैव अनुपमेय सुखामृताचा वर्षाव करणारी अवस्था निरलसपणे उपभोगिली जाते. अशा प्रकारे शांभवोपायाचा समावेश झालेल्या सिद्धयोग्याकडून अनुत्तर आनंद दशा अनुभविली जाते (३.२१ पृ.३९६), तुर्यरसामुळे सिद्धयोग्याचा प्राण श्रीपरमेश्वरांच्या शक्तिस्फाराच्या सुगंधाने युक्त होतो. त्याच्या सर्व वासना-ग्रंथींचे भेदन झालेले असते अर्थात् त्याच्या सर्व वासना नष्ट झालेल्या असतात. ज्यावेळेला या कुंभकभावाने प्राण हळूहळू आणि समान प्रमाणात बहिःप्रसर करू लागतो त्यावेळेलाही सिद्धयोगी त्या सुगंधाने युक्त आनंदाचा अनुभव करीत असतो. अशा प्रकारे तो रोजचे व्यवहार करीत असूनही सर्व अवस्थांमध्ये चिदानंदघनरूप असतो. व्यवहारातही त्याला अभेददृष्टीचा आनंद मिळत असतो. यालाच निर्व्युत्थान समाधीचा साक्षात्कार असे म्हणतात; कारण तुर्य दशेतून बाहेर येऊन त्या सिद्धयोग्याचे निमेष अर्थात् लयाच्या प्रसंगी प्राणरोध म्हणजे समाधी आणि उन्मेषात प्राणप्रवाह म्हणजे व्युत्थान राहत असते. यालाच तुर्यातीतपद असे म्हणतात (३.२२ पृ.४००), सिद्ध-योग्याचे समदर्शन कधीही बिघडत नाही (३.२२ पृ.४००), समस्त लौकिक व्यवहारांचा त्याग करून जो मुक्तिप्रद अद्वैताचा आश्रय करतो तो सर्व देवांना म्हणजेच श्रीसदाशिव, श्रीईश्वर, श्रीअनंत व श्रीरुद्रादि देवतांना, ब्राह्मणादि वर्ण, ब्रह्मचर्यादि आश्रम, दूधमधादि द्रव्ये व चांडालादि या सर्वांना सारखेच पाहतो व सर्व बंधनातून मुक्त होतो (३.२२ पृ.४०१), असा सिद्धयोगी श्रीशिवांप्रमाणे किंवा श्रीशिवांसारखा होतो (३.२५ पृ.४१७), आत्मज्ञाना-मध्ये सम्यक् सिद्धी प्राप्त केलेल्या जीवनमुक्तसिद्धयोग्याला आपल्या आत्म्याच्या नित्यानंदरसाचे आतून बाहेरून निरंतर आस्वादन करीत राहणे हेच फळ मिळते (३.२६ पृ.४२२), सर्व विश्व हे अशा या सिद्ध श्रीशिवयोग्यांच्या स्फुरणरूप असलेल्या क्रियाशक्तीचा म्हणजे श्रीशिवांशी समवायसंबंधाने, अविनाभावाने, संघट्टपणे, यामलभावाने, अद्वयरूपाने आणि अनवच्छेद्यपणे, एकरसरूप, समव्याप्त व समरस असलेल्या कुंडलिनी शक्तीचा विकास आहे

(३.२० पृ.४४४), सिद्धयोगी हा ज्याप्रमाणे सृष्टिकर्ता असतो त्याप्रमाणे स्थितिकर्ता आणि लयकर्ताही होतो (३.३१ पृ.४५०), सिद्धयोगी हा अखंड जागृत असल्यामुळे आवरणरहित होतो (३.३८ पृ.४९८), सिद्धयोग्याची अनुत्तर श्रीपरमशिवांच्या धामात अखंड स्थिती होते व आपण निरंतर आनंदाने भरून गेलो आहोत असा त्याला सतत अनुभव येतो (३.४० पृ.५०६), ज्या साधकभक्तयोगिशिष्याची संवित् अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने अतंर्मुखाने जागृत झालेली कुंडलिनी शक्ती स्वतःच श्रीसद्गुरुरूपाने सिद्धयोगसाधन करून व सुषुम्नागामी होऊन सहस्रारात श्रीशिवांशी समरस झाली असेल अर्थात् तुर्यावस्थेत आरूढ होऊन स्थिरपद झाली असेल त्याच्या अभिलाषबुद्धीचा क्षय होऊन त्याच्या पुर्यष्टकरूपी जीवस्थितीचा नाश होतो (३.४१ पृ.५१४), ज्याप्रमाणे जागृत अवस्थेतला माणूस स्वप्नातल्या गोष्टींना खरे म्हणून पाहत नाही त्याचप्रमाणे त्याच भावनेने सिद्धयोगी संसारालाही सत्य म्हणून पाहत नाही. अशा रीतीने प्रमाण, प्रमेय व प्रमिती यांच्यामुळे योगारूढ सिद्धयोग्याची बहिर्गती होते आणि त्याच्या प्रमितीच्या कार्यरूप अभिलाषेचा क्षय झाला असता जीव-भावाचाही पूर्णपणे क्षय होतो (३.४१ पृ.५१८, ५१९) आणि अशा सिद्ध-योग्याला पुनःपुन्हा अर्थात् अखंड निमीलन व उन्मीलन असलेली अशी प्रतिमीलन समाधी प्राप्त होते म्हणजे त्याला अंतर्बाह्य श्रीशिवत्वाची जाणीव निरंतर असते. (३.४५ पृ.५३९)

येथपर्यंत आपण श्रीशिवसूत्रकारांनी शांभवोपाय, शाक्तोपाय व आणवोपाय यांमध्ये कथन केलेल्या फलनिष्पत्तीचे विविध अंगांनी व शब्दांनी वर्णन केलेले स्वरूप पाहिले; परंतु श्रीशिवशक्तीसामरस्याची प्राप्ती हेच फलनिष्पत्तीचे एकमात्र स्वरूप आहे. जरी शक्ती म्हणजे चेतनपदावरून खाली उतरून संकुचित झालेला जीव व शक्तिमान् म्हणजे श्रीशिव असे दोन पदार्थ गणले जात असले तरी ते एकरूपच असतात. ज्यावेळी साधकभक्तयोगिशिष्याला सर्व जगत् ही शक्ती आहे व श्रीपरमशिव हे शक्तिमान् आहेत अशी अनुभूती येते त्यावेळी तो सिद्धयोगी होतो. ज्याप्रमाणे पाणी व बर्फ यांचा रस म्हणजेच त्यांचे एकत्रिकरण असते त्याप्रमाणेच श्रीशिव व त्यांच्या शक्तीने युक्त जगत् यांच्यात चिद्रसाचे एकत्रिकरण आहे. ते एकच आहेत अशा संवेदनामुळे श्रेष्ठ शाक्तबलाच्या स्फुरणाने पवित्र झालेल्या हृदयाने युक्त अशा साधक-भक्तयोगिशिष्याला दुसरा जन्म येत नाही. वर्तमान जन्मात तो जीवन्मुक्तच

असतो; पण केवळ त्याच्या प्रारब्धकर्मांचा नाश होईपर्यंत त्याचा देह प्रारब्ध भोगीत राहतो. सारांश, ज्याप्रमाणे लाकडाच्या समूहाला लागलेली अग्नीची ज्वाळा आकाशात लीन होताना दिसते त्याप्रमाणेच देहप्राणादींमध्ये स्थिर असणारा संसिद्ध योग्याचा आत्मा तत्पद अर्थात् श्रीशिवस्वरूपात लीन होतो.

"**श्रीस्पंदशास्त्र**" हे "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाचेच विस्तृत रूप असल्या-मुळे या ग्रंथाच्या संकलककाराने "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथाच्या प्रस्तावनेत उपरोक्त श्रीशिवशक्तिसामरस्याच्या अंतिम फलनिष्पत्तीचे किंवा अवस्थेचे वर्णन करताना असे म्हटले आहे की, "श्रीस्पंदशास्त्रकारांनी या श्रीशिवशक्ति-सामरस्याचे वर्णन "**अभेदोपलब्धी**" या नावाने केले असून याचे वर्णन करताना श्रीसंततुकाराममहाराजांनी असे म्हटले आहे की -

**लवण मेळवितां जळे। काय उरलें निराळें।।१।।**
**तैसा समरस जालों। तुजमाजीं हरपलों।।२।।**
**अग्निकर्पूराच्या मेळीं। काय उरली काजळी।।३।।**
**तुका म्हणे होती। तुझी माझी एक ज्योती।।४।।**

श्रीस्वात्मारामयोगींद्र यांनीही उपरोक्त दृष्टान्ताच्याच आधारे सामरस्याची स्थिती किंवा आत्मोपलब्धी म्हणजेच समाधी होय, हे सांगताना "**श्रीहठ-योगप्रदीपिका**" या ग्रंथात असे म्हटले आहे की, "ज्यावेळी मीठ पाण्यात पडून विरघळते त्यावेळी ते पाण्याशी एकरूप होते. त्याचप्रमाणे ज्यावेळी मनरूपी जीव किंवा शक्ती आत्मरूपाशी अर्थात् स्पंदरूप श्रीशिवांशी म्हणजे चैतन्याशी एकरूप होते त्यावेळी त्या अवस्थेला समाधी असे म्हणतात. ज्यावेळी प्राणांची गती क्षीण होते व मनाचाही लय होतो त्यावेळी जी समरस अवस्था उपस्थित होते त्याला समाधी असे म्हणतात. जीवात्मा व परमात्मा यांच्या उपरोक्त प्रकारे होणाऱ्या ऐक्याला समता असे म्हणतात. या समतेच्या अवस्थेत सर्व संकल्प पूर्णपणे नष्ट होत असल्याने यालाच समाधी असे म्हणतात." (तृतीयोपदेश श्लोक ४.५, ६, ७)

अशी ही एकरस, अनवच्छेद्य, अभेद्य, अपूर्व, अपरंपार, अद्वय, अकथनीय, एकमेवाद्वितीय, अलौकिक व अनुत्तर अवस्था आहे; कारण या अवस्थेत एकाचवेळी ज्ञान व भक्ती आणि चित् व आनंद यांचा समावेश झालेला दृष्टीला पडतो. या अवस्थेत ज्ञान व भक्ती ही एकाकार होते. स्वसंवेद्य आत्मरूपाची ही अवस्था असल्याने ज्ञानाची अंतिम सीमा व प्रेमाची पराकाष्ठा

येथे पाहवयाला मिळते. ही समन्वयाची भूमी असल्याने येथेच द्वैताद्वैताचे सामंजस्य झालेले दृष्टीला पडते. या ठिकाणी श्रीशिव व शक्ती पूर्णपणे एकरस होत असल्याने येथे श्रीशिवांचे अगर शक्तीचे प्राधान्य असत नाही. हीच खरी साम्यावस्था होय. यालाच श्रीशिवशक्तीचे सामरस्य असे म्हणतात. या समरस अवस्थेलाच अद्वयावस्था किंवा अभेदावस्था म्हटले जाते. या अवस्थेत दोन किंवा अनेकांचे वैषम्य तर नाहीसे होतेच; परंतु विषमतेचे बीजही राहत नाही. ही चिदानंदमयी अद्वैतनिष्ठा आहे यात काहीही शंका नाही. ही अवस्था बुद्धीच्या, विचाराच्या किंवा ध्यानाच्या पलीकडे असून ती अव्यक्त व स्वयंप्रकाश आहे.

उपरोक्त विचारांच्या पृष्ठभूमीवर "**श्रीस्पंदशास्त्रकार**" या अवस्थेबद्दल काय म्हणतात ते पाहण्यासारखे आहे.

**(१)** आपल्या स्वरूपाची पूर्ण आणि खरी स्मृती हीच मुक्ती आहे. या स्मृतीलाच शास्त्रीय शब्दामध्ये "तुरीयारूप शाक्तभूमिकेचा साक्षात्कार होणे" असे म्हणतात. (प्रस्तावना पृ.१५)

**(२)** कोणत्याही अन्य स्थानी जाण्याने मोक्ष मिळत नाही. एखादे विशेष स्थान मोक्षाचे आहे असेही असत नाही. अज्ञान ग्रंथी मोकळ्या होणे हाच मोक्ष आहे. (पृ.६)

**(३)** "**श्रीमहाभारत**" या ग्रंथाच्या मोक्षधर्मामध्ये रागद्वेषादि क्लेशांनी युक्त अशा दूषित चित्ताला संसार असे म्हटले असून त्यापासून पूर्णपणे मुक्त झालेल्या चित्ताला मोक्ष असे म्हटले आहे. (पृ.७)

**(४)** रागादि चित्त हा संसार असून पवित्र चित्त हा मोक्ष आहे. (पृ.७)

**(५)** सर्व विकल्प म्हणजे संसार होय. विकल्पाशिवाय जीवाला दुसरे कोणतेही बंधन असत नाही. (पृ.७)

**(६)** संकुचित आणि कृत्रिम प्रमातृपद विसरून जीव श्रीशिवांशी समरस होणे हेच जीवन्मुक्तिफल आहे. (पृ.३१)

**(७)** ज्या वेळेला क्षोभ म्हणजे मनाची व्यग्रता थांबेल किंवा लीन होईल त्यावेळेला परमपद प्राप्त होईल (पृ.३४)

**(८)** स्वतःच्या आत्मगत अशुद्धीमुळे अर्थात् आणव मलामुळे संसारामधील वासनात्मक कर्मांच्या अभिलाषांमध्ये किंवा इच्छांमध्ये पडलेल्या अर्थात् कर्ममलाने लिप्त झालेल्या मर्यादित सामर्थ्याच्या अर्थात् पूर्ण सामर्थ्य नसलेल्या पुरुषाच्या क्षुब्धवृत्ती व माया अर्थात् मल, अहंकार, भेदबुद्धी नाहीशी झाल्यावर

त्या पुरुषाला परमपद प्राप्त होत असते. (पृ.१२९)

**(९)** मन, चेतना, शक्ती आणि आत्मा हे चौघेजण ज्यावेळेला पूर्णपणे नष्ट होतील त्यावेळेला ते श्रीभैरवरूप आपोआप व्यक्त होईल. (पृ. १४८)

**(१०)** जो साधक स्वभावाचा किंवा स्पंदात्मक आत्मस्वरूपाचा सर्व विश्वातील स्थावर व जंगम वस्तूंमध्ये अर्थात् कणाकणामध्ये अनुस्यूत किंवा समाविष्ट असलेल्या मुख्य सत्तेच्या रूपात साक्षात्कार करून घेत विस्मयावस्थेत अर्थात् आश्चर्य करीत राहत असतो तो साधक या तिरस्काराने पूर्ण आणि कुत्सित अर्थात् दूषित आवागमनामध्ये अर्थात् जन्म-मृत्यूच्या येरझाऱ्यामध्ये पडणे कसे शक्य आहे? (पृ.१६०)

**(११)** ज्याप्रमाणे दिव्याची ज्योत विझल्यावर ती भूमीमध्ये, आकाशामध्ये, कोणत्याही दिशेला किंवा कोणत्याही विदिशेमध्ये म्हणजे दोन दिशांच्या मध्यवर्ती बिंदूत जाऊ शकत नाही; मात्र दिव्यामधील तेलाचा क्षय झाल्यावर केवळ शांती होत असते त्याप्रमाणे सिद्धयोग्याचा आत्मा निवृत्तिस्थानी पोहोचल्यावर भूमीमध्ये, आकाशामध्ये कोणत्याही दिशेमध्ये किंवा कोणत्याही विदिशेमध्ये जाऊ शकत नाही; मात्र सिद्धयोग्याचा आत्मा सर्व दु:खांचा क्षय झाल्यामुळे केवळ शांतीच्या अवस्थेमध्ये लय होऊन जातो. (पृ.१७६, १७७)

**(१२)** मोक्ष ही कोणतीही वेगळी अवस्था नाही तर स्वरूपख्याती म्हणजे स्वरूपाचे ज्ञान अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्य हाच मोक्ष होय. (पृ.१८०)

**(१३)** सर्व दीक्षांमध्ये निर्वाण दीक्षा ही असामान्य व दुर्लभ आहे; कारण ज्या भाग्यवान् व्यक्तीला ही निर्वाण दीक्षा प्राप्त होते त्या व्यक्तीच्या मनामध्ये अनेक युगे साठलेल्या आणि पिंड न सोडणाऱ्या वासना या एका क्षणभरात नाहीशा होत असतात. असा योगी पुर्यष्टकाच्या म्हणजे पांचभौतिक शरीराच्या बंधनातून मुक्त होऊन स्वरूपामध्ये विश्रांती प्राप्त करून घेतो.(पृ.३५०)

**(१४)** ज्यावेळी साधकभक्तयोगिशिष्य स्थूल किंवा सूक्ष्म पुर्यष्टक यांपैकी एकात राहत असतानाही चित्ताला लीन करून अंतर्बाह्य एकाकार असलेल्या स्पंदतत्त्वाची अनुभूती प्राप्त करून घेतो त्यावेळी त्या प्रत्ययोद्-भवाच्या स्वतंत्रतेने संहार व उदय संपन्न करीत असतो. यामुळे असा साधकभक्तयोगिशिष्य आपली आतापर्यंत हरविलेली भोक्तेपणाची पदवी प्राप्त करून घेतो व शक्तिचक्राचा श्रीईश्वर अर्थात् पूर्ण श्रीशिव बनतो. (पृ.४७९)

**(१५)** जो साधकभक्तयोगिशिष्य आपल्या आंतरिक श्रीईश्वरी शक्तीशी युक्त असतो तो जीवन्मुक्त असतो. (पृ.३२२)

**(१६)** सिद्धयोगाचा अभ्यास करणारा साधकोत्तम हा जीवन्मुक्तच असतो; कारण तो सतत सर्वावस्थेमध्ये एक क्षणभरसुद्धा वाया न घालविता श्रीपरमशिवस्थितीत जागृत राहतो. (पृ.३२२)

**(१७)** सर्वांतर्यामी परमात्म्यासकट सर्व माझ्या लीला आहेत असे साक्षि-रूपाने जो पाहत राहतो तो जीवन्मुक्त स्थिती भोगतो. (पृ.३२३)

**(१८)** ज्यावेळी श्रीसद्गुरुकृपेने शक्तिपात होतो त्यावेळी श्रीपरमशिव-रूपी शक्तीची किरणे त्याच्यावर पडतात. त्यामुळे ज्ञान जागृत होऊन जीवाची दृष्टी विमल होते. ही दृष्टी एकदा प्राप्त झाली की, देहाहून वेगळे असे जे जे पदार्थ आहेत ते ते सर्व आत्मस्वरूप आहेत असे तो पाहतो. जी जी वस्तू दिसेल त्या त्या वस्तूंच्या ठिकाणी विवेक जागृत करून सर्व पदार्थमात्र श्रीपरमशिवांच्या शक्तिचक्रातील अविभाज्य घटक आहेत अशी अनुभूती तो घेतो. अशी जागृती ठेवल्याने या शक्तिचक्राचा तो जीव अधिष्ठात्रा बनतो म्हणजे श्रीपरमशिव होतो. (पृ.३२७)

**(१९)** आत्मानुभवाने सम्यक् विश्रांती प्राप्त झाल्यावर जो अलुप्तानुभव स्थिर राहतो त्यामुळे तत्त्ववित् पुरुष विषयभोग घेत असतानाही जीवन्मुक्तच असतात. (पृ.३२८)

**(२०)** हे त्रिलोकीनाथा! आपली उपासना करून ज्या साधकाने सर्व किल्बिषरूप उपद्रव नाहीसे केले आहेत किंवा ते धुऊन टाकले आहेत म्हणजे श्रीसद्गुरुकृपेने शक्तिपातयोगाचे साधन मिळून ज्यांच्या प्राणशक्तीचे सुषुम्नेत चालन होऊन जन्मजन्मांतरींचे सर्व संस्कार जळून गेल्याने अज्ञानादि सर्व दोष दूर झाले आहेत त्यांना माझ्यातच हे सर्व जगत् स्थित आहे, मीच सर्व आहे व मीच सर्वत्र आहे हा अनुभव अद्वैतभावनेच्या आवेशाने अत्यंत शीघ्रतेने प्राप्त होतो. (पृ.३२८)

**(२१)** ज्या सिद्धयोग्याच्या चित्ताचा असा स्वभाव विकसित झालेला असतो की, "हे सर्व विश्व माझेच स्वरूप आहे," तो सिद्धयोगी सर्व प्रमेय विश्वाला आपला खेळ समजून, नित्ययुक्त असल्याकारणाने, पांचभौतिक कायेमध्ये राहत असूनही श्रीईश्वराप्रमाणे मुक्त आहे. अशा व्यक्तीसाठी शरीराचे अस्तित्व इत्यादि बंधनकारक होत नाही. (पृ.३३२)

येथपर्यंत आपण **"श्रीशिवसूत्रे"** या ग्रंथाधारे जीव, जगत् व श्रीईश्वर

यांच्या रूपाने होणारी पिंडब्रह्मांडाची उभारणी अर्थात् त्यांचे स्वरूप व सिद्धयोगसाधनाने अर्थात् क्रमयोगाने या सर्वांची संहारणी होऊन श्रीशिवशक्तिसामरस्यावस्थेची प्राप्ती कशी होते हे विस्तृतपणे पाहिले. या सर्व विवेचनाचे श्रीसंततुकाराममहाराजांनी पुढील चार अभंगात साररूपाने वर्णन करताना असे म्हटले आहे की -

**संकोचोनी काय झालासी लहान। घेई आपोशन ब्रह्मांडाचें।।१।।**
**करोनी पारणें आंचवू संसारा। उशीर उशीरा लावूं नको।।२।।**
**घरकुलीनें होता पाडिला अंधार। तेणें केलें फार कासावीस।।३।।**
**झुगारूनी दुरी लपविलें काखे। तुका म्हणे वाखे कौतुकाचे।।४।।**

❄ ❄ ❄ ❄ ❄

**निरंजनीं आम्हीं बाधियेलें घर। निराकारीं निरंतर राहिलोंसे।।१।।**
**निराभासीं पूर्ण झालो समरस। अखंड ऐक्यास पावलों आम्ही।।२।।**
**तुका म्हणे आतां नाहीं अहंकार। झालों तदाकार नित्य शुद्ध।।३।।**

❄ ❄ ❄ ❄ ❄

**निरंजनीं एकवटवाणे। संग नेणें दुसरा।।१।।**
**पाहा चाळविलें कैसें। लावूनि पिसें गोवळें।।२।।**
**लपविलें अंगें अंग। दिला संग होता तो।।३।**
**तुका म्हणे नव्हतें ठावें। झाले भावें वाटोळें।।४।।**

❄ ❄ ❄ ❄ ❄

**लवण मेळवितां जळें। काय उरलें निराळें।।१।।**
**तैसा समरस झालों। तुजमाजीं हरपलों।।२।।**
**अग्निकर्पूराच्या मेळीं। काय उराली काजळी।।३।।**
**तुका म्हणे होती। तुझी माझी एक ज्योती।।४।।**

❄ ❄ ❄ ❄ ❄

हे साधका ! तू मुळात चैतन्यस्वरूप, विभुरूप, आत्मरूप अर्थात् श्रीशिवशक्तिरूप असताना आपल्या स्वस्वरूपाशी अभिन्न असलेल्या शक्तीचा संकोच करून जीवरूपाने लहान का झालास? ही जी उभारणी तू स्वत: केली आहेस तिची संहारणी करण्याकरिता ब्रह्मांडाचे आपोशन घे अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने जागृत झालेली मूलाधारस्थ जीवरूप कुंडलिनी शक्ती आज्ञाचक्राच्या पर्यंत असलेल्या पिंडातून सुषुम्नाद्वारे ब्रह्मांडात म्हणजे आज्ञाचक्राच्या वर सहस्रारात नेऊन श्रीशिवांशी समरस कर.।।१।। अशा रीतीने पारणे करून म्हणजे

अनंत जन्मपर्यंत संकुचितपणामुळे जो स्वस्वरूपाचा उपवास अर्थात् विस्मरण झाले होते ते उपरोक्त प्रकारे सामरस्याच्या द्वारा दूर करून समस्त संसार गिळून टाक. हे घडून येण्याकरिता फार उशीर लावू नको अर्थात् दीर्घकाल, निरंतर व अत्यंत श्रद्धाभक्तिआदरसत्काराने श्रीसद्गुरुकृपाप्राप्त साधन कर.।।२।। घरकुलीने अर्थात् जीवपणामुळे, देहाभिमानामुळे, वासनांमुळे व इच्छाआकांक्षादि संसारोन्मुख वृत्तींमुळे जन्ममरणपरंपरारूप आत्मस्वरूपाच्या अज्ञानामुळे जो अंधार पडला होता त्याने तुला जन्मजन्मांतरी अत्यंत कासावीस केले होते अर्थात् त्रिविध तापाने पोळून टाकले होते.।।३।। श्रीसंत तुकाराममहाराज असे म्हणतात की, हे साधकभक्तयोगिशिष्या ! तू आपल्याला स्वतःला आपल्याच काखेत अर्थात् स्वतःच्या ठिकाणी लपवून स्वतःच हा संसाराचा खेळ कौतुकाने लपून खेळत होतास; पण हा खेळ तापदायक असल्यामुळे तो तू दूर झुगारून दे अर्थात् जीवरूपाने जे स्वांग घेतलेले आहे ते सोडून देऊन श्रीशिवरूप हो.।।४।।

आम्ही निरंजनात म्हणजे निःशेष अंजनरहित अशा शुद्ध श्रीशिवशक्ति-सामरस्यावस्थेत घर बांधले आहे अर्थात् तेथे समरस झालो आहोत आणि त्या अवस्थेतच अखंड निराकार रूपाने राहत आहोत.।।१।। अशा प्रकारे श्रीशिवशक्तीचे जे निःशेष आभासरहित अर्थात् पिंडब्रह्मांडाच्या उभारणी-विरहित स्वरूप आहे त्याच्याशी आम्ही समरस आणि त्रिकालाबाधित समावेशावस्थेला प्राप्त झालो आहोत.।।२।। श्रीसंत तुकाराममहाराज असे म्हणतात की, आता "अ" म्हणजे श्रीशिव व "हं" म्हणजे शक्ती या दोघांचे सहस्रारात समरसीकरण झाल्यामुळे आमच्या ठिकाणी "अहं"कार शिल्लक राहिलेला नाही. आम्ही नित्य शुद्ध अशा श्रीशिवशक्तीशी तदाकार, एकरूप किंवा समरस झालो आहोत.।।३।।

माझे मूळचे श्रीशिवशक्तिस्वरूप हे निरंजन अर्थात् शुद्ध व कलंकरहित असे होते. त्या अवस्थेत मला कोणाचाही संग नव्हता. असे माझे निःसंग व निखळ शुद्ध रूप होते.।।१।। परंतु श्रीईश्वराने स्वतःच स्वतःला चाळविले अर्थात् स्वेच्छेनेच आपल्याला जीवरूपाने संकुचित करून घेऊन पिंडब्रह्मांडाच्या गुंत्यात अडकवून घेतले.।।२।। अशा प्रकारे संसारोन्मुख होऊन त्याने आपल्याला अर्थात् स्वस्वरूपाला लपवून टाकले आणि मूळची एकसंगाची अद्वय स्थिती मोडून टाकली.।।३।। अशा प्रकारे जीवभाव प्राप्त झाल्याने आमचे वाटोळे झाले व पुन्हा मी श्रीशिवभाव प्राप्त करून घेतल्यामुळेही

आमचे वाटोळेच झाले.।।४।।

ज्याप्रमाणे मीठ पाण्यात घातल्यावर ते पाण्यापेक्षा वेगळे राहत नाही ।।१।। त्याप्रमाणे मी श्रीईश्वराशी अर्थात् माझ्या स्वसंवेद्य अशा मूळच्या श्रीशिवशक्तिस्वरूपाशी समरस अर्थात् एकरूप व एकरस झालो. या रीतीने मी श्रीभगवंतामध्ये हरवून अर्थात् विरघळून गेलो.।।२।। ज्याप्रमाणे अग्नी आणि कापूर यांचा संबंध आला असता कापूर जळून जाऊन खाली काजळी सुद्धा उरत नाही।।३।। त्याप्रमाणे श्रीईश्वराची व माझी स्वरूपज्योती मुळातच जी एक होती ती आता सर्व संकुचितपणाचा निरास झाल्यामुळे पूर्ववत् एक झाली आहे.।।४।।

सारांश, सिद्धयोगाचे साधन करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यांना या साधनाचे अत्युच्च व अनुत्तर पातळीवरील श्रीसद्गुरुस्वरूपाने मार्गदर्शन करून अंतःस्फूर्ती देणारा आणि आपल्या स्वसंवेद्य व स्वस्पंद अर्थात् श्रीशिवशक्तिरूप आत्मस्वरूपाकडे अर्थात् सामरस्यरूप व अंतिम सिद्धीकडे मार्गस्थ होण्यासाठी प्रेरणा देणारा "**श्रीशिवसूत्रे**" हा एक अपूर्व, अलौकिक, लोकोत्तर व एकमेवाद्वितीय असा ग्रंथ आहे. साधक वाचक, भक्त व जिज्ञासू अभ्यासकांना या ग्रंथाचा लाभ होईल.

या ग्रंथात समाविष्ट केलेल्या श्रीक्षेमराजाचार्यकृत "श्रीशिवसूत्र विमर्शिनी," श्रीभट्टभास्कराचार्य विरचित "वार्तिक," श्रीभट्टकल्लटाचार्य विरचित "वृत्ती" व श्रीवरदराजाचार्य विरचित "वार्तिक" या मूळ संस्कृत ग्रंथांचे भाषांतर कै. श्री. परशुराम रेणुकादास बोधनकर यांनी करून दिले होते. त्यांचे सुश्लिष्ट विवरण व श्रीकृष्णानंदसागरकृत "श्रीशिवरंजनी टीका" याचे भाषांतर चि. सौ. मंजरी प्रीतम पाटील एम्. ए. (सुवर्णपदक विजेती) हिने केले आहे. याशिवाय तिने श्री.जयदेवसिंग लिखित "Shri Shiva Sutras, The Yoga Supreme identity" या ग्रंथातील काही महत्त्वाच्या टीपा व कठीण शब्दांचा अर्थ, प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज विरचित "श्रीशिवसूत्र प्रबोधिनी" यातील विवरण आणि उपरोक्त ग्रंथांच्या प्रस्तावना यांचे भाषांतरही केले आहे. त्याच प्रमाणे श्री. ग. वा. तगारे यांनी लिहिलेल्या "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाच्या प्रस्तावनेचे सुबोधिकरण चि. डॉ. सौ. दीप्ती महेश दाभाडे हिने करून दिले आहे. या दोघींच्याकडून या संप्रदायाची अशीच सेवा उत्तरोत्तर व्हावी व त्यांच्यावर अखंड श्रीगुरुकृपा राहावी म्हणून श्रीसद्गुरुचरणी प्रार्थना आहे. त्याचप्रमाणे या ग्रंथाची मुद्रिते तपासण्याचे काम चि. सौ. सुवर्णा

दत्तगुरू पाटील हिने अत्यंत मेहनतीने व साक्षेपाने केले असून त्याबद्दल तिचे कितीही कौतुक केले तरी ते थोडेच होईल. याशिवाय श्री. दिलीप मधुसूदन पिंगळे यांनी या ग्रंथाची मुद्रिते संगणकावर तपासून जे साहाय्य केले ते अत्यंत अमोल व अपूर्व असेच आहे. याशिवाय या ग्रंथाची अक्षर जुळणी चि. विवेक जयवंत हटकर, श्री. नितीन यशवंत रोडे यांनी सेवाभावाने, प्रेमाने व श्रद्धेने केलेली आहे, ही अत्यंत स्पृहणीय गोष्ट आहे. या सर्वांवर व त्यांच्या कुटुंबियांवर श्रीसद्गुरुचरणांनी अखंड कृपादृष्टी ठेवावी ही त्यांच्या चरणी प्रार्थना आहे.

ज्यांनी अत्यंत आत्मीयतेने, आपुलकीने व प्रेमाने अर्थसाहाय्य करून हा ग्रंथ प्रसिद्ध होण्याचा मार्ग सुलभ करून दिला त्या सर्वांवर व त्यांच्या कुटुंबियांवर श्रीसद्गुरुचरणांनी अखंड कृपादृष्टी ठेवावी अशी त्यांच्या परम-कोमल चरणी प्रार्थना आहे.

सिद्धयोगाचे समाधिधन ज्या ज्या ग्रंथांमधून संपूर्णपणे अगर अल्पांशाने प्रकट झालेले असेल ते ते ग्रंथ मूळ व मराठी भाषांतरांसह साधकभक्तयोगि-शिष्यांपर्यंत पोहोचविण्याचा पूर्वी केलेला संकल्प माझे हृदयस्थ श्रीसद्गुरू सकलसंतश्रेष्ठ महासिद्धयोगी श्रीसंत गुळवणीमहाराज आपल्या अमोघ शक्तिसामर्थ्याने, माझ्यावरील प्रेमाने व अपरंपार कृपाबलाने पूर्ण करून घेतील असा नितांत विश्वास आहे; कारण हे त्यांनी माझ्यावर सोपविलेले कार्य आहे. श्रीसद्गुरूंनी दिलेले किंवा सोपविलेले कार्य हे नेहमीच यशस्वी होत असते. (Given mission is always successful) असा शास्त्रकारांचा निर्वाळा आहे; कारण हे कार्य निमित्तमात्र म्हणून कोणीही करीत असला तरी अंततः संप्रदाय परंपरेने वाहत आलेली श्रीसद्गुरुरूप इच्छाशक्तीच आपल्या अपूर्व बलाने हे घडवून आणीत असते, हे नितांत सत्य आहे.

सारांश, "**तया अक्षराआंतील भावो। पाववीन मी तुमचा ठावो। आइका म्हणे केशवो। श्रीवामनाचा।।**" या न्यायाने "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाची विस्तृत प्रस्तावना त्यातील रहस्य साररूपाने उलगडून दाखवून पूर्ण झाली. "**फोडूनि शब्दांचे अंतर। वस्तु दाखवी निजसार। तोचि सद्गुरु माहेर। अनाथांचे।।५.२.१५।।श्रीदासबोध।।**" या श्रीसमर्थ रामदास-स्वामीमहाराजांच्या म्हणण्याप्रमाणे हा ग्रंथ श्रीसद्गुरुनाथस्वामीमहाराजांच्या कृपेचे वैभव आहे, हे नितांत सत्य आहे. श्रीसद्गुरुकृपेने होणाऱ्या कुंडलिनी शक्तीच्या उत्थापनाद्वारा महार्थाशी अर्थात् श्रीशिवस्वरूपाशी एकरूप किंवा

समरस करणाऱ्या अमनस्कयोगाची किंवा क्रमयोगाची अगर अनुपाययोगाची सिद्धी हा या ग्रंथाचा मूर्धन्य महासिद्धान्त असून इतर तदंगभूत उपसिद्धान्त हे या ग्रंथाचे स्वरूप आहे. सिद्धयोगाचे साधन करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यांना शब्दरूप श्रीसद्गुरुस्वरूपाने मार्गदर्शन करणारा हा एक अमोलिक, अपूर्व व अलौकिक असा ग्रंथ आहे.

सिद्धयोग हे ब्रह्मविद्येचे बीज आहे. सिद्धयोगसाधकभक्तयोगिशिष्यांना महार्थयुक्त, स्वस्पंदात्मक व संविन्मूर्तिरूप अर्थात् चैतन्यरूप श्रीशंभूंची किंवा श्रीशिवशक्तिसामरस्याची प्राप्ती व्हावी म्हणून श्रीसद्गुरुनाथस्वामीमहाराजांच्या अपार कृपेने हे महार्थरूप सिद्धयोगसाधनेचे रहस्य या ग्रंथरूपाने प्रसिद्ध होत आहे. सिद्धमहायोगशास्त्र अर्थात् शक्तिपातयोगरहस्य म्हणजे शुद्धबोधाचा उल्लास आहे. मत्सर, द्वेषादि क्षुद्र व संकुचित बुद्धी सोडून देऊन या शास्त्राच्या रहस्याचा सर्व संतांच्या व पंथांच्या सारस्वताच्या प्रांगणात शिरून विचार केला पाहिजे. हे शास्त्र म्हणजे एक महान् आश्चर्य आहे. या शास्त्राचा कधीही अनादर करता कामा नये.

सच्छिष्यरूप साधकभक्तयोगिशिष्यांच्याकरिता या ग्रंथाची रचना महामाहेश्वराचार्यवर्य श्रीवसुगुप्तपाद यांनी केली आहे. ज्याप्रमाणे दिवा हातात असला म्हणजे चालणाऱ्यांचे पाय घसरत नाहीत व वाट चुकत नाही त्याच-प्रमाणे आडमार्गाने जाणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यांनाही या ग्रंथाच्या प्रकाशात शुद्धमार्ग दृष्टीला पडतो. अत्यंत सावधानतेने, साक्षेपाने व निश्चयाने जो सिद्धयोगसाधकभक्तयोगिशिष्य या सिद्धमहायोगशास्त्राचा अर्थात् शक्तिपात-योगरहस्याचा अभ्यास करतो तो आपल्या आयुष्यातच आपल्या महार्थरूप भगवत्तेची अनुभूती घेऊन कृतार्थ होतो. यापेक्षा दुसरे कोणते मोठे आश्चर्य असू शकते?

शक्तिपात ही या भूतलवरील एक अलौकिक, लोकोत्तर, एकमेवाद्वितीय व अपूर्व अशी सिद्धयोगांतरगतसाधनप्रक्रिया असून त्यामुळे उपस्थित होणाऱ्या अनुपाययोगाचा महिमा ग्रंथग्रंथांतरी, शास्त्रांतरी व श्रीसंतवाङ्मयात विपुलतेने पाहवयाला मिळतो. या सिद्धयोगसाधनप्रक्रियेच्या अंतर्भूत असलेल्या श्रीसद्गुरू, श्रीसद्गुरुकृपा, साधकभक्तयोगिशिष्य, शक्तिपातयोगदीक्षा, सिद्धयोगसाधन, कुंडलिनी शक्तीचे स्वरूप, इत्यादि विविध पैलूंचे सांगोपांग दर्शन घेण्यासाठी साधकभक्तयोगिशिष्यांनी वेळोवळी निर्दिष्ट केलेल्या ग्रंथांचे अवश्य अवलोकन करावे. या सर्व ग्रंथांच्या वाचनाने "**श्रीशिवसूत्रे**" सारख्या दुरूह ग्रंथाचे

साकल्याने आकलन होणे सहज शक्य होईल.

इत्यलम्! सर्व साधकभक्तयोगिशिष्यांनी विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण श्रीसद्गुरुचरणी नित्य व अखंड अगत्य ठेवून त्यांच्या निरंतर श्रीचरणस्मरणाने जीवन धन्य व कृतार्थ करावे ही नम्र प्रार्थना.

**श्रीसद्गुरुचरणरजसेवक**
**अर्थात्**
**श्रीसद्गुरुचरणपादपद्मोपजीवी**
**केशव रामचंद्र जोशी**



# प्रस्तावना

लेखक:- "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाचे
अनुवादक श्री. ग. वा. तगारे

महाराष्ट्राचे आध्यात्मिक जीवन हे श्रीमदाद्यशंकराचार्यांचे अद्वैतमत, "**श्रीमद्भागवतमत,**" नाथपंथ आणि काश्मीरीय श्रीशैवदर्शन यांनी संपन्न बनविले आहे. या तिघांपैकी प्रथम तीन मतांचे मराठीत विपुल विवेचन झालेले आहे. परंतु श्रीनिवृत्तिनाथमहाराज व श्रीज्ञानेश्वरमहाराज यांनी मराठीत प्रचलित केलेले काश्मीरीय श्रीशैवमत किंवा श्रीईश्वराद्वयवाद याबद्दल लोकांना तितकीशी कल्पना नाही. हे मत मराठीत प्रचलित करण्याचे श्रेय श्रीनिवृत्तिनाथमहाराजांना देण्याचे कारण याविषयी अशी आख्यायिका आहे की, श्रीज्ञानेश्वरमहाराज यांनी "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथावर आपली "**भावार्थ दीपिका**" ही मराठी टीका लिहिल्यानंतर श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी त्यांना आपल्या संप्रदायाचे रहस्य विशद करणारी ग्रंथरचना करण्यास सांगितले. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीवसुगुप्तपादाचार्य यांनी लिहिलेल्या "**श्रीशिवसूत्रे**" आदि ग्रंथाधारे "**श्रीअमृतानुभव**" या नावाने प्रसिद्ध असलेले "**श्रीअनुभवामृत**" हे प्रकरण लिहिले.[१] श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्या "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथाच्या टीकेच्या समारोपात त्या काळात त्यांना माहिती असलेली श्रीआदिनाथ, श्रीमत्स्येंद्रनाथ व श्रीगोरक्षनाथ इत्यादि श्रीगुरुपरंपरा दिलेली आहे.[२] त्यावरून परंपरेने श्रीज्ञानेश्वरमहाराज हे श्रीशैव होते. तसेच श्रीगोपालकृष्णनाथमहाराज हेही श्रीशैव होते; कारण श्रीउपमन्यूने आपल्याला कशी दीक्षा दिली हे स्वतः श्रीगोपालकृष्णनाथमहाराजांनी सांगितले आहे. त्यांनी याविषयी असे म्हटले आहे की, "नंतर आठव्या दिवशी माझ्या डोक्याचे मुंडन करून ते तुपाने माखले. हातात दंड व दर्भ घेऊन आणि वल्कले धारण करून तसेच कंबरेला मेखला बांधून घेतलेल्या मला त्या ब्राह्मणाने पाशुपतदीक्षा दिली." [३] श्रीगोपालकृष्णनाथमहाराज हे "पाशुपत" या वैदिक संप्रदायाचे अनुयायी होते. [४] तो संप्रदाय "**श्रीतैत्तिरीय आरण्यक**" (**"श्रीमहानारायण उपनिषद्"**) १७.१.५ या मंत्रांवर आधारलेला आहे हे इतरत्र सांगितलेच आहे. त्यावरून "**श्रीमहाभारत**" या ग्रंथामधील श्रीगोपालकृष्णनाथमहाराज वामाचारी श्रीशैव नव्हते हे स्पष्ट होते. "**श्रीमद्भगवद्गीता**" सांगताना त्यांनी सर्वत्र श्रुतींचे अर्थात् उपनिषदांचे आधार

घेतले आहेत. ते श्रुतिपरंपरेच्या बाहेर गेले नाहीत. श्रीईश्वराद्वयवादी काश्मीरी श्रीशैव परंपरेचे संस्थापक श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य [५] आणि श्रीअभिनवगुप्तपादाचार्य (इ.स. १०वे शतक) यांनी "**श्रीमद्भगवद्गीता**" हा श्रीशैवग्रंथ असल्यामुळे त्यावर टीका लिहिल्या [५] तेव्हा श्रीशैवपरंपरेचे वारस असणाऱ्या श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथावर टीका लिहिण्यात असांप्रदायिकपणा केला नाही हे श्रीनिवृत्तिनाथमहाराजांना माहीत नव्हते अशातला भाग नाही. परंतु श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथावर टीका लिहिताना सांप्रदायिक दृष्टी न ठेवता श्रीमदाद्यशंकराचार्य, श्रीरामानुजाचार्य इत्यादि वैष्णव टीकाकारांचेही आधार "**भाष्यकारांते वाट पुसतु।। श्रीज्ञानेश्वरी १८.१७२३।।**" असे म्हणून घेतलेले आहेत.

श्रीमदाद्यशंकराचार्यांना "वैष्णव" असे म्हणण्याचे कारण त्यांची श्रीगुरुपरंपरा पुढीलप्रमाणे आहे.

श्रीविष्णू-श्रीब्रह्मदेव-श्रीनारदमुनी-श्रीव्यासमुनी-श्रीशुकमुनी-श्रीगौडपाद ("**मांडूक्योपनिषद्**" याचे कारिकाकार) श्रीगोविंदयती-श्रीमदाद्यशंकराचार्य अशी ही परंपरा आहे.

श्रीक्षेत्र जगन्नाथपुरी येथील श्रीजगन्नाथमंदिरातील "**मादला पंजी**" या ताडपत्री पोथीवरून "**भौमकर**" या ओरिसातील बौद्ध राजवटीत संरक्षणासाठी पुरल्या गेलेल्या श्रीजगन्नाथाने श्रीमदाद्यशंकराचार्यांना दृष्टान्त देऊन स्वतःला बाहेर काढावयाला सांगितले. त्या मूर्तीप्रमाणे नवीन मूर्ती (नवकलेवर) तयार करून तत्कालीन सोमवंशी राजा श्रीययाती-केसरी याच्या मदतीने तिची समारंभपूर्वक स्थापना केली. श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या या कार्याबद्दल राजाने श्रीमदाद्यशंकराचार्य आणि त्यांचे शिष्य श्रीपद्मपादाचार्य यांचे पुतळे श्रीजगन्नाथाच्या रत्नसिंहासनावर स्थापन करून त्यांची पूजा-अर्चा करण्याला सुरुवात केली. इ.स. १७९३-९४पर्यंत ही पूजा-अर्चा सुरू होती. [६]

श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज यांनी "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथाच्या सहाव्या अध्यायातील "**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः।।६.११।।**" इत्यादि योग-मार्गावरील श्लोकांच्या टीकेत "**श्रीपातंजल योगसूत्र**" या ग्रंथावर आधारलेल्या ग्रंथाचा उपयोग केला. काश्मीरी श्रीशैवमतातील "**श्रीशिवसूत्रे**" यात सांगितलेला योगमार्ग श्रीपातंजलयोगाहून भिन्न असून सुद्धा त्याकाळी श्रीपातंजलयोग रूढ असल्यामुळे कदाचित् कुंडलिनी मार्गाचे विवेचन केले; पण आपले रहस्य अर्थात् सांप्रदायिक ज्ञान ज्यात आहे असा स्वतंत्र ग्रंथ

लिहिला जावा अशी श्रीनिवृत्तिनाथमहाराजांची इच्छा त्या आदेशात असावी.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीअनुभवामृत**" लिहिताना श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्यकृत "**श्रीशिवसूत्रे**" हा ग्रंथ आधारासाठी वापरला. "**चैतन्यमात्मा।**" व "**ज्ञानं बन्धः।**" ही "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील संस्कृत सूत्रे, "**पिंडे पिंडाचा ग्रासु।। श्रीज्ञानेश्वरी ६.२९१।।**" करण्याचा आपल्या श्रीशैवसांप्रदायाचा दंश व्यक्त करणारी "**शरीरे संहारः कलानाम्।।३.४।।**" इत्यादि "**श्रीशिवसूत्रे**" "**शक्ति-शक्तिमतोरभेदः**" या काश्मीरी श्रीशैव संकल्पनेचे "**श्रीशिवशक्तिसामरस्य**" या "**श्रीअनुभवामृत**" या ग्रंथाच्या प्रारंभीच्या पहिल्या प्रकरणातील काव्यमय वर्णन इत्यादि वरून सिद्ध होते.

माझ्या या पुस्तकाचा विषय श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे तत्त्वज्ञान नाही. "**श्रीशिवसूत्रे**" ही श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य यांनी लिहिलेली आहेत. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीअनुभवामृत**" या ग्रंथात "**श्रीशिवसूत्रे**" यांचा उल्लेख केल्यामुळे मी श्रीवसुगुप्तपादाचार्यांकडे आकृष्ट झालो. "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथावरील श्रीभास्कराचार्य, श्रीक्षेमराजाचार्य इत्यादि टीकाकार श्रीवसुगुप्तपादाचार्यांच्या परंपरेतील असूनसुद्धा त्यांनी भिन्न सूत्रपाठ आणि भिन्न अर्थ केलेले पाहून स्वतः श्रीवसुगुप्तपादाचार्यांना कोणता अर्थ अभिप्रेत आहे हा निर्णय घेता येईना. सुदैवाने श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी आपल्या सूत्रांचा अर्थ स्पष्ट करणाऱ्या "**श्रीस्पंदकारिका**" या नावाने प्रसिद्ध असलेल्या कारिका "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात लिहून ठेवलेल्या आहेत. यातही विशेष भाग्याची गोष्ट अशी की, श्रीवसुगुप्तपादाचार्यांचे साक्षात् शिष्य असलेल्या श्रीभट्टकल्लटाचार्यांची "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथावरील टीका उपलब्ध आहे. तेव्हा श्रीभट्टकल्लटाचार्यांनी केलेल्या अर्थांच्या अनुरोधाने मी प्रथम "**श्रीस्पंदकारिका**" (विवेचक-प्रस्तावना, अनुवाद आणि स्पष्टीकरणात्मक टीपा) इ.स. १९८४ मध्ये लिहिली. त्यात इतर टीकाकारांनी दिलेले भिन्न अर्थ जरी नोंदले असले तरी मी श्रीभट्टकल्लटाचार्यांचे अर्थ प्रमाण मानलेले आहेत. [७]

"**श्रीशिवसूत्रे**" वाचताना पदोपदी त्यांचे "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथाशी असलेले साम्य लक्षात आले आणि त्यांचा उल्लेख करून त्यांच्या आधारे "**श्रीशिवसूत्रे**" यांचा अर्थ निश्चित केला. त्याबरोबरच श्रीभास्कराचार्य, श्रीक्षेमराजाचार्य इत्यादि टीकाकारांचे अर्थ दिलेले आहेत. "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथावर श्रीभट्टकल्लटाचार्यांची टीका उपलब्ध नसल्यामुळे श्रीभास्कराचार्य

आणि श्रीक्षेमराजाचार्य हे दिग्गज जेव्हा विशिष्ट सूत्रांचे पाठ किंवा अर्थ वेगवेगळे करतात तेव्हा श्रीवसुगुप्तपादाचार्यांना नेमके काय म्हणायचे आहे हे सांगणे कठीण असते. अशावेळी सर्व टीकाकारांनी दिलेले भिन्न अर्थ नमूद करणे एवढेच करता येते. माझ्या दृष्टीने अर्थ स्पष्ट करणारी जर "**श्रीस्पंदकारिका**" असेल तर ती पुष्कळदा सार्थ दिलेली आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या तत्त्वज्ञानाचे महाराष्ट्रातील तत्त्वविचारातील अत्युच्च स्थान लक्षात घेता त्यांनी संदर्भग्रंथ म्हणून वापरलेल्या "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाकडे माझे लक्ष गेले. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रेष्ठ मानलेल्या श्रीवसुगुप्तपादाचार्यांचे तत्त्वज्ञान, साधनमार्ग इत्यादींची माहिती असावी म्हणून मी "**श्रीस्पंदकारिका**" आणि "**श्रीशिवसूत्रे**" हे दोन ग्रंथ मराठीत अनुवादित केले. त्यांपैकी "**श्रीशिवसूत्रे**" हा ग्रंथ प्रसिद्ध होत आहे. मला आवर्जून पुन्हा असे सांगावयाचे आहे की, श्रीवसुगुप्तपादाचार्य आणि त्यांचे तत्त्वज्ञान व साधनमार्ग हा या ग्रंथाचा विषय आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे तत्त्वज्ञान हा या ग्रंथाचा विषय नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या काही ओव्या आनुषंगिक म्हणून केवळ तुलनेसाठी येथे दिलेल्या आहेत.

या ग्रंथात प्रथमतः "**श्रीशिवसूत्रे**" या शीर्षकाचे स्पष्टीकरण करून सूत्रोपलब्धीचा इतिहास संक्षिप्तपणे दिलेला आहे. त्यानंतर उपलब्ध "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाचे तीन पाद असले तरी परंपरागत पद्धतीप्रमाणे चार पाद असावेत असे माझे मत मी उपलब्ध पुराव्यानिशी मांडले आहे. अधिक संशोधन केल्यास चौथा पाद उपलब्ध होईल अशी मला आशा वाटते.

त्यानंतर "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाचा काळ आणि श्रीवसुगुप्तपादाचार्यांचा काळ एकच आहे असे मानले जात असल्याने तो इ.स. ७७५ ते ८२५ असावा असे जरी मी म्हटले असले तरी ही सूत्रे परंपरागत असावीत आणि श्रीवसुगुप्तपादाचार्यांना ती जुन्या परंपरेतून मिळाली असणे अशक्य नाही. ही सूत्रे स्वप्नात मिळाली किंवा स्फुरली ही कथा मानसशास्त्रीय दृष्ट्या शक्य आहे. श्रीकोलेरीजना "**कुब्लाखान**" ही कविता स्वप्नात मिळाली किंवा श्रीबुधकौशिक ऋषींना "**श्रीरामरक्षास्तोत्र**" स्वप्नात स्फुरले, या घटना सत्य असतील तर तीन-चार शब्द असलेली छोटी छोटी सत्त्याहत्तर सूत्रे श्रीवसुगुप्तपादाचार्यांना स्वप्नात कोणा सिद्धाने किंवा श्रीशिवांनी देणे अशक्य नाही.

अशा सूत्रग्रंथाचा अर्थ लिहिताना किंवा करताना शब्दकोश किंवा व्याकरण यांच्यापेक्षा त्यांच्यावरील परंपरागत टीका या अधिक उपयुक्त असतात. शब्दांचे परंपरागत संकेत आणि इतर संकल्पना या टीकाकारांना श्रीगुरुपरंपरेने माहिती असतात. श्री. मोनिअर विल्यमसारख्या प्रसिद्ध कोशकाराने योगशास्त्रातील चक्रांच्या नावांचे कसे चुकीचे अर्थ दिले आहेत हे सर जॉन वुड्रॉफ यांनी आपल्या "**सर्पंट पॉवर**" या पुस्तकात दाखविले आहेत. "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील उदाहरण द्यावयाचे झाल्यास "**उद्यमो भैरवः ।।१.५।।**" या सूत्रातील "**उद्यम**" याचा अर्थ प्रयत्न किंवा exertion असा केलेला आढळतो. श्रीक्षेमराजाचार्यांनी त्याचा खरा अर्थ "**उन्मज्जनरूप**" किंवा आतून वर उद् किंवा उचंबळून येणे असा केलेला असून शांभवोपायातील ती क्रिया नैसर्गिकपणे अचानक होणारी आहे. कै. श्री. जयदेवसिंग यांनी "**उद्यम**" या शब्दाचा अर्थ "The sudden spontaneous emergence of the supreme I- consciousness" असा केलेला आहे. हा अर्थ अधिक योग्य आहे. येथे परंपरागत टीकांचे अर्थ त्यांच्या विश्वसनीयतेचे मूल्यमापन करून स्वीकारले आहेत. "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील प्रकाशित टीका व टीकाकारांच्या विषयीची उपलब्ध माहिती साक्षेपाने दिली आहे. "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथावर श्रीवसुगुप्तपादाचार्यांचे साक्षात् शिष्य श्रीभट्टकल्लटाचार्यांची टीका उपलब्ध नसल्यामुळे इतर टीकाकारांचे अर्थ नमूद करून त्या सूत्राचा भावार्थ असणारी "**श्रीस्पंदकारिका**" (सार्थ) उद्धृत करणे इतकेच मी केलेले आहे. यात माझे स्वतःचे असे काहीही नाही.

सामान्य वाचकांचा "अद्वैत" (श्रीमदाद्यशंकराचार्य) आणि "श्रीईश्वराद्वयवाद" (श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य) या संकल्पनांविषयी गैरसमज होऊ नये अर्थात् या दोन्ही एकच आहेत असे वाटू नये यासाठी या संकल्पनांतील फरक येथे संक्षिप्तपणे देत आहे.

## अद्वैत आणि अद्वय
## या दोन संकल्पनांतील फरक

(१) अद्वैतमतातील अंतिम तत्त्व परब्रह्म हे ज्ञानप्रकाशरूप आहे. त्याच्या ठिकाणी कर्तृत्व नाही. हे अविद्यानामक उपाधीने युक्त झाले म्हणजे श्रीईश्वररूपात सृष्टीची उत्पत्ती वगैरे कार्ये होतात. एका अर्थी सृष्ट्युत्पत्ती इत्यादि कार्ये अविद्यात्मक आहेत.

श्रीईश्वराद्वय मतातील अंतिम तत्त्व परम श्रीशिव हे प्रकाश अर्थात् ज्ञान म्हणजेच श्रीशिव आणि विमर्श म्हणजे कर्तृत्व किंवा शक्ती यांनी युक्त आहे. ज्ञातृत्व आणि कर्तृत्व या शक्तींनी संपन्न असलेले श्रीशिव आपल्या इच्छास्वातंत्र्याप्रमाणे सृष्टी (सृज्-बाहेर काढणे, सृज् विसर्गे अर्थात् स्वतःमध्ये असलेले विश्व बाहेर काढणे), स्थिती (जगत्पालन), संहार (विश्व परत आत स्वतःमध्ये घेणे), विलय किंवा तिरोधान (स्वात्मप्रच्छादन) आणि अनुग्रह अशी पंचकृत्ये करतात. श्रीशिवांचे हे पंचकृत्यकारित्व न मानल्यास श्रीशिव कर्तृत्वहीन किंवा असत् ठरतील.

(२) श्रीशांकराद्वैतमतानुसार माया ही अनिर्वचनीय उपाधी असून ती मिथ्या आहे. श्रीईश्वराद्वय वादातील माया ही श्रीशिवांची शक्ती असून ती सत्स्वरूप आणि चिन्मयी आहे. या श्रीशैवमतानुसार शक्ती आणि शक्तिमान् यांमध्ये कोणताही फरक असत नाही. श्रीसोमानंदाचार्यांनी "**श्रीशिवदृष्टी**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**शक्ती-शक्तिमतोर्भेदः शैवे जातु न वर्ण्यते।।**

**अर्थ :-** श्रीशैवमतानुसार शक्ती आणि शक्तिमान् यांमध्ये कोणताही भेद असत नाही.

(३) श्रीमदाद्यशंकराचार्य यांच्या मतानुसार संसार हा नामरूपात्मक आणि मिथ्या आहे. श्रीईश्वराद्वयवादातील विश्व हे श्रीशिवस्वरूप, चिद्विलास-युक्त, आभासयुक्त (किंचित् प्रकटीकरण) व त्यामुळे ते श्रीशिवांप्रमाणे सत् आहे.

या दोन्ही संकल्पनात आणखी काही भेद आहेत; परंतु अद्वैत आणि अद्वय या संज्ञा जरी बाह्यात्कारे सारख्या वाटल्या तरी त्या भिन्न आहेत एवढे दिग्दर्शन करण्यापुरते येथे त्यातील काही फरक स्पष्ट केलेले आहेत. या संकल्पनातील तात्त्विक फरक लक्षात येण्यासाठी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात येणाऱ्या पती, पशू, पाश इत्यादि संकल्पना संक्षिप्तपणे स्पष्ट केलेल्या आहेत. यामुळे "**श्रीशिवसूत्रे**" समजण्याला मदत होईल अशी आशा वाटते. श्रीशैवमत हे स्वतंत्र दर्शन आहे. यामुळे जरी यातील परिभाषा आणि संकल्पना या श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या मताप्रमाणे वाटल्या तरी परस्परांहून भिन्न आहेत. याविषयी अधिक विवेचन माझ्या "**श्रीशैवदर्शन**" या पुस्तकात (पृ. ७१ ते १२४) केले आहे ते पाहावे.

"**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात मोक्षासाठी उपाय म्हणून शांभव, शाक्त आणि

आणव असे तीन भाग केलेले आहेत. या तीन विभागांचे सूत्राधारे विवेचन करून प्रत्येक विभागातील प्रत्येक सूत्राचा सारांश दिला आहे.

"**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाची मांडणी पुढीलप्रमाणे केलेली आहे. प्रत्येक सूत्राची प्रस्तावना, संस्कृत सूत्र, सूत्रातील प्रत्येक शब्दाचा अर्थ, सूत्राचा सरलार्थ, सूत्रातील संकल्पनांचे स्पष्टीकरण आणि टीकाकारांनी दिलेले विभिन्न अर्थ यात क्रमाने दिलेले आहेत. "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाचा अर्थ करताना मी परंपरागत विवेचनाचा आधार घेतला आहे.

संस्कृत न येणाऱ्यांनीही जरी या सूत्रसंहितेचा भाग वाचला तरी संस्कृत येत नाही अशी अडचण त्यांना वाटू नये अशी अपेक्षा आहे. मर्यादित पृष्ठ-संख्येत "**श्रीशिवसूत्रसंहिता**" सर्वांपर्यंत पोहोचवून श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे तत्त्वज्ञान समजून घेण्याचा हा नम्र प्रयत्न आहे.

**टीपा :-**

(१) "**श्रीअनुभवामृत**" या ग्रंथाला प्रकरण म्हणण्याचे कारण मूळ ग्रंथ सलग (माझ्या संग्रहातील पोथीप्रमाणे) आठशेचार ओव्यांचा होता. श्रीशिवकल्याणांच्या पूर्वीच त्याचे दहा विभाग केले गेले. अशी सलग पोथी नांदेडच्या कै. कानोल्यांच्या संग्रहात होती असे त्यांनी मला सांगितले होते. माझ्या जवळील पोथीत नंतर कोणीतरी प्रकरणदर्शक शीर्षके दिलेली आहेत.

(२) श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज हे इतिहास संशोधनाला बसले नव्हते. श्रोत्यांना आपली रूढ श्रीसद्गुरुपरंपरा सांगून समारोप करणे एव्हढाच त्यांचा उद्देश होता. ती परंपरा श्रीमत्स्येंद्रनाथांपूर्वी श्रीसरह किंवा श्रीशरभनाथां-पर्यंत जाते हे मी श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांची सद्गुरुपरंपरा (नवभारत, फेब्रुवारी १९५८) या लेखात दाखविले आहे.

(३) "श्रीमहाभारत, **म. भा. अनुशासन पर्व १४.३७९-३८०** ही दीक्षा का घेतली हा प्रश्न गौण आहे. अध्याय १५ ते १८ श्रीकृष्णांची श्रीशिवभक्ती दाखवतात. श्रीकृष्णांच्या श्रीशिवभक्तीचे किंवा शैवत्वाचे आणखी उल्लेख पुढीलप्रमाणे आहेत. जयद्रथवधाची प्रतिज्ञा केलेल्या श्रीअर्जुनाला श्रीकृष्ण श्रीशिवांकडे घेऊन जातात **(द्रौणपर्व ८०.२.४९)** श्रीकृष्णकृत **श्रीशिव-महिमावर्णन (सौप्तिक पर्व** १७६.२६ **अनुशासनपर्व अध्याय** १६०-१६१) श्रीशैव आणि श्रीवैष्णव असा वाद उपस्थित होऊ नये; कारण परब्रह्माची ती भिन्न नावे आहेत. दोघेही वस्तुतः अभिन्न आहेत ही पुराणकारांची भूमिका आहे. "**श्रीकूर्मपुराण**" या पुराणात याविषयी असे म्हटले आहे की -

**यो विष्णुः स स्वयं रुद्रः ।। १.१५.८९-९१ ।।**

अशी ऐक्यदर्शक वचने सर्व पुराणात आढळतात.

(४) पाहा श्री. ग. वा. तगारे यांचा "**श्रीशैवदर्शन**" हा ग्रंथ.(पृ.१८-६१)

(५) श्रीवसुगुप्तपादाचार्यांची "**वासवी**" टीका आज उपलब्ध नाही; पण श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनी "**श्रीमद्भगवद्गीतासंग्रह**" या टीकेत ती वापरली होती असे दिसते.

(६) डॉ. श्री. गोपीनाथ मोहपात्रा - "**जगन्नाथ इन हिस्ट्री अँड रिलिजस ट्रॅडिशन्स ऑफ ओरिसा**" (पृ.४०-४१) महाप्रभू श्रीचैतन्य श्रीजगन्नाथपुरी-मध्ये असताना या मूर्ती तेथे होत्या. पण त्यांनी या मूर्तींच्या पूजेला हरकत घेतली नाही. पण इतिहासाच्या अज्ञानामुळे इ.स. १७९३-९४मध्ये श्रीचैतन्यांच्या कट्टर वैष्णव अनुयायांनी त्या मूर्ती श्रीशैवपंथी मानून विद्रूप करून काढून टाकल्या. विशेष म्हणजे त्यावेळी नागपूरकर भोसल्यांचे ओरिसावर राज्य होते.

(७) पाहा :- श्री. ग. वा. तगारे कृत "**श्रीस्पंदकारिका**" प्रकाशक :- श्री. अरुण रा. गोडबोले, कौशिक प्रकाशन, सातारा, १९८४.

## श्रीशिवसूत्रे

विश्वाची उत्पत्ती, स्थिती व संहार यांचा आधार असलेले व अशी लीला करण्याचे कर्तुम्-अकर्तुम्-अन्यथाकर्तुम् असे इच्छास्वातंत्र्य असणारे जे परतत्त्व आहे त्याला श्रीशिव असे संबोधून त्याचे स्वरूप विवेचन करणारी व त्याच्याशी अद्वयत्व साधण्याचा योगमार्ग विशद करणारी जी श्रीशिव-विषयक सूत्रे आहेत त्या सूत्रसंग्रहाला "**श्रीशिवसूत्रे**" असे नाव दिलेले आहे. "**श्रीनीलमतपुराण**" व श्रीकल्हणकृत "**श्रीराजतरंगिणी**" या ग्रंथांवरून असे लक्षात येते की, सम्राट् अशोक आणि मौर्य यांच्या पूर्वीच्या काळापासून काश्मीर येथे श्रीअर्धनारीश्वराची अर्थात् एकाच मूर्तीमध्ये अर्धा भाग पुरुष अर्थात् श्रीशिव आणि अर्धा भाग स्त्री अर्थात् शक्ती अशा परम श्रीशिवांची उपासना चालू होती. श्रीशिवांमध्ये शक्तीचाही समावेश होतो. श्रीशिवशक्तीचे इतके अभिन्नत्व आहे की, शक्तीशिवाय श्रीशिव आणि श्रीशिवांशिवाय शक्ती असत नाही. श्रीसोमानंदपादाचार्य या काश्मीरीय शैव आचार्यांनी "**श्रीशिवदृष्टी**" या ग्रंथात या विषयी असे म्हटले आहे की -

**न शिवः शक्तिरहितः न शक्तिर्व्यतिरेकिणी।**
**शक्तिशक्तिमतोर्भेदः शैवे जातु न वर्ण्यते।।३.२.३।।**

**अर्थ :-** शक्तिरहित श्रीशिव आणि श्रीशिवांव्यतिरिक्त शक्ती असू शकत नाही. शक्ती व शक्तिमान् यांमधील भेद श्रीशैवमताला संमत असत नाही.

या श्रीशिवसंकल्पनेमुळे विश्वनिर्मितीसाठी श्रीशिवांना उपादानाचीही आवश्यकता नसते.

"**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथावरील टीकाकार श्रीक्षेमराजाचार्य यांनी श्रीशिवसूत्रांच्या उपलब्धीची कथा सांगून "**श्रीशिवसूत्रे**" म्हणजे श्रीशिवांची उपनिषत्संग्रहरूपी सूत्रे अर्थात् "**श्रीशिवोपनिषत् सङ्ग्रहरूपाणि शिवसूत्राणि**" असा अर्थ केला आहे.

"**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथावरील "**विमर्शिनी**" या टीकेच्या प्रस्तावनेत श्रीक्षेमराजाचार्य यांनी असे म्हटले आहे की, "**कदाचित् असौ "द्वैत-दर्शनाधिवासितप्राये जीवलोके रहस्यसम्प्रदायो मा विच्छेदि" इत्याशयतः............... परमशिवेन स्वप्ने अनुगृह्य उन्मिषितप्रतिभः कृतः यथा- "अत्र महीभृति महति शिलातले रहस्यम् अस्ति तत् अधिगम्य अनुग्रहयोग्येषु प्रकाशय।।**" अर्थात् "ज्यावेळी द्वैतमताचा प्रसार होऊन रहस्यसंप्रदाय अर्थात् श्रीईश्वराद्वयवादी संप्रदाय लुप्त होतो की काय अशी परिस्थिती उद्भवली त्यावेळी भगवान् परम श्रीशिवांनी संप्रदाय लोप होऊ नये म्हणून श्रीवसुगुप्तपादाचार्यांना स्वप्नात "येथे डोंगरावर अर्थात् श्रीनगरजवळील श्रीमहादेवगिरीवर एका मोठ्या शिलातळावर रहस्य कोरलेले आहे ते मिळवून अनुग्रह करण्यास योग्य असलेल्यांमध्ये प्रकाशित कर," असा दृष्टान्त दिला."

त्याप्रमाणे श्रीवसुगुप्तपादाचार्यांना ती शिला सापडली. ती त्यांच्या कर-स्पर्शाने उपडी होऊन त्यावरील सूत्रांनी त्यांना स्वप्नाचा प्रत्यय आला व ही श्रीशिवांचे रहस्यज्ञान असणारी सूत्रे **(इमानि श्रीशिवोपनिषत्सङ्ग्रहरूपाणि शिवसूत्राणि)** ही "**श्रीशिवसूत्रे**" होत हे त्यांना कळले. श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी ते ज्ञान श्रीभट्टकल्लटाचार्य या सच्छिष्यांना दिले. ते ज्ञान श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथात संगृहीत केले, असे श्रीक्षेमराजाचार्य यांनी आपल्या "**श्रीशिवसूत्रविमर्शिनी**" या ग्रंथात म्हटले आहे. यावरून पुढील गोष्टी स्पष्ट होतात.

(१) श्रीवसुगुप्तपादाचार्यांच्या काळी द्वैत संप्रदायाचे प्राबल्य होते, हे ऐतिहासिक सत्य आहे. श्रीवसुगुप्तपादाचार्यांपूर्वी अठ्ठावीस द्वैतमतप्रचारक आगम प्रचलित होते. इतकेच नव्हे; तर श्रीवसुगुप्तपादाचार्यांपूर्वी श्रीउग्रज्योती

व श्रीवसुगुप्तपादाचार्यांना कनिष्ठ असलेला समकालीन असा श्रीउग्रज्योतींचा शिष्य श्रीसद्योज्योती याने त्या आगमांपैकी "**श्रीरौरवागम**" व "**श्रीस्वायंभुवागम**" या आगमांवर टीका लिहिल्या. त्याप्रमाणेच त्यांनी द्वैत आगमांच्या आधारे "**श्रीतत्त्वत्रय निर्णय**", "**श्रीभोगकारिका**", "**श्रीमोक्ष-कारिका**" इत्यादि प्रकरणग्रंथ लिहिले व आपल्या द्वैती संप्रदायाला त्यांनी सिद्धान्त श्रीशैवमत असे नाव दिले. श्रीसद्योज्योती यांनी "**श्रीमोक्षकारिका**" या ग्रंथात अद्वयवादी व पाशुपत या दोन्ही मतांचे खंडन केले आहे. त्याच काळात श्रीबृहस्पती हे दुसरे द्वैतवादी आचार्य होऊन गेले.

(२) ही "**श्रीशिवसूत्रे**" एका शिळेवर खोदलेली होती आणि ही शिळा किंवा तिचा खोदलेला भाग खाली करून ठेवलेला होता.

कनिष्कराजाने काश्मीर जिंकल्यावर बौद्ध धर्माचा प्रसार करण्याचा कसोशीने प्रयत्न झाला. हा प्रसार श्रीवसुगुप्तपादाचार्यांच्या काळापर्यंत चालू होता हे श्रीनागबोधी व इतर बौद्धसिद्धांच्या उल्लेखावरून दिसते. श्रीनागबोधीने गुह्यसमाज तंत्राच्या आधारे "**श्रीगुह्यसमाज-मण्डलो-पायिकाविंश विधि**" असे लिहिले आहे. कनिष्काच्या काळापासून बौद्धधर्माचा प्रसार चालू असताना सुरक्षितपणासाठी हा सत्त्याहत्तर सूत्रांचा मोठा शिलालेख उपडा ठेवला गेला असणे शक्य आहे.

(३) हा शिलालेख श्रीवसुगुप्तपादाचार्यांना उपलब्ध झाला. परंपरागत कथेप्रमाणे भगवान् श्रीशिवांनी स्वप्नात जाऊन त्याबद्दल आदेश दिला. भूमिगत देवतामूर्ती अनेक सामान्य लोकांच्या स्वप्नात येऊन आपले ठिकाण सांगून स्वतःला बाहेर काढण्याचा आदेश देतात. याविषयीची अनेक उदाहरणे नमूद केलेली आहेत. जर सामान्य लोकांना असे दृष्टान्त होऊ शकतात तर श्रीवसुगुप्तपादाचार्यांसारख्या श्रीशिवोपासनेला जीवन वाहिलेल्या सिद्धपुरुषाला असा दृष्टान्त झाला असल्यास असंभाव्य असे काहीच नाही.

स्वतःला बुद्धिवादी म्हणविणाऱ्यांनी हा सर्व दृष्टान्त खोटा मानून श्रीवसुगुप्तपादाचार्य हे त्याच टेकडीवर राहत असल्यामुळे ज्यावेळी योगा-योगाने त्यांना ही शिळा दिसली त्यावेळी चार लोकांच्या मदतीने त्यांनी ही शिळा उपडी केली व त्यावर ही सूत्रे खोदलेली आढळली असे म्हटले तरी चालेल. कित्येकदा अचानक शोध लागतात. तसेही झाले असेल. शिला-लेखावर सूत्रे असणे शक्य आहे, हे मान्य करावयास काहीही हरकत नाही.

(४) श्रीवसुगुप्तपादाचार्यांचे शिष्य श्रीभट्टकल्लटाचार्य यांनी "**श्रीस्पंदवृत्ती**"

या "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथावरील टीकेत शिलालेखाचा उल्लेख केलेला नाही. महादेवगिरी या पर्वतावर राहणाऱ्या श्रीवसुगुप्तपादाचार्य या सिद्धांच्या स्वप्नात जाऊन भगवान् श्रीशिवांनी त्यांना ही सूत्रे शिकविली असे म्हटले आहे. श्रीभट्टकल्लटाचार्य हे श्रीवसुगुप्तपादाचार्यांचे साक्षात् शिष्य होते "**श्रीशिवसूत्रे**" शिळेवर खोदलेली असती तर त्यांनी निश्चितच तो उल्लेख केला असता. यावर असेही म्हणता येईल की, श्रीभट्टकल्लटाचार्यांना श्रीशैव-तत्त्वज्ञानात खरा रस होता. त्याचदृष्टीने माध्यम शिळा गौण असल्याने त्याने त्याला विशेष महत्त्व दिले नसावे.

कारणे काहीही असोत; परंतु श्रीशिवांनी श्रीवसुगुप्तपादाचार्यांना स्वप्नात सूत्रे शिकवली ही श्रीभट्टकल्लटाचार्यांनी मांडलेली स्वप्न उपपत्ती काश्मीरी टीकाकारांनी मानली आहे.

श्रीभास्कराचार्य हे श्रीक्षेमराजाचार्यांच्या वडिलांच्या समकालीन होते. त्यांनी "**श्रीशिवसूत्रे**" यावरील "**वार्तिक**" या टीकेत एका सिद्धाने (भगवान् श्रीशिवांनी नव्हे) श्रीवसुगुप्तपादाचार्यांच्या स्वप्नात जाऊन त्यांना या सूत्रांचा उपदेश केला असे म्हटले आहे. श्रीवसुगुप्तपादाचार्य आणि श्रीभास्कराचार्य यांच्यामध्ये तीन शतकांचे अंतर असल्यामुळे श्रीशिव हे सिद्धरूपाने श्रीवसुगुप्त-पादाचार्यांच्या स्वप्नात आले ही कथा रूढ होणे शक्य आहे.

या परंपरागत कथांवरून ही सूत्रे मानवकर्तृक नसून ती श्रीवसुगुप्त-पादाचार्यांना स्वप्नात प्राप्त झाली असे दिसते. श्रीशिवचिंतनाला जीवन वाहिलेल्या सिद्धपुरुषाला आपला संप्रदाय अर्थात् श्रीईश्वराद्वयवाद किंवा रहस्यवाद कसा टिकणार अशी चिंता वाटत असताना स्वप्नामध्ये श्रीशिवांनी येऊन सूत्रोपदेश दिला व जागे झाल्यावर तो त्यांच्या स्मरणात राहिला या गोष्टी घडणे सहज शक्य आहे. "**श्रीरामरक्षा**" हे स्तोत्र श्रीबुधकौशिकऋषींनी स्वप्नात रचले आणि श्रीकोलिरीज यांनी स्वप्नात "**कुब्लाखान**" ही कविता लिहिली. असे जर आहे तर दोन-चार शब्दांची त्रोटक सत्त्याहत्तर "**श्रीशिवसूत्रे**" श्रीवसुगुप्तपादाचार्यांच्या स्वप्नात सांगितली जाणे व सकाळी त्यांनी ती लिहून काढणे यात अशक्य असे काहीही नाही. ज्याअर्थी ही सूत्रे स्वप्नात स्फुरलेली आहेत त्याअर्थी ती मानवकृत नसून श्रीईश्वरकृत आहेत अशी श्रद्धा दृढ होणे स्वाभाविक आहे.

आज महादेवगिरीवर जी "**श्रीशंकरोपल**" नावाची शिळा दाखवितात व तिच्यावर सूत्रे खोदली होती असे सांगतात त्या शिळेवर खोदण्याची किंवा

कोरण्याची निशाणी किंवा अवशेष नाहीत. याचा अर्थ इतकाच की, मधल्या इस्लामी राजवटीत मूळ शिळा विच्छिन्न झाली व लोकांच्या श्रद्धेला तडा जाऊ नये म्हणून सध्याची शिळा "**श्रीशंकरोपल**" म्हणून ठेवली गेली. भावी संशोधनात जर त्या सूत्रे खोदलेल्या जुन्या शिळेचे अवशेष सापडले तर शिलालेखपक्ष अधिक प्रभावी ठरेल. तोपर्यंत दृष्टान्त पक्ष ग्राह्य मानावासा वाटतो.

## श्रीशिवसूत्रे-विभाग

उपलब्ध "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाचे तीन विभाग असून श्रीभास्कराचार्य आणि श्रीक्षेमराजाचार्य यांनी त्यांना भिन्न शीर्षके दिली आहेत.

| श्रीभास्कराचार्य | श्रीक्षेमराजाचार्य | सूत्रसंख्या |
|---|---|---|
| (१) सामान्य चित्प्रकाश-स्वरूप निरूपण | शांभवोपाय | २२ |
| (२) सहजविद्योदय | शाक्तोपाय | १० |
| (३) विभूतिस्पन्द | आणवोपाय | ४५ |

श्रीभास्कराचार्य यांच्या "**विभूतिस्पंद**" या विभागात पंधराव्या सूत्रानंतर एक अधिक सूत्र आलेले आहे. यामुळे श्रीभास्कराचार्य यांच्या "**श्रीशिवसूत्रे**" या संहितेत अठ्ठ्याहत्तर सूत्रे आहेत आणि श्रीक्षेमराजाचार्य यांच्या संहितेत सत्त्याहत्तर सूत्रे आहेत.

प्राचीन सूत्रग्रंथांना (उदाहरणार्थ "**श्रीब्रह्मसूत्रे**") व पुराणांना सुद्धा चार पाद असतात तसेच "**श्रीशिवसूत्रे**" यांनाही असावेत. श्रीभास्कराचार्य यांनी आपल्या "**श्रीशिवसूत्रवार्तिक**" या ग्रंथाच्या प्रास्तविकात असे म्हटले आहे की -

**सरहस्यान्यतः सोऽपि प्रादाद् भट्टाय सूरये**
**श्रीकल्लटाय सोप्येवं चतुःखण्डानि तान्यथ।।४।।**
**व्याकरोत् त्रिकमेतेभ्यः स्पन्दसूत्रैः स्वकैस्ततः।**
**तत्त्वार्थचिन्तामण्याख्यटीकया खण्डमन्तिकम्।।५।।**

**अर्थ :-** श्रीभट्टकल्लटाचार्य यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाच्या अंतिम खंडावर "**श्रीचिंतामणी**" नामक टीका लिहिली. श्रीभास्कराचार्य यांनी तीन गोष्टी स्पष्ट केल्या आहेत.

(१) "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाचे मूळ चार भाग किंवा पाद होते.

(२) श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी ते चार भाग आपले शिष्य श्रीभट्टकल्लटाचार्य

यांना दिले. त्यांपैकी पहिल्या तीन भागांवर श्रीभट्टकल्लटाचार्य यांनी "**श्रीस्पंद-सूत्रे**" नामक टीका लिहिली. (हे विधान विवाद्य आहे. श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी "**श्रीस्पंदकारिका**" लिहिल्या असा अधिक विश्वसनीय पुरावा आहे.)

(३) श्रीभट्टकल्लटाचार्य यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाच्या चौथ्या पादावर "**श्रीचिंतामणी**" नामक टीका लिहिली.

ही टीका सध्या जरी उपलब्ध नसली तरी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाच्या विद्यमान संहितेत उपलब्ध नसलेली परंतु "**श्रीशिवसूत्रे**" म्हणून संबोधलेली पुढील दोन सूत्रे "**श्रीतत्त्वार्थचिंतामणी**" या ग्रंथात उद्धृत केली आहेत.

"**प्राणाख्यनिमित्तं दार्ढ्यम् ।।**" आणि "**प्राक्संवित् प्राणे परिणता ।।**"

याव्यतिरिक्त पुढील सूत्रे "**श्रीशिवसूत्रे**" म्हणून श्रीक्षेमराजाचार्य यांनी आपल्या "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथावरील टीकेत दिली आहेत.

**(१) सकृद् विभातोऽयमात्मा पूर्णोऽस्य क्वापि अप्रकाशसम्भवः ।।**

(वस्तुतः हे दोन सूत्रांचे एकत्रिकरणातून बनलेले सूत्र आहे.)

**(२) चिद्घनात्मपूर्णं विश्वम् ।।**

वरील सूत्रे सध्याच्या "**श्रीशिवसूत्रे**" या संहितेत आढळत नाहीत. यावरून ती चौथ्या पादात असावीत. यावरून "**श्रीब्रह्मसूत्रे**" या ग्रंथाप्रमाणे "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाला चार पाद असावेत असे वाटते.

## "श्रीशिवसूत्रे" - काळ

"**श्रीशिवसूत्रे**" ही शिळेवर खोदली असतील तर त्यांचा काळ ठरविणे पुराव्याअभावी कठीण आहे; पण ज्यांना ती उपलब्ध झाली किंवा स्वप्नात स्फुरली त्या श्रीवसुगुप्तपादाचार्यांचा काळ अंदाजे ठरवता येतो.

श्रीकल्हणाचार्य यांनी "**श्रीराजतरंगिणी**" या ग्रंथामध्ये श्रीवसुगुप्तपादाचार्य यांचे शिष्य श्रीभट्टकल्लटाचार्य हे काश्मीरचे राजे अवंतिवर्मा (इ. स. ८५५-८८३) यांच्या कारकीर्दीत होऊन गेले असे म्हटले आहे. श्रीवसुगुप्तपादाचार्य हे श्रीभट्टकल्लटाचार्य यांच्या मागच्या पिढीतील आहेत. पिढी ही सामान्यपणे २५ ते ३० वर्षांची मानतात. त्यावरून श्रीवसुगुप्तपादाचार्यांचा काळ इ.स. ७७५ ते ८२५ असा निश्चित होतो. मी श्रीवसुगुप्तपादाचार्यांचा म्हणजे पर्यायाने "**श्रीशिवसूत्रे**" यांचा काळ इ.स. ८२५च्या सुमारास मानतो. अधिक निश्चित पुरावा उपलब्ध झाला तर तोही काळ मी स्वीकारीन.

## "श्रीशिवसूत्रे" या ग्रंथावरील टीका

प्राचीन सूत्रग्रंथांचा अर्थ लावताना प्राचीन परंपरागत टीकाकारांची मदत

घेणे आवश्यक असते. त्याशिवाय दोन किंवा तीन शब्दांच्या सूत्रात तत्त्वज्ञान किंवा साधनामार्ग काय सांगितला आहे याचा उलगडा होत नाही. याशिवाय हे स्वतंत्र दर्शन असल्यामुळे यातील पारिभाषिक संज्ञा व इतर बारकावे या परंपरागत टीकाकारांच्या मदतीने समजून घेतल्या नाहीत तर अर्थाचा अनर्थ होतो. उदाहरणच घ्यावयाचे झाल्यास "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील "**उद्यमो भैरवः।।१.५।।**" हे सूत्र घेता येईल. यातील "**उद्यम**" या शब्दाचा कोशातील अर्थ उद्योग, प्रयत्न, exertion असा दिलेला आहे. परंतु या शास्त्रात "उद्यम" या शब्दाचा अर्थ "आतून आपोआप उचंबळून येणे" किंवा "उच्छलन" असा आहे. या उद्यमामध्ये प्रयत्न किंवा दमणे यांना स्थान नाही. ती एक आतून आपोआप होणारी प्रक्रिया आहे. प्रस्तुत पुस्तकात असे अनेक पारिभाषिक शब्द आलेले आढळतील की, त्यांचे कोशगत अर्थ व टीकाकारांनी केलेले अर्थ खूपच भिन्न आहेत.

हे टीकाकार श्रीवसुगुप्तपादाचार्यांच्या परंपरेतील असल्यामुळे त्यांच्या आधारे मी सूत्रांचे विवेचन केलेले आहे. श्रीक्षेमराजाचार्यांची टीका ही सर्वात सविस्तर, विद्वत्ताप्रचुर पण पारंपारिक आहे. तिच्या आधारे प्रथम सूत्र विवेचन करून नंतर इतर टीकाकारांचे अर्थ नमूद केलेले आहेत. अर्थ करताना मी पदरचे काहीही सांगितले नाही.

काश्मीरी श्रीईश्वराद्वयवादी श्रीशैवमताची आधारशिला असलेल्या "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथावर पुढील टीका उपलब्ध आहेत.

**(१) वृत्ती :-** कर्ता अज्ञात असून काहींच्या मते श्रीक्षेमराजाचार्य हे या वृत्तीचे कर्ते आहेत.

**(२) वार्तिक :-** कर्ते श्रीभास्कराचार्य. इ. स. ९२७-९७५; परंतु डॉ. श्रीजयदेवसिंग यांच्या मते इ. स. ११००

**(३) विमर्शिनी :-** कर्ते श्रीक्षेमराजाचार्य. इ. स. ९७५-१०५०

**(४) श्रीशिवसूत्रवार्तिक :-** कर्ते श्रीवरदराजाचार्य अर्थात् श्रीकृष्णदास. इ.स. १०००-१०२५ डॉ. श्रीजयदेवसिंग यांच्या मते इ. स. १५००

हे सर्व टीकाकार श्रीवसुगुप्तपादाचार्यांच्या विद्यावंशातील आहेत. (याठिकाणी वृत्ती, वार्तिक इत्यादींचा अंतर्भाव "**टीका**" या संज्ञेत केला आहे.) या टीकाकारांचे काळ जरी सध्या संशोधकांनी मानले गेलेले दिले असले तरी त्याबद्दल मतभेद आहेत. श्रीवसुगुप्तपादाचार्यांचा व या टीकाकारांचा संबंध पुढील विद्यावंशावरून स्पष्ट होईल.

श्रीवसुगुप्तपादाचार्य (इ. स. ८००-८५०)
श्रीभट्टकल्लटाचार्य (इ. स. ८२५-८७५)
श्रीप्रद्युम्नभट्टाचार्य (श्रीभट्टकल्लटाचार्यांचे मामेभाऊ) (इ. स. ८२५-८७५)
श्रीप्रज्ञार्जुनाचार्य (इ. स. ८५०-९००)
श्रीमहादेवभट्टाचार्य (इ. स. ८७५-९२५)
श्रीसिद्धनाथाचार्य = श्रीकंठाचार्य (इ. स. ९००-९५०)
श्रीभास्कराचार्य (इ. स. ९२५-९७५) [१-२]
श्रीसोमानंदाचार्य (इ. स. ८७५-९२५)
श्रीउत्पलाचार्य (इ. स. ९००-९५०)
श्रीलक्ष्मणगुप्ताचार्य (इ. स. ९२५-९७५)
श्रीअभिनवगुप्तपादाचार्य (इ. स. ९५०-१०००)
श्रीक्षेमराजाचार्य (इ. स. ९७५-१०००)

**टीप :-** १) श्रीजयदेवसिंगांच्या मते (इ. स. १०००)

२) **(पाहा :-** श्री. नवजीवन रस्तोगीकृत **"द क्रम तांत्रिसिझम् ऑफ काश्मीर," खंड पहिला, पृष्ठ १४४)** श्रीजयदेवसिंगकृत "**श्रीशिवसूत्रे**" प्रस्तावना पृष्ठ १७.

## (१) वृत्ती

वरील टीकांपैकी "**वृत्ती**" ही काश्मीर दरबार ग्रंथावली खंड ४ व ५ मध्ये इ. स. १९१६ मध्ये प्रसिद्ध झाली. श्रीजगदीशचंद्र चतर्जींनी संपादन केलेल्या या वृत्तीची फक्त तेवीस पृष्ठे आहेत. वृत्तीला "**मंगलाचरण**" नाही.

"**चैतन्यमात्मा।।१.१।।**" या सूत्रापासून "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाचा प्रारंभ झाला असून "**इति शिवम्**"**।।३.४५।। इति श्रीशिवसूत्रवृत्तौ आणवोपायप्रकाशनं नाम तृतीय उन्मेषः।।३।। समाप्तेयं श्रीशिवसूत्रवृत्तिः।।** असा समारोप केलेला आहे.

या वृत्तीचे कर्ते श्रीक्षेमराजाचार्य आहेत असे डॉ. श्रीजयदेवसिंग यांचे मत आहे; परंतु प्रथम वृत्ती लिहून श्रीक्षेमराजाचार्य यांनी आपल्या टीकेत तिचा विस्तार केला की, प्रथम टीका लिहून तिचा सारांश वृत्तीत दिला याबद्दल मतभेद आहेत. (पाहा :- डॉ. श्रीजयदेवसिंगकृत "**श्रीशिवसूत्रे - प्रस्तावना**" पृ. १७)

"**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथामधील प्रत्येक शब्दाचा किंवा संज्ञेचा स्पष्ट अर्थ या वृत्तीत केलेला आहे. सामान्य वाचकाला श्रीक्षेमराजाचार्य यांच्या विद्वत्तापूर्ण

भाष्यसम टीकेपेक्षा सूत्रार्थ समजण्यासाठी अधिक उपयोग झालेला आहे. गेल्या बहात्तर वर्षांत या वृत्तीची नवीन आवृत्ती निघाली नसल्यामुळे सूत्रविवेचनात काही महत्त्वाच्या सूत्रांवर वृत्तीतील सार्थ उतारे किंवा शब्दार्थ दिले आहेत.

## (२) वार्तिक

"**श्रीशिवसूत्रे**" या वरील वार्तिकाचे कर्ते श्रीभास्कराचार्य हे श्रीदिवाकरभट्ट या तत्कालीन प्रसिद्ध पंडितांचे पुत्र आहेत. "**पित्राख्यातास्तु मध्यमा: ।।**" वडिलांच्या कीर्तीमुळे प्रसिद्ध असणारे मध्यम प्रतीचे असतात असे जरी सुभाषितकारांनी म्हटले असले तरी श्रीभास्कराचार्य यांनी स्वत:बद्दल "**दैवाकरिर्भास्करोऽहम् ।।**" अर्थात् "मी श्रीदिवाकरभट्टांचा मुलगा भास्कर आहे," असा उल्लेख "**श्रीशिवसूत्रवार्तिक**" प्रस्तावना कारिका क्र. ९ मध्ये केलेला आहे. त्यांनी वापरलेल्या "**श्रीशिवसूत्रेसंहिता**" या ग्रंथातील काही सूत्रातील पाठ, सूत्रांचा अनुक्रम आणि संख्या याबाबत श्रीक्षेमराजाचार्य यांच्या "**श्रीशिवसूत्रेसंहिता**" याहून भिन्न आहे. उदाहरणार्थ श्रीक्षेमराजाचार्य यांच्या "**श्रीशिवसूत्रे**" **३-१४** नंतर श्रीभास्कराचार्य यांच्या संहितेत पुढील सूत्र अधिक आहे. याविषयी असे म्हटले आहे की -

**विसर्गस्वाभावाद्बहि:स्थितेस्तत्स्थिति: ।।३.१५अ।।**

श्रीभास्कराचार्य यांनी काही सूत्रांचा अर्थ श्रीक्षेमराजाचार्य यांच्यापेक्षा निराळा केलेला आहे. श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी श्रीभट्टकल्लटाचार्य यांना "**श्रीशिवसूत्रे**" शिकविली. श्रीभट्टकल्लटाचार्यांनी जरी "**श्रीशिवसूत्रे**" यावर टीका लिहिली असली तरी सध्या ती उपलब्ध नाही. त्यामुळे श्रीभास्कराचार्य आणि श्रीक्षेमराजाचार्य यांच्या अर्थाबद्दल जेथे मतभेद आहेत तेथे श्रीकल्लटाचार्यांना किंवा श्रीवसुगुप्तपादाचार्यांना नेमका कोणता अर्थ अभिप्रेत असावा हे समजण्याला मार्ग नाही. इतकेच नव्हे; तर "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाच्या प्रकरणांची शीर्षके "**उपाय**" की "**प्रकाश**" आहेत तेही सांगता येत नाही. माझ्या मताने "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाचे तीन किंवा चार विभाग नंतर करण्यात येऊन टीकाकारांनी त्यांना आपल्या कल्पनेप्रमाणे शीर्षके दिलेली आहेत. "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथाच्या विभागांना श्रीभट्टकल्लटाचार्य आणि श्रीरामकंठाचार्य या टीकाकारांनी भिन्न शीर्षके दिलेली आहेत, हे या संदर्भात लक्षणीय आहे.

## श्रीशिवसूत्रवार्तिक

श्रीभास्कराचार्य यांनी आपल्या "**वार्तिक**" या टीकेच्या मंगलाचरणात "**उत्पत्ति-स्थिति-लयकर्त्या श्रीशिवांना**" वंदन केल्यावर आपल्याकडे

श्रीशिवसूत्रपरंपरा कशी आली हे सांगताना "श्रीसद्गुरू श्रीवसुगुप्तपादाचार्यांना श्रीमहादेवगिरीवर सिद्धाच्या आदेशाने श्रीशिवसूत्रे मिळाली" असे ते म्हणतात. याविषयी चौथ्या कारिकेत असे म्हटले आहे की -

**श्रीमन्महादेवगिरौ वसुगुप्तगुरोः पुरा।**
**सिद्धादेशात् प्रादुरासन् शिवसूत्राणि तस्य हि।।३।।**

**अर्थ :-** कैलासपर्वतावरील एका विविक्षित शिलाखंडावर श्रीसद्गुरू श्रीवसुगुप्ताचार्यांच्या पुढ्यात सिद्धाच्या आदेशाप्रमाणे ही श्रीशिवसूत्रे प्रादुर्भूत झाली.।।३।।

श्रीभास्कराचार्य यांनी श्रीक्षेमराजाचार्य यांच्याप्रमाणे स्वप्नात येऊन स्वतः श्रीशिवांनी ती सूत्रे श्रीवसुगुप्तपादाचार्य यांना दिली असे म्हटलेले नाही.

श्रीभास्कराचार्य यांनी आपल्या **"वार्तिक"** या टीकेत याविषयी असे म्हटले आहे की -

**दैवकरिर्भास्करोऽहमन्तेवासिगणेरितः।।८.५।।**
**. . . . . . . सूत्राणि विवृणोमिच।। कारिका ९.५।।**

**अर्थ :-** आगमाबद्दल अज्ञानी असणाऱ्या शिष्यांनी आग्रह केल्यावरून मी हे वार्तिक लिहिले आहे.

**"वार्तिक"** या टीकेच्या समारोपात आपण कारिका क्रमांक ३९०मध्ये संक्षेपात उत्तम सूत्रवार्तिक वर्णन केलेले आहे ते सर्वांनी नीट सेवन करावे (सुसेव्यम्) व अशा अभ्यासकांना ते सिद्धिमोक्षप्रद होवो अशी कामना त्यांनी व्यक्त केलेली आहे.

श्रीभास्कराचार्य यांनी तिसऱ्या व शेवटच्या पुष्पिकेत असे म्हटले आहे की -

**इति काश्मीरिक- श्रीमदाचार्यभट्टदिवाकरात्मज भट्टश्रीभास्करविरचिते शिवसूत्रवार्तिके विभूतिस्पन्दाख्यःतृतीय प्रकाशः। समाप्तश्चायं शिवसूत्रवार्तिकाख्यो ग्रन्थः।।**

**अर्थ :-** अशा प्रकारे काश्मीरवासी श्रीमदाचार्यभट्टदिवाकरांचे पुत्र श्रीभट्टभास्कराचार्यांनी रचिलेला श्रीशिवसूत्रवार्तिकातला विभूतिस्पंद नावाचा तिसरा प्रकाश संपला.

श्रीभास्कराचार्य यांनी "**श्रीशिवसूत्रे**" यांच्या विभागांना दिलेली शीर्षके ही श्रीक्षेमराजाचार्य यांच्या टीकेपेक्षा भिन्न आहेत हे आपण वर पाहिलेले आहेच.

काश्मीरी श्रीशैवपंडितात श्रीभास्कराचार्य यांचे स्थान मोठे आहे. इ. स. १९१६ मध्ये मुद्रित झालेला हा ग्रंथ आता दुष्प्राप्य आहे. मी "**श्रीशिवसूत्रे**" यांचे विवेचन करताना "**श्रीशिवसूत्रवार्तिक**" या ग्रंथातील महत्त्वाचे उतारे दिलेले असले तरी संपूर्ण "**श्रीशिवसूत्रवार्तिक**" या टीकेचे सानुवाद प्रकाशन होणे आवश्यक आहे.

### (३) श्रीक्षेमराजाचार्यकृत श्रीशिवसूत्रविमर्शिनी

माझा "**श्रीशिवसूत्रदर्शन**" हा ग्रंथ मुख्यतः श्रीक्षेमराजाचार्यकृत "**विमर्शिनी**" या टीकेच्या आधाराने लिहिला आहे. "**श्रीशिवसूत्रे**" यावरील सर्व टीकांत ही विस्तृत, विद्वत्ताप्रचुर आणि प्रसन्न गद्यात लिहिलेली टीका आहे.

श्रीक्षेमराजाचार्य हे सुप्रसिद्ध प्रकांडपंडित श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांचे शिष्य होते. श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाच्या प्रत्येक विभागाच्या शेवटी आपल्या श्रीसद्गुरूंचा उल्लेख केलेला आहे. त्यांनी प्रथम उपायाच्या शेवटी असलेल्या पुष्पिकेत याविषयी असे म्हटले आहे की -

**इति श्रीमन्महामाहेश्वराचार्याभिनवगुप्तपादपद्मोपजीवि श्रीक्षेमराज-विरचिताया शिवसूत्रविमर्शिन्या शाम्भवोपायप्रकाशनं नाम प्रथम उन्मेषः।।**
अर्थात् "श्रीमत् महामाहेश्वर असलेल्या श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांच्या श्रीचरणकमलांवर उपजीवन करणाऱ्या श्रीक्षेमराजाचार्य यांनी रचलेल्या श्रीशिवसूत्रविमर्शिनीमधील "**शांभवोपाय प्रकाशन**" नामक पहिला उन्मेष समाप्त झाला."

श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांच्या या प्रसिद्ध शिष्याने या टीकेखेरीज "**श्रीस्पंद-संदोह**", "**श्रीस्पंदनिर्णय**", "**श्रीप्रत्यभिज्ञाहृदय**", "**श्रीस्वच्छन्दोद्योत**", "**श्रीनेत्रोद्योत**", "**श्रीपराप्रावेशिका**", "**श्रीतत्त्वसंदोह**" इत्यादि अनेक प्रमाणभूत ग्रंथ लिहिले आहेत.

"**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाच्या "**विमर्शिनी**" टीकेच्या प्रारंभी "**द्वैत-भासाद्वयात्म" शांकर चैतन्य विजयी असते,**" असे मंगलाचरण करून "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथावरील वृत्तीतील गोंधळ किंवा असामंजस्य पाहून आपण ही वृत्ती लिहिण्याला प्रवृत्त झालो असे श्रीक्षेमराजाचार्य म्हणतात. त्यांच्या मतानुसार श्रीवसुगुप्तपादाचार्य यांच्या वेळी अशी परिस्थिती निर्माण झाली होती की, द्वैतवादाचा प्रसार होऊन "**रहस्यसंप्रदाय**" किंवा श्रीईश्वराद्वयवाद लोपतो की काय असे वाटू लागले. तेव्हा भगवान् श्रीशिवांनी

श्रीवसुगुप्तपादाचार्यांच्या स्वप्नात जाऊन "काश्मीर मधील श्रीनगर शेजारच्या श्रीमहादेवगिरीवर सत्यज्ञान शिलालेखावर उत्कीर्ण केले आहे त्याचा प्रसार कर." अशी आज्ञा केली. श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी ती शिळा शोधून काढली आणि तिच्यावरील श्रीशैवज्ञान आपले शिष्य श्रीभट्टकल्लटाचार्य यांना शिकविले. ते त्यांच्याकडे परंपरेने आले. त्यावरून "**श्रीशिवसूत्रे**" यांचा निश्चित अर्थ त्यांनी सांगितला आहे. "**विमर्शिनी**" टीकेच्या प्रस्तावनेमध्ये याविषयी असे म्हटले आहे की -

**शिवसूत्राणी तु निर्णीयन्ते।।**

**अर्थ :-** "**श्रीशिवसूत्रे**" यांचा निश्चित अर्थ करण्यासाठी या टीकेची मी रचना करीत आहे.

"**विमर्शिनी**" ही एक आदर्श टीका आहे. हिच्यात प्रत्येक सूत्राचे प्रयोजन किंवा प्रस्तावना, सूत्रातील प्रत्येक शब्दाचा सविस्तर अर्थ, त्या शब्दातील संकल्पना स्पष्ट करण्यासाठी अनेक ग्रंथांतील अवतरणे देऊन समासप्रचुर पण प्रसन्न अशा गद्य शैलीत केलेले विवेचन वाचताना आनंद वाटतो. मी त्यांच्या टीकेचा तपशीलवार सारांश दिलेला आहे पण मूळ ग्रंथाचे शब्दशः भाषांतर झाले तर काश्मीरी श्रीशैवमतावरील एक प्रमाणग्रंथ मराठीत उपलब्ध होईल.

ग्रंथ समाप्तीच्या श्लोकात याविषयी असे म्हटले आहे की -

**तरत तरसा संसाराब्धिं विधत्त पदे पदे।**
**विमृशत शिवप्रोक्तं सूत्रं रहस्यसमुज्ज्वलम्।।५।।**

**अर्थ :-** तुम्ही सर्वजण संसारसागर त्वरित तरून जा. श्रीशिवांनी आपले उज्ज्वल रहस्य असलेली जी "**श्रीशिवसूत्रे**" सांगितली आहेत त्यांचे चिंतन करीत जा.

अशी विनंती श्रीक्षेमराजाचार्य यांनी केलेली आहे. शेवटच्या आणवोपायाच्या पुष्पिकेत पहिल्या पुष्पिकेप्रमाणे आपल्या श्रीसद्गुरूबद्दल परमादर व्यक्त कलेला आहे. "**श्रीशिवसूत्रविमर्शिनी**" या टीकेचा "**समाप्ता चेयं श्रीशिवसूत्र-विमर्शिनी।।**" असा शेवट केल्यावर ही टीका सर्वांना कल्याणप्रद होवो, अशी सदिच्छा त्यांनी व्यक्त केलेली आहे. याविषयी असे म्हटले आहे की -

**कृतिः श्रीक्षेमराजस्य क्षेमायास्तु विमर्शिनाम्।**
**शिवस्वात्म्यैकबोधार्था "शिवसूत्रविमर्शिनी"।।**

**अर्थ :-** श्रीक्षेमराजांची ही विमर्शिनीरूप कृती विचारवंतांच्या कल्याणासाठी

आहे; कारण ही श्रीशिवसूत्रविमर्शिनी श्रीशिव आणि आत्मा यांचे ऐक्यज्ञान करून देणारी आहे.

## (४) श्रीकृष्णदास तथा श्रीवरदराज कृत "श्रीशिवसूत्रवार्तिक"

श्रीभास्कराचार्य यांच्या टीकेप्रमाणे ही "**श्रीशिवसूत्रे**" यावरील कारिकात्मक टीका आहे. श्रीवरदराजांच्या काळाबद्दल मतभेद आहेत. श्री. नवजीवन रस्तोगी हे त्यांचा काळ इ. स. १०००-१०५० मानतात तर श्री. जयदेवसिंग त्यांचा काळ इ. स. १५०० (१५ वे शतक) मानतात.

(पाहा :- (१) काश्मीर संस्कृत ग्रंथावली ४३, श्रीनगर १९२५.५ "**श्रीमधुसूदन**" कौलशास्त्री. (२) श्री. नवजीवन रस्तोगी :- पृ. १७२-१७६. (३) श्री. जयदेवसिंग प्रस्तावना. पृ.१८)

श्रीवरदराजाचार्यांनी प्रस्तावनेत श्रीक्षेमराजाचार्य यांनी दिलेली "**श्रीशिवसूत्रे**" यांच्या निर्मितीची कथा जवळ जवळ तशीच दिली आहे आणि आपण श्रीक्षेमराजाचार्यांच्या "**श्रीशिवसूत्रविमर्शिनी**" या ग्रंथाच्या आधारे ही कथा लिहीत असल्याचे पाचव्या कारिकेत मान्य केलेले आहे.

श्रीवरदराज यांनी एकूण दोन शे पंधरा कारिका असलेल्या या वार्तिकाच्या शेवटी असे म्हटले आहे की -

**मधुराजकुमाराणां महाहन्ताधिरोहिणाम्।**
**पश्चिमेन तदालोकध्वस्तपश्चिमजन्मनां।। २१३।।**

**अर्थ :-** महाअहंतेवर आरूढ झालेल्या, मधुराजकुमार यांच्या ज्ञान-प्रकाशाने ज्यांचे पुढील सर्व जन्म नष्ट झाले आहेत।।२१३।।

**मया वरदराजेन मायामोहापसारकम्।**
**अनुगृह्णन्तु नामैतत् सन्तः सन्तोषमागताः।।२१४,२१५।।**

**अर्थ :-** अशा मी श्रीवरदराज यांनी मायामोह दूर सारणारे हे वार्तिक रचले आहे. श्रीक्षेमराजपंडितांच्या व्याख्यानाला अनुसरणाऱ्या व कृतीने कुशल असणाऱ्या कृष्णदासाने याचा मथितार्थ व्यक्त केला आहे. त्यांच्यावर संतुष्ट झालेल्या विद्वानांनी व सज्ञनसंतांनी अनुग्रह करावा.।।२१४,२१५।।

या ग्रंथाचा समारोप करताना श्रीवरदराजाचार्य यांनी "मायामोह दूर करणारे श्रीक्षेमराजाचार्य यांच्या "**श्रीशिवसूत्रविमर्शिनी**" या व्याख्यानानुसार वार्तिक लिहिलेले असून या वार्तिकामुळे संतुष्ट झालेले सज्जन अनुग्रह करोत," अशी सद्भावना व्यक्त केली आहे.

"**श्रीशिवसूत्रे**" यांचा अर्थ समजण्याला "**श्रीशिवसूत्रवार्तिक**" या टीकेची पुष्कळ मदत होते हे त्यातील मी घेतलेल्या अवतरणांवरून लक्षात येईल.

## काही मूलभूत संकल्पना

हे काश्मीरी श्रीशैवमत स्वतंत्र दर्शन आहे. "**श्रीशिवसूत्रे**" लक्षात घेण्याच्या दृष्टीने यातील परिभाषा व संकल्पना या श्रीशांकरतत्त्वज्ञानापेक्षा भिन्न आहेत. त्या संक्षिप्तपणे या विभागात मांडल्या आहेत.

या योगमार्गामध्ये "परम श्रीशिव" हे अंतिम तत्त्व मानले आहे. त्याला चित्, चिती, चैतन्य, परासंवित् किंवा अंतिमज्ञान किंवा अनुभूती, श्रीपरमेश्वर इत्यादि पर्यायी शब्दांनी संबोधिले जाते. ते नामरूपातीत व स्थलकालातीत आहेत. "**श्रीप्रत्यभिज्ञाहृदय**" या ग्रंथामध्ये याविषयी असे म्हटले आहे की-

**श्रीमत्परमशिवस्य पुनः विश्वोत्तीर्ण-विश्वात्मक-परमानन्दमय-प्रकाशैकघनस्य-एवंविधमेव शिवादिधरण्यन्तमखिलमभेदेनैव स्फुरति, न तु वस्तुतः अन्यत् किञ्चित् ग्राह्यं ग्राहकं वा।। सूत्र ३।।**

**अर्थ :-** विश्वाच्या पलीकडे तसेच विश्वात्मक परमानंदमय प्रकाशैक-घन परमश्रीशिव हे श्रीशिवांपासून ते धरेपर्यंत संपूर्ण प्रमेयरूपाने अर्थात् जगदभिन्न रूपाने स्फुरित होत असतात. खरे पाहता ग्राह्य-ग्राहक अन्य कोणीही नाही; कारण परम श्रीशिव हे अनंत वैचित्र्याच्या रूपात स्फुरित होत असतात.

ते चैतन्य विश्वात्मक, विश्वव्यापी (Immanent), विश्वोत्तीर्ण (Transcendent), परमानंदरस्वरूप व अप्रतिहत इच्छास्वातंत्र्य असणारे आहे. हे वैचित्र्यपूर्ण विश्व हा त्याच्यामध्येच झालेला त्याचा आविष्कार आहे. परम श्रीशिव हे प्रकाश व प्रकाश्य आहेत. त्यांच्यामध्ये ग्राह्य-ग्राहक भेद नाही. श्रीशांकरवेदांतातील ब्रह्म हे केवळ प्रकाश किंवा ज्ञान किंवा बोध आहे; परंतु परम श्रीशिव हे प्रकाश-विमर्शमय किंवा श्रीशिवशक्तिसामरस्यमय आहेत कारण; "**यदि निर्विमर्शःस्यात् अनीश्वरो जडश्च प्रसज्येत।।**" अर्थात् "जर श्रीशिव हे केवळ प्रकाशमय असते तर ते हिऱ्याप्रमाणे जड व अनीश्वर झाले असते." असे श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीपराप्रावेशिका**" या ग्रंथामध्ये याविषयी म्हटले आहे.

श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीपराप्रावेशिका**" या ग्रंथामध्ये विमर्श या शब्दाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की -

**विमर्शो नाम विश्वाकारेण, विश्वप्रकाशनेन, विश्वसंहरणेन च अकृत्रिमाहं इति विस्फुरणम्।।** (पृ.१,२)

**अर्थ :-** विमर्श म्हणजे विश्वाची उत्पत्ती, स्थिती व लय करणारे विश्वाकार, विश्वप्रकाश असलेले अकृत्रिम (Non-relational Immediate) अहंतेचे विस्फुरण किंवा आतील जाणीव होय. पराशक्ती, परावाक् स्वातंत्र्य, ऐश्वर्य, स्फुरत्ता व स्पंद या विमर्श शक्तीचे विशेष व्यक्त करणाऱ्या संज्ञा आहेत.

ही विमर्श शक्ती अर्थात् चिती किंवा पराशक्ती ही श्रीशिवांपेक्षा निराळी नाही. शक्तिरहित श्रीशिव किंवा श्रीशिवांहून भिन्न शक्ती असू शकत नाहीत. श्रीसोमानंद यांनी "**श्रीशिवदृष्टी**" या आपल्या ग्रंथामध्ये याविषयी असे म्हटले आहे की -

**न शिवः शक्तिरहितो न शक्तिर्व्यतिरेकिणी।**
**शक्ति-शक्तिमतोर्भेदः शैवे जातु न वर्ण्यते।।३.२.३।।**

**अर्थ :-** श्रीशिव हे शक्तिरहित असू शकत नाहीत आणि आधाराशिवाय किंवा श्रीशिवांशिवाय शक्तिसत्तेची कल्पना करता येत नाही. श्रीशैवदर्शनात इतर शास्त्रांप्रमाणे शक्ती आणि शक्तिमान् यांतील भिन्नता विर्णिलेली नाही.

शक्ती आणि शक्तिमान् किंवा श्रीशिव यांमध्ये भेद मानणे श्रीशैवमताला संमत नाही. संत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीअनुभवामृत**" या आपल्या ग्रंथाच्या प्रारंभी श्रीशिवशक्तींच्या ऐक्याचे काव्यमय भाषेत वर्णन केलेले आहे ते या संदर्भात लक्षणीय आहे. परम श्रीशिव हे प्रकाशविमर्शमय किंवा श्रीशिवशक्तिमय आहेत. प्रकाश या शब्दाचा अर्थ स्वतः प्रकाशस्वरूप असून दुसऱ्याला प्रकाशित करणारे आत्मतत्त्व असा आहे. यालाच अहंत्व किंवा अहंता असे म्हणतात आणि विमर्श म्हणजे दुसऱ्यावर अवलंबून नसलेली इच्छाशक्ती किंवा स्वातंत्र्य होय. परम श्रीशिवांचे शक्तिविशेष अनेक असले तरी चिच्छक्ती, आनंदशक्ती, इच्छाशक्ती, ज्ञानशक्ती आणि क्रियाशक्ती या पाच मुख्य शक्ती आहेत. आपल्या चिच्छक्तीने कोणतेही उपादान नसताना श्रीशिव हे विश्वनिर्मिती करतात.

श्रीअभिनवगुप्तपादाचार्य यांनी "**श्रीतंत्रसार**" या आपल्या ग्रंथामध्ये याविषयी असे म्हटले आहे की -

**तस्य च स्वातन्त्र्यम् आनन्दशक्तिः, तच्चमत्कार इच्छाशक्तिः, प्रकाशरूपता चिच्छक्तिः, आमर्शात्मकता ज्ञानशक्तिः, सर्वाकार-योगित्व क्रियाशक्तिः-वस्तुतः इच्छाज्ञानक्रियाशक्तियुक्तः अनवच्छिन्नः प्रकाशो**

**निजानन्दविश्रान्तः शिवरूपः।।**

**अर्थ :-** त्याचे स्वातंत्र्य ही आनंदशक्ती, त्याचा चमत्कार ही इच्छाशक्ती, प्रकाशरूपता ही चिच्छक्ती, आमर्शात्मकता ज्ञानशक्ती, सर्वाकारयोगित्व म्हणज प्रत्येक प्रकारच्या आकार इत्यादींना अवभासित किंवा प्रकाशित करण्याचे सामर्थ्य हीच क्रियाशक्ती आहे. खरे पाहता परम श्रीशिव हे इच्छा, ज्ञान आणि क्रिया शक्तीने युक्त असून अनवच्छिन्न प्रकाशरूप व स्वतःच्या आनंदात विश्रांती प्राप्त करून घेणारे श्रीशिवरूप आहेत.

श्रीक्षेमराजाचार्य यांनी **"श्रीप्रत्यभिज्ञाहृदय"** या ग्रंथामध्ये याविषयी असे म्हटले आहे की -

**चितिः स्वतन्त्रा विश्वसिद्धिहेतुः।। सूत्र १।।**

**अर्थ :-** चितिशक्ती स्वतंत्र असून विश्वनिर्मितीचे कारण आहे.

मायावादात या मताला स्थान नाही. सर्वशक्तिमान् श्रीशिव हे पुढील पंचकृत्ये करीत असतात.

**(१) सृष्टी :- सृज् :-** सोडणे किंवा जाऊ देणे स्वतःमध्ये सामावलेले विश्व जाऊ देणे किंवा प्रकट करणे याला सृष्टी असे म्हणतात. ही निर्मिती नसल्यामुळे उपादानाचा प्रश्नच उद्भवत नाही.

**(२) स्थिती :-** विश्वप्रकटीकरण क्रिया चालू ठेवणे.

**(३) संहार :-** प्रकट केलेले विश्व परत आपल्यात ओढून घेणे. विश्वाचा नाश होत नाही. ते श्रीशिवांमध्ये विलीन होते.

**(४) पिधान :-** झाकणे. आत्म्याचे सत्यस्वरूप झाकणे.

**(५) अनुग्रह :-** कृपा. श्रीशिवकृपेवाचून मोक्षप्राप्ती होऊ शकत नाही.

विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि संहार ही श्रीशिवांची क्रीडा असून ती अनंत काळापासून चालू आहे आणि चालू राहणार आहे.

## तत्त्वे

परम श्रीशिवांपासून विश्वविकास कसा होतो हे स्पष्ट करण्यासाठी त्रिकशास्त्रात पुढील छत्तीस तत्त्वे सांगितली आहेत.

(१) श्रीशिव, (२) शक्ती, (३) श्रीसदाशिव, (४) श्रीईश्वर. (५) शुद्धविद्या, (६) माया, (७) कला, (८) विद्या, (९) राग, (१०) काल, (११) नियती, (१२) पुरुष, (१३) प्रकृती, (१४) बुद्धी, (१५) अहंकार, (१६) मन, (१७) श्रोत्र, (१८) त्वक्, (१९) चक्षू, (२०) जिह्वा, (२१) घ्राण, (२२) वाक्, (२३) पाणी (हात), (२४) पाद, (२५) पायू, (२६) उपस्थ. (२७) शब्द, (२८)

स्पर्श, (२९) रूप, (३०) रस, (३१) गंध, (३२) आकाश, (३३) वायू, (३४) वह्नी, (३५) सलिल आणि (३६) पृथ्वी.

यांपैकी पहिली सहा तत्त्वे श्रीशिवांचे स्वरूप झाकीत किंवा शक्तींचा संकोच करीत नाहीत. यामुळे या सहा तत्त्वांना शुद्धाध्वन् किंवा शुद्ध मार्ग अशी संज्ञा आहे. (पाहा :- ।।**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**।। **३.१.४**।। श्रीअभिनवगुप्तपादाचार्यकृत "**विमर्शिनी**" टीका.)

श्रीशिव, शक्ती, श्रीसदाशिव किंवा सादाख्य, श्रीईश्वर किंवा ऐश्वर्यतत्त्व, सद्विद्या किंवा शुद्धविद्यातत्त्व ही प्रथम सहा तत्त्वे आहेत. पुढील सहा ते छत्तीस तत्त्वे परम श्रीशिवांच्या रूपाचे तिरोधान करतात व त्यांच्यामुळे परम श्रीशिवांच्या शक्तींचा संकोच होतो म्हणून या तत्त्वांना अशुद्धमार्ग किंवा अशुद्धाध्वन् असे म्हटले आहे. ही तत्त्वे पुढीलप्रमाणे आहेत. माया, कला, विद्या, राग, काल, नियती, पुरुष, प्रकृती, बुद्धी, अहंकार, मन, श्रोत्र, त्वक्, चक्षू, जिह्वा, घ्राण, वाक्, पाणि किंवा हस्त, पाद, पायू, उपस्थ, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, आकाश, वायू, वह्नी, सलिल आणि पृथ्वी ही ती तत्त्वे आहेत.

शाक्तआगमात अशीच छत्तीस तत्त्वे मानलेली आहेत. वैष्णव आगमात पस्तीस तत्त्वे मानतात. या सर्वांवर सांख्यतत्त्वज्ञानाचे ऋण आहे.

प्रथम आपण शुद्धाध्वन् किंवा शुद्ध मार्ग मानल्या गेलेल्या तत्त्वांचा विचार करू.

### (१) श्रीशिव

विश्वनिर्मितीसाठी सर्वोच्च इच्छा, ज्ञान व शक्ती असलेले पूर्णानंद स्वभावाचे परम श्रीशिवांचे पहिले स्पंदन म्हणजे श्रीशिवतत्त्व होय. या तत्त्वाहून श्रेष्ठ असे अन्य काहीही नाही. तो आपल्या स्वतंत्र इच्छेने परम श्रीशिवांनी निर्मिलेला विश्वनिर्मितीसाठीचा परम श्रीशिवांचा प्रथम स्पंद आहे. श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीपराप्रावेशिका**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**अस्य जगत् स्त्रष्टुमिच्छां परिगृहीतवतः परमेश्वरस्य प्रथमस्पन्द एवेच्छाशक्तितत्त्वम् अप्रतिहतेच्छत्वात्।।**

**अर्थ :-** या जगताला निर्माण करण्याच्या इच्छेचे परिग्रहण केलेल्या श्रीपरमेश्वरांचा प्रथमस्पंद अर्थात् पहिली हालचाल हीच इच्छाशक्ती आहे; कारण ही इच्छा अप्रतिहत म्हणजेच कोणताही विरोध नसणारी आहे.

## (२) शक्तितत्त्व

श्रीक्षेमराजाचार्य यांच्या दृष्टीने श्रीशिव आणि शक्ती यांत कोणताही भेद नाही. "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**या सा शक्तिर्जगद्धातुः कथिता समवायिनी।**
**इच्छात्वं तस्य सा देवी सिसृक्षोः प्रतिपद्यते।।**

**अर्थ :-** ही जी विधात्याची नित्यसंबंधित अशी शक्ती आहे तीच त्या सृष्टिकर्त्याचे इच्छात्व अर्थात् इच्छाशक्ती होय, असे प्रतिपादिले आहे.

श्रीमहेश्वरानंदांनी "**श्रीमहार्थमंजरी**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**यदा स्वहृदयवर्त्तिनमुक्तरूपमर्थतत्त्वं बहिःकर्तुमुन्मुखो भवति तदा शक्तिरिति व्यवह्रियते।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला स्वहृदयात असणारे आधी सांगितलेले अर्थतत्त्व बाहेर कार्य करण्याला उन्मुख होते किंवा उद्युक्त होते त्यावेळेला त्याला "शक्ती" असे म्हटले जाते.

सारांश श्रीशिव आणि शक्ती अभिन्न आहेत; पण शक्तितत्त्वामध्ये श्रीशिवांचा विश्वोत्पत्तीचा आनंदभाव व्यक्त होतो.

त्रिकशास्त्रातील श्रीशिवशक्तिसंकल्पना व "**श्रीअनुभवामृत**" या ग्रंथातील "**श्रीशिवशक्ती समावेशन किंवा सामरस्य**" या प्रकरणातील देवोदेवी संकल्पनेतील साम्य लक्षणीय आहे.

## (३) श्रीसदाशिव किंवा सादाख्यतत्त्व

विश्वविकासामध्ये परम श्रीशिवांच्या इच्छेचे विश्वरूप होण्यासाठी ज्ञान व शक्ती या दोन शक्ती कारणीभूत आहेत.

"अहम्-इदम्" अर्थात् "मी-हे" अशा जाणीवेला विश्व असे म्हणतात. सादाख्य किंवा श्रीसदाशिवतत्त्वाच्या ठिकाणी ज्ञान आणि क्रिया या दोन्ही शक्ती असतात. "**ज्ञानक्रिये सादाख्यम्**" असे म्हटले असले तरी या तत्त्वांमध्ये ज्ञानशक्तीचे प्राधान्य असते.

श्रीसोमानंदाचार्य यांनी "**श्रीशिवदृष्टी**" या ग्रंथामध्ये याविषयी असे म्हटले आहे की -

**अथाऽस्माकं ज्ञानशक्तिर्या सदाशिवरूपता।। २.१।।**

**अर्थ :-** आम्ही श्रीशैवमतावलंबी लोकांनी ज्ञानशक्तीचा स्वीकार

श्रीसदाशिवांच्या स्वरूपात केलेला आहे.

विश्वाचा "अहम् अस्मि" किंवा "इदम्" हे विश्वच मी आहे असा येणारा प्रत्यय हीच ज्ञानशक्ती होय. चित्रकाराला चित्र काढण्यापूर्वी चित्राची अस्पष्ट कल्पना किंवा चित्ररेखा असते. या जाणिवेला "**अनुन्मीलित चित्रन्याय**" असे म्हणतात. श्रीसदाशिवतत्त्वामध्ये परम श्रीशिवांच्या इच्छेला किंवा अहंतेला प्राधान्य असते.

श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीषट्त्रिशत्संदोह**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**तत्र प्रोन्मीलितमात्रचित्रकल्पतया इदमंशस्य अस्फुटत्वात् इच्छा-प्राधान्यम्।।**

**अर्थ :-** ते तत्त्व केवळ विविध कल्पनांनी प्रोन्मीलित किंवा विकसित झालेले असल्यामुळे इदंअंशाच्या अस्पष्टत्वामुळे त्यात इच्छाप्राधान्य असते.

श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीप्रत्यभिज्ञाहृदय**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**सदाशिवतत्त्वेऽहन्ताच्छादिता स्फुटेदन्तामयं विश्वम्।।**

**अर्थ :-** अहन्तेची स्पष्ट जाणीव असलेले आणि इदन्तेची किंवा विश्वाची अस्फुट जाणीव असलेले विश्वोत्पत्ती होऊ घातलेले तत्त्व म्हणजे श्रीसदाशिव-तत्त्व होय.

या तत्त्वातील विश्वाकडे किंवा इदंतेकडे असणारा कल म्हणजे अहंतेवर कमी भर नव्हे. यातील द्रष्टा व दृश्य (Subject and object) चित् (consciousness) आहे.

या श्रीसदाशिवतत्त्वाची अनुभूती असलेल्या व्यक्तीला "**महामंत्रेश्वर**" असे म्हणतात. त्याला सर्व विश्व म्हणजे मीच अर्थात् "अहमस्मि इदम्" ही अनुभूती येत असते.

## (४) श्रीईश्वर किंवा ऐश्वर्यतत्त्व

श्रीसदाशिवतत्त्वातील अनुभूती ही "अहमिदम्" अर्थात् अहम्ची अधिक स्फुटता असलेली व पर्यायाने इदम्ची किंवा विश्वाची अस्फुट जाणीव असणारी असते. परंतु श्रीईश्वरतत्त्वात ती जाणीव "इदमहम्" अर्थात् विश्वाची अधिक स्पष्ट जाणीव असणारी अशी होते. त्यामुळे या तत्त्वाला विश्वोन्मेष किंवा अंकुरित जगत् असे म्हणतात.

श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीपराप्रावेशिका**" या ग्रंथामध्ये याविषयी असे

म्हटले आहे की -

**अङ्कुरितं जगदहन्तयाऽऽवृत्य स्थितमीश्वरतत्त्वम्।।**

**अर्थ :-** श्रीईश्वरतत्त्वामध्ये इदंता आणि अहंता (विश्व आणि मी यांची जाणीव) सारख्या प्रमाणात असते; परंतु अहम्‌चा अंश अधिक स्फुट किंवा स्पष्ट झालेल्या इदम्‌मध्ये असल्यामुळे हे ज्ञानशक्तिप्रधान तत्त्व आहे.

श्रीईश्वरतत्त्वाचा साक्षात्कार झालेल्या व्यक्तीला मंत्रेश्वर असे म्हणतात.

## (५) सद्‌विद्या किंवा शुद्धविद्या

विश्वविकासाच्या ज्या अवस्थेत इदंतेचा अंश अधिक स्पष्ट होऊन अहंता किंवा मीत्व आणि इदंता किंवा विश्व एकाच पारड्यात तोलल्यास समतोल असल्याचे आढळतात त्या तत्त्वाला शुद्धविद्या असे म्हणतात.

"**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथात श्रीउत्पलाचार्य यांनी असे म्हटले आहे की -

**सामान्याधिकरण्यं च सद्विद्याहमिदन्धियोः।। ३.१.३।।**

**अर्थ :-** अहम् आणि इदम् या दोन्ही प्रकारच्या बुद्धीचे सामानाधि-करण्य सद्विद्यातत्त्वात होत असते.

श्रीअभिनवगुप्तपादाचार्य यांनी यावरील टीकेत असे म्हटले आहे की -

**मध्यमे तु रूपे "अहमिदम्" इति समधृत तुलापुटन्यायेन यो विमर्शः।।**

**अर्थ :-** मध्यरूपाने "अहमिदम्" अर्थात् "मी हे जगत् आहे," या समधृततुलापुटन्यायाने म्हणजे वजनकाट्यातील दोन्ही तागड्या या सम असलेल्या न्यायाने विमर्श होत असतो किंवा ज्ञान होत असते.

या अवस्थेत अहम् अर्थात् मी आणि इदम् किंवा विश्व हे भिन्न भासले तरी विश्व हा माझाच भाग आहे अशी भेदाभेद विमर्शनात्मक अवस्था असते. या अवस्थेत "**अहम्**" म्हणजे "**मी**" आणि "**इदम्**" म्हणजे "**विश्व**" अशी परस्पर संबंधांची वास्तव अनुभूती असल्यामुळे हिला "सद्विद्या" किंवा "शुद्धविद्या" म्हटले आहे. या दशेत क्रियाशक्ती ही प्रबळ असते. ही पर (उच्च) व अपर (खालची) अशी दोहोमधील अवस्था असल्यामुळे हिला परापरदशा असे म्हणतात.

सारांश, विमर्श किंवा वैश्विक अनुभूती या पाच तत्त्वांमध्ये कशी होते हे लक्षणीय आहे.

**(१) व (२) श्रीशिवतत्त्व** :- अहंविमर्श म्हणजे "**सर्वम् अहम्**" अर्थात् "मीच सर्व आहे," ही अनुभूती होय. श्रीशिव व शक्ती भिन्न नसल्यामुळे

शक्तितत्त्वाचा यातच समावेश होतो.

**(३) श्रीसदाशिव (सादाख्य) :-** अहम्-इदम् विमर्श. अहम्‌ची मुख्य विशेष अनुभूती व इदम्‌ची किंवा विश्वाची फक्त जाणीव याला श्रीसदाशिव किंवा सादाख्यतत्त्व असे म्हणतात.

**(४) श्रीईश्वरतत्त्व :- "इदम्-अहम् विमर्श"** किंवा **"इदम्"**ची किंवा विश्वाची अधिक जाणीव याला श्रीईश्वरतत्त्व असे म्हणतात.

**(५) शुद्धविद्या किंवा सद्विद्या :- "अहम् अहम्"** आणि **"इदम्-इदम्"** अर्थात् मी व विश्व यांची होणारी समान जाणीव याला शुद्धविद्या किंवा सद्विद्या असे म्हणतात. या अवस्था श्रीशिवांचे स्वरूप झाकीत नाहीत किंवा तिरोधान करीत नाहीत. या सर्वांना मिळून शुद्धाध्वन् किंवा शुद्धमार्ग असे म्हटले आहे.

## अशुध्दाध्वन् (६ ते ११)

यातील सहा ते अकरा तत्त्वे म्हणजे माया व तिची पाच कंचुके आहेत. या तत्त्वांमुळे परम श्रीशिवांच्या स्वरूपाचे तिरोधान होते व त्यांच्या शक्तीचा संकोच होतो म्हणून या तत्त्वांना अशुद्धाध्वन् किंवा अशुद्ध मार्ग असे म्हटले आहे.

**(६) माया :-** "**त्रिकशास्त्र**" हे मायातत्त्वाला सत्य मानते. श्रीशांकराद्वैताप्रमाणे मिथ्या मानीत नाही. "**माया**" हा शब्द "**मा**" किंवा मापणे यापासून बनलेला असून अमेय असलेली श्रीशिवांची अनुभूती माये-मुळे मेय किंवा मर्यादित होते म्हणून या तत्वाला माया असे म्हटले आहे.

श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीषट्त्रिंशत्संदोहकारिका**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**माया विभेदबुद्धिर्निजांशजातेषु सकलजीवेषु।।**

**अर्थ :-** माया ही अहम् पासून इदम् किंवा विश्व हे वेगळे करतेच पण इदम् मधील वस्तू-वस्तूंमध्ये भिन्नता निर्माण करते.

श्रीअभिनवगुप्तपादाचार्य यांनी "**श्रीतंत्रसार**" या ग्रंथामध्ये याविषयी असे म्हटले आहे की -

**अवभासकारिणी च परमेश्वरस्य माया नाम शक्तिः।।**

**अर्थ :-** अवभासन किंवा प्रकाशन करणारी श्रीपरमेश्वराची माया नावाची शक्ती आहे.

श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीपराप्रावेशिका**" या ग्रंथात याविषयी असे

म्हटले आहे की -

**स्वस्वरूपेषु भावेषु भेदप्रथा माया।।**

**अर्थ :-** जरी चिद्रूपाने पदार्थ (भाव) एकमय असले तरी त्यांचे ते एकत्व स्वरूप झाकून अर्थात् तिरोधान करून ते भिन्न आहेत, असे माया भासविते.

कला, विद्या, राग, काल आणि नियती ही मायेची पाच कंचुके असून ती आत्म्यावर आवरण घालून व त्याला स्वभावविस्मृती करवून त्याच्या असीम अशा सामर्थ्यावर मर्यादा घालतात. ती तत्त्वे पुढीलप्रमाणे आहेत.

**(७) कला :-** श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीषट्त्रिंशतत्त्वसंदोह**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**तत् सर्वकर्तृता सा सङ्कुचिता कतिपयार्थमात्रपरा।**
**किञ्चित्कर्तारममुं कलयन्ती कीर्त्यते कला नाम।।**

**अर्थ :-** श्रीपरमेश्वराच्या सर्व कर्तृत्वादि शक्ती असंकुचित असूनसुद्धा संकुचित झाल्याने कला, विद्या, राग, नियती इत्यादिरूप होतात. त्या श्रीपरमेश्वराच्या किंचित् कर्तृत्वाला कला असे म्हणतात.

कला ही परम श्रीशिवांचे किंवा आत्म्याचे मूळचे सर्वकर्तृत्व किंवा कर्तुम्-अकर्तुम्-अन्यथाकर्तुम् शक्ती झाकून आत्म्याच्या कर्तृत्वावर मर्यादा घालते. (Principles limited to individual subject-object)

**(८) विद्या :-** चिच्छक्तीच्या किंवा आत्म्याच्या सर्वज्ञत्वावर आवरण घालून विद्या ही शक्ती आत्म्याला अल्पज्ञ बनविते.

**(९) राग :-** आत्मा हा पूर्णत्वामुळे नित्यतृप्त असतो; परंतु रागरूपी कंचुक आत्म्याच्या ठिकाणी निरनिराळ्या वस्तूंबद्दल इच्छा किंवा हाव निर्माण करून भोगात रमविते.

**(१०) काल :-** आत्मतत्त्व हे नित्य असते. त्याच्यावर कालदृष्ट्या मर्यादा घालून वर्तमान, भूत आणि भविष्य हे नियतभेद निर्माण होतात.

**(११) नियती :-** चिच्छक्तीचे किंवा आत्म्याचे स्वातंत्र्य किंवा व्यापकत्व मर्यादित करून दिशा (space) व कार्यकारणभावाच्या मर्यादा घालणे याला नियती असे म्हणतात.

## व्यक्तिमर्यादिततत्त्वे (१२ व १३)

**(१२) पुरुष :-** ज्यावेळी श्रीपरमेश्वर आपल्या मायाशक्तीने संकुचितता धारण करतो त्यावेळी त्याला "पुरुष" असे म्हणतात. परम श्रीशिवावस्थेतील

त्याच्या पूर्णत्व, सर्वज्ञत्व, सर्वकर्तृत्व इत्यादि शक्ती संकोच पावून त्याच्या ठिकाणी किञ्चिज्ञत्व व किंचित् कर्तृत्व येते. पूर्णत्वाच्या अभावामुळे व परिमितत्वामुळे त्याला अणू असे म्हणतात. अणू या शब्दात जागा किंवा परिमाण अभिप्रेत नाही.

**(१३) प्रकृती :-** सांख्यशास्त्राप्रमाणे श्रीशैवदर्शनात जरी प्रकृती तत्त्व मानले असले तरी यात प्रत्येक पुरुषाला स्वतंत्र प्रकृती असते व मोक्षकल्पनेच्या संदर्भात तेच संयुक्तिक आहे. सद्विद्येतील अहमिदमस्मि या जाणिवेतील पुरुष भोक्ता असून प्रकृती भोग्य आहे.

श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीपराप्रावेशिका**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**गुणानामविभागावस्था प्रकृतितत्त्वम्।।**

**अर्थ :-** प्रकृती ही महत् पासून पृथ्वी अखेरच्या सर्व तत्त्वांचे मूळ व सत्त्व, रज आणि तम या गुणांची साम्यावस्था आहे.

## मानसिक क्रियात्मक तत्त्वे (१४ ते १६)

### अंतःकरण

अंतःकरण म्हणजे अंतर्गत इंद्रिय किंवा व्यक्तीची मानसिक व्यापार-यंत्रणा तसेच सुखदुःखादि जाणीव आत ग्रहण करण्याचे सामर्थ्य होय.

**(१४) बुद्धी :-** "**श्रीअनुत्तरप्रकाशपंचाशिका**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**बुद्धिरध्यवसायस्य कारणं निश्चितात्मनः।।२७।।**

**अर्थ :-** ही ज्ञानशक्ती असून ती हे अमुक आहे व अमुक नाही असा निश्चय करते.

श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीपराप्रावेशिका**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**निश्चयकारिणा विकल्प-प्रतिबिम्बसारिणी बुद्धिः।।**

**अर्थ :-** ही निश्चयकारिणी असून विकल्पाचे प्रतिबिंब ग्रहण करण्याला योग्य असते.

ही सत्त्वप्रधान असून विश्वाचे प्रतिबिंब ग्रहण करण्याला समर्थ असते. प्रकृतीत पुरुष हा निद्रितावस्थेत असल्याप्रमाणे स्वतःला जणू विसरतो. तो जागा झाल्यावर जी सत्ता मात्र आहे किंवा केवळ अस्तित्वाची जी जाणीव आहे ती बुद्धी होय. "**बुध्**" या धातूचा अर्थ जाणणे किंवा जागृत होणे असा

आहे. "**सत्त्व**" आणि "**सत्ता**" हे समानार्थी शब्द आहेत.

**(१५) अहंकार :-** श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीपराप्रावेशिका**" या ग्रंथा-मध्ये अहंकाराविषयी असे म्हटले आहे की -

**अहङ्कारो नाम ममेदं न ममेद्मित्यभिमानसाधनम्।।**

**अर्थ :-** पुरुषाला जागृतीनंतर अस्तित्वाच्या सामान्य जाणिवेनंतर "मी अमुक आहे" अशी विशेष प्रकारची जाणीव होऊन "हे माझे आहे" आणि "हे माझे नाही" असे ममत्व किंवा अभिमान जाणवतो तो अहंकार होय.

ही जाणीव ही श्रीईश्वराच्या इच्छाशक्तीचे किंवा प्रकृतीच्या रजोगुणाचे प्राधान्य असणारी अनुभूती होय. अहंकारात रजोगुणाचा प्रभाव अधिक असला तरी सत्त्व आणि तमस् हे गुण त्याच्याठिकाणी असतातच.

**(१६) मन :-** हे तत्त्व अहंकारापासून आविष्कृत होते. इंद्रियांच्या द्वारा होणारे बाह्य वस्तूंचे आकलन, त्या आकलनाचे संकलन आणि त्यांचा स्वत:शी कितपत संबंध आहे हे निश्चित करण्यासाठी अहंकाराकडे संक्रमण हे मनाचे कार्य आहे. मनामुळे संकल्प व विकल्प निर्माण होतात. बुद्धि-तत्त्वाचा प्रकाश अहंकारापर्यंत पोहोचतो. तो मनापर्यंत न पोहोचल्यामुळे मन हे अंधारात असल्यासारखे तमोमय असते व त्यामुळे मनाची क्रियाशक्ती ही तम:परिणामिनी असते.

याविषयी "**श्रीअनुत्तरप्रकाशपंचाशिका**" या ग्रंथामध्ये असे म्हटले आहे की -

**सङ्कल्पस्य विकल्पस्य बीजं मन उदीर्यते।।**

**अर्थ :-** संकल्प आणि विकल्प यांचे बीज मनात उद्भूत होते.

## इंद्रियानुभूतीची तत्त्वे (१७ ते ३१)

**(१७-२१) ज्ञानेंद्रिये :-** येथे इंद्रिये या शब्दाचा अर्थ इंद्रियातील विशिष्ट ग्रहणशक्ती असा आहे. श्रवणेंद्रिय, स्पर्शेंद्रिय, चक्षुरिंद्रिय, रसनेंद्रिय व घ्राणेंद्रिय ही पाच ज्ञानेंद्रिये किंवा बुद्धींद्रिये आहेत.

**(२२-२६) कर्मेंद्रिये :-** ज्यांच्याकडून बोलणे, चालणे इत्यादि क्रिया होतात त्या विशिष्ट शक्ती म्हणजे कर्मेंद्रिये होत. ही अहंकारापासून निर्माण होतात. वागिंद्रिय (कार्य-बोलणे), हस्तेंद्रिय (कार्य-पकडणे-लिहिणे), पादेंद्रिये (कार्य-चालणे) पाय्विंद्रिय (कार्य-मलविसर्जन-विसर्ग) व उपस्थेंद्रिय (कार्य-लैंगिकक्रिया) ही पाच कर्मेंद्रिये आहेत.

**(२७-३१) तन्मात्रा :-** तत्-मात्र म्हणजे फक्त तेच, तेव्हढेच व काही कमी अधिक नसलेले होय. इंद्रिय संवेदनांची (sense-perception) मूलभूत तत्त्वे पुढीलप्रमाणे आहेत.

(१) शब्दतन्मात्र (२) स्पर्शतन्मात्र (३) रूपतन्मात्र (४) रसतन्मात्र (५) गंधतन्मात्र या पाच तन्मात्रा आहेत.

पंचतन्मात्रा या जरी अत्यंत सूक्ष्म असल्या तरी या तन्मात्रांपासून स्थूल किंवा जड पंचमहाभूते निर्माण होतात.

## जड तत्त्वे - पंचमहाभूते (३२ ते ३६)

वरील तन्मात्रांपासून अनुक्रमे आकाश, वायू, तेज किंवा अग्री, आप आणि पृथ्वी ही पंचमहाभूते निर्माण होतात.

"**श्रीपरात्रिंशिका**" या ग्रंथामध्ये श्रीअभिनवगुप्तपादाचार्य यांनी या तत्त्वांविषयी असे म्हटले आहे की -

**यथा न्यग्रोधबीजस्थः शक्तिरूपो महाद्रुमः।**
**तथा हृदयबीजस्थं विश्वमेतच्चराचरम्।।२४।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे न्यग्रोध अर्थात् वटवृक्षाच्या बीजामध्ये अंकुर, पत्र आणि फळ असलेला शक्तिरूप मोठा वृक्ष सामावलेला असतो त्याप्रमाणे परम श्रीशिवांच्या हृदयबीजात हे चराचर विश्व सामावलेले असते.

श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीपराप्रावेशिका**" या ग्रंथाच्या समारोपात याविषयी असे म्हटले आहे की, या तत्त्वांचे उत्पत्ती, स्थिती व लयस्थान विश्वमय व विश्वोत्तीर्ण परम श्रीशिवच आहेत.

या श्रीशैवतत्त्वांवर सांख्यतत्त्वांची छाप आहे हे स्पष्ट आहे.

## पाश अर्थात् बंध किंवा मल

पाश, बंध अथवा मल ही यानंतरची महत्त्वाची संकल्पना आहे. आत्म्याच्या ठायी परम श्रीशिवांप्रमाणे अमर्याद शक्ती असते. या शक्तीला बंधन पडून आत्म्याला अणुत्व येते याचे कारण अज्ञान हे आहे. याला श्रीशैवशास्त्रात मल किंवा बंध असे म्हणतात.

"**श्रीतंत्रसार**" या ग्रंथात श्रीअभिनवगुप्तपादाचार्य यांनी असे म्हटले आहे की -

**अज्ञानं किल बन्धहेतुरुदितः शास्त्रे मलं तत्स्मृतम्।।**

**अर्थ :-** अज्ञान हेच बंधाचे कारण आहे असे शास्त्रामध्ये म्हटले आहे. यालाच "मल" असे म्हणतात.

बंध म्हणजेच पाश होय. पाशाने जो बद्ध होतो त्याला पशू असे म्हणतात. सर्व पाशांच्या अतीत सर्व पशूंवर सत्ता चालविणाऱ्याला पती किंवा परम श्रीशिव असे म्हणतात. पती, पशू व पाश या त्रयीवरून काश्मीरी दर्शनाला "त्रिकशास्त्र" किंवा "शासन" असे म्हणतात. श्रीअभिनवगुप्तपादाचार्य यांनी **"श्रीतंत्रसार"** या ग्रंथामध्ये म्हटल्याप्रमाणे अज्ञानाला त्रिकशास्त्रात मल अशी संज्ञा आहे; परंतु या शास्त्रात जीवाचे अज्ञान म्हणजे जड पदार्थाप्रमाणे संपूर्ण ज्ञानाभाव नसून अपूर्ण किंवा किंचित् ज्ञान आहे. या मलांपैकी एक अनादि जन्मजात पण शेवट होणारा सान्त मल आहे. परम श्रीशिवांच्या इच्छेने निर्माण झालेल्या या मलाने जीवाच्या मूळच्या परम श्रीशिवावस्थेतील पूर्णत्वाला मर्यादा पडल्यामुळे परिमितत्व अर्थात् अणुत्व येते. आणवमल, कार्ममल आणि मायीयमल असे पाशांचे किंवा मलांचे तीन प्रकार आहेत.

### (१) आणवमल

जीवाला "अणू" असे म्हणतात. या संज्ञेत जीवाची व्याप्ती किंवा स्थळमर्यादा अभिप्रेत नसून ज्ञानमर्यादा अभिप्रेत आहे. या मलाने जीवाला अणुत्व आल्याने या मलाला आणवमल असे म्हणतात. या मलामुले जीवाच्या ज्ञानशक्ती आणि क्रियाशक्ती मर्यादित होतात.

### (२) कार्ममल

आणवमलामुळे जीवाच्या ज्ञान व क्रिया या दोन्ही शक्ती मर्यादित झाल्यामुळे त्याची इच्छाशक्तीही मर्यादित होते. विश्वाच्या उत्पत्तीपूर्वी ही इच्छाशक्ती विषयशून्य किंवा objectless असते. सर्व जीवांना आपली मर्यादित क्रियाशक्ती वापरण्याची इच्छा असते. विश्वनिर्मितीनंतर इच्छापूर्तीसाठी जीवाला योग्य शरीर मिळते व संसार सुरू होतो. कर्म करण्याची पण मर्यादित असलेली इच्छा म्हणजेच कार्ममल होय. हा मल कर्मसंस्कारापेक्षा भिन्न आहे. काया, वाचा आणि मन यांनी केलेल्या कर्मांचे जीवावर होणारे परिणाम म्हणजे कर्मसंस्कार होय. कार्ममल ही विषयशून्य objectless असलेली मर्यादित इच्छाशक्ती असून तिचे अस्तित्व आणवमलावर अवलंबून आहे.

### (३) मायीयमल

माया ही जीवाचे मूळचे ज्ञान आणि सामर्थ्य मर्यादित करते. माया आणि तिची पाच कंचुके यांनी आत्म्याचे मूळ ज्ञान झाकले जाते आणि त्याला स्वतःला आपण निराळे व इतर जीव निराळे तसेच आपल्यापेक्षा इतर वस्तू निराळ्या अशी भेद पाहण्याची वृत्ती म्हणजे शरीरभुवनाकाराची प्रतीती येते.

"**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात श्रीअभिनवगुप्तपादाचार्य यांनी याविषयी असे म्हटले आहे की -

**शरीरभुवनाकारो मायीयः परिकीर्तितः।।१.५६।।**

**अर्थ :-** शरीर व भुवनाकाराची प्रतीती मायीय मलामुळे येत असते. जीवाला या भेदबुद्धीमुळे सुखदु:ख आणि पुनर्जन्म यांची प्राप्ती होते.

## मोक्ष

वर जरी बंधाची अथवा मलाची चर्चा केली असली तरी त्रिकशास्त्राच्या मतानुसार बंधाला वस्तुस्थितीत अस्तित्वच नसते तेव्हा अस्तित्वात नसलेल्या बंधापासून मुक्तता कोठून होणार?

श्रीसोमानंदाचार्यांनी "**श्रीशिवदृष्टी**" या ग्रंथामध्ये याविषयी असे म्हटले आहे की -

**बन्धमोक्षौ न भिद्येते सर्वत्रैव शिवत्वतः।**
**सैवेषा सा च संसारो बन्धमोक्षावतः स्थितौ।।**
**प्रतीतिमात्रमेवात्र तावता बन्धमोक्षता।**
**तदात्मत्वे नास्ति बन्धस्तदभावान्न मोक्षता।।३.६८,६९,७०,७२।।**

**अर्थ :-** सर्वत्र श्रीशिवरूप असल्यामुळे बंध आणि मोक्ष यात कोणताही फरक नाही. मोह आणि अज्ञान यांमुळे संसारी जीवांना बंध आणि मोक्ष वाटतात. जर बंध हाच खरा नाही तर मग मोक्षाचे अस्तित्व कसे शक्य आह? आत्म्याच्या ठिकाणी बंधही नाही आणि मोक्षही नाही.

संत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीअनुभवामृत**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**म्हणोनि बंधचि तव वावो।**
**मा मोक्षा के प्रसवो।।३.१५।।**

**अर्थ :-** जर बंध हाच खरा नाही तर मग मोक्षाचे अस्तित्व कसे शक्य आहे?

संत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी बंध आणि मोक्ष हे मिथ्या आहेत असे म्हणताना काश्मीरी श्रीशैवमताचा पुनरुच्चार केलेला आहे. श्रीउत्पलपादाचार्य यांनी "**श्रीप्रत्यभिज्ञाहृदय**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की, मोक्ष म्हणजे स्वतःच्या नैसर्गिक मूळ स्वरूपाची फेरओळख होय.

श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथामध्ये याविषयी असे म्हटले आहे की -

**मोक्षा हि नाम नैवान्यः स्वरूपप्रथनं हि तत्।**
**स्वरूपपञ्चात्मनः संवित् नान्यत्............।।**

**अर्थ :-** मोक्ष म्हणजे दुसरे तिसरे काहीही नसून आत्म्याला स्वस्वरूपाचा किंवा आपणच परासंवित् किंवा पराशक्ती असल्याचा जो साक्षात्कार होतो त्याला "मोक्ष" असे म्हणतात.

"**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात श्रीअभिनवगुप्तपादाचार्य यांनी घट-कुंभ या अर्थाचे शब्द सांगताना असे म्हटले आहे की -

**अस्यां भूमौ सुखं दुःखं बन्धो मोक्षश्चितिर्जडः**
**घटकुम्भवदेकार्याः शब्दाः।।२.१०।।**

**अर्थ :-** असा साक्षात्कार झाल्यावर सुख-दुःख, बंध-मोक्ष, चिती-चित्-चैतन्य आणि जड हे घट-कुंभ याप्रमाणे एकाच अर्थाचे शब्द आहेत. संत श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा या मताशी विरोध नाही.

## अनुग्रह अथवा शक्तिपात

या श्रीशैवमताप्रमाणे केवळ बुद्धिवादाने तर्काने किंवा शब्दज्ञानाने मोक्ष-प्राप्ती होत नाही. त्यासाठी अनुग्रहाची किंवा शक्तिपाताची आवश्यकता आहे असे मानतात.

"**कठोपनिषद्**" आणि "**मुंडकोपनिषद्**" या ग्रंथांमध्ये याविषयी असे म्हटले आहे की -

**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो**
**न मेधया न बहुना श्रुतेन।**
**यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा**
**विवृणुते तनु स्वाम्।।कठ. १.२.२३।। मुंड. ३.२.३।।**

**अर्थ :-** आत्मा हा प्रवचनाने किंवा फार शास्त्राध्ययनाने किंवा धारणा-शक्तीने किंवा अधिक श्रवण करण्याने मिळू शकत नाही. हा विद्वान् ज्या परमात्म्याच्या प्राप्तीची इच्छा करतो त्या इच्छेच्या द्वाराच त्याची प्राप्ती होऊ शकते. आत्मा हा त्याच्याकडे आपले स्वरूप व्यक्त करीत असतो.

श्रीईश्वरीकृपेने जीवाला अध्यात्मज्ञान होते. केवळ मानवी कर्तृत्वाने मोक्षप्राप्ती होत नाही. श्रीसद्गुरू हेच या श्रीईश्वरी अनुग्रहाचे माध्यम असल्यामुळे संत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी व इतर सर्व संतांनी श्रीगुरुमाहात्म्य वर्णन केलेले आहे. श्रीनिवृत्तिनाथमहाराज हे श्रीसद्गुरुत्वाचे प्रतीक आहेत. ज्यावेळी श्रीज्ञानेश्वरमहाराज हे त्यांच्या स्तुतीसाठी आदर, श्रद्धा इत्यादि भावना उचंबळून

येऊन लिहितात त्यावेळी तो श्रीनिवृत्तिनाथमहाराजांचा गौरव तर आहेच; पण तो श्रीसद्गुरू या श्रीईश्वरी प्रतिनिधीचा गौरव आहे.

अनुग्रह किंवा शक्तिपात होण्यासाठी सध्या रूढ असलेल्या अर्थी दीक्षेची आवश्यकता असतेच असे नाही. या त्रिकमतानुसार **"दीक्षा"** म्हणजे श्रीसद्गुरूंकडून मंत्र घेणे इतकाच नाही.

**"श्रीतंत्रालोक"** या ग्रंथामध्ये याविषयी असे म्हटले आहे की -

**दीयते ज्ञानसद्भाव: क्षीयते पशुबन्धना।**
**दानक्षपणसंयुक्ता दीक्षा तेनेह कीर्तिता।।**

**अर्थ :-** ज्या कृत्यामुळे आध्यात्मिक ज्ञान दिले जाते व आणवमल नामक पशुत्वाचे बंधन होणारे जन्मजात अज्ञान नाहीसे होते त्याला दीक्षा असे म्हणतात.

शक्तिपाताचे तीव्र, मध्यम आणि मंद असे तीन प्रकार आहेत. पूर्वजन्मांच्या संस्कारामुळे ज्यांची बरीच आध्यात्मिक प्रगती झालेली असते त्यांच्यावर तीव्र शक्तिपात होऊन फारशी साधना न करता त्यांना मोक्ष मिळतो. ज्यांनी इतकी प्रगती केली नसेल ते शक्तिपाताला योग्य लोक श्रीसद्गुरूंकडे जाऊन दीक्षा घेऊन योगाभ्यास करून मोक्ष मिळवतात. ज्यांची फारशी आध्यात्मिक प्रगती झालेली नाही त्यांच्यावर मंदशक्तिपात होतो, त्यांच्या ठिकाणी आध्यात्मिक ध्यानधारणा करण्याची आवड निर्माण होते व कालांतराने तेही प्रगती करीत करीत मोक्षाप्रत जातात.

## उपाय

श्रीईश्वरी अनुग्रहाशिवाय मोक्षप्राप्ती नाही हे जरी खरे असले तरी माणसाला आध्यात्मिक प्रगतीसाठी प्रयत्न करावे लागतात. या प्रयत्नांना उपाय असे म्हणतात. अनुपाय, शांभवोपाय, शाक्तोपाय आणि आणवोपाय असे चार प्रकारचे उपाय आहेत.

**(१) अनुपाय :-** "अनुपाय" या शब्दातील "अन्" या शब्दाचा अर्थ किंचित् अर्थात् ईषत् असा आहे. उदा. "अनुदरा कन्या" या शब्दाचा अर्थ पोट नसलेली कन्या असा नसून जिचे पोट सुटलेले नाही अशी मर्यादित उदर असलेली मुलगी असा आहे. अनुपायामध्ये मंत्र, दीक्षा, पूजा, ध्यान, हे करावे किंवा हे करू नये असे कोणतेही विधिनिषेध नसतात. केवळ श्रीसद्गुरूंचे वचन ऐकून श्रीसद्गुरूंच्या दृष्टिपाताने किंवा श्रीसद्गुरूंशिवाय स्वतंत्रपणे तीव्र शक्तिपात होऊन ते श्रीपरमेश्वराने झपाटले जाऊन त्यांचे व्यक्तित्त्व (Individul

consciousness) परम श्रीशिवांमध्ये विलीन होते.

"**श्रीशिवसूत्रे**" हा योगमार्गावरील सूत्रग्रंथ अनुपायाची चर्चा करीत नाही. "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात केवळ शांभवोपाय, शाक्तोपाय आणि आणवोपाय यांची चर्चा केलेली आहे. मी सूत्रकारांच्या अनुक्रमाप्रमाणे जरी विवेचन केलेले असले तरी प्रथम वाचताना आणवोपाय, शाक्तोपाय आणि शांभवोपाय या चढत्या आध्यात्मिक प्रगतीच्या पायऱ्या अथवा उपाय वर्णन केलेले विभाग वाचले तर सोयीस्कर होईल.

**(२) शांभवोपाय :-** श्रीईश्वराद्वयवादी काश्मीर शैवमताच्या तात्त्विक विवेचनात पती, पशू व पाश या तीन पदार्थांचा अथवा तत्त्वांचा विचार करणारे हे मत आहे. यामुळे याला त्रिकशैवमत असे म्हटले आहे. या मताचे उद्गाते श्रीवसुगुप्तपादाचार्य यांच्या मतानुसार आत्मा किंवा सत्ता हेच सत्-तत्त्व असून तेच चैतन्य किंवा सर्व ज्ञानक्रिया यांच्या बाबतीत परिपूर्ण व स्वतंत्र आहे. चैतन्य हाच आत्मा असून हीच सत्ता आहे, असे श्रीवसुगुप्तपादाचार्य यांनी म्हटले आहे. आत्म्याच्या ठिकाणी केवळ ज्ञान किंवा प्रकाश किंवा श्रीशिव आणि क्रिया किंवा विमर्श किंवा शक्ती नसून तो आनंदमय आहे. वस्तू सत् असल्याखेरीज तिच्या ठिकाणी चित् किंवा चैतन्य आणि आनंद असणार नाही. यासाठी सत् ला चिदानंदघन असे म्हणतात. त्याच्या ठिकाणी वैश्विक "मी"त्वाची जाणीव असल्यामुळे या जाणिवेतून विश्वातील सर्व वस्तू प्रकट होतात.

सारांश, चैतन्य हाच आत्मा असून हीच सत्ता आहे हे या तत्त्वज्ञानाचे आधारभूत सूत्र आहे. भाषेच्या सोयीसाठी आत्म्यालाच श्रीशिव असे म्हणतात.

येथे प्रश्न असा आहे की, श्रीशिव हे जर आनंदमय व सर्वज्ञानक्रियास्वतंत्र आहेत तर श्रीशिवस्वरूप जीव हा ज्ञान आणि क्रिया यांवर मर्यादा असणारा आणि सुखदुःखे भोगणारा का असतो? श्रीवसुगुप्तपादाचार्यांच्या मते जीवाच्या ठिकाणी संकुचित ज्ञान असते. जे आत्मा नाही त्या शरीराला तो आत्मा मानून त्याच्याबद्दल अभिमान धरतो. हे त्याचे अल्पज्ञान आहे. हे जीवाच्या मर्यादित स्वातंत्र्याचे व सुखदुःखादि भोगाचे कारण आहे. यावर असाही प्रश्न विचारला जातो की, श्रीशिव आणि जीव हे मूलतः एकाच स्वभावाचे असताना एक सर्वज्ञ आणि एक अल्पज्ञ असा फरक का पडतो? याचे कारण असे आहे की, श्रीशिव हे आपल्या इच्छास्वातंत्र्याने विश्वनिर्मितीची क्रीडा करण्यासाठी आपल्या "महामाया" नामक गोपनशक्तीने स्वतःला झाकून घेतात.



झाकणे किंवा लपवणे हे या शक्तीचे कार्य आहे. श्रीशिवांसारखेच ज्ञान व क्रिया असणाऱ्या शक्ती या श्रीशिवांना झाकून टाकीत असल्यामुळे संपूर्ण ज्ञान राहत नाही. जे राहते ते किंचित् ज्ञान असून हे किंचित् ज्ञान "मी निराळा" आणि "विश्व माझ्याहून निराळे" असे भासविते. श्रीशिवांच्या पिधान शक्तीमुळे किंवा महामायेमुळे जीवाचे ज्ञान मर्यादित होते व ज्ञानदृष्ट्या त्याला अणुत्व येते. हा अणुत्व आणणारा "आणवमल" अनादि पण सांत आहे. **"श्रीशिवसूत्रे"** या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**नित्योदितनिजाभासस्फुरत्तानिह्नुतात्मने।**
**शिवाय परिपूर्णैकचिद्रूपवपुषे नमः।।२।।**

**अर्थ :-** नित्य उदय पावणारे निजाभासरूप जे स्फुरण त्या स्फुरणाने "स्व" स्वरूपाला झाकून टाकणाऱ्या व पूर्ण चैतन्य हेच ज्यांचे शरीर आहे अशा श्रीशिवांना माझा नमस्कार असो. सतत प्रसरण पावणाऱ्या स्फुरत्तेने जरी श्रीशिवस्वरूप झाकले गेले तरी संकुचित अणु-आत्मरूपाचे प्रकटन होते वस्तुतः त्या अवस्थेतही पूर्णसच्चिद्घन भावाचा लोप अथवा हानी होत नाही.

याशिवाय जीव हा श्रीशिवांपेक्षा अन्य दोन मलांनी किंवा पाशांनी व्यापलेला असतो. विश्वाचे कारण असलेल्या मायेने पंचमहाभूतादि तत्त्वांच्या समुदायाने जीवाला व्यापलेले असते. हा मायेपासून झालेला मायीयमल आहे. याशिवाय त्याच्या ठायी आलेली जगातील वस्तुजात भिन्न भिन्न आहेत ही जाणण्याची क्रिया आहे. यामुळे जीव "हे हवे" "ते नको" अशा क्रिया करतो व या कर्माचे संस्कार किंवा वासना निर्माण होतात. ज्या मलामुळे जीव क्रमपाशात गुरफटतो त्या मलाला कार्ममल किंवा कर्मापासून उत्पन्न होणारा मल असे म्हटले आहे.

सारांश, विश्वनिर्मितीची क्रीडा करण्याची इच्छा झालेल्या श्रीशिवांनी एका अर्थी स्वतःसारख्या असणाऱ्या जीवाला आणव, मायीय आणि कार्ममलात किंवा पाशात गुंतविले व जीव हा पाशबद्ध पशू झाला. श्रीशिवस्वरूप न झालेले आब्रह्मस्तंबापर्यंत किंवा श्रीब्रह्मदेवापासून ते तृणापर्यंत सर्व पशू असतात.

आपणा सर्वांना होणारे ज्ञान हे शब्दांमार्फतच व्यक्त होते. श्रीवरदराजाचार्य या **"श्रीशिवसूत्रे"** या ग्रंथाच्या टीकाकारांनी याविषयी असे म्हटले आहे की, सर्व ज्ञान शब्दांनी अनुविद्ध अर्थात् शब्दात सामावलेले असते. हे सर्व शब्द अक्षरांचे बनलेले असतात. श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य यांनी असे म्हटले आहे

की, वर्ण किंवा मूळाक्षरे उच्चारण्याला लागणारी जी शब्दशक्ती आहे ती आपल्या ज्ञानाची बैठक म्हणजे अधिष्ठान किंवा मूलभूत आधार असल्यामुळे त्या ज्ञानाची माता किंवा मातृका आहे. तंत्रशास्त्रात "अ" पासून "क्ष" पर्यंतच्या मूळाक्षरांचे किंवा वर्णांचे वर्ग किंवा गट लक्षात घेऊन त्यांच्या अधिष्ठात्या श्रीमहालक्ष्मी, श्रीब्राह्मी, श्रीमाहेश्वरी इत्यादि नावे असलेल्या शक्ती मानल्या आहेत. हे श्रीशैवमत एक आगमाधिष्ठित तंत्र असल्यामुळे श्रीवसुगुप्त-पादाचार्यांनी मातृकासंकल्पनेचा स्वीकार केलेला आहे. या मातृकांमुळे मिळालेली ज्ञाने बहिर्मुख असल्यामुळे या मातृका बंध निर्माण करतात. **(पाहा :- वृत्ती व श्रीवरदराज श्रीशिवसूत्रे १.४)**

या मातृकांच्या किंवा कलांच्या किंवा शक्तिसमूहाच्या ताब्यात गेलेला आत्मा हा मूळचा श्रीशिवस्वरूप असला तरी पशू होतो. श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य यांनी "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**शब्दराशिसमुत्थस्थ शक्तिवर्गस्य भोग्यताम्।**
**कला विलुप्ताविभवो गतः सन् स पशुः स्मृतः ।।३.१३।।**

**अर्थ :-** शब्दराशीपासून अर्थात् "अ"कारापासून "क्ष"कारापर्यंतच्या वर्णसमुदायापासून निर्माण होणाऱ्या श्रीब्राह्मी, श्रीमाहेश्वरी इत्यादि देवता-समूहांच्या वशीभूत असलेल्या स्वतंत्र पतिप्रमात्याला किंवा श्रीपरमेश्वरालाच किंवा श्रीशिवांनाच "पशुप्रमाता" अर्थात् जीव असे नाव दिलेले आहे. पशुप्रमाता या कलासमूहाला वश होण्यामागील कारण असे आहे की, कला समूहाने श्रीपरमेश्वराच्या असीम वैभवाला किंवा स्वातंत्र्याला पूर्णपणे नष्ट-भ्रष्ट केलेले असते. जेव्हा जीवाला आपल्या श्रीशिवत्वाची जाणीव होते तेव्हा त्याच्यावर सत्ता गाजवणाऱ्या या शक्ती त्याच्या मदतनीस होतात.

जीवाला स्वतःच्या श्रीशिवत्वाची जाणीव होण्याचा किंवा ओळख पटण्याचा उपाय कोणता आहे? श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात उत्तम, मध्यम व कनिष्ठ अशा अनुक्रमाने तीन उपाय सांगितले आहेत. शांभवोपाय हा यातील सर्वश्रेष्ठ उपाय आहे. यात हठयोगातील आसन, प्राणायामादि कसरत नाही. यात मंत्रजपतपाचे कष्ट नाहीत. हा उपाय किंवा योग इच्छाशक्तीवर अवलंबून असल्यामुळे त्याला इच्छोपाय किंवा इच्छायोग असे म्हणतात. या योगामुळे जीव (मी) आणि श्रीशिव यातील अभेदत्व प्रत्ययाला येत असल्यामुळे याला अभेदोपाय असे म्हटले आहे. या योगामुळे विकल्प नाहीसे होत असल्यामुळे याला "अविकल्प" किंवा "निर्विकल्प"

योग असे नाव आहे. या योगात प्राण, मन किंवा बुद्धी यांचा वापर होत नाही. यामुळे श्रीपातंजलयोगापेक्षा याचे स्वरूप सूक्ष्म व भिन्न आहे.

श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी हा योग "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात "**उद्यमो भैरवः ।।१.५।।**" या दोन शब्दात सांगितला आहे. यातील उद्यम या शब्दाचा अर्थ "प्रयत्न" नसून उद् + यम म्हणजे उन्मज्ज्न किंवा उचंबळून येणे असा आहे. हा योग उन्मज्ज्नरूप असतो. या योगात श्रीशिवत्वाचे आपोआप आतूनच उन्मज्ज्न किंवा उचंबळून येणे होत असते. "**आकिञ्चिच्चिन्तकस्य**" अर्थात् कसलेही चिंतन न करता तीव्र इच्छाशक्तीने श्रीशिवतत्त्वात लीन होणे आणि शब्दातीत असलेल्या सत्तत्त्वाचे ग्रहण होणे अथवा ईश्वरी किंवा शांभव समावेश होणे याला "**शांभव उपाय**" असे म्हणतात. ही अवस्था जपतपादि सायास न करता अनायासे किंवा आपण होऊनच आतून उद्भूत होते. या अवस्थेत द्रष्टा, दृश्य व दर्शन या त्रिपुटीचा लय होतो म्हणून या उपायाला अभेदोपाय असे म्हटले आहे.

या सूत्रात "**भैरव**" हा पारिभाषिक शब्द आलेला आहे. भैरव या शब्दाची निरूक्ती "**भ**" अर्थात् भरण, विश्वाचे पोषण किंवा स्थिती, "**र**" अर्थात् रवण किंवा संहार आणि "**व**" अर्थात् वमन किंवा आतून बाहेर टाकणे अर्थात् सृज् किंवा सृष्टी किंवा उत्पत्ती अशी करून "**भैरव**" म्हणजे उत्पत्ती, स्थिती व लय करणारे श्रीशिवतत्त्व आहे असे म्हटले आहे. हे श्रीशिवतत्त्व आतून उचंबळून येणे हा मातृकाचक्रातून सुटून मातृका आपल्याला साहाय्यभूत होण्याचा मार्ग आहे. आपल्या श्रीभैरवत्वाची आतून जाणीव झाली की, त्या मनुष्याचे मंत्र सिद्ध होतात.

सारांश, शांभव उपायात पुढील गोष्टी महत्त्वाच्या आहेत.

(१) यात श्रीशिवतत्त्वाचे आतून उन्मज्ज्न होते.

(२) यामुळे सर्व कल्पनांचा किंवा संकल्पविकल्पांचा निरास होतो.

(३) हा योग ज्यांचे अंतरंग श्रीभैरवतत्त्वाने भारलेले किंवा व्याप्त आहे अशा साधकांनाच साधतो. ही प्रगत आध्यात्मिक अवस्था श्रीसद्गुरुकृपेने किंवा स्वतः संकल्पविकल्पांवर मात करून प्राप्त होते, असे "**श्रीमालिनी-विजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात सांगितले आहे. स्वतःच्या इच्छाशक्तीने संकल्प-विकल्पांच्या पलीकडे जाऊन श्रीशिवतत्त्वाशी एकरूप होण्याच्या या योग-मार्गाला "**शांभवयोग**" किंवा "**शांभवसमावेश**" असे म्हटले आहे.

श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी वर वर्णन केलेले अकस्मात् साक्षात्कार होण्याची

पूर्वतयारी करण्याचे दोन उपाय किंवा मार्ग सांगितले आहेत. त्यांनी "**श्रीस्पंद-कारिका**" या आपल्या कारिकांमध्ये याविषयी असे म्हटले आहे की -

**एकचिन्ताप्रसक्तस्य यतः स्यादपरोदयः।**
**उन्मेषः स तु विज्ञेयः स्वयं तमुपलक्षयेत्।।४१।।**

**अर्थ :-** आपण एका विचारात गढलो असताना नकळत दुसऱ्या विचाराचा उदय होतो. पहिल्या विचाराचा अस्त आणि दुसऱ्या विचाराचा उदय या दोन विचारांतील संधिक्षणावर किंवा उन्मेषावर अनुसंधान करावे. दुसरा उपाय असा आहे की, सर्व विश्व हा श्रीशिवांच्या शक्तींचा विस्तार आहे. उत्कट एकाग्र जाणिवेने आपण श्रीशिवच आहोत; तेव्हा या शक्ती श्रीशिवांच्या स्वातंत्र्यशक्तीचे प्रकट रूप असल्यामुळे विश्व हे श्रीशिवरूप किंवा आत्मरूप असून आत्मरूपापेक्षा भिन्न नाही असे ज्ञान मुरणे आवश्यक आहे. अशा ज्ञानाने विश्वसंहार होतो. विश्वसंहार म्हणजे विश्व किंवा इदं हे आत्म्यापेक्षा किंवा अहम्पेक्षा निराळे नाही ही जाणीव होय. हा बाह्य जगाचा कल्पान्ती होणारा प्रलय नव्हे.

"**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की, ही अवस्था श्रीसद्गुरूंच्या कृपेने प्राप्त होते आणि अकस्मात् साक्षात्काराची पूर्व तयारी होते.

ज्याच्या ठिकाणी विश्वसंहार होतो त्याच्या ठिकाणी विश्व व आपण एकच आहोत असा साक्षात्कार होऊन त्याला तुर्यावस्थेचा आनंद प्राप्त होतो. तुर्या ही जागृत, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्थांच्या पलीकडील म्हटली तरीही या तिन्ही अवस्थांमध्ये सामावलेली असते. तिच्यामुळे "मी गाढ झोपलो," "मला स्वप्न पडले," असे आपण म्हणू शकतो. ही अवस्था स्वतःसिद्ध असून हिचे उन्मज्जन आतून आपोआप होते.

श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील प्रथमोन्मेषातील सूत्रे ८ ते १० यांमध्ये व त्यांवरील टीकांमध्ये याविषयी सविस्तर चर्चा केलेली आहे ती पाहावी.

**या अवस्थांची लक्षणे पुढील प्रमाणे आहेत :-**

ज्या अवस्थेत इंद्रियांच्या द्वारा बाह्य जगाचे आकलन होते त्या अवस्थेला जागृत अवस्था असे म्हणतात. ज्या अवस्थेत इंद्रियांच्या द्वारा बाह्य जगाशी संबंध न येता केवळ मनोव्यापारांनी संकल्पनात्मक ज्ञान मिळते ती स्वप्न अवस्था होय. ज्या अवस्थेत जाणिवेचा पूर्ण अभाव असतो आणि शरीर व

मन यांचे व्यापार थांबून केवळ श्वासोच्छ्वास चालू असतो अशा गाढ झोपेच्या अवस्थेला सुषुप्तिअवस्था असे म्हणतात.

या तिन्ही अवस्थांना तुर्या ही साक्षिभूत अवस्था आहे. तुर्या ही अत्यंत श्रेष्ठ आणि आनंदमयी अवस्था आहे. जो या अवस्थेतील आनंदाचा उपभोग घेतो तो शक्तिस्वरूप असणाऱ्या इंद्रियांच्या आहारी न जाता त्या शक्तींचा खऱ्या अर्थाने स्वामी बनतो. श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील सूत्रक्रमांक १.१२ मध्ये व त्यावरील टीकेमध्ये याविषयी सविस्तर चर्चा केली आहे ती पाहावी.

वर वर्णन केलेल्या महायोग्याच्या परतत्त्वाशी एकता होत जाण्याच्या निदर्शक भूमिका विस्मयकारक असतात. योग्याची इच्छाशक्ती ही श्रीशिवांच्या स्वातंत्र्यशक्तीशी एकरूप होत जाऊन तो योगी अनेक चमत्कार करू शकतो. श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील सूत्रे क्रमांक १.१२ व १.१३मध्ये व त्यांवरील टीकांमध्ये याविषयी सविस्तर चर्चा केली आहे ती पाहावी.

अशा महायोग्याला सर्व आंतर व बाह्य वस्तुजात (इदम्) हे स्वतःच्या शरीरासारखे (अहम्) स्वतःचे स्वरूप असल्यासारखे दिसते. अशा अवस्थेत योग्याला आत्मा व विश्व यांचे ऐक्य अनुभवावयाला येते. जेव्हा आपले चित्त चित्शी म्हणजे वैश्विक चैतन्याशी एकरूप होते तेव्हा त्याला बाह्य विश्व हे आपलेच स्वरूप आहे असा प्रत्यय येतो. त्या योग्याच्या ठिकाणी विश्वाबद्दल सर्वत्रता, सर्वज्ञता इत्यादि धर्मांचा आविर्भाव होतो. या परतत्त्वाच्या अखंड जाणिवेने त्याला पशुत्व आणणाऱ्या शक्ती नाहीशा होतात. श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील सूत्रे क्रमांक १.१४ ते १.१६ यांमध्ये व त्यांवरील टीकांमध्ये याविषयी सविस्तर चर्चा केली आहे ती पाहावी.

योग्याला सर्व विश्वव्यापक व विश्वात्मा जे परमश्रीशिव ते आपणच आहोत अशी दृढ जाणीव किंवा निश्चित ज्ञान होणे म्हणजेच आत्मज्ञान होणे आहे. श्रीवसुगुप्तपादाचार्य यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील सूत्रक्रमांक १.१७मध्ये व त्यावरील टीकेमध्ये याविषयी सविस्तर चर्चा केली आहे ती पाहावी.

ज्ञेय आणि ज्ञातृत्व अर्थात् दृश्य व द्रष्टा म्हणजे जे पाहवयाचे असते अशी वस्तू म्हणजे विश्व व ते पाहणारा या उभयतांचे ज्ञान असणे हा आपला स्थायीभाव आहे, या अखंड जाणिवेचा आनंद हेच समाधिसुख आहे.

श्रीवसुगुप्तपादाचार्य यांनी "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथामध्ये याविषयी असे म्हटले आहे की -

**इयमेवामृतप्राप्तिरयमेवात्मनो ग्रहः।**
**इयं निर्वाणदीक्षा च शिवसद्भावदायिनी।।४.३२।।**

**अर्थ** :- हीच तादात्म्यता आहे. हीच अमृतत्वाची प्राप्ती आहे. हेच आत्म्याचे ग्रहण किंवा आत्मज्ञान आहे. हिलाच निर्वाण दीक्षा असे म्हणतात. ही परम श्रीशिवांचे स्वरूपत्व किंवा सायुज्य अर्थात् श्रीशिवभाव प्राप्त करून देणारी असल्याने या निर्वाणदीक्षेला श्रीशिवसद्भावदायिनी असेही म्हणतात.

श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीचंद्रज्ञान**" यातील एक अवतरण उद्धृत करून याविषयी असे म्हटले आहे की -

**अथ अस्य समाधिसुखं- तत्तादृशं अवलोकयतां जनानां ..... स्वानन्दाभिव्यक्तिपर्यवसायि भवति।।**

**अर्थ** :- आता याचे समाधिसुख ते त्याप्रमाणे जनांकडून अवलोकिले जाते आणि स्वानंदाच्या अभिव्यक्तीत पर्यवसित होते.

योग्याला होणारा आनंद हा केवळ त्या योग्यालाच होतो असे नसून त्याचा सर्वसामान्य जनतेला लाभ होत असतो. श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील सूत्रक्रमांक १.१८मध्ये व त्यावरील टीकेमध्ये याविषयी सविस्तर चर्चा केली आहे ती पाहावी.

अशा योग्याच्या ठिकाणी येणाऱ्या शक्ती किंवा सिद्धी पुढीलप्रमाणे आहेत.

श्रीशिवांच्या इच्छाशक्तीशी संधान करणारा योगी आपल्या इच्छेप्रमाणे हव्या त्या शरीराची उत्पत्ती करू शकतो. श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य यांनी "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथामध्ये याविषयी असे म्हटले आहे की -

**तथा स्वप्नेऽप्यभीष्टार्थान् .....नित्यं**
**स्फुटतरं ..... (शिवः) अवश्यं प्रकाशयेत।।१.२४।।**

**अर्थ** :- योगसाधना परिपक्व झालेल्या योग्याच्या स्वप्नात सुद्धा जरी काही पदार्थ हवेसे वाटले तरी ते पदार्थ श्रीशिव प्रकाशमान् करतात किंवा पुरवितात.

भूतकाळातील किंवा भविष्यकाळातील विशिष्ट स्थळी झालेल्या अथवा होणाऱ्या घटना अशा योग्याला तो असेल तेथे वर्तमानकाळातच ज्ञात होतात. असा योगी परिपोषण किंवा आप्यायन करण्यासाठी भिन्न शरीरे किंवा

वस्तू एकत्र करू शकतो. याला श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात विश्वसंघट्ट असे म्हटलेले आहे. या संहिती करण्याच्या सामर्थ्याप्रमाणे पृथक्करण किंवा विभक्त करण्याची शक्ती या योग्याला प्राप्त होते. उदाहरणार्थ व्याधीचा उपशम होण्यासाठी किंवा अवयव दुरुस्त करण्यासाठी तो शरीरापासून वेगळा काढणे व नंतर शरीराला पूर्ववत जोडणे आवश्यक आहे. अशा योग्यामध्ये शुद्धविद्येचा उदय झाल्यामुळे त्याला सर्व सिद्धींवर प्रभुत्व प्राप्त होते. श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील सूत्रे क्रमांक १.१७ ते १.२० यांमध्ये व त्यांवरील टीकांमध्ये याविषयी सविस्तर चर्चा केली आहे ती पाहावी.

या सिद्धी श्रीशैवागमाच्या साधनपादात दिलेल्या आहेत.

श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य यांनी "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथात या सिद्धींची किंवा विभूतींची चर्चा करताना असे म्हटले आहे की -

**यथा ह्यर्थोऽस्फुटो दृष्टः सावधानेऽपिचेतसि**
**भूयः स्फुटतरो भाति स्वबलोद्योगभावितः।**
**तथा यत्परमार्थेन यदा यत्र यथा स्थितम्**
**तत्तथा बलमाक्रम्य न चिरात सम्प्रवर्तते।।४.३६,३७।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे एखादा दूर असलेला पदार्थ माणसाने लक्षपूर्वक सावधान मनाने पाहिला तरी पहिल्या नजरेमध्ये अस्पष्ट दिसतो; पण विशेष प्रयत्न करून आत्मबळाच्या साहाय्याने परीक्षण केले असता पुन्हा अधिक स्पष्ट दिसतो.।।३६।।

त्याप्रमाणे अर्थात् तसाच प्रयत्न केला असता योग्याला स्पंदात्मक आत्मबलावर आरूढ होण्याच्या अवस्थेमध्ये अल्प काळातच ते सर्व पदार्थ त्रैलोक्यात कोठेही असले तरी जसे आहेत त्या अवस्थेत दिसू लागतात.।।३७।।

स्पंदबळावर आरूढ झालेल्या योग्याला भूत, भविष्य आणि वर्तमान काळात त्रैलोक्यातील सर्व पदार्थ जशा अवस्थेत असतील तशा अवस्थेत समजतात. या सिद्धींचे उदाहरण म्हणून श्रीक्षेमराजाचार्य यांनी सोन्याचा खजिना कुठे, केव्हा आणि कशा परिस्थितीत आहे हे योगी सांगू शकतो असे म्हटले आहे.

श्रीशिवांशी तादात्म्य प्राप्त करून घेतलेल्या योग्याला मर्यादित शक्ती प्राप्त होतात. इतकेच नव्हे; तर त्याच्या ठिकाणी शुद्धविद्या किंवा उन्मनाशक्तीचा उदय झाल्यामुळे "मी सर्व विश्व आहे" किंवा "**अहमेव सर्वम्**"

अर्थात् सर्व शक्तींचा एकसमयावच्छेदेकरून प्रभू आहे अशी माहेश्वरत्व सिद्धी प्राप्त होते. आजपर्यंतच्या आत्मसाक्षात्काराची किंवा आत्मव्याप्तीची श्रीशिवव्याप्तीत किंवा श्रीशिवांशी संपूर्ण एकरूप होण्यात परिणती होते. श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य यांनी "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील सूत्रक्रमांक १.२१ मध्ये व त्यावरील टीकेमध्ये याविषयी सविस्तर चर्चा केली आहे ती पाहावी.

अशी आत्मव्याप्तीची श्रीशिवव्याप्ती झाली अर्थात् जीव आणि श्रीशिव एकरूप झाले की, अशा श्रीशिवस्वरूप योग्याला दैवीशक्तीच्या अगाध साठ्याशी ("**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात दैवीशक्तीच्या अगाध साठ्याला "**महाह्रद**" ही पारिभाषिक संज्ञा वापरली आहे.) म्हणजे त्याच्याशी त्याच्या अनुसंधानाने अखंड तादात्म्य साधते व त्यामुळे जिच्यापासून सर्व मंत्रांची निर्मिती होते अशा श्रीशिवांच्या परमोच्च "**मी**"त्वाची (Supreme-I-consciousness) अनुभूती येते.

श्रीपातंजलयोगापेक्षा हा योग भिन्न आहे. हे स्पष्ट आहे.

**(३) शाक्तोपाय :-** या उपायाचा व वामाचारी तसेच दक्षिणमार्गी शाक्तपंथाचा परस्परांशी काहीही संबंध नाही. याला शाक्तोपाय म्हणण्याचे कारण हा उपाय शक्ती अथवा मंत्रांच्या सामर्थ्याचा प्रसार किंवा वृद्धी यावर आधारलेला आहे. साक्षात्कारासाठी चिच्छक्ती किंवा विमर्शशक्ती हिचा आधार घेणे यात आवश्यक असते. यामुळे याला शाक्तयोग असे म्हणतात. या योगात मंत्रांचे महत्त्व असल्यामुळे याला मंत्रोपाय असेही नाव आहे.

आपले मन विकल्पशून्य असत नाही. एका विकल्पाच्या पाठोपाठ दुसरा विकल्प अशी विकल्पांची शृंखला चालूच असते. हे सर्व विकल्प "मी" म्हणजे हे "शरीर" हे गृहीत धरून मी गरीब, श्रीमंत, ज्ञानी इत्यादि आहे, अशा स्वरूपाचे असतात. यांना "अशुद्ध विकल्प" असे म्हणतात. परंतु मी पृथ्वीतत्त्वापासून श्रीशिवांपर्यंतच्या तत्त्वपसाऱ्यापासून भिन्न असून विश्वोत्तीर्ण अर्थात् सर्व विश्वावरचे (Transcendental) व विश्वात्मक अर्थात् सर्व विश्वात भरून असलेले (Immanent) आत्मतत्त्व मी आहे, असे भावणे, वाटणे हा शुद्ध विकल्प आहे. या शुद्ध विकल्पाचे चिंतन व मनन करून तो अनेक मार्गाने मनावर बिंबवून घेणे हा शाक्तोपाय, ज्ञानोपाय किंवा भावनोपाय आहे. या उपायाने द्वैतनिरसन होते.

हा शुद्ध विकल्प सर्वसामान्य माणसाच्या मनात प्रादुर्भूत होत नाही. श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीप्रत्यभिज्ञाहृदय**" या ग्रंथात चित्ताची व्याख्या

करताना असे म्हटले आहे की -

**चेत्यते विमृश्यते अनेन परं तत्त्वमिति चित्तम्।।**

**अर्थ :-** परतत्त्वाचा शोध घेण्याचा ज्याला अत्यंत ध्यास लागलेला आहे अशा मनाला चित्त असे म्हणतात.

मंत्राची व्याख्या करताना असे म्हटले आहे की -

**मननात् त्रायते इति मन्त्रः।।**

**अर्थ :-** मनन केल्यामुळे जो रक्षण करतो त्याला "मंत्र" असे म्हणतात.

श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीशिवसूत्रविमर्शिनी**" या ग्रंथात मननाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की -

**पर-स्फुरत्तात्मक-मननधर्मात्मता, भेदमयसंसार प्रशमात्मकत्राणधर्मता च अस्य निरुच्यते।।२.१।।**

**अर्थ :-** मनन याचा अर्थ मंत्रातील पराशक्तीशी आपण एकरूप आहोत अशी अखंड मानसिक जाणीव होत राहणे आणि त्राण याचा अर्थ भेदमय असा जो संसार किंवा आपण हे विश्व परस्परांपेक्षा भिन्न आहोत ही जी भिन्नतेची भावना त्या भावनेपासून संरक्षण होणे होय.

शाक्तोपायात मंत्राला प्राधान्य असते. ही शक्ती मंत्रांचे अथवा गूढशक्ति-युक्त अक्षरांचे किंवा वर्णांचे किंवा वर्णसमुदायांचे स्वरूप धारण करते आणि साधकाचे मन त्यातील मंत्रदेवतेशी इतक्या उत्कटतेने तद्रूप होते की, ते स्वतःच मंत्रस्वरूप होते. "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य यांनी असे म्हटले आहे की -

**चित्तं मन्त्रः।।२.१।।**

**अर्थ :-** चित्त म्हणजे श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेली कुंडलिनी शक्ती हाच मंत्र आहे अगर शाक्तपरामर्शाने रंगलेले आराधन अथवा सिद्धयोगसाधन करणाऱ्याचे मन आहे. हे मन अहंपरामर्शात मग्न होते किंवा मंत्रात गुप्त असलेले परतत्त्व त्याच्यामुळे जाणले जाते. हे परतत्त्व किंवा श्रीपरमेश्वर व आपण भिन्न नाही अशी तीव्र आंतरिक जाणीव असलेले आणि अशा रीतीने देवतेशी किंवा परतत्त्वाशी एकरूप व समरस झालेले चित्त हे मंत्र किंवा मंत्ररूप असते.

ज्ञान आणि क्रिया यांचे स्वातंत्र्य असणारे चैतन्य म्हणजेच आत्मा होय. असे "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात सांगितले आहे. मंत्राचा साक्षात्कार झालेले चित्त हे त्या चैतन्यात्मक चैतन्यस्वरूप आत्म्याचे एक रूप आहे.

मंत्र वर्णात्मक असतात. "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात श्रीअभिनवगुप्तपादाचार्य यांनी याविषयी असे म्हटले आहे की -

**उच्चाररहितं वस्तु चेतसैव विचिन्तयन्।।२.२।।**

**अर्थ :-** वर्णांचे मूळ स्वरूप पाहता ते उच्चाररहित असतात. ज्या वस्तूचे चिंतन केले जाते ती वस्तू उच्चाराच्या मर्यादेपलीकडे असते.

या उच्चाररहित उच्चारातीत अशा अवस्थेला "परावाक्", "पराशक्ती", "विमर्शशक्ती", "संविच्छक्ती", "मातृका" इत्यादि संज्ञा आहेत. सर्व शब्द व वस्तू यांचे उगमस्थान विचार आणि उच्चार यांच्या पलीकडे असते. परावाक् प्रकट होण्याची पुढील अवस्था म्हणजे पश्यंती होय. या अवस्थेत शब्द आणि वस्तू अद्यापि भिन्न झालेले नसतात. मध्यमा ही यापुढील प्रकट होण्याची अवस्था आहे. या अवस्थेत शब्द आणि वस्तू यांच्या विचारांच्या पातळीवर जरी भिन्नता स्पष्ट होत असली तरी त्याचा स्थूल वाचिक उच्चार होत नाही. हे एक प्रकारचे सूक्ष्म उच्चारण असते. याची यापुढील स्थूल शारीरिक अवस्था अथवा वाचिक उच्चारण म्हणजे वैखरी होय. विश्व हे या शक्तीप्रमाणे पर, सूक्ष्म आणि स्थूल अशा रूपाने प्रकट होते. परावाक् ही सर्व मंत्रांची शक्ती आहे. "**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथामध्ये याविषयी असे म्हटले आहे की -

**मन्त्राणां जीवभूता तु या स्मृता शक्तिरूपया।**
**तया हीना वरारोहे निष्फलाः शरदभ्रवत्।।**

**अर्थ :-** हे वरारोहे! ज्याप्रमाणे शरदऋतूतील ढग निष्फळ असतात त्याप्रमाणे मंत्रांना जिवंतपणा देणारी जी शक्ती सांगितलेली आहे तिने विरहित मंत्र निष्फळ किंवा निर्बल होतात.

"**श्रीतंत्रसद्भाव**" याच ग्रंथात पुढे असेही म्हटले आहे की -

**सर्ववर्णात्मका मन्त्रास्तेच शक्त्यात्मकाः प्रिये।**
**शक्तिस्तु मातृका ज्ञेया साच ज्ञेया शिवात्मिका।।**

**अर्थ :-** हे प्रिये! सर्व वर्ण हे मंत्रात्मक व शक्त्यात्मक असून यांना मातृका असे म्हणतात. हे मंत्र श्रीशिवात्मिका आहेत.

शास्त्रांमध्ये या मातृकांचे जे विवेचन केलेले आहे ते थोडे गूढ आणि काव्यमय आहे. "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथात श्रीवसुगुप्तपादाचार्यवर्य यांनी असे म्हटले आहे की -

**मातृकाचक्रसम्बोधः।।२.७।।**

**अर्थ :-** (प्रसन्न झालेल्या श्रीसद्गुरूंकडून शक्तिपातयोगदीक्षा झाल्याने

अनादिनिद्रिस्थ श्रीशिवरूप आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत झाल्यावर साधकभक्तयोगिशिष्याला) मातृकासमूहाचा सम्यक् बोध अथवा योग्य ज्ञान होते.

या सूत्रात विवेचनात सांगितल्याप्रमाणे प्रत्येक वर्णाची एक विशिष्ट शक्ती आहे ती त्या वर्णाची अधिष्ठात्री देवता मानली आहे. श्रीशैवग्रंथकार "**अहम्**" मध्ये मातृकाचक्र सामावलेले आहे असे मानतात. "**अहम्**" यापैकी "**अ**" हे श्रीशिवांचे प्रतीक असून तो विश्वाचा आरंभदर्शक आहे. "**ह**" हे शक्तीचे किंवा प्रकट विश्वाचे प्रतीक आहे. बिंदू हा श्रीशिवशक्तीचे सामरस्य दर्शवतो. "अ"पासून "ह"पर्यंत सर्व वर्ण येत असल्यामुळे शब्दरूपात्मक सर्व वस्तुजात "**अहम्**" मध्ये सामावलेले आहे, असे श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**श्रीप्रत्यभिज्ञाहृदय**" या ग्रंथात म्हटले आहे.

सारांश, शाक्तोपायात मंत्रशक्तीला प्राधान्य आहे. ही मंत्रशक्ती मातृकात सामावलेली असून श्रीशिवांच्या विमर्श स्वरूपचिंतनातून किंवा वैश्विक "मीत्वाच्या" जाणिवेतून निर्माण होते आणि वैयक्तिक अहंतेचा वैश्विक अहन्तेत लोप होतो. (या उपायाचे अधिक विवेचन "**श्रीशैवदर्शन**" या ग्रंथात पाहावे. महत्त्वाची सूचना म्हणजे यातील प्रक्रिया श्रीसद्गुरुमुखाने समजून घेऊन त्या जाणत्या व्यक्तीच्या देखरेखीखाली कराव्यात. पुस्तके वाचून शब्दज्ञानाच्या आधारे करू नयेत.)

**(३) आणवोपाय :-** मन, बुद्धी, अहंकार, प्राण व शरीर यांनी मर्यादित झालेल्या आत्मतत्त्वाला (The psychological or empirical self) अणू असे म्हणतात. याला आत्मा असे म्हणण्याचे कारण हे मर्यादित आत्मतत्त्व या जन्मातून दुसऱ्या जन्मात जाते. "**आत्मा**" हा शब्द "अत्" किंवा संचार करणे या धातूपासून व्युत्पन्न झालेला आहे. शांभवोपायात आत्मा हा शब्द चैतन्य या अर्थाने वापरलेला आहे तर शाक्तोपायात "**चित्तं मन्त्रः ।।२.११।।**" असे म्हटले आहे आणि आणवोपायात "**आत्मा चित्तम् ।।३.१।।**" अशी व्याख्या केलेली आहे. यावरून एकाच पारिभाषिक शब्दाचे निरनिराळ्या उपायात भिन्न भिन्न अर्थ होतात असे लक्षात येते. या उपायात अणूने किंवा सामान्य जीवाने कोणती साधना किंवा क्रिया करावी व ती कशी करावी याचे विवेचन केलेले आहे. या क्रिया मंत्रजप, पूजा यांसारख्या बाह्य स्थूल स्वरूपाच्या आहेत तशाच ध्यानासारख्या मानसिक स्वरूपाच्याही आहेत. आणवोपायाला "**क्रियोपाय**" असेही म्हणतात. या उपायाची परिणती पुढे

शाक्तोपायात व त्यानंतर शांभवोपायात होते.

"**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**उच्चार-करण-ध्यान-वर्ण-स्थान प्रकल्पनैः ।**

**यो भवेत्तु समावेशः सम्यगाणव उच्यते ।।२२।।**

**अर्थ :-** आणवोपायात उच्चार, करण, ध्यान, वर्ण आणि स्थानकल्पना या प्रक्रियांनी किंवा मार्गांनी आत्मतत्त्वात विलीनता किंवा समावेश साधला जातो. हे पाचही पारिभाषिक शब्द असून यांचे अर्थ पुढीलप्रमाणे आहेत.

**(त) उच्चार :-** उत्‌चार किंवा वर येणे व ध्वनिरूपाने प्रकट होणे हे प्राणशक्तीचे लक्षण आहे. येथे "प्राण" हा शब्द दोन अर्थांनी वापरला आहे. प्राणन् किंवा श्वासोच्छ्वास हा "प्राण" या शब्दाचा स्थूल अर्थ आहे. प्राणशक्तीचे विशिष्ट स्वरूप आणि कार्य व्यक्त करणाऱ्या प्राण, अपान, समान, उदान व व्यान या रूपांना विशिष्ट सूक्ष्मप्राण असे म्हटले आहे. प्राणाची विशिष्ट शक्ती म्हणजे उच्चार होय. या विशिष्ट प्राणांच्या ठिकाणी लक्ष केंद्रीभूत करण्याच्या किंवा प्राणधारणेच्या प्रक्रियेला Technicque किंवा उच्चार असे म्हटले आहे. या निरनिराळ्या प्राणांवर लक्ष्य केंद्रीभूत केले असता निरनिराळ्या प्रतीचे आनंद होतात. उदाहरणार्थ प्राणापान यांच्यावर लक्ष केंद्रित झाल्यास "परानंद", समानवायूवर लक्ष केंद्रित झाल्यास "ब्रह्मानंद", उदानस्थैर्यापासून "महानंद", व्यानावर मन स्थिर झाल्यास "चिदानंद" आणि संपूर्ण प्राणशक्तीचा साक्षात्कार झाल्यास "जगदानंद" हा सर्वश्रेष्ठ आनंद प्राप्त होतो. या सर्व प्रक्रियेला उच्चारयोग किंवा प्राणयोग असे म्हणतात. आनंदानुभव, कंप, (बाह्य वस्तुमात्राविषयी) निद्रा व घूर्णना ही लक्षणे हा योग सिद्ध झाल्यावर प्रकट होतात.

हा प्राणयोग "**श्रीपातंजलयोगसूत्रे**" या ग्रंथातील प्राणायामापेक्षा निराळा आहे.

**(थ) करण :-** स्थूल, सूक्ष्म व कारण देहाच्या आणवोपायातील प्रक्रियेला "**करण**" असे म्हणतात. यात मुद्रांचा उपयोग केला जातो. श्रीअभिनवगुप्तपादाचार्यवर्य यांनी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात ग्राह्य, ग्राहक, चित् किंवा संवित्ती, निवेश अथवा सन्निवेश, व्याप्ती, त्याग आणि आक्षेप हे करण प्रक्रियेचे सात प्रकार पुढे सांगितले आहेत. आपल्यापेक्षा भिन्न भासणारे बाह्य पदार्थ आत्मस्वरूप असल्याची ज्ञानप्राप्ती होणे हा या सर्वांचा उद्देश आहे. यातील ग्राह्य ते सन्निवेश हे पहिले चार आणवयोगापैकी आहेत त्यांची स्थूल

रूपरेषा पुढीलप्रमाणे आहे. बाह्य पदार्थ किंवा ग्राह्य हे ग्राहकात किंवा ज्ञानेंद्रियात विलीन करणे आणि ते ज्ञानेंद्रिय स्वरूप आहेत हे जाणणे अशा अनुक्रमाने बाह्य वस्तूंच्या बाह्यपणाचे चित्स्वरूपात सर्वस्वी विलीनीकरण होणे हा संनिवेश मानतात आणि भावनेद्वारा या सर्व क्रिया साधल्या जातात. आणवोपायातील सोळा ते पंचवीस ही सूत्रे शांभवोपायाशी संबद्ध आहेत.

**(द) ध्यान :-** ध्यानाचे पुढीलप्रमाणे तीन प्रकार सांगितले आहेत.

**(१) त्रिपुटी निरासयुक्त ध्यान :-** प्रमाता (ज्ञाता), प्रमाण (ज्ञान) आणि प्रमेय (ज्ञेय) हे एकच आहेत असे त्रिपुटी निरासयुक्त ध्यान करणे. या ध्यानामुळे आपल्या आंतरिक जाणिवेचा किंवा ज्ञानाचा अग्नी प्रज्वलित होतो. त्या अग्नीत आपल्या इंद्रियांच्या आतील शक्तींनी बाह्यवस्तूंचे ज्ञान आणि संवेदना भावनेद्वारा या अंतर्गत अग्नीत हवन कराव्यात अर्थात् आंतर आणि बाह्य ज्ञान व बाह्य वस्तूंच्या संवेदना नाहीशा होऊन ऐकात्म्य लाभेल. हा परतत्त्वातील आणवसमावेश आहे.

**(२) ध्यानाची दुसरी प्रक्रिया :-** ही प्रक्रिया संत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**पिंडे पिंडाचा ग्रासु।।६.२९१।।**" या शब्दात वर्णन केली असून ती या उपायाच्या "**शरीरे संहारः कलानाम्।।**" या चौथ्या सूत्रात वर्णन केलेली आहे. या ध्यानात भावनेच्या द्वारा पृथ्वीपासून श्रीशिवांपर्यंतची सर्वतत्त्वे (उदाहरणार्थ पृथ्वीतत्त्व आपात विलीन करणे. आप तेजात अशा अनुक्रमाने) विलीन करून स्थूल शरीर हे सूक्ष्म शरीरात आणि सूक्ष्म शरीर हे कारण शरीरात विलीन करावयाचे असते.

या प्रक्रियेला "**लयभावना**" असे म्हणतात.

**(३) अन्य एक प्रक्रिया :-** उजव्या पायाच्या अंगठ्यापासून कालाग्नी निर्माण झाला आहे अशी भावना करून त्यात शरीराचे हवन करावे. या प्रक्रियेला "**दाहभावना**" असे म्हणतात. ही प्रक्रिया आणवप्रक्रियेपेक्षा शाक्त असावी असे वाटते.

**(ध) वर्ण :-** "**उच्चार**" या आणवयोगामध्ये मन हे प्राणापानादि विशिष्ट प्राणशक्तींवर केंद्रीभूत करावे असे सांगितले आहे. आता सामान्य प्राण किंवा प्राणनाच्या अर्थात् उच्चारावर लक्ष केंद्रीभूत करण्याचा आणवयोगाचा विचार करू.

श्रीअभिनवगुप्तपादाचार्यवर्य यांनी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**उक्तो य एष उच्चारस्तत्र योऽसौ स्फुरन् स्थितः।**
**अव्यक्तानुकृति प्रायो ध्वनिर्वर्णः स कथ्यते।।५.१३१।।**

**अर्थ :-** सामान्य प्राणनेच्या उच्चारापासून अव्यक्त किंवा प्रकट न झालेला जो ध्वनी प्रत्येक प्राणिमात्रामध्ये निसर्गतः अखंड होत असतो त्याला **"वर्ण"** असे म्हणतात.

**"श्रीस्वच्छंदतंत्र"** या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**नामोच्चारयिता कश्चित प्रतिहन्ता न विद्यते।**
**स्वयमुच्चरते देवः प्राणिनामुरसि स्थितः।।**

**अर्थ :-** या वर्णाला उच्चार करावयाला लावणारा कोणीही नाही व त्याला कोणीही थांबवू शकत नाही. प्राणिमात्रांच्या हृदयात असलेला देव स्वतः या वर्णाचा उच्चार करीत असतो.

श्रीअभिनवगुप्तपादाचार्यवर्य यांनी **"श्रीतंत्रालोक"** या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**एको नादात्मको वर्णः सर्ववर्णाविभागवान्।**
**सोऽनस्तमितरूपत्वादनाहत इहोदितः।।६.२१६।।**

**अर्थ :-** हा वर्ण एक असून तो नादात्मक आहे. सर्व वर्ण किंवा अक्षरे या नादात अव्यक्त स्वरूपात असून त्यापासून सर्व अक्षरे किंवा ध्वनी बाहेर पडतात. हा ध्वनी अनाहत किंवा सततोदित असा आहे.

या नादावर अनुसंधान ठेवणे याला वर्णयोग किंवा ध्वनियोग असे म्हणतात. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी **"श्रीयोगतारावली"** या ग्रंथात यालाच नादानुसंधान असे म्हटले आहे. श्रीक्षेमराजाचार्य यांनी **"श्रीशिवसूत्र-विमर्शिनी"** या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**सकारेण बहिर्याति हकारेण विशेत् पुनः।**
**हंस-हंसेत्यतो मन्त्रं जीवो जपति नित्यशः।।**
**षट्शतानि दिवा रात्रौ सहस्राण्येकविंशतिः।**
**जपो देव्या विनिर्दिष्टः सुलभोदुर्लभो जडैः।।३.२७।।**

**अर्थ :-** या नादात्मक वर्णाचे सृष्टिबीज अर्थात् **"स"** आणि संहारबीज अर्थात् **"ह"** असे रूप असून सृष्टिबीज **"स"** हे उच्छ्वासरूपाने प्रकट होते व श्वासरूपाने संहारबीज **"ह"** प्रकट होते. प्रथम श्वास **"ह"** आणि नंतर उच्छ्वास **"स"** असा हंसमंत्र सर्व दिवसभरात २१६०० वेळा जपला जातो. याला अजपागायत्री असे म्हणतात. या हंसमंत्रावर किंवा नादावर अनुसंधान

केल्याने कुंडलिनी शक्ती जागृत होते.

हा नाद मध्यमा अवस्थेत सूक्ष्म असून पश्यंती अवस्थेत ऐकू येत नाही. विकल्पशून्य अवस्थेत ज्योतीचा साक्षात्कार होतो. ही चर्चा सूत्रकारांनी आणवोपायात न घेता शाक्तोपयोगात घेणे आवश्यक आहे. आणवोपायातील ७, १२, १५, २१, २६, ४४ व ४५ ही सूत्रे शाक्तोपायाशी संबंधित आहेत.

हंस हा अनाहतनाद हे प्रणवाचे किंवा ॐकाराचे प्रतीकात्मक स्वरूप आहे. साधकयोग्याला या प्रणवनादाच्या द्वारा सूक्ष्मनादाचे स्वरूप असलेल्या बिंदू अथवा अर्धमात्रा, अर्धचंद्र, रोहिणी, नाद, नादान्त, शक्ती, व्यापिनी, समना आणि उन्मना या नऊ अवस्था अनुप्राप्त होतात.

"**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**समनान्तं वरारोहे पाशजालमनन्तकम्।**
**पाशावलोकनं त्यक्त्वा स्वरूपावलोकनं हि यत्।।**
**आत्मव्याप्तिर्भवत्येषा शिवव्याप्तिस्ततोऽन्यथा।।**

**अर्थ :-** हे वरारोहे! हे पार्वती!! समनेपर्यंत साधकभक्तयोगिशिष्य संसाराच्या अनेक पाशजालांनीयुक्त असतो. ज्यावेळी या सर्व पाशजालांचा त्याग किंवा नाश होतो व स्वस्वरूपाची प्राप्ती होते त्यावेळी त्याला आत्मव्याप्ती व श्रीशिवव्याप्ती अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्याची प्राप्ती होते.

समना अवस्थेपर्यंत आत्मव्याप्ती अर्थात् विश्वव्यापक श्रीशिवस्वरूपाचा साक्षात्कार न होता स्वतःपुरता मर्यादित आत्मस्वरूप साक्षात्कार व उन्मना अवस्थेत श्रीशिवव्याप्ती अर्थात् सर्व विश्व आत्मस्वरूप असल्याचा साक्षात्कार होतो.

श्रीक्षेमराजाचार्य यांनी आपल्या टीकेत याविषयी असे म्हटले आहे की -

**आत्मव्याप्तन्तस्य मोहस्य जयात उन्मना**
**शिवव्याप्यात्मनः सहजविद्यायाः प्राप्तिरुक्ता।**

**अर्थ :-** आत्मव्याप्ती अवस्था संपल्यानंतर मोह किंवा मायाजय होतो व उन्मना नावाची श्रीशिवव्याप्ती अवस्था प्राप्त होते. ती आत्म्याची "सहजविद्या" होय.

**(न) स्थानकल्पना :-** ज्यांना आपले चित्त बुद्धी किंवा नाद यावर केंद्रीभूत करता येत नसेल त्यांना बाह्यवस्तूंवर चित्त केंद्रित करण्याचे "**स्थानकल्पना**" नामक आणवोपाय आहेत. उदाहरणार्थ स्थूल प्राण किंवा श्वासोच्छ्वास यावर लक्ष ठेवणे हा आणवोपाय आहे.

श्वास घेताना बारा अंगुळे आत जातो व उच्छ्वास सोडल्यावर बारा अंगुळे पर्यंत बाहेर जातो. या श्वासाच्या मर्यादेला (मर्यादेच्या टोकाला) **"आंतरद्वादशान्त"** असे म्हणतात व उच्छ्वासाच्या मर्यादेला **"बाह्य-द्वादशान्त"** असे म्हणतात. या द्वादशांतांवर लक्ष केंद्रीभूत केल्यास मानसिक विकल्प हळू हळू कमी होत जाऊन मनोलय होतो. ही एक आणवप्रक्रिया आहे.

आपले स्थूल शरीर म्हणजे नासिकाग्र किंवा भ्रूमध्य भाग ही चित्त एकाग्र करण्याची दोन स्थाने आहेत. मूर्ती, चित्र, ॐकाराचे प्रतीक या शरीराबाहेरील वस्तू हे तिसरे स्थान आहे.

या प्रक्रिया तुलनेने सोप्या आहेत. आणवोपायाची परिणती शाक्तोपायात होते व शाक्तोपाय पुढे शांभवोपायात परिणत होतो.

## श्रीशिवसूत्र - सूत्रार्थ सारांश

आतापर्यंत आपण "शांभव", "शाक्त" आणि "आणव" या उपायांचा संकलित विचार केला. आता या उपायांतील प्रत्येक सूत्राचा सारांश पाहू.

### १. शांभवोपाय

१. शांभवोपायातील पहिल्या सूत्रात या श्रीशैवदर्शनाची तत्त्वज्ञानात्मक भूमिका स्पष्ट केली आहे. ती अशी. चैतन्य हेच आत्मरूप आणि वास्तवता आहे. चैतन्य म्हणजे नुसती हालचाल नव्हे. चैतन्य म्हणजे ज्ञान आणि क्रिया यांचे संपूर्ण स्वातंत्र्य होय. जाणीव अथवा ज्ञान आणि आनंद हे त्याचे स्वरूप आहे. असे स्वातंत्र्य आणि स्वरूप असणारा म्हणजे आत्मा होय.

श्रीक्षेमराजाचार्य यासंबंधी विवरण करताना असे सांगतात की, "हे श्रीशंकरात्मक स्पंदतत्त्व असलेले चैतन्य सर्वदा स्वप्रकाशयुक्त आणि परमार्थ-सत् आहे. याच्या ठिकाणी स्वभावतः श्रीशिवांप्रमाणे प्रकाश म्हणजे ज्ञान आणि विमर्श म्हणजे क्रियाशक्ती असतात.

२. (वरील सूत्रात म्हटल्याप्रमाणे आत्म्याच्या ठिकाणी श्रीशिवांप्रमाणे प्रकाश आणि विमर्श या शक्ती आणि परिपूर्ण स्वातंत्र्य असते; पण) आत्म्याला स्वस्वरूपाविषयी संकुचित ज्ञान हा "आणवमल" नामक पाश किंवा बंध आहे. (या श्रीशैवमतात संपूर्ण ज्ञानाभाव किंवा अज्ञान मानत नाहीत.)

३. "मायीय" म्हणजे मायेपासून उत्पन्न होणारा आणि "कार्म" म्हणजे कर्मापासून उत्पन्न होणारा असे आणखी दोन बंध जीवाच्या म्हणजे आत्म्याच्या (indivudual soul च्या) ठिकाणी आहेत.

४. वरील तीन मलांनी म्हणजे पाशांनी किंवा बंधांनी मर्यादित ज्ञानाचा

मूलभूत आधार असलेल्या मातृका या वर्णांचा उच्चार करणाऱ्या व वर्णांवर स्वामित्व असणाऱ्या शक्ती आहेत; कारण ज्ञान हे शब्दांनी व्यक्त होते आणि शब्द हे मातृकांचे अर्थात् वर्णांचे बनलेले असतात.

५. श्रीशिवसंवित् (श्रीभैरव) आतून उचंबळून येणे (उन्मेष किंवा उन्मज्जन होणे) हा या बंधांतून सुटण्याचा उपाय आहे.

६. (हे श्रीभैरवत्व, विश्वसंवित् साध्य होण्यासाठी शाक्तोपायांतर्गत श्रीशैवशास्त्रात सांगितलेल्या पद्धतीने म्हणजे एकाग्र जाणिवेने) सर्व शक्तींच्या ठिकाणी ऐक्य साधल्याने (आत्म्यापेक्षा) विश्व भिन्न आहे ही जाणीव नाहीशी होते. (अहम्-इदम् मधील भेद नाहीसा झाल्यावर विश्वसंहार होतो.)

७. (श्रीभैरवत्वाचा उन्मेष किंवा उन्मज्जन झाले व शक्तिचक्राच्या ठिकाणी संधान झाले म्हणजे विश्वात्म्यैक्याचा साक्षात्कार होतो.) अशा योग्याला जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तीन्ही अवस्थांत तुर्या अवस्थेतील अत्यंत श्रेष्ठ (अशा श्रीशिवांच्या ठिकाणी असणारा) आत्मानंद (आभोग) कायमचा प्राप्त होतो.

८. ज्यावेळी इंद्रियांच्या द्वारा बाह्य जगाचे ज्ञान आकलन होते ती जागृत अवस्था होय.

९. ज्या अवस्थेत बाह्य जगाशी इंद्रियांचा संबंध न येता केवळ मनो-व्यापाराने संकल्पनात्मक ज्ञान मिळते ती स्वप्नावस्था होय.

१०. ज्या अवस्थेत जाणीव नसते अशी मोहमयी गाढ झोपेची अवस्था म्हणजे सुषुप्ती अवस्था होय.

११. जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तीन्ही अवस्थांत अत्यंत श्रेष्ठ आत्मानंदाचा म्हणजे श्रीशिवानंदाचा उपभोग घेणारा शक्तिस्वरूप असलेल्या खऱ्याखुऱ्या इंद्रियांचा स्वामी किंवा "वीर" होतो.

१२. परतत्त्वाशी ऐक्य होत असताना योग्याच्या भूमिका अखंड आनंदयुक्त व आश्चर्यचकित करणाऱ्या असतात; कारण अखंड आनंदयुक्त असूनही त्यापासून तृप्ती प्राप्त होत नाही. हे आश्चर्य योग्याचे परतत्त्वाशी ऐक्य होत असताना असणाऱ्या भिन्न भिन्न भूमिकांचे दर्शक आहे. सिद्धयोग्याने त्या भूमिकांवर आरूढ होऊन विश्रांती घ्यावयाची असते.

१३. श्रीभैरवत्व प्राप्त झालेल्या सिद्धयोग्याची इच्छाशक्ती श्रीशिवांच्या स्वातंत्र्यशक्तीशी एकरूप किंवा अभिन्न असते व त्या सामर्थ्याने विश्वनिर्मिती किंवा संहार करता येतो.

१४. अशा इच्छाशक्तिसंपन्न सिद्धयोग्याला सर्व आंतर व बाह्य वस्तुजात स्वत:चेच स्वरूप आहे असे दिसते; कारण त्याला विश्वात्म्यैक्याची अनुभूती असते.

१५. जेव्हा वास्तवतेचे केंद्र असलेल्या वैश्विक चैतन्याशी (universal consciousnessशी) म्हणजे चित्‌शी चित्त संपर्क साधते तेव्हा हे बाह्य विश्व व शून्य अवस्था आपलेच स्वरूप आहे, अशी अनुभूती येते.

१६. श्रीशिवचैतन्य प्राप्त करून घेण्याचा हा शाक्तोपाय आहे. परम श्रीशिव या शुद्ध तत्त्वाविषयीच्या अखंड जाणिवेमुळे आत्म्याला बंध निर्माण करून त्याला मर्यादित करणाऱ्या व पशुत्व देणाऱ्या शक्तींचा सिद्धयोग्याच्या ठिकाणी अभाव होतो व त्यामुळे तो श्रीशिवांप्रमाणे विश्वेश होतो.

१७. विश्वात्मा जे श्रीशिव ते आपणच आहोत अशी दृढ जाणीव म्हणजे आत्मज्ञान होय.

१८. सिद्धयोग्याला आपल्या सर्वज्ञपणाच्या जाणिवेमुळे जो अखंड आनंद मिळतो त्याच्या प्रकटीभवनाने लोकांनाही आनंदाचा लाभ होतो. तो आनंद केवळ वैयक्तिक राहत नाही.

१९. (श्रीशिवसूत्रे १.१३मध्ये उल्लेखिलेल्या) शक्तीशी अनुसंधान केले असता सिद्धयोगी आपल्या इच्छेप्रमाणे हव्या त्या शरीराची निर्मिती करू शकतो.

२०. श्रीशिवांच्या शक्तीशी अनुसंधान करून संहितीकरण म्हणजे व्याधीच्या उपशमासाठी शरीरापासून अवयव वेगळा काढणे व जोडणे, भूत किंवा भविष्यातील विशिष्ट स्थळी झालेल्या घटना वर्तमान काळात जाणणे इत्यादि सामर्थ्ये योग्याला प्राप्त होतात.

२१. सिद्धयोग्याच्या ठिकाणी "मी सर्व विश्व आहे" अशी उन्मनी-स्थितीतील वैश्वात्म्य जाणीव (याला येथे "शुद्धविद्या, म्हटले आहे") झाली की, सर्व सिद्धींच्यावर त्याला प्रभुत्व मिळते.

२२. पराशक्ती हाच एक महाह्रद म्हणजे डोह आहे. त्याच्याशी अनुसंधान केल्याने सर्व मंत्रांची निर्माती असलेली जी परासंवित् तिची अनुभूती सिद्धींची इच्छा न धरता स्वात्मसुखाची इच्छा करणाऱ्या सिद्धयोग्याला प्राप्त होते.

### २. शाक्तोपाय

१. ज्यावेळी साधकाचे मन मंत्रदेवतेच्या विमर्शामुळे त्या देवतेशी सामरस्य पावते त्यावेळी आराधकाचे चित्त हाच मंत्र बनतो. निरनिराळ्या वर्णांचा

म्हणजे अक्षरांचा समुदाय किंवा विशिष्ट मांडणी म्हणजे मंत्र नव्हे. नुसते उच्चारले जाणारे मंत्र अथवा मंत्राक्षरे मंत्र नव्हेत.

२. मंत्रांच्या नैसर्गिक अर्थात् अकृतक एकाग्र अनुसंधानामुळे साधकाला मंत्रदेवतेशी तादात्म्य साधते.

३. ज्या वर्णसमूहामुळे श्रीशिवांशी किंवा परतत्त्वाशी आपण एकरूप आहोत अशी जाणीव होते त्या वर्णसमूहाला म्हणजे शब्दराशीला किंवा "विद्याशरीराला" मंत्र असे म्हणतात. सर्व मंत्रांचे रहस्य वैयक्तिक चित्ताचे सर्व विश्वाशी एकरूप व अभेदमय असलेली मी-त्वाची-विमर्शाची-जाणीव (super I-consciousnessची) "स्फुरत्ता" असते.

४. ज्यांच्या बाबतीत आपण सर्व विश्वाशी एकरूप आहोत हे अहं-विमर्शरूपी मंत्रसामर्थ्य निर्माण होत नाही त्यांना तेजोबिंदू, अनाहतनाद इत्यादि मर्यादित सामर्थ्याच्या दुय्यम सिद्धींचा मोह पडतो. पण या सिद्धी किंवा भेदनिष्ठ विकल्पात्मक ज्ञान हे स्वप्न किंवा स्वप्नाप्रमाणे भ्रमरूप असते. मंत्राचे किंवा शाक्तोपायाचे उद्दिष्ट असल्या दुय्यम सिद्धी नसून श्रीशिवांची विश्वात्मक विमर्शशक्ती असते.

५. क्षुद्रसिद्धीत न गुरफटणाऱ्या सिद्धयोग्यामध्ये जेव्हा श्रीईश्वरेच्छेने परमश्रेष्ठ ज्ञानाचा उदय होतो तेव्हा त्याला "खेचरी मुद्रा" अर्थात् श्रीशिवांची आनंदोल्लासपूर्ण ज्ञानरूपी अथांग गगनात विहार करणारी अवस्था प्राप्त होते.

६. वरील मुद्रांचे वा मंत्रांचे सामर्थ्य मिळविण्याच्या मार्गाचे उपदेशक श्रीसद्गुरू असतात किंवा तसे मार्गदर्शन किंवा अनुग्रह करणारी परमेश्वरी शक्ती असते.

७. वाच्य व वाचक असे वस्तुजात वर्णांनी अर्थात् मातृकांनी बनलेल्या शब्दापासून ज्ञात होते. या मातृका, परावाक् किंवा पराअहंतेच्या शेवटी श्रीशिवांची वैश्विक सर्जन शक्ती (Cosmic Creative Power) आहे. श्रीसद्गुरू प्रसन्न झाल्यावर मातृकासमूहाचे सम्यक् ज्ञान होते.

८. मातृका चक्राचे सम्यक् ज्ञान झालेल्या सिद्धयोग्याच्या शरीराची परमश्रेष्ठ चैतन्यरूपी अग्नीमध्ये आहुती पडते. त्याचा अहंप्रत्ययरूपी क्षोभ परमात्म्यात विलीन होतो.

९. अशा सिद्धयोग्याचे ज्ञान हेच अन्न असते. येथे "ज्ञान" म्हणजे "मर्यादित ज्ञान" मानले तर ते सिद्धयोग्याने (जणू भक्षण करून) नाहीसे करावयाचे असते. ज्ञान म्हणजे "स्वतःच्या मूल स्वरूपाचे विमर्शात्मक ज्ञान"

असा अर्थ घेतल्यास ते सिद्धयोग्याला पूर्ण तृप्ती देऊन आत्म्याच्या ठिकाणी विश्रांती देणारे असते.

१०. शुद्ध विद्येचा ऱ्हास जसजसा होत जाईल तसतसे भेददर्शक प्रपंचरूपी संकल्प उद्भवत जातात; पण श्रीभास्कराचार्यांच्या मते आत्मज्ञानानंतर सामान्य व्यावहारिक ज्ञानाचा लोप होत जाऊन त्या मायिक ज्ञानाशी संबंधित किंवा निर्मित वस्तुजात केवळ स्वप्नगत आहेत, वास्तव नाहीत असे ज्ञान होते.

## ३. आणवोपाय

"अणु"साठी सांगितलेला जो "उपाय" किंवा मोक्षमार्ग आहे तो आणवोपाय होय.

१. विषय वासनेने कलुषित होऊन जे त्रिगुणात्मक विषय प्राप्त होण्यासाठी प्रयत्नशील अशी बुद्धी, अहंकार आणि मन यांचा समुच्चय म्हणजे "चित्त" होय आणि हे चित्त म्हणजे व्यक्तिगत आत्मा होय. हा या योनीतून त्या योनीत हिंडत असल्यामुळे त्याला ( अत् = भ्रमण करणे) "भ्रमण करणारा तो आत्मा" अशी संज्ञा दिली आहे. अशा आत्म्याला "अणू" असे म्हटले आहे.

२. या अणूला इंद्रिये, मन, बुद्धी, अहंकार यांच्यामार्फत मिळणारे ज्ञान हे सत्यज्ञान नसल्यामुळे बंधनकारक ठरते आणि तो संसारात भ्रमण करतो.

३. हे बंधन मायेमुळे होते. येथे "माया" हा शब्द आत्म्याचे सत्यस्वरूप आणि कला, विद्या, राग इत्यादि तत्त्वे, सूक्ष्म शरीर, स्थूल शरीर यांच्यामधील फरक जाणता न येणे अर्थात् अविवेक या अर्थी आला आहे. मायेमुळे सत्यज्ञान होत नाही.

४. योग्याने ज्या तत्त्वांनी "स्थूल", "सूक्ष्म" आणि "कारण" शरीरे बनली आहेत त्यांचा अनुक्रमे ज्यापासून जे तत्त्व आले आहे ते त्याच्या पूर्वीच्या तत्त्वात (उदाहरणार्थ पृथ्वीतत्त्व आपतत्त्वामध्ये) विलीन झाल्याची भावना करावी. अशी भावना करीत करीत शेवटी स्थूलदेह सूक्ष्मदेहात, सूक्ष्मदेह "कारण"देहात विलीन करीत अंतिम तत्त्व जे श्रीशिव त्यांचा साक्षात्कार करून घ्यावा.

श्रीक्षेमराजाचार्यांनी याविषयी असे म्हटले आहे की, ही प्रक्रिया "लय" भावनेने वा "दाह" भावनेने करावी.

५. योग्याने प्राणायामाने इडा व पिंगला या नाड्यांमधून वाहणाऱ्या प्राणापानाचे सुषुम्नानाडीत विलिनीकरण करावे व धारणासामर्थ्याने पृथ्वी,

आप आदि महाभूतांवर विजय मिळवावा, पंचमहाभूतांच्या पासून प्रत्याहारपूर्वक मन काढून घ्यावे व त्या पंचमहाभूतांपासून विभक्तत्व साधावे. (हे आणवोपाय प्रयत्नपूर्वक करावे लागतात. सूत्र १.२० मधील "शांभवोपायात" हे आपोआप अयत्नतः साधतात.)

६. वरील सूत्रात वर्णिलेली सिद्धी मायेने आवृत असते. त्यामुळे परतत्त्वाचे ज्ञान होत नाही.

७. मायेवर संपूर्ण विजय मिळविल्यामुळे सहजविद्येची प्राप्ती होते.

८. तो सहजविद्याजय झालेला योगी जागरूक अर्थात् जागृतावस्थेत अथवा उन्मना असलेल्या श्रीशिवांशी एकरूप असतो. जग हे त्याला आपला एक किरण आहे असे भावते अर्थात् त्याचा द्वैतभाव नष्ट होतो.

९. असा आत्मा विश्वमंचावरील एक नर्तक असतो. त्या त्या भूमिका वठवताना त्याच्या हातून घडणाऱ्या कर्मांपासून तो अलिप्त असतो.

१०. त्याचे सूक्ष्मशरीर अर्थात् पुर्यष्टक हा रंगमंच असतो.

११. त्या अंतरात्म्याच्या नर्तनाची प्रेक्षक ही सिद्धयोग्याची अंतर्मुख झालेली इंद्रिये असतात.

१२. उच्च पारमार्थिक बुद्धीमुळे सिद्धयोग्याला सत्त्व म्हणजे आत्म्याची स्फुरत्ता व सूक्ष्म अंतःस्पंदन अभिव्यक्त करता येते.

१३. अशा सिद्धयोग्याला सहज ज्ञान आणि सर्व विश्वाला वश करण्याचे स्वातंत्र्य मिळते.

१४. ज्याप्रमाणे सिद्धयोग्याला स्वतःच्या शरीरात स्वातंत्र्य व्यक्त करता येते त्याप्रमाणे तो ते दुसरीकडे व्यक्त करू शकतो.

१५. सिद्धयोग्याने सर्व विश्वाचे कारण असलेल्या पराशक्तीकडे अवधान द्यावे.

१६. पराशक्तीवर जर सिद्धयोगी स्थिर झाला तर तो अनायासे म्हणजे ध्यान-धारणादि न करता परारूपी अमृताच्या डोहात म्हणजे हृदामध्ये मग्न होतो.

१७. शुद्ध विद्या प्राप्त झाल्यावर योगी जितक्या प्रमाणात तिच्यात स्थिर झाला असेल तितक्या प्रमाणात त्याची निर्मातृशक्ती असते.

१८. जोपर्यंत योग्यामधील शुद्ध विद्येचा विनाश होत नाही तोपर्यंत योग्याला पुनर्जन्म नसतो.

१९. सहज विद्या प्राप्त झालेल्या योग्याने दक्ष म्हणजे अप्रमत्त राहिले

पाहिजे. नाहीतर "क"वर्गादि वर्णांवर अधिष्ठित असलेल्या मातृका म्हणजे मातृदेवता सामान्य लोकांवर गाजवतात तशी सत्ता त्याच्यावर चालवतील.

२०. जागृती, स्वप्न व सुषुप्ती या अवस्थांमध्ये केवळ प्रारंभी वा शेवटी नव्हे; तर मध्यंतरी सुद्धा तुर्यावस्था कमी होऊ नये. ज्याप्रमाणे तेल सर्व पृष्ठभाग व्यापते त्याप्रमाणे ती तुर्यावस्था जागृती आदि सर्व अवस्था व्यापेल असे करावे.

२१. मन, बुद्धी, प्राण व शरीर ही आत्मा नाहीत हे जाणून त्यांपासून अलिप्त राहून विकल्परहित मनाने तुरीयावस्थेत आत्म्याच्या अंतरंगात प्रवेश करावा.

२२. जरी तुरीया अवस्थेत मग्न झालेला योगी व्युत्थान होऊन नेहमीच्या अवस्थेत आला तरी त्याचा तुरीयावस्थेतील जगदानंद म्हणजे आपल्या विश्वैक्याची जाणीव अखंड कायम राहते. ही शांभवावस्था आहे.

२३. जाग्रतादि अवस्थांचा प्रारंभ व शेवट यांच्या मधल्या अवस्थेत मनाची खालच्या दर्जाची स्थिती होण्याची शक्यता असते. त्यासाठी योग्याने सावधान राहून त्या अवस्था तुर्यावस्थेने व्यापून टाकाव्यात.

२४. ही कमी होणारी तुर्यावस्था सर्व पदार्थ आत्मस्वरूप आहेत म्हणजे प्रत्येक वस्तू श्रीशिवस्वरूप आहे असे अनुसंधान केले असता पुन्हा उत्थान पावते.

२५. अशा रीतीने योग्याच्या ठिकाणी तुर्याप्रकर्ष होऊन तुर्यातीत अवस्था प्राप्त झाली की, सिद्धयोगी श्रीशिवांसारखा म्हणजे श्रीशिवतुल्य (श्रीशिवस्वरूप नव्हे) होतो.

२६. जरी अशी श्रीशिवतुल्य अवस्था प्राप्त झाली तरी प्रारब्ध कर्मांचे फळ भोगून संपविण्यासाठी तो योगी आपले शरीर हे व्रत अर्थात् कर्तव्य असल्याप्रमाणे सांभाळतो किंवा त्याचे पालन करतो.

२७. अहंविमर्शयुक्त अशा सिद्धयोग्याचे बोलणे हा जप असतो.

२८. आत्मज्ञानाचा प्रसार करणे हे त्याचे दान होय.

२९. पशूंवर म्हणजे सर्वसामान्य जीवांवर प्रभुत्व गाजविणाऱ्या "क" वर्गादि वर्णांवर स्थित असणाऱ्या मातृदेवतांवर म्हणजे शक्तिचक्रावर प्रभुत्व मिळविलेला सिद्धयोगीच अध्यात्मज्ञानाचा प्रसारक असतो.

३०. ज्याअर्थी सिद्धयोगी श्रीशिवतुल्य आहे त्याअर्थी विश्व हे श्रीशिवांच्या शक्तिविकासाप्रमाणे सिद्धयोग्याच्या क्रियाशक्तीचा विकास आहे.

३१. विश्वाचे सर्जनच नव्हे; तर त्याची स्थिती व लय सिद्धयोग्याच्या शक्तीचे प्रकटीकरण अर्थात् विकास आहेत.

३२. अविद्येमुळे उत्पत्ती, स्थिती व लय होतो. सहजज्ञान त्यापासून अलिप्त असते. जरी सिद्धयोग्याच्या ज्ञानीपणामुळे या अवस्थांत बदल झाला तरी त्याच्या तुर्यावस्थेच्या आनंदात खंड पडत नाही.

३३. असा सिद्धयोगी सुख व दु:ख या बाह्यवस्तूंप्रमाणे आपल्याशी संबंध नसणाऱ्या आहेत असे मानतो. सिद्धयोग्याचा त्याच्या सूक्ष्म शरीराशी प्रमाता म्हणजे अनुभवणारा म्हणून सुद्धा संबंध नसल्यामुळे सुखदु:खे त्याला स्पर्श करू शकत नाहीत.

३४. सुखदु:खांच्या संस्कारांपासून संपूर्ण मुक्त झालेला सिद्धयोगी केवली अर्थात् केवळ चिन्मात्रस्वरूपावस्था अनुभवणारा होतो.

३५. पण जेव्हा साधक मोहाने म्हणजे मायेने व्याप्त होतो तेव्हा तो आत्मज्ञान लुप्त होऊन शुभाशुभ कर्मांनी लिप्त होतो व संसारात गुरफटला जातो.

३६. विज्ञानाकल, प्रलयाकल व सकल जीवांच्या अनुभूती क्षेत्रातील भेदांचा श्रीमहेश्वरकृपेने लोप होऊन सिद्धयोग्याच्या ठिकाणी स्वत:च्या इच्छेनुरूप सृष्टी निर्मितीचे स्वातंत्र्य व सामर्थ्य येते.

३७. स्वत:च्या संकल्प, स्वप्न इत्यादींमध्ये सृष्टी निर्माण करण्याच्या सामर्थ्यावरून योग्याच्या ठिकाणी असलेल्या सर्जन-सामर्थ्याचे अनुमान करता येईल.

३८. आनंदमय स्वातंत्र्यशक्ती ही जागृती, स्वप्न व सुषुप्ती यांच्या मुळाशी आहे. ही शक्ती स्वत:मध्ये असणारा जो आनंद आहे त्याचे भावनांद्वारा या सर्व दशांमध्ये अनुप्राणन म्हणजे पुनरुज्जीवन करावे. या तीन्ही दशा तुर्यानंदाने भारून टाकाव्यात.

३९. चित्ताच्या दशा जशा तुर्यानंदाने भरून टाकाव्यात असे मागील सूत्रात सांगितले आहे तसे शरीर, इंद्रिये व बाह्य वस्तू यांच्या ठिकाणी तुर्यानंदाचे अनुप्राणन करावे.

४०. देहाला आत्मा मानणारे अविद्यारूपी आणवमलामुळे हव्यास अर्थात् अभिलाषा बाळगतात व बहिर्मुख होऊन या योनीतून त्या योनीत नेले जातात व सुखदु:खे भोगतात.

४१. पारमेश्वरी अनुग्रहाने आत्मस्वरूपाची जागृती येते. सिद्धयोग्याची

संवित् तुर्यावस्थेत स्थिर झाली की, त्याच्या अभिलाषबुद्धीचा क्षय होतो आणि त्याच्या पुर्यष्टकरूपी जीव स्थितीचा नाश होतो.

४२. अभिलाषा नाहीशी होऊन पुर्यष्टकापासून अलिप्त असलेला सिद्धयोगी आपले पंचभूतात्मक शरीर प्रावरणाप्रमाणे अर्थात् आत्मा व शरीर भिन्न असल्याप्रमाणे वापरतो. असा विमुक्त सिद्धयोगी श्रीशिवतुल्य असतो.

४३. जीवन्मुक्तीनंतर सिद्धयोग्याचे शरीर गळून पडत नाही; कारण वैश्विक प्राणशक्तीचा शरीराशी संबंध हा श्रीशिवांच्या इच्छा स्वातंत्र्यामुळे असतो. जोपर्यंत तो संबंध असतो तोपर्यंत सिद्धयोगी देहत्याग करीत नाही.

४४. इडा, पिंगला व सुषुम्ना नाड्यांच्या मधून वाहणाऱ्या प्राणशक्तीच्या अंतर्भागी असलेल्या संवित्च्या सतत होणाऱ्या तीव्र जाणिवेने किंवा स्मरणाने सर्व दशांत व्यवहारात सर्वश्रेष्ठ मी-त्वाची जाणीव राहते. या अवस्थेला "निर्व्युत्थान" समाधी असे म्हणतात.

४५. अशा सिद्धयोग्याच्या बाबतीत पुनःपुन्हा (अखंड) निमीलन व उन्मीलन असलेली प्रतिमीलन समाधी अर्थात् सदोदित अंतर्बाह्य श्रीशिवत्वाची जाणीव असते.



## "श्रीशिवसूत्रप्रबोधिनी" या ग्रंथाला परमहंस परिव्राजकाचार्य श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज यांनी लिहिलेली भूमिका, प्राक्कथन व उपसंहार

### भूमिका

"**श्रीशिवसूत्रे**" या नावाचे हे छोटेसे दर्शनशास्त्र "**काश्मीरी शैव-दर्शनाचा**" संक्षिप्त परंतु अत्यंत गहन आणि उपयोगी असा ग्रंथ आहे. विशेषत: शक्तिपातयोगदीक्षा आणि कुंडलिनी शक्तीच्या साधनक्रमाचे महत्त्व समजण्यासाठी हा ग्रंथ स्वत:चे एक विशिष्ट स्थान ठेवून आहे. जवळजवळ सातशे वर्षांपूर्वी श्रीअभिनवगुप्तपादाचार्य या नावाचे एक विद्वान् पंडित होऊन गेले. हा ग्रंथ त्यांनीच रचला असावा असे म्हटले जाते. श्रीअभिनव-गुप्तपादाचार्यांनी रचलेला याच विषयावरचा "**श्रीतंत्रालोक**" या नावाचा एक मोठा ग्रंथही मिळतो. या ग्रंथमालेचे एकंदर बारा भाग आहेत. एका श्रीअभिनवगुप्तांचे नाव "**श्रीशंकर-दिग्विजय**" नामक ग्रंथातही आलेले आहे. ते आसामप्रांतात राहणारे असून त्यांना भगवत्पाद श्रीमदाद्यशंकराचार्यांनी वादात पराभूत केले होते. "**श्रीशिवसूत्रे**" आणि "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथांचे रचनाकार श्रीअभिनवगुप्तपादाचार्य हे भगवत्पाद श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या खूप नंतरच्या काळात होऊन गेले.

त्यांच्या या दर्शनाला "**उन्मेषवाद**" असेही आपण म्हणू शकतो. त्याला जरी भगवत्पाद श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या विवर्तवादाचे स्पष्टीकरण म्हटले तरी अनुचित होणार नाही. वेदांमध्ये हा दृश्य अर्थात् दिसणारा प्रपंच धात्याच्या अर्थात् धारण करणाऱ्याच्या संकल्पाचा अथवा समवर्तनाचा परिणाम आहे असे म्हटले आहे. उदाहरणार्थ "**यथा धाता पूर्वमकल्पयत्।।**" अर्थात् "ज्याप्रमाणे धात्याने पूर्वी संकल्प केला होता," "**कामस्तदग्रे समवर्तताधि।।**" अर्थात् "काम (इच्छा) इत्यादि सर्वांच्या आधी तो आत्मा संपूर्णपणे अस्तित्वात होता." "**हिरण्यगर्भ: समवर्तताग्रे।।**" अर्थात् "हिरण्यगर्भ (ब्रह्म) सर्वात आधी संपूर्णपणे अस्तित्वात होते" इत्यादि वचनांनी हे सिद्ध होते. ब्रह्माचे सृष्टीच्या रूपात विशेषरूपाने अथवा समरूपाने वर्तमान असणे किंवा अस्तित्वात असणे हेच विवर्तन अथवा समवर्तन आहे.

या दर्शनामध्ये सृष्टीच्या क्रमाला पाच कलांच्या क्रमानुसार उन्मेष अशी संज्ञा दिली आहे. उन्मेष म्हणजे डोळे उघडणे असा अर्थ आहे; परंतु त्याचा

पारिभाषिक अर्थ ज्ञानाचे प्रस्फुरण असा समजला पाहिजे. ज्याप्रमाणे स्वप्नातली सृष्टी ही स्वप्नद्रष्टा अर्थात् स्वप्न पाहणाऱ्याच्या आत्मदेवाचा उन्मेष आहे त्याचप्रमाणे हे दृश्य जगत् धात्याच्या संकल्पाचा उन्मेष आहे. आत्म्याच्या चित्स्वरूपाला ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय या त्रिपुटीच्या अपेक्षेने "**ज्ञः**" असे म्हटले आहे. "**ज्ञः**" मुळे त्रिपुटीचा एकदमच उदय व अस्त होत असतो. त्रिपुटीच्या उदयाला "**ज्ञः**" चा "**उन्मेष**" असे म्हणतात. "**ज्ञः**" नेहमी स्थिर असतो. त्रिपुटीशी संबंध आल्यामुळे त्याच्यामध्ये स्पंदन अथवा कंप येत नाही किंवा तो निस्पंद होत नाही. ही त्रिपुटीच जीवाच्या बंधनाचे कारण बनते. श्रीईश्वराला बंधन नसते; कारण जागृतीमध्ये जीवाचा ज्ञेयोन्मेष श्रीईश्वरीय प्रपंचरूपी ज्ञेयोन्मेषामुळे नित्य सत्य भासू लागतो. "**तिस्रो मात्रा मृत्युमत्यः।। प्रश्नोपनिषद् ५.६।।**" इत्यादींमध्ये त्यांना "तीन मात्रा असे म्हटले असून त्या मृत्यूने युक्त आहेत."

त्या दोघांमध्ये हाही फरक आहे की, आपले स्वप्न शक्तिरहित असते. त्यामुळे त्याची कोणतीही सत्ता असत नाही; परंतु सर्वशक्तिमान् श्रीईश्वराचा उन्मेष सशक्त अथवा शक्तियुक्त आहे; कारण त्याचा संकल्पही शक्तियुक्त आहे. याबद्दल "**श्रीब्रह्मसूत्रे**" या ग्रंथात असे लिहिले आहे की, "**अर्थवती हि सा।।**" अर्थात् "सर्वशक्तिमान् श्रीईश्वराची शक्ती पूर्ण आहे." ती पूर्ण सृष्टी करून पूर्णच शिल्लक राहते. "**पूर्णमदः पूर्णमिदम्**" असे "**ईशावास्योपनिषद्**" या ग्रंथाच्या शांतिपाठात आले आहे. पूर्ण शिल्लक राहिलेल्या शक्तीला "**श्रीअथर्ववेद**" या वेदामध्ये उच्छिष्ट ब्रह्म आणि पुराणांमध्ये शेषनाग असे म्हटले आहे. शेषनाग म्हणजे विश्वकुंडलिनी असे म्हटले जाऊ शकते.

सर्व प्राण्यांचे देहही पूर्ण आहेत. "**यथा ब्रह्माण्डे तथा पिण्डे।।**" अर्थात् "जे ब्रह्मांडात तेच पिंडात आहे." व्यष्टिरूपाने सर्व देहांमध्ये देहाची रचना करून जी शक्ती शिल्लक राहते तिला तंत्रशास्त्रकारांनी कुंडलिनीचे नाव दिले आहे. तीसुद्धा प्रत्येक मनुष्यामध्ये पूर्ण आहे.

श्रीशैवदार्शनिक ब्रह्माला "**श्रीपरमशिव**" असे म्हणतात. त्यांच्या उन्मेषाच्या प्रथमकलेमध्ये श्रीशिव हे शक्तियुक्त असतात. त्यामुळे या कलेमध्ये श्रीशिवशक्ती हे दोघेही प्रथम शांतातीताकलेची दोन तत्त्वे म्हणून सांगितली जातात. शक्तीच्या श्रीशिवांमध्ये अभिव्यक्त होण्याच्या स्थितीला तिसरा श्रीसदाशिव असे म्हटले असून त्यालाच अर्धनारीनटेश्वर असे म्हणतात. या स्थितीला दोन पाकळ्यांच्या बीजासारखेही समजले जाऊ शकते. त्यानंतर शक्ती श्रीशिवांहून

अलग अथवा वेगळी होते. त्यावेळेला श्रीशिवभावाला श्रीईश्वर आणि शक्तीला शुद्धविद्या असे म्हटले जाऊ शकते. या तीन तत्त्वांना शांतिकलेचे अंग मानले आहे.

शक्ती परत क्रियाशील होते. क्रियेत गती, गतीपासून काल, परिणतीपासून कला आणि त्यांच्या क्रमाने नियती या तीन तत्त्वांचा उदय होतो. श्रीशिवांना चिन्मय आणि शक्तीला आनंदमयी असे समजावे. या अभिप्रायानुसार हे "**सच्चिदेकं ब्रह्म**" "ज्ञानरूप श्रीशिव आणि चिदानंद लहरीरूपी शक्ती आहे." यालाच "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथामध्ये अध्यात्मभाव आणि भूतभाव असे म्हटले आहे.

**अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्म उच्यते।**
**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः।।८.३।।**

**अर्थ :-** परम अक्षर अर्थात् ज्याचा कधीच नाश होत नाही असा सच्चिदानंदघन परमात्मा ब्रह्म आहे व आपले स्वरूप अर्थात् जीवात्मा अध्यात्म या नावाने ओळखला जातो. अक्षर ब्रह्मापासून भूतमात्रादि चराचर पदार्थांची उत्पत्ती करणारा जो सृष्टिव्यापार आहे त्याला कर्म असे म्हणतात.

अध्यात्मभाव "**अहम्**" रूपात आणि भूतभाव "**इदम्**" रूपात व्यक्त होतो. श्रीपरमशिव ज्ञानरूप चिन्मय "**ज्ञः**" आहेत. श्रीपरमशिवांमध्ये उन्मेष झाल्यावर "**अहम्-इदम्**" विमर्शाचा उदय होतो. "**इदम्**" मध्ये काल, कला आणि नियती यांच्या योगाने अहम्‌रूपी द्रष्ट्याच्या बहिर्ज्ञानात या तिघांचीही जणू एक भिंत उभी होते. जरी श्रीशिवांच्या विमर्शज्ञानात सर्वज्ञता असते तरीही जीवभावामध्ये ती सीमित अथवा मर्यादित अशी एकदेशीय होते. त्यामुळे काल, कला व नियती ही तीनही मायेची अंगे मानली आहेत; कारण या तीनही गोष्टी ज्ञानाला संकुचित करतात. या तीनही तत्त्वांच्या विमर्शाला येथे विद्या असे म्हटले आहे. तिच्या रागात अर्थात् आसक्तीत पडून श्रीशिवांचा अंशरूपी जीवपुरुष मायाबद्ध अर्थात् मायेने बांधलेला दिसू लागतो.

काल, कला, नियती, विद्या आणि राग हे जीवावर आवरण अथवा झाकणाप्रमाणे असल्यामुळे त्यांना पाच कंचुक अर्थात् अंगरखा म्हणजेच देहाला आच्छादणारा कपडा असे म्हणतात. माया, पाच कंचुक आणि पुरुष यांच्या सहित विद्याकलेची सात तत्त्वे आहेत. शक्तीच्या अव्यक्त दशेपासून महत्‌तत्त्वादि सांख्यांची चोवीस तत्त्वे या शास्त्राला जशीच्या तशी मान्य

आहेत. शेवटचे तत्त्व असणाऱ्या पृथ्वीतत्त्वाला निवृत्तिकला आणि अन्य तेवीस तत्त्वांना प्रतिष्ठाकला यांच्या अंतर्गत मानले आहे. ही चोवीस तत्त्वे अशुद्ध तत्त्वे आणि विद्याकलेची सात तत्त्वे शुद्धाशुद्ध तत्त्वे म्हणविली जातात.

**"जीवो ब्रह्मैव नापरः।।"** अर्थात् "जीव हा ब्रह्मच आहे, आणखी दुसरा कोणीही नाही." **"श्रीमद्भगवद्गीता"** या ग्रंथात असे म्हटले आहे की,**"ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः।।१५.७।।"** अर्थात् "या देहात हा जीवात्मा माझाच सनातन अंश आहे." तो इंद्रिये आणि मन यांनी युक्त होऊन संसारामध्ये सुखदुःखांचा भोक्ता होतो. **"श्रीशिवसूत्रे"** या ग्रंथात मायेकडून जीवाच्या बंधनाचे कारण ज्ञेयरूप प्रपंचाचे ज्ञान आहे असे म्हटले आहे. **"ज्ञानं बन्धः।।१.२ व ३.२।।"** जणू आत्म्याच्या ज्ञानाला मायेचे पाच कंचुक आवरण घालून अहम्-ममरूपी पाशात बांधून घालतात. त्यामुळेच येथे जीवाला पशू आणि श्रीशिवांना पशुपती असे म्हटले आहे. कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यानंतर तत्त्वांची शुद्धी करून जीवाला पाशमुक्त करते. पाचही कलांचे नामकरण त्यांच्या अंगस्वरूप तत्त्वांच्या शुद्धीनुसारच केले गेले आहे अर्थात् भोगांपासून निवृत्त झाल्यामुळे निवृत्ति-कलेची शुद्धी होते. शक्तीच्या प्रतिष्ठेद्वारा अव्यक्ततत्त्वाची शुद्धी होते. विद्या-कलेची शुद्धी विद्येद्वारा, शांतिकलेची शुद्धी शांतीमुळे आणि शांतातीता-कलेची शुद्धी शांतातीताद्वारा होते.

यासंबंधी **"श्रीशिवपुराण"** या पुराणग्रंथाच्या वायवीय संहितेच्या एकोणतीसाव्या अध्यायामध्ये असे म्हटले आहे की -

**प्रापिका व्यापिका शक्तिः पञ्चतत्त्वविशोधनात्।**
**निवृत्त्या रुद्रपर्यन्ता स्थितिरण्डस्य शोध्यते।।२१।।**
**प्रतिष्ठया तदूर्ध्वं तु यावदव्यक्तगोचरम्।**
**तदूर्ध्वं विद्यया मध्ये यावद्विद्येश्वरावधि।।२२।।**
**शान्त्या तदूर्ध्वमध्वान्ते विशुद्धि शान्त्यतीतया।**
**यमाहुः परमं व्योम परप्रकृतियोगतः।।२३।।**

**अर्थ :-** व्यापिका शक्ती पाच तत्त्वांची शुद्धी करीत असल्यामुळे तिला प्रापिका असे म्हणतात. निवृत्तीमुळे अंडाच्या रुद्रपर्यंत स्थितीचे शुद्धिकरण केले जाते. जोपर्यंत त्याच्यावर गोचर अर्थात् इंद्रिये अव्यक्त होत नाहीत तोपर्यंत प्रतिष्ठा अर्थात् शक्ती द्वारा शुद्धी केली जाते. जोपर्यंत त्याच्यावर

श्रीविद्येश्वराची मर्यादा आहे तोपर्यंत विद्येने शुद्धी केली जाते. त्याच्यावर अध्वांचा किंवा मार्गांचा नाश होईतोपर्यंत शांतिकलेद्वारा व त्याच्यावर शांत्यातीताकलेद्वारा विशुद्धी होते. याला परप्रकृतीच्या योगाने परमव्योम असे म्हणतात.

व्यापिका आणि प्रापिका या दोन्ही पदांमध्ये **"आप् अर्थात् प्राप्त करणे"** हा धातू आहे. जी व्यापक असूनही प्राप्त होत नाही आणि दृष्टि-गोचर अथवा अनुभवगम्य होत नाही तीच ज्यावेळेला तत्त्वांचे शोधन करू लागते त्यावेळेला तिचा अनुभव येण्याला सुरुवात होते अर्थात् **"व्यापिका"** म्हणजे सुप्तावस्था आणि **"प्रापिका"** म्हणजे जागृतावस्था असे समजले पाहिजे. जागृत होऊन कुंडलिनी शक्ती कोणत्या क्रमाने तत्त्वांचे शोधन करते ते येथे सांगितले आहे. छत्तीस तत्त्वांना पाच कलांमध्ये त्यांच्या शुद्धिक्रमानुसार ठेवले आहे आणि कलांची नावेही त्याच दृष्टिकोनातून ठेवली आहेत. शक्ती जागृत झाल्यानंतर तिची क्रियावती, कलावती, वर्णमयी आणि वेधमयी अशी चार रूपे सांगितली आहेत. ती वेगवेगळ्या क्रिया स्वतः करविते म्हणून तिला **"क्रियावती"** असे म्हणतात. ती पाचही कलांचे रूप धारण करून तत्त्वांना शुद्ध करते म्हणून **"कलावती"** असे तिचे नाव आहे. तीच मातृकाशक्तीच्या रूपात व्यक्त होते म्हणून तिला **"वर्णमयी"** असे म्हणतात; तर षट्चक्रांचा ती वेध करते म्हणून तिला **"वेधमयी"** असे म्हणतात.

शक्तिपातयोगदीक्षा घेतलेल्या सिद्धयोगसाधकभक्तयोगिशिष्यांचा असा अनुभव आहे की, कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यानंतर विषयभोगांपासून वृत्ती दूर होऊ लागते अर्थात् निवृत्ती येते. मग कुंडलिनी शक्ती योग्य तऱ्हेने आपले स्थान पक्के करते व आपला परिचय देऊ लागते. मातृकाशक्ती श्रीसरस्वतींच्या रूपात व्यक्त होऊन विद्या प्रदान करते आणि शांती तसेच समाधिरूप शांत्यातीताकलेपर्यंत घेऊन जाते. **"श्रीतंत्रालोक"** या ग्रंथात श्रीअभिनवगुप्तपादाचार्य असे म्हणतात की,"ब्रह्मतत्त्व कल्पनेच्या पलीकडील आहे. त्यामुळे ते प्राप्त करण्याचे साधनही कल्पनातीतच असले पाहिजे. ते साधन म्हणजेच कुंडलिनी शक्तीचे जागृत होणे होय."

**"भावनोपनिषद्"** या ग्रंथात क्रियाशक्तीला पीठ, ज्ञानशक्ती कुंडलिनीला गृह आणि इच्छाशक्तीला महात्रिपुरसुंदरी असे म्हटले आहे. विषयभोग पार्थिव आहेत. त्यामुळे ते निवृत्तिकलेच्या अंतर्गत आहेत. त्याचप्रमाणे प्रथम तेवीस

तत्त्वे प्रतिष्ठाकलेमध्ये अंतर्भूत आहेत. प्रतिष्ठाकलेमध्ये शक्तीचे ज्ञानरूप विकसित होते. त्यामुळे त्याला "**गृह**" अर्थात् घर असे म्हटले आहे ते योग्यच आहे. विद्या ही रागयुक्त असताना अशुद्ध आणि रागमुक्त अर्थात् आसक्तिरहित असताना शुद्ध म्हणविली जाते. शुद्धविद्येचे स्थान शांतिकला आहे. शुद्धविद्येलाच "**महात्रिपुरसुंदरी**" असे म्हटले आहे.

निवृत्तीचे दार्शनिक स्वरूप उपर्युक्त "**प्रश्नोपनिषद्**" या ग्रंथाच्या श्रुतीमध्ये दाखविले आहे. तेथे असे म्हटले आहे की, "त्रिपुटी मृत्युमती म्हणजे मृत्यूने युक्त आहे; कारण ज्ञान आणि ज्ञेयाने बहिर्मुखी आणि मध्य स्थितीच्या क्रियांमध्ये ज्ञान त्याचप्रमाणे याच्या उलट ज्ञेय ज्ञानाने आणि ज्ञान ज्ञात्याने युक्त होऊन अभ्यंतर्मुखी क्रियांमध्ये एकमेकांशी आसक्त म्हणजे चिकटून राहतात. जरी ते एकमेकांना अगदी घट्टपणे चिकटलेले असतील तरी "**ज्ञः**" कंपित होत नाही. मृत्यूचे स्थान देह आहे; मात्र "**ज्ञः**" आत्मा अमर आहे. त्यामुळेच त्रिपुटीच्या अन्योन्यासक्तीच्या म्हणजेच एकमेकांच्या आसक्तीच्या विच्छेदाला किंवा तोडण्याला "**निवृत्ती**" असे म्हटले आहे. जर ज्ञान व ज्ञेयाची आसक्ती संपून जाईल तर ज्ञाता ज्ञानापासून तटस्थ अथवा अलिप्त राहू लागेल किंवा जर आत्मस्थित होऊन संकल्पांचा त्याग करू लागेल तर तो देहासक्तिरूप बंधनातून मुक्त होईल. हीच "**अमरत्वाची प्राप्ती**" होय.

या श्रुतीनंतर पुढे उपरोक्त उपनिषदात ॐकार उपासना ही ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय यांच्या एकमेकांबद्दलच्या आसक्तीच्या विच्छेदनासाठी अर्थात् नष्ट करण्यासाठी साधन किंवा उपाय म्हणून सांगितली आहे. त्या ॐकारातल्या "अ"काराला ऋग्वेदरूपी ज्ञेय, "उ"काराला श्रीसामवेदरूपी ज्ञान आणि "म"काराला श्रीयजुर्वेदरूपी ज्ञाता असे म्हटले असून त्यांना "**तीन मात्रा**" असे नाव दिले आहे. या दृष्टीने "**प्रश्नोपनिषद्**" या ग्रंथामध्ये असे म्हटले आहे की -

**तिस्रो मात्रा मृत्युमत्यः प्रयुक्ता**
**अन्योन्यसक्ता अनुविप्रयुक्ताः ।**
**क्रियासु बाह्याभ्यन्तरमध्यमासु**
**सम्यक्प्रयुक्तासु न कम्पते ज्ञः ।।५.६।।**

**अर्थ :-** ॐकाराच्या "**अ**"कार, "**उ**"कार व "**म**"कार अशा तीन मात्रा आहेत; पण ज्यांनी मृत्यूच्या विषयाचे अतिक्रमण केलेले नाही अर्थात्

ज्यांना मृत्यू आहे अर्थात् जे लोक या पृथक्-पृथक् मात्रांचे एकीकरण करू शकले नाहीत त्यांना त्या मृत्युगोचरच असतात. या मात्रांचा आत्म्याच्या ध्यानक्रियेत विनियोग केला आहे. शिवाय या तिन्ही मात्रा अन्योन्यसंबद्ध आहेत. त्याचप्रमाणे या मात्रा अनविप्रयुक्ता म्हणजे ज्यांचा पृथक्-पृथक् प्रयोग केलेला नाही अशा असतात. विशेषतः एकाच ध्यानकाली बाह्य, आभ्यंतर व मध्यम या तीन योगक्रियांमध्ये त्यांचा चांगल्याप्रकारे प्रयोग केला असता ॐकाराचा हा पूर्वोक्त विभाग जाणणारा साधकभक्तयोगिशिष्य मनात चंचल होत नाही.

जाग्रत, स्वप्न व सुषुप्त स्थानांतील पुरुषाचे अभिध्यान करणे या बाह्य, मध्यम व आभ्यंतर अशा तीन योगक्रिया आहेत. (जाग्रत्पुरुष हा वैश्वानराभिन्न विश्व आणि त्याचे स्थान स्थूलशरीर व जागरित स्वाप्न अर्थात् स्वप्नातील जागृत पुरुष आहे. हिरण्यगर्भाभिन्नपुरुष हा तैजस आणि त्याचे स्थान लिंग-शरीर व स्वप्न आहे आणि सुषुप्तपुरुष हा श्रीईश्वराभिन्न प्राज्ञ आणि त्याचे स्थान अव्याकृत व सुषुप्ती आहे. त्याच्यापुढे "**मांडूक्योपनिषद्**" या ग्रंथात सांगितल्याप्रमाणे अन्य अकार, उकार व मकार यांच्या तादात्म्याने अभिध्यान केले असता व या योगक्रियांमध्ये अन्योन्यसंबद्ध व ब्रह्मदृष्टीने संश्लिष्ट अशा तीन मात्रांचा उपयोग केला असता उपासक मनात कंपित होत नाही अर्थात् या वाक्याने सर्वात्मक परब्रह्माचे ॐकारभेदाने ध्यान करावयाला सांगितले आहे.)

त्रिपुटी शिल्लक असताना "**ज्ञः**" रूपी आत्म्याचे अनुसंधान करणे म्हणजेच योग होय. "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथात श्रीगोपालकृष्णनाथमहाराज असे म्हणतात की -

**शनैः शनैः उपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया।**
**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किञ्चिदपि चिन्तयेत्।।६.२५।।**

**अर्थ :-** साधकभक्तयोगिशिष्याने क्रमाक्रमाने अभ्यास करीत शांत होत जावे. तसेच धैर्ययुक्त बुद्धीने मनाला परमात्म्याच्या ठिकाणी स्थापन करून त्या परमात्म्याशिवाय दुसऱ्या कशाचेही चिंतन करू नये.

पूज्यपाद श्रीमदाद्यशंकराचार्यही असे म्हणतात की "**एष योगस्य परमो विधिः।।**" अर्थात् "हा योगाचा सर्वश्रेष्ठ विधी आहे." जेव्हा मन व बुद्धी विषयांपासून सर्व प्रकारे मागे येतील तेव्हाच आत्मस्थित होऊन कोणताही विचार न करणे शक्य आहे. आत्मशक्ती कुंडलिनी जागृत होऊन साधक-

भक्तयोगिशिष्यात एका अपूर्व आनंदाची लहर जागवील आणि विषयभोगां-पासून चित्ताला मागे आणील. हा बहुधा सर्वच साधकभक्तयोगिशिष्यांचा अनुभव आहे.

## प्राक्कथन

"**श्रीशिवसूत्रे**" हे काश्मीरी श्रीशैवसंप्रदायाचे सात-आठ शे वर्षे इतके जुने सत्त्याहत्तर सूत्रांचे एक छोटेसे श्रीशैवदर्शन आहे. ते श्रीअभिनवगुप्तपादाचार्य यांनी रचलेले आहे. श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनीच रचलेला शक्तिपात या विषयावरचा आणखी एक बारा खंडांचा ग्रंथ आहे. त्याचे नाव "**श्रीतंत्रालोक**" असून त्यातलाच विषय लेखकाने केवळ सत्त्याहत्तर सूत्रांमध्ये सांगितला आहे.

या ग्रंथात तीन उन्मेष आहेत. त्यांची नावे क्रमशः शांभवोपाय, शाक्तोपाय आणि आणवोपाय अशी आहेत. तीनही उन्मेषांच्या शेवटी "उपाय" हा शब्द या गोष्टीचा द्योतक आहे की, या ग्रंथात कोणत्यातरी लक्ष्याच्या प्राप्तीकरिता अथवा सिद्धीसाठी एका विशिष्ट साधनाक्रमाचे प्रतिपादन केले असून या तीनही उन्मेषांना साधकभक्तयोगिशिष्यांच्या अवस्थांनुसार आणव, शाक्त व शांभव असे म्हणतात आणि या तीन पूर्ण साधनक्रमांना तीन स्तरांमध्ये विभक्त करतात. त्यामुळेच सर्वप्रथम तीनही स्तरांमधला भेद आणि ज्या आधारावर वरती सांगितलेले भेद मानले गेले आहेत त्या साधनाची मानसिक आणि आध्यात्मिक अवस्था यांचे ज्ञान होणे आवश्यक आहे. उन्मेषाबद्दल पुढे योग्य वेळेला विचार करण्यात येईल.

शांभव म्हणजे ब्रह्म किंवा श्रीशिवभाव, शाक्त म्हणजे शक्तियुक्त भाव आणि आणवापासून अल्पज्ञ जीवभाव असे समजावे. ब्रह्म अथवा परम श्रीशिव सत्, चित् व आनंदरूप आहेत हे सर्वांना मान्य आहे. जीव त्यांचा अंशरूप आहे अर्थात् श्रीशिव आणि जीव यांच्यामध्ये सजातीय भिन्नत्व नसून त्यांचा अंश व अंशी असा संबंध आहे. दोघांमध्येही केवळ ज्ञानाच्या परिमाणाचाच फरक आहे.

आणवोपायात असे म्हटले आहे की, ज्याप्रमाणे दवबिंदूवर पडलेला प्रकाश स्वतःला दवबिंदूच समजू लागतो त्याप्रमाणे जीव आपले वास्तविक ज्ञानस्वरूप विसरतो आणि चित्तालाच आत्मा समजू लागतो. आणवोपायाचे साधन हा भ्रम हटवून साधकभक्तयोगिशिष्याला आपल्या वास्तविक श्रीशिवस्वरूपाचे ज्ञान करून देण्याची इच्छा करते. जीवावस्थेत व्यापक

असणारे शांभवज्ञान चित्ताशी तादात्म्य पावून चित्ताच्या संस्कारांपर्यंतच सीमित राहते आणि अहंतेमुळे तेवढ्याच शक्ती आणि ज्ञानाच्या आधारावर कर्तृत्व व भोक्तृत्व यांचा अभिमान धरून अनेक कर्मविपाकांच्या जाळ्यात अडकून राहते.

चित्तात्मक ज्ञान विभूचा अंश असल्याकारणाने आणव म्हणविले जाते. येथे एक गोष्ट विचार करण्यासारखी आहे की, शास्त्रांचे सांगणे आणि श्रेष्ठ पुरुषांचा अनुभव असा आहे की, जीवाबरोबर श्रीईश्वरही राहतो. आता असा प्रश्न उभा राहतो की, जीवाप्रमाणे श्रीईश्वराच्या ज्ञानावर चित्ताच्या संसर्गामुळे अणुत्व का येत नाही?; कारण ते दोघेही समान रूपात बरोबरच राहत असतात. याचे उत्तर असे दिले जाते की, जीव मायेच्या अधीन राहून आपले स्वरूप विसरून जातो आणि श्रीईश्वर मायेच्या साक्षिरूपात तटस्थ राहतो. त्यामुळेच मायेच्या पाशात बांधलेल्या जीवांना पशू आणि श्रीशिवांना "**पशु-पती**" असे म्हटले आहे.

यानंतर असा प्रश्न येणे साहजिकच आहे की, माया म्हणजे काय आणि तिचे स्वरूप कसे आहे? वेदान्त्यांचे याबाबतीत असे म्हणणे आहे की, "**मा**" म्हणजे जी नाही आणि "**या**" म्हणजे जी आहे असे भासते, ती माया होय. परंतु ही अभावात्मक व्याख्या पूर्णरूपाने शंकेचे समाधान करीत नाही. श्रीशैवदार्शनिकांच्या मते "**मा**" म्हणजे मापणे किंवा मोजणे असून जी विभू अर्थात् व्यापक तत्त्वाला मापात घालते अर्थात् मर्यादित करते ती अज्ञानात्मिका माया होय. अज्ञान याचा अर्थ ज्ञानाचा अभाव नसून अज्ञान म्हणजे अपूर्ण किंवा संकुचित ज्ञान होय. देश, काल आणि नियती यांचे अस्तित्व तात्त्विक नसूनही उपेक्षित केले जाऊ शकत नाही. ते ज्ञानाला आपल्या क्षेत्रात सीमाबद्ध करीत असतात. या अपूर्ण दृष्टीला माया अथवा अविद्या असे म्हणतात. त्यामुळेच जीवाला मायामल, आणवमल आणि कर्तृत्वभोक्तृत्वमल यांनी आवृत म्हणजे झाकलेला असे म्हटले जाते.

कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यानंतर शाक्तोपायाची सुरुवात होते. ज्यांना शक्तिपातयोगदीक्षेची प्राप्ती झालेली आहे अशा साधकभक्तयोगिशिष्यांना हे सांगण्याची काहीच आवश्यकता नाही की, कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यानंतर ती स्वतःच कार्य करू लागते. त्यामुळेच याला क्रियायोग असेही म्हणतात. आणवोपायाचा साधकभक्तयोगिशिष्य ज्या क्रिया स्वतःच्या प्रयत्नांनी करतो त्या क्रिया कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यानंतर आपोआपच होऊ लागतात.

साधकभक्तयोगिशिष्याला असा अनुभव येऊ लागतो की, आपल्या अंतरात अशी शक्ती जागृत झाली आहे की, ती सर्व साधनांना पूर्णरूपाने जाणते आणि त्यांच्या क्रियांमध्ये कोणत्याही त्रुटीचे भय राहत नाही. बहुधा असे पाहण्यात येते की, हठयोगाच्या साधकभक्तयोगिशिष्यांना बऱ्याचदा अनेक शारीरिक आणि मानसिक व्याधींचे शिकार व्हावे लागते. त्यांचा उपचारही कधी कधी असाध्य होतो आणि या व्याधी त्यांच्या कर्तृत्वाभिमानाच्या असावधानतेमुळे होतात. परंतु शाक्तोपायाच्या साधकभक्तयोगिशिष्यांच्या बाबतीत असे काहीही होत नाही. ती देवात्मिका पराशक्ती साधकभक्तयोगिशिष्यांकडून त्याची भूमिका आणि बलाबलानुसार अनायास साधन करवून घेते; कारण शक्ती ज्ञानाने युक्त आहे. यासंबंधी **"श्वेताश्वतरोपनिषद्"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**पराऽस्य शक्तिर्विविधैव श्रूयते।**
**स्वाभाविकी ज्ञान बल क्रिया च।।६.८।।**

**अर्थ :-** याच्या अर्थात् ब्रह्माच्या स्वाभाविक अर्थात् अनादिसिद्ध अशा ज्ञान, क्रिया व बलादि विविध श्रेष्ठ शक्ती ऐकिवात आहेत.

त्यामुळेच कुंडलिनी शक्ती जागृत झाली असता जीवाचा कर्तृत्वाभिमान आपोआप शिथिल अथवा सैल होऊ लागतो, शरणागतीचा भाव उत्तरोत्तर वाढू लागतो आणि सर्वात शेवटी कर्तृत्वाभिमान क्षीण झाल्यानंतर तो साधकभक्तयोगिशिष्य आणवमलातून पूर्णपणे वर येतो. अशा प्रकारे जागृत कुंडलिनी शक्ती त्याला स्वतः शांभवोपायाच्या स्तरावर घेऊन जाते.

**"जीवो ब्रह्मैव नापरः।।"** अर्थात् "जीव हा ब्रह्माशिवाय वेगळा असा काहीही नसतो;" परंतु **"कठोपनिषद्"** या ग्रंथात असे म्हटले आहे की, **"आत्मेन्द्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः।।१.४।।"** अर्थात् "आत्मा हा इंद्रिय आणि मनाने युक्त झाल्यामुळे त्याला विद्वान् **"भोक्ता"** असे म्हणतात." त्याचा चित्ताशी होणारा तादात्म्यभाव हा इंद्रिये आणि भौतिक देहापर्यंत खाली उतरून येतो. तो जीव कर्मेंद्रियांच्या संबंधामुळे स्वतःला **"कर्ता"** म्हणवून घेतो आणि ज्ञानेंद्रियांच्या योगाने भोक्ता आणि देहाची आसक्ती असल्याकारणाने स्वतःला मरणशील मानतो; परंतु त्याचे सत्स्वरूप अमरत्व असेच सांगते की, मी कधीही मरणार नाही व हे शरीर कायम अमर राहावे. आनंदाचा भाव विषयांच्या सुखांचे रूप धारण करतो अर्थात् त्याच्यात सत्स्वरूप, चित्स्वरूप, आणि आनंदस्वरूपात अणुत्व अर्थात् संकुचितपणा

येतो.

आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत झाल्यानंतर साधकभक्तयोगिशिष्यांना सर्वप्रथम एका अपूर्व आनंदाच्या आवेशाचा आणि मस्तीचा अनुभव येतो. तास तास आसनावर बसून राहिले तरीही तेथून उठावे असे वाटत नाही. क्रिया होतात; पण त्याही अपूर्व आनंदाचा स्त्रोत निर्माण करणाऱ्या असतात. हसणे, रडणे, ओरडणे आदि सर्व त्याला आनंदविभोर करतात. त्यामुळे भगवत्पाद श्रीमदाद्यशंकराचार्यांनी रचलेल्या "**श्रीसौंदर्यलहरी**" या ग्रंथाच्या आठव्या श्लोकात कुंडलिनीला चिदानंदलहरी आणि एकवीसाव्या श्लोकात परमानंदलहरी असे म्हटले आहे.

जर विचारपूर्वक पाहिले तर हा आनंद म्हणजे आत्म्याचे स्वतःचे स्वरूप आहे. आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत झाल्यानंतर चित्त आणि आत्म्याचे तादात्म्य, जे अणुत्वाचे कारण आहे, ते शिथिल होऊ लागते आणि आत्मानंदाचे आंशिक स्फुरण सुरू होते. त्याचबरोबर विषयांपासून विरक्ती येऊ लागते आणि भोगेच्छा कमी कमी होऊ लागते. कर्तृत्वाभिमान क्षीण झाल्यानंतर मन संकल्प-विकल्पांच्या स्थानी स्थिरतेमध्ये अभ्यस्त अर्थात् अभ्यासयुक्त होऊ लागते आणि मौन होऊन आत्मानंदाच्या रसास्वादनात बुडून राहू लागते. या संबंधी "**तैत्तिरीय उपनिषद्**" या ग्रंथातील ब्रह्मवल्लीमध्ये असे म्हटले आहे की -

**आनन्दं ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कुतश्चनेति।।९.१।।**

**अर्थ :-** जो विद्वान् सर्व एषणारहित श्रोत्रियाच्या आत्मभूत, विषय-विषयिसंबंधशून्य, नित्य व अविभक्त अशा अखंड ब्रह्माच्या परमानंदाला जाणणारा असतो तो कोणत्याही कारणाने भीत नाही.

चिदानंदामध्ये "**चित्**"ला ज्ञानस्वरूप श्रीशिवभाव आणि आनंदाला शक्तिरूपा श्रीभगवतीचा भाव समजले पाहिजे. या दोघांच्या एकत्व संबंधाचे निरूपण भगवत्पाद श्रीमदाद्यशंकराचार्यांनी खालीलप्रमाणे वर्णन केले आहे.

**शरीरं त्वं शम्भोः शशिमिहिरवक्षोरुहयुगं**
**तवात्मानं मन्ये भगवति नवात्मानमनघम्।**
**अतः शेषः शेषीत्ययमुभयसाधारणतया**
**स्थितः सम्बन्धो वां समरस परानन्दपरयोः।।**

**अर्थ :-** हे भगवती! तू श्रीशंभूंचे शरीर आहेस. तुझ्या वक्षस्थळावर दोन्ही स्तनरूपी चंद्र आणि सूर्य आहेत. मी निष्पाप भगात्मा अर्थात् संसाराचा

आत्मा असणाऱ्या श्रीशंकरांना तुझा आत्मा मानतो. त्यामुळे आपणा दोघात परानंद आणि परमात्म्याचा साधारणतया शेष अर्थात् विशेषण आणि शेषी अर्थात् विशेष असा संबंध आहे.

अशा प्रकारे शाक्तोपायाच्या आनंदातून वर येऊन चैतन्यज्ञानयुक्त शांभवोपायाचा उदय होतो. शास्त्रकारांनी प्रथम उन्मेषात शांभवोपायाला, दुसऱ्यात शाक्तोपायाला व तिसऱ्यात आणवोपायाला स्थान दिले आहे. शांभवोपाय हा उपाय म्हणजेच साधनाचे अंग असल्याकारणाने शांभव अथवा श्रीशिव किंवा ब्रह्मभावाला मोक्ष म्हटले जाऊ शकत नाही; कारण अंतिम शिल्लक राहिलेले आवरण हटविण्यासाठी उपाय हेच या ग्रंथाच्या पहिल्या उन्मेषात सांगितले आहे.

## उपसंहार

हे आधीच सांगितलेले आहे की, हे "**श्रीशिवसूत्रे**" या नावाचे श्रीशैव-दर्शन जीव-ब्रह्माचे ऐक्य अर्थात् अद्वैतवादाचे प्रतिपादन करणारे आहे; परंतु त्याचबरोबर साधकभक्तयोगिशिष्यांचा दृष्टिकोण लक्षात घेऊन हे दर्शन साधनक्रमही उलगडून सांगते. या साधनाद्वारा साधकभक्तयोगिशिष्य जीव-भाव सोडून ब्रह्मभावाची प्राप्ती करून घेतो. या शास्त्रात जीवाला पशू आणि ब्रह्माला पशुपती असे म्हटले आहे अर्थात् मनुष्यामध्ये पशू, देव आणि ब्रह्म असे सर्व भाव पाहवयाला मिळतात. "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथातल्या नवव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकात तर राक्षसी आणि आसुरी भावांचाही उल्लेख केलेला आहे.

"**श्रीपातंजलयोगदर्शन**" या ग्रंथाचे वृत्तिकार असे म्हणतात की, "क्षिप्तचित्त अर्थात् रजोगुणाच्या उद्रेकाने अस्थिर, बहिर्मुख, सुखदुःखादि विषयांमध्ये गुंतून राहणारे मन दैत्य-दानवांचे असते. तमोगुणाच्या उद्रेकाने कृत्याकृत्य अर्थात् कोणते काम करणे योग्य आहे आणि कोणते नाही हा विवेक अर्थात् विचार नसलेले आणि क्रोधादि भावांमुळे नेहमी विरोधी विचार करणारे मन राक्षसपिशाच्चांचे असते. सत्त्वगुणाच्या उद्रेकाने सुख आणि दुःख यांच्या साधनांमध्ये विचारपूर्वक प्रवृत्त होणारे मन हे देवतांचे असते." इंग्लिश भाषेत एक म्हण अशी आहे की, Man is a rational animal or man is dattan or man is divine. अर्थात् "मनुष्य हा विचारी किंवा आसुरी किंवा दैवी प्राणी आहे." याकरिता साधकभक्तयोगिशिष्याने आसुरी आणि राक्षसी भावांपासून मुक्तच राहिले पाहिजे.

साधकभक्तयोगिशिष्य सत्त्वगुणाचा आश्रय घेऊन पशुभावापासून देवभावापर्यंत अग्रेसर होण्याची इच्छा करीत असतो. या दर्शनात "**भैरवीभाव ।।१.५।।, वीरेश किंवा वीरभाव।।१.११।।, कुमारी (बाला) रूपी इच्छा-शक्तियुक्त शाक्तभाव।।१.१३।।, अपशुशक्तिभाव।।१.१६।।, श्रीशिवा-वस्थाभाव।।२.५।।, सिद्धभाव।।३.१३।।, श्रीशिवतुल्यभाव।।३.२५।।, केवलीभाव।।३.३४।।** व **श्रीशिवभाव।।३.४२।।**" असे भाव सांगितले आहेत. हे भाव म्हणजे पशुभाव आणि श्रीशिवभाव यांच्यामधले साधनसोपान म्हणून जाणले पाहिजेत.

जो मनुष्य देहाच्या भोगांनाच जीवनध्येय मानतो तो एक समजुतदार पशूच आहे. उपनिषदातही मनुष्यांना "**देवानां पशुः।।**" अर्थात् "देवांचा पशू असे म्हटले आहे." पशूला बांधण्यासाठी पाश असतात. वास्तविक मोहरूपी राग हाच मुख्य पाश असून तोच काम, क्रोध, लोभ, मोह, मात्सर्यादि रूपात प्रकट होत असतो. ज्यावेळेला मनुष्य कामक्रोधादि कोणत्याही आवेशा-मध्ये येतो त्यावेळेला तो त्याच भावासारखा अर्थात् त्या भावानुरूप होऊन जातो. या भावांना मनुष्याच्या "**पाशवी शक्ती**" असेही म्हटले जाते. साधक-भक्तयोगिशिष्य या सर्वांना जिंकण्यासाठी, त्यांच्या पलीकडे जाण्यासाठी प्रयत्न करतो आणि हाच आणवोपायाचा विषय आहे; परंतु शक्तिपातयोगदीक्षेद्वारा शुद्ध शक्तिरूप कुंडलिनी जागृत झाल्यानंतर या पाशवी शक्ती सूत्र।।३.१९।। मध्ये सांगितलेल्या अपशुशक्तींमध्ये म्हणजेच दिव्य शक्तींमध्ये परिवर्तित होतात. आणवोपायातले "**आत्मा चित्तम्।।३।।**" हे सूत्र असा संकेत देते की, आत्म्याची चेतनसत्ता चित्ताकाशावर प्रतिभासित झाल्यामुळे अणू म्हणजेच संकुचित झाली आहे आणि चित्तामध्ये स्फुरित अहंभाव पशूंपासून देवतां-पर्यंत सर्वांमध्ये पाहिला जातो.

देहाभिमान जेवढा दृढ असतो तेवढा पशुभाव अधिक होत जातो. देहातून जरा वरच्या सूक्ष्मस्तरांवर पशुभाव क्षीण होत जातो. शक्तिपातयोग-दीक्षेद्वारा देवात्मशक्तीची जागृती साधकभक्तयोगिशिष्याला दैवी शक्तीचा अनुभव करून देते. जोपर्यंत अपशुशक्ती जागृत होत नाही तोपर्यंत हे दोन्ही भाव खूप वरच्या स्तरापर्यंत जागृत असतात. शांभवभावामध्ये याच शक्ती श्रीशिवभावात परिणत होतात. त्यामुळेच त्यांना सूत्र।।१.४।। मध्ये ज्ञानात्मिका मातृकाशक्ती असे म्हटले आहे.

पशुभावामध्ये बुद्धिसत्त्वावर देहासक्ती, देहाच्या भोगांची आसक्ती आणि

भोगांच्या वासनांचे संस्कार राहतात. ते रजोगुण आणि तमोगुणप्रधान असतात. भौतिक देह पंचभूतांनी निर्मिलेला असून तो विराट्च्या तमोगुणी अहंकाराचा परिणाम आहे. इंद्रिये राजस अहंकाराची आणि मन सात्त्विक अहंकाराची विकृती आहे. आणवमलाचे दोन स्तर आहेत. (१) पाशविक पाशांच्या बंधनांनी युक्त आणि (२) शुद्ध सत्त्वगुणाचे स्वरूप असणाऱ्या पाच कंचुकांनी म्हणजेच मायामलाने युक्त, असे हे दोन स्तर आहेत. त्यामुळेच साधक-भक्तयोगिशिष्याच्या उन्नतिपथाचा पहिला स्तर पशुभावापासून मुक्त होणे हा आहे आणि तो शुद्धतत्त्वाच्या अनुसंधानाद्वारा संपन्न होतो. त्याच्यानंतर शुद्धतत्त्वाचा उदय झाल्यानंतर सूत्र।।१.२१।। मध्ये म्हटल्याप्रमाणे मायेचे पाच कंचुक नष्ट झाल्यानंतर मायामल अणुभावाची निवृत्ती होते.

येथे साधनाचे दोन मार्ग सांगितले आहेत. शक्तिपातरहित व शक्तिपाता-नंतर कुंडलिनी जागृतिसहित असे साधनाचे दोन मार्ग आहेत. प्रथम श्रेणीचा साधकभक्तयोगिशिष्य मंत्रादींच्या दीक्षेद्वारा यत्नपूर्वक साधन करीत असतो. अष्टांगयोग, लययोग, देवपूजा, अनुष्ठानादि ज्या ज्या गोष्टी क्रियासाध्य आहेत त्या याच श्रेणीच्या अंतर्गत येतात. हाच आणवोपाय आहे. शक्तिपातयोगदीक्षा ही शक्तिपाताचे सामर्थ्य असणाऱ्या एखाद्या श्रीसद्गुरूं-कडूनच मिळते. तेच शिष्याची कुंडलिनी शक्ती जागृत करू शकतात. यामुळे शाक्तोपाय आणि शांभवोपाय दोन स्तरांपर्यंत विभागला गेला आहे.

कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यानंतर साधकभक्तयोगिशिष्याचा पशू किंवा आणव भाव तत्काळ नष्ट होत नाही. तो शांभवोपायापर्यंत तसाच विद्यमान राहतो, हे वर सांगितलेले आहेच. एखाद्या तीव्र साधकभक्तयोगिशिष्याची कुंडलिनी शक्ती देवाच्या अनुग्रहाने म्हणजेच कृपेने शक्तिपातयोगदीक्षेशिवायच जागृत होते; परंतु त्यामुळे त्याची भ्रांती किंवा मोह नष्ट होत नाही आणि कोणाकोणामध्ये अनेक अडचणी आल्यामुळे ती विकृत रूपही धारण करते. अशा मनुष्याने कोणातरी समर्थ श्रीसद्गुरूंकडून दीक्षा ग्रहण करावी. हीच गोष्ट "**गुरुरुपायः ।।२.६।।**" या सूत्रात सांगितली आहे. ज्याप्रमाणे या सूत्रातून श्रीसद्गुरुकृपा हा उपाय प्रकट होतो त्याप्रमाणेच शांभवोपाय आणि शाक्तोपाय यांच्यासाठी श्रीसद्गुरुकृपा हाच एकमेव उपाय आहे.

ज्याप्रमाणे एका दिव्याने दुसरा दिवा लावावा त्याप्रमाणे श्रीसद्गुरू स्पर्श, मंत्र अथवा दृष्टिद्वारा आपल्या शक्तीने शिष्याच्या सुप्त अर्थात् झोपलेल्या किंवा क्रियाहीन कुंडलिनी शक्तीला जागृत करतात. असेही पाहण्यात येते

की, वरती सांगितलेल्या स्पर्श, मंत्रादींशिवाय श्रीसद्गुरूंच्या केवळ संकल्पानेच अधिकारी शिष्याची कुंडलिनी शक्ती जागृत होते. स्पर्शाने स्थूलदीक्षा, मंत्राने सूक्ष्मदीक्षा, अवलोकनाद्वारा म्हणजेच पाहण्याने सूक्ष्मतरदीक्षा आणि केवळ संकल्पाद्वारा सूक्ष्मतमदीक्षा सांगितली गेली आहे. या सर्व दीक्षांच्या परिणामांच्या स्वरूपानुसार अनुभवांमध्ये तारतम्यता म्हणजेच कमीजास्तपणा येतो. शिष्यां-मध्येही दोन प्रकारचे अधिकारी सांगितले आहेत. एक प्रकार म्हणजे जे आपलेच कल्याण करू शकतात आणि दुसरा प्रकार म्हणजे ज्यांना श्रीसद्गुरूंच्या आशीर्वादस्वरूप शक्तिपाताचे सामर्थ्य प्राप्त होते. या विषयाच्या माहितीसाठी तद्विषयक शास्त्रांचे जिज्ञासूंनी अवलोकन करावे. (या विषयासंबंधीचे सांगोपांग विवेचन डॉ. केशव रामचंद्र जोशी यांनी "**शक्तिपातयोगरहस्य अर्थात् सिद्धमहायोगशास्त्र**" आणि "**श्रीज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शन**" या दोन ग्रंथांमध्ये केले आहे.)

कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यानंतर साधकभक्तयोगिशिष्य शक्तीचा आश्रित होतो. कुंडलिनी शक्तीचा विकास आणि साधकभक्तयोगिशिष्याची प्रगती व उन्नती परस्परांशी संबंधित आहे. कुंडलिनी शक्तीच्या सुप्तावस्थेत मनुष्याच्या कामक्रोधादि शक्ती पाशविक स्तरावर असतात. शक्ती जागृत झाल्यानंतर जरी त्यांचे तत्काळ उन्मूलन झाले नाही तरीही त्याचबरोबर ब्राह्मी आदि शक्तींचा अनुभव येऊ लागतो. त्या शक्ती पाशविक भावांपासून साधकभक्तयोगिशिष्यांचे रक्षण करण्याला साहाय्यभूत होतात. त्यामुळेच त्यांना "**पशुमातरः ।।३.१९।।**" असे म्हटले आहे.

साधकभक्तयोगिशिष्य जेवढा अंतर्गुरुरूपी जागृत शक्तीला शरण जाऊन आत्मनिवेदन करीत राहतो तेवढाच तो शांभवभावाची प्राप्ती करीत जातो. शाक्तोपायाच्या स्तरावर शक्तीचे रूप क्रियांद्वारा अनुभवाला येते; परंतु शांभवभावामध्ये शक्ती श्रीसद्गुरुतत्त्वाच्या रूपात प्रकट होते. ज्याप्रमाणे दोन मित्र बरोबर राहत असावेत आणि त्यांच्यातला एक जण मुक्त आहे आणि दुसरा बंधनात आहे त्याप्रमाणेच हे असते. जो बंधनात असतो तो सहवासाने बंधनमुक्ताशी साम्यता प्राप्त करून घेतो. अशा प्रकारे श्रीसद्गुरुतत्त्वाला श्रुतिवचनांमध्ये "**द्वा सुपर्णा सयुजा सखाया।।श्वेताश्वतरोपनिषद् ४.६।।**" अर्थात् "नेहमी परस्पर मिळूनमिसळून राहणारे दोन मित्र म्हणजे जीव व श्रीशिव हे सुंदर गतियुक्त पक्षी असून ते एकाच वृक्षाचा म्हणजे सुषुम्नेचा आश्रय घेऊन राहतात," असे म्हटले आहे. (त्यातील जीव अर्थात् कुंडलिनी

शक्ती ही मूलाधारात राहून संसाराच्या स्वादिष्ट फलांचा उपभोग घेते आणि दुसरा अर्थात् श्रीशिव हे सहस्त्रारात राहून संसाराचा उपभोग न घेता नुसते पाहत राहतात.) सिद्धयोगसाधनामुळे कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर हे तत्त्व प्रकट होते. साधकभक्तयोगिशिष्य श्रीसद्गुरू दर्शन, शरण आणि आत्मनिवेदन यांच्या द्वारा त्यांच्याशी म्हणजे श्रीशिवांशी परम साम्यता प्राप्त करून घेतो अर्थात् श्रीशिवतुल्य होतो.

वरती जे काही सांगितले आहे त्यावरून वाचकांच्या हे लक्षात आले असेल की, कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यानंतर साधकभक्तयोगिशिष्याला जी लक्षणे अनुभवाला येतात, त्यांचे अनुसंधान केल्याने जागृत शक्तीचे अनुसंधान होते. शक्ती जागृत झाल्यावर तिचे शुद्ध स्वरूप असणाऱ्या देवात्मरूपात प्रकट होते. जेथे।।१.१६।। या सूत्रात शुद्धतत्त्वाच्या अनुसंधानाद्वारा अपशुशक्तीच्या जागृतीविषयी सांगितले आहे तेथे शुद्धतत्त्वाने शक्तीच्या जागृतीपूर्वी हृदयादि स्थानांच्या अनुसंधानाद्वारा ईश्वराच्या काल्पनिक सत्तेवर ध्यान अभिप्रेत आहे. त्याचे फळ म्हणून सूत्र।।१.१५।। मध्ये चित्त अंतर्मुख असल्याकारणाने दृश्य जगत् स्वप्नाप्रमाणे वाटते असे सांगितले आहे.

पाचही कलांमध्ये शांतातीताकलेत श्रीशिवशक्ती, शांतिकलेत श्रीसदाशिव-श्रीईश्वर आणि शुद्धविद्येमध्ये शुद्धतत्त्व सांगितले आहे. त्यांची स्थाने क्रमशः आज्ञा, विशुद्ध आणि अनाहत अशी आहेत. त्यांच्या खाली विद्याकलेमध्ये मायेच्या पाच कंचुकांपैकी काल, कला आणि नियती यांनाही शुद्ध तत्त्वे असे म्हटले आहे. **"क्षणतत्क्रमयोः संयमाद्विवेकजं ज्ञानम्।। श्रीपातंजलयोगसूत्र ।।३.५२।।"** अर्थात् "कालाचे क्षण आणि त्यांच्या क्रमावर संयमरूपी अनुसंधानाद्वारा विवेकज ज्ञान प्राप्त होते."

अशा प्रकारे अनंत आकाश, अनंत समुद्राच्या जलराशी अथवा अनंत समय यांच्यावरही ध्यान करण्याचे विधान आहे. त्याबद्दल **"श्रीपातंजलयोग-दर्शन"** या ग्रंथाच्या सूत्र।।२.४७।। यात असे म्हटले आहे की, अनंतामध्ये चित्त समाहित झाल्यानंतर प्रयत्न शिथिल करावेत. परंतु कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यानंतर साधकभक्तयोगिशिष्याच्या अनुसंधानाच्या अभ्यासाच्या अनुपातामुळे त्याची अपशुशक्ती जागृत होते. कुंडलिनी शक्तीच्या क्रियांवर साधकभक्तयोगिशिष्याचे लक्ष्य बळजबरीने जाते आणि त्याच्या लक्ष्यानु-

संधानाद्वारा कुंडलिनीची जागृती आणि पशुशक्तीची क्षीणता साधकभक्तयोगिशिष्याला अनुभवाला येते. पुढे शुद्ध विद्येच्या उदयाने।।१.२१।। मध्ये सांगण्यात आलेल्या चक्रेशत्व सिद्धीनुसार उत्तर स्तरावर ज्यावेळेला कुंडलिनी शक्ती शुद्ध विद्येच्या रूपात उदित होते त्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्याला सहाही चक्रांच्या सिद्धी प्राप्त होतात. यासाठी जिज्ञासू साधकभक्तयोगिशिष्यांनी "**श्रीशिवसंहिता**" या ग्रंथातील पाचवे पटल पाहावे.

।।ॐतत्सत्।।

# "श्रीशिवसूत्रम्" या ग्रंथाला प्रकाशक श्रीकृष्णानंदसागर यांनी लिहिलेली भूमिका

## त्रिकदर्शन

त्रिकदर्शनाचे व्यवस्थित प्रवर्धन होण्याला काश्मीरमध्ये आठव्या शताब्दीच्या उत्तरार्धापासूनच सुरुवात झाली होती; परंतु नवव्या शताब्दीमध्ये ते पूर्णपणे विकसित झाले. आगमशास्त्रांमधून आणि श्रीसद्गुरुपरंपरेच्या आधाराने त्रिकदर्शनाचे निर्माण तर याच्याही पूर्वीपासूनच होत आलेले आहे. त्यामुळे याचा काळ निश्चित करणे कठीणच आहे. आगमशास्त्र, स्पंदशास्त्र आणि प्रत्यभिज्ञाशास्त्र अशा प्रकारे त्रिकदर्शनाच्या आधारस्तंभ असणाऱ्या शास्त्रांना तीन प्रकारांत विभागले जाते. यांमध्ये श्रीशैवागमाचे प्रमुख स्थान आहे. श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथाच्या ११, १२ व ३६ या आह्निकांमध्ये श्रीकंठनाथांच्या आज्ञेने श्रीत्र्यंबकादित्य, श्रीआमर्दक आणि श्रीश्रीनाथ यांनी तीन प्रकारच्या श्रीशैवतंत्रांचा प्रसार आणि प्रचार केला होता असे कथन केले आहे. त्याचप्रमाणे १३ व ३६ या आह्निकांमध्ये असे वर्णन केले आहे की, "**अर्धत्र्यंबक**" नावाचा आणखीही एक आगमसंप्रदाय आहे. त्याचे प्रवर्तन श्रीत्र्यंबकांच्या मुलीने केले होते. दक्षिणेकडचे वीरशैवदर्शन द्वैतप्रधान आणि काश्मीरचे हे त्रिकदर्शन पूर्णपणे अद्वैतप्रधान आहे. "**श्रीराजतरंगिणी**" या ग्रंथात आलेल्या विभिन्न प्रसंगांच्या विवेचनांनुसार भगवान् श्रीपरमशिवांची आराधना काश्मीरमध्ये अनादिकालापासून चालत आलेली आहे. या दर्शनाचे शास्त्रीय नाव "**त्रिकशासन**" अथवा "**त्रिक**" असे आहे. यालाच "**रहस्यसंप्रदाय**" अथवा "**त्र्यंबकसंप्रदाय**" असेही म्हणतात. सिद्धा, नामक आणि मालिनी या तीन आगमांना, श्रीशिव, शक्ती आणि अणू किंवा पती, पाश आणि पशू अगर श्रीशिव, शक्ती आणि नर यांना श्रीदेवीच्या परा, अपरा आणि तत्परा या तीन रूपांना मानण्यामुळे, भेद, अभेद आणि भेदाभेद यांचे वर्णन केल्यामुळे याला "**त्रिक**" असे म्हणतात. या तत्त्वज्ञानाला शास्त्रज्ञांनी "**सर्वश्रेष्ठ**" म्हणून घोषित केले आहे. याविषयी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**वेदाच्छैवं ततो वामं ततो दक्षं ततः कुलम्।**
**ततो मतं ततश्चापि त्रिकं सर्वोत्तमं मतम्।।**

**अर्थ :-** वेदांहून श्रीशैवदर्शन उत्तम, श्रीशैवांहून वाम, वामाहून दक्षिण, दक्षिणाहून मत आणि त्याहूनही त्रिकदर्शन हे सर्वोत्तम तत्त्वज्ञान मानले जाते.

या सर्वोत्तमतत्त्वाचे भगवान् श्रीशंकरांनी श्रीवसुगुप्तपादाचार्यांना श्रीशिव-सूत्रांच्या रूपात स्वप्नात येऊन ज्ञान दिले आणि श्रीवसुगुप्तपादाचार्यांनीही त्याचे योग्य प्रकारे मनन व चिंतन करून त्रिकशासन जनकल्याणासाठी प्रतिष्ठापित केले.

"**श्रीशिवसूत्रे**" नावाच्या या लघुग्रंथात शांभवोपाय, शाक्तोपाय आणि आणवोपाय या तीन प्रकरणांचा समुल्लेख केला आहे. श्रीशैवदर्शनाचा सर्वच्या सर्व प्रतिपाद्यविषय याच ग्रंथाच्या प्रकरणांमध्ये विषयविवेचनाच्या दृष्टीने वर्णन केला गेला आहे. त्यामुळेच संस्कृत वाङ्मयात "**त्रिकदर्शन**" या नावाने तो विषय प्रतिष्ठित झाला आहे.

जरी या तीनही उपायांमध्ये वस्तुतत्त्वाच्या दृष्टीने एकाच अनुत्तरतत्त्वाचे प्रतिपादन केलेले असले तरीही अधिकाराच्या भेदाने भिन्न-भिन्न प्रक्रियेचे अवलंबन घेऊन साधकजनांना समजाविले आहे. त्यामुळे मुमुक्षुजन सहज सरळपणाने आपले आत्मतत्त्व जाणून घेऊ शकतील.

## शांभवोपाय

प्रथम उन्मेषामध्ये शांभवोपायाच्या दृष्टीने अनुत्तर श्रीशिवतत्त्वाचे विवेचन केले आहे. आत्मस्वरूपाच्या प्राप्तीमध्ये समस्त प्रमेयपदार्थांचे प्रशमन अर्थात् त्यांचा नाश होणे अत्यंत आवश्यक आहे. त्यामुळेच त्रिकदर्शनामध्ये सर्वोत्कृष्ट उपाय हठपाकक्रम अथवा शांभवोपायाचा मानला जातो. वास्तविक हाच उपायक्रम पूर्णपणे अभेदभावनाप्रधान आहे. याविषयी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**स्वात्मन्येव चिदाकाशे विश्वमस्म्यवभासयन्।**
**स्रष्टा विश्वात्मक इति प्रथया भैरवात्मता।।**

**अर्थ :-** चिदाकाश अर्थात् चैतन्यस्वरूप अशा स्वात्म्यात "मी विश्व आहे" असे अवभासित किंवा प्रकाशित होत असताना मीच स्रष्टा अर्थात् निर्माण करणारा विश्वाने युक्त आहे अशा प्रथेने किंवा ज्ञानाने श्रीभैरवात्मता येते.

"प्रमाता, प्रमाण आणि प्रमेयरूप सारे विश्व चिद्रूप अशा माझ्यापासून आविर्भूत किंवा प्रकट झाले आहे, हे विश्व अनतिरिक्त असूनही अतिरिक्त अशा माझ्यात स्थित आहे आणि त्याचप्रमाणे माझ्यापेक्षा सर्वथा वेगळ्या रूपात स्थित आहे," हा विमर्श अर्थात् विचार म्हणजेच शांभवोपाय होय.

त्याचप्रमाणे श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**मत्त एवोदितमिदं मय्येव प्रतिबिम्बितम्।**
**मदभिन्नमिदं चेति त्रिधोपायः स शाम्भवः।।३.२८०।।**

**अर्थ :-** माझ्यापासूनच निर्माण झालेले, माझ्यातच प्रतिबिंबित झालेले आणि माझ्याहून अभिन्न असणारे असे हे तीन उपाय म्हणजेच शांभवोपाय होय.

"**श्रीतंत्रालोक**"कारांच्या शब्दात असे सांगितले जाते की, "मीच आपल्या स्वरूपभूत अहंतात्मक चिदाकाशात विश्वाला प्रकाशित करतो. त्यामुळे मीच या विश्वाचा सृजनकर्ता आहे. त्याचप्रमाणे हा सारा षडध्वसमुदाय म्हणजेच वर्ण, पद, मंत्र, कला किंवा प्रकाशित तत्त्व आणि भुवन माझ्या चिद्रूपातच प्रतिभासित होतात. त्यामुळे मीच स्थितिकर्ता पालकदेव आहे आणि शेवटी हा सर्व विश्वप्रपंच माझ्यातच विश्रांती घेत असल्यामुळे मी समस्त प्रमेय वर्गाचा संहारकर्ता श्रीशिव आहे," अशा प्रकारे विचार करणारा साधकभक्तयोगिशिष्य विश्रांती प्राप्त करतो अर्थात् अपरिमेय विचित्र विश्वाने युक्त भवप्रपंचात्मक स्वप्नगृह जाळणारे दैदीप्यमान अग्निरूप श्रीशिव मीच आहे असा निरंतर अनुभवप्रकाशपूर्वक अभ्यास म्हणजे शांभवोपाय होय. हाच उपाय साधकभक्तयोगिशिष्याला श्रीपरमशिवत्वाची प्राप्ती करून देतो.

शाक्तोपाय आणि आणवोपायामध्ये क्रमाने भेदाभेद आणि भेदपूर्वक स्नान, व्रत, देहशुद्धी, धारणा, ध्यान आणि मंत्रासंबंधी विचारही केला जातो. परंतु शांभवोपायामध्ये पूर्णपणे अभेदभावनेचे विधान आहे; कारण सर्व बाह्य उपकरणांची त्याच्यात निवृत्ती होते. त्यामुळे "**अभेदोपायमत्रोक्तं शाम्भवः।।**" अर्थात् "येथे जो अभेदोपाय सांगितला आहे तो शांभवोपाय आहे असेही म्हटले जाते."

शांती अथवा मधुरपाक क्रमामध्ये मंत्र आणि मुद्रावीर्य यांच्या अनुसंधानस्वरूप शाक्तोपायाचे ग्रहण अभीष्टच किंवा हितकारक आहे; कारण हे स्वरूप-परामर्शयुक्त आहे. याच्यातच समस्त बाह्य आणि आंतर विकल्प-कल्पनांचे चिदग्नीमध्ये हवन होऊन जाते. त्यामुळे असे म्हटले जाते की, "**शाक्तमुच्यते भेदाभेदात्मकोपायम्।।**" अर्थात् "भेद व अभेदयुक्त उपायाला शाक्त असे म्हणतात." हा शाक्तोपाय भेदाभेदात्मक आहे. याविषयी "**श्रीशिवस्तोत्रावली**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सर्वभावमयभावमण्डलं विश्वशक्तिमयशक्तिबर्हिषि।**
**जुह्वतो मम समोऽस्ति कोऽपरो विश्वमेधमययज्ञयाजिनः।।**

**अर्थ :-** सर्व भावांनी युक्त अशा भावमंडलाचे सर्व शक्तियुक्त शक्तिरूप तुपामध्ये हवन करणारा माझ्यासारखा विश्वमेधमय यज्ञ करणारा कोण बरे दुसरा असेल?

"**भेदोपायं तदाणवम्।।**" अर्थात् "आणवोपाय म्हणजे भेदोपाय आहे." त्यामुळे त्यात यम, नियम व प्राणायाम आदि साधनांची साधकभक्तयोगिशिष्यांना अपेक्षा ठेवावी लागते आणि हे उक्त साधनांचा आधार घेतल्याने प्राप्यही आहे. "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथामध्ये मोक्षाच्या चार मार्गांचे समुल्लेखन केले गेले आहे. ते म्हणजे अनुपाय, शांभवोपाय, शाक्तोपाय आणि आणवोपाय हे होत. अनुपाय म्हणजे शांभवोपायाचेच चरम अथवा अंतिम रूप आहे. यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**साक्षादुपायेन इति शाम्भवेन। तदेव हि अव्यवहितं परज्ञानवाप्तौ निमित्तं स एव परां काष्ठां प्राप्तश्चानुपाय उच्यते।।**

**अर्थ :-** साक्षात् उपायाने म्हणजे शांभवोपायाने होय. हा शांभवोपायच अव्यवहित किंवा अडथळारहित परज्ञानाच्या प्राप्तीसाठी निमित्त आहे. तोच जेव्हा पराकाष्ठेला प्राप्त होतो तेव्हा त्याला "**अनुपाय**" असे म्हणतात.

अनुपाय पूर्णतः परमेश्वराच्या अनुग्रहशक्तीवर केंद्रित आहे. श्रीसद्गुरूंच्या अनुग्रहशक्तीच्या सकृत् तत्त्वोपदेशक्रमाने आपल्या स्वस्वरूपाचे उन्मीलन होते. अनेक वेळेच्या भावनेचे अनुसंधान याच्यामध्ये अपेक्षित नाही आणि आणवोपायामध्ये तत्त्वोपदेशाच्या प्रक्रियेची असकृत् भावना केल्यावरच स्वरूपलाभ होऊ शकतो. आचार्य श्रीजयरथांनी अनुपायाचा अर्थ "**अल्पोपाय अनुदरा कन्यावत्।।**" अर्थात् अनुपाय यातील "**अन्**"चा अर्थ "**किंचित्**" ईषत् व "**अनुदरा कन्या**" याचा अर्थ "**पोट नसलेली**" असा नसून जिचे पोट सुटलेले नाही किंवा मर्यादित उदर असलेली मुलगी असा केला आहे. अनुपायामध्ये मंत्र, दीक्षा, पूजा व ध्यान हे करावे किंवा करू नये असे विधिनिषेध नसतात. केवळ श्रीसद्गुरुवचन ऐकून श्रीसद्गुरूंच्या दृष्टिपाताने किंवा श्रीसद्गुरूंशिवाय स्वतंत्रपणे तीव्र शक्तिपात होऊन साधकभक्तयोगिशिष्य हे परमेश्वराने झपाटले जाऊन त्यांचे व्यक्तित्व श्रीपरशिवांत विलीन होते, असा अनुपायाचा अर्थ केला आहे. सकृत् उपदेशरूपताच अल्पोपाय आहे. शांभवोपायामध्ये तीव्र शक्तिपाताची अपेक्षा केली जाते आणि अनुपायामध्ये

तीव्र-तीव्र शक्तिपाताशिवाय निरुपाय समावेशदशेचा लाभ कधीही शक्य होत नाही. ज्याप्रमाणे एका दिव्याने दुसरा दिवा लावावा त्याप्रमाणे हाच क्रम अनुपायामध्ये संघटित होतो. अनुपायालाच "**आनंदोपाय**" असेही म्हणतात. याविषयी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**भूयो भूयो विकलांशनिश्चयक्रमचर्चनात्।**
**यत्परामर्शमभ्येति ज्ञानोपायं तु तद्विदुः।।१.१४८।।**
**यत्तु तत्कल्पनाक्लृप्तबहिर्भूतार्थसाधनम्।**
**क्रियोपायं तदाम्नातं भेदो नात्रापवर्गतः।।१४९।।**
**तत्राद्ये स्वपरामर्शे निर्विकल्पैकधामनि।**
**यः स्फुरेत् प्रकटं तदिच्छारूपं प्रकीर्तितम्।।१४६।।**
**एवं परेच्छाशक्त्यंश सदुपायमिमं विदुः।**
**शाम्भवाख्यं समावेशं समुत्यन्तेनिवासिनः।।२३३।।**

**अर्थ** :- वारंवार किंवा पुनःपुन्हा विकलांशनिश्चयक्रमचर्चनापासून अर्थात् शक्तीच्या अंशाच्या निश्चयक्रमाच्या वारंवार केलेल्या विचारांपासून जो परामर्श उत्पन्न अथवा निर्माण होतो त्याला ज्ञानोपाय असे म्हणतात.।।१४८।।

जो भेदमय कल्पनांनी कल्पित केलेला असतो आणि जो बाह्यविकल्पमय अर्थात् उच्चार, करण व ध्यानादि अर्थांचा साधक असतो त्याला क्रियोपाय असे म्हणतात. (यालाच आणवोपाय असेही म्हणतात.)।।१४९।।

साधनामध्ये अभ्यस्त साधकभक्तयोगिशिष्याला ज्यावेळी चरमतल्लीनता प्राप्त होते व त्याच्या सर्व विकल्पांचा क्षय होतो त्यावेळी त्याला तेजस अवस्था प्राप्त होते. या स्थितीत साधकभक्तयोगिशिष्याला आत्मपरामर्शाची पहिली अनुभूती होऊ लागते. त्यावेळी इतर सर्व वैकल्पिक परामर्श समाप्त होतात. अशा स्थितीत साधकभक्तयोगिशिष्याला एका स्फुरत्तेची म्हणजे जागृत कुंडलिनी शक्तीची सूक्ष्म अवस्था प्राप्त होते. या अवस्थेत साक्षात् स्फुरणाची आद्य अनुभूती स्पष्टरूपाने होते. हाच इच्छा नावाचा उपाय आहे. यालाच शांभवोपाय असे म्हणतात; कारण की, यावेळी साधकभक्तयोगिशिष्याचा श्रीशैवमहाभावाचा मार्ग प्रशस्त होतो.।।१४६।।

(अशा प्रकारे परभट्टारिकारूप इच्छाशक्ती आणि तिचे अंशही परेच्छात्मकच असतात हे सर्वमान्य आहे) इत्यादि उक्तीनुसार शाक्तोपायाच्यापेक्षा (अनुपाय) हा साक्षात् उपाय असल्याकारणाने सदुपाय आहे. श्रीसुमतिनाथांचे शिष्य श्रीसोमदेव, त्यांचे शिष्य श्रीशंभुनाथ आदि शिष्यपरंपरेचे विद्वान् श्रीसद्गुरुजन

याला शांभवसमावेश असे मानतात.।।२३३।।

अर्थात् शांभवोपायाला इच्छोपाय, शाक्तसमावेशाला ज्ञानोपाय आणि आणवोपायाला क्रियोपाय असेही म्हणतात. याच तीन उपायांनी सर्वोत्कृष्ट परमज्ञानस्वरूप अनुत्तरतत्त्व केवळ आनंदशक्तीत अवस्थित राहते. याविषयी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**विभुशक्त्यणुसम्बन्धात् समावेशस्त्रिधा मतः।**
**इच्छा-ज्ञान-क्रिया योगादुत्तरोत्तरसम्भूतः।।**
**ततोपि परमं ज्ञानमुपायादिविवर्जितम्।**
**आनन्दशक्तिविश्रान्तमनुत्तरमिहोच्यते।।२४२।।**

**अर्थ :-** विभू, शक्ती आणि अणू यांच्या संबंधापासून होणारा समावेश तीन प्रकारचा असतो. इच्छा, ज्ञान आणि क्रिया यांच्या योगामुळे उत्तरोत्तर निर्माण होणारा समावेश हा संस्कृत म्हणजे संस्कार करून शुद्ध म्हणजे श्रेष्ठ असतो.

त्याच्याहूनही श्रेष्ठ असणारे, उपाय वगैरेंनी रहित असणारे आणि आनंदशक्तीत विश्रांती घेणारे ज्ञान म्हणजे अनुत्तर तत्त्व किंवा विज्ञान होय.।।२४२।।

शांभव समावेशदशेत विचार एकदम शांत होऊन जातात. त्याच्यात विकल्पांची कोणतीही उपयोगिता राहत नाही. श्रीसद्गुरूंनी दिलेल्या उपदेश-क्रमामुळे हृदयात असणाऱ्या समस्त अज्ञानग्रंथी छिन्नभिन्न होतात आणि त्यामुळे सारा अहंममभाव गळून जातो. अशा अवस्थेत कोणत्याही प्रकारच्या बाह्य भावनांची अपेक्षा न ठेवणारी संवित् किंवा शक्ती श्रीपरमशिवांपासून प्राप्त झालेल्या अभेदाने त्या साधकभक्तयोगिशिष्याला भारून टाकते. यालाच "**शांभवसमावेश**" असे म्हणतात. याविषयी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**अकिञ्चिच्चिन्तकस्यैव गुरुणा प्रतिबोधितः।**
**उत्पद्यते स आवेशः शाम्भवोऽसावुदीरितः।।१.१६८।।**
**अकिञ्चिच्चिन्तकस्येति विकल्पानुपयोगिता।**
**तथा च अहिति ज्ञेयसमापत्तिर्निरूप्यते।।१७१।।**
**तेनाविकल्पा संवितिर्भावनाद्यनपेक्षिणी**
**शिवतादात्म्यमापन्ना समावेशोऽत्र शाम्भवः।।१७८।।**

**अर्थ :-** ज्या साधकभक्तयोगिशिष्याला श्रीसद्गुरूंनी शक्तिपातयोगदीक्षा

दिल्यामुळे निर्विचार अवस्था प्राप्त होऊन त्यात तीव्र बोधाचे प्रत्यभिज्ञान झाल्यामुळे जो आवेश उत्पन्न होतो त्या आवेशाला शांभव समावेश असे म्हणतात.।।१.१६८।।

ज्यावेळी साधकभक्तयोगिशिष्य चिंतनाची अवस्था पार करून निर्विचार दशेमध्ये स्थिर होतो त्यावेळी त्याच्या बाबतीत सर्व विकल्प अनुपयोगी ठरल्यामुळे ज्ञेयाची प्राप्ती अत्यंत शीघ्रतेने निश्चितपणे होते.।।१७१।।

या तारतम्यानुसार ज्यावेळी संकुचित संवित्ती म्हणजे जीवरूप कुंडलिनी शक्ती अविकल्प अवस्थेत भावना किंवा उपदेश यामुळे निरपेक्ष होऊन श्रीशिवांशी तादात्म्य अर्थात् समरसता प्राप्त करून घेते त्यावेळी त्या अवस्थेत जो समावेश किंवा सामरस्य प्राप्त होते, त्याला शांभवसमावेश असे म्हणतात.।।१७८।।

शांभवसमावेश अवस्थेत सुप्रबुद्ध सिद्धयोगी चिद्रूपात अखंड प्रतिष्ठित राहत असतो; कारण ही चिद्रूपता हाच सर्व विश्वाचा स्वभाव आहे व तीच आत्मा आहे. मग तिची साधना म्हणजे काय असणार बरे? आणि त्या साधनेचा उपाय म्हणजे तरी कोणता असणार? यामध्ये प्रत्यक्षादि प्रमाणांचीही अपेक्षा असत नाही; कारण चैतन्य हे अखंड स्वतःच प्रकाशात्मा आहे. "**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातही "**चैतन्यमात्मा।।१.१।।**" असेच म्हटले आहे. चैतन्य हे अथवा चिती हीच आत्मा आहे. चैतन्य आणि आत्मा यांच्यामध्ये "**राहोशिरवत्।।**" (राहूचे अर्थात् वास्तविकपणे राहू म्हणजे नुसते शिरच (डोके) आहे. त्यामुळे राहूचे डोके असे होऊ शकत नाही. त्यामुळे राहू म्हणजेच डोके आणि डोके म्हणजेच राहू होय.) असा काल्पनिक भेद आहे. ज्यामुळे चेतनता मुख्य होईल ते चेतनतत्त्व आहे आणि ज्ञानात्मक क्रियेत स्वातंत्र्य ठेवणारेही चैतन्यच आहे. हेच आत्म्याच्या चेतनत्वाचे स्वरूप आहे.

"**श्रीशिवसूत्रवार्तिक**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**चैतन्यमात्मनो रूपं सिद्धं ज्ञानक्रियात्मकम्।।१५।।**

**अर्थ :-** चैतन्य हेच आत्म्याचे ज्ञानक्रियात्मक सिद्ध रूप होय.

ज्ञानरूप क्रियेमध्ये सर्वतंत्र स्वतंत्रभाव हाच चैतन्याचा स्वभाव आहे.

## शाक्तोपाय

"**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथातील द्वितीय उन्मेषात शाक्तोपायाद्वारा श्रीपरशिवतत्त्वाचे विवेचन केले गेले आहे. "**भेदाभेदौ हि शक्तिता।।**" अर्थात् "भेद व अभेद म्हणजेच शक्तिता होय." यामध्ये बाह्य मंत्रोच्चारण,

करण, ध्यान, वर्ण आणि स्थानविशेष इत्यादि कल्पनांचा अभाव आहे अर्थात् या कल्पना यात नाहीत. यांपासूनच अभेदावस्था आहे आणि मनाने या सर्वांचे चिंतन होत असल्याकारणाने विकल्पात्मक भेदप्रथाही होऊ शकते. त्यामुळे या समावेशात भेद व अभेद या दोघांचाही स्वीकार केला जातो. हीच शाक्तसमावेश दशा आहे. "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले जाते की -

**उच्चाररहितं वस्तु चेतसैव विचिन्तयत्।**
**यः समावेशमाप्नोति शाक्तः सोऽत्राभिधीयते।।**

**अर्थ :-** उच्चार होत नसलेल्या वस्तूचे अथवा तत्त्वाचे मनानेच चिंतन करीत जो समावेश प्राप्त करतो त्याला "शाक्तसमावेश" असे म्हणतात.

याला "ज्ञानोपाय" अशासाठी म्हणतात की, ज्यावेळेला साधकभक्त-योगिशिष्य "**आत्मैवेदं सर्वम्।।**" अर्थात् "हा सर्व दृश्य प्रपंच आत्म्याचाच स्वभाव आहे," असा विमर्श अर्थात् विचार करतो त्यावेळेला त्याच्यात इदमंश आणि अहमंश यांचा विकल्प असतो. "**अहम्**" हेच "**इदम्**" रूपाने आभासित किंवा व्यक्त होत आहे असा असकृत् दृढ अभ्यास करण्याने साधकभक्तयोगिशिष्य अभेदयुक्त विमर्शावस्थेत पोहोचतो. त्यामुळेच "**चित्तं मन्त्रः।।२.१।।**" अर्थात् "मंत्रदेवतेच्या परामर्शामुळे सामरस्यावस्थेला प्राप्त झालेल्या साधकभक्तयोगिशिष्याचे चित्त हेच मंत्र आहे." ज्यावेळेला साधक-भक्तयोगिशिष्य मंत्रभावपूर्वक आराधना करतो त्यावेळेला त्याची आराधना "**शिवो भूत्वा शिवं यजेत्।।**" या न्यायाने अर्थात् "श्रीशिव होऊन श्रीशिवांचीच आराधना होते." त्यामुळेच शाक्तोपायामध्ये बाह्यसाधना अपेक्षित केली जाते आणि त्यामुळेच तो अहंविमर्शामध्ये आरूढ होऊ शकतो. "**प्रयत्नः साधकः ।।२.२।।**" अर्थात् "साधकभक्तयोगिशिष्याचा स्वतःचा सहज प्रयत्नच इष्टदेवतेशी अभिन्नरूप प्राप्त करून देतो." त्यामुळेच सर्व प्रमेयपदार्थांमधून उत्पन्न होणारी अज्ञानजनित भेदप्रथा किंवा भेदज्ञान नष्ट होते. भेदात्मक ज्ञानापासून सहजदशा दूर राहते. त्यामुळेच "**ज्ञानं बन्धः।।१.२ व ३.२।।**" हे सूत्रात निर्देशिले आहे. या द्वैतबंधनाद्वारा अंतःकरणातून रागद्वेषादि भावना प्राण्याच्या चित्तात आविर्भूत होत राहतात.

वस्तुतः स्वरूप विमर्शांचे ज्ञानच साधकभक्तयोगिशिष्यांसाठी पुष्टिकारक अथवा उत्तम मानले जाते. त्यासाठीच "**ज्ञानमन्नम्।।२.९।।**" हे सूत्र प्रतिपादिले आहे.

## आणवोपाय

"अणू" ही संज्ञा अथवा नाव हे जीवाला दिले जाते. त्यामुळे याला जीवोपाय असेही म्हटले जाऊ शकते. आणवोपाय हा भेदप्रधान अर्थात् ज्यात भेदाला महत्त्व दिले जाते तो उपाय आहे. "**भेदोपायं तदाणवम्।।**" या "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथामधील उक्तीने हे सिद्ध होते किंवा "**अणुषु भेदिषूपायेषु भवः आणवः।।**" अर्थात् "अणू म्हणजे भेदी म्हणजेच भेद करणाऱ्या उपायांमध्ये होणारा तो आणव होय."

साधकभक्तयोगिशिष्याला जीवभावाच्या निवृत्तीसाठी नाना साधनांचा आश्रय घ्यावा लागतो.

"**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात याची अशी व्याख्या केलेली आहे की -

**उच्चारकरणध्यानवर्णस्थानप्रकल्पनैः।**
**यो भवेत् स समावेशः सम्यगाणव उच्यते।।**

**अर्थ :-** प्राणायाम, मंत्र, जप, करण, ध्यान, वर्ण आणि स्थान यांच्या भेदांनी युक्त समावेश म्हणजे आणवोपाय होय.

भेदप्रथायुक्त कल्पनांनी प्रकल्पित व उच्चारादि बहिर्भूत अर्थाचे उपकरण असण्याने यालाच क्रियोपाय असेही म्हणतात.

या उपायाने श्रीपरमशिवांचे स्वरूप ज्ञात होते; कारण तृतीय उन्मेषामध्ये असे म्हटले आहे की, "**शिवतुल्यो जायते।।३.२५।।**" अर्थात् "आणवोपायाच्या प्रक्रियेचा निरंतर अभ्यास करण्याने साधकभक्तयोगिशिष्य साक्षात् श्रीशिवसदृश म्हणजेच श्रीशिवांसारखाच होतो."

श्रीशिवतुल्य स्थितीमध्ये त्याची देहकला हळुहळू विगलित अथवा नष्ट झाल्यानंतर त्याला श्रीशिवांहून अभिन्न अशा भावाची प्राप्ती होते. तो क्रमशः सारूप्य व सायुज्य मुक्ती प्राप्त करतो; परंतु साधकभक्तयोगिशिष्याची शरीरात स्थिती अजून राहते आणि ती परित्याज्य आहे; कारण ज्या प्रारब्धकर्मांनी शरीराची निर्मिती होते त्या सर्वांची केवळ भोगांनीच पूर्ण शुद्धी होणे शक्य असते. त्यामुळेच श्रुती असे म्हणते की, "**प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः।।**" अर्थात् "हा पंचभूतांनी रचलेला देह तर प्रारब्ध कर्मांनुसारच बनलेला असतो. त्या कर्मांचा पूर्ण शेवट शरीराद्वारा प्रारब्ध भोगल्यावरच संभव आहे." अशा अवस्थेत जर भोगापर्यंत या साधकभक्तयोगिशिष्याच्या कर्मांची परिसमाप्ती झाली नाही तर त्याचे शरीरात राहणे कसे काय होईल? "**शरीरवृत्तिर्व्रतम्**

।।३.२६।।" या सूत्रात याचे असे समाधान केले आहे की, "मी श्रीशिवस्वरूप आहे," या श्रीशिवोऽहंभावनेत स्थित असणारा सिद्धयोगी शरीरामध्येच स्थित राहूनही योगाभ्यासक्रमद्वारा देहामधल्या वासनांपासून सुटका मिळवितो. देह व प्राण आदींमध्ये राहूनही त्याची श्रीशिवसमावेशरूप स्थिती तशीच राहते. याविषयी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**सुप्रदीप्ते यथा वह्नौ शिखा दृश्येत चाम्बरे।**
**देहप्राणस्थितोऽप्यात्मा तद्वल्लीयेत तत्पदे।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे लाकूड आदि वस्तूंमध्ये लागलेल्या अग्नीच्या ज्वाळा आकाशात जाऊन विलीन होतात त्याप्रमाणे देहप्राण आदींमध्ये स्थित असणारा आत्मा श्रीशिवतत्त्वामध्ये लीन होतो.

## श्रीशैवागमाचा दार्शनिककाल

काश्मीर श्रीशैवदर्शनाचा मुख्य स्रोत श्रीशैवागम आहे. श्रीशैवाचार्य वेदांसमान श्रीशैवागम ग्रंथांचा उद्गम अनादिकालापासून मानतात. त्यामुळे श्रीशैवागमांना या विषयामध्ये एखाद्या निश्चित तिथीमध्ये आणता येत नाही. त्याचप्रमाणे या संप्रदायाचा आविर्भाव भगवान् श्रीशंकरांकडून झाला आहे.

आगमकालानंतर काश्मीर श्रीशैवदर्शनाच्या विकासात ऐतिहासिक रूपात आचार्य श्रीवसुगुप्तपादाचार्यांचे नाव प्रसिद्ध आहे. त्यांनी श्रीशैवसिद्धान्ताला एक नवीन स्वरूप देऊन एका व्यवस्थित साखळीमध्ये बांधले आहे. जरी श्रीशैवागम मुळात अत्यंत प्राचीन असला तरीही त्याचा प्रसार आणि प्रचार श्रीविक्रमराजाच्या आठव्या शतकाच्या मध्यावधी काळापासून सुरू झाला आणि नवव्या शतकामध्ये या श्रीशैवागमाचे पूर्णपणे विकसित झालेले स्वरूप जनमानसांच्या कल्याणार्थ प्रसारित झाले होते. या दर्शनाचे प्रणेते अथवा उपदेशक आचार्यांचा जन्मसुद्धा काश्मीरच्या केशरभूमीत झाला होता.

हे समस्त श्रीशैवाद्वैतशास्त्र जगतात येण्याआधी परावाणीच्या रूपात अस्तित्वात होते; परंतु अभिव्यक्त होण्याच्या इच्छेने याच परावाणीने पश्यंतीदशेचे स्वरूप धारण केले. जरी वाच्य आणि वाचक हे दोघेही अभिव्यक्तरूपातच विद्यमान असतात तरीही ही स्थिती आगामी विश्वाचा पराहंतात्मक मूलोपादान बिंदू आहे. त्यानंतर मध्यमदशेतच समस्त वाच्य-वाचक प्रपंचाचा विभाग संघटित होतो. **हा प्रपंच परमेश्वर आपल्या चिद्, आनंद, इच्छा, ज्ञान आणि क्रियात्मक शक्तिचक्राद्वारा वैखरी अवस्थेच्या रूपात विकसित करतो. त्यांना क्रमशः ईशान, तत्पुरुष, सद्योजात, अघोर आणि**

**वामदेवात्मक पंचमुख असे म्हणतात.** प्राचीन काळी याच पंचमुखांपासून चौसष्ठ तंत्र आणि श्रीशैवागमांचा आविर्भाव झाला होता. कलिकाळाच्या प्रभावाने तत्त्वोपदेशकांच्या परंपरांचा ऱ्हास झाला. त्यामुळे प्रायः समस्त श्रीशैवशास्त्रांचा जनमानसातून विलोप झाला. दीर्घ काळानंतर श्रीकैलास पर्वतावर परिभ्रमण करीत करीत **भगवान् श्रीशंकरांनी श्रीकंठमूर्तींचे** स्वरूप धारण करून **श्रीदुर्वासऋषींना** त्रिकशास्त्राच्या प्रचार-प्रसारासाठी आदेश दिला होता. भगवान् **श्रीदुर्वासऋषींनी** भगवान् श्रीपरमशिवांचा आदेश जनकल्याणासाठी शिरोधार्य मानून **श्रीत्र्यंबक, श्रीआमर्दक** आणि **श्रीश्रीनाथ** नावांच्या मानसपुत्रांना निर्माण केले. त्यांनीच पुढे जाऊन क्रमशः **अद्वैत, द्वैताद्वैत** आणि **द्वैत** सिद्धान्तांची जनहितार्थ स्थापना केली. त्यांच्यामधला **अद्वैतवादी त्रिकसिद्धान्ताचे** प्रतिपादन करणारा **श्रीत्र्यंबक** संप्रदाय सर्वोत्कृष्ट मानला जातो. **श्रीसोमानंदपाद** याच संप्रदायाचे आचार्य आहेत. **श्रीत्र्यंबकांच्या** चौदा पिढ्यांनंतर पंधराव्या मानस पुत्राने एका ब्राह्मण-कन्येशी विधिपूर्वक पाणिग्रहण संस्कार करून विवाह केला आणि त्यांच्यापासून क्रमशः **श्रीसंगमादित्य, श्रीवर्षादित्य, श्रीअरुणादित्य, श्रीआनंद व श्रीसोमानंदपाद** असे पुत्र झाले. अशा प्रकारचा वंशावलीचा क्रम "**श्रीशिवदृष्टी**" नावाच्या श्रीसोमानंदपादांच्या ग्रंथात प्रतिपादन केला आहे. त्यामुळेच "**श्रीशिवदृष्टी**" हे श्रीशैवदर्शनाचे एक विलक्षण असे अप्रतिम ग्रंथरत्न झाले आहे. या ग्रंथापासूनच लिखितस्वरूपात श्रीशैवदर्शनाचा प्रचार व प्रसार होऊन तो अत्यधिक पसरला. या ग्रंथाचा आधार घेऊनच श्रीउत्पलाचार्यांनी "**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" आदि ग्रंथांची रचना केली. यांचे शिष्य **श्रीलक्ष्मणगुप्त** आणि त्यांचे शिष्य म्हणजेच **श्रीअभिनवगुप्तपादाचार्य** होत. त्यांनी आगमशिवाद्वयवाद आणि काव्यशास्त्राशी संबंधित विपुल साहित्याचे सृजन केलेले आहे. त्यांचे शिष्य म्हणजे **राजानक श्रीक्षेमराज** होत आणि ज्यांनी "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील कारिकांवर संस्कृतात टीका लिहिली ते **राजानक श्रीयोगाचार्य** म्हणजे श्रीक्षेमराजांचे शिष्य होत.

श्रीवसुप्तपादाचार्यांची परंपरा "**श्रीशिवसूत्रवार्तिक।। ३.८।।**" मध्ये पुढीलप्रमाणे सविस्तरपणे वर्णिली आहे. **श्रीवसुगुप्तपादाचार्य - श्रीभट्ट-कल्लटाचार्य - श्रीप्रद्युम्नभट्टाचार्य - श्रीप्रज्ञार्जुनाचार्य - श्रीमहादेवभट्टाचार्य - श्रीश्रीकंठभट्टाचार्य व श्रीभास्कराचार्य** अशी ही परंपरा आहे.

**श्रीनरसिंहगुप्तांच्या** वंशात **श्रीवसुगुप्तपादाचार्यांचा** जन्म झाला. त्यांनी

काश्मीर प्रदेशी असणाऱ्या हार्वन नामक स्थानाच्या जवळ असणाऱ्या "**श्रीमहादेवगिरी**" नावाच्या पर्वतावर श्रीशिवांची आराधना केली. त्यावेळेला श्रीशंकरांनी त्यांच्या स्वप्नात येऊन असे सांगितले की, "छादीग्रामाच्या वनस्थलीमध्ये एका शिळेवर "**श्रीशिवसूत्रे**" कोरलेली आहेत." स्वप्नातल्या आदेशाप्रमाणे ते त्या स्थानी गेले. आता ती शिळा "**श्रीशंकरपल**" नावाने प्रसिद्ध आहे. या दृष्टीने श्रीभट्टकल्लटाचार्यांनीही असे म्हटले आहे की -

**लब्धं महादेवगिरौ महेशस्वप्नोपदिष्टाच्छिवसूत्रसिन्धोः।**
**स्पन्दामृते यद्वसुगुप्तपादैः श्रीकल्लटस्तत्प्रकटीचकार।।**

**अर्थ :-** श्रीमहेशांनी स्वप्नात आदेश दिल्याप्रमाणे श्रीमहादेव पर्वतावर मिळालेल्या **श्रीशिवसूत्र** समुद्रातून श्रीवसुगुप्तपादांनी जे स्पंदरूपी अमृत काढले ते श्रीभट्टकल्लटाचार्यांनी प्रकट केले.

## आगमिक संस्कृत साहित्य

श्रीशैवदर्शनाचे मूळ उपजीव्य अर्थात् आधारभूत असे **श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र, श्रीस्वच्छंदतंत्र, श्रीनेत्रतंत्र, श्रीमृगेंद्रतंत्र, श्रीनैश्वासतंत्र, श्रीरुद्रयामलतंत्र, श्रीविज्ञानभैरव, श्रीआनंदभैरव, श्रीउच्छुष्मभैरव, श्रीपरात्रिंशिका** आदि महत्त्वपूर्ण ग्रंथ आहेत. या ग्रंथांचे प्रणेते भगवान् श्रीशंकरच आहेत. अशा प्रकारे या आगमिक ग्रंथांचे पर्यालोचन अर्थात् अभ्यास करून **स्पंद, प्रत्यभिज्ञा** या नावांनी या त्रिकशासनाचे प्रतिष्ठापन झाले. **श्रीमृगेंद्रतंत्र** आणि **श्रीनेत्रतंत्र** हे ग्रंथ **कालिकागमात** येतात; कारण हे भेदप्रधान आहेत. अन्य ग्रंथ **अद्वैत, द्वैत** त्याचप्रमाणे **विशिष्टाद्वैताचे** प्रतिपादन करतात. **श्रीस्वच्छंदतंत्र** आणि **श्रीनेत्रतंत्र** यांच्यावर राजानक श्रीक्षेमराज यांनी लिहिलेल्या टीकांमधून **द्वैतवादाचे निराकरण** करून अद्वैतवादाचे विवेचन केले गेले आहे.

## श्रीशिवसूत्रवृत्ती

श्रीवसुगुप्ताचार्य यांचे शिष्य श्रीभट्टकल्लटाचार्य यांच्या नावाने प्रचलित ही वृत्ती अत्यंत सरळ आणि संक्षिप्त आहे.

## श्रीशिवसूत्रवार्तिक

हे श्रीभट्टभास्कराचार्य विरचित वार्तिक त्रिकशास्त्रांच्या अत्यंत गूढ अर्थांचे प्रकाशन करते. श्रीवसुगुप्तपादाचार्यांच्या परंपरेमध्ये श्रीभट्टभास्करांचे स्थान सातवे आहे अर्थात् ते सातव्या पिढीतले आहेत असे त्यांच्या वार्तिकामधूनच ज्ञात होते. त्याच्यामध्ये ३९० पद्ये आहेत.



## ॐ श्रीशिवसूत्रविमर्शिनी ॐ

श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांचे प्रमुख शिष्य राजानक श्रीक्षेमराजद्वारा प्रणीत "**श्रीशिवसूत्रविमर्शिनी**" ही आगमिक धारेमधली एक विलक्षण व्याख्या आहे. त्यांनी समस्त आगमग्रंथांमधली उद्धरणे देत देत प्रत्येक सूत्राची विशद अर्थात् स्पष्ट आणि उक्त व्याख्याकारांचे विचार पुष्ट करणारी अशी व्याख्या केली आहे. त्रिकदर्शनाच्या परंपरेत या टीकेचे खूप महत्त्वपूर्ण स्थान आहे; कारण त्यांच्या अन्य आगमिक ग्रंथांच्या व्याख्यांमधून पूर्णपणे अद्वैतभावाचीच झलक पाहवयाला मिळते.

## ॐ श्रीशिवसूत्रवार्तिक ॐ

राजानक श्रीक्षेमराजांचे शिष्य श्रीवरदराजाचार्यांद्वारा रचलेल्या वार्तिकात अन्य सर्व व्याख्यांचे सारतत्त्व आणि गंभीर गूढार्थाचे विवेचन आले आहे. पद्यामध्ये रचलेले असूनही हे वार्तिक सूत्रांचे अर्थ चांगल्या तऱ्हेने प्रकाशित करते.



# श्रीजयदेवसिंग यांनी "श्रीशिवसूत्रे" या इंग्रजी ग्रंथाला लिहिलेली प्रस्तावना.

## श्रीशैवदर्शनाचे अद्वैत तत्त्वज्ञान आणि योग यांचे प्रमुख स्रोत

तत्त्वज्ञान आणि योगाच्या श्रीशैवदर्शनाला सामान्यपणे आगम असे म्हणतात. आगम याचा अर्थ श्रद्धेवर अधिकार ठेवणारे पारंपारिक तत्त्व अथवा दर्शन होय.

सर्वसाधारणतः श्रीशैवदर्शन हे श्रीशिवशासन अथवा श्रीशैवागम या नावांनी ओळखले जाते. काश्मीरचे अद्वैत श्रीशैवदर्शन हे त्रिकशासन, त्रिकशास्त्र अथवा रहस्यसंप्रदाय म्हणून निर्देशिले जाते. शासन आणि शास्त्र हे शब्द खूप महत्त्वाचे आहेत. या दोन्ही शब्दात मूळ धातू "शास्" असा असून त्याचा अर्थ शिस्त लावणे असा आहे. शासन अथवा शास्त्र याचा अर्थ शिस्तीसाठी असणाऱ्या नियमांनी युक्त असे शिकविणे होय. भारतामध्ये शास्त्र अथवा शासन याचा अर्थ केवळ एका विशिष्ट तत्त्वज्ञानाचे बौद्धिक स्पष्टीकरण असा कधीच नसतो. ते निश्चितच पारमार्थिक तत्त्वाची मूलभूत तत्त्वे सांगते. त्याचबरोबर त्या दर्शनाचा जो अभ्यास करतो त्याच्यासाठी त्या दर्शनात तत्त्वांच्या पायाभूत आधारावर काही नियम घालून दिलेले असतात. त्या अभ्यासकांना ते पाळावे लागतात. शास्त्र हे केवळ विचारांचा मार्ग नसून जीवनाचाही मार्ग आहे. काश्मीरी श्रीशैवतत्त्वज्ञानाला **"त्रिकदर्शन"** म्हणण्याचे कारण म्हणजे ते तिघांचे तत्त्वज्ञान आहे. त्या तीन गोष्टी म्हणजे (१) श्रीशिव (२) शक्ती आणि (३) नर म्हणजे बंधनात पडलेला आत्मा किंवा (१) पर अर्थात् श्रेष्ठ (२) परापर अर्थात् भेदामधले अहंज्ञान आणि (३) अपर अर्थात् भेद या आहेत.

काश्मीरी त्रिकदर्शन हे तीन प्रकारात मोडते **(१) श्रीआगमशास्त्र (२) श्रीस्पंदशास्त्र (३) श्रीप्रत्यभिज्ञाशास्त्र.**

### (१) श्रीआगमशास्त्र

श्रीआगमशास्त्र याचा अर्थ श्रीशिवांकडून प्राप्त होणारे ज्ञान असा विचारात घेतला जातो. श्रीआगमशास्त्र हे दर्शनाची तत्त्वे आणि आचारधर्म दोन्हीही सांगते. खालील तंत्रे श्रीआगमात मोडणारी आहेत.

"**श्रीमालिनीविजय किंवा श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र,**" "**श्रीस्वच्छंद-तंत्र,**" "**श्रीविज्ञानभैरवतंत्र,**" "**श्रीमृगेंद्रतंत्र,**" "**श्रीनेत्रतंत्र,**" "**श्रीरुद्र-यामलतंत्र,**" "**श्रीशिवसूत्रे**" इत्यादि.

यांपैकी बहुतेक तंत्रे द्वैततत्त्वाचा उपदेश करतात. त्रिकदर्शनाचा सर्वात महत्त्वाचा आगम ग्रंथ म्हणजे "**श्रीशिवसूत्रे**" हा होय.

## श्रीशिवसूत्रे

या ग्रंथाची महती या वास्तवात सामावलेली आहे की, ही सूत्रे द्वैतवादाच्या परिणामांना संपविण्यासाठी व्यक्त झाली आहेत. हा ग्रंथ बहुधा "**श्रीशिवो-पनिषद्संग्रह**" या नावाने ओळखला जातो. त्याचा अर्थ हा ग्रंथ श्रीशिवांद्वारा प्रकट केलेल्या रहस्यतत्त्वाचा समावेशक किंवा सारग्रंथ असा आहे. ही सूत्रे प्रथम श्रीवसुगुप्तांकडे प्रकट झाली.

श्रीवसुगुप्तांना ही सूत्रे प्रकट होऊन कशी मिळाली याविषयी तीन गोष्टी अथवा उपपत्ती आहेत.

(१) श्रीभट्टकल्लटाचार्य यासंबंधी त्यांच्या "**श्रीस्पंदवृत्ती**" या ग्रंथात असे म्हणतात की, श्रीशिवांनी श्रीवसुगुप्ताचार्यांना स्वप्नात श्रीशिवसूत्रांचा उपदेश केला. ते श्रीनगरजवळच्या शालिमारबागेपाठीमागे असणाऱ्या हर्वण किंवा हर्वन नावाच्या धबधब्याच्या दरीत असलेल्या श्रीमहादेव पर्वतावर राहत होते.

(२) श्रीभास्कराचार्य त्यांच्या वार्तिकात असे म्हणतात की, ही सूत्रे श्रीवसुगुप्ताचार्यांना एका सिद्धांकडून स्वप्नात प्रकट होऊन मिळाली.

(३) श्रीक्षेमराजाचार्य त्यांच्या "**विमर्शिनी**" या टीकेत असे सांगतात की, श्रीशिव श्रीवसुगुप्ताचार्यांच्या स्वप्नात आले आणि त्यांना असे म्हणाले की, "महादेव पर्वतावर ही गुप्त तत्त्वे एका दगडावर खोदलेली आहेत. त्यांचा संग्रह करून जे मुक्तियोग्य आहेत त्यांना त्यांचा उपदेश कर." जागे झाल्या-नंतर श्रीवसुगुप्ताचार्य स्वप्नात सांगितलेल्या जागेवर गेले आणि त्यांनी त्या दगडाला केलेल्या स्पर्शमात्रेच तो दगड सरळ होऊन त्यांना त्या दगडावर कोरलेली "**श्रीशिवसूत्रे**" मिळाली.

तो विशिष्ट दगड आजही "**श्रीशंकरोपल**" या नावाने ओळखला जातो आणि त्याच्यावर सूत्रे कोरलेली होती असे सांगण्यात येते. तो दगड तेथे आहे; पण त्याच्यावर या सूत्रांचा पत्ता लागत नाही.

"**श्रीशिवसूत्रे**" मिळण्याच्या तीन उपपत्तींमध्ये काही समान मुद्दे आहेत.

(१) त्यांचा कोणीही मानवी लेखक नाही. ती सूत्रे श्रीशिवांद्वारा प्रकट झाली.

(२) ती सूत्रे श्रीवसुगुप्तपादाचार्यांपुढेच प्रकट होऊन त्यांना मिळाली.

ती सूत्रे श्रीशिवांद्वारा अथवा सिद्धद्वारा स्वप्नात प्रकट झाली किंवा श्रीशिवांनी दिलेल्या आदेशाप्रमाणे ती दगडावर कोरलेली मिळाली; या गोष्टी प्रकट होण्याच्या मुख्य घटनेचा विचार करता गौण आहेत.

## श्रीशिवसूत्रेप्राप्तीचा काळ

आपल्याला "**श्रीराजतरंगिणी**" या ग्रंथावरून असे ज्ञात होते की, श्रीभट्टकल्लटाचार्य हे काश्मीरचे राजे श्री. अवंतिवर्मांच्या राजवटीत होऊन गेले. राजे श्री. अवंतिवर्मा हे इसवी सनाच्या नवव्या शतकात होऊन गेले. "**श्रीशिवसूत्रे**" यांचा शोध लावलेले श्रीवसुगुप्ताचार्य हे श्रीभट्टकल्लटाचार्यांचे श्रीसद्गुरू होत. त्यामुळे ते इसवी सनाच्या आठव्या शतकाच्या उत्तरार्धात अथवा नवव्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेले असावेत. त्यामुळे इसवी सनाच्या आठव्या शतकाचा उत्तरार्ध किंवा नवव्या शतकाचा पूर्वार्ध हा "**श्रीशिवसूत्रां**"च्या शोधाचा काळ असला पाहिजे.

## श्रीशिवसूत्रांवरील टीका

श्रीक्षेमराजाचार्य त्यांच्या श्रीशिवसूत्रांवरील "**विमर्शिनी**" या टीकेत असे म्हणतात की, त्यांच्या काळात असणाऱ्या श्रीशिवसूत्रांवरील अनेक टीकांमधली तफावत त्यांच्या लक्षात आली. त्यामुळे त्यांनी स्वतःच एक नवीन टीका लिहिण्याचा निर्णय घेतला. त्यांनी ज्या टीकांमध्ये तफावत पाहिली त्यांची नावे दिलेली नाहीत. सध्याच्या काळात एकंदरीत चार टीका उपलब्ध आहेत.

**(१) श्रीभट्टकल्लटाचार्य विरचित वृत्ती**

**(२) श्रीभास्कराचार्य विरचित वार्तिक**

**(३) श्रीक्षेमराजाचार्य विरचित विमर्शिनी**

**(४) श्रीवरदराजाचार्य उपाख्य श्रीकृष्णदास विरचित वार्तिक**

"**वृत्ती**" ही टीका लिहिणाऱ्या लेखकांचे नाव जरी अज्ञात असले तरी ती श्रीभट्टकल्लटाचार्य यांनी लिहिली आहे असे मानले जाते. ही "**वृत्ती**" "**विमर्शिनी**"शी प्रतिपादन करण्यातच नव्हे; तर शब्दांमध्येही सारखेपणा दाखविते. त्यावरून असे दिसते की, एक तर "**वृत्ती**" आधी लिहिली गेली आणि श्रीक्षेमराजांनी प्रतिपादनाचा विस्तार करण्याकरिता त्याचा साचा

म्हणून उपयोग केला किंवा "**विमर्शिनी**" प्रथमत: लिहिली आणि स्वत: श्रीक्षेमराजांनी किंवा अन्य कोणी तरी तिचा संक्षेप करून "**वृत्ती**" तयार केली.

श्रीभास्कराचार्य त्यांच्या वृत्तीच्या प्रस्तावनेच्या भागात असे म्हणतात की, श्रीवसुगुप्ताचार्यांनी श्रीभट्टकल्लटाचार्यांना "**श्रीशिवसूत्रांचा**" उपदेश केला आणि त्यानंतर त्यांनी श्रीप्रद्युम्नभट्टाचार्यांना व श्रीप्रद्युम्नभट्टाचार्यांनी त्यांच्या पुत्राला म्हणजेच श्रीप्रज्ञार्जुनाचार्यांना त्याचा उपदेश केला. श्रीप्रज्ञार्जुनाचार्यांनी त्यांचे शिष्य श्रीमहादेवभट्टाचार्य यांना श्रीशिवसूत्रांचे ज्ञान प्रदान केले. श्रीमहादेवभट्टाचार्य यांनी मग ते त्यांच्या पुत्राला म्हणजे श्रीकंठभट्टाचार्यांना दिले. श्रीभास्कराचार्यांनी स्वत: श्रीकंठभट्टाचार्यांकडून "**श्रीशिवसूत्राचे**" ज्ञान प्राप्त केले. श्रीभास्कराचार्य इसवी सनाच्या अकराव्या शतकात झाले. त्यामुळे त्यांनी रचलेले "**वार्तिक**" त्याच काळात लिहिले गेले.

"**वृत्ती**" ही अत्यंत संक्षिप्त स्वरूपात सूत्रांच्या प्रमुख कल्पना सादर करते. "**वार्तिक**" हे पद्यस्वरूपात आहे.

श्रीक्षेमराज यांची "**विमर्शिनी**" अत्यंत सुबोधपणे सर्व सूत्रांचे गद्यामध्ये सर्वसमावेशक स्पष्टीकरण देते. श्रीक्षेमराज त्यांचे प्रतिपादन अन्य ग्रंथातील तौलनिक आणि महत्त्वाची उद्धरणे देऊन सिद्ध करतात. त्यातले काही ग्रंथ आता पूर्णपणे नष्ट झालेले आहेत.

इसवी सनाच्या दहाव्या शतकात झालेले श्रीक्षेमराजाचार्य हे श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांचे शिष्य होत हे सर्वविदित आहेच. त्यामुळे श्रीक्षेमराजाचार्य यांनी "**विमर्शिनी**" टीका इसवी सनाच्या दहाव्या शतकात लिहिली असावी. श्रीक्षेमराजाचार्य यांनी प्रचंड लिखाण केले आहे. त्यांनी खालील ग्रंथ लिहिले आहेत.

"**श्रीप्रत्यभिज्ञाहृदय,**" "**श्रीस्पंदसंदोह,**" "**श्रीस्पंदनिर्णय,**" "**श्रीस्वच्छंदोद्योत,**" "**श्रीनेत्रोद्योत,**" "**श्रीविज्ञानभैरवोद्योत,**" "**श्रीशिवसूत्रविमर्शिनी,**" "**श्रीस्तवचिंतामणिटीका,**" "**श्रीपराप्रावेशिका,**" "**श्रीतत्त्वसंदोह**" **आणि** "**श्रीउत्पलाचार्यांची स्तोत्रावलीटीका.**"

श्रीवरदराजाचार्य उपाख्य श्रीकृष्णदास यांनी रचलेली "**श्रीशिवसूत्रवार्तिकम्**" ही "**श्रीशिवसूत्रे**" यांवरची चौथी टीका होय. हे वार्तिक म्हणजे श्रीक्षेमराजाचार्यकृत विमर्शिनीचेच नव्याने केलेले सादरीकरण आहे. श्रीवरद-

राजाचार्यांनी त्यांचे स्वतःचे असे वेगळे प्रतिपादन केलेले नाही. ते इसवी सनाच्या पंधराव्या शतकात होऊन गेले.

या सर्व टीकांमध्ये श्रीक्षेमराजाचार्यकृत "**विमर्शिनी**" ही सर्वांत जुनी आणि विद्वत्तापूर्ण व्याख्या आहे.

## (२) श्रीस्पंदशास्त्र

"**श्रीशिवसूत्रांनी**" घालून दिलेले तत्त्वज्ञान स्पंदशास्त्रात तपशीलवारपणे सांगितले आहे. त्याच्यामध्ये प्रामुख्याने "शक्ती" याच विषयाच्या दृष्टिकोनातून "**श्रीशिवसूत्रे**" यांचा अर्थ लावला आहे.

या शास्त्राचा प्रमुख ग्रंथ "**श्रीस्पंदशास्त्र**" किंवा "**श्रीस्पंदसूत्रे**" अथवा "**श्रीस्पंदकारिका**" या नावाने ओळखला जातो. या ग्रंथावर खालील टीका आहेत.

**१) श्रीभट्टकल्लटाचार्य यांची "श्रीस्पंदकारिका वृत्ती"**
**२) श्रीरामकंठाचार्य यांची "श्रीस्पंदकारिका विवृती"**
**३) श्रीउत्पलाचार्य यांची "श्रीस्पंदप्रदीपिका"**
**४) श्रीक्षेमराजाचार्य यांचा "श्रीस्पंदनिर्णय"**
**५) श्रीक्षेमराजाचार्य यांचा "श्रीस्पंदसंदोह"** - ही फक्त पहिल्या कारिकेवरची व्याख्या आहे.

श्रीक्षेमराजाचार्यांच्या मते "**श्रीस्पंदसूत्रे**" ही श्रीवसुगुप्ताचार्यांनी लिहिलेली आहेत. बाकीच्यांच्या मते ती श्रीवसुगुप्ताचार्यांचे शिष्य श्रीभट्टकल्लटाचार्यांनी रचलेली असावीत.

## (३) श्रीप्रत्यभिज्ञाशास्त्र

हे शास्त्र समस्त श्रीशैवदर्शनाला योग्य असे तत्त्वज्ञान सांगते. ते त्रिक तत्त्वज्ञानाचे मुद्दे आणि चर्चा सांगून विशदीकरण अथवा स्पष्टीकरण करते.

या श्रीशैवशास्त्राचा पहिला ग्रंथ म्हणजे श्रीसोमानंदपादाचार्यांनी लिहिलेला "**श्रीशिवदृष्टी**" हा ग्रंथ होय. ते श्रीवसुगुप्ताचार्यांचे शिष्य होत. ते इसवी सनाच्या नवव्या शतकात झाले. "**श्रीशिवदृष्टी**" हा तत्त्वज्ञानविषयक खूपच महत्त्वाचा असा ग्रंथ आहे; परंतु दुर्दैवाने तो अजून पूर्ण स्वरूपात उपलब्ध झालेला नाही. श्रीसोमानंदपादाचार्यांनी त्याच्यावर "**वृत्ती**" सुद्धा रचली आहे; पण तीही पूर्ण रूपात उपलब्ध नाही.

या शास्त्राचा सर्वांत महत्त्वाचा आणि उपलब्ध असलेला ग्रंथ म्हणजे "**श्रीप्रत्यभिज्ञासूत्र**" किंवा "**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" हा होय. हा ग्रंथ श्रीसोमानंद-

पादाचार्यांचे शिष्य श्रीउत्पलाचार्यांनी रचला आहे. या "**श्रीप्रत्यभिज्ञासूत्रांना**" एवढे महत्त्व प्राप्त झाले की, सर्व काश्मीरचे तत्त्वज्ञानच "**श्रीप्रत्यभिज्ञादर्शन**" या नावाने ओळखले जाऊ लागले. "**श्रीप्रत्यभिज्ञासूत्रां**"वर खालील व्याख्या लिहिल्या गेल्या आहेत.

(१) श्रीउत्पलाचार्यांनी स्वतःच रचलेली "**वृत्ती;**" परंतु ती अपूर्ण स्वरूपात आहे.

(२) "**श्रीप्रत्यभिज्ञा विमर्शिनी**" ही श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनी रचली आहे.

(३) "**श्रीप्रत्यभिज्ञा-विवृति-विमर्शिनी**" ही सुद्धा श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनीच रचली असून ती "**विवृती**" नावाच्या श्रीउत्पलाचार्यांच्या नष्ट झालेल्या टीकेवरची व्याख्या आहे.

वरील ग्रंथांशिवाय "**श्रीतंत्रालोक**" नावाचा श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनी रचलेला एक महान् ग्रंथ आहे. तो सदतीस अध्यायांचा असून त्याच्यात श्रीशैवतत्त्वज्ञानाचा आणि आचरणाचा सर्व अंगांनी अभ्यास केलेला आहे. याचेच "**श्रीतंत्रसार**" नावाचे संक्षिप्तस्वरूपही आहे. श्रीजयरथ यांनी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथावर "**विवेक**" नावाची व्याख्या लिहिली आहे.

## श्रीशिवसूत्रांची तात्त्विक पार्श्वभूमी

"**श्रीशिवसूत्रे**" हा योगावरील एक प्रबंध अर्थात् योगाविषयीच्या सर्व अंगांचा काळजीपूर्वक अभ्यास केलेले पुस्तक आहे; परंतु हा योग तत्त्वज्ञानाच्या एका निश्चित पद्धतीवर आधारलेला आहे. हा योग ज्या तत्त्वज्ञानावर आधारलेला आहे ते जोपर्यंत नीटपणे आकलन होत नाही तोपर्यंत हा योग समजणे शक्य नाही.

आपण खालील मुद्यांवर या योगाची तात्त्विक पार्श्वभूमी विचारात घेऊ शकतो.

**(१) अंतिम तत्त्व किंवा परम तत्त्व.**
**(२) सृष्टी अथवा जगत्क्रिया.**
**(३) बंध.**
**(४) मुक्ती.**

### (१) अंतिम तत्त्व किंवा परमतत्त्व

अंतिम तत्त्व अथवा परमतत्त्व म्हणजेच चित् किंवा परासंवित् होय. हे संबंधरहित (non-relational) चैतन्य आहे. ते सर्व बदलांमधले बदल न

होणारे तत्त्व आहे. त्याच्यामध्ये कर्ता आणि विषय यांमधला किंवा "**अहम्**" आणि "**इदम्**" अर्थात् "मी" व "हे" जगत् यांच्यामधला कोणताही भेद नसतो. ते स्वतःच स्वतःची मदत करणारे सर्वश्रेष्ठ आत्मतत्त्व आहे. "**श्रीप्रत्यभिज्ञाशास्त्राच्या**" शब्दात सांगावयाचे झाल्यास ते "प्रकाशविमर्शमय" अर्थात् "श्रीशिवशक्तिमय" तत्त्व आहे. प्रकाश म्हणजे ज्याच्याशिवाय काहीही व्यक्त होणार नाही असा शाश्वत प्रकाश अथवा तेज आहे. हा प्रकाश म्हणजेच "श्रीशिव" होत. "विमर्श" म्हणजे शक्ती असून ती श्रीशिवांचा "स्वभाव" आहे. विमर्श किंवा शक्ती म्हणजे असा आरसा आहे की, ज्यात श्रीशिव त्यांचे स्वतःचे ऐश्वर्य, सामर्थ्य आणि सौंदर्य यांचे ज्ञान करून घेतात. विमर्श म्हणजे श्रीशिवांची कर्तृत्वशक्ती आहे. फक्त प्रकाश हा परमतत्त्वाचे स्वरूप होऊ शकत नाही. तसे पाहवयाला गेले तर हिरा म्हणजे सुद्धा प्रकाशच आहे; पण तो स्वतःला प्रकाश म्हणून ओळखत नाही. विमर्श ही प्रकाशाची अशी बाजू आहे की, ज्यामुळे प्रकाश हा स्वतःला प्रकाश म्हणून जाणतो. ते आत्मज्ञान म्हणजे क्रिया होय.

विमर्श हा त्या क्रियेचे सूचन करतो. विमर्शाविषयी राजानक श्रीक्षेमराजाचार्य त्यांच्या "**श्रीपराप्रावेशिका**" या ग्रंथात असे म्हणतात की, "विमर्श" म्हणजे "**अकृत्रिमाहम् इति विस्फुरणम्।।**" अर्थात् "मी अकृत्रिम म्हणजेच नैसर्गिक असा आहे असे तत्काळ ज्ञान होणे होय." त्याचबरोबर श्रीक्षेमराजाचार्य असे म्हणतात की, "**यदि निर्विमर्शः स्यात् अनीश्वरो जडश्च प्रसज्येत।।**" अर्थात् "जर परमतत्त्व केवळ प्रकाश असेल आणि विमर्शही नसेल तर ते तत्त्व पूर्णपणे सामर्थ्यहीन आणि जड होईल." या परमतत्त्वाचे आत्मचैतन्यच सृष्टी, स्थिती आणि लय यांना जबाबदार आहे.

चित् हे आपण चिद्रूपिणी शक्ती आहोत हे जाणून असते. ही स्वतःची "चिद्रूपिणी शक्ती" म्हणून जाणीव असणे म्हणजेच विमर्श होय. "**श्रीपराप्रावेशिका**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

"विमर्शाला पराशक्ती, स्वातंत्र्य, ऐश्वर्य, कर्तृत्व, स्फुरत्ता, सार, हृदय व स्पंद इत्यादि अनेक नावे दिली जातात."

श्रीशांकर वेदान्तात ब्रह्म हे विमर्श अथवा क्रियारहित केवळ प्रकाश अथवा ज्ञान मानल्यामुळेच त्याला जगताच्या सृष्टीसाठी मायेची आळवणी करावी लागते. ब्रह्म हे कोणत्याही क्रियेशिवाय आहे. त्यामुळेच ते सृष्टी करण्यास असमर्थ आहे. श्रीईश्वर अथवा मायोपहित अर्थात् मायायुक्त चैतन्यच

जगत् निर्माण करू शकते. पण ही माया कोठून आली? जर माया ही ब्रह्म अथवा श्रीईश्वराहून बाहेरची शक्ती आहे असे मानले तर श्रीशांकर वेदान्त द्वैतवादापर्यंत खाली येईल. जर माया ही ब्रह्माच्या सामर्थ्याचा आविर्भाव किंवा व्यक्त स्वरूप असेल तर ब्रह्म त्याच्या क्रियेचा त्याग करू शकत नाही. सांख्य आणि वेदान्ती दोघेही पुरुष आणि आत्म्याला निष्क्रिय समजतात; कारण की, ते क्रिया याचा अर्थ बऱ्याच असंस्कृत दृष्टीने घेतात. ब्रह्म अथवा आत्मा हा निश्चितच एखाद्या कुंभार अथवा घड्याळ बनविणाऱ्या कामगाराप्रमाणे वागू शकत नाही. हा विमर्श अर्थात् ही दिव्य इच्छा म्हणजे सूक्ष्माहून सूक्ष्म वस्तूपासून स्थूलाहून स्थूल वस्तूपर्यंत वृद्धी पावणारी अमर्याद अशा सामर्थ्याची आत्मिक शक्ती आहे.

स्वातंत्र्य हेच श्रीशिवांचे उत्कृष्ट वैशिष्ट्य आहे. हे वैशिष्ट्य स्वतःला इच्छेच्या स्वरूपात व्यक्त करते आणि ही इच्छाशक्ती तत्काळ स्वतःला ज्ञान आणि क्रिया यांमध्ये बदलविते.

परमतत्त्व हे केवळ वैश्विक चैतन्य नसून सर्वश्रेष्ठ आत्मिक शक्ती किंवा सामर्थ्यही आहे. हे वैश्विक चैतन्य अनुत्तर असेही म्हणविते. अनुत्तर म्हणजेच सर्वश्रेष्ठ व पूर्ण तत्त्व होय. हे विश्वोत्तीर्ण म्हणजेच विश्वाच्या पलीकडलेही आहे आणि विश्वमय म्हणजेच विश्वात सामावलेलेही आहे.

## (२) सृष्टी अथवा जगत्क्रिया

सृष्टी अथवा निर्मिती करणे हा परमतत्त्वाचा स्वभाव आहे. क्रिया ही दिव्यत्वाचा आत्मा म्हणजेच सार आहे. जर परमतत्त्वाने सृष्टी केली नाही तर तो आत्मा अथवा चैतन्य राहणारच नाही. तो केवळ अनात्म व एखाद्या घटाप्रमाणे जड होईल.

याविषयी श्रीअभिनवगुप्तपादाचार्य त्यांच्या "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात असे म्हणतात की -

**अस्थास्यदेकरूपेण वपुषा चेन्महेश्वरः।**
**महेश्वरत्वं संवित्त्वं तदत्यक्षद् घटादिवत्।।३.१००।।**

**अर्थ :-** जर श्रीमहेश्वर त्यांच्या एकाच स्वरूपात किंवा शरीरात तसेच राहिले व विविधत्वाने नटले नाहीत तर त्यांचे श्रीमहेश्वरत्व किंवा संवित्व म्हणजेच चैतन्यत्व गळून जाईल आणि ते एखाद्या घटाप्रमाणे जड होतील किंवा भासतील.

परमतत्त्व अथवा श्रीपरमशिव हे प्रकाशविमर्शमय आहेत. त्या अवस्थेमध्ये

"अहम् म्हणजे मी" आणि "इदम् म्हणजे हे" हे अभेदात्मक एकतेत स्थित असतात अर्थात् त्यांच्यात वेगवेगळेपणा नसतो. "अहम्" हे प्रकाशाचे अंग आहे. "इदम्" किंवा "शक्ती" स्वतःचा चैतन्यपणा हे "विमर्श" याचे अंग आहे. ह्या विमर्श म्हणजे स्वातंत्र्य किंवा शक्ती होय. त्याच्यात काही नाही असे नाही. जे घडणारे आहे ते सर्व त्याच्यात समाविष्ट आहे. याविषयी "**श्रीपरात्रिंशिका**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यथा न्यग्रोधबीजस्थः शक्तिरूपो महाद्रुमः।**
**तथा हृदयबीजस्थं विश्वमेतच्चराचरम्।।३४।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे वडाच्या झाडाच्या बीजामध्ये तो वटवृक्ष एका शक्तीच्या रूपात स्थित असतो त्याचप्रमाणे हे चर म्हणजे हलणारे आणि अचर म्हणजे न हलणारे अर्थात् जड विश्व परमात्म्याच्या हृदयरूपी बीजात स्थित असते.

श्रीपरमशिवांची शक्ती म्हणजे "चिती" अथवा "पराशक्ती" किंवा "परावाक्" होय. पुढे येणाऱ्या भागात आपण पराशक्ती किंवा परावाक् हे शब्द आणि त्याचे विषय यांच्या निर्मितीत कोणता भाग घेतात हे पाहणारच आहोत.

श्रीपरमशिवांच्या अमर्याद शक्ती आहेत; परंतु खालील काही त्यांच्या प्रमुख शक्ती मानता येतील.

**(१) चित् :-** आत्मज्ञानाचे सामर्थ्य आणि सर्व बदल अथवा परिणामांचे किंवा त्यांना कारणीभूत होणारे परिणामशून्य तत्त्व म्हणजे चित् होय. या दृष्टिकोनातून परमतत्त्व हे "श्रीशिव" म्हणून ओळखले जाते.

**(२) आनंद :-** यालाच स्वातंत्र्य असे म्हणतात. या अंगाने परमतत्त्व हे "श्रीशक्ती" म्हणून ओळखले जाते. चित् आणि आनंद हे श्रीपरमेश्वराचे स्वभाव आहेत. बाकीच्या त्यांच्या शक्ती म्हणून मानता येतील.

**(३) इच्छा :-** या अंगाने परमतत्त्व "श्रीसदाशिव" अथवा "सादाख्य" म्हणून ओळखले जाते.

**(४) ज्ञान :-** यामध्ये परमतत्त्वाला "श्रीईश्वर" असे म्हटले जाते.

**(५) क्रिया :-** क्रिया म्हणजे कोणतेही आणि प्रत्येक स्वरूपामध्ये अवतरण्याचे सामर्थ्य होय. या अंगाने परमतत्त्व सद्विद्या अथवा शुद्ध विद्या म्हणून ओळखले जाते.

हे जगत् म्हणजे परमतत्त्वाचा शक्तीच्या रूपातला उन्मेष म्हणजे उघडणे किंवा प्रसर म्हणजे पसरणे आहे.

## सृष्टीच्या प्रक्रियेत आविर्भूत होणाऱ्या गोष्टी किंवा अनुभूती.

### विश्वात्मक अनुभवाची तत्त्वे (१ ते ५)

हे अगोदरच सांगण्यात आलेले आहे की, श्रीपरमशिवांना दोन अंगे अथवा बाजू आहेत. एक म्हणजे विश्वोत्तीर्ण आणि दुसरी म्हणजे विश्वमय अथवा क्रियाशील होय. श्रीपरमशिवांच्या या क्रियाशील अंगाला "श्रीशिव-तत्त्व" असे म्हणतात.

**(१) श्रीशिवतत्त्व :- श्रीशिवतत्त्व** म्हणजे श्रीपरमशिवांची प्राथमिक क्रियाशील हालचाल अर्थात् प्रथम स्पंद आहे.

**(२) शक्तितत्त्व :- शक्तितत्त्व** म्हणजे श्रीशिवांची शक्ती आहे. ती चैतन्यामध्ये अहम् व इदम् अर्थात् मी व हे म्हणजेच कर्ता आणि कर्म किंवा विषय व जगत् असा विकार किंवा बदल घडवून आणते.

तरीही शक्ती श्रीशिवांहून भिन्न नाही. श्रीशिव हे त्यांच्या क्रियात्मक अंगाने शक्ती म्हणून ओळखले जातात. ही शक्ती श्रीशिवांचा अहंविमर्श अर्थात् त्यांची उन्मुखता किंवा सृष्टी करण्यासाठीची तीव्रता आहे.

ज्याप्रमाणे एखादा कलाकार स्वत:चा आनंद स्वत:त ठेवू शकत नाही उलट एखाद्या गीतात किंवा कवितेत तो ओततो त्याचप्रमाणे श्रीपरमशिव त्यांची उदात्तता व भव्यता यांचे आनंदयुक्त आश्चर्य त्यांच्या सृष्टीत ओततात.

शक्तितत्त्वात परमात्म्याचा आनंद हे प्रधान अंग असते.

श्रीशिव आणि शक्ती हे एकमेकांपासून कधीच वेगळे होत नाहीत किंवा त्यांना कधीही वेगळे करता येत नाही.

**(३) श्रीसदाशिवतत्त्व किंवा सादाख्यतत्त्व :-** वैश्विक अनुभवाची "इदम्"ची बाजू खात्रीपूर्वक प्रतिपादन करण्याची इच्छा म्हणजे श्रीसदाशिवतत्त्व अथवा सादाख्यतत्त्व होय. श्रीसदाशिवतत्त्वात इच्छा प्रमुख आहे.

या पातळीवरचा अनुभव म्हणजे "मी हे आहे" असा असतो; परंतु तो खूप अस्फुट किंवा अस्पष्ट असतो. अजूनही "मी" अर्थात् अहम् हीच बाजू प्रबळ असते. आदर्श विश्व हे चैतन्याच्या गंभीरतेमध्ये अभिन्न असे काहीतरी आहे असे अनुभवाला येते.

श्रीसदाशिवतत्त्व ही पहिली सृष्टी किंवा आभास आहे. या विश्वाच्या अनुभवामध्ये "कर्ता" आणि "कर्म" अर्थात् "अहम्" व "इदम्" हे चैतन्यात्मकच असतात. या अंगामध्ये चैतन्य हे स्वत:लाच ग्रहण करीत असते म्हणून "अहम्" आणि "इदम्" ही ग्रहण केली जातात.

**(४) श्रीईश्वर किंवा ऐश्वर्यतत्त्व :-** दिव्यत्वाच्या अनुभवाची पुढची अवस्था म्हणजे ज्यात "इदम्" चे स्वरूप जास्त स्फुट किंवा स्पष्ट होते त्यालाच श्रीईश्वरतत्त्व असे म्हणतात. हाच विश्वाचा उन्मेष किंवा विश्वाचे स्पष्टपणे उमलणे होय. या अवस्थेत ज्ञान प्रबळ किंवा वरचढ असते.

**(५) सद्विद्यातत्त्व किंवा शुद्धविद्यातत्त्व :-** सद्विद्यातत्त्वात अनुभवाच्या "मी" आणि "हे" या बाजू एखाद्या "**समधृततुलापुटन्यायेन।।**" म्हणजे "तुलेच्या सारख्याच असणाऱ्या दोन्ही पारड्यांप्रमाणे सारख्याच तोलाच्या असतात." या अवस्थेमध्ये "क्रियाशक्ती" प्रबळ असते. या अवस्थेत "अहम्" आणि "इदम्" हे इतक्या स्पष्टपणे ओळखू येतात की, जरी "अहम्" आणि "इदम्" यांच्यात सारखेपणा असला तरी विचारांमध्ये ते अचूकपणे एकमेकांपासून वेगळे करता येतात. या पातळीवरचा अनुभव हा "**भेदाभेदविमर्शनात्मा।।**" अर्थात् "एकतेतली भेदता" असा असू शकतो. अर्थात् ज्यावेळी "इदम्" "अहम्" पासून स्पष्टपणे वेगळे केले जाते त्यावेळी अजूनही ते "इदम्" "अहम्"चा भाग आहे असे वाटते. जे "अहम्" म्हणजे "आत्मा" आहे तेच "इदम्" म्हणजे "जगत्" आहे आणि जे "इदम्" म्हणजे "जगत्" आहे ते "अहम्" म्हणजे "आत्मा" आहे म्हणजेच त्यांना समानाधिकरण अर्थात् सारखा आधार आहे.

या अवस्थेतला अनुभव "परापर दशा" म्हणून ओळखला जातो. ती पर म्हणजे सर्वश्रेष्ठ आणि अपर म्हणजे खालची यांच्या मधली अवस्था आहे.

या अवस्थेपर्यंत सर्व अनुभव हे कल्पनेच्या स्वरूपातले असतात म्हणूनच त्याला परिपूर्ण किंवा शुद्ध अध्वा असे म्हणतात अर्थात् ज्यात परमतत्त्वाचे स्वरूप अजूनपर्यंत अस्पष्ट अथवा अव्यक्त किंवा दिसेनासे झालेले नाही अशी सृष्टी होय.

## मर्यादित व्यक्तिगत अनुभवजन्य ज्ञानाची तत्त्वे (६ ते ११)

**(६) मायातत्त्व :-** आता यापुढे मायातत्त्वाचा खेळ सुरू होतो. या अवस्थेपासून पुढे परमतत्त्वाचे स्वरूप अस्पष्ट झालेले अशुद्धाध्वा असे असते. हे सर्व माया आणि तिच्या कंचुकांमुळे होते. माया हा शब्द "मा" म्हणजे मोजणे या धातुपासून निर्माण होतो. माया म्हणजे जी अनुभवजन्यज्ञान मोजते अर्थात् संकुचित करते आणि "अहम्"ला "इदम्"पासून आणि "इदम्"ला "अहम्"पासून तोडून टाकून वस्तूंना एकामेकातून बाहेर काढते

ती होय.

सद्विद्यातत्त्वापर्यंत ज्ञान वैश्विक असते. "इदम्" म्हणजे हे सर्व अर्थात् संपूर्ण विश्व होय. मायेच्या प्रभावामुळे "इदम्" म्हणजे केवळ हे होय. मात्र हे इतर सर्व वस्तूंपासून वेगळे असणारे एकटे एक असून या पातळीपासून पुढे संकोच व मर्यादा चालू होते. माया ही आत्म्यावर एक प्रकारचा असा पडदा ओढते की, त्यामुळे आत्मा आपले सत्य स्वरूप विसरतो आणि अशा प्रकारे माया भेदाची किंवा वेगळेपणाची जाणीव उत्पन्न करते.

मायेची उत्पत्ती म्हणजे पाच कंचुके किंवा आवरणे होत. त्यांची कार्ये खालीलप्रमाणे आहेत.

**(७) कला :-** ही विश्वचैतन्याचे अथवा परासंवित्‌चे सर्वकर्तृत्व कमी करते आणि त्याच्यात संकुचितपणा आणते.

**(८) विद्या :-** ही सर्वज्ञत्व कमी करते आणि ज्ञानाच्या बाबतीत संकुचितपणा निर्माण करते.

**(९) राग :-** हे कंचुक परासंवित्‌चे सर्व सुखत्व अर्थात् पूर्णत्व क्षीण करते आणि विशिष्ट गोष्टींकरता जीवांमध्ये इच्छा निर्माण करते.

**(१०) कला :-** ही परासंवित्‌चे नित्यत्व अर्थात् शाश्वतता कमी करून काळामध्ये भूत, भविष्य व वर्तमानादि मर्यादितपणा निर्माण करते.

**(११) नियती :-** हे कंचुक परासंवित्‌चे स्वातंत्र्य आणि व्यापकत्व कमी करून कारण, जागा आणि स्वरूप यांच्यात संकुचितता निर्माण करते.

काश्मीरच्या त्रिकदर्शनाने हजारो वर्षांपूर्वी अनुभवाच्या विश्लेषणाच्या द्वारा जे तत्त्वज्ञान प्रस्तुत केले तेच जर्मन तत्त्वज्ञ श्री. कांट यांना अपेक्षित होते हे दिसून येते.

श्री. ह्यूम यांनी अनुभवजन्यज्ञानाला ज्यामध्ये कोणत्याही प्रकारचे बंधन-तत्त्व नाही अशा प्रकारच्या कल्पनांचा हलता देखावा इतक्यापर्यंत खाली आणले. श्री. कांट यांनी तत्त्वज्ञानात श्री. कोपर्निकन क्रांती ही गोष्ट अशी सिद्ध करून दाखविली की, सत्य अनुभव हा आवश्यकता आणि वैश्विकता ही विशिष्ट लक्षणे असणाऱ्या व एकत्रिकरण केलेल्या निर्णयांनी युक्त असतो. आवश्यकता आणि वैश्विकता ही अनुभवाची अपत्ये नाहीत. या दोन्ही गोष्टी अनुभवाच्या आधीच्या आहेत. इंद्रिये केवळ अनुभवांमध्ये असणाऱ्या गोष्टींची माहिती देतात; पण जाणीव अथवा समजूत त्या अनुभवात गृहीत असलेल्या गोष्टींवर त्यांच्या स्वतःचे असे कायदे लादते की, जेणेकरून

त्या गोष्टी एका संयुक्तक्रियायुक्त व संवादीज्ञानामध्ये रूपांतरित होतील. श्री. कांट या कायद्यांना वर्ग प्रकार असे म्हणतात. या गोष्टी मनाच्या जडण-घडणीत मुळातून किंवा स्वाभाविकच असतात.

त्रिक अथवा प्रत्यभिज्ञा तत्त्वज्ञान असे मानते की, विभू पण संकुचित जीवाचे अनुभव हे माया व तिच्या कला, विद्या, राग, काल आणि नियती या कंचुकांनी घडलेले असतात.

श्री. कांट काल आणि अवकाश यांना अंतर्ज्ञानाचे स्वरूप मानतात व आपले सर्व ज्ञान हे काल आणि अवकाश यांच्यामुळे मर्यादित होत असते असे सांगतात. प्रत्यभिज्ञा तत्त्वज्ञान हेही असेच सांगते की, आपले अनुभवजन्य ज्ञान हे काल आणि नियती यांच्यामुळे मर्यादित होते. श्री. कांट यांचे असे मत आहे की, मनुष्याचे अनुभव हे अवकाशकालबाधित अशाच स्वरूपात येणारे असतात. प्रत्यभिज्ञादर्शनातही असेच मानले आहे की, मानव हा मायेशी एवढा जोडला गेलेला असतो की, त्याचे अनुभव हे कला आणि नियती याच दोन घटकांभोवती फिरत राहण्यासाठी बांधले जातात.

माया या शब्दाचा अर्थ असा आहे की, ज्या सामर्थ्याद्वारा अनुभवजन्य ज्ञान अनुभवले जाते ते सामर्थ्य म्हणजे माया होय. (**"मीयते अनया इति माया।।"**) प्रत्यभिज्ञादर्शनात माया-प्रमाता, चित्त-प्रमाता, सकल, अणू आणि जीव हे सर्व संकुचित जीवासाठी समानार्थक शब्द म्हणून वापरले जातात.

प्रत्यभिज्ञा तत्त्वज्ञानात नियतीची तीन महत्त्वाची कार्ये आहेत १) अवकाशात मर्यादितपणा आणणे २) कारणपरंपरेचा शोध घेणे व ३) वस्तूच्या स्वरूपाचे मोजमाप करणे.

पहिल्या दोन गोष्टी श्री. कांट यांच्या अवकाश आणि कारणपरंपरेच्या प्रकारांच्या कल्पनाद्वारा अंतर्भूत केल्या जातात; पण तिसऱ्या गोष्टीला समान असणारी गोष्ट श्री. कांट यांच्या तत्त्वज्ञानात नाही. श्री. कांट यांचे संबंधांचे प्रकार अथवा वर्ग नियतीत अंतर्भूत होतात. त्याचे परिमाण, गुणवत्ता आणि बाह्य गोष्टींचे वर्ग हे विद्या या कंचुकाखाली येतात.

श्री. कांट यांचा सिद्धान्त हा केवळ ज्ञानाच्या सिद्धान्ताच्या मार्गापुरताच (epistemology) मर्यादित आहे. श्री. कांट यांनी त्यांचा सिद्धान्त हा केवळ ज्ञानाच्या संदर्भातच मांडलेला आहे. प्रत्यभिज्ञादर्शनाचे तत्त्वज्ञान मात्र ज्ञान आणि क्रिया या दोन्हींशी संबंधित आहे. श्री. कांट यांच्या तत्त्वज्ञानात कला आणि राग या दोन कंचुकांशी तुलनीय तत्त्वे नाहीत. ही दोन्हीही कंचुके

क्रियेशी संबंधित आहेत. मनुष्य हा ज्ञानाचा गठ्ठा मात्र नाही. तो एक क्रिया-शील प्राणी आहे. कला क्रियेच्या संदर्भातल्या मर्यादितपणाची द्योतक आहे. एकही मनुष्य श्रीशिवांसम सामर्थ्यवान् नाही. राग म्हणजे प्रेम हे मनुष्याची किंमत निर्देशित करते. ते त्याच्या विविध गोष्टींबद्दलची लालसा सूचित करते. ज्याप्रमाणे कला मायाप्रमात्याच्या पूर्ण स्वातंत्र्याचा नाश दर्शविते अथवा व्यक्त करते त्याचप्रमाणे राग हा उत्कृष्टत्वाचा नाश व्यक्त करतो.

श्री. कांट असे मत मांडतात की, जड वस्तू आणि स्वरूप असे ज्ञानाचे दोन स्रोत आहेत. वस्तू ही निसर्गाने दिलेली असून मनाद्वारा त्या वस्तूवर आकाराचा आरोप केला जातो. अशा प्रकारे श्री. कांट यांच्या तत्त्वज्ञानात द्वैतवाद आहे. प्रत्यभिज्ञा तत्त्वज्ञानात असे मानले जाते की, वस्तू आणि स्वरूप हे दोन्ही मायेद्वारा निर्मिले जातात. स्वरूप हे विद्या, काल, नियती यांच्याद्वारा आणि वस्तू ही कलेद्वारा निर्मिली जाते. मायेच्या द्वारा तिच्या कलासामर्थ्यामुळे प्रधान किंवा प्रकृतीची निर्मिती होते. (**"वेद्यमात्रं स्फुटं भिन्नं प्रधानं सूयते कला।। श्रीतंत्रालोक।।"** अर्थात् "ज्ञेय किंवा केवळ विषय होणारे भिन्न व स्फुट असे प्रधान हे कला निर्माण करते.") प्रकृती-पासून बुद्धी, अहंकार आणि मन निर्माण होते. अहंकारापासून पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये व पाच तन्मात्रा निर्माण होतात आणि त्या तन्मात्रांपासून पंचमहाभूतांची निर्मिती होते. त्यामुळे वस्तू आणि ज्ञानाचे स्वरूप ही दोन्हीही मायेपासून उत्पन्न होतात आणि माया ही श्रीशिवशक्तींपासून निर्माण होते. अशा प्रकारे प्रत्यभिज्ञेमध्ये निर्भेळ अद्वैतवाद आहे.

श्री. कांट असे म्हणतात की, आपण जगताला, स्वतःला आणि श्रीईश्वराला समजूत (understanding) आणि वर्ग (categories) अथवा प्रकार यांच्या द्वारा जाणू शकत नाही. श्रीप्रत्यभिज्ञाशास्त्र सुद्धा असेच मानते की, माया आणि तिच्या द्वारा घडणाऱ्या घटना या अशुद्धअध्वांमध्ये अंतर्भूत होतात आणि अशुद्धअध्वांमध्ये निर्माण झालेले ज्ञान हे विकल्पांच्या द्वारा निर्माण होते. विकल्प म्हणजे भेद तयार करणारे मनातले विचार होत; तर विश्व, आत्मा आणि श्रीईश्वर यांचे ज्ञान निर्विकल्प, अभेदात्मक व एकच आहे.

श्री. कांट पुढे असे म्हणतात की, जगत्, आत्मा आणि श्रीईश्वराचे ज्ञान हे फक्त नैतिक आणि आध्यात्मिक शिस्तपालनानेच होईल. प्रत्यभिज्ञा तत्त्वज्ञानही असे म्हणते की, परमतत्त्वाचे ज्ञान हे साधनेनेच आणि आणव, शाक्त व शांभव उपायांनीच होईल. अन्य कोणत्याही गोष्टींनी होणार नाही.

## मर्यादित अथवा संकुचित प्रमात्यांची तत्त्वे (१२ व १३)

**(१२) पुरुष :-** श्रीशिवांचे वैश्विक ज्ञान आणि सामर्थ्य यांना जी मर्यादित करते त्या मायाशक्तीच्या द्वारा श्रीशिव हे पुरुष बनतात किंवा प्रमाता बनतात. या संदर्भात पुरुष म्हणजे प्रत्येक चेतन प्राणिमात्र होय.

श्रीशैवशास्त्रात पुरुष हा अणू म्हणून ज्ञात आहे. दैवी परिपूर्णतेचे संकुचितरूप म्हणून अणू हा शब्द वापरलेला आहे.

**(१३) प्रकृती :-** पुरुष हा जर ज्ञानात्मक निर्मिती आहे तर प्रकृती ही विषयात्मक किंवा ज्ञेयात्मक निर्मिती आहे.

सांख्यांची प्रकृतीविषयीची कल्पना ही त्रिकशासनाच्या प्रकृतीपेक्षा भिन्न आहे. सांख्यांच्या मते प्रकृती ही एकच असून सर्व पुरुषांसाठी सारखीच अथवा सामान्य असते. त्रिकांच्या मते प्रत्येक पुरुषाला वेगळी प्रकृती असते. प्रकृती सर्व ज्ञेयत्वाचा एक साचा आहे.

प्रकृती ही तीन गुण अथवा genetic constituents अर्थात् मूळघटकांनी म्हणजे १) सत्त्व, २) रज आणि ३) तम यांनी बनलेली आहे. तिच्या अव्यक्त दशेमध्ये प्रकृती या तीनही गुणांना समतोलपणे धारण करीत असते. भौतिक बाबतीत सत्त्वगुण हा प्रकाशत्व आणि तेजस्वीपणा या गुणवैशिष्ट्यांचा असतो, मानसिक बाबतीत सत्त्वगुण हा पारदर्शकता, आनंद आणि शांती या गुणांना द्योतित करणारा असतो आणि नैतिकतेच्या बाबतीत तो चांगुलपणाचा निर्देशक असतो. सृष्टिक्रमात तामसगुण हा अंधाराचे व तीव्रतेचे तत्त्व आहे, मानसिक बाबतीत तो मंदपणा, भ्रम आणि औदासिन्य या गुणवैशिष्ट्यांनी युक्त आहे तर नैतिक विषयामध्ये तो अवनती व अपकर्षाचे तत्त्व आहे. भौतिक बाबतीत रज हा क्रियेने युक्त आहे, मानसिक बाबतीत तो लालसा आणि तीव्र भावनेच्या गुणांनी युक्त आहे आणि नैतिक विषयात तो महत्त्वाकांक्षा आणि लोभाचे तत्त्व आहे.

प्रत्यभिज्ञामते प्रकृती ही श्रीशिवांची शांताशक्ती आहे. तर सत्त्व, रज आणि तम हे गुण श्रीशिवांच्या अनुक्रमे ज्ञान, इच्छा आणि क्रिया या शक्तींचे विकार आहेत. अशा प्रकारे प्रत्यभिज्ञातत्त्वज्ञानात पूर्ण अद्वैतवाद आहे, सांख्यांप्रमाणे प्रकृती आणि पुरुष यांच्यातले द्वैत नाही.

पुरुष हा भोक्ता आणि प्रकृती ही भोग्य आहे.

## मानसिक क्रियेची तत्त्वे (१४ ते १६)

प्रकृती ही अंतःकरण, इंद्रिये आणि पंचमहाभूतांत विभागली जाते.

अंत:करण म्हणजे जीवाचे आंतरिक साधन किंवा मानसिक हत्यार होय. ते बुद्धी, अहंकार आणि मन या तत्त्वांनी युक्त आहे.

**(१४) बुद्धी :-** बुद्धीत परावर्तित होणारे विषय हे पुढीलप्रमाणे दोन प्रकारचे असतात.

**(अ)** बाह्य अर्थात् डोळ्यांनी ग्रहण केलेला घट.

**(ब)** आंतरिक अर्थात् संस्कारांनी घडविलेल्या प्रतिमा.

**(१५) अहंकार :-** हे बुद्धीचे फळ होय. हे "मी" पणा तयार करणारे तत्त्व आहे आणि स्व-विनियोग करणारे सामर्थ्य आहे.

**(१६) मन :-** हे अहंकारापासून उत्पन्न होते. मन हे इंद्रियांना विषयांचे आकलन करण्याला मदत करते आणि त्याच्यापासून ते प्रतिमा आणि कल्पना यांची बांधणी करते.

## इंद्रियजन्य अनुभवांची तत्त्वे (१७ ते ३१)

**(अ) पाच ज्ञानेंद्रिये-आकलनांच्या पाच शक्ती :-** अहंकारापासून निर्माण झालेली ज्ञानेंद्रिये अथवा बुद्धींद्रिये ही इंद्रियजन्य अनुभवांची तत्त्वे आहेत. (१७) ग्रहणेंद्रिय (१८) रसनेंद्रिय (१९) चक्षुरिंद्रिय (२०) स्पर्शेंद्रिय आणि (२१) श्रवणेंद्रिय यांच्या पाच शक्ती आहेत.

**(ब) पाच कर्मेंद्रिये :-** ही सुद्धा अहंकाराचीच फळे आहेत. ही कर्मेंद्रिये (२२) वागींद्रिय (२३) हस्तेंद्रिय (२४) पादेंद्रिय (२५) पाय्विंद्रिय आणि (२६) उपस्थेंद्रिय यांच्या पाच शक्ती आहेत.

इंद्रिये ही आकलन करून देणारी इंद्रिये नसून त्या आकलन-अवयवांमार्फत कार्यान्वित होणाऱ्या शक्ती आहेत.

**(क) पंचतन्मात्रा :-** हीही अहंकाराचीच फळे आहेत. "तन्मात्रा" याचा शब्दश: अर्थ "तेवढेच" असा आहे. इंदिय-ग्रहणाच्या विशिष्ट-तत्त्वाची या तन्मात्रा सर्वसाधारण तत्त्वे आहेत. या तन्मात्रा पुढीलप्रमाणे आहेत.

(२७) शब्दतन्मात्रा (२८) स्पर्शतन्मात्रा (२९) रूपतन्मात्रा (३०) रसतन्मात्रा (३१) गंधतन्मात्रा.

## भौतिक तत्त्वे (३२ ते ३६)

**(ड) पंचमहाभूते :-**

पंचमहाभूते ही पंचतन्मात्रांचीच फळे आहेत.

(३२) आकाश हे शब्दतन्मात्रांपासून उत्पन्न झाले आहे.

(३३) वायू हा स्पर्शतन्मात्रेपासून निर्माण झालेला आहे.

(३४) तेज अथवा अग्नी हा रूपतन्मात्रेपासून निर्माण झालेला आहे.
(३५) आप अथवा पाणी हे रसतन्मात्रेपासून झालेले आहे.
(३६) पृथ्वी हे गंधतन्मात्रेपासून उत्पन्न झालेले आहे.

## जीव

चैतन्य अथवा श्रीशिव हेच प्रत्येक प्राण्यामधला मुख्य भाग आहेत. तेच त्या प्राण्याचा खराखुरा "स्व" आहेत.

जीवाच्या भौतिक अंगांची निर्मिती पंचमहाभूतांपासून झालेली आहे. त्याला स्थूल शरीर अथवा भौतिक देह असे म्हणतात.

त्या जीवामध्ये प्राणशक्तीही कार्य करीत असते. या प्राणशक्तीमुळेच तो जीव स्थिर राहतो.

त्याचे मानसिक साधन म्हणजे अंत:करण होय. ते मन, बुद्धी आणि अहंकार यांनी युक्त असते. ही तीन तत्त्वे पाच तन्मात्रांबरोबर मिळून पुर्यष्टक तयार करतात. त्रिकशास्त्राप्रमाणे हे पुर्यष्टक सूक्ष्म शरीर तयार करते. त्यामधील आत्मा मृत्यूच्या वेळेला देह सोडून जातो.

प्रत्येक जीवामध्ये शक्तीच्या स्वरूपात असणारी कुंडलिनी शक्ती असते आणि ती पाठीच्या कण्याच्या खालच्या बाजूला असते.

प्रत्येक जीवाला सर्वसाधारणपणे जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन जाणिवांच्या अवस्थांचा अनुभव येत असतो; पण तुरीय ही चौथीही जाणिवेची अवस्था आहे. प्रत्येक जीवामधील तुरीय अवस्था म्हणजे प्रमुख आत्मा असून तीच श्रीशिवांचे चैतन्य आहे. हे साक्षिचैतन्य असून याची जीवाला बहुतेक जाणीव नसते. तुरीय म्हणजे शुद्ध चिदानंद होय. जीवाचे मन हे मागील जन्मांच्या वासनांमध्ये अडकलेले असते. ज्यावेळेला योगाच्या प्रक्रियांनी जीवाचे मन वासनांपासून मुक्त होते त्यावेळेला त्याला तुरीयावस्थेची प्राप्ती होते आणि तो जीवन्मुक्त म्हणविला जातो.

## बंध

जीव आणव मलामुळे बंधनात पडतो. ही प्राथमिक संकुचित उपाधी आहे. तिच्यामुळे परमचैतन्य हे अणू अर्थात् संकुचित किंवा लहान बनते. हे संकुचितत्व श्रीपरमशिवांच्या इच्छाशक्तीमध्ये संकुचितता निर्माण झाल्यामुळे होते. यामुळेच जीव स्वत:ला परमचैतन्याच्या वैश्विक प्रवाहापासून वेगळी झालेली स्वतंत्र व्यक्ती समजत असतो. बंध म्हणजेच आत्मसंकोच आणि अपूर्णता यांची जाणीव होय.

त्यानंतर अशुद्धाध्वांच्या संगतीत आल्यामुळे जीव परत मायीयमलांमुळे आणि कार्ममलांमुळे आणखी संकुचित होतो. मायीयमल म्हणजेच मायेने उत्पन्न केलेली संकुचित उपाधी किंवा अवस्था होय. ती भिन्न वेद्य प्रथा म्हणजेच देहाच्या अनुषंगाने असणाऱ्या भिन्न मर्यादित वस्तूंमुळे निर्माण होणारी भिन्नत्वाची जाणीव आहे. ही माया श्रीपरमशिवांच्या ज्ञानशक्तीचे संकुचितत्व होय. कार्ममल म्हणजे वासनांमुळे निर्माण होणारी संकुचित अवस्था होय. जीवाला एका जन्मातून दुसऱ्या जन्मात फिरविणारी ही वास-नांचीच शक्ती आहे.

## मुक्ती

त्रिकशासनाच्या मते मुक्ती म्हणजे आपल्या यथार्थ स्वभावाचा जो अकृत्रिम अहंविमर्श आहे त्याची ओळख अथवा स्मरण किंवा प्रत्यभिज्ञा होय.

सर्वसाधारणपणे मनोअहंचैतन्य म्हणजेच आत्मचैतन्य हे जडाच्या विरोधी आहे. शुद्ध आत्मचैतन्य म्हणजे तत्काळ होणारी जाणीव आहे. जेव्हा एखाद्याला ही जाणीव होते तेव्हा त्याला त्याचे खरे स्वरूप कळून येते. यालाच मुक्ती असे म्हणतात.

याविषयी श्रीअभिनवगुप्तपादाचार्य "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात् असे म्हणतात की -

**मोक्षो हि नाम नैवान्यः स्वरूपप्रथनं हि तत्।।१.१५६।।**

**अर्थ :-** मोक्ष किंवा मुक्ती म्हणजे अन्य काहीही नसून आपल्या स्व-रूपाची म्हणजे यथार्थ स्वभावाची जाणीव होणे होय.

परंतु श्रीशिवचैतन्य प्राप्त होणे हीच सर्वोच्च प्राप्ती आहे. यामध्ये हे सर्व विश्व म्हणजे मी किंवा श्रीशिव आहे असे भासते. हे सर्व शक्तिपात अथवा अनुग्रहामुळे होते.

## उपाय

दीक्षा अथवा अनुग्रह मिळविण्यासाठी आध्यात्मिक साधना करावी लागते. यालाच "उपाय" अथवा "योग" असे म्हणतात. उपाय हे चार मुख्य शीर्षकांमध्ये विभागले गेले आहेत.

**(१) अनुपाय (२) शांभवोपाय (३) शाक्तोपाय (४) आणवोपाय.**

"अन्" या अनुपायातल्या उपसर्गाचा अर्थ लहान असा होतो. ज्यावेळेला तीव्र शक्तिपातद्वारा श्रीसद्गुरूंकडून एकच शब्द ऐकून साधकभक्तयोगिशिष्याला त्याच्या स्वस्वरूपाचे ज्ञान होते त्यावेळेला तो कोणत्याही विशेष प्रयत्नां-

शिवाय दिव्य परमात्मचैतन्यात बुडून जातो. त्याच्याबाबतीत त्याने अनुपाया-द्वारा आत्मतत्त्वाची प्राप्ती करून घेतली असे म्हटले जाते. श्रीशिवसूत्रे हा योगावरचा ग्रंथ आहे. त्याच्यात "अनुपाया"चा समावेश केलेला नाही; कारण ज्या अवस्थेत कोणत्याही विशिष्ट योगाशिवाय आत्मज्ञान प्राप्त करता येते अशा अवस्थेविषयी या ग्रंथात निर्देश केलेला नाही. याविषयी श्रीअभिनवगुप्त-पादाचार्य असे म्हणतात की –

**उपायजालं न शिवं प्रकाशयेद् घटेन किं भाति सहस्रदीधितिः।**
**विवेचयान्नित्थमुदारदर्शनः स्वयंप्रकाशं शिवमाविशेत्क्षणात्।।**

**अर्थ :-** खूप उपायही श्रीशिवांना प्रकाशित करू शकत नाहीत. घडा काय सूर्याला भासवू शकतो का? अशा प्रकारे विवेचन करीत ज्याची दृष्टी उदार झाली आहे असा साधकभक्तयोगिशिष्य स्वयंप्रकाशित असणाऱ्या श्रीशिवांमध्ये तत्काळ प्रवेश करू शकतो.

ही अवस्था सर्व यौगिक क्रियांपलीकडची असल्यामुळे या अवस्थेचे कोणतेही स्पष्टीकरण देता येत नाही.

## श्रीशिवसूत्रे, त्यांचे विभाग व स्वरूप

या ग्रंथात तीन विभाग आहेत. पहिल्या भागात शांभवोपायाविषयी, दुसऱ्या विभागात शाक्तोपायाविषयी आणि तिसऱ्या विभागात आणवोपा-याविषयी सांगितले आहे.

या उपायांविषयी आता आपण सविस्तर चर्चा करू.

## पहिला विभाग किंवा उन्मेष

### शांभवोपाय किंवा शांभवयोग

पहिल्या विभागाच्या पहिल्या सूत्रात श्रीशैवदर्शनाची तात्त्विक बैठक त्याचप्रमाणे शांभवयोगाचा अनुभव सांगितला आहे. हे सूत्र असे सांगते की, चैतन्य हाच आत्मा किंवा स्वभाव आहे. या शास्त्रात चैतन्य म्हणजे केवळ जाणीव नव्हे; कारण चैतन्य म्हणजेच ज्याला इच्छा, ज्ञान आणि क्रिया यांचे पूर्ण स्वातंत्र्य आहे असा श्रीशिवरूप आत्मा होय. चैतन्याचे खरेखुरे स्वरूप म्हणजे चित् आणि आनंद हेच आहे. ते स्वतःला इच्छा, ज्ञान आणि क्रिया यांमध्ये व्यक्त करते.

आता येथे असा प्रश्न उत्पन्न होतो की, "जर जीव व जगत् यांचे स्वरूप एक म्हणजे श्रीशिवच आहेत तर मग या जगतातील सर्वांनाच श्रीशिवानंद का बरे अनुभवता येत नाही? त्या उलट त्यांना इच्छा, ज्ञान आणि क्रिया यांचे

अपूर्णत्वच का अनुभवाला येते?"

या प्रश्नाचे उत्तर असे आहे की, हे बंधन किवा अपूर्णत्व हे जीवावर असणाऱ्या आणव, मायीय व कार्म या मलांच्या आवरणांमुळे असते. आणवमल हा पहिल्यापासून असणारा मल असून तोच "श्रीशिव" हे आपले यथार्थ स्वरूप आहे असे समजतात. हे ज्ञात नसणारे प्रमुख अज्ञान आहे. मायीयमल हा मायेमुळे असतो. हा मायीयमल आत्म्याला स्थूल आणि सूक्ष्म देह प्रदान करतो आणि भेदाची जाणीव निर्माण करतो; तर कार्ममल हा कर्मांमुळे असणाऱ्या वासनांमुळे असतो. आणवमल उत्पन्न करणाऱ्या अज्ञानाविषयी सूत्र क्रमांक दोनमध्ये सांगितले आहे; तर मायीयमल आणि कार्ममल यांच्याविषयी सूत्र क्रमांक तीनमध्ये सांगितले आहे.

दुसरे सूत्र असे सांगते की, संकुचित ज्ञानामुळे जीव बंधनात पडतो. अज्ञान म्हणजे ज्ञानाचा पूर्ण अभाव नसून संकुचित किंवा अशुद्ध ज्ञान होय.

श्रीशिवांना स्वातंत्र्यशक्ती आहे म्हणजेच हे वैश्विक नाट्य प्रत्यक्षात आणण्याची अविरोध शक्ती आहे. "या स्वस्वातंत्र्यशक्तिद्वारा ते महामाया-शक्तीचे नाटक सुरू करतात. तिच्याचमुळे ते स्वतःचे स्वरूप लपवून टाकतात" अर्थात् **"स्वस्वातन्त्र्यशक्त्याभासितस्वरूपगोपनारूपया महामायाशक्त्या।।"** आणि संकुचित ज्ञान आणि संकुचित स्वरूप धारण करतात. अशा प्रकारे जगन्नाट्य सुरू होते. यातली पहिली अवस्था म्हणेज स्वरूपनिमेष किंवा स्वरूपगोपन म्हणजेच स्वतःला लपविणे होय. हीच चैतन्याची स्थूल वस्तूमध्ये परिणत होण्याची किंवा गुंतून पडण्याची पहिली स्थिती आहे. ही द्वयत्वाची अर्थात् खाली येण्याची कमान आहे. त्याच्यानंतर हळूहळू क्रमाने स्वरूप-उन्मेष, अथवा स्वरूपप्रकाशन किंवा श्रीशिवांचा परमचैतन्ययुक्त स्वभाव स्पष्ट होण्याची प्रक्रिया सुरू होते. हा चढता क्रम आहे. आता सुरू होतो सृष्टीचा, जीवनाचा आणि मनाचा खेळ. पण फक्त मानवी पातळीवरच स्वतःचे खरे स्वरूप जाणून घेण्याचा प्रश्न उद्भवतो आणि याच स्वरूपाच्या ज्ञानासाठी किंवा प्रत्यभिज्ञेसाठी योग किंवा आत्मिक प्रक्रियेची योजना केलेली आहे.

अज्ञान किंवा आणवमल म्हणजे केवळ संकुचित ज्ञान आहे. त्यामुळे जीवाला स्थूल, सूक्ष्मादि शरीरे हाच आत्मा वाटतो.

तीन प्रकारचे मल अथवा मर्यादित ज्ञान हे शब्दांमध्ये मूळ धरून असते आणि त्या शब्दांचा आपल्या जीवनावर फार मोठा प्रभाव पडत असतो. हे

शब्द ज्या वर्णांनी बनलेले आहेत त्यांना "मातृका" असे म्हणतात. मातृका याच सर्व संकुचित ज्ञानाचा पाया आहेत. याच विषयाचे चौथ्या सूत्रात स्पष्टीकरण केलेले आहे.

मातृका म्हणजेच जिचे ज्ञान झालेले नाही व जिची जाणीव झालेली नाही ती माता होय. जोपर्यंत या मातृकांचे रहस्य उलगडत नाही तोपर्यंत जीव बंधनातच अडकलेला असतो; पण ज्याक्षणी हे रहस्य उलगडते त्याक्षणी ही मातृकाच मुक्ती देणारी होते.

"**उद्यमो भैरवः ।।**" या सूत्र क्रमांक पाचमध्ये अगदी थोडक्यास्वरूपात शांभवयोगाविषयी स्पष्टीकरण दिले आहे.

"**उद्यमः**" याचा अर्थ मेहनत असा या विषयाच्या संदर्भात घेऊ नये. शांभवयोगामध्ये मेहनतीचा प्रश्नच येत नाही. यालाच इच्छोपाय अथवा इच्छायोग असे म्हणतात. हा केवळ इच्छेच्या उन्मुखता अथवा उत्सुकता यांच्यामुळे घडून येतो. यालाच अभेदोपाय असे म्हणतात अर्थात् या योगात "अहम्" म्हणजे "मी" आणि "श्रीशिव" यांची पूर्ण ओळख पटते आणि केवळ मनोभौतिक साधन असणारा "अहम्" किंवा "मी" नष्ट होतो अथवा केवळ नाम व रूप हे नष्ट होते आणि श्रीशिवांचाच "अहम्" म्हणून अनुभव येतो. या योगालाच अविकल्पक अथवा निर्विकल्पक योग किंवा उपाय असेही म्हणतात; कारण ज्यावेळेला सर्व विचारांचा नाश होतो त्यावेळेलाच विचाररहित अवस्थेचा अनुभव येतो.

हा असा योग आहे की, जेथे कोणत्याही प्रकारे देह, प्राण, मन किंवा बुद्धी यांचा क्रियाशील भाग नसतो. त्यामुळेच उद्यम याचा अर्थ येथे मेहनत, श्रम अथवा शिस्त असा नाही. श्रीक्षेमराजाचार्यांनी उद्यम याचा अर्थ "**उन्मज्ञनरूपः ।।**" असा योग्यच केलेला आहे म्हणजेच श्रीशिवचैतन्याच्या आविर्भावाच्या रूपातला हा उद्यम आहे. शांभवयोग म्हणजेच (१) श्रीशिवांच्या आत्मचैतन्याची अचानक होणारी जाणीव (२) सर्व कल्पनांचा अंत व (३) आपले पूर्ण चैतन्य आंतर श्रीभैरवतत्त्वात बुडून अथवा पूर्णपणे सामावून जाणे होय. ज्या साधकभक्तयोगिशिष्यांना ही अनुभूती आलेली आहे त्यांच्याच बाबतीत हा शांभवयोग घडून येणारा असा आहे.

"**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात शांभवोपायाचे खालील प्रमाणे वर्णन केलेले आहे.

**अकिञ्चिच्चिन्तकस्यैव गुरुणा प्रतिबोधतः ।**

**जायते यः समावेशः शाम्भवोऽसावुदाहृतः ।।२.२३।।**

**अर्थ :-** जो सर्व प्रकारांच्या कल्पनांनी विरहित असा आहे अर्थात् कोणताही विचार करणारा नाही अशा साधकभक्तयोगिशिष्यांमध्ये श्रीसद्गुरूंच्या कृपेने अर्थात् अनादि निद्रिस्थ आत्मचैतन्य शक्ती कुंडलिनी शक्तिपातयोग-दीक्षेने जागृत झाल्यामुळे किंवा तिच्या तीव्र जागृतीमुळे जो समावेश होतो किंवा श्रीशिवचैतन्यात सामावणे होते त्याला शांभव समावेश असे म्हणतात.

ज्यावेळेला "आपण श्रीशिव आहोत" अशी स्वतःचीच ओळख कोणत्याही मनाच्या प्रक्रियेविना किंवा विचारांविना केवळ इच्छाशक्ती अंतर्गत चैतन्याकडे उन्मुख झाल्यामुळे होते त्यावेळेला तो शांभवयोग अथवा शांभवसमावेश असतो.

जीवामध्ये परमतत्त्व किंवा श्रीशिव किंवा विश्वोत्तीर्ण दिव्य असा आत्मा म्हणजे प्रकाश म्हणजेच आनंद सतत स्वतःच्याच तेजाने चमकणारा असा असतो; पण जीवाच्या कल्पना अथवा विकल्पांमुळे तो त्याच्या स्वतःच्या दृष्टिपथात येत नाही. परमतत्त्व हे आपल्यातले शाश्वत अस्तित्व आहे. ते सिद्ध म्हणजेच कायम असणारे तत्त्व आहे. साध्य म्हणजेच आपल्या प्रयत्नांनी अस्तित्वात येणारी वस्तू नाही. ते आपल्या विकल्पांच्या जाळ्यात अडकणारे नाही; पण हुशारीमुळे कदाचित् आपण त्याच्यावर दृष्टिक्षेप टाकू शकू. आपण जेवढे जास्त त्याला पकडावयाचा प्रयत्न करू व जितके जास्त त्याला ग्रहण करण्याचा प्रयत्न करू तितके जास्त ते आपल्यापासून दूर जाईल. आपण आपल्याच मनाचे कैदी आहोत. जर आपल्यातले श्रीशिव म्हणजेच आपले परमतत्त्व जाणावयाचे असेल तर विचारांना आत्महत्या करावी लागेल, विकल्प म्हणजेच भेद निर्माण करणाऱ्या मानसिक क्रिया नष्ट व्हाव्या लागतील आणि कल्पनांचे चक्र थांबावे लागेल. आपल्या अनेक मुद्यांचा एकाच वेळी अंतर्भाव करणाऱ्या किंवा सतत विषयांतर करीत राहणाऱ्या बुद्धीच्या भूताला विश्रांती द्यायला हवी आणि ही गोष्ट आपण परमतत्त्वाचे ज्ञान करून घेण्याला लायक ठरण्याच्या आधी व्हावयाला हवी. विकल्प हा अनेक रंगांच्या जातींचा; पण शाश्वततेच्या पांढऱ्या रंगाची चकाकी असणाऱ्या घुमटाप्रमाणे आहे. ज्यावेळेला विकल्प नष्ट होतात त्यावेळेला आपल्यातले विश्वोत्तीर्ण परमतत्त्व स्वप्रकाशाने चमकू लागते. हा असा अनुभव आहे की, ज्यात दर्शक, दर्शन आणि दृष्टी या गोष्टी पूर्णपणे नष्ट झालेल्या असतात. त्यामुळेच त्याला अभेदोपाय म्हणजेच ज्यात वरील सर्व भेद नष्ट होतात

असा उपाय असे म्हटले गेले आहे.

अशा प्रकारे ज्यावेळेला मन कोणत्याही कल्पनेचा स्वीकारही करीत नाही आणि त्यागही करीत नाही त्यावेळेला त्याची क्रिया थांबून जाते आणि जीव त्याच्या परमतत्त्वात स्थान प्राप्त करतो. हाच विषय श्रीअभिनवगुप्त-पादाचार्य आपल्या "**श्रीअनुत्तराष्टिका**" या ग्रंथात अत्यंत सुंदर रीतीने प्रकट करताना असे म्हणतात की -

**मा किञ्चित् त्यज या गृहाण, विरम स्वस्थो यथावस्थितः ।।२।।**

**अर्थ :-** कशाचाही त्याग करू नकोस अथवा स्वीकार करू नकोस, जसा आहेस तसाच स्वतःमध्ये थांबून जा.

श्री. जे. कृष्णमूर्ती नामक आधुनिक योगी हेच शब्द वापरतात आणि त्यालाच इच्छारहित जागृती अर्थात् विचारांची नसणारी जागृती (Choiceless awareness) असे म्हणतात. जाणीव अथवा जागृती म्हणजे विचार नव्हे, शिस्त नव्हे किंवा सवयही नव्हे. याचा सराव करता येत नाही. याचा अर्थ क्षणाक्षणाचा सावधपणा होय. परमतत्त्वाची एक आंतरिक बाजू अशीही असते की, ज्यामध्ये आपण जगत असतो; परंतु आपल्याला त्याचे ज्ञान नसते. शांभवयोग आपल्याला ही जाणीव परत शोधण्यासाठी आणि हिचे ज्ञान होण्यासाठी उद्युक्त करतो. पण हे सर्व घडते ते शोधून नव्हे, इच्छेने नव्हे, आचरणाने नव्हे; तर ज्यावेळेला मन खोल विचार करण्याचे बंद करते आणि स्वतःतल्या दिव्य अस्तित्वाच्या तेजापुढे पूर्ण शरणागत होते त्यावेळेलाच हे घडते.

शांभवयोगाशी तुलना करता येईल असे विचार आपल्याला श्री. वू-वै, (wu-wei) या ताओवादी विचारसरणीत, झेनच्या "let-go" या तत्त्वज्ञानात आणि श्री. जे. कृष्णमूर्तींच्या निवडरहित जाणिवेच्या विचारांमध्ये सापडतात.

"**श्रीतंत्रसार**" या ग्रंथाच्या तिसऱ्या भागात श्रीअभिनवगुप्तपादाचार्य असे म्हणतात की, "शांभवोपायामध्ये इच्छाशक्ती ही ज्ञानशक्तीमुळे अधिक मजबूत झालेली असते. ही दृढता ज्ञात करून साधकभक्तयोगिशिष्य हा हे सर्व विषय आणि विषयी यांनी भरलेले जगत् परमात्म्यामध्ये त्याचे परावर्तन म्हणून स्थित असते असे अनुभवितो व म्हणतो की, "माझ्या स्वतःच्या शक्ती माझ्यात परावर्तित होऊन छत्तीस तत्त्वे म्हणून भासतात." या शक्ती मातृकांच्या रूपात अभिव्यक्त होतात. मातृका म्हणजे ज्यांची प्रतिबिंबे श्रीशिव ते पृथ्वी या तत्त्वांच्या रूपात अभिव्यक्त होतात ती "**क**" पासून "**ह**" पर्यंतची अक्षरे

होत. (याच्या अधिक माहितीसाठी दुसऱ्या उपायातील सातव्या सूत्राचे विवरण पाहावे.)

श्रीक्षेमराज आपल्या पहिल्या विभागाच्या पाचव्या सूत्रातील टीकेत शेवटी असे म्हणतात की, शांभवोपायाला खालील शाक्तोपायाची मदत होऊ शकते.

**एकचिन्ताप्रसक्तस्य यतः स्यादपरोदयः।**
**उन्मेषः स तु विज्ञेयः स्वयं तमुपलक्षयेत्।।३.९।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला मनुष्य एक विचार करीत असतो आणि त्यानंतर दुसरा विचार उत्पन्न होतो त्यावेळेला त्यांच्यामधला जो अभावाचा क्षण असतो त्याला उन्मेष म्हणजेच त्या दोन्ही विचारांची पार्श्वभूमी असणाऱ्या आत्म्याच्या यथार्थ स्वभावाची अभिव्यक्ती असे म्हणतात. त्याचा प्रत्येकाने स्वतः अनुभव घ्यावा.

श्री. जे. कृष्णमूर्ती हे आधुनिक गूढवादी होते. त्यांनी एकही संस्कृत ग्रंथ वाचलेला नसतानाही या अनुभवाविषयी आपल्या एका पुस्तकात उन्मेषाबद्दल असे म्हटले आहे की, हा उन्मेष "क्रियाशील क्षण" आहे. तो विचार नाही तर जाणिवेचा एकदम होणारा स्फोट आहे. "उन्मेष" याचा शब्दशः अर्थ पापणी उघडणे असा आहे, म्हणजेच उघडे करणे अर्थात् स्वतःची ओळख पटणे होय.

नंतर सहाव्या सूत्रात असे म्हटले आहे की, ज्यावेळेला परमात्म्याच्या जाणिवेचा अनुभव सामान्य किंवा रोजच्या आयुष्यातही तसाच येत राहतो त्यावेळेला हे सर्व विश्व म्हणजे स्वतःच्या किंवा आत्म्याच्या शक्तींचा विस्तार आहे असे भासू लागते आणि त्या शक्तिसमूहाच्या तीव्र जाणिवेमुळे हे विश्व श्रीशिव किंवा परमात्म्याहून वेगळे आहे अशी जाणीव नष्ट होते आणि एकचैतन्यमयत्व येते.

सातव्या सूत्रात असे सांगितले आहे की, आंतरिक दिव्य आत्म्याचा अनुभव म्हणजेच तुरीयावस्था किंवा विश्वोत्तीर्ण संवित् अथवा चैतन्याचा अनुभव होय आणि त्या अवस्थेचा आनंद जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ती यांच्या जाणिवेत वेगळेपणा भासत असला तरी अखंडच राहतो.

आठ, नऊ आणि दहा ही सूत्रे असे सांगतात की, आध्यात्मिक दृष्टिकोनातून पाहता ज्याला आत्मचैतन्याचे ज्ञान झालेले आहे त्यालाच "जागृत" म्हणजे सावध किंवा जागा झालेला असे म्हणता येईल. जो असंयमित विविध कल्पना

आणि विचार यांच्या आहारी गेलेला आहे तो पूर्ण जागृत दिसत असला तरीही स्वप्नावस्थेत आहे असे समजावे. ज्याने परतत्त्वात सूक्ष्म अंतर्दृष्टी प्राप्त केलेली नाही तो गाढ निद्रेत आहे असे समजावे. जो विश्वोत्तीर्ण चैतन्यशक्तीविषयी जागृत झालेला नाही त्याच्या सर्व क्रिया एखाद्या झोपेत चालणाऱ्या व्यक्तीप्रमाणे असतात.

अकरावे सूत्र असे सांगते की, जो सिद्धयोगी तुरीयावस्थेचा अथवा विश्वोत्तीर्ण संवित्‌चा अनुभव इतर तीनही म्हणजेच जागृत, स्वप्न आणि सुषुप्ती या अवस्थांमध्येही कायम ठेवतो तो एकमेव सत्य भोक्ता किंवा उपभोग घेणारा असतो आणि त्याच्या इंद्रियांचा परिपूर्ण स्वामी असतो.

बारावे सूत्र सर्वसामान्यपणे असे सांगते की, ज्या सिद्धयोग्याला परमतत्त्वाचे ज्ञान झालेले आहे तो अत्यंत आश्चर्यकारक अशा सिद्धी विकसित करतो. तेराव्या सूत्रात असे म्हटले आहे की, असा सिद्धयोगी त्याच्या इच्छाशक्तीचा विकास करून अनेक आश्चर्यकारक बदल घडवून आणतो.

चौदा आणि पंधरा ही दोन सूत्रे असे मानतात की, अशा सिद्धयोग्याला प्रत्येक अंतर्गत अथवा बाह्य वस्तुनिष्ठ बघण्यायोग्य घटना या त्याच्या आत्म-चैतन्याच्या रूपाच्या वाटतात. सोळाव्या सूत्रात असे सांगितले आहे की, श्रीपरमशिवांपर्यंत प्रत्येक गोष्टीचे मूळ तो सिद्धयोगी शोधून काढण्याला समर्थ बनतो आणि सर्व प्रकारच्या मर्यादित वस्तूंपासून मागे सरतो.

सतरावे सूत्र असे सांगते की, आता या सिद्धयोग्याला असे पूर्णपणे कळून चुकलेले असते की, त्याचा आत्मा म्हणजे दुसरा तिसरा कोणी नसून श्रीशिव अर्थात् जगदात्मा आहे. अठराव्या सूत्रात असे म्हटले आहे की, प्रत्येक अनुभवाचा तोच ज्ञाता असून सिद्धयोग्याची ही जाणीव अविरोधपणे प्रवाहित होत असते. एकोणिसावे सूत्र असे सांगते की, इच्छाशक्तीशी एकरूप झाल्याकारणाने सिद्धयोगी त्याच्या इच्छेला येईल ती वस्तू निर्माण करू शकतो. विसाव्या सूत्रात असे निर्देशिलेले आहे की, अशा प्रकारचा सिद्ध-योगी सर्व प्रकारच्या अस्तित्वाच्या घटकांना एकत्रित करण्याचे, अलग करण्याचे आणि अवकाश व काळाने दूर केलेल्या प्रत्येक गोष्टी एकत्रित आणण्याचे सामर्थ्य विकसित करतो.

एकविसाव्या सूत्रात असे सांगितले आहे की, अशा प्रकारचा सिद्धयोगी क्षुद्र सिद्धींची इच्छा करीत नाही. शुद्धविद्या म्हणजेच उन्मनाशक्ती प्रकट झाल्यावर तिच्या द्वारे हा सिद्धयोगी वैश्विक चैतन्य आणि सर्व शक्तींवर

प्रभुत्व प्राप्त करतो. त्याचा सर्वश्रेष्ठ अनुभव म्हणजे आत्मव्याप्ती नसून श्रीशिवत्वयोजना अथवा श्रीशिवव्याप्ती म्हणजेच ज्यात हे सर्व जगत् म्हणजे श्रीशिवांचे स्वतःचे स्वरूप वाटते अशी अवस्था अनुभवाला येणे आहे.

बाविसाव्या सूत्राने असे निदर्शनाला येते की, अशा प्रकारचा सिद्धयोगी दिव्यशक्तींच्या अमर्याद साठ्याशी म्हणजेच महाह्रदाकाशाशी समरस झाल्याकारणाने सर्व प्रकारच्या मंत्रांचा क्रियात्मक स्रोत असणाऱ्या परमात्मचैतन्याचा अनुभव घेतो.

## सारांश

आपण आतापर्यंत असे पाहिले की, शांभवोपाय स्वात्मज्ञान व्हावे म्हणून कोणत्याही विशिष्ट उपाय अथवा आचरणाची तरफदारी करीत नाही.

ज्यावेळेला आपण कशाचाही स्वीकार करीत नाही अथवा त्याग करीत नाही व ज्यावेळेला सर्व प्रकारच्या कल्पनांनी विरहित अशी सामान्य जाणीव असते त्यावेळेला अचानक आणि तीव्र असा आपल्या परमात्मस्वरूपाच्या अनुभवाचा प्रकाश पडतो. यालाच शांभवसमावेश असे म्हणतात. हेच प्रत्यक्ष ज्ञान होय.

आणवोपाय आणि शाक्तोपाय हे केवळ पारंपारिक आहेत म्हणजेच ते क्रमाक्रमाने आत्मज्ञानापर्यंत घेऊन जातात म्हणजेच आणवोपाय शाक्तोपाया-पर्यंत नेतो आणि मग शाक्तोपाय शांभवोपायाची प्राप्ती करून देतो. अंतिम ध्येय मात्र शांभवसमावेश आहे. आणव आणि शाक्त हे शांभवयोगापर्यंत पोहोचविण्याच्या मधल्या पायऱ्या अथवा साधन आहेत.

या आधी सांगितल्याप्रमाणे आपण अत्यंत विस्तृतपणे शाक्तोपायाच्या संबंधात मातृकांचा यथायोग्य वापर याबाबत चर्चा करू. शांभवोपाय हे श्रीशैवागमाचे वैशिष्ट्य आहे. अशा प्रकारचा कोणताही योग वेदान्त अथवा पातंजलयोगात नाही. वेदान्तात ज्ञानयोग काहीसा शाक्तोपायाशी समान आहे तर पातंजलयोग आणवोपायाच्या काही भागासारखा आहे. शांभवयोग हा या दर्शनांना अनोळखी आहे.

खरे सांगावयाचे झाले; तर अनुपाय म्हणजेच शांभवोपायाची अत्यंत परिपक्वता होय. "**स (शाम्भवोपायः) एव परां काष्ठां प्राप्तश्चानुपाय इत्युच्यते।।**" अर्थात् "ज्यावेळी तो शांभवोपाय अंतिम स्वरूप प्राप्त करतो त्यावेळी तो अनुपायात परिणत होतो किंवा त्यालाच अनुभव असे म्हणतात." (**श्रीतंत्रालोक १.१४२।।** वरील श्रीजयरथाचार्य यांची "**विवेक**" व्याख्या.)

नंतरच्या काळात शांभवयोग आणि अनुपाय यांची कल्पना व्यक्त करण्या-साठी काश्मीरच्या श्रीवातुलनाथ यांनी साहस हा शब्दप्रयोग वापरात आणला. साहस याचा अर्थ एखादी गोष्ट अचानक घडणे होय. हा शब्द अचानक व तीव्रपणे होणाऱ्या आत्मज्ञानाची कल्पना अत्यंत योग्यपणे व्यक्त करतो.

सांख्ययोग आणि वेदान्त यांचे अंतिम ध्येय मुक्ती हेच आहे. मुक्ती म्हणजे दोघांच्याही मते कैवल्य होय. कैवल्य म्हणजेच परिपूर्ण अलगत्व होय. त्या दोघांच्या मुक्तीमध्ये फरक एवढाच आहे की, सांख्ययोगाने प्रकृती-पासून वेगळेपणा किंवा निराळेपणा स्वीकारला आहे; तर वेदान्त्यांनी माये-पासून वेगळेपणा अपेक्षिला आहे. परंतु आत्म्याच्या कल्पनेमध्ये त्या दोघांच्या मतात फरक आहे. सांख्यांच्या मते आत्मा अथवा पुरुष म्हणजे सच्चित म्हणजेच अस्तित्व-चैतन्य आणि पुरुषापेक्षा श्रेष्ठ आणखी कोणीही नाही. वेदान्त्यांच्या मते आत्मा म्हणजे सच्चिदानंद अर्थात् अस्तित्व, चैतन्य व आनंद होय आणि त्याचा ब्रह्माशी सारखेपणा आहे.

श्रीशैवागमाचे अंतिम ध्येय केवळ मुक्ती नसून श्रीशिवत्व योजना म्हणजेच श्रीशिवावस्थेची प्राप्ती करून घेणे आहे. श्रीशैवागमाच्या शब्दात सांगावयाचे झाल्यास अंतिम ध्येय म्हणजे केवळ आत्मव्याप्ती नसून श्रीशिवव्याप्तीही आहे. आत्मव्याप्तीत आत्मज्ञानाची कल्पना अथवा विचार असतो; परंतु श्रीशैवागमातली आत्मज्ञानाची कल्पना वेदान्त्यांहून वेगळी आहे. वेदान्ती असे मानतात की, आत्मा हा केवळ ज्ञानमय असून त्याच्यात कोणतीही क्रिया नाही. श्रीशैवागमात मात्र आत्मा हा ज्ञान व क्रिया या दोघांनीही युक्त आहे; परंतु श्रीशैवागमात आत्मव्याप्ती हे कमी प्रतीचे ध्येय आहे. उच्च प्रतीचे ध्येय म्हणजे श्रीशिवव्याप्ती होय. श्रीशिवव्याप्तीमध्ये श्रीशिवशक्तींचे सामरस्य होत असते. आत्मव्याप्तीत मर्यादित ज्ञान व क्रिया असतात; पण श्रीशिवव्याप्तीत वैश्विक सर्वव्यापक ज्ञान व क्रिया आहेत. ही श्रीशिवव्याप्ती म्हणजे जे एकाच वेळेला विश्वाच्या पलीकडचेही आहेत आणि विश्वात सामावलेलेही आहेत. अशी श्रीपरमशिवांची स्थिती आहे. ही स्थिती ज्यावेळेला उन्मनाशक्तीचा विकास होतो त्यावेळेला प्राप्त होते.

वेदान्त्यांच्या मुक्तीत माया नष्ट होते आणि तिच्याबरोबरच मायेने उत्पन्न केलेले निकृष्ट असे भ्रमात्मक जगतही नष्ट होते; पण श्रीशिवव्याप्तीत मात्र हे सर्व विश्व म्हणजे श्रीशिवांच्या म्हणजेच स्वतःच्या शक्तीचे व्यक्त रूप भासते.

सांख्ययोगातला मुक्तात्मा हा केवळ सच्चित् असतो. आत्मा अथवा पुरुष

हा सर्व दु:खांपासून आणि ते सोसण्यापासून मुक्त असतो. परंतु त्याला सकारात्मक आनंद नसतो. वेदान्त्यांच्या आत्म्याचे वैशिष्ट्य म्हणजे सच्चिदानंद होय. त्यांच्यामध्ये मुक्तीत सकारात्मक आनंद असतो; तो केवळ आत्मानंद असतो. श्रीशिवव्याप्तीत मात्र हे सर्व जग आत्मचैतन्याच्या आश्चर्यकारक आनंदाने प्रकाशत असते.

सांख्य आणि वेदान्त या दोन्ही दर्शनांच्या मते चित्त अथवा मन हे त्याच्या उत्पत्तीच्या साच्याकडे म्हणजेच प्रकृतीकडे मुक्तीच्या वेळेला परतते. "**श्रीपातंजलयोग**" या दर्शनात या परतण्याला एक विशिष्ट नाव आहे. प्रतिप्रसव म्हणजेच प्रकृतीत परत सामावून किंवा बुडून जाणे होय. या अशुद्ध करविणाऱ्या बुद्धीला तिच्या प्रमुख कारणात मिसळून जावेच लागते. त्यानंतरच केवळ पुरुष त्याच्या मूळच्या तेजाने चकाकू शकतो. चित्ताला पुरुषाच्या पवित्र हद्दीत कधीही येण्याची परवानगी दिली जात नाही. चित्त हे परके व परदेशी असते आणि त्याला त्याच्या मूळ घरी परत पाठवावे लागते.

पूर्णपणे अद्वैतवादी असणाऱ्या श्रीशैवागमाकडे मात्र गरीब बिचाऱ्या चित्तासाठी काही आनंदाचे शब्द आहेत. श्रीशैवागमाप्रमाणे आत्मज्ञान प्राप्त झालेल्या मनुष्याचे चित्त हे चित् मध्ये बदलले जाते व त्याला नवचैतन्य मिळते. "**श्रीप्रत्यभिज्ञाहृदय**" या ग्रंथातील तेरावे सूत्र त्याच्या श्रेष्ठ दैवाचे धीर देणारे बोल एकदम अचूक शब्दात मांडते.

**तत्परिज्ञाने चित्तमेव अन्तर्मुखीभावेन चेतनपदाध्यारोहात् चितिः ।।**

**अर्थ :-** आत्म्याचे पंचविध क्रियाकारित्व पूर्ण ज्ञात झाल्यानंतर चित्तच अंतर्मुख होऊन चेतनपदावर आरूढ होऊन चिती अर्थात् परमात्मचैतन्य बनते.

या सूत्रावरची श्रीक्षेमराजांची अत्यंत साधी व सरळ टीका काळजीपूर्वक लक्षात घेण्याजोगी आहे.

**चित्तं सङ्कोचिनी बहिर्मुखतां जगत् अन्तर्मुखीभावेन चेतनपदाध्यारोहात् ग्राहकभूमिकाक्रमणक्रमेण सङ्कोचकलया अपि विगलनेन स्वरूपापत्त्या चितिर्भवति-स्वां चिन्मयीं परां भूमिमाविशति इत्यर्थः ।**

**अर्थ :-** संकोचाची सवय असणारी बहिर्मुखता त्यागून चित्त अंतर्मुख होऊन चेतनपदावर आरूढ होते म्हणजेच ग्राहकभूमिकेवर आक्रमण करण्याच्या क्रमाने संकोचकलेचाही नाश करून व स्वरूप प्राप्त करून ते चित्त चिती बनते अर्थात् स्वतःच्या चिन्मय अशा श्रेष्ठ भूमीत प्रवेश करते.

श्रीशैवागमात चित्त हे परके नाही. "**श्रीप्रत्यभिज्ञाहृदय**" या ग्रंथातील पाचवे सूत्रही असे स्पष्टपणे सांगते की -

**चितिरेव चेतनपदादवरूढा चेत्यसङ्कोचिनी चित्तम्।।५।।**

**अर्थ :-** चिती अर्थात् परमचैतन्यच चेतनपदावरून खाली येऊन संकोच पावून चित्त बनते.

निमेष अथवा अवरोहात चिती चित्त बनते; मात्र उत्पत्तीच्या श्रेष्ठ पायरीवर म्हणजेच अध्यारोह अथवा उन्मेषामध्ये चित्त त्याचे मूळ स्वरूप प्राप्त करते आणि ते परत चिती बनते अर्थात् चितिशक्ती मूळ चैतन्ययुक्त श्रीशिवस्वरूप बनते.

## दुसरा विभाग किंवा उन्मेष
## शाक्तोपाय किंवा शाक्तयोग

पहिल्या विभागात शांभवोपाय सांगितला आहे. मात्र ही गोष्ट निदर्शनाला आणावयाला पाहिजे की, आपल्यामधला आत्मा म्हणजेच श्रीशिव होत; परंतु ज्याचा मूळ गुणधर्म विकल्प अथवा विचार आहे ते मन अडथळ्यांचे काम करते आणि आपल्यात चकाकत असणाऱ्या परमात्म्याचे कधी दर्शनही होऊ देत नाही. ज्यावेळेला लय अथवा विकल्पांचा नाश होतो त्यावेळेलाच ज्या पडद्याच्या मागे परमतत्त्व लपलेले असते तो पडदा दूर केला जातो आणि स्वतःच्या पूर्ण तेजाने चमकणाऱ्या परमतत्त्वाचे दर्शन आपल्याला होते. परमतत्त्व म्हणजे एखादी साध्य करण्याजोगी गोष्ट नसून आवरण काढण्याजोगी वस्तू आहे. परंतु येथे बिकट प्रश्न असा आहे की, विकल्पांनी पूर्ण भरलेल्या मनाला निवृत्त कसे करावयाचे? श्रीअभिनवगुप्तपादाचार्य यासंबंधी असे म्हणतात की, "**ज्यावेळेला एखादा विकल्प निर्माण होतो त्यावेळेला त्याचा स्वीकारही करू नका आणि त्यागही करू नका; कारण तो आपोआप निवृत्त होऊन जाईल आणि तुम्ही स्वतःला जसे आहात तसे कळून याल.**" ही कलाविरहित कला आहे. हे प्रयत्नरहित व अचानक घडणारे आहे. हा शांभवोपाय एका बाजूने पाहिल्यास अत्यंत सोपा व सरळ वाटतो आणि दुसऱ्या बाजूने विचार केल्यास अत्यंत अवघड वाटतो. हा सोपा आहे याचे कारण कोणतेही विशिष्ट प्रयत्न किंवा शिस्त त्याच्याकरता पाळण्याची गरज नाही. हा सर्वात कठीण आहे याचे कारण म्हणजे विचार करणे ही मनाची सवय नाही; तर तेच त्याचे जगणे आहे. ज्यावेळेला विकल्परहित अवस्था यावी असा प्रयत्न मनुष्य करू लागतो त्यावेळेला

त्याचे मन अथवा चित्त आणखी जास्त जास्तच विचार करू लागते. विकल्प किंवा विचारशून्य होण्यासाठी प्रयत्न करणे म्हणजे आपल्या स्वतःच्या त्वचेतून आपण बाहेर उडी मारावी तसे आहे. फार थोड्या मर्त्य मानवांना असे विकल्पशून्य राहण्याला दिले गेले आहे अर्थात् अशी संधी किंवा स्थिती फारच थोड्या लोकांना मिळते किंवा उपलब्ध होते.

त्यामुळेच दुसरा विभाग अन्य उपायाची शिफारस करतो. तो उपाय म्हणजेच **"शाक्तोपाय"** होय. त्यात तीन महत्त्वाचे शब्द उपयोगात आणले आहेत. हे तीन शब्द महाह्रद, अनुसंधान आणि मंत्रवीर्यानुभवः असे आहेत.

**"महाह्रद"** हा शब्द महाशक्तीचे सूचन करतो. **"अनुसंधान"** म्हणजे अत्यंत जवळून सामरस्याच्या दृष्टीने केलेले मानसिक परीक्षण होय. **"मन्त्रवीर्यानुभवः ।।"** म्हणजे मंत्राच्या सामर्थ्याचा अनुभव होय. एखाद्याने जी आपली रक्षणकर्त्री म्हणून सिद्ध होऊ शकते अशी ती मंत्राची शक्ती अनुभवावयाला यावी म्हणून "महाशक्तीचा" आश्रय घ्यावा. "शांभवोपायात" मात्र आपल्याला श्रीशंभू किंवा श्रीशिवांचा प्रकाश म्हणून आश्रय घ्यावा लागतो म्हणूनच त्याला **"शांभवोपाय"** असे नाव आहे.

शाक्तोपायात चिच्छक्ती किंवा विमर्शशक्तीचा साधकभक्तयोगिशिष्याने आत्मज्ञानासाठी आश्रय घ्यावा. त्यामुळेच त्याला **"शाक्तोपाय"** असे म्हटले जाते. शाक्तोपायालाच शाक्तयोग, ज्ञानोपाय, ज्ञानयोग, भावनोपाय, मंत्रोपाय आदि नावांनीही ओळखले जाते.

खूपशा लोकांना विचारशून्य होता येत नाही. मग त्यांना बाहेर येण्याला कोणताच मार्ग नाही का? याठिकाणी या प्रश्नाचे उत्तर शाक्तोपाय "हो" असे देतो. एका "शुद्ध विकल्पाची" धारणा करा. हा शुद्ध विकल्पच हा भवसागर पार करणारी सत्य नाव ठरेल आणि आपण आपल्या शाश्वत परमतत्त्वावर आपली नाव उतरवू शकू. खालच्या परिच्छेदात श्रीअभिनवगुप्तपादाचार्य शुद्ध आणि अशुद्ध विकल्पांचे स्पष्टपणे विवरण करतात. अशुद्ध विकल्पांच्या बाबतीत ते असे म्हणतात की –

**विकल्पबलात् एव जन्तवो बद्धम् आत्मानम् अभिमन्यन्ते। स अभिमानः संसारप्रतिबन्धहेतुः। अतः प्रतिद्वन्द्विरूपो विकल्प उदितः संसारहेतुं विकल्पं दलयति इति अभ्युदयहेतुः।। श्रीतंत्रसार।।**

**अर्थ :-** अशुद्ध विकल्पांच्या बळावरच मनुष्यप्राणी स्वतःला बांधलेले समजतात. हा अभिमान म्हणजेच त्यांची स्वतःबद्दलची चुकीची संकल्पनाच

संसारामध्ये त्यांना बांधण्याला कारणीभूत होते. त्यामुळे ज्यावेळेला विरोधी विकल्प उत्पन्न होतो त्यावेळेला तो विकल्प म्हणजेच संसाराला कारणीभूत असणाऱ्या विचारांना नष्ट करतो आणि अशा प्रकारे त्यांना अभ्युदय किंवा मोक्ष मिळवून देण्याला कारणीभूत होतो. अशुद्ध विकल्प म्हणजेच अशा कल्पना आणि विश्वास आहे की, ज्यामुळे मनुष्य त्याच्या मन व देहांनी बनलेल्या समूहाला "आत्मा" समजू लागतो. "मी बारीक आहे, अशक्त आहे, रागीट आहे," इत्यादि अशुद्ध विकल्पांची उदाहरणे आहेत. अशुद्ध विकल्प म्हणजे नेहमीच्या मन, शरीर व जीवाविषयीच्या कल्पना होत.

मग शुद्ध विकल्प म्हणजे काय? याविषयी श्रीअभिनवगुप्तपादाचार्य "**श्रीतंत्रसार**" या ग्रंथात असे म्हणतात की -

**स च एवंरूपः समस्तेभ्यः परिच्छिन्न-स्वभावेभ्यः शिवान्तेभ्यः तत्त्वेभ्यो-यत् उत्तीर्णम् अपरिच्छिन्न-संविन्मात्ररूपं तदेव च परमार्थः तदेव च अहम्। अतो विश्वोत्तीर्णो विश्वात्मा च अहम् इति।।**

**अर्थ :-** आणि तो अर्थात् परमात्मा सर्व परिच्छिन्न अथवा मर्यादित स्वभावांहून आणि श्रीशिवांपर्यंतच्या तत्त्वांहून पलीकडे आहे, तो अपरिच्छिन्न अर्थात् अमर्याद आहे, तो केवळ संविद्रूप अथवा चैतन्यरूपच आहे, तो परमार्थ आहे आणि तोच मी आहे. त्यामुळे विश्वोत्तीर्ण आणि विश्वात्मा असा मी आहे.

या शुद्ध विकल्पाचे सतत स्मरण करणे म्हणजे शाक्तोपाय होय. येथे एक प्रश्न असा उत्पन्न होतो की, "श्रीपरमशिवांना अशा प्रकारे विकल्पाच्या आवाक्यात आणता येते का?" जर एखाद्याने विकल्पाच्या साहाय्याने श्रीपरमशिवांमध्ये प्रवेश केला अर्थात् अत्यंत शुद्ध आणि पवित्र अशा विकल्पाच्या साहाय्यानेच त्याला हा प्रवेश करता येतो; तर त्याचा अर्थ असा होतो की, श्रीपरमशिवांना विचारांच्या प्रांतात आणता येते आणि जर असे होत नसेल तर त्या शुद्ध विकल्पाचा तरी काय उपयोग?

पहिल्या प्रश्नाच्या अनुषंगाच्या पद्धतीनुसार श्रीशैवतत्त्वज्ञान असे सांगते की, परमतत्त्व विकल्पांच्या प्रांतात आणता येत नाही. याविषयी श्रीअभिनव-गुप्तपादाचार्य "**श्रीतंत्रसार**" या ग्रंथात असे म्हणतात की -

**परं तत्त्वं तु सर्वत्र सर्वरूपतया प्रकाशमेव इति न तत्र विकल्पः कस्यचित् उपक्रियायै खण्डनायै वा।।**

**अर्थ :-** परमतत्त्व हे सर्वत्र व सर्वरूपत्वाने स्वयंप्रकाशच आहे. त्यामुळे

विकल्प त्याला कोणतीही मदतही करीत नाही आणि त्याचे खंडनही करीत नाही.

वास्तविक पाहता परमतत्त्व हे कोणत्याही क्रिया अथवा विशिष्ट आचरण पद्धतीच्या प्रभावाखाली येऊ शकत नाही.

श्रीअभिनवगुप्तपादाचार्य यांनी **"श्रीतंत्रसार"** या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**अभ्यासं च परे तत्त्वे शिवात्मनि स्वस्वभावे न सम्भवत्येव।....**
**संविद्रूपे तु न किञ्चित् आदातव्यं न अपसरणीयम् इति कथम् अभ्यासः।।**

**अर्थ :-** कोणत्याही प्रकारचा अभ्यास परमतत्त्व किंवा श्रीशिवात्मा यांच्या स्वस्वभावात होऊच शकत नाही. संविद्रूपात काहीही स्वीकारावयाचेही नाही आणि काहीही टाकावयाचेही नाही. मग तो अभ्यास कसा बरे होऊ शकेल?

मग शुद्ध विकल्पाचा उपयोग काय? त्याचा फायदा असा आहे की, शुद्ध विकल्पामुळे द्वैतभावना दूर होते. ही "द्वैतभावना" काय आहे? याविषयी श्रीअभिनवगुप्तपादाचार्य **"श्रीतंत्रसार"** या ग्रंथात असे म्हणतात की -

**द्वैताधिवासी नाम न कश्चन पृथक् वस्तुभूतः अपि तु स्वरूपाख्याति-मात्रं तत्। अतो द्वैतोपासनं विकल्पेन क्रियते।।**

**अर्थ :-** द्वैतभावना म्हणजे अन्य काहीही वेगळी वस्तू नसून ती स्वरूप-अख्याति अर्थात् आत्म्याविषयी अज्ञान होय. त्यामुळे त्याचे निरसन शुद्ध विकल्पाद्वारे केले जाते.

हे शुद्ध विकल्पाचे नकारात्मक कार्य आहे.

शुद्ध विकल्पाचे एक सकारात्मक कामही आहे. तो तीन मार्गांनी काम करतो. (१) मंत्रशक्तिद्वारा, (२) भावनेकडे नेणाऱ्या सत्-तर्काद्वारा आणि शेवटी (३) शुद्ध विद्याद्वारा ही कामे होतात. ही त्या शुद्ध विकल्पाची ठळक कामे आहेत; पण वेगवेगळी नाहीत. ही सर्व एकमेकांना आतून जोडलेली आहेत; पण आपल्याला स्पष्टीकरणाच्या दृष्टिकोनातून वरील तीनही मार्ग स्वतंत्रपणे बघावे लागतील.

**(१) मंत्रशक्ती :-** या आधीच सांगितल्याप्रमाणे पहिल्या भागातले शेवटचे सूत्र शाक्तोपायाकडे घेऊन जाणारे आहे. दुसऱ्या विभागाच्या पहिल्या सूत्रातल्या प्रस्तावनेच्या भागात श्रीक्षेमराजाचार्य असे म्हणतात की, **"तत्र शक्तिः मन्त्रवीर्यस्फाररूपा ....... इति मन्त्रस्वरूपं तावत् निरूपयति।।"** अर्थात्

"शक्ती ही मंत्राच्या सामर्थ्याच्या विस्ताराचे स्वरूप आहे. त्यामुळे प्रथमतः मंत्राचे स्वरूप परीक्षिले पाहिजे." त्यामुळे दुसऱ्या विभागातील पहिले सूत्र असे आहे की, "**चित्तं मन्त्रः ।।**" या सूत्रातील "**चित्तम्**" या पदाचा अर्थ कोणतेही चित्त अथवा मन असा होत नाही. या संदर्भात मन किंवा चित्त याचा अर्थ ज्याने अत्यंत गंभीरतेने विचार करण्याचा किंवा चिंतन करण्याचा आणि परमतत्त्व शोधून काढण्याचा निश्चय केलेला आहे असे मन होय. "**चेत्यते विमृश्यते अनेन परं तत्त्वम् इति चित्तम् ।।**" अर्थात् "जे चैतन्ययुक्त होऊन परमतत्त्वाचा विचार करते ते चित्त होय."

आणि दुसरा प्रश्न असा आहे की, मंत्र म्हणजे काय? "**मंत्र**" या पदात दोन अक्षरे आहेत. त्यातील एक म्हणजे "**मन्**" आणि दुसरे म्हणजे "**त्र**" होय. "**मन्**" याचा अर्थ विचार करणे व सावध राहणे असा आहे आणि "**त्र**" म्हणजे जे रक्षण करते ते. "**परस्फुरत्तात्मकमननधर्मात्मकता, भेदमयसंसार-प्रशमात्मकत्राणधर्मता च अस्य निरुच्यते।**" अर्थात् "मंत्र म्हणजे परस्फुरत्तेचे अर्थात् परमतत्त्वाचे मनन म्हणजेच विचार करण्याच्या धर्माने युक्त आणि भेदाने युक्त असणाऱ्या संसाराचा आभास नष्ट करण्याचा त्राण म्हणजेच रक्षणाच्या धर्माने युक्त होय.

हे आधीच सांगितलेले आहे की, ज्यात शक्तिस्वरूपातले चैतन्य हे मार्गदर्शक तत्त्व आहे त्यालाच शाक्तोपाय असे म्हणतात. शक्ती ही मंत्राचे किंवा गूढ अक्षराचे वा अक्षरांचे स्वरूप धारण करते. साधकभक्तयोगिशिष्याचे मन इतक्या तीव्रतेने मंत्राच्या देवतेशी एकरूप झालेले असते की, तो स्वतःच मंत्र बनून जातो. या संदर्भातल्या चित्ताचा अर्थ आत्म्याचे चैतन्य म्हणून खालच्या पातळीवर आलेले एक अंग होय. पहिल्या उपायाच्या पहिल्या सूत्रात आत्म्याचे स्वातंत्र्य, ज्ञान आणि क्रियाशक्ती अशी वैशिष्ट्ये असणारे परमचैतन्य होय असे वर्णन केलेले आहे. येथे चित्त हे आत्म्याचे खालच्या पातळीवरचे अंग आहे. त्यात मंत्राचे ज्ञान होते.

प्रत्येक मंत्रात काही अक्षरे अथवा वर्ण असतात. केवळ वर्णांचा यांत्रिकपणे उच्चार करणे हे निरुपयोगी आहे. साधकभक्तयोगिशिष्याने ज्या देवतेची तो आळवणी करतो त्या देवतेत स्वतःला सामावून टाकणे अत्यंत आवश्यक आहे. पूर्णाहंता किंवा पूर्ण आत्मचैतन्य हीच श्रीशिवांची विमर्शशक्ती असून तीच परमात्म्याची क्रियाशील स्पंदनशक्ती अर्थात् सर्व मंत्रांचा स्रोत आहे. प्रत्येक मंत्र परमात्म्याच्या क्रियाशक्ती असणाऱ्या दिव्य आत्मचैतन्याकडे

घेऊन जातो. ते दिव्य आत्मचैतन्य अथवा अहंता ही वाणी नाही; परंतु सर्व वाणी, विचार आणि विषयांची जननी आहे. शुद्ध विकल्प म्हणजेच त्या दिव्य पूर्णाहंतेचे आपला आत्मा म्हणून चिंतन करणे होय. ते आत्मचैतन्य किंवा अहंता ही श्रीशिवांची शक्ती आहे म्हणून त्या शक्तीचे चिंतन करणे म्हणजेच शाक्तोपाय होय आणि तो शाक्तोपाय प्रत्येक आत्म्याचे श्रीशिवांशी सामरस्य घडवून आणतो. त्यामुळेच "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात खालील व्याख्या दिली आहे.

**उच्चाररहितं वस्तु चेतसैव विचिन्तयन्।**
**यं समावेशमाप्नोति शाक्तः सोऽत्राभिधीयते।।२.२२।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य ज्याचा उच्चारही करता येत नाही त्या वस्तूचे म्हणजे ब्रह्माचे अर्थात् श्रीशिवांचे मनानेच चिंतन करीत जो समावेश प्राप्त करतो त्याला येथे "शाक्तसमावेश" असे म्हटले जाते.

मग प्रश्न असा निर्माण होतो की, ती उच्चाररहित अर्थात् उच्चारता न येणारी वस्तू कोणती आहे? ती "**परावाक्**" होय. तिलाच पराशक्ती, पराहंता, विमर्शशक्ती, पूर्णाहंविमर्शात्मिकासंवित्शक्ती व मातृका आदि नावांनीही संबोधिले जाते. तीच सर्व वाणी आणि विचारांच्या पलीकडची पराहंता आहे आणि तीच विश्वाला अस्तित्वात आणणारी प्रमुख क्रियाशील स्पंदनशक्ती आहे. ती सर्व शब्द आणि विषय यांचे उगमस्थान असूनही शब्दांच्या पलीकडची आहे. सृष्टिक्रमामध्ये परावाक् नंतरची पुढची पायरी म्हणजे "**पश्यंती**" होय. या पातळीवर शब्द आणि अर्थ हे अविभाज्य व दोघातही फरक करता न येणारे असतात. त्याच्यानंतरची पायरी म्हणजे "**मध्यमा**" होय. येथे जरी शब्द आणि अर्थ यांच्यात वेगळेपणा आणणे सुरू झालेले असले तरी त्या अवस्थेत उच्चारणे नसते. ते उच्चार सूचित केले जाणारे; परंतु व्यक्त नसलेले असे असतात. फरक हा फक्त विचारांच्या पातळीवर असतो. ही पश्यंती आणि वैखरीच्या मधली अवस्था आहे. या स्थितीत एका सूक्ष्मवाणीप्रमाणे काही तरी असते. तिने अजूनपर्यंत शब्दांचे रूप घेतलेले नसते. वैखरी अवस्थेत स्थूलवाणी असते. त्या वाणीत शब्द आणि त्यांचे अर्थ यांचे पूर्णपणे विभाजन झालेले असते. विखर म्हणजे शरीर होय. त्यामुळे वैखरी म्हणजे ही अशी अवस्था आहे की, ज्याच्या उच्चारणात शरीराचे अवयवही उपयोजिले जातात. अशा प्रकारे सृष्टीच्या प्रकटीकरणात तीन अवस्था असतात. परा, सूक्ष्मा व स्थूला किंवा अतिसूक्ष्म, सूक्ष्म व स्थूल या त्या अवस्था आहेत.

परावाक् किंवा श्रीशिवांचे परमचैतन्य हे सर्व मंत्रांचे राहण्याचे ठिकाण किंवा साररूप रहस्य आहे. हेच "**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथात खालील प्रमाणे मांडले आहे.

**मन्त्राणां जीवभूता तु या स्मृता शक्तिरूपया।**
**तया हीना वरारोहे निष्फलाः शरदभ्रवत्।।**

**अर्थ :-** ती जी शाश्वत शक्ती म्हणून मानली जाते तीच सर्व मंत्रांचा आत्मा असून जर मंत्र त्या शक्तीने रहित असले तर हे सुंदरी! ते मंत्र शरद ऋतूतील ढगांप्रमाणे निष्फळ ठरतात.

ही शाश्वत शक्ती म्हणजे श्रीपरमशिवांची शक्ती होय.

हीच कल्पना या उपायातल्या तिसऱ्या सूत्राने अधिक मजबूत केली आहे. ।। **विद्याशरीरसत्ता मन्त्ररहस्यम्।।२.३।।**

मंत्रांमध्ये अक्षरे किंवा वर्ण असतात. ते वर्ण म्हणजे अर्थहीन अस्पष्ट बडबडणे नव्हे. ते परमात्म्याच्या शक्तीची चिह्ने आहेत. या मुळापासूनच वर्णांमध्ये असणाऱ्या शक्तींच्या समूहाला "मातृका" असे म्हणतात. या मातृका सर्व मंत्रांचे "रहस्य" आहे. याविषयी "**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सर्वे वर्णात्मका मन्त्रास्ते च शक्त्यात्मकाः प्रिये।**
**शक्तिस्तु मातृका ज्ञेया सा च ज्ञेया शिवात्मिका।।**

**अर्थ :-** हे प्रिये! सर्व मंत्र वर्णांनी युक्त आहेत. ते शक्तिस्वरूप आहेत. या शक्ती मातृका म्हणून समजल्या जातात आणि मातृका या श्रीशिवात्मक आहेत असे जाणावे.

**या सा तु मातृका देवि परतेजः समन्विता।**
**तया व्याप्तमिदं विश्वं सब्रह्मभुवनात्मकम्।।**

**अर्थ :-** हे देवी! ब्रह्मापासून पृथ्वीपर्यंत भुवनांसह असणारे हे विश्व परमात्म्याच्या तेजाने युक्त असणाऱ्या मातृकांनी व्यापलेले आहे.

ही पराहंता किंवा आत्मचैतन्य हे श्रीपरमशिवांचे क्रियाशील सामर्थ्य आहे. पराहंता ही पराशक्ती, परावाक्, परा अथवा महामातृका किंवा केवळ मातृका म्हणूनही ओळखली जाते. मंत्रशक्ती प्राप्त करण्यासाठी साधकभक्त-योगिशिष्याला श्रीसद्गुरूंकडे जावे लागते. साधकभक्तयोगिशिष्य अशा रीतीने श्रीसद्गुरूंकडे गेला की, ते त्यांचे स्वतःचे तेज त्या मंत्रात घालतात आणि चैतन्यशक्ती त्या मंत्रावर बिंबवितात आणि त्याला मातृकांच्या रहस्याचा

उपदेश करतात. या पूर्वीच सांगितल्याप्रमाणे मातृका म्हणजे सर्व वर्णांचा समूह होय आणि त्या मातृका म्हणजे आत्मचैतन्यही आहे. ते सर्व वर्णांचे व पर्यायाने पद व अर्थ अर्थात् विषय व विषयी यांनी भरलेल्या जगताचेही स्वरूप आहे. "**मी**" याला संस्कृतमध्ये "**अहम्**" असे म्हणतात. "**अ**" व "**ह**" या वर्णांमध्ये संस्कृतमधील सर्व वर्ण येतात. ज्याअर्थी या वर्णांपैकी प्रत्येक वर्ण विषय अथवा विषयी तत्त्वांच्या सृष्टीचा किंवा निर्मितीचा प्रतिनिधी आहे त्याअर्थी तो "अहम्" किंवा श्रीपरमशिवांचे चैतन्य हे विषय व विषयी यांनी युक्त अशा सर्व जगताचे निर्माण करणारे असते. या उपायातले सातवे सूत्र असे सांगते की, शिष्याला मातृकांविषयीचे ज्ञान श्रीसद्गुरूंकडून प्राप्त होते. या सूत्राचे भाषांतर व स्पष्टीकरण मातृकांची सृष्टी जाणून घेण्यासाठी अभ्यासूंनी लक्षपूर्वक अभ्यासावे.

श्रीपरमशिवांचे आत्मचैतन्य सर्व जगताला एका आदर्श अवस्थेत धारण करते. याविषयी श्रीक्षेमराजाचार्य "**श्रीप्रत्यभिज्ञाहृदय**" या ग्रंथात असे म्हणतात की -

**अत एव अनुत्तराकुलस्वरूपात् अकारात् आरभ्य शक्तिस्फार-रूपहकलापर्यन्तं यत् विश्वं प्रसृतं ..... तत् अकारहकाराभ्यामेव सम्पुटीकारयुक्त्या प्रत्याहारन्यायेन अन्तःस्वीकृतं सत् अविभाग-वेदनात्मकबिन्दुरूपतया स्फुरितम् अनुत्तर एव विश्राम्यति-इति शब्दराशिस्वरूप एव अयम् अकृतको विमर्शः ।।**

**अर्थ :-** त्यामुळेच अनुत्तर अर्थात् परमतत्त्व अकुल अशा स्वरूपाच्या "**अ**"कारापासूनच सुरू होऊन शक्तीचा विस्तार हेच स्वरूप असणाऱ्या "**ह**" कलेपर्यंत जे विश्व पसरलेले आहे...... ते "**अ**"कार व "**ह**"कार यांनीच संपुटीकरण केलेले अर्थात् "**अ**" व "**ह**" यांनी जोडलेले व प्रत्याहार न्यायाने अंतर्भागात स्वीकारलेले असून अद्वैताच्या ज्ञानाने युक्त अशा बिंदूच्या स्वरूपात स्फुरण पावून अनुत्तर म्हणजे परमतत्त्वात विश्रांती घेते. अशा प्रकारे शब्दांच्या समूहाच्या स्वरूपाचा हा अकृतक अर्थात् स्वाभाविक विमर्श आहे.

"**अ**" हा प्रकाश अथवा श्रीशिवांचे प्रतिनिधित्व करतो तर "**ह**" हा विमर्श अथवा शक्तीचे प्रतिनिधित्व करतो. बिंदू किंवा "**ह**" वरचा अनुस्वार असे निर्देशित करतो की, जरी श्रीशिव हे पृथ्वीतत्त्वापर्यंत शक्तीच्या द्वारा व्यक्त झालेले असले तरी ते तेथेच विभागलेले नसतात तर ते अखंडपणे

एकच असतात.

ज्यावेळेला मातृकांचे ज्ञान नसते त्यावेळेला त्या मातृका सर्व प्रकारच्या जगताच्या अनुभवापर्यंत म्हणजेच बंधनाप्रत जीवाला नेत असतात. ज्याक्षणी त्यांचे पूर्ण ज्ञान होते त्याक्षणी त्या जीवाला मुक्ती देणाऱ्या होतात. ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य अथवा प्रमाता म्हणजे जीव हा शुद्ध विकल्पाच्या द्वारा मंत्राचे मनन करतो आणि आपण श्रीशिवच आहोत असे जाणून घेतो त्यावेळेला मंत्रात मुळातून असणारी मंत्रशक्ती म्हणजेच मातृकाशक्ती जीवाच्या चित्ताला बदलून टाकते किंवा चित्तात परिवर्तन करते. अशा प्रमात्याने अर्थात् जीवाने केलेला शुद्ध विकल्प म्हणजेच कल्पना पूर्णपणे विरून जाते. आता त्याचे चित्त हे चिती अर्थात् चैतन्यशक्तीमध्ये रूपांतरित होते. त्याला आता सत्य आत्मचैतन्याच्या ठोक्यांची जाणीव होऊ लागते व मग त्याला असे ज्ञान होते की, हे सर्व जग म्हणजे मातृका किंवा आत्मचैतन्याची निर्मिती आहे. ही आत्मचैतन्याची बाजू अथवा अंग असे प्रकाशन करते की, हे सर्व विश्व म्हणजे आत्म्याचेच व्यक्त स्वरूप आहे. ते मातृकांमधील मंत्रशक्तीच्या सर्वश्रेष्ठ विकास असणाऱ्या उन्मनीशक्ती अथवा उन्मना हिच्या द्वारा प्रकाशात आणले जाते. उन्मनेलाच पराविद्या असेही म्हणतात. श्रीक्षेमराजाचार्य याचा संदर्भ पहिल्या उपायाच्या एकवीसाव्या सूत्रात घेतात. तेथे तिला शुद्धविद्या असे म्हटले आहे; तर दुसऱ्या उपायाच्या पाचव्या सूत्रातही याचा संदर्भ येतो व तेथे तिला खेचरी श्रीशिवावस्था असे म्हटले आहे.

**(२) सत्-तर्क :-** सत्-तर्क साधकभक्तयोगिशिष्याला त्याच्या पुढच्या मार्गक्रमणात मदत करतो. साधकभक्तयोगिशिष्य आपल्या महान् श्रीसद्गुरूंकडून अथवा आगम किंवा श्रीशैवदर्शनाच्या पारंपारिक ग्रंथांतून असे समजून घेतो की, हा आत्मा म्हणजे श्रीशिव आहेत, भौतिक जैवमनोसंघट्ट नव्हे. या विषयी श्रीअभिनवगुप्तपादाचार्य **"श्रीतंत्रसार"** या ग्रंथात असे म्हणतात की -

**आगमस्य समुचितविकल्पोदये व्यापारः ।।**

**अर्थ :-** आगमाचे कार्य चित्तामध्ये शुद्ध विकल्प निर्माण करणे हे आहे. त्याच ग्रंथात श्रीअभिनवगुप्तपादाचार्य सत्-तर्का विषयी असे म्हणतात की -

**तथाविधविकल्पप्रबन्ध एव सत्तर्क इति उक्तः ।।**

**अर्थ :-** शुद्ध विकल्पाप्रमाणे असणाऱ्या कल्पनांच्या सलगतेला अधिक मजबूत करणारा विचार म्हणजे सत्-तर्क होय.

हा सत्-तर्क भावनेकडे घेऊन जातो. भावना म्हणजे क्रियाशील ध्यान

होय. त्याचप्रमाणे आध्यात्मिक ध्यानाचे सामर्थ्य होय. श्रीअभिनवगुप्तपादाचार्य भावनेची व्याख्या करताना "**श्रीतंत्रसार**" या ग्रंथात असे म्हणतात की -

**अस्फुटत्वात् भूतमिव अर्थम् अभूतमिव स्फुटत्वापादनेन भाव्यते यया।।**

**अर्थ :-** भावनेमुळे जी वस्तू सत्य आणि अस्तित्वात आहे ती असत्य आणि अस्तित्वात नसलेली वाटते; कारण अस्पष्ट भावनेमध्ये विधायक किंवा साहाय्यक कल्पना या खूप महत्त्वाची भूमिका बजावतात.

हा एक प्रकारच्या स्वयंसूचनेचा प्रकार असून तो जडामध्ये बुडतो आणि आश्चर्यकारक सत्तत्त्वाला त्याच्या रहस्यमय खोलीतून अथवा गंभीरतेतून बाहेर काढतो. तो सत्तर्क हळूहळू आणि क्रमाने आत्मचैतन्याचा जो प्रकाश व्यक्त करतो तो शुद्धविद्येकडे घेऊन जातो. शुद्धविद्येच्या प्रभावाखाली ज्ञेय हे ज्ञानाचे स्वरूप आहे असे भासते. त्यानंतर ज्ञानाचा ज्ञात्यामध्ये शेवट होतो आणि अंततः या ज्ञात्याची जागा विश्वोत्तीर्ण आत्मचैतन्य घेते. यात ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय यांच्यामधील भेद पूर्णपणे संपलेला असतो.

स्पंदतत्त्वज्ञानामध्ये आणखी एक शाक्तोपाय सांगितला आहे. त्याच्या साहाय्याने जर एखादा साधकभक्तयोगिशिष्य दोन विचारांच्या मधल्या अभावात असणाऱ्या स्पंदाला पकडू शकला तर विकल्पांचा नाश होऊ शकतो. या व्यक्त होण्यालाच उन्मेष असे म्हणतात.

ज्या प्रमात्याला मातृकाचक्राविषयी पूर्ण प्रकाश मिळालेला असतो त्याचे सगळे आयुष्यच बदलून जाते. तो श्रीपरमेश्वराभिमुख होतो. त्याचे पूर्ण आयुष्यच योग बनून जाते. त्याची सामान्य धार्मिक कार्ये आध्यात्मिक क्रिया बनतात. या उपायातले आठवे सूत्र असे सांगते की, अग्नीत तूप, जव आदींच्या आहुती टाकण्याऐवजी असा योगी त्याच्या स्थूल आणि सूक्ष्म देहांच्या विचारांचा अहं म्हणून भावनेच्या बळाने चिदग्नीत आहुती टाकतो.

नववे सूत्र असे सांगते की, तांदूळ, गहू आदि त्याचे अन्न असण्याऐवजी त्याच्या परमतत्त्वाचे विचारच त्याचे अन्न बनते. हे अन्न त्याचे पोषण करते आणि समाधान देते.

श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनी अशा प्रकारचीच आणखी उदाहरणे प्रस्तुत केली आहेत. सर्व वस्तू या श्रीपरमेश्वरातच राहत असतात. या शुद्ध विचारासह अशा प्रकारचा साधकभक्तयोगिशिष्य भावनेद्वारा प्रत्येक गोष्ट श्रीपरमेश्वरालाच अर्पण करीत असतो. हाच त्याचा योग अथवा यज्ञ होय. पूर्ण आणि अमर्याद असा श्रीपरमेश्वर हाच माझा आत्मा आहे अशा प्रकारचे सतत चिंतन

म्हणजेच त्याचा जप होय. देह, घट आदि श्रीपरमेश्वराचे अंग असणारे दृश्य घटक हेच त्याचे व्रत होय. जो विचारांना विषय नाही अशा श्रीपरमेश्वराचा शोध हाच त्या योग्याचा योग असतो.

परंतु प्रमुख शाक्तोपाय हा मंत्रशक्तीत सामावलेला असतो. मंत्रशक्ती ही मातृकेत आधीपासूनच असते आणि ती आत्मचैतन्याच्या ध्यानाने अथवा विचाराने उत्पन्न होते. एक दार हळूच झोके घेत उघडे होते व एक प्रकारचे बल त्याच्यापासून निर्माण होते. ते आपल्या तथाकथित "अहं"ला मृत्यूपर्यंत आलिंगन देते. तो संकुचित "मी" आत्मचैतन्यात राहण्यासाठी मृत्यू पावतो.

## तिसरा विभाग किंवा उन्मेष
## आणवोपाय किंवा आणवयोग

श्रीशिवसूत्रांचा तिसरा विभाग "आणवोपाय" याच्याशी संबंधित आहे. "**उपाय**" हा शब्द "**जवळ येण्याचे साधन**" हा अर्थ सूचित करतो. शांभवोपायामध्ये चैतन्य अथवा परमतत्त्वाजवळ जाण्याचा उपाय अर्थात् जर त्याला "उपाय" म्हटले जाऊ शकत असेल तर तो उपाय इच्छारहित जाणीव किंवा अक्रियाशील जागृती होय. या उपायात असा कोणताही आधार किंवा वस्तू नाही की, ज्याच्यावर चित्त एकाग्र करता येते. या उलट चित्ताला स्वतःला मागे घ्यावे लागते व क्रियाशील भूमिका बजावण्यापासून थांबावे लागते. कदाचित् त्यामुळेच या उपायाला "**निरालंबयोग**" असेही म्हटले जाते. निरालंब म्हणजे आधारविरहित योग होय.

शाक्तोपायामध्ये चैतन्याप्रत जाण्याचे साधन म्हणजे चित्त होय. येथेही परत चित्त कोणत्याही विशिष्ट बिंदूवर स्थिर केलेले नसते किंवा कोणत्याही वस्तूवर लक्ष्य एकाग्र केलेले नसते अथवा ध्यान लावलेले नसते. या उपायात चित्ताचा त्याच्या उत्पत्तीचा शोध घेण्यासाठी उपयोग केला जातो. आत्मा किंवा अहम् म्हणजे काय? याचा गांभीर्याने विचार करण्यासाठी चित्त उपयोगात आणले जाते. चित्ताचा उपयोग मंत्र आणि सर्व मंत्रांचे उत्पत्तिस्थान असणाऱ्या परमचैतन्याचे खोल महत्त्व जाणून घेण्यासाठीही केला जातो. आत्म्याच्या माहात्म्यावर सतत अर्थात् अखंडपणे स्थिर राहिले असता चित्त पवित्र होते आणि अंततः मंत्रशक्तीमध्ये रूपांतरित होते. त्यामुळे अशा प्रकारे साधकभक्त-योगिशिष्याला दिव्य व शाश्वत परमात्म्याचे "प्रातिभज्ञान" प्राप्त होते. भावना आणि शुद्धविद्या यांच्याद्वारा चित्त वर उचलले जाते आणि वरती सांगितल्या-प्रमाणे त्याचे रूपांतर होते. परंतु शाक्तोपायही प्रत्येकालाच शक्य आहे असे

नाही, हे लक्षात घेतले पाहिजे. ज्यांचे चित्त आधीच पूर्णपणे अध्यात्माकडे वळलेले आहे त्यांच्यासाठीच हा उपाय आहे. श्रीक्षेमराजाचार्यांनी दुसऱ्या विभागाच्या पहिल्या सूत्रात चित्ताची व्याख्या करताना असे म्हटले आहे की-

**चेत्यते विमृश्यते अनेन परं तत्त्वम् इति चित्तम्।।**

**अर्थ :-** ज्याच्या साहाय्याने चैतन्ययुक्त होऊन परमतत्त्वाचा विचार केला जातो त्याला चित्त असे म्हणतात.

शाक्तयोग ही आत्मशोधाची प्रक्रिया आहे. आधुनिक योग्यांपैकी श्रीरमणमहर्षींनी शाक्तयोगाचे उत्तम उदाहरण पुढे ठेवले आहे असे म्हणता येईल. शाक्तयोगात चित्ताचे आलंबन अथवा आधार म्हणजे परमात्माच होय.

पण आणवोपायात मात्र गोष्ट जरा वेगळी असते. येथे अणू म्हणजे जीवरूप साधकभक्तयोगिशिष्य त्याच्या स्वत:प्रमाणेच मर्यादित आणि संकुचित अंग असलेली बुद्धी, प्राण, देह, अवकाशातली एखादी वस्तू इत्यादि गोष्टींपैकी एखाद्या गोष्टीचा आधार आपल्या भौतिक क्रियांचा अभ्यास चालू राहू शकावा यासाठी घेत असतो.

**"शांभवोपायातले"** पहिले सूत्र **"चैतन्यमात्मा।।१-१।।"** असे आहे. ते चैतन्य म्हणजे पूर्ण स्वातंत्र्य, ज्ञान आणि क्रिया यांच्या वैशिष्ट्याने युक्त वैश्विक चैतन्य असून ते आत्मा आहे. **"शाक्तोपायातले"** पहिले सूत्र **"चित्तं मन्त्र:।।२.१।।"** असे आहे. जे मंत्रशक्तिद्वारा आत्मचैतन्याचे ज्ञान प्राप्त करून घेते ते आध्यात्माभिमुख चित्त आहे. **"आणवोपायात"** पहिले सूत्र **"चित्तम् आत्मा।।३.१।।"** असे आहे. यामध्ये जे एका स्वरूपातून दुसऱ्या स्वरूपात फिरते असे आत्मस्वरूपाचे बुद्धी, मन व अहंकार यांचे संघट्टरूप चित्त होय. **(अतति सञ्चरति इति आत्मा अर्थात् जो संचार करतो तो आत्मा होय.)** येथे आत्मा हा शब्द "ज्याला बहुश: आत्मा म्हणून समजले जाते असे मानसिक संघट्ट" या अर्थाने वापरला आहे. हा मानसिक किंवा अनुभवावर आधारलेला आत्मा म्हणजेच अणू होय. हा योग "अणू" पासूनच सुरू होत असल्याने याला "आणवयोग" असे म्हणतात. यामध्ये चित्त स्वत:ला आत्म्याशिवाय इतर कोणत्यातरी वस्तूवर स्थिर ठेवते. त्यामुळे त्याला भेदोपाय असे म्हणतात अर्थात् याचे आत्म्याशिवाय इतर साधनाने परमचैतन्याप्रत पोहोचण्याच्या मार्गाची प्रक्रिया असे वर्णन करता येईल. शाक्तोपायात ज्ञान हे सर्वात प्रबळ असते तर आणवोपायात क्रिया सर्वात प्रबळ असते. आणवोपायात ध्यान ही उपयोगात आणली जाणारी

क्रियाच मानली आहे. आणवोपायात क्रिया आणखी स्थूल स्वरूपात म्हणजेच एखाद्या मंत्राचा जप, विशिष्ट देवता किंवा मूर्ती यांची आराधना अशा स्वरूपातही उपयोगात आणली जाते. त्यामुळे त्याला "क्रियोपाय" असे म्हणतात.

हे अत्यंत काळजीपूर्वक लक्षात ठेवले पाहिजे की, हे तीन उपाय म्हणजे जलाभेद्य डबे नाहीत. आणवोपायाने शाक्तोपायापर्यंत जाता येते आणि अंततः शांभवोपायाची पायरी गाठता येते. शांभवोपायाचे ज्ञान हीच सर्वश्रेष्ठता होय आणि तेच इतर उपायांचे अंतिम ध्येय आहे. एक उपाय दुसऱ्या उपायामधून जातो. जरी अनात्मवस्तूचे त्या परमतत्त्वाचे अंग अथवा व्यक्तस्वरूप म्हणून ध्यान केले तरी त्याचा अंततः शाक्तोपायात शेवट होतो. शाक्तोपायाच्या अभ्यासात "मी"चे विलिनीकरण व इतर अभ्यासांचे समरसीकरण होऊन आत्मचैतन्य हे प्रत्येक गोष्टीत विलसत आहे असे समजून येते. त्याचा सराव शांभवोपायाची प्राप्ती करून देतो. या शांभवोपायात आत्मचैतन्य म्हणजे केवळ श्रीशिवांचे व्यक्त स्वरूप नसून त्याच्यात श्रीशिवांच्या शक्तीचा पसारा असणाऱ्या जगताचाही समावेश आहे. त्यामुळेच "**श्रीशिवसूत्रे**" ही प्रत्येक उपाय किंवा प्रक्रिया यांचे स्पष्टीकरण देत असताना केवळ त्याच उपायात अडकून राहत नाहीत तर इतरही उपाय किंवा साधनांचा संदर्भ देतात.

## आणवोपायाची ठळक वैशिष्ट्ये

"**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात आणवोपायाची खालीलप्रमाणे व्याख्या केली आहे.

**उच्चारकरणध्यानवर्णस्थानप्रकल्पनैः।**
**यो भवेत्तु समावेशः सम्यगाणव उच्यते।।२.२१।।**

**अर्थ :-** उच्चार, करण, ध्यान, वर्ण व स्थानप्रकल्पना यांनी जो समावेश होतो म्हणजेच जीवाचे परमात्म्यात मिसळणे होते त्याला आणवोपाय असे म्हणतात.

या आधी हे सांगितले आहेच की, आणवोपायाचे पालन करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याच्या चित्ताचा आधार एखादी आत्म्याशिवाय वेगळी वस्तू असते. कदाचित् ती त्याची (१) बुद्धी, (२) स्थूल प्राण, (३) सूक्ष्म प्राण म्हणजे ज्याला "वर्ण" असे म्हणतात, (४) देह आणि विशिष्ट प्रकारात केलेली त्याच्या अवयवांची रचना, मांडणी म्हणजे ज्याला "करण" असे

म्हणतात आणि (५) एखादी बाह्य वस्तू म्हणजे ज्याला "स्थानकल्पना" असे म्हटले जाते या असू शकतात. "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथाच्या कारिकेत या सर्व गोष्टी एकत्रित केल्या आहेत. आता आपण हे सर्व विस्ताराने पाहू या.

## (१) ध्यान

श्रीअभिनवगुप्तपादाचार्य "**श्रीतंत्रसार**" या ग्रंथात असे म्हणतात की, "साधकभक्तयोगिशिष्याने प्रमाता अर्थात् ज्ञाता किंवा कर्ता, प्रमाण अर्थात् ज्ञान आणि प्रमेय अर्थात् विषय किंवा ज्ञेय यांचे एकत्रित ध्यान करावे. याचा परिणाम म्हणजे आतला खोल चैतन्याग्नी लगेच प्रज्वलित होईल. त्यानंतर त्याच्या इंद्रियांमधून संचरित होणाऱ्या शक्तींच्या समूहाद्वारा सर्व बाह्य विषय त्याने भावनेद्वारा प्रज्वलित झालेल्या आतल्या चैतन्याग्नीत ओतावेत. त्यानंतर आतला आणि बाहेरचा अर्थात् चैतन्य आणि बाह्य विषय यांच्यातला फरक नष्ट होईल आणि केवळ एक चैतन्य शिल्लक राहील. अशा प्रकारे साधक-भक्तयोगिशिष्य आत्मचैतन्यात "आणवसमावेश" प्राप्त करील."

"**श्रीशिवसूत्रे**" या ग्रंथाच्या तिसऱ्या उपायाच्या चौथ्या सूत्रात ध्यानाचा आणखी एक मार्ग सांगितला आहे. साधकभक्तयोगिशिष्याने पृथ्वीपासून श्रीशिवांपर्यंतची सर्व तत्त्वे प्रथम स्थूल शरीरात, मग सूक्ष्म शरीरात व शेवटी कारण शरीरात विरघळून जात आहेत अशी "भावना" करावी. यालाच "**लयभावना**" असे म्हणतात किंवा एखाद्याने असा विचार करावा की, कालाग्निरुद्र हा उजव्या पायाच्या अंगठ्यापासून निघत आहे व सर्व देहाला जाळत आहे. यालाच "**दाहभावना**" असे म्हणतात. हाच शाक्तप्रक्रियेचा एक यथार्थ प्रकार आहे.

या प्रकारांनी साधकभक्तयोगिशिष्याचे चित्त आत्मचैतन्यात समावेश प्राप्त करते. याच्या अधिक ज्ञानासाठी चौथ्या सूत्राचे स्पष्टीकरण जिज्ञासूंनी बघावे.

## (२) उच्चार

उच्चार हा प्राणाशी म्हणजेच जीवनशक्तीशी जोडलेला असतो. त्याचे मुख्य वैशिष्ट्य म्हणजे उच्चार अर्थात् वरती उचलून येणे आणि आवाजाच्या रूपात भासणे असे आहे. प्राण हा शब्द दोन अर्थांनी वापरला जातो. एक म्हणजे सामान्य अथवा सूक्ष्म प्राण आणि दुसरा म्हणजे विशिष्ट प्राण होय. सामान्य अर्थी तो "प्राणना" या नावाने ओळखला जातो. विशिष्ट अर्थी प्राण हा प्राण, अपान, समान, उदान व व्यान या वेगवेगळ्या नावांनी ओळखला

जातो. ही नावे प्राणशक्तीच्या विविध कार्यांनुसार दिली जातात. विशिष्ट प्राणांचे गुणधर्म म्हणजे उच्चार होय. सूक्ष्म प्राण हा वर्ण या गुणधर्माने युक्त आहे. त्याचा विचार स्वतंत्रपणे केला जाईल.

उच्चाराची प्रक्रिया ही प्राणधारणा म्हणजेच प्राणाच्या विविध अंगांवर विशिष्ट तऱ्हेने लक्ष एकाग्र करणे होय.

विविध प्राणांवर लक्ष केंद्रित करून विविध "आनंद" अनुभवता येतात. ज्यावेळेला चित्त केवळ प्रमात्यावर स्थिर होते त्यावेळेला "**निजानंदाचा**" अनुभव येतो. ज्यावेळेला चित्त अनुभवावयाला येणाऱ्या विषयांच्या अभावावर स्थिर होते त्यावेळेला जो आनंद अनुभवावयाला येतो त्याला "**निरानंद**" असे म्हणतात. ज्यावेळेला प्राण आणि अपान या दोघांवर मिळून लक्ष एकाग्र केले जाते त्यावेळेला अनुभवावयाला येणाऱ्या आनंदाला "**परानंद**" असे म्हणतात. ज्यावेळेला सर्व अनुभवावयाला येणाऱ्या वस्तूंचे एकीकरण करणाऱ्या समानवायूवर चित्त एकाग्र केले जाते त्यावेळेला "**ब्रह्मानंदा**"चा अनुभव येतो. ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्याचे चित्त सर्व ज्ञान आणि ज्ञेय आत्म्यात विरघळवून उदानावर स्थिर होते त्यावेळेला त्याला जो आनंद अनुभवावयाला येतो त्याला "**महानंद**" असे म्हणतात. ज्यावेळेला चित्त व्यानावर स्थिर होते त्यावेळेला अनुभवावयाला येणाऱ्या आनंदाला "**चिदानंद**" असे म्हणतात.

या सहा आनंदांच्या अनुभवानंतर ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्याला त्याच्या प्राणशक्तीच्या पूर्णत्वाची जाणीव होते त्यावेळेला त्याला "**जगदानंदा**"चा अनुभव येतो. या जगदानंदात कोणत्याही प्रकारचा भेद किंवा संकुचितत्व नसते; कारण तो पुढे, मागे व सगळीकडे पसरलेला असतो. या स्थितीत स्वतःला ज्ञान व ज्ञानाच्या साधनात व्यक्त करणारे चैतन्य त्याच्यात असते. जगदानंद हा पूर्ण स्वातंत्र्याच्या आनंदरूप अमृताद्वारा स्वतःला पसरवितो आणि त्याच्यात ध्यानाची कोणतीही आवश्यकता नसते.

ही पूर्ण प्रक्रिया उच्चारयोग अथवा प्राणयोग म्हणून ओळखली जाते. ज्यावेळेला हा योग पूर्णपणे विकसित होतो त्यावेळेला खालील वैशिष्ट्ये परिणाम म्हणून व्यक्त होतात - (१) आनंदाचा अनुभव, (२) उद्भव म्हणजे एक प्रकारची आतली उडी, (३) कंप म्हणजे थरथर कापणे, (४) निद्रा म्हणजे ज्यात बाकीच्या बाह्य वस्तूंबद्दल साधकभक्तयोगिशिष्य झोपेत असतो आणि (५) घूर्णी किंवा आनंदाने गोलगोल फिरणे ही पाच वैशिष्ट्ये आहेत.

हा प्राणयोग पूर्णपणे प्राणायामाहून वेगळा आहे. त्यात केवळ प्राणांवर

संयम ठेवला जातो. हे पुढे पाहवयाला मिळेलच.

### (३) वर्ण

याचा आधीच असा उल्लेख केलेला आहे की, "प्राण" हा दोन अर्थांनी वापरला जातो. एक म्हणजे सामान्य किंवा सूक्ष्म प्राण आणि दुसरा म्हणजे विशिष्ट प्राण होय. आपण असे पाहिले आहे की, उच्चार हा प्राणाचा नैसर्गिक गुणधर्म आहे. आपण या आधी विविध प्राणांवर चित्त स्थिर करून आणवयोग कसा करता येतो हेही पाहिले आहे. आता आपण हे पाहणार आहोत की, सामान्य प्राणाच्या उच्चाराशी संबंधित होऊन साधकभक्तयोगिशिष्य आणवयोगाचे कसे आचरण करतात? श्रीअभिनवगुप्तपादाचार्य या विषयी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात असे म्हणतात की -

**उक्तो य एष उच्चारस्तत्र योऽसौ स्फुरन् स्थितः।**
**अव्यक्तानुकृतिप्रायो ध्वनिर्वर्णः स कथ्यते।।५.१३१।।**

**अर्थ :-** या सामान्य प्राणाच्या उच्चारापासून ज्ञानेंद्रियांनी न समजणारा व ज्याचा उच्चार करता येत नाही असा एक ध्वनी कंप पावतो त्यालाच वर्ण असे म्हणतात.

"**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**नास्योच्चारयिता कश्चित्प्रतिहन्ता न विद्यते।**
**स्वयमुच्चरते देवः प्राणिनामुरसि स्थितः।।**

**अर्थ :-** कोणीही या ध्वनीचे स्वतःच्या इच्छेने उच्चारण करू शकत नाही अथवा कोणीही त्याचे उच्चारण थांबवू शकत नाही.

श्रीअभिनवगुप्तपादाचार्य याविषयी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात असे म्हणतात की -

**एको नादात्मको वर्णः सर्ववर्णविभागवान्।**
**सोऽनस्तमितरूपत्वादनाहत इहोऽदितः।।६।१२१६।।**

**अर्थ :-** सर्व वर्ण अविभक्त स्वरूपात धारण करणारा एकच नादरूप वर्ण आहे. त्याचा अस्त कधीच होत नसल्याकारणाने त्याला "**अनाहतनाद**" असे म्हटले आहे.

श्रीजयरथ या कारिकेवरील टीकेत असे म्हणतात की -

**सर्ववर्णाविभागस्वभावत्वादव्यक्तप्रायो योऽसावनाहतरूपो नादः स वर्णोत्पत्तिनिमित्तत्वाद्वर्ण उच्यते वर्णशब्दाभिधेयो भवेदित्यर्थः।।**

**अर्थ :-** या अव्यक्त व उच्चार न होणाऱ्या अनाहतनादामध्ये सर्व वर्ण

अविभक्त रूपात स्थित असतात. तो वर्णांना निर्माण करतो म्हणून "वर्ण" या नावाने ओळखला जातो अर्थात् "वर्ण" या शब्दाने अभिधेय होतो.

या अनाहतनादाचे अनुसंधान करणे अर्थात् त्याचे तीव्रपणे सतत स्मरण करणे किंवा जाणीव ठेवणे म्हणजेच वर्णयोग अथवा ध्वनियोग होय. तो योगाचा खूप जुना प्रकार आहे. "**श्रीयोगतारावली**" या ग्रंथात श्रीमदाद्यशंकराचार्य यालाच "**नादानुसंधान**" असे म्हणतात. काही तंत्रांमध्ये आणि महासिद्धयोगी श्रीगोरक्षनाथांच्या योगपरंपरेमध्ये याला हेच नाव दिलेले आहे. उत्तरप्रदेशातल्या मध्ययुगीन संतांनी म्हणजेच श्रीकबीर आदींनी या वर्णयोगाला "**सुरतिशब्दयोग**" असे नाव दिलेले आहे. श्रीराधास्वामी परिवारातही त्याला "**सुरतिशब्दयोग**" असेच नाव दिलेले आहे.

हा नादात्मक वर्ण कसा आहे? हे आपण कसे जाणावे? याविषयी श्रीअभिनवगुप्तपादाचार्य "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात असे म्हणतात की -

**सृष्टिसंहारबीजं च तस्य मुख्यं वपुर्विदुः।।५.१३२।।**

**अर्थ** :- त्याचे मुख्य शरीर किंवा प्रकार म्हणजे सृष्टिबीज आणि संहारबीज हे होत.

श्रीजयरथ त्याचे प्रमुख प्रकार खालील शब्दात वर्णन करतात.

**प्रधानमभिव्यक्तिस्थानमित्यर्थः।।**

**अर्थ** :- सृष्टिबीज आणि संहारबीज ही त्याची प्रमुख अभिव्यक्तीची स्थाने होत.

सृष्टिबीज आणि संहारबीज म्हणजे काय? "**स**" म्हणजे सृष्टिबीज किंवा उच्छ्वास निर्देशित करणारे गूढ अक्षर किंवा वर्ण होय तर "**ह**" हे संहार बीज किंवा श्वास निर्देशित करणारे गूढ अक्षर होय.

श्रीक्षेमराजाचार्यांनी तिसऱ्या उपायाच्या सत्ताविसाव्या सूत्राच्या टीकेत उल्लेख केलेल्या खालील कारिकेत हा नाद प्रत्येक सजीवाच्या श्वासात कशा प्रकारे स्वतःला व्यक्त करतो याची प्रक्रिया दिली आहे.

**सकारेण बहिर्याति हकारेण विशेत्पुनः।**
**हंसहंसेत्यतो मन्त्रं जीवो जपति नित्यशः।।**
**षट्शतानि दिवारात्रौ सहस्राण्येकविंशतिः।**
**जपो देव्या विनिर्दिष्टः सुलभो, दुर्लभो जडैः।।**

**अर्थ** :- श्वास हा "**सकाराने**" म्हणजे "**स**" असा आवाज करीत बाहेर जातो आणि "**हकाराने**" म्हणजेच "**ह**" असा आवाज करीत परत

आत प्रवेश करतो. (अशा रीतीने) जीव "हंसहंस" असा मंत्रजप अखंडपणे करीत असतो. तो हा जप दिवस व रात्र मिळून एकवीस हजार सहाशे इतक्या वेळेला करतो. हा श्रीगायत्रीचा जप म्हणून निर्देशला आहे. तो ज्ञानीयोग्यांना सुलभ आहे; मात्र जड अथवा अज्ञानी जीवांना दुर्लभ आहे.

**"हंस"** हा मंत्र प्रत्येक श्वास-प्रश्वासाच्या वेळेला प्रत्येक प्राणिमात्राकडून सहज जपला जातो. सर्वसामान्यपणे एका दिवस-रात्रीत याची संख्या एकवीस हजार सहाशे इतकी होते. बाहेर जाणारा आणि आत येणारा श्वास हा जप जीव नैसर्गिकपणे करीत असतो. त्यासाठी याला देहाच्या कोणत्याही भागाकडून कसलेही प्रयत्न करावे लागत नाहीत. त्यामुळे या जपाला **"अजपा-जप"** असे म्हणतात. अजपा-जप म्हणजे कोणीही कसलाही प्रयत्न न करता आपोआप होणारा मंत्राचा जप होय. श्वास व प्रश्वास हे अनुक्रमे **"हम्"** व **"सः"** यांच्या उच्चारांसारखे असल्याकारणाने याला **"हंसमंत्र"** असे म्हणतात. यालाच **"अजपा-गायत्री"** असेही नाव आहे. या मंत्राच्या अनुसंधानामुळे अथवा मानसिक परीक्षणामुळे अथवा या सहज प्रक्रियेच्या जाणीवेमुळे प्राण आणि अपान हे समान पातळीवर येतात आणि मग माकडहाडाच्या खाली साडेतीन वेटोळे घातलेली सुप्त कुंडलिनी शक्ती वरती चढते. त्या वेळेला आनंददायक असे किती तरी आवाज ऐकू येतात; परंतु साधकभक्तयोगिशिष्याने याच स्थूल व मोठ्याने येणाऱ्या नादात मग्न राहू नये. त्याने या नादांकडे दुर्लक्ष केले पाहिजे आणि परानाद म्हणजेच सूक्ष्म अनाहतनादाकडे चित्त एकाग्र केले पाहिजे. या नादावर स्थिरचित्त राहिले असता चित्त विरघळून जाते आणि मग साधकभक्तयोगिशिष्याला विशुद्ध चैतन्याचा अनुभव येतो.

जागृत झालेली कुंडलिनी शक्ती ब्रह्मग्रंथीत प्रवेश करते. मग ती मूलाधारचक्रात शिरते व पुढे पुढे जात ती विष्णुग्रंथी आणि अनाहतचक्र व विशुद्धचक्र यांचा भेद करते. मग ती रुद्रग्रंथीचा व नंतर आज्ञाचक्राचा भेद करते आणि अंती सहस्रारात प्रवेश करते. आता साधकभक्तयोगिशिष्य सहस्रारातून स्रवणाऱ्या अमृताचा स्वाद घेऊ शकतो.

नाडी आणि चक्र हे भौतिक घटक नाहीत. ते प्राणमय कोशात असतात. प्राणमय कोश म्हणजे सूक्ष्म देहातले आवश्यक आवरण होय. केवळ त्यांचा प्रभाव हा मज्जारज्जू व ज्ञानतंतुमंडल यांच्यातून जाणवतो. चक्रे ही प्राणशक्तीची स्थाने आहेत. त्यांना "चक्र" असे म्हटले जाते. याचे कारण म्हणजे त्यांचा आकार चक्रासारखा भासतो. ते प्राणाला शोषतात आणि प्राणमय कोशाला

प्राण देतात आणि प्राणमय कोशातूनच भौतिक देहाला प्राण मिळतो.

"नाद" हा मध्यमा अवस्थेत सूक्ष्म असतो. तो ज्या वेळेला "पश्यंती" अवस्थेत पोहोचतो त्यावेळेला तो ऐकण्याजोगा राहत नाही. साधकभक्तयोगि-शिष्याला जेव्हा ज्योतीचा अनुभव येतो तेव्हा सर्व विकल्प संपतात किंवा शांत होतात आणि त्याला पूर्णाहंता किंवा परमात्मचैतन्याचा अनुभव येतो.

"**हंसः**" हे नादाच्या जीवनाचे चिह्न अथवा प्रतीक असणारे व्यक्त स्वरूप आहे. अनाहतनाद हा त्याच्या अंतर्गत महत्त्वाच्या विषयी प्रणवाचे प्रतीक आहे. या प्रणवाच्या अनुसंधानाने नादाचे सूक्ष्म स्वरूप असणारे योगाचे नऊ प्रकार निर्माण होतात. त्यांना "नऊ नाद" असे म्हणतात. (१) पहिली अवस्था म्हणजे बिंदू ही असून तिला "**अर्धमात्रा**" असेही म्हणतात. त्यानंतरची (२) पहिल्या अवस्थेपेक्षा सूक्ष्म असणारी "**अर्धचंद्र**" ही अवस्था येते. प्रत्येक पुढे येणारी अवस्था ही मागच्या अवस्थेपेक्षा जास्त सूक्ष्म असते. त्यानंतर येणाऱ्या अवस्था म्हणजे (३) **रोधिनी** (४) **नाद** (५) **नादान्त** (६) **शक्ती** (७) **व्यापिनी** (८) **समना** आणि (९) **उन्मना** या होत. "उन्मना" ही चैतन्याची सर्वश्रेष्ठ बाजू आहे. "समना" अवस्थेपर्यंत केवळ आत्मव्याप्ती म्हणजेच परमात्म्याचे ज्ञान अथवा जाणीव असते; परंतु "उन्मना" अवस्थेतच श्रीशिवव्याप्ती म्हणजेच फक्त आत्मज्ञानच नव्हे; तर हे जगत् म्हणजे आत्म्याचे अंगच आहे असे ज्ञान होते.

तिसऱ्या उपायाच्या सातव्या सूत्रात श्रीक्षेमराजाचार्य उन्मनेचा संदर्भ देतात. ते असे म्हणतात की, समनेपर्यंत मायेचा खेळ असतो. उन्मनेच्या पातळीवरच माया पूर्णपणे नष्ट होते. उन्मनेचे आणखी एक नाव म्हणजे "**सहजविद्या**" होय. श्रीक्षेमराजाचार्य त्याच्यासंबंधी खालील मत उद्धृत करतात.

**आत्मव्याप्त्यन्तस्य मोहस्य जयात् उन्मनाशिवव्याप्त्यात्मनः सहज-विद्यायाः प्राप्तिरुक्ता।।**

**अर्थ :-** आत्मव्याप्तीत शेवट होणाऱ्या मोहावर विजय मिळविल्यानंतर श्रीशिवव्याप्तियुक्त उन्मनेची म्हणजेच सहजविद्येची प्राप्ती होते.

या दृष्टीने "**श्रीस्वच्छंदतंत्र**" असे म्हणते की -

"उन्मनास्वरूप सहजविद्येची प्राप्ती साधकभक्तयोगिशिष्याला श्रीशिवव्याप्ती प्राप्त करण्याची कुवत देते व ही श्रीशिवव्याप्ती केवळ आत्मज्ञान होईपर्यंत अस्तित्वात असणाऱ्या मायेचा नाश झाल्यानंतरच होते."

श्रीक्षेमराजाचार्य आणखी असे म्हणतात की, उन्मना अवस्थेपर्यंत पोहोचण्याचा मार्ग म्हणजे शाक्तोपाय जरी असला तरीही तो आणवोपायात सामावलेला आहे; कारण आणवोपायाला शाक्तोपायापर्यंत न्यावेच लागते. या उपायातील १५, २१, २६, ४४ व ४५ ही सूत्रेही शाक्तोपायाचाच संदर्भ देतात.

## (४) करण

आणवोपाय हा बुद्धी, स्थूल प्राण आणि सूक्ष्म प्राण अर्थात् वर्ण यांचा कसा उपयोग करतो? हे याआधी आपण पाहिले आहे. करण म्हणजे देह उपयोगात आणण्याची एक प्रक्रिया होय. "देह" म्हणजे तिन्ही स्थूल, सूक्ष्म व कारण देह होत. करणामध्ये मुद्रा सुद्धा उपयोगात आणता येतात.

येथे सात प्रकारच्या करण प्रक्रिया आहेत. त्यांची नावे अशी आहेत. (१) ग्राह्य, (२) ग्राहक, (३) चित् अथवा संवित्ती, (४) निवेश किंवा संनिवेश, (५) व्याप्ती, (६) त्याग व (७) आक्षेप **(श्रीतंत्रालोक ५.२९)** श्रीजयरथांनी त्यांच्या टीकेत करणांचे मुख्य उद्देश खालील शब्दात दिले आहेत.

**"इह ग्राह्यादिभिः सप्तभिः प्रकारैर्भिन्नं करणं नाम बोधपूर्वकमभ्यासं प्राहुः बोध्यन्यग्भावेन स्वात्मैकताननतामापन्नं बोधमेव कथितवन्तः।।"**

**अर्थ :-** ग्राह्यादि सात प्रकारांनी वेगळे असणारे करण म्हणजे बोधपूर्वक अर्थात् ज्ञानयुक्त अभ्यास होय. बोध्य किंवा ज्ञेय पूर्णपणे नष्ट होऊन स्वात्म्याशी एकरूपता प्राप्त होणे म्हणजेच "बोध" होय.

पहिले चार प्रकार तर पूर्णतः आणवोपायातच येतात. प्रथम सर्व विषयांचे जगत् आत्म्याशी एकरूप करून नंतर ते सर्व चित् अथवा संवित्मध्ये एकत्रित होते व शेवटी त्या सर्वांना परमचैतन्यात स्थिर करणे या गोष्टी पहिल्या चार करणांना रचतात. पहिली क्रिया ग्राह्य किंवा ग्रहण अथवा आकलन होणाऱ्या पदार्थांना ग्राहक म्हणजेच ज्ञानेंद्रियांशी एकरूप करणे या प्रक्रियेने युक्त असते. पुढची प्रक्रिया ग्राह्य व ग्राहक या सर्वांनाच संवित्मध्ये किंवा चितीमध्ये एकरूप करण्याची असते. तिसऱ्या प्रक्रियेत चित् किंवा संवित्मध्ये पूर्णपणे स्थिरावणे याचा समावेश असतो. संवित्मध्ये पूर्णपणे सामावून जाणे म्हणजे संनिवेश होय. संनिवेशामध्ये पदार्थ हा काहीतरी बाहेरचा आहे असा काहीच पत्ता लागत नाही.

ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य परमचैतन्यासह प्रत्येक पदार्थाला व्यापून राहतो त्यावेळेला त्याने **"व्याप्ती"** मिळविली असे म्हणतात. व्याप्ती ही भावनेद्वारा मिळविली जाते. ज्या पातळीवर सर्व प्रयत्न पूर्णपणे सोडून दिले

जातात त्याला त्याग असे म्हणतात. आता परमचैतन्य तीव्रपणे स्थिर होऊन राहते. व्याप्ती आणि त्याग हे शाक्तोपायापर्यंत पोहोचतात. "**आक्षेप**" म्हणजे परमचैतन्याचे सर्व विश्वात प्रक्षेपण होय अर्थात् झेप घेणे होय. ही शांभवयोगाची अवस्था आहे.

सूत्र क्रमांक सोळा आणि पंचवीस हे शांभवयोगाचे संदर्भ देतात.

### (७) स्थान कल्पना

कोणीही व्यक्ती चित्त हे बुद्धी म्हणजेच आंतर प्राण किंवा नादावर स्थिर करू शकत नाही. त्याच्यासाठी अन्य काही आणवोपाय आहेत. ते चित्त बाह्य वस्तूंवर स्थिर करण्याविषयी आहेत.

याविषयी श्रीअभिनवगुप्तपादाचार्य "**श्रीतंत्रसार**" या ग्रंथात असे म्हणतात की -

**अथ बाह्यविधिः स एव स्थानप्रकल्पनशब्देन उक्तः।**
**तत्र त्रिधा स्थानं प्राणवायुः शरीरं बाह्यं च।।**

**अर्थ** :- (आणवोपायाचा) बाह्यविधीच "स्थानप्रकल्पन" या शब्दाने सांगितला जातो. येथे तीन स्थाने आहेत - (१) प्राणवायू, (२) शरीर आणि (३) काहीतरी शरीराच्या बाहेरची वस्तू.

येथे प्राणवायू हा शब्द उच्चाराशी संबधित असणाऱ्या प्राणवायूच्या अर्थापेक्षा वेगळ्या अर्थाने वापरला आहे. उच्चारामध्ये साधकभक्तयोगिशिष्याला आपले चित्त प्राण, अपान, समान, उदान आणि व्यान या प्राणाच्या अंतर्गत अंगांवर स्थिर करावे लागते.

स्थानकल्पनेमध्ये साधकभक्तयोगिशिष्याला नाकातून बाहेर जाणाऱ्या व आत येणाऱ्या प्रश्वास व श्वासरूप प्राणावर चित्त स्थिर करावे लागते. शरीराच्या केंद्रापासून प्राण म्हणजे प्रश्वास बाहेरच्या जागेत बारा अंगुले किंवा बोटे इतके अंतर जातो व त्याच बिंदूपासून अपान म्हणजे श्वास तेवढेच अंतर शरीराच्या आतील केंद्रापर्यंत व्याप्त करतो. हे दोन बिंदू किंवा ही दोन स्थाने "**बाह्य द्वादशान्त**" आणि "**आंतर द्वादशान्त**" या नावांनी ओळखली जातात. या दोन बिंदूंवर चित्त स्थिर करण्याच्या सरावाने चित्तातील विकल्प शांत होऊ लागतात आणि शेवटी साधकभक्तयोगिशिष्याला "आणव समावेश" म्हणजेच आणव प्रक्रियेद्वारे आत्म्यात सामरस्य प्राप्त होते.

या विषयाच्या संदर्भात देहाला "स्थूल देह" असे म्हणतात. देहाहून बाह्य वस्तू म्हणजे मूर्ती, चित्र आदि वस्तू होत. जे आपले चित्त प्राणावरही केंद्रित

करू शकत नाहीत ते या बाह्य वस्तूंवर केंद्रित करू शकतात.

वरती सांगितल्याप्रमाणे साधकभक्तयोगिशिष्याचे अंतिम ध्येय म्हणजे जगत् हे स्वतःचे अंग म्हणून सामावून घेणाऱ्या श्रीशिवचैतन्याची प्राप्ती आहे.

आणवयोग शाक्तयोगापर्यंत आणि शाक्तयोग अंतिमतः शांभवयोगापर्यंत नेऊन पोहोचवितो.

## श्रीशिवसूत्रांमधल्या घटकांचा सारांश

## पहिला विभाग किंवा उन्मेष

(१) आत्म्याचा गुणधर्म म्हणजे आत्मा हा ज्ञान आणि क्रिया यांच्या पूर्ण स्वातंत्र्याने गुणधर्मित झालेले आधारभूत चैतन्य आहे.

(२) जीव "आणवमल" या नैसर्गिक किंवा स्वाभाविक संकुचित उपाधीमुळे बंधनात पडतो. आणवमल म्हणजे स्वतःच्या यथार्थ स्वरूपाचे अज्ञान होय.

(३) आणवमलाबरोबरच मायीयमल आणि कार्ममल याही जीवाच्या संकुचित उपाधी आहेत. या जीवाला बंधनात टाकण्याला साहाय्यभूत होतात.

(४) आधीच्या सूत्रात सांगितलेल्या तीन संकुचित उपाधी म्हणजे वास्तविक पाहता शब्दांमध्ये मूळ धरलेले संकुचित ज्ञान होय. या उपाधींचा आपल्या जीवनावर खूप प्रभाव पडलेला असतो. हे शब्द "मातृका" या नावाने ओळखल्या जाणाऱ्या वर्णांनी बनलेले असतात. त्यामुळे "मातृका" याच सर्व संकुचित ज्ञानाचा पाया बनतात.

(५) शांभवोपाय अथवा श्रीभैरवांची उत्पत्ती किंवा विश्वोत्तीर्ण चैतन्याचा उदय हा अज्ञानाच्या बेड्यांचे शत-शत तुकडे करतो आणि जीवाला मुक्त करतो.

(६) ज्यावेळेला श्रीभैरवचैतन्य उदित होते त्यावेळेला हे सर्व जगत् श्रीशिवांच्या शक्तीचे व्यक्तस्वरूप भासते आणि ज्यावेळेला साधकभक्तयोगि-शिष्याचे चित्त तीव्र चैतन्यासह या शक्तीशी समरस होते त्यावेळेला हे जगत् चैतन्याशिवाय काहीतरी वेगळे आहे हा विचार नष्ट होतो. सहावे सूत्र हे शांभवचैतन्याचा परिणाम आणि त्या चैतन्याला शाक्तोपायाने अधिक मजबुती देणे या दोन्ही गोष्टी दाखविते.

(७) ज्यावेळेला तेजातून श्रीभैरवचैतन्याचा उदय होतो आणि शक्ति-संधानाद्वारा तो अधिक मजबूत होतो त्यावेळेला अत्यानंद उत्पन्न करणारा (चौथ्या) तुरीय अथवा विश्वोत्तीर्ण चैतन्याचा आनंद जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या तीनही अवस्थांमध्येही एक ठळक व अखंडित स्वरूप बनतो. तो

आनंद ध्यानातच असतो असे नाही; तर सामान्य व रोजच्या व्यवहारातही तो तुरीय चैतन्याचा आनंद सतत राहतोच.

(८) जागृतअवस्थेतील ज्ञान हे बाह्य ज्ञानेंद्रियांनी मिळविलेले आणि सर्व विषयांना समान असे असते.

(९) स्वप्नावस्थेत फक्त स्वप्न पाहणाऱ्याशी संबंधित असणाऱ्या चित्ताने कल्पना किंवा आभास आणि दिवास्वप्नाच्या रूपात निर्माण केलेले अनुभव सामावलेले असतात.

(१०) गाढ निद्रा ही पूर्ण बेसावधपणाची अवस्था आहे. झोपेची ही अवस्था म्हणजे मायेने आणलेली भ्रमावस्था होय. वरील तीनही अवस्था या सामान्य मनुष्य आणि साधकभक्तयोगिशिष्य या दोघांच्याही दृष्टिकोनातून विचारात घेता येतील.

(११) जो परमचैतन्याच्या आनंदाचा अनुभव तीनही चैतन्याच्या अवस्थांमध्ये घेतो तो त्याच्या इंद्रियांचा स्वामी बनतो.

(१२) अशा प्रकारचा साधकभक्तयोगिशिष्य हा त्याच्या परमतत्त्वाच्या प्राप्तीच्या चढावाच्या मार्गात अनेक आनंददायक आश्चर्यांनी युक्त अशा अनेक अनुभवांच्या टप्प्यांमधून जातो.

(१३) ज्या सिद्धयोग्याने श्रीभैरवचैतन्य मिळविलेले आहे त्या सिद्धयोग्याची इच्छा म्हणजेच स्वातंत्र्यशक्ती अर्थात् श्रीशिवांची पूर्ण इच्छाशक्ती होय. ती जगताची सृष्टी आणि विलय करू शकते.

(१४) अशा प्रकारच्या सिद्धयोग्याला आत अथवा बाहेर विषय म्हणून अनुभवावयाला आलेली कोणतीही गोष्ट ही चैतन्याचेच स्वरूप वाटत असते.

(१५) अशा प्रकारचा अनुभव हा सर्व प्रकारच्या सत्यत्वाचा पाया असून केंद्रस्थानी असणाऱ्या परमचैतन्यात प्रत्येक साधकभक्तयोगिशिष्याचे चित्त मिसळून गेल्यावरच येणे शक्य आहे.

(१६) ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य श्रीशिवतत्त्वाशी मानसिकरीत्या एक होतो त्यावेळेला तो श्रीसदाशिवांप्रमाणे जीवाच्या सर्व बंधनातून किंवा संकुचितपणापासून मुक्त होतो.

(१७) श्रीशिव आणि आपण एकच आहोत अशी पूर्ण खात्री पटणे म्हणजेच "स्व" अथवा आत्मज्ञान होय.

(१८) ज्ञानाच्या प्रत्येक लहानशा अंशात सिद्धयोग्याला आत्मचैतन्याच्या आनंदाचा अनुभव येत असतो. त्याच्या सहवासात येणाऱ्यांमध्येही या आनंदाचे

संचरण होत असते.

(१९) इच्छाशक्तीशी समरस झाल्यानंतर सिद्धयोगी त्याला हवा तसा देह तयार करू शकतो.

(२०) सिद्धयोगी त्याचे चैतन्य शक्तीशी मिळवून दोन तुकड्यांना पूर्णपणे जोडू शकतो अथवा त्यांना वेगळे करू शकतो. त्याचप्रमाणे अवकाश व कालामध्ये ज्या घटना दूरपर्यंत नेलेल्या असतात त्या घटना आदींना एकत्र करू शकतो.

(२१) ज्यावेळेला इच्छाशक्तीबरोबर एकत्र झाल्याने सिद्धयोगी परमात्म-चैतन्य प्राप्त करण्याची इच्छा करतो त्यावेळेला तो शुद्धविद्या म्हणजेच उन्मनाशक्तीमध्ये स्थिर होतो आणि आपण जणूकाही सर्व जगताचे अधिपती आहोत अशी जाणीव त्याला होत असते.

(२२) पराशक्ती ही तिच्या खोलीच्या पारदर्शकतेच्या दृष्टिकोनातून एखाद्या तलावाप्रमाणे असते. ज्यावेळेला जीव अथवा साधकभक्तयोगिशिष्य तिच्याशी एकरूप झालेला असतो म्हणजेच ज्यावेळेला त्याला पराशक्ती व आपण एकच आहोत याची अखंड जाणीव होत असते त्यावेळेला त्या साधकभक्तयोगिशिष्याला महान् मंत्राच्या सामर्थ्याची कल्पना येते. त्या मंत्रसामर्थ्याचा अनुभव घेणे म्हणजेच परमचैतन्याने आपला स्वतःचा आत्मा स्पंदित होत असल्याचा अनुभव घेणे होय. हा आत्माच सर्व मंत्रांची क्रियाशील उत्पत्ती होय म्हणजेच सर्व मंत्र त्याच्यापासून आपले सामर्थ्य प्राप्त करतात.

## दुसरा विभाग किंवा उन्मेष

(१) ज्यावेळेला चित्त सतत परमतत्त्वाच्या मंत्रावरच स्थिर होते म्हणजेच परमात्म चैतन्यावरच स्थिर होते त्यावेळेला त्याचे स्वरूप साधकभक्तयोगि-शिष्याला कळून येते म्हणजेच चित्त स्वतःच तो मंत्र होते. त्यानंतर तो मंत्र म्हणणारा व मंत्र यांच्यामध्ये कोणताही फरक राहत नाही. शाक्तोपाय ही ज्ञानाची प्रक्रिया आहे. सत्य अशा आत्मचैतन्याच्या ज्ञानाच्या अखंड स्मरणामुळे अथवा जाणिवेमुळे साधकभक्तयोगिशिष्याचे चित्त स्वतः आत्मचैतन्यच बनून जाते. अशा प्रकारे त्याला पूर्ण ज्ञान होते.

(२) तीव्र व सतत केलेल्या प्रयत्नांमुळेच साधकभक्तयोगिशिष्याच्या चित्ताचे आणि मंत्रात अंतर्निहित असणाऱ्या देवतेचे सामरस्य होते.

(३) विद्याशरीर हा सामासिक शब्द आहे. याचा अर्थ शब्दराशी अथवा मंत्रांचा समूह असा आहे. शब्दसमूहाची सत्ता ही जगतापासून अभिन्न असणाऱ्या

परमात्मचैतन्यात असते. त्यामुळे मंत्रांचे रहस्य म्हणजे आपल्यामध्ये जगताला सामावून घेणाऱ्या परमात्मचैतन्याशी होणारे चित्ताचे सामरस्य होय. जर साधकभक्तयोगिशिष्याचे मन मायिक संकुचित सामर्थ्यामध्ये म्हणजेच सिद्धी-मध्येच समाधानी झाले तर तो मंत्राच्या श्रेष्ठ ध्येयापासून खाली येतो व त्याचे अधःपतन होते; कारण या मायिक सिद्धी म्हणजे सामान्य व खालच्या प्रतीच्या ज्ञानाच्या स्वरूपाच्या असतात आणि स्वप्नाप्रमाणे भ्रामक असतात. मंत्राचे ध्येय आणि पर्यायाने शाक्तोपायाचे ध्येय हे कमी दर्जाची शक्ती मिळविणे नसून जगत् स्वतःमध्ये धारण करणारे श्रीशिवचैतन्य मिळविणे हे आहे.

(४) ज्यांच्या बाबतीत अहंविमर्शरूपी मंत्रसामर्थ्य निर्माण होत नाही त्यांना अनाहतनादादि क्षुद्र सिद्धींचा मोह पडतो. पण या सिद्धी भ्रम आहेत. मंत्राचे किंवा शाक्तोपायाचे उद्दिष्ट असल्या सिद्धी नसून श्रीशिवांची विश्वात्मक विमर्शशक्ती असते.

(५) परमात्मज्ञान उदित झाले असता साधकभक्तयोगिशिष्याला खेचरी मुद्रेची प्राप्ती होते. ही श्रीशिवावस्था आहे.

(६) श्रीसद्गुरू हे मुद्रा आणि मंत्र यांचे सामर्थ्य मिळविण्याच्या कामी साहाय्यकारी होतात; कारण ते ध्येय मिळविण्याचे साधन समजावून सांगत असतात किंवा दिव्य तेज हे योग्य संधी मिळविण्याच्या बाबतीत श्रीसद्गुरूंप्रमाणे काम करते.

(७) सर्व पदे अर्थात् वाचक आणि अर्थ अर्थात् वाच्य हे मातृकांनी युक्त शब्दांमधून तयार होतात अथवा त्यांच्यामधून उत्पन्न होतात. श्रीशिवांच्या परमात्मचैतन्यापासून होणाऱ्या शेवटच्या विश्लेषणापासून मातृकाचक्र उदित होते. हेच मातृकाचक्राचे रहस्य आहे. हेच मातृकाचक्र आपला आत्मा आहे. हे ज्ञात झाल्यावर साधकभक्तयोगिशिष्य मुक्त होतो.

(८) स्थूल, सूक्ष्म आदि सर्व देह हे आधी फसवा आत्मा म्हणून जे सिद्ध झालेले असतात तेच आता यथार्थ आत्मचैतन्याच्या अग्नीत आहुती म्हणून टाकले जातात.

(९) जर **ज्ञान** म्हणजे **संकुचित ज्ञान** असे प्रतिपादन केले तर सूत्राचा अर्थ असा होतो की, संकुचित ज्ञान हे अन्न आहे अर्थात् तेच साधकभक्त-योगिशिष्याच्या द्वारा आत्मसात् केले जाते.

जर **ज्ञान** याचा अर्थ **स्वरूपज्ञान** असा केला तर ज्ञान म्हणजे अन्न होय. ते अन्न समाधान देते आणि या सर्व सूत्राचा अर्थ असा होतो की, स्वरूप-ज्ञान हेच त्याचे अन्न बनते म्हणजेच त्याला सर्वोच्च समाधान देते.


श्रीभास्कराचार्यांनीही त्यांच्या **वार्तिकात** हेच प्रतिपादिले आहे.

(१०) शुद्ध विद्या जर नष्ट झाली तर सर्व प्रकारच्या भेदयुक्त विकल्पांचा उदय होतो.

श्रीभास्कराचार्यांच्या मते या सूत्राचा अर्थ असा आहे की, आत्मज्ञानाचा उदय झाला असता ज्यावेळेला जगतातल्या सामान्य गोष्टींना समान असणारे ज्ञान नष्ट होते त्यावेळेला आधी झालेले विषयांचे भ्रमात्मक ज्ञान हे एखादे स्वप्न पाहण्याप्रमाणे लक्षात ठेवले जाते.

## तिसरा विभाग किंवा उन्मेष

(१) जे इंद्रियांच्या अर्थांच्या इच्छेने तीव्रपणे आकर्षिले जाते ते **चित्त** होय. चित्तातले घटक म्हणजे बुद्धी, चित्त आणि अहंकार हे होत. वैयक्तिक बाबतीत सांगावयाचे झाल्यास चित्त हाच ज्ञाता अथवा आत्मा असतो. चित्ताला आत्मा म्हटले जाते; कारण सत्त्व, रज आणि तम या त्रिगुणांच्या साहाय्याने तो एका जन्मातून दुसऱ्या जन्मात फिरत असतो. "**अतति इति आत्मा।।**" अर्थात् "जो फिरत असतो तो आत्मा होय."

(२) या अणूचे ज्ञान जीवाच्या मनोसाधनांपर्यंत मर्यादित असते आणि त्याच्या इच्छा या इंद्रियविषयांच्या आनंदाशी जोडलेल्या असतात. त्यांच्या प्रभावाखाली तो एका स्वरूपातून किंवा देहातून दुसऱ्या स्वरूपात किंवा देहात हिंडत असतो.

(३) मानवाला बंधन हे बहुतकरून मायेमुळे असते. या संदर्भात माया म्हणजे खरा आत्मा आणि कला अर्थात् किंचित् कर्तृत्व, राग अर्थात् आसक्ती, विद्या अर्थात् मर्यादित ज्ञान, स्थूल व सूक्ष्म आत्मा यांच्यात भेदा-भेद करण्याची कुवत नसणे होय.

(४) साधकभक्तयोगिशिष्याने तत्त्वांच्या समरसीकरणाचे ध्यान करावे म्हणजेच आधीचे तत्त्व पुढच्या तत्त्वात श्रीशिवतत्त्वापर्यंत एकरूप करावे. उदाहरणार्थ स्थूल देह सूक्ष्म देहात, सूक्ष्म देह कारण देहात व पुढे सर्वात शेवटी सर्वांचा श्रीशिवतत्त्वात लय करून श्रीशिवतत्त्वाचे ज्ञान करून घ्यावे.

(५) प्राणायाम, प्रत्याहार, धारणा इत्यादींच्या साहाय्याने साधकभक्तयो-गिशिष्य प्राण व अपान यांचा सुषुम्नेत लय करण्याचे सामर्थ्य मिळवू शकतो. तो पाणी, पृथ्वी आदि तत्त्वांवर प्रभुत्व गाजवू शकतो, तत्त्वांपासून मन मागे घेऊ शकतो आणि तत्त्वांपासून स्वतःला वेगळेही करू शकतो.

(६) प्राणायाम, धारणा इत्यादींच्या साहाय्याने साधकभक्तयोगिशिष्य तत्त्वांवर असामान्य सिद्धी मिळवू शकतो; परंतु अशा सिद्धी मोहामुळे उत्पन्न

झालेल्या असतात. तो मोह खऱ्या तत्त्वावर पडदा ओढतो. या हठयोगादि साधनांनी त्याला सत्य वस्तूची प्राप्ती होत नाही.

(७) ज्यावेळेला मायेवर पूर्णपणे विजय मिळविला जातो त्यावेळेला जीवाचे श्रीशिवांशी सामरस्य आहे असे दाखवून देणारी सहजविद्या प्राप्त होते.

(८) जो उन्मना अवस्थेत स्थिर झाला आहे व तिच्याशी एकरूप झालेला आहे त्याला हे जगत् म्हणजे त्याच्या प्रकाशाचा एक किरण आहे असे भासते. त्याच्या बाबतीत द्वैत पूर्णपणे संपलेले असते.

(९) आत्मा हा जणू जगद्रूप रंगभूमीवरचा अभिनेता अर्थात् नर्तक असतो. तो जी जी पात्रे रंगवितो त्यांचा त्याच्यावर काहीही परिणाम होत नाही.

(१०) अंतरात्मा म्हणजेच सूक्ष्म देह हा जगन्नाट्यातल्या नर्तकाची रंगभूमी असतो.

(११) साधकभक्तयोगिशिष्याची इंद्रिये अंतर्मुख झालेली असतात आणि अशा प्रकारे ती जगन्नाट्याचे प्रवर्तन करण्यात आनंद मानणाऱ्या अंतरात्म्याचे नाटक पाहत असतात.

(१२) ज्याप्रमाणे एखादा अभिनेता सत्त्व म्हणजेच आपली आतली मानसिक अवस्था आपल्या अभिनयकौशल्याच्या जोरावर अभिनीत करू शकतो त्याचप्रमाणे साधकभक्तयोगिशिष्य आपल्या उच्च आध्यात्मिक बुद्धिमत्तेच्या जोरावरच सत्त्वाची म्हणजे आतल्या तेजाची अभिव्यक्ती करू शकतो.

(१३) अशा प्रकारचा साधकभक्तयोगिशिष्य जगताला जाणून घेण्याचे आणि त्याच्यावर ताबा ठेवण्याचे संपूर्ण स्वातंत्र्य मिळवितो.

(१४) ज्याप्रमाणे साधकभक्तयोगिशिष्य त्याच्या शरीरात स्वातंत्र्याची अभिव्यक्ती करू शकतो त्याचप्रमाणे इतरत्रही करू शकतो.

(१५) पराशक्ती ही सर्व जगताचा मुख्य स्रोत असून त्या पराशक्तीकडे साधकभक्तयोगिशिष्याने आपले लक्ष केंद्रित केले पाहिजे.

(१६) जर साधकभक्तयोगिशिष्य दृढपणे पराशक्तीत स्थिर झाला तर तो अगदी सहजपणे आत्म्याच्या परानंदात गढून जातो. त्याच्यासाठी त्याला एकाग्रता, ध्यान आदींची आवश्यकता राहत नाही.

(१७) सिद्धयोगी शुद्ध विद्येत प्रस्थापित होऊन त्या चैतन्याच्या सामर्थ्याच्या मोजमापाशी योग्य त्या प्रमाणात वस्तू निर्माण करू शकतो.

(१८) जोपर्यंत शुद्ध विद्या जागृत आहे तोपर्यंत सिद्धयोग्याला दुसरा जन्म असत नाही.

(१९) ज्याने शुद्ध विद्या प्राप्त केलेली आहे अशा सिद्धयोग्याने बेसावध

राहू नये. जर तो सावध राहिला नाही तर त्याला सामान्य जीवाप्रमाणे शब्दांच्या मागे असणाऱ्या देवता भ्रमित करू शकतात.

(२०) चौथी किंवा तुर्यावस्था ही बाकीच्या तीनही म्हणजेच जागृत, स्वप्न आणि सुषुप्ती या अवस्थांना नेहमी व्यापत असते. याकरिता ज्याप्रमाणे तेल त्याच्या आधाराला हळूहळू व्यापून टाकते त्याप्रमाणे सिद्धयोग्याने सर्व अवस्थांच्या प्राथमिक अवस्थेत तुर्यावस्थेने तर व्यापले पाहिजेच; पण अंतिम अवस्थेतही व्यापले पाहिजे.

(२१) देहाच्या कल्पनांचा म्हणजे देहच आत्मा आहे या विचारांचा त्याग करून साधकभक्तयोगिशिष्याने चौथ्या अवस्थेत विकल्पांशिवाय उडी मारली पाहिजे.

(२२) ज्यावेळेला तुर्य म्हणजेच विश्वाच्या पलीकडील चैतन्याशी एकरूप झालेला प्राण बाहेर पसरतो म्हणजेच तो बाह्य वस्तूंविषयी क्रियाशीलपणे सावध असतो त्यावेळेला तो साधकभक्तयोगिशिष्य प्रत्येक गोष्ट ही चिदानंदासमान आहे असे अनुभवितो.

(२३) ज्यावेळेला सिद्धयोगी हा जागृत्यादि अवस्थांच्या प्राथमिक आणि अंतिम पातळ्यांच्या मध्ये चतुर्थ अवस्थेचा आनंद भोगीत असतो त्यावेळी मधल्या पातळीत कदाचित् चित्ताची खालची अवस्था येऊ शकते. त्यामुळे सिद्धयोग्याने याविषयी सावध राहावे आणि मधल्या अवस्थाही तुर्यावस्थेने व्याप्त होतील असे पाहावे.

(२४) ज्यावेळेला सिद्धयोगी त्याचे आत्मचैतन्य इतर सर्व वस्तूंशी जोडतो म्हणजेच प्रत्येक गोष्ट त्याला आत्मचैतन्य म्हणून प्रतीत होते त्यावेळेला एखादा पडदा मध्ये येऊन दिसेनासे झालेले विश्वोत्तीर्ण चैतन्य पुनरुज्जीवित होते.

(२५) ज्यावेळेला तुर्यावस्थेच्या सतत स्मरणामुळे सिद्धयोगी तुर्यातीत अवस्थेची प्राप्ती करून घेतो त्यावेळेला तो श्रीशिवांसमान होतो.

(२६) जोपर्यंत प्रारब्ध कर्मांचा नाश होत नाही तोपर्यंत देहात राहून सिद्धयोगी जे जे करतो ते ते त्याचे व्रतच असते.

(२७) सिद्धयोग्याचे आत्मचैतन्य म्हणजेच परमात्मचैतन्य असल्याकारणाने सिद्धयोग्याचे प्रत्येक बोलणे हे आत्म्याचा जपच असते.

(२८) सिद्धयोगी आत्मज्ञानाचा सगळीकडे प्रसार करतो. हेच त्याचे दान किंवा भेट होय.

(२९) शक्तिचक्रे ही जीवांवरती नियमन करणारी असतात. अशा शक्ति-

चक्रांवर प्रभुत्व प्राप्त करून सिद्धयोगी सत्यतत्त्वाच्या ज्ञानाबाबतीत इतरांना प्रकाशित अथवा उत्तेजित करण्याला एकटाच समर्थ असतो.

(३०) ज्याप्रमाणे हे जगत् म्हणजे श्रीशिवांच्या शक्तीचे व्यक्त स्वरूप असते त्याप्रमाणेच हा सिद्धयोगी श्रीशिवांसमान असल्याकारणाने हे जगत् म्हणजे त्याच्या आत्मचैतन्यशक्तीचे व्यक्त स्वरूपच असते.

(३१) या जगताचे पालन व त्याचा लय हेही त्या सिद्धयोग्याच्याच चैतन्यशक्तीचे व्यक्त स्वरूप आहे.

(३२) जरी वैषयिक गोष्टी किंवा वस्तू दिसण्याच्या स्वरूपात बदल झाला तरीही अनुभवाच्या कर्त्यामध्ये कोणताही बदल होत नाही; कारण बदलाच्या अनुभवाचाही अनुभव घेणाऱ्याची म्हणजे प्रमात्याची आवश्यकता असते.

(३३) अशा प्रकारच्या सिद्धयोग्याला सुखदु:खे ही काहीतरी नीलघटादीं-सारखी बाह्य अर्थात् बाहेरची किंवा वेगळी वाटतात. ती त्याला त्याच्या चैतन्याचे अंग वाटत नाहीत. त्यामुळे त्या सुखदु:खांचा त्याच्यावर कोणताही परिणाम होत नाही.

(३४) कोणत्याही सुखदु:खांच्या संस्कारांचा स्पर्श न झालेला सिद्धयोगी **केवली** म्हणून ओळखला जातो. **केवली** म्हणजेच असा सिद्धयोगी की, जो केवळ आत्मचैतन्याचाच ज्ञाता असतो.

(३५) परंतु ज्यावेळेला प्रमाता हा अज्ञानाच्या प्रभावाखाली असतो आणि त्याला त्याच्या खऱ्या स्वरूपाची जाणीव नसते त्यावेळेला तो कर्मांचा विषय होतो आणि संसारात बांधला जातो.

(३६) ज्यावेळेला सिद्धयोग्याला आत्मज्ञान हे देह, प्राण आदींकडून वेगळे आहे हे समजते व त्यामुळे तो सर्व भेदज्ञान नष्ट करतो आणि त्याच्यात आत्मज्ञानाचा शुद्ध चैतन्य म्हणून उदय होतो त्यावेळेला तो त्याच्या इच्छेला येईल तशी सृष्टी निर्माण करू शकतो.

(३७) सिद्धयोग्याचे सृष्टिसामर्थ्य एखाद्याच्या स्वप्नात होणाऱ्या काल्पनिक कृतींवरून तर्काने जाणले जाऊ शकते.

(३८) जागृत, स्वप्न आणि सुषुप्ती या तीनही अवस्थांमध्ये साधकभक्त-योगिशिष्य स्वत:ला या तीनही अवस्थांची प्रमुख उपाधी असलेल्या क्रियाशील विश्वोत्तीर्ण आनंदाने आनंदित करू शकतो.

(३९) ज्याप्रमाणे आंतरिक मानसिक अवस्था तुर्य अथवा विश्वोत्तीर्ण चैतन्याने भरल्या जातात त्याचप्रमाणे साधकभक्तयोगिशिष्याने बाह्य वस्तूही

त्याच चैतन्यानंदाने भराव्यात.

(४०) जे संकुचित जीव स्वत:ला आत्मा म्हणून ओळखू शकत नाहीत; परंतु आणवमलामुळे स्थूल अथवा सूक्ष्म देहालाच आत्मा समजत असतात ते विविध वस्तूंच्या इच्छेने प्रेरित होत असतात आणि ते जीव बहिर्मुख होऊन एका जन्मातून दुसऱ्या जन्मात फिरत राहतात.

(४१) जो तुर्यावस्थेत अर्थात् विश्वोत्तीर्ण चैतन्यात स्थिर होतो त्या साधकभक्तयोगिशिष्याच्या सर्व अहंकारयुक्त इच्छा नष्ट होतात आणि त्यानंतर सूक्ष्म व स्थूल देहाला बांधलेली त्याची संकुचित जीवावस्था संपते व आता तो चित्प्रमाता अर्थात् सिद्धयोगी म्हणून ओळखला जाऊ लागतो.

(४२) इच्छा अथवा वासनांची समाप्ती झाल्यानंतर संकुचित व सूक्ष्म-देहाला मी म्हणून समजणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याचे जीव म्हणून जगणे संपते. तो त्याचे बाह्य शरीर हे केवळ बाह्य आवरण म्हणून ठेवतो. दिव्य आत्मचैतन्याची प्राप्ती झालेला तो सिद्धयोगी आता श्रीशिवच असतो.

(४३) आत्मज्ञान झाल्यानंतरही सिद्धयोग्याला परमात्म्याच्या स्वातंत्र्य-शक्तीतून उत्पन्न झालेल्या प्राणाशी स्थूल देह संबंधित असल्याकारणाने स्थूल देह तसाच ठेवावा लागतो. जोपर्यंत प्राणाशी देहाचा असलेला हा संबंध सुटत नाही तोपर्यंत सिद्धयोगीही देह सोडू शकत नाही.

(४४) नासिका किंवा प्राणशक्ती ही पिंगला अर्थात् उजवी नाडी, इडा अर्थात् डावी नाडी व सुषुम्ना म्हणजे मध्य नाडी अशा तीन नाड्यांमधून प्रवाहित होत असते. प्राणाची आंतरिक बाजू म्हणजे **संविद्** होय. मध्य बाजू म्हणजे विश्वोत्तीर्ण आत्म्याची जाणीव होय. या आत्मचैतन्याच्या अखंड स्मरणामुळे जागृत्यादि सर्व अवस्थांमध्ये **निर्व्युत्थान समाधी** लागते.

(४५) आत्मा हा आपले यथार्थ स्वरूप विसरलेला असतो. हा आत्मा आपले ते स्वरूप परत ओळखतो. ज्या सिद्धयोग्याला हे दिव्य, परमात्मचैतन्याच्या स्वरूपाचे ज्ञान होते त्याच्या सर्व भेदभावना मिटतात व त्याला सर्व जगत् श्रीशिवांमध्ये मिसळून गेले आहे असे आतून जाणवते आणि बाहेरून तो सर्व जगत् म्हणजे श्रीशिवस्वरूप आत्मचैतन्याचे व्यक्त स्वरूप आहे असे जाणतो.



।।श्रीगुरुःशरणम्।।

।।ॐ श्रीमद् अमृतमूर्तये शिववामनाय नमः।।

।।ॐ नमः सच्चिदानन्दात्मने।।

# श्रीशिवसूत्रे

## प्रथम उन्मेष
## पहिला अध्याय
## प्रथम विकास

## शांभवोपाय

### ।। मङ्लाचरणम्।।

**श्रीक्षेमराज विमर्शिनी :-**

**रुद्रक्षेत्रज्ञवर्गः समुदयति यतो यत्र विश्रान्तिमृच्छेद्**
**यत्तत्त्वं यस्य विश्वं स्फुरितमयमियद्यन्मयं विश्वमेतत्।**
**स्वाच्छन्द्यानन्दवृन्दोच्छलदमृतमयानुत्तरस्पन्दतत्त्वं**
**चैतन्यं शाङ्करं तज्जयति यदखिलं द्वैतभासाद्वयात्म।। १।।**

**अर्थ :-** ज्यापासून श्रीरुद्र अर्थात् प्रमातृप्रमेयमय जगताची सृष्टी, स्थिती व संहारकर्ता आणि क्षेत्रज्ञ अर्थात् श्रीब्रह्मादि देवता व प्राणिमात्र जन्माला येतात तसेच विश्रांतीही घेतात अर्थात् अंती तेथेच जाऊन मिळतात आणि ज्या तत्त्वापासून हे विश्व स्फुरण पावते व ज्या तत्त्वाने हे युक्त आहे असे हे चैतन्यरूप श्रीशांकरतत्त्व सतत विजयी होवो. हे तत्त्व स्वातंत्र्ययुक्त व लहरणाऱ्या आनंदाचा समूह आहे. हे अमृतमय, अनुत्तर व द्वैताचा भास निर्माण करणारे; पण अद्वैतरूप असे अखिल स्पंदतत्त्व आहे. त्याचा जयजयकार असो.।।१।।

ग्रंथकर्त्याने कार्यसिद्धी अर्थात् ग्रंथ निर्विघ्नतेने पूर्ण व्हावा म्हणून श्रीशिव-तत्त्वाचे वस्तुनिर्देशात्मक मंगल केले आहे.

**आसमञ्जस्यमालोच्य वृत्तीनमिह तत्त्वतः।**
**शिवसूत्रं व्याकरोमि गुर्वाम्नायविगानतः।। २।।**

**अर्थ :-** श्रीक्षेमराज विमर्शिनीकार असे म्हणतात की, या सूत्रांवर अनेक वृत्ती किंवा टीका अनेक पंडितांनी केल्या आहेत. त्यातील असमंजसता पाहून श्रीसद्गुरुवाक्यरूप वेदांचे विशेषविज्ञानबलाने अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने मी

श्रीशिवसूत्रांचे तात्त्विक विवेचन करणार आहे.।।२।।

श्रीकैलास पर्वतावर महामाहेश्वर म्हणजे श्रीईश्वराशी एकत्व पावलेले श्रीमान् वसुगुप्ताचार्य राहत होते. ते श्रीशिवाराधनेत अतितत्पर असून श्रीमहेश्वर-कृपेने शक्तिपात प्रक्रियेवर त्यांचे निरतिशय प्रेम होते. यामुळे त्यांनी बौद्धाचार्य श्रीनागबोधिसिद्धांचे आदेश बाजूला सारून श्रीपरमेश्वर-योगिनी-सिद्ध यांच्या संप्रदायाचां अर्थात् परंपरोपदेशाचा स्वीकार केला होता व स्वहृदय परमपवित्र केले होते.

एकदा त्यांना परमदयाळू श्रीशिवांनी स्वप्नात अनुग्रह देऊन त्यांची प्रतिभा जागृत केली. श्रीशिवांचा उद्देश हा होता की, द्वैतदर्शनाने भारावलेल्या या मनुष्यलोकात अर्थात् पृथ्वीवर हा रहस्यसंप्रदाय परंपरोपदेशाने अर्थात् एकाने दुसऱ्यास सांगावा व त्याने तिसऱ्यास सांगावा, अशा रीतीने प्रसृत होणारा असल्याने हा संप्रदाय नष्ट होऊ नये म्हणून श्रीशिव स्वप्नात श्रीवसुगुप्ताचार्यांना असे म्हणाले की, "या पर्वतावरील एका विविक्षित मोठ्या शिळेवर रहस्य अर्थात् तन्मय-वृत्त-विषय आहे. त्याचे तू ग्रहण करून अनुग्रहयोग्य साधकभक्तयोगिशिष्यांना त्याचे ज्ञान दे." सकाळी श्रीवसुगुप्ताचार्यांनी त्या महत् शिळेचा शोध करून व तिला हात लावून पाहताच आपल्याला पडलेले स्वप्न खरे आहे असे त्यांना समजून आले व श्रीशिवागमशास्त्राचा संग्रह ज्यात आहे अशी **"श्रीशिवसूत्रे"** त्यांना मिळाली. नंतर ती उत्तमरीतीने जाणून श्रीभट्टकल्लटाचार्यादि सच्छिष्यांना त्यांनी सांगितली आणि **"श्रीस्पंदकारिका"** यां ग्रंथाच्या द्वारा त्यांचा संग्रह केला. ती **"श्रीस्पंदसूत्रे"** श्रीवसुगुप्तांपासून श्रीसद्गुरुपरंपरेने प्राप्त झालेली **"श्रीस्पंदनिर्णय"** या ग्रंथात स्पष्ट वर्णिली आहेत. येथे श्रीशिवसूत्रे वर्णावयाची अर्थात् सांगावयाची आहेत.

आता अगोदर "माणसे अर्थात् जीवात्मे वेगळे व श्रीईश्वर वेगळा" या प्रतिपक्षवाद्यांच्या विपरीत अर्थात् विरुद्ध आक्षेपाला उत्तर देताना "चैतन्य पारमार्थिकतेने पाहता श्रीशिवच विश्वाचा आत्मा आहेत" असे पहिल्या सूत्राने अर्थात् **"चैतन्यमात्मा।।१.१।।"** या सूत्राने सांगतात.

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

**हिमगिरितनयाकान्तं शशधरकलिकोत्तंसम्।**
**स्थितलयजनिकर्तारं प्रणमत वरदं देवम्।।१।।**

**स्थूलार्थ :-** श्रीपार्वतीपती चंद्रशेखर म्हणजे चंद्र धारण करणाऱ्या जगदुत्पत्त्यादींचे कर्ते, भक्तांना वर देणारे आणि दिव्य प्रकाशक अशा श्रीशिवांना

नमस्कार करा.।।१।।

**सूक्ष्मार्थ :-** अतिस्वच्छ अशा श्रेष्ठ अविनाशी स्थानापासून फुललेल्या, स्वातंत्र्यशक्तीने सुंदर व मोहक जगताला संजीवनी देणाऱ्या, अमा नामक कलेला अर्थात् चंद्रकोरीला भूषण किंवा साधन म्हणून धारण करणाऱ्या, प्रकाशक तसेच जगदुत्पत्त्यादिक्रीडा करणाऱ्या, सृष्टिस्थित्यादि पंचकृत्य-व्यवहार करणाऱ्या व उत्कृष्ट आत्मलाभरूपी वर देणाऱ्या अशा आत्म-स्वरूपात हे साधकभक्तयोगिशिष्यहो! तुम्ही प्रवेश करा.

या श्लोकाच्या पहिल्या पादात शक्तियुक्त स्वरूपाचे प्राधान्य वर्णन करीत सामान्य चित्स्वरूपाचे वर्णन केले आहे.

द्वितीय पादात शाक्त स्वरूपाच्या प्राधान्याने सहजविद्येच्या उदयाचे वर्णन केले आहे. उरलेल्या भागात अर्थात् तृतीय पादात विश्वनाट्याच्या नटनरूपाच्या वर्णनाबरोबर विभूतीचे वर्णन करून प्रकाशत्रयाचे वर्णन अर्थात् विवरण केले आहे.

**नित्योदितनिजाभासस्फुरत्तानिह्नुतात्मने।**
**शिवाय परिपूर्णैकचिद्रूपवपुषे नमः।।२।।**

**अर्थ :-** नित्य उदय पावणारे निजाभासरूप जे स्फुरण त्या स्फुरणाने "स्व"स्वरूपाला झाकून टाकणाऱ्या व पूर्ण चैतन्य हेच ज्याचे शरीर आहे अशा श्रीशिवांना माझा नमस्कार असो. सतत प्रसरण पावणाऱ्या स्फुरत्तेने जरी श्रीशिवस्वरूप झाकले गेले तरी संकुचित अणू अशा आत्मरूपाचे प्रकटन होते. वस्तुतः त्या अवस्थेतही पूर्णसच्चिद्घन भावाचा लोप अथवा हानी होत नाही.।।२।।

याने तृतीय प्रकाशात येणाऱ्या उपक्रम व अभ्यासादींमध्ये दिसणाऱ्या सारार्थसर्वस्वाचे निर्देशन केले आहे.

**श्रीमन्महादेवगिरौ वसुगुप्तगुरोः पुरा।**
**सिद्धादेशात्प्रादुरासन् शिवसूत्राणि तस्य हि।।३।।**

**अर्थ :-** श्रीकैलासपर्वतावरील एका विविक्षित शिलाखंडावर सद्गुरू श्रीवसुगुप्ताचार्यांच्या पुढ्यात सिद्धाच्या आदेशाप्रमाणे ही "**श्रीशिवसूत्रे**" प्रादुर्भूत झाली.।।३।।

**सरहस्यान्यतः सोऽपि प्रादाद्भट्टाय सूरये।**
**श्रीकल्लटाय सोऽप्येवं चतुःखण्डानि तान्यथ।।४।।**
**व्याकरोत्त्रिकमेतेभ्यः स्पन्दसूत्रैः स्वकैस्ततः।**

**तत्त्वार्थचिन्तामण्याख्यटीकया खण्डमन्तिमम्।।५।।**
**एवं रहस्यमप्येष मातुलेयाय चावदत्।**
**श्रीमत्प्रद्युम्नभट्टाय सोऽपि स्वतनयाय च।।६।।**
**श्रीमत्प्रज्ञार्जुनाख्याय प्रादात्सोऽप्येवमावदत्।**
**श्रीमहादेवभट्टाय स्वशिष्यायाप्यसौ पुनः।।७।।**
**श्रीमच्छ्रीकण्ठभट्टाय प्रददौ स्वसुताय च।**
**तस्मात्प्राप्य करोम्येष सूत्रवार्तिकमादरात्।।८।।**
**दैवाकरिर्भास्करोऽहमन्तेवासिगणेरितः।**
**यस्मादागमविभ्रंशाद्भ्रान्तेर्भ्रमितबुद्धयः।।९।।**
**सुकुमारा अतस्तानि सूत्राणि विवृणोमि च।।९.५।।**

**अर्थ :-** श्रीवसुगुप्ताचार्यांनी गुप्तरहस्यांनी युक्त अशी ही सूत्रे विद्वान् श्रीभट्टकल्लटाचार्यांना सांगितली. श्रीभट्टकल्लटाचार्यांनी या सूत्रांची चार खंडात विभागणी करून त्यावर "**श्रीस्पंदसूत्रे**" रचली व अंतिमखंडावर "**श्रीतत्त्वार्थ-चिंतामणी**" नामक टीका लिहिली आणि रहस्यासह हा सर्व विषय आपल्या मातुलपुत्राला म्हणजे श्रीप्रद्युम्नभट्टाचार्यांना शिकविला. हा विषय श्रीप्रद्युम्नभट्टा-चार्यांनी आपल्या श्रीप्रज्ञार्जुन नामक पुत्राला शिकविला. त्यांनी श्रीमहादेवभट्टा-चार्य नामक स्वशिष्याला हा विषय समजाविला. श्रीमहादेवभट्टाचार्यांनी स्वपुत्र श्रीकंठभट्टाचार्याला हे शिकविले. श्रीकंठभट्टाचार्यांपासून मला अर्थात् श्रीदिवा-करोपाह्वभास्कराला ही विद्या मिळाली. माझ्या शिष्यसमुदायाने मला प्रेरणा दिल्यामुळे मी या सूत्रांवर मोठ्या प्रेमादराने "**वार्तिक**" केले. आगमाचा पुढे पुढे लोप झाला. त्यामुळे भ्रांती उत्पन्न होऊन माणसांची बुद्धी सुकुमार अर्थात् शास्त्रीय विषय ग्रहण करण्याला असमर्थ झाली म्हणून या सूत्रांचे आम्ही विवरण करीत आहोत.।।४-९.५।।

**विवरण :-** आदर्श पुस्तकामध्ये पाहत असताना श्रीसद्गुरुपरंपरेने उपदेशिलेला अर्थ असा दिसतो की, आत्मा हा स्वात्माच श्रीशिव आहेत, हे "**तत्रात्मन्येव शिवता सर्वस्याखण्डिता एव हि।।**" या सूत्रात सांगितले. संसारी जीवाला श्रीशिवत्व कसे? असे जर म्हणाल तर विमोहिनीशक्तीमुळे हे श्रीशिव आच्छादित असल्यासारखे दिसतात; पण वस्तुतः ते आच्छादित नसून नेहमी प्रकाशमान असतात. अन्यथा सर्व व्यवहाराचा छेद होईल. "**सा चास्त्यहन्तेदन्तादि ज्ञानाभासादिनावृता।।**" ही "श्रीशिवता" "अहंता" व "इदंता" इत्यादि ज्ञानाच्या आभासाने झाकलेली आहे. मग हे आच्छादन दूर

कसे होईल? असा प्रश्न कोणाला पडला तर त्याचे उत्तर असे आहे की, त्यासाठी श्रीईश्वरानुग्रहच झाला पाहिजे. या दृष्टीने शास्त्रात असे म्हटले आहे की, "**शक्तिपातवशाद्देवि नीयते सद्गुरुं प्रति।।**" अर्थात् "शक्तिपाताने अर्थात् श्रीईश्वरानुग्रहाने माणूस श्रीसद्गुरूंपर्यंत पोहोचतो." तदनुग्रहाने स्वस्वरूप स्पष्ट होते. तसे झाले म्हणजे सर्वकाही आपल्या ताब्यात राहू शकते. "**स्व-स्वरूपं शिवं साक्षात्।।**" अर्थात् "आपले स्वतःचे स्वरूप हेच साक्षात् श्रीशिव आहेत," असे पुढे सांगितले आहे.

**तत्रात्मन्येव शिवता सर्वस्याखण्डितैव हि।।१०।।**
**सदास्त्यहन्तेदन्तादिज्ञानाभासादिनावृता।**
**तस्यावृतिविनाशाय स्वरूपज्ञप्तये शिवः।।११।।**

**अर्थ :-** सर्व जीवात्म्यांमध्ये श्रीशिवत्व अखंडित अनुस्यूत आहे अर्थात् सामावलेले आहे; पण ते अहंता व इदंता यांनी आवृत आहे. त्या आवरणाचा विनाश करण्यासाठी व स्वरूपाचे ज्ञान करून देण्यासाठी श्रीशिवांनी असे म्हटले आहे की -।।१०-११।।

**विवरण :-** आपला आत्मा हाच चिदात्मा श्रीशिव आहेत. या व्यतिरिक्त आत्मा म्हणजे दुसरे काहीही नसून आदि व अंती तो श्रीशिवच आहे. ही श्रीशिवता स्वानुभवसिद्ध असून ती परिपूर्णपणे लौकिककार्यकारणात्म ऐश्वर्याचा आश्रय करूनच असते. ही श्रीशिवता सर्वांचे विश्रांतिस्थान आहे. ज्यावेळी चिदणूला म्हणजे चैतन्यस्वरूप असलेल्या जीवाला प्रत्यभिज्ञा प्राप्त होते त्यावेळी त्याला आपल्या हृदयात या स्वातंत्र्ययुक्त श्रीशिवतेची अनुभूती येते. मात्र जीव मायेच्या आवरणामुळे व "इदंता" ज्ञानाने आवृत झाल्यामुळे आपली स्व-स्वरूपयुक्त श्रीशिवत्वाची प्राप्ती करून घेऊ शकत नसल्यामुळे या आत्म-स्वरूपप्राप्तीची म्हणजे श्रीशिवशक्तिसामरस्याची प्राप्ती व्हावी अर्थात् या अंतिम स्थितीची अनुभूती यावी अशी जिज्ञासा असणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यां-करिता श्रीशिवांनी दयाळू होऊन क्रमज्ञानपूर्वक ही "**श्रीशिवसूत्रे**" कथन केली आहेत.

**सक्रमज्ञानपूर्वाणि सूत्राण्याह कृपाकुलः।**
**स्वस्वरूपं शिवः साक्षात्तस्योन्मेषनिमेषतः।।१२।।**
**शक्तिप्रसरसङ्कोचनिबद्धावुदयव्ययौ।**
**जगतो ज्ञानदेहस्य कलाचक्रस्य चोद्भवः।।१३।।**
**तत्स्वरूपस्योपन्यासे बह्वयो विप्रतिपत्तयः।**

**संस्थितास्तद्व्युदासार्थं शिवः सूत्रमरीरचत्।।१४।।**

**अर्थ** :- श्रीशिवांनी दयाळू होऊन क्रमज्ञानपूर्वक ही सूत्रे सांगितली आहेत. "स्व"स्वरूप म्हणजे आपले स्वरूप श्रीशिव आहे. त्यांच्या उन्मेष व निमेषामुळे विशुद्ध संविन्मात्ररूपी जगाचे, चिदिच्छादि कलाचक्राचे, श्रीशिवादि तत्त्वपंचकाचे किंवा खेचर्यादि शक्तिप्रसाराचे उत्पत्ती, स्थिती व संहार हे अवलंबून आहेत अर्थात् उन्मेष म्हणजे श्रीशिवांच्या शक्तीचा प्रसार व निमेष म्हणजे श्रीशिवांच्या शक्तीचा संकोच, यांवर सर्व अवलंबून आहे.।।१२-१४।।

**विवरण** :- मंदशक्तिपात झालेल्यांना आणवज्ञानाने, तीव्रमध्यशक्तिपात झालेल्यांना शाक्तज्ञानाने व तीव्रतरशक्तिपात झालेल्यांना शांभवज्ञानाने क्रमशः ऊर्ध्व, ऊर्ध्वतर आणि ऊर्ध्वतम अशा पायरी पायरीने सर्वोर्ध्व पदवीचा व स्थितीचा लाभ होतो अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्याची प्राप्ती होते. अशा जिज्ञासू व अधिकारी साधकभक्तयोगिशिष्यांसाठीच श्रीशिवांपासून या **"श्रीशिवसूत्रांचा"** अवतार झाला आहे.

श्रीशिवसूत्रांच्या या पहिल्या भागात श्रीशिवांनी शांभव उपायाच्या दृष्टीने श्रीशिवस्वरूपाच्या अनुभवाचे स्फुरण कसे होते हे कथन केले आहे.

**"श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र"** या ग्रंथात शांभव उपाय म्हणजे काय हे सांगताना असे म्हटले आहे की -

**अकिञ्चिच्चिन्तकस्यैव गुरुणा प्रतिबोधतः।**
**जायते यः समावेशः शाम्भवोऽसावुदाहृतः।।**

**अर्थ** :- काहीच चिंतन न करणाऱ्या श्रीसद्गुरूंनी ज्ञान दिल्याने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने ज्ञानशक्ती कुंडलिनी उत्थित केल्याने जागृत झालेल्या योग्यात म्हणजे अत्यंत खोल व गंभीर स्वरूपज्ञानाच्या द्वारा निर्विकल्प भावामध्ये स्थिती प्राप्त झालेल्या साधकभक्तयोगिशिष्याला जो भगवदावेश प्राप्त होतो त्याला शांभवोपाय, शांभवमुद्रा किंवा शांभव समावेश असे म्हणतात.

श्रीशिवस्वरूपाच्या बाबतीत पुष्कळ मत-मतांतरे आहेत. त्यांचा निरास करण्यासाठी श्रीशिवांनी **"चैतन्यमात्मा"** हे पहिले सूत्र रचले आहे.

### सूत्र क्रमांक १

**संबंध** :- "मनुष्य व श्रीईश्वर यांच्यात भेद आहे," असे मानणाऱ्यांच्या विरुद्ध "वस्तुतः श्रीशिवचैतन्य हेच सर्व विश्वाचा आत्मा आहे," असे प्रारंभीच्या सूत्रात सांगितले आहे. त्याचप्रमाणे या पहिल्या सूत्रात श्रीशिव कोण आहेत, त्यांचे स्वरूप काय आहे आणि श्रीशिवदर्शनात त्यांचे वर्णन कोणत्या

प्रकारे केले आहे हेही सूचित केले आहे.

**चैतन्यमात्मा।। १।।**

**शब्दार्थ :- चैतन्यम् :-** कुंडलिनी शक्ती. चेतनाचा भाव. चेतन म्हणजे ज्ञान व क्रिया यामध्ये परिपूर्ण स्वातंत्र्य. ज्ञान व क्रिया यांचे स्वातंत्र्य असण्याची अवस्था. **आत्मा :-** श्रीशिव. केवळ वैयक्तिक आत्मतत्त्व नसून स्वभाव अर्थात् स्व म्हणजे "आत्मा" व भाव म्हणजे "शक्ती" नामक अवस्था. सत्ता (Reality).

**अर्थ :-** सर्व प्रकारे ज्ञानक्रियास्वातंत्र्य असलेले श्रीशिव हेच चैतन्य असून हेच आत्मा अथवा सत्ता आहेत अर्थात् चैतन्य म्हणजे कुंडलिनी शक्ती हीच आत्मा आहे म्हणजे ही शक्ती श्रीशिवांशी समवायसंबंधाने, अविनाभावाने, यामलरूपाने, संघट्टपणे, अद्वयपणे आणि अनवच्छेद्यरीतीने एकरसरूप, समव्याप्त व समरस झालेली आहे अर्थात् श्रीशिवशक्ती एकरूप आहेत.।।१।।

**विशेष व्याख्या :-** जेथे चेतना मुख्य असते ते चेतन आहे. या चेतनेचे ज्ञानरूप क्रियेतील स्वातंत्र्य हे चैतन्य आहे. हे स्वातंत्र्य हेच आत्म्याचे अर्थात् चेतनतेचे स्वरूप आहे. चेतनता ही भूः, भुवः व स्वःरूप असून तेच सर्व जगताचे स्वरूप आहे. लौकिक देह, प्राण, पुर्यष्टक म्हणजे सूक्ष्म शरीर, शून्य, बुद्धी, जागृती इत्यादि कोणतीही गोष्ट आत्मा असत नाही. यामुळे या भावरूप आणि अभावरूप जगताचा जो स्वभाव आहे तोच आत्मा आहे. हा आत्मा सर्व प्रकारच्या ज्ञानरूप क्रियांमध्ये स्वतंत्र असतो. त्यामुळे जाणण्याच्या अर्थात् ज्ञानाच्या क्रियेतील स्वातंत्र्य हाच आत्मा आहे.

या दृष्टीने श्रीभट्टभास्कराचार्यांनी आपल्या वार्तिकात असे म्हटले आहे की-

**चैतन्यमात्मनो रूपं सिद्धं ज्ञानक्रियात्मकम्।**
**तस्यानावृतरूपत्वाच्छिवत्वं केन वार्यते।।१५।।**

**अर्थ :-** जाणण्याच्या क्रियेतील स्वतंत्रता हे चैतन्य आत्म्याचे स्वरूप आहे. हे स्वरूप मलत्रयाच्या आवरणाने रहित असल्यामुळे त्याच्या श्रीशिवभावात कोणताही अडथळा येत नाही.।।१५।।

चैतन्य अर्थात् चितिशक्ती म्हणजे कुंडलिनी हीच आत्मा आहे. त्यामुळे चैतन्य म्हणजे कुंडलिनी शक्ती आणि आत्मा म्हणजे श्रीशिव हे दोन्ही राहूचे शीर या कल्पनेप्रमाणे अभेदात्मक किंवा समरस आहेत. वास्तविक पाहता त्यांच्यात कोणताच भेद नाही.

जो चेत्यमान् अर्थात् प्रकाशयुक्त नाही असा कोणताही स्वभाव असू

शकत नाही. कोणाचाही स्वभाव असा असणे शक्य असत नाही व अशी चैतन्यविरहित स्थिती कधीही असणे शक्य नाही. यामुळे चेत्यमान, स्वप्रकाश व चिदेकरस चैतन्यच स्वभाव आहे आणि हा जर सर्व विश्वाचा स्वभाव आहे तर त्याची साधना काय करायची? आणि त्याच्या प्राप्तीकरता उपाय तरी कोणता योजावयाचा? असे असल्यामुळे याकरिता कोणत्याही प्रमाणाची, साधनाची किंवा उपायाची आवश्यकता असत नाही; कारण की, चैतन्य हे सदासर्वदा स्वयंप्रकाश व चिद्रूप असून त्याच्यावर कोणीही आवरण घालू शकत नाही.

"**श्रीत्रिकहृदय**" या ग्रंथात या दृष्टीने असे म्हटले आहे की -

**स्वपदा स्वशिरच्छायां यद्वल्लङ्घितुमीहिते।**
**पदोद्देशे शिरो न स्यात्तथैवं बैन्दवी कला।।**

**अर्थ :-** मनुष्य जो जो आपल्या पायाने आपल्या डोक्याची सावली ओलांडून जाण्याच्या इच्छेने पुढे पुढे जातो तो तो त्याच्या डोक्याची सावली पुढे पुढे जात राहते. हीच गोष्ट बैंदवीकला अर्थात् चिती म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या सबंधी खरी आहे; कारण की, कुंडलिनी शक्तीपासूनच निर्माण झालेल्या बुद्धी इत्यादि कोणत्याही साधनाने तिची अर्थात् तिच्याशी समरस असलेल्या आत्म्याची अनुभूती येणे अशक्य आहे.

या दृष्टीने "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**तेन शब्दार्थचिन्तासु न साऽवस्था न यः शिवः।**
**भोक्तैव भोग्यभावेन सदा सर्वत्र संस्थितः।।३.२९।।**

**अर्थ :-** यामुळे सर्व वाचक अर्थात् जीव आणि वाच्य अर्थात् ज्ञेय अशा पदार्थांच्या संवेदनांची अशी कोणतीही अवस्था नाही की, जी श्रीशिवरूप नाही. खरी स्थिती अशी आहे की, प्रत्येक ठिकाणी भोक्ता अर्थात् भोग घेणारा आत्मा हाच भोग्य अर्थात् भोग घेण्याला योग्य अशा प्रमेय पदार्थांच्या रूपामध्ये उल्हसित किंवा आनंदित होऊन शाश्वतरूपाने राहिलेला आहे.।।३.२९।।

ही स्वस्वरूपाचा विकास करणारी कुंडलिनी शक्तीच स्वातंत्र्य शक्ती आहे. यामुळे श्रीशिवांचे स्पंदतत्त्वरूप चैतन्य हे नेहमीच स्वयंप्रकाश व परमार्थ सत्य आहे.।।१।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

"**चैतन्यमात्मा।।१।।**" अर्थात् "चैतनशक्ती कुंडलिनीच आत्मा आहे," असे श्रीशिवांनी प्रथम सूत्रात कथन केले आहे. अचेतित अर्थात् अप्रकाशित

अशा कोणत्याही वस्तूला अस्तित्व नाही. प्रकाशाहून बाह्य अशी वस्तू वस्तूच असत नाही. चितिक्रिया ही सर्वसामान्यरूप आहे अर्थात् ती सर्वत्र दिसून येते. "**चेतयते इति चेतनः।।**" अर्थात् "चेतवितो म्हणून चेतन होय." हे चेतन तत्त्व सर्व ज्ञान-क्रियांमध्ये स्वतंत्र असते. त्याचा भाव म्हणजेच चेतनाचा भाव म्हणजेच चैतन्य होय.

**चैतन्यमात्मनो रूपं सिद्धं ज्ञानक्रियात्मकम्।**
**तस्यानावृतरूपत्वाच्छिवत्वं केन वार्यते।।**

**अर्थ :-** चैतन्यशक्ती कुंडलिनी ही आत्मरूप म्हणजे श्रीशिवरूपच आहे हे सिद्धच आहे. ही शक्ती ज्ञान व क्रियारूप आहे. तिच्या अनावृत श्रीशिवरूपाचे कोणालाही निराकरण किंवा ते दूर करता येत नाही.

यालाच सर्वज्ञानक्रियामय परिपूर्ण स्वातंत्र्य असे म्हणतात अर्थात् हे चैतन्य सर्व प्रकारच्या ज्ञानात आणि क्रियेत पूर्ण स्वतंत्र असते. असे स्वातंत्र्य केवळ भगवान् परम श्रीशिवांच्या ठिकाणीच आहे. इतर अनाश्रित श्रीशिव-तत्त्वांमध्येही हे परिपूर्ण स्वातंत्र्य नाही; कारण ही तत्त्वे परम श्रीशिवांवर अवलंबून असतात.

**विवरण :- अनाश्रितान्त :-** श्रीशिवांना अनाश्रित असे म्हटले आहे. अनाश्रित श्रीशिव ही शक्तितत्त्वाच्या खालची आणि श्रीसदाशिवतत्त्वाच्या वरची अवस्था आहे. ही केवळ एक अवस्था (stage) आहे. हे कोणत्याही प्रकारचे तत्त्व नाही. हे तत्त्व सत्याच्या त्या पायरीचे निर्देशन करते की, जेथे शक्ती तात्पुरता "स्व"वर पडदा टाकण्याला सुरुवात करते आणि अशा प्रकारे जगत् "स्व"पासून वेगळे होते. यालाच "**अख्याती**" असे म्हणतात. श्रीशिवतत्त्वही परम श्रीशिवांहून कमीच आहे; कारण ते उत्पन्न होते व त्यात अच्छेद्य व अक्लेद्यादि गुण आहेत. त्यामुळे ही तत्त्वे परम श्रीशिवांच्या ताब्यात आहेत. हे श्रीशिव जरी नित्य, व्यापक, अमूर्त इत्यादि अनंत गुणांनी युक्त असले तरीही नित्यत्वादि गुण अन्यत्र म्हणजे आकाश, परमाणू इत्यादि ठिकाणीही संभवतात. त्यामुळे इतरत्र कोठेही सापडत नसलेल्या व दिसत नसलेल्या "स्वातंत्र्य" या गुणाचेच येथे मुख्यत्वाने वर्णन करावयाचे आहे. अशा प्रकारे अन्य धर्मांच्या प्रतिक्षेपामुळे "चैतन्य" हा शब्द भाववाचक नाम म्हणून दाखविला आहे.

श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनी यासंबंधी असे म्हटले आहे की -

**चैतन्यमिति भावान्तः शब्दः स्वातन्त्र्यमात्रकम्।**

**अनाक्षिप्तविशेषं सदाह सूत्रे पुरातने।।१.२८।।**

**अर्थ :-** चैतन्य हा भाववाचक शब्द म्हणजे केवळ स्वातंत्र्य होय आणि तो मागच्या सूत्रात "**अनाक्षिप्त विशेष**" म्हणून सांगितला आहे म्हणजेच इतर कोणताही अर्थ त्यावर आक्षिप्त होत नाही.

"मात्र" शब्दाचा अर्थ "अनाक्षिप्त" असा सांगितला आहे. भावप्रत्यायान्त शब्द हा सहचारिधर्मांची निवृत्ती सांगतो.

याविषयी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**धर्मान्तरप्रतिक्षेपाप्रतिक्षेपौ तयोर्द्वयोः।।**
**सङ्केतभेदस्य पदं ज्ञातृवाञ्छानुरोधतः।**
**भेदोऽयमेव सर्वत्र द्रव्यभावाभिधायिनोः।।**

**अर्थ :-** अन्य धर्मांचा प्रतिक्षेप आणि अप्रतिक्षेप या दोघांच्या संकेत-भेदांचे पद ज्ञात्याच्या इच्छेच्या अनुरोधानुसार असते. हा भेद सर्वत्र "द्रव्यभाव" म्हणून ओळखला जातो.

"**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथातही "**चितिः प्रत्यवमर्शात्मा।।१.५.१३।।**" अर्थात् "चितिशक्ती हीच प्रत्यवमर्शात्मा म्हणजे प्रत्यवमर्शाने युक्त आहे," असे म्हटले आहे. जी चेतवते प्रकाशविते ती चिती होय. तिचा म्हणजेच त्या चिति-क्रियेचा प्रत्यवमर्श म्हणजेच स्वात्मचमत्कार हे लक्षण असणारा आत्मा किंवा स्वभाव होय. स्वात्मा परामर्शिला जात नाही. स्वात्म्यात त्याच्याकडून काहीच प्रकाशविले जात नाही व अखंडपणे काही भासविले जात नाही. त्यामुळे तो प्रकाशित होत नाही असे म्हणतात. चेत्याकडून स्वात्म्यात "अहम्" अर्थात् मी असा संरंभाच्या उद्योगाचा उल्लास विभूतियोगामुळे चमत्कारिला जातो अर्थात् स्वात्मा परामर्शिला जातो. स्वात्म्यातच सर्व प्रकाशित केले जाते. "हा" असा जो परिछेद आहे या एवढ्याच रूपाने विलक्षण भावाने निळे, पिवळे, सुख, दुःख व त्यांचा अभाव आदि असंख्य अवभासयोगाने आभासविले जाते. त्यामुळे चेत्याकडून चेतविले अर्थात् प्रकाशविले जाते, असे म्हणतात.

ते चैतन्य म्हणजेच आत्मा होय. भेदवाद्यांनी मानलेला भिन्नभिन्न स्व-भावाचा दुसरा कोणताही पदार्थ नव्हे. तो भिन्नभिन्न स्वभावाचा पदार्थ चैतन्य-रहित जड असल्यामुळे अनात्मा म्हणवितो. चिदात्म्यात भेद उत्पन्न होत नाही अर्थात् संभवत नाही. देशकाल हे चैतन्यव्यतिरिक्त व अप्रकाश्यमान आहेत म्हणून ते असत् आहेत. चिदात्म्याशी संबंध आल्याने ते चेत्यमान

अर्थात् प्रकाशमानही आहेत म्हणून देशकाल "सत्"ही आहेत. अशा प्रकारे देशकाल हे सत् व असत् अशा दोन्ही प्रकारचे असल्यामुळे येथे भेदाला जागा नाही. मुक्ती मिळण्यापूर्वी भेदरूप मळ असला तरी मुक्तिदशेत त्याचा नाश होतो म्हणून येथे नानात्मवाद जुळत नाही. मलशांतीत किंवा मलावशेषातही हा नानात्ववाद जुळत नाही. अन्यथा मुक्त श्रीशिवरूप जीव हे संसारीच होतील. "**चैतन्यमेव एकात्मा...।।**" अर्थात् "चैतन्य हाच एकमात्र आत्मा आहे," असे वचन असल्यामुळे "अनेक आत्मे" किंवा "आत्मभेद" मानण्याला जागा नाही.

आता "आत्मा कोण आहे?" हे जाणून घेण्याची इच्छा असलेल्यांना विमर्शिनीकार असे सांगतात की, चार्वाकांचे लौकिक शरीर, वैदिकांचे प्राण, योगाचारी बौद्धांची बुद्धी आणि लौकिक, चार्वाक, योगाचार, माध्यमिक व वैदिकांनी मानलेले शरीर, बुद्धी, शून्य व प्राण हे आत्मा नव्हेत; तर पूर्वोक्त चैतन्यच आत्मा आहे. तोच शरीरादि कल्पितस्थानात "अहं" या सत्यप्रमातृत्वाने स्फुरतो.

या दृष्टीने "**श्रीमृत्युजिद्भट्टारक**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**परमात्मस्वरूपं तु सर्वोपाधिविवर्जितम्।**
**चैतन्यमात्मनो रूपं सर्वशास्त्रेषु पठ्यते।।८.२८।।**

**अर्थ :-** सर्व उपाधींनी विरहित असे जे परमात्म्याचे स्वरूप आहे तेच चैतन्य होय आणि आत्म्याचे असेच स्वरूप शास्त्रात सांगितलेले आहे.

"**श्रीयोगवासिष्ठ**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यद्यज्ज्ञेयमिदं तत्त्वं न इति सन्त्यज्य युक्तिभिः।**
**प्राप्यावशिष्टं चिन्मात्रं सोऽस्मि सोऽस्मिति भावय।।**

**अर्थ :-** जे जे जाणण्यायोग्य तत्त्व आहे ते हे तत्त्व नाही. अशा प्रकारे या ज्ञानाचा युक्तीने त्याग करून जे शिल्लक राहील ते चिन्मात्र असून तोच अर्थात् ते तत्त्वच मी आहे असे जाणावे.

"**श्रीअष्टावक्रगीता**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**प्रकाशो मे निजं रूपं नातिरिक्तोऽस्म्यहं ततः।**
**यदा प्रकाशते विश्वं तदाह भास एव हि।।**

**अर्थ :-** मी प्रकाशरूपच असून त्याशिवाय आणखी काहीही नाही. जे प्रकाशित झालेले विश्व दिसते ते केवळ भासमान आहे.

तसेच "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथातही असे म्हटले आहे की -

**चिद्धर्मा सर्वदेहेषु विशेषो (भेदः) नास्ति कुत्रचित्।**
**अतश्च तन्मयं सर्व भावयन् भवजिज्जनः।।९७।।**

**अर्थ :-** सर्व देहांमध्ये चैतन्यच भरलेले असून त्यात कोणताही विशेष भेद असत नाही. याकरिता सर्व काही चैतन्यमयच आहे अशी भावना सतत करावी.

ही गोष्ट अधिक स्पष्ट करताना "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यतः करणवर्गोऽयं विमूढोऽमूढवत्स्वयम्।**
**सहान्तरेण चक्रेण प्रवृत्ति-स्थिति-संहतीः।।१.६।।**
**लभते तत्प्रयत्नेन परीक्ष्यं तत्त्वमादरात्।**
**यतः स्वतन्त्रता तस्य सर्वत्रेयमकृत्रिमा।।७।।**

**अर्थ :-** ज्या तत्त्वाच्या बळामुळे अंतर्भागी असलेल्या शक्तिचक्राबरोबर त्या बाह्य अचेतन इंद्रियसमुदायाला स्वतः जड असतानाही चेतन पदार्थाप्रमाणे उत्पत्ती, स्थिती आणि संहार करण्याचा धर्म प्राप्त होत असतो, अशा स्पंदात्मक स्वभाव असलेल्या त्या तत्त्वाचे आदरपूर्वक व प्रयत्नपूर्वक परीक्षण करावे. असे करणे आवश्यक आहे; कारण या स्पंदततत्त्वाची स्वतंत्रता अर्थात् कृतिस्वातंत्र्य हे सर्व विश्वामध्ये स्वाभाविकपणे व्यापून राहिलेले आहे.।।१.६।।

त्याचप्रमाणे हे जे चैतन्य तोच आत्मा म्हणजेच स्वभाव आहे असे येथे सांगितले आहे. हा स्वभाव कोणाचा? इत्यादि. त्याबद्दल आणखी विशेष माहिती न सांगितल्याने हा स्वभाव "भाव व अभावरूप विश्वाचा" आहे असे समजावे. अचेत्यमान असा पदार्थ कोणाचाही केव्हाही स्वभाव होऊ शकत नाही. चेत्य म्हणजे प्रकाशमान वस्तूच स्वप्रकाश चिदात्म्याशी एकरूप होऊ शकते म्हणून आत्मा हा चैतन्यस्वभावयुक्त होय.।।७।।

या दृष्टीने "**श्रीउच्छुष्मभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यावन्न वेदका एते तावद्वेद्याः कथं प्रिये।**
**वेदकं वेद्यमेकं तु तत्त्वं नास्त्यशुचिस्ततः।।**

**अर्थ :-** हे प्रिये! जोपर्यंत जाणणारे लोक नाहीत तोपर्यंत जाणावयाची वस्तू तरी कशी असेल? अशा प्रकारे वेद्य अर्थात् जाणण्याची वस्तू आणि वेदक अर्थात् जाणणारे या तत्त्वांमध्ये काहीही भेद नाही.

ही गोष्ट अधिक स्पष्ट करताना "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील पुढील

तीन कारिकांमध्ये असे म्हटले आहे की -

**यस्मात्सर्वमयो जीवः सर्वभावसमुद्भवात्।**
**तत्संवेदनरूपेण तादात्म्यप्रतिपत्तितः।।३.२८।।**
**तेन शब्दार्थचिन्तासु न साऽवस्था न यः शिवः।**
**भोक्तैव भोग्यभावेन सदा सर्वत्र संस्थितः।।२९।।**
**इति वा यस्य संवित्तिः क्रीडात्वेनाखिलं जगत्।**
**स पश्यन् सततं युक्तो जीवन्मुक्तो न संशयः।।३०।।**

**अर्थ :-** जीव किंवा पशुप्रमाता हा सर्वमय आहे; कारण हा जीव किंवा पशुप्रमाता पतिप्रमात्याप्रमाणे किंवा परमेश्वराप्रमाणे संसारामधील अर्थात् जगतामधील सर्व घट, सुख इत्यादि भावांसह संवेदनात्मक तादात्म्य प्राप्त करून घेऊन त्यांची सर्जना किंवा सृष्टी करीत असतो.।।३.२८।।

("**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथामध्ये "**सृष्टी**" या शब्दाचा अर्थ सृष्टी, स्थिती, संहार, विधान आणि अनुग्रह ही पाच कृत्ये असा केलेला आहे.)

**अर्थ :-** यामुळे सर्व वाचक अर्थात् जीव आणि वाच्य अर्थात् ज्ञेय अशा पदार्थांच्या संवेदनाची कोणतीही अशी अवस्था नाही की, जी श्रीशिवरूप नाही. खरी स्थिती अशी आहे की, प्रत्येक ठिकाणी भोक्ता अर्थात् भोग घेणारा आत्मा हाच भोग्य अर्थात् भोग घेण्याला योग्य अशा प्रमेय पदार्थांच्या रूपामध्ये उल्हसित किंवा आनंदित होऊन शाश्वतरूपाने राहिलेला आहे.।।२९।।

**अर्थ :-** अशा प्रकारे ज्याला हे सर्व जग संवित् आत्मस्वरूप अर्थात् मन्मय किंवा चिन्मय आहे असा स्वानुभव येतो तो हे सर्व विश्व ही आपली लीला आहे असे जाणतो. अशा प्रकारे आपल्या आंतरिक श्रीईश्वरी सत्तेशी तो पुरुष नेहमी युक्त असल्यामुळे जीवन्मुक्त असतो यात काहीही संशय नाही.।।३०।।

ज्या अर्थी चैतन्य हाच विश्वाचा स्वभाव आहे त्या अर्थी त्याच्या सिद्धीसाठी प्रत्यक्ष व अनुमानादि प्रमाणांची आवश्यकता असत नाही; कारण या प्रमाणांचीच सिद्धी स्वप्रकाश चैतन्याधीन आहे. चैतन्याला कोणीही आवरण घालू शकत नाही.

या दृष्टीने श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**प्रकाशो नाम यश्चायं सर्वत्रैव प्रकाशते।**
**अनपह्नवनीयत्वात्किं तस्मिन्मानकल्पनैः।।**

**अर्थ :-** "**अनपह्नवनीयत्वात्किं।।**" अर्थात् "प्रकाश हा नेहमी सर्वत्र

प्रकाशित होत असतोच. तो जर कधीच कोणाकडूनही झाकला जात नाही तर त्याला प्रमाणांनी मोजण्याच्या कल्पनेचा काय उपयोग?" असे म्हणून चैतन्य-सिद्धी प्रमाणाधीन नाही; कारण चैतन्य हे सर्वप्रकाशक आहे असे वर्णन केले आहे आणि प्रमाणसिद्धीच चैतन्याधीन असल्याचे "**प्रमाणान्यपि वस्तूनां जीवितं यानि तन्वते। तेषामपि परो जीवः स एव परमेश्वरः।।**" अर्थात् "जी प्रमाणे वस्तूंच्या जीवनाचा विस्तार करतात त्यांच्यापेक्षाही श्रेष्ठ जीव अस्तित्वात असून तोच श्रीपरमेश्वर आहे," असे या श्लोकाने वर्णिले आहे. जीव हा प्रमाणांचा सिद्धिकर्ता असून तो प्रमाणांपलीकडे आहे व तोच परमेश्वर आहे म्हणून प्रमाणांची गरज नाही.

या दृष्टीने "**श्रीत्रिकहृदय**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**स्वपदा स्वशिरच्छायां यद्वल्लङ्घितुमीहते।**
**पादोद्देशे शिरो न स्यात्तथेवायं वैन्दवी कला।।**

**अर्थ :-** आपल्या पायाने आपल्याच शिराची सावली ओलांडता येत नाही तशी ही बिंदुकला स्वप्रमाणाज्ञेय आहे.

याच आशयाने "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**यत्र स्थितमिदं सर्वं कार्यं यस्माच्च निर्गतम्।**
**तस्यानावृतरूपत्वान्न निरोधोऽस्ति कुत्रचित्।।१.२।।**
**जाग्रदादिविभेदेऽपि तदभिन्ने प्रसर्पति।**
**निवर्तते निजान्नेव स्वभावादुपलब्धृतः।।३।।**
**अहं सुखी च दुःखी च रक्तश्चेत्यादिसंविदः।**
**सुखाद्यवस्थानुस्यूते वर्तन्तेऽन्यत्र ताः स्फुटम्।।४।।**
**न दुःखं न सुखं यत्र न ग्राह्यं ग्राहको न च।**
**न चास्ति मूढभावोऽपि तदस्ति परमार्थतः।।५।।**

**अर्थ :-** श्रीशिवांच्या स्पंदात्मक विमर्शभूमिकेत किंवा शाक्तभूमिकेत अथवा ज्ञानभूमिकेत किंवा श्रीशिवांच्या ठिकाणी हे सर्व कार्यरूप असलेले जगत् अभेदरूपाने अवस्थित असते किंवा राहते आणि त्या श्रीशिवांपासून बाहेर पडते किंवा उत्पन्न होते. त्या श्रीशिवांच्या किंवा सत्तेच्या अनाच्छादित अर्थात् आच्छादनरहित किंवा आवरणरहित स्वरूपामुळे स्वतंत्र प्रसारात कोठेही अडचण किंवा अडथळा असत नाही.।।१.२।।

**अर्थ :-** जागृती, स्वप्न, सुषुप्ती इत्यादि भिन्न अवस्थांमध्ये ते स्पंदतत्त्व

किंवा श्रीशिवतत्त्व हे भेदरहित किंवा अभिन्न रूपाने वेदकाच्या अर्थात् अनुभव घेणाऱ्याच्या किंवा जाणणाऱ्याच्या रूपामध्ये व्यापून राहिलेले असते. यामुळे या सर्व अवस्थांच्या प्रसाराच्या वेळी हे स्पंदतत्त्व (श्रीशिवांच्या स्वतःच्या) अनुभवस्वभावापासून निवृत्त होत नाही.।।३।।

**अर्थ :-** ही गोष्ट उघड किंवा स्पष्ट आहे की, मी सुखी आहे, मी दुःखी आहे आणि मी अनुरक्त आहे या व अशाच प्रकारच्या अन्य संवेदना त्या शरीर इत्यादींहून भिन्न असलेल्या दुसऱ्या अनुभवित्या अर्थात् अनुभव घेणाऱ्या व वेदक अर्थात् ज्ञात्या सत्तेमध्ये अवस्थित असतात किंवा राहतात. ही वेदकसत्ता या सर्व अवस्थांहून भिन्न असली तरी सुख, दुःख इत्यादि अवस्थांमध्ये ओवलेली असते.।।४।।

**अर्थ :-** ते स्पंदतत्त्व हे तत्त्वतः अर्थात् वास्तविक स्वरूपात सत् व नित्य आहे. या स्पंदतत्त्वाच्या ठिकाणी दुःख नाही, सुख नाही, ग्राह्यता अर्थात् ग्रहण होण्याचा धर्म नाही, ग्राहकता नाही आणि मूढभावही अर्थात् अचेतनत्वही नाही.।।५।।

असे म्हटले आहे की, **"श्रीशंकरात्मक स्पंदतत्त्वरूप चैतन्य सर्वदा स्वप्रकाश व पारमार्थिक सत्य आहे,"** असे सिद्ध केले आहे.।।१।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

मलप्रतिबंधाच्या तारतम्यामुळे प्रतिपक्षाचे लोक वेगवेगळी मते सांगतात. लौकिक म्हणजे चार्वाक सचेतन शरीरालाच "आत्मा" असे म्हणतात. नैयायिक ज्ञानादि गुणांनी युक्त व बुद्धितत्त्वाचे आधिक्य असलेल्या तत्त्वाला किंवा पदार्थाला "आत्मा" असे म्हणतात. मीमांसक पुर्यष्टकाला "आत्मा" असे म्हणतात, तर सौगत म्हणजे बौद्ध ज्ञानसंतानाला "आत्मा" म्हणून ओळखतात. काही श्रुतिवेत्ते शून्यअभावाला "आत्मा" असे म्हणतात. माध्यमिकही शून्याला "आत्मा" असे म्हणतात. पांचरात्रीयांच्या मते अव्यक्त हाच "आत्मा" होय. सांख्यमते विज्ञानकलावस्था म्हणजे "आत्मा" होय. काही वेदवेत्ते श्रीईश्वर-तत्त्वाला "आत्मा" मानतात. वैयाकरणी श्रीसदाशिवतत्त्वाला "आत्मा" असे समजतात. हे सर्व बिचारे पारमार्थिक स्वातंत्र्यापासून वंचित झालेले असून मायाशक्तीमुळे भेदाला उराशी बाळगून आहेत.

परंतु श्रीशिवमत असे आहे की **"चैतन्यमात्मा।।१।।"** अर्थात् "चैतन्यच म्हणजे कुंडलिनी शक्ती ही श्रीशिवांशी समवायसंबंधाने, अविनाभावाने, संश्लेशाने, यामलरूपाने, संघट्टपणे, अद्वयरूपाने आणि अनवच्छेद्यरीतीने एकरसरूप,

समव्याप्त व समरस झालेली असल्यामुळे तीच आत्मा अर्थात् श्रीशिव आहेत."

**चैतन्यमात्मनो रूपं सिद्धं ज्ञानक्रियात्मकम्।**
**तस्यानावृतरूपत्त्वात् शिवत्वं केन वार्यते।।१५।।**

**अर्थ :-** ज्ञानात्मक आणि क्रियात्मक असे चैतन्य म्हणजे कुंडलिनी शक्ती हेच आत्म्याचे स्वरूप आहे, असे सिद्धच आहे. हे चैतन्य कशानेही झाकले जात नसल्यामुळे त्याचे श्रीशिवत्व कोण नाकारील?।।१५।।१।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**चैतन्यमात्मा।।१।।**" अर्थात् "आत्मा सर्वांना चेतवितो म्हणून त्याला चेतन असे म्हणतात." तो सर्व क्रिया व सर्व ज्ञान या बाबतीत स्वतंत्र आहे. त्याचा भाव म्हणजे चैतन्य होय अर्थात् सर्वज्ञानक्रियासंबंधमय परिपूर्ण स्वतंत्रता हाच चैतन्यमय आत्मा होय. लौकिक लोकांनी म्हणजे चार्वाक, बौद्धादिकांनी मानलेले शरीर, प्राण, बुद्धी व शून्य हे आत्मे नव्हेत. या शिवाय हे जे चैतन्य आहे तोच भाव व अभावरूप जगताचा स्वभाव आहे.

या दृष्टीने "**श्रीमदुच्छुष्मभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यावन्न वेदका एते तावद्वेद्याः कथं प्रिये।**
**वेदकं वेद्यमेकं तु तत्त्वं नास्त्यशुचिस्ततः।।**

**अर्थ :-** हे प्रिये! जोपर्यंत वेदक म्हणजे ज्ञाते नसतील तोपर्यंत ज्ञेय पदार्थ तरी कसे असतील? वेदक व वेद्य हे एक तत्त्व होऊ शकत नाही आणि तसे मानणे हे अयोग्यच आहे.।।१।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

**प्रास्ताविक :-** श्रीनागबोधी प्रभृती नास्तिक अशा अग्रगण्य सिद्धांनी आत्मा अर्थात् परमात्मा म्हणजे श्रीईश्वर याचा निरास करून या पृथ्वीवरील मानवांना आक्रांत केले अर्थात् त्यांनी शून्य किंवा अनीश्वरवादाचा प्रसार केला.।।१।।

त्यावेळी सिद्धयोगाच्या किंवा शक्तिपातयोगाच्या रहस्यमय संप्रदायाचा विच्छेद होऊ नये या प्रगल्भ इच्छेने आणि श्रीपार्वतीच्या प्रेरणेने भगवान् श्रीशंकरांनी कैलास पर्वतावरील शिलाखंडावर ही "**श्रीशिवसूत्रे**" लिहिली.।।२।।

श्रीशंकरांनी श्रीशिवभक्ताग्रणी श्रीवसुगुप्ताचार्य यांना स्वप्नामध्ये त्यांचे श्रीसद्गुरुत्व पत्करून ही "**श्रीशिवसूत्रे**" अत्यंत दयेने कथन केली. अशा त्या परमसद्गुरू श्रीवसुगुप्ताचार्यांना माझे नमन असो.।।३,४।।

महामाहेश्वर श्रीक्षेमराजाचार्य पंडितांच्या मुखातून आविर्भूत झालेल्या

सद्वृत्तीला म्हणजे विवेचनाला किंवा विवरणाला अनुसरून त्यांच्या वाक्या-धारेच श्रीशिवसूत्रांवर हे वार्तिक मी लिहीत आहे.।।५-५.५।।

जीव आणि श्रीईश्वराचे ऐकात्म्य किंवा एकात्मता नाही असे म्हणणाऱ्यां-विरुद्ध आमचे असे प्रतिपादन आहे की, "**चैतन्यमात्मा।।१।।**" अर्थात् "जीव आणि जडस्वरूप प्रपंचाचा आत्मा श्रीपरमशिवच असून ते चित्क्रिया-त्मक चैतन्यमूर्ती आहेत."।।६-७।।

श्रीपरमशिवांचे चित्क्रियारूप चैतन्य हेच स्वातंत्र्य असून तेच आत्मा आहेत. यामुळेच श्रीशिव हे सर्वश्रेष्ठ आहेत.।।८।।

किंवा "आत्मा कोण आहे?" असे विचारणाऱ्या अज्ञानी लोकांना समजावून देताना देह, प्राण, मन, आकाश, शून्य व भूमी यांपैकी कोणीही व काहीही आत्मा नव्हे असेच आमचे कथन किंवा सांगणे आहे.।।९।।

तर "चैतन्यच आत्मा आहे," असे श्रीब्रह्मदेवांनी सांगितले असून तेच आत्म्याचे स्वाभाविक शरीर आहे.।।१०।।

प्रेरणेचा अभाव असल्यामुळे चेतन भासणाऱ्या जगताचे अचेतन शरीर कधीच असणार नाही.।।११।।

(अचेतनाला चेतन किंवा चैतन्यच प्रेरक असल्यामुळे) चिद्रूपाच्या तादात्म्यामुळे चेतन होण्याला योग्य असलेल्या व नसलेल्या सर्वच गोष्टी चिन्मय होतात. या श्रीशिवांनी सांगितलेल्या नीती म्हणजे तत्त्वानुसार स्थावर-जंगमरूप निखिल विश्वाचे खरे स्वरूप चैतन्यच आहे.।।१२.५।।

**विवरण :-** याचा दुसऱ्याही पद्धतीने अर्थ केला जाऊ शकतो. तो असा आहे की, या जगतात केवळ चैतन्यच तुमचे "स्वत:चे" किंवा "आत्मीय" आहे. आत्म्याचा अर्थ आहे "आपले," बाकीचे सर्व परक्याचे आहे. बाकीच्या गोष्टी कितीही जवळच्या व आपल्या वाटल्या तरी त्या तशा नसतात. मित्र, प्रियजन, परिवार, धन, यश, प्रतिष्ठा, उच्च पद व साम्राज्य हे सर्व जरी आपले वाटले तरी ती फसवणूक असते; कारण मृत्यू या सर्व गोष्टी तुमच्या-पासून हिरावून घेत असतो. त्यामुळे जी गोष्ट मृत्यूही तुमच्याकडून हिरावून घेऊ शकत नाही तीच गोष्ट "आपली" असते आणि या "आपल्या" वस्तूला अर्थात् स्वत:लाच जाणून घ्यावयाचे असते. हे जर कळलेच नाही तर बाकी सर्व ज्ञान व्यर्थ होय. जो "स्वयम्"ला जाणतो त्यालाच इतर सर्व ज्ञान होत असते. जो चैतन्याच्या "स्व"प्रकाशात न्हाऊन निघतो तोच पवित्र होय. चैतन्य म्हणजे तुमचा स्वभाव आहे. त्याला ओलांडून तुम्ही एक क्षणभरही

राहू शकत नाही. त्यामुळेच "माझ्या"शिवाय चैतन्य आणखी कोणतेच असू शकत नाही हा भाव दृढ झाला की, संन्यास उत्पन्न होईल; कारण माझ्या शिवाय आणखी कोणी आहे हा भाव उदय होणे म्हणजेच संसार होय.।।१।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

जो अनंतशक्तीने युक्त असणारा हे अनंत जगत् निर्माण करतो तोच अंतरात्मा या जगताचे पालन करतो. जो विश्वाच्या शेवटी सर्वांचा लय करून सत्यचिन्मूर्तीच्या स्वरूपात राहतो आणि जो सज्जनांमध्ये मंगल असे मुक्तिरूप अत्यंत दयाळूपणाने धारण करतो तो ज्ञानमूर्ती श्रीशिवात्मा सर्वांच्या हृदयात खरोखर सर्व बाजूंनी नित्य स्फुरण पावतो.।।१।।

पहिल्या सूत्रातून सूत्रकार प्रथम आत्म्याचे स्वरूप दाखवितात. त्यांनी "**चैतन्यमात्मा।।१।।**" असे म्हणून आत्मस्वरूप दाखवून त्याच अनुषंगाने येथे मंगलही केलेले आहे; कारण अनुत्तरात राहणाऱ्या भगवान् परम श्रीशिवांचे स्वरूप प्रकाशात्मक चैतन्य आहे. चितिरूप कुंडलिनी शक्तीशिवाय अर्थात् चैतन्यरूप आत्म्याशिवाय कोणत्याही वस्तूचे अस्तित्व सिद्ध होत नाही; परंतु या आत्म्याचे चैतन्य हेच स्वाभाविक शरीर आहे. चैतन्य म्हणजे चेतयते अर्थात् चेतना किंवा प्रेरणा देणारा तो चेतन होय म्हणजेच सर्व ज्ञानक्रियांमध्ये स्वतंत्र तो चेतन होय. त्याचा भाव अर्थात् भाववाचक नाम म्हणजे चैतन्य होय. त्याचप्रमाणे सर्व ज्ञान व क्रियांच्या संबंधाने युक्त परिपूर्ण असे सर्वतंत्र अर्थात् सर्व प्रकाराने स्वातंत्र्य या चैतन्य शब्दाने निरूपिले जाते.

या विषयी वार्तिककारांचे मत पुढीलप्रमाणे आहे.

**चैतन्यमात्मनो रूपं सिद्धं ज्ञानक्रियात्मकम्।**
**तस्यानावृतरूपत्वाच्छिवत्वं केन वार्यते।।**

**अर्थ** :- चैतन्य म्हणजे ज्ञानक्रियात्मक असे आत्म्याचे रूप होय. त्याच्या अनावृत अर्थात् न झाकलेल्या रूपामुळे श्रीशिवत्वाचे कोणाकडून निवारण केले जाते? अर्थात् कोणाकडूनही केले जात नाही.

अशा प्रकारचे स्वातंत्र्य फक्त सहा प्रकारच्या ऐश्वर्यांनी संपन्न अशा भगवान् परम श्रीशिवांचे असते. श्रीपरमेश्वराचे हेच स्वातंत्र्य अत्यंत दुर्घटकारी आहे. श्रीसदाशिवप्रभृती प्रमातृवर्गाने युक्त अशा श्रीशिवतत्त्वरूपांमध्ये अशा प्रकारचे स्वातंत्र्य अस्तित्वात नसते. वास्तविक पाहता श्रीशिवतत्त्व म्हणजे श्रीपरमशिवतत्त्वाहून निर्माण होणारे अनाश्रित नावाचे अच्छेद्य, अक्लेद्य व अशोष्य आदि धर्मांनी युक्त असे तत्त्व आहे. जरी परम श्रीशिव हे नित्यत्व

व व्यापकत्व आदि धर्मांनी युक्त आहेत तरीही नित्यत्वादि धर्म आकाश व परमाणू आदींमध्येही असू शकतात; परंतु अन्यत्र कोठेही न दिसून येणाऱ्या स्वातंत्र्याच्या प्रदर्शनासाठी "**चैतन्यमात्मा**" असे म्हटले आहे आणि हे चेतन शब्दाच्या भावप्रत्ययाने अधिक स्पष्ट केले आहे.

यासंबंधी श्रीअभिनवगुप्तपादाचार्य यांनी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**चैतन्यमिति भावान्तः शब्दस्वातन्त्र्यमात्रकम्।**
**अनाक्षिप्तविशेषं सदाह सूत्रे पुरातने।। १.२८।।**

**अर्थ :-** चैतन्य हे भाववाचक नाम अनाक्षिप्त अर्थात् कोणाकडूनही आक्षिप्त अर्थात् शंका काढता न येणारे विशेष अशा स्वातंत्र्याचे निदर्शक आहे, असे मागच्या सूत्रात सांगितले आहे.

अशा प्रकारे "मात्रपदाचे" तात्पर्य अनाक्षिप्त हे आहे; कारण भावप्रत्यय शेवटी असणाऱ्या पदाने सहचारी धर्मांतर अर्थात् सहचारी अशा अन्य धर्मांची निवृत्तीच सांगितली जाते.

याविषयी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**धर्मान्तरप्रतिक्षेपाप्रतिक्षेपौ तयोर्द्वयोः।**
**सङ्केतभेदस्य पदं ज्ञातृवाञ्छानुरोधितः।**
**भेदोऽयमेव सर्वत्र द्रव्यभावाभिधायिनोः।।**

**अर्थ :-** अन्य धर्मांचे प्रतिक्षेप आणि अप्रतिक्षेप अशा दोघांच्या संकेत-भेदाचे पद ज्ञात्याच्या इच्छेच्या अनुरोधाने असते. द्रव्यभाव हे नाव सांगणाऱ्याचा हा भेद सर्वत्र दिसून येतो.

याविषयीच "**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**आत्मात एव चैतन्यं चित्क्रिया चितिकर्तृता।**
**तात्पर्येणोदितस्तेन जडात्स हि विलक्षणः।।१.५.१२।।**
**चितिः प्रत्यवमर्शात्मा परावाक्स्वरसोदिता।**
**स्वातन्त्र्यमेतन्मुख्यं तदैश्वर्यं परमात्मनः।।१.५.१३।।**

**अर्थ :-** आत्म्यापासूनच चैतन्य, चित्क्रिया, चितिकर्तृता इत्यादि तात्पर्याने उदित होतात व त्यामुळे तो जडापासून विलक्षण होतो किंवा वेगळा होतो. ही चिती अर्थात् चैतन्य म्हणजेच प्रत्यवमर्शाने युक्त अशी स्वरसापासून उत्पन्न होणारी परावाक् असून परमात्म्याचे ऐश्वर्य असणारे मुख्य स्वातंत्र्य आहे.

अशा प्रकारे या विषयी मलप्रतिबंधकतारतम्याने वादींच्या बळजबरीने

आणलेल्या विरोधी मतांचे निराकारण होते. त्याचप्रमाणे लौकिकवादी चैतन्याने विशिष्ट असणारे शरीर म्हणजे आत्मा व नैयायिकादि ज्ञानादि गुणसमूहांचा आश्रय असणारे बुद्धितत्त्वच बहुधा आत्मा म्हणून संसृतीत स्वीकारतात. मोक्षावस्थेत मात्र त्यांचा उच्छेद होत असल्याने ते शून्यतत्त्वच ठरते. मीमांसक पुर्यष्टकाला आत्मा मानतात. सौगत अर्थात् बुद्धवादी ज्ञानसंतान हेच परम-तत्त्व मानतात तर काही वेदवादी प्राणालाच आत्मा मानतात. अभावब्रह्मवादी हे सर्व असत् आहे असे शून्यच स्वीकार करतात तर माध्यमिकही असेच मानतात. पांचरात्रवादी अव्यक्तातच शिरले आहेत; तर सांख्यादि विज्ञान-कलावस्थेत आहेत. काही वेदवित् श्रीईश्वरतत्त्वाला व वैयाकरणी शब्द-ब्रह्ममय पश्यंती वाणीरूप श्रीसदाशिवतत्त्वाला आत्मा मानतात.

आगमशास्त्रात असे म्हटले आहे की -

**बुद्धितत्त्वे स्थिता बौद्धा गुणेष्वेवार्हताः स्थिताः।**
**स्थिता वेदविदः पुंसि अव्यक्ते पाञ्चरात्रकाः।।**

**अर्थ :-** बौद्ध बुद्धितत्त्वात, आर्हत गुणांमध्ये, वेदवादी पुरुषात तर पांच-रात्रवादी अव्यक्तात स्थित आहेत.

हे सर्व पारमार्थिक स्वातंत्र्यापासून वंचित झालेले लोक मायेच्या द्वारा भेद-भूमीला प्राप्त होतात. त्यांना यथार्थ श्रीपरमशिवतत्त्व हेच ज्याचे स्वरूप आहे असा मोक्ष मिळत नाही. जरी मुक्तीच्या आधी मल असतानाही व मोक्षदशेत मलाचा नाश होऊन गेल्यामुळे आत्म्यांचे नानात्व सांगणे कशाही प्रकारे शक्य होत नाही. त्यामुळेच "चैतन्य हाच आत्मा आहे," असे म्हटले आहे.

**विवरणात्मक टीपा :-**

या सूत्रात आलेल्या काही महत्त्वाच्या शब्दांचे अर्थ पुढीलप्रमाणे आहेत.

**(१) सूत्र :-** "सूत्र" या शब्दाचा दोरा हा वास्तविक अर्थ असून त्यामुळे दोऱ्यात ज्याप्रमाणे फुले वगैरे ओवता येतात त्याप्रमाणेच सूत्रात काही कल्पना, नियम इत्यादि ओवलेले असतात. सूत्राची व्याख्या पुढीलप्रमाणे आहे.

**अल्पाक्षरम् असन्दिग्धं सारवद् विश्वतोमुखम्।**
**अस्तोमनवद्यं च सूत्रं सूत्रविदो विदुः।।**

**अर्थ :-** कमीतकमी अक्षरे असलेले, स्पष्ट, सर्वांचे सार, सर्वांना व्यापणारे, निरुपयोगी शब्द नसलेले आणि एकही चूक नसलेले असे जे ते सूत्र होय.

**(२) आत्मा :-** या सूत्रातल्या आत्मा या शब्दाचा अर्थ "स्वयम्" आणि

स्वभाव किंवा सत्याचे स्वरूप असा आहे. त्यामुळे या सूत्राचा अर्थ "असणे अर्थात् सत् आणि जाणीव अर्थात् चित् म्हणजे आत्मा होय आणि असणे व जाणीव हे सत्याचे स्वरूप होय," असा दोन्ही प्रकाराने होतो.

**(३) चैतन्य** :- चेतन या नामापासून "चैतन्य" हा शब्द "य" हा तद्धित प्रत्यय लागून तयार झाला आहे. या प्रत्ययाचा अर्थ संबंध असा आहे. त्यामुळे "चैतन्य" याचा अर्थ जाणीवयुक्त अवस्था असा आहे आणि तद्धित प्रत्ययामुळे तो शब्द ज्ञान आणि क्रिया यांचे पूर्ण स्वातंत्र्य असलेल्या तत्त्वाशी असलेला संबंध निर्देशित करतो. यामुळे चैतन्य म्हणजे सर्व ज्ञान आणि क्रिया यांचे पूर्ण स्वातंत्र्य होय.

**(४) अचेतित** :- अचेतित अर्थात् अप्रकाशित म्हणजे जाणिवेच्या प्रकाशाने प्रकट न होणारे तत्त्व होय. प्रकाश म्हणजे संवेदनेचा प्रकाश असून त्याने भौतिक प्रकाशही दृश्यमान होतो. त्यामुळे जेव्हा जेव्हा एखादे प्रकाशन किंवा एखाद्या वस्तूचे प्रकटन होते तेव्हा तेव्हा तेथे प्रकाश किंवा संवेदना किंवा जाणिवेचा प्रकाश असतो. ज्याप्रमाणे लौकिक प्रकाशाशिवाय जगातली कोणतीही गोष्ट दृश्य होत नाही त्याप्रमाणेच प्रकाशाशिवाय कोणतीही गोष्ट अस्तित्वात येणे शक्य नाही. प्रत्येक वस्तूचे प्रकटन म्हणजे चैतन्य व्यक्त होणे होय.

याकरिता **"कठोपनिषद्"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारकं**
**नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः।**
**तमेव भान्तमनुभाति सर्वं**
**तस्य भासा सर्वमिदं विभाति।।२.२.१५।।**

**अर्थ** :- त्या आत्मतत्त्वाच्या ठिकाणी सूर्य, चंद्र, तारे आणि वीजही प्रकाशत नाही; मग अग्नी तरी कोठून प्रकाशित होणार? फार काय सांगावे? हे जे सर्व काही भासत आहे ते तो श्रीपरमेश्वर प्रकाशित होऊ लागला असतानाच त्याच्या प्रकाशात प्रकाशित होते. ही सर्व "त्या"च्याच प्रकाशाने प्रकाशित होतात.

**(५) स्वातंत्र्य** :- याचा शब्दशः अर्थ स्वावलंबित्व असा आहे. तंत्रशास्त्रातला हा तांत्रिक शब्द आहे. यात पुढील पाच महत्त्वपूर्ण कल्पना समाविष्ट आहेत.

**(अ) पहिली कल्पना** अशी आहे. स्वातंत्र्य म्हणजे उत्पत्तीचे पूर्ण

स्वातंत्र्य, इच्छेचे पूर्ण स्वातंत्र्य आणि क्रियेसाठी कोणत्याही बाह्य वस्तूंवर किंवा साधनांवर अवलंबून नसणारे तत्त्व किंवा संपूर्ण ऐश्वर्य होय.

**(ब) दुसरी कल्पना** अशी आहे. स्वातंत्र्य म्हणजे विमर्श किंवा कायमचे स्वचैतन्याचे अस्तित्व होय. ज्ञान, ज्ञाता आणि ज्ञेय यांनी युक्त असणारा "स्व" होय.

**(क) तिसरी कल्पना** अशी आहे. स्वातंत्र्य म्हणजे ज्ञान आणि क्रिया होय. उत्पत्तीच्या पूर्ण स्वातंत्र्यात ज्ञान आणि क्रिया या दोन्ही असतात.

या पद्धतीतले "श्रीशिव" हे श्रीशांकरवेदान्तातल्या कर्तृत्वरहित ब्रह्मासारखे नाहीत. श्रीशिवांना स्वातंत्र्य, अनिर्बंध इच्छा, संपूर्ण ज्ञान, संपूर्ण क्रियाशक्ती व संपूर्ण चैतन्यत्व आहे.

**(ड) चवथी कल्पना** अशी आहे. शाश्वतत्व किंवा सर्वव्यापकत्व हे आकाश आणि परमाणू यांच्या बाबतीतही शक्य आहे, असे काही विद्वानांचे मत आहे; परंतु पूर्ण स्वातंत्र्य हे केवळ चैतन्य स्वभाव असलेल्या श्रीपरमशिवांनाच आहे.

**(इ) पाचवी कल्पना** अशी आहे. "मल" याचा शब्दशः अर्थ गाळ किंवा अशुद्धता किंवा कलंक असा आहे. मल हा दिव्य चैतन्याच्या शुद्ध सोन्याला आच्छादून आणि लपवून टाकतो. मल ही आत्म्याच्या मुक्त प्रकटीकरणाला अडथळा करणारी मर्यादित अवस्था आहे. ती तीन प्रकारची असते. आणवमल, मायीयमल आणि कार्ममल हे ते तीन प्रकार आहेत.

**(१) आणवमल :- "आणवमल"** ही प्रमुख मर्यादित अवस्था आहे. हा आणवमल वैश्विक चैतन्य अनुभवजन्य होण्याला बाधा आणीत असतो. ही एक लौकिक मर्यादित अवस्था आहे. त्या अवस्थेवर कोणत्याही मनुष्याचे नियंत्रण असत नाही. त्यामुळेच जीव स्वतःला विश्वापासून तोडलेला एक भाग अर्थात् अपूर्ण समजतो. या अवस्थेत श्रीशिवांची महानता लपलेली असते आणि जीव "स्व"रूप विसरलेला असतो. आणवमल हा दोन प्रकारांनी नष्ट करून टाकता येतो. एकतर बोध किंवा ज्ञान याने आणवमल नाहीसा करता येतो. परंतु स्वतंत्रता हाच श्रीशिवांचा स्वभाव असून आणवमलामुळे त्यांचे परिपूर्ण स्वचैतन्य आणि क्रिया हरविलेली असते अर्थात् स्वातंत्र्य आणि क्रिया यांचा या बोधात संकोच झालेला असतो किंवा अबोधासह स्वचैतन्याने पूर्णकर्तृत्वाला बोधरूपाहून भिन्न समजण्याचा मिथ्याभिमान म्हणजे हा आणवमल होय.

**(२) मायीयमल :-** "**मायीयमल**" हा मायेमुळे निर्माण होत असून तो आत्म्याला स्थूल आणि सूक्ष्म शरीर प्रदान करतो. तोही वैश्विक मलच आहे. हा मल भिन्न-वेद्य-प्रथा अर्थात् शरीराच्या भिन्न मर्यादित गुणांमुळे जीवाच्या चैतन्यामध्ये किंवा जाणिवेमध्ये भिन्नत्व आणणारा आहे.

**(३) कार्ममल :-** "**कार्ममल**" म्हणजे ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये यांनी अंतःकरणाच्या प्रभावाखाली केलेल्या क्रियेच्या ठशाला किंवा वासनेला अर्थात् यांच्या रूपातील मलाला "कार्ममल" असे म्हणतात. ही प्रत्येक जीवाने त्याच्या कर्माने आणि वासनेने निर्माण केलेली मर्यादित अशी स्थिती आहे.

**(६) अनादि श्रीशिव :-** काही सिद्धान्तवादी किंवा मतवादी असे मानतात की, अनादि श्रीशिव यांच्या ठिकाणी मल म्हणून काही आहे असे कधीही गृहित धरलेले नाही. त्यामुळे अनादि श्रीशिव हे कधीही आपल्या स्तरावरून खाली उतरून बंधनात अडकत नाहीत. दुसऱ्या प्रकारच्या श्रीशिवांच्या ठिकाणी मल आहे म्हणून ग्राह्य मानलेले आहे आणि हे श्रीशिव आपल्या स्तरावरून खाली उतरून बंधनात बद्ध होत असतात. यामुळे मुक्त झालेले श्रीशिव हे स्वतंत्र झाल्यावरही अनादि श्रीशिवांपेक्षा कमी किंवा कनिष्ठ दर्जाचे असतात. परंतु श्रीक्षेमराज हे या मताला विरोध करीत असताना असे म्हणतात की, हे स्वतंत्र झालेले श्रीशिव हे पुनर्जन्म घेणाऱ्या किंवा पुन्हा देह धारण करणाऱ्या आत्म्यापेक्षा अधिक चांगले असत नाहीत. हे पुन्हा देह धारण करणारे आत्मे स्वतःला आत्मा न समजता शरीर समजत असतात.

**(७) श्रीमृत्युजिद्भट्टारक :-** हे "**श्रीनेत्रतंत्र**" या ग्रंथाचे दुसरे नाव आहे. ते काश्मीर श्रीशैव क्रमिक पुस्तकामध्ये छापण्यात आलेले आहे.

**(८) श्रीवसुगुप्ताचार्य :-** श्रीवसुगुप्त हे आचार्य असून त्यांनी प्रथमच किंवा सर्वप्रथम श्रीशैवतत्त्वज्ञानाचे पद्धतशीरपणे विवरण किंवा स्पष्टीकरण केले आहे.

**(९) करणेश्वरीचक्र :-** पाच कर्मेंद्रिये आणि पाच ज्ञानेंद्रिये ही जाणिवेची इंद्रिये आहेत. विविध संज्ञेमध्ये किंवा संवेदनेमध्ये कार्य करणाऱ्या दिव्य शक्तीच्या समूहाला "**करणेश्वरीचक्र**" असे म्हणतात.

**(१०) विविध शक्ती :-** अनुभवजन्य "स्व"च्या प्रवृत्ती, स्थिती आणि संहार यांच्या शक्ती परम श्रीशिव किंवा परमात्मा यांच्यापासून निघालेल्या आहेत.

**(११) पूर्ण परमात्म्याचे स्वातंत्र्य :-** पूर्ण परमात्म्याचे काहीही करण्याचे स्वातंत्र्य हे स्वाभाविक किंवा सहज असते अर्थात् ते कोणत्याही प्रकारे

साधनात्मक कारणावर किंवा बाह्य वस्तूवर अवलंबून नसते.

(१२) **बैंदवीकला** :- बैंदवीकला म्हणजे पराप्रमाता किंवा परमात्म्याची शक्ती होय. "**वेत्ति इति विन्दुः।।**" अर्थात् "जो जाणतो तो विंदू होय." परमात्मा किंवा श्रेष्ठ चैतन्य हेच जाणणारे असते आणि त्यालाच विंदू किंवा बिंदू असे म्हणतात." "**बिन्दोरियम् इति बैन्दवी।।**" अर्थात् "ही बिंदूची शक्ती आहे म्हणून तिला बैंदवी असे म्हणतात." बैंदवी म्हणजे बिंदूशी संबधित असे तत्त्व किंवा शक्ती होय. कला म्हणजे शक्ती होय. त्यामुळे बैंदवीकला म्हणजे "परमात्म्याची किंवा चैतन्याची ज्ञान मिळविण्याची शक्ती" होय. येथे बैंदवीकलेचा अर्थ "स्व"ची अर्थात् आत्म्याची शक्ती होय आणि त्या शक्तीमुळे तो नेहमीच ज्ञाता असतो आणि कधीच ज्ञेय नसतो.।।१।।

## सूत्र क्रमांक २

**संबंध** :- जर परम श्रीशिवरूप चैतन्यच जीव व जडात्मक विश्वाचा स्वभाव आहे तर मग चैतन्यस्वभाव हा बंध कसा होईल? ही शंका दूर करण्यासाठी दोन सूत्रांचे एक सूत्र करून अकारसंबंध व असंबंध करून पुढीलप्रमाणे सूत्रार्थ सांगितला जातो. "**चैतन्यमात्माऽज्ञानं बन्धः।।**" अर्थात् "**चैतन्यमात्मा + अज्ञानं बन्धः।।**" असा याचा संधिविग्रह होऊन "चैतन्य हाच आत्मा असून अज्ञान हाच बंध आहे," असा याचा अर्थ होईल.

"**परः संनिकर्षः संहिता।।**" अर्थात् दूर अंतरावर असलेल्यांना एकत्र करणे म्हणजे संधी होय. या सूत्रानुसार "**चैतन्यमात्माऽज्ञानं बंधः।।**" असे अकारप्रश्लेशाने एक सूत्र करावे. इतर ठिकाणी अकाराचा प्रश्लेश न करता संधीच्या अभावी आरोह व अवरोह क्रमाने "**चैतन्यमात्मा।।**" व "**ज्ञानं बन्धः।।**" अशी वेगळी सूत्रे होतात. येथे ज्ञान म्हणजे आत्म्यात अनात्म्याचा अभिमान धरणे आणि अनात्म्यात आत्माभिमान म्हणजे मल होय असे अलग करून व सूत्रे एकत्र करून सांगितले आहे.

त्याचप्रमाणे आचार्य श्रीअभिनवगुप्तपादाचार्य याविषयी असे म्हणता की -

**चैतन्यमात्मा ज्ञानं च बंध इत्यत्र सूत्रयोः।**
**संश्लेशेतरयोगाभ्यामयमर्थः प्रदर्शितः।।**
**चैतन्यमिति भावान्तः शब्दः स्वातन्त्र्यमात्रकम्।**
**अनाक्षिप्तविशेषं सद् आह सूत्रे पुरातने।।**
**द्वितीयेन तु सूत्रेण क्रियां वा करणं च वा।**
**ध्रुवता तस्य चिन्मात्ररूपस्य द्वैतमुच्यते।।**

**द्वैतप्रथा तदज्ञानं तुच्छत्वाद्बन्ध उच्यते।**
**तत एव समुच्छेद्यमित्यावृत्यानिरूपितम्।।**

**अर्थ :-** "**चैतन्यमात्मा।।**" आणि "**ज्ञानं बंधः।।**" या सूत्रांमध्ये संश्लेश अर्थात् एकत्रित करून व इतर योगांनी हा अर्थ दाखवून दिला आहे. "चैतन्य" हा भाववाचक शब्द "स्वातंत्र्य" या अर्थाचा असून त्यालाच "अनाक्षिप्त" हे विशेषण मागील सूत्रात दिले आहे. दुसऱ्या सूत्राने क्रिया किंवा करण यांना उद्देशित केले आहे. त्या चिन्मात्ररूपाची ध्रुवता म्हणजे द्वैतज्ञान होय. ही द्वैतप्रथा हेच अज्ञान होय. ते तुच्छ किंवा तिरस्करणीय असल्यामुळे तोच बंध आहे. त्याचाच समूळ उच्छेद करावा या उद्देशाने हे सर्व निरूपण केले आहे.

**ज्ञानं बन्धः।।२।।**

**शब्दार्थ :- ज्ञानम्** - संकुचित ज्ञान अथवा संकुचित स्वरूपाचे ज्ञान. **बन्धः** - बंधन, मर्यादा.

**अर्थ :-** (आत्मस्वरूपाविषयी वास्तव ज्ञान नसणे अर्थात् देह, प्राण व पुर्यष्टकादि रूपालाच आत्मा म्हणणे अथवा) संकुचित किंवा मर्यादित ज्ञान असणे हा बंध अर्थात् बंधाचे कारण आहे अर्थात् ज्ञानरूप कुंडलिनी शक्ती ही आपल्या आत्मचैतन्यरूप श्रीशिवपदावरून खाली उतरून ज्यावेळी संकुचित जीवरूप धारण करून मूलाधारात अंतर्मुखाने निद्रिस्त होऊन बहिर्मुखाने कामोपभोगाकांक्षाइच्छावासनासंकल्पनातृष्णादींमध्ये लिप्त होते त्यावेळी ती बंधाला कारण होते.।।२।।

**विशेष व्याख्या :-** विषयांचे ज्ञान होणे हेच बंधन आहे. अशा प्रकारे ज्या अवस्थेत द्वैताचे ज्ञान होते ते अज्ञान व बंधन असून ते आणवमलामुळे होते. ज्यावेळी आत्म्यामध्ये अपूर्णतेचा अनुभव येतो त्यावेळी त्याला "आणव-मल" असे म्हणतात. या आणवमलामुळेच आत्मा हा अणू अर्थात् जीव-स्वरूपाला प्राप्त होतो. हा जीवरूप आत्मा देह, प्राण व पुर्यष्टक म्हणजे शरीर इत्यादि सर्वांना जाणतो आणि यामुळेच त्याला विषयांचे ज्ञान होते.

पहिल्या सूत्रानुसार पाहता आत्म्याच्या ठिकाणी अनात्मज्ञान व अनात्म्याच्या ठिकाणी आत्मज्ञान असा संयुक्त वियुक्त पाठाने श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनी अर्थ केला आहे. द्वैतज्ञान हे अज्ञान असून ते बंधन होय. आता विमर्शिनीकार श्रीक्षेमराजांचे मत वरील युक्तीनुसार चित्प्रकाशावाचून दुसरे काहीच या विश्वात नाही; तर मल तरी कसा असेल? व तो निरोधक चित्स्वरूपाच्छादक

व आवरक तरी कसा असेल? असा भेदवाद्यांच्या मताचा परिहार करताना श्रीक्षेमराजाचार्य असे म्हणतात की -।।२।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

**मलमज्ञानमिच्छन्ति संसाराङ्कुरकारणम्।।**

**अर्थ :-** संसारकारण अशा मायीयमलाचे अज्ञान हे कारण आहे आणि "**अज्ञानाद् बध्यते लोकस्ततः सृष्टिः च संहृतिः।।**" अर्थात् "अज्ञानाने बंधन, विश्वोत्पत्ती आणि विश्वसंहारादि होतात."

"**ज्ञानं बन्धः।।२।।**" अर्थात् "अज्ञान म्हणजे परमेश्वरस्वातंत्र्याचे आवरक व आत्मानात्म्याचे अपूर्ण ज्ञान होय." याला आणवमल हे नाव आहे. हे संसारकारण असलेल्या अशा मायीयमलाचे परंपरेने कारण होय. मल म्हणजे अज्ञानरूपी अंधार होय. हा मल श्रीपरमेश्वराच्या स्वातंत्र्यरूपाने उल्लसित होणाऱ्या स्वरूपाला झाकून टाकून गुप्त ठेवतो. आत्मा व अनात्मा यांच्या विषयींचा खोटा अभिमान व त्यांच्या स्वभावाविषयीच्या अपूर्ण ज्ञानाला आणवमल असे म्हणतात. संसाराच्या सर्व भिन्न भिन्न वेद्यप्रथा या माया या नावाने प्रसिद्ध आहेत. अशा मायीयमलाचे स्वरूप "**संसारकारणं कर्म संसाराङ्कुर उच्यते।।**" अर्थात् "या संसाराचे कारण असलेल्या कर्मालाच संसारांकुर असे म्हणतात," असे आहे. मायीयमलापासून कार्ममल व कार्ममलापासून आणवमल उत्पन्न होतो. जरी अज्ञानाला पौरुष व बौद्धमल हे दोन मल कारणीभूत असले तरी येथे पौरुषमल विवक्षित असून बौद्धमल कारणीभूत नाही. पौरुषमलच संसारांकुराला विशेषत्वाने कारणीभूत होतो असे सूचित केले आहे.

या दृष्टीने श्रीअभिनवगुप्तपादाचार्य यांनी असे म्हटले आहे की -

**विशेषणेन बुद्धिस्थे संसारोत्तरकालिके।**
**संभावनां निरस्यैतदभावे मोक्षमब्रवीत्।।**

**अर्थ :-** संसाराच्या काळात बुद्धीमध्ये स्थित असणाऱ्या विशेषणाने संभावनेचा निरास करावा. याच्या अभावात "मोक्ष" आहे असे म्हटले जाते.

"**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथामध्ये बंधाचे स्वरूप सांगताना असे म्हटले आहे की, "श्रीपरमेश्वराने स्वस्वातंत्र्यशक्तीने आभासित स्वरूपाचे गुप्तत्व राखण्यासाठी महामायेची निर्मिती केली. माया ही श्रीशिवतत्त्व सोडून सर्वांना झाकणारी व "**मायोपरि महामाया।।**" अर्थात् "मायेच्यावर असलेली महामाया ही श्रीशिवतत्त्व व श्रीशिवस्वातंत्र्य यांचे गुप्तत्व ठेवणारी अशी

आहे." महामाया ही आकाशाप्रमाणे स्वच्छ अशा आत्म्याच्या ठिकाणी श्रीशिव ते मायाप्रमाता जो जीव येथपर्यंतचा संकोच भासविते. हेच श्रीशिवांच्या अभेदाचे अज्ञान असून "मी अपूर्ण आहे" असे ज्ञान म्हणजे बंध होय. मलाच्या आत्मव्यतिरिक्तत्वाचे व्याख्यान आम्ही "**श्रीस्वच्छंदोद्योत**" या ग्रंथात पंचमपटलगत दीक्षाविचारात विस्ताराने केले आहे. हा सूत्रार्थ "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील "**निजाशुद्ध्या .... ।।१.९।।**" या कारिकांशात संगृहित आहे. अशा प्रकारे परमात्म्याचे अनात्माभिमानरूप अज्ञान हेच केवळ बंध नसून अनात्मे जे शरीरादि यांना आत्मा समजण्याचे अज्ञानमूलक ज्ञानही बंधच होय. हे "**परामृतरसापाय...... ।।४.४६।।**" या कारिकेत ग्रथित आहे.

उपरोक्त "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील मूळ कारिका पुढीलप्रमाणे आहेत.

**निजाशुद्ध्यासमर्थस्य कर्तव्येष्वाभिलाषिणः ।**
**यदा क्षोभः प्रलीयेत तदा स्यात्परमं पदम् ।।१.९।।**
**परामृतरसापायस्तस्य यः प्रत्ययोद्भवः ।**
**तेनास्वतन्त्र्यतामेति स च तन्मात्रगोचरः ।।४.४६।।**

**अर्थ :-** स्वतःच्या आत्मगत अशुद्धीमुळे अर्थात् आणवमलामुळे संसारामधील वासनात्मक कर्मांच्या अभिलाषांमध्ये किंवा इच्छांमध्ये पडलेल्या अर्थात् कार्ममलाने लिप्त झालेल्या मर्यादित सामर्थ्याच्या अर्थात् पूर्ण सामर्थ्य नसलेल्या पुरुषाच्या क्षुब्धवृत्ती आणि माया अर्थात् मल, अहंकार व भेदबुद्धी नाहीशी झाल्यावर त्या पुरुषाला परमपद प्राप्त होते.।।१.९।।

श्रीशिवांच्या निर्विकल्प स्वरूपामध्ये विकल्पज्ञानाचा उदय होणे अर्थात् प्रत्ययोद्भव होणे हेच श्रीशिवांचे परामृतरसापासून अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्य या अवस्थेपासून भ्रष्ट होणे होय. यामुळे श्रीशिव स्वतःचे स्वातंत्र्य गमवतात व परतंत्र बनतात. त्यामुळे श्रीशिवांना विकल्पज्ञानाविषयी अर्थात् पाच तन्मात्रांविषयी अर्थात् संपूर्ण जगताविषयी अभिलाषा निर्माण होते.।।४.४६।।

अशा रीतीने चैतन्य शब्दाने स्वातंत्र्यात्मक रूप सांगितले आहे. चिदात्म्याला अपूर्ण समजणे व देहादिकांना आत्मा समजणे असे दोन प्रकारचे आणवमल "**ज्ञानं बन्धः ।।२।।**" या सूत्राने सांगितले आहेत.

आणवमल हा पौरुष आणि बौद्ध असा दोन प्रकारचा असतो. जो "स्व" मध्ये निर्माण होतो त्याला पौरुष आणवमल असे म्हणतात. जो बुद्धीमध्ये निर्माण होतो त्याला बौद्ध आणवमल असे म्हणतात. येथे सांगितलेले अज्ञान

म्हणजे पौरुष अज्ञान अर्थात् अबोधत्व असून ते जीवाच्या खऱ्या स्वभावाचे निदर्शक आहे व ते एका जीवातच निर्माण होते.

"**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथात या दृष्टीने असे म्हटले आहे की -

**स्वातन्त्र्यहानिर्बोधस्य स्वातन्त्र्यास्याप्यबोधता।**
**द्विधाणवं मलमिदं स्वस्वरूपहानिता।।**

**अर्थ** :- स्वस्वरूपाच्या अज्ञानामुळे बोधाची स्वातंत्र्यहानी व देहादि-स्वातंत्र्याचे अज्ञान असे दोन आणवमल आहेत.।।२।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

आत्म्याच्या आवरणाच्या उपन्यासाचे सूत्र श्रीमहेश्वर असे सांगतात की, "**ज्ञानं बन्धः।।२।।**" अर्थात् "ज्ञान म्हणजे संकुचित ज्ञान हाच बंध होय." ।।१५.५।।

भेद दाखविणारे "मी" आहे व "हे माझे आहे" असे जे शब्दामुळे होणारे मायेसंबंधीचे मलमूलक ज्ञान आहे तेच बंधन होय. अविद्या हे त्या आवरणाचे स्वरूप होय.।।१६-१७।।

**विवरण** :- "मी आहे" हे ज्ञान बंधन आहे. त्याचप्रमाणे जे ज्ञान आत्मज्ञानाशिवाय बाहेरून गोळा केले जाते ते ज्ञानच बंधन आहे. जे शास्त्रां-मधून घेतले आहे, जे श्रीसद्गुरूंकडून उधार घेतले आहे आणि जी स्मृती आहे ते सर्व बंधन आहे. त्यापासून मुक्ती मिळणार नाही. त्यामुळे साधकभक्तयोगि-शिष्याने अशा गोष्टीचा शोध घेतला पाहिजे की, जे त्याचे स्वतःचे असेल. त्याच्या आंत जो चैतन्याचा झरा आहे व जो त्याला कोणाकडूनही मिळालेला नाही, त्याचा त्याने शोध घेतला पाहिजे अर्थात् चैतन्याने युक्त अशा आत्म्याचा शोध घेतला पाहिजे अर्थात् त्याचे यथार्थ ज्ञान करून घेतले पाहिजे म्हणजे मग बंधनातून मुक्तता मिळेल.

तात्पर्य असे आहे की, "अहमिदम्" अर्थात् "मीच आहे" असे जे ज्ञान ते बंधन आहे. येथे ज्ञान याचा अर्थ ब्रह्म किंवा आत्मज्ञान नाही. चित्स्वरूप आत्मा स्वतः ज्ञानस्वरूप आहे. त्यामुळे त्या चैतन्ययुक्त प्रकाशात जाणण्याची शक्ती अर्थात् ज्ञान विद्यमान आहे. जीव त्या चैतन्यप्रकाशयुक्त चित्ताशी तादात्म्य पावून अर्थात् एकरूप होऊन इंद्रियादींद्वारा बाह्य विषयांचा ज्ञाता होत असतो अर्थात् विषयांचे ज्ञान मिळवीत असतो. त्यामुळे चित्ताची निर्विषय अवस्था हीच शुद्धज्ञानाची अवस्था आहे. चित्ताची बाह्यज्ञानयुक्त अवस्था सविषय असून ते इदं विमर्षोन्मेष म्हणजे पिंडब्रह्मांडाच्या उभारणीने

युक्त आहे. विद्याकलेमध्ये मायेची पाच कंचुके म्हणजे पाच आवरणे अर्थात् कला, काल, नियती, विद्या आणि राग हे असतात. येथे काल, कला व नियतीचे ज्ञान करून देणारी विद्या ही सविषयी ज्ञानाची वाचक आहे. हीच विद्या ज्यावेळेला राग म्हणजे संसाराच्या प्रेमाने किंवा आकर्षणाने युक्त असते त्यावेळेला ती बंधनाचे कारण होते. त्यामुळे ज्ञानाला बंधन असे म्हटले आहे. आत्मा ज्ञानस्वरूप आहे. चित्ताच्या संयोगाने चित्तावर आत्म्याच्या चैतन्याचा भाव व्यक्त होतो. तो बाह्य विषयांकडे किंवा जाणिवांकडे प्रवृत्त झाल्यामुळे ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान या त्रिपुटीच्या बंधनात येऊन पडतो अर्थात् ज्ञातृ म्हणजे जीवभावात चैतन्यरूप आत्मा चित्ताशी तादात्म्य पावून स्वतःलाच ज्ञाता समजू लागतो. अशा प्रकारे त्याच्यात अणुचित्ताशी तादात्म्य पावल्यामुळे अणुत्वाचे ज्ञान आणि चित्ताच्या विषयांचे अल्पज्ञान झाल्यामुळे अल्पज्ञत्त्व येते. हे दोन्हीही बंधनस्वरूप आहे.

**विवरणात्मक टीपा :-**

"**ज्ञानं बन्धः।।२।।**" या सूत्रात आलेल्या काही महत्त्वाच्या शब्दांचे अर्थ खालीलप्रमाणे आहेत.

**(१) मायाप्रमाता :-** मायाप्रमाता म्हणजे मायेच्या प्रभावाखाली असणारा जीव होय. प्रलयाकल आणि सकल हे मायाप्रमात्यातच समाविष्ट होतात.

**(२) महामाया :-** महामायेच्या दोन अवस्था आहेत. एक म्हणजे अपरा आणि दुसरी म्हणजे परा होय.

**(अ) अपरामहामाया :-** ही शुद्धविद्येच्याखाली आणि मायेच्या वर प्रकाशित होते. यात विज्ञानाकल स्थिर झालेला असतो. ही अपरामहामाया जीवाची मानसिकता दाखविते. त्यामुळे म्हणजेच त्या मानसिकतेमुळे त्या जीवाला शुद्ध प्रकाश किंवा शुद्ध ज्ञानाची प्राप्ती होते; परंतु ते ज्ञान परमात्म्याच्या ज्ञानाने विरहित असते.

**(ब) परामहामाया :-** ही शुद्धविद्येच्या खालची अवस्था असून येथे श्रीविद्येश्वर स्थिर झालेले असतात. जरी हे श्रीविद्येश्वर स्वतःला शुद्ध चैतन्य समजत असले तरी अजूनही ते त्यांच्याकडून भिन्न वस्तूंचा विचार करीत असतात अर्थात् त्यांना आत्म्याहून इतर वस्तूंच्या भिन्नत्वाची प्रचीती येत असते.

**(३) अज्ञान :-** अज्ञानाचे दोन प्रकार आहेत. "**आत्मनि अनात्मा-भिमान।।**" अर्थात् "आत्म्याला अनात्मा समजणे अर्थात् आत्मा न समजणे"

हा एक प्रकार होय. दुसरा प्रकार म्हणजे "**अनात्मनि आत्माभिमान।।**" अर्थात् "अनात्म्याला अर्थात् शरीर इत्यादींना आत्मा समजणे" हा होय.

**या श्रीशिवपद्धतीत अज्ञान म्हणजे ज्ञानाचा पूर्ण अभाव नसून अज्ञान म्हणजे संकुचित ज्ञान अर्थात् अपरिपूर्ण, मर्यादित, अर्धवट व अपूर्ण ज्ञान होय.**

**(४) विज्ञानाकल :-** विज्ञानाकल म्हणजे शुद्धविद्येच्या खालचे; परंतु मायेच्या वरचे तत्त्व होय. त्याच्यात पूर्ण ज्ञान असते; परंतु साधन नसते. ते मायीयमल आणि कार्ममल यांनी विरहित असते; परंतु आणवमल मात्र त्याच्याशी संबंधित असतो.

**(५) स्वस्वरूप :-** स्वस्वरूप हे ज्ञान आणि क्रिया यांच्या पूर्ण स्वातंत्र्याने युक्त असते.।।२।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**ज्ञानं बन्धः।।२।।**" अर्थात् "विषयांचे ज्ञान हाच बंध होय किंवा अकारासंबधाचे अर्थात् "अ" म्हणजे श्रीशिव व त्यांच्या शक्तियुक्त स्वरूपाचे अज्ञान म्हणजे "बंध" अर्थात् बंधन होय."

"**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**मलमज्ञानमिच्छन्ति संसाराङ्कुरकारणम्।**

**अर्थ :-** अज्ञानरूप मल हाच संसाररूपी अंकुराचे कारण आहे किंवा मलरूप अज्ञान हेच संसाराला कारणीभूत होणारे आहे.

मायाप्रपंचही बंध व कर्मजन्य मलही बंधच होय.।।२।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा रीतीने स्थावरजंगमविश्वाचे चैतन्य हेच जर शरीर असेल तर या विश्वाला बंधाचा संबंध कसा आला? अशी कोणाला शंका आली तर ती घालविण्यासाठी प्रश्लेष व अश्लेष पाठाने म्हणजे संबंध व असंबंध या दृष्टीने एक सूत्र श्रीमहेश्वरांनी जे सांगितले आहे ते असे आहे.।।१४।।

"**ज्ञानं बन्धः।।२।।**" अर्थात् "चैतन्यस्वरूपाविषयीचे अज्ञान हे आत्म-बंधाचे किंवा बंधनाचे मुख्य कारण आहे."।।१४.५।।

आत्मवस्तूला अनात्मा समजणे व अनात्म अशा देहादिकांना आत्मा समजणे हे दोन्ही प्रकारचे ज्ञान यालाच या शास्त्रात "आणवमल" असे म्हणतात. हा आणवमल स्वकल्पित आहे. यालाच स्वइच्छेने भावना केलेला बंध असे म्हणतात.।।१५-१६।।

हा "आणवमल" म्हणजे बंध आहे का? या प्रश्नाचे उत्तर "आणवमल" हा बंध नव्हे असेच आहे.।।२।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

जर चेतन आणि जड असे स्वरूप असणाऱ्या समस्त विश्वाचे अनुत्तरतत्त्व अर्थात् सर्वांच्या पलीकडचे असे तत्त्व हे स्वरूप असणारे श्रीपरमशिवरूप चैतन्यच स्वभाव असेल तर हा संसाररूपी बंध कसा काय असू शकतो? अशी शंका दूर करण्यासाठी संहितापाठाचा स्वीकार अथवा विभागाचा अवलंब करून अकारप्रश्लेषाद्वारा "**ज्ञानं बन्धः।।२।।**" हे सूत्र कथन केले आहे. जर संहितापाठ स्वीकारला तर "**चैतन्यमात्माज्ञानं बन्धः।।**" असे एकच सूत्र होईल. जर संहितापाठ घेतला नाही तर सूत्रपाठाप्रमाणे दोन सूत्रे होतील. अशा स्थितीत अकारप्रश्लेषाने संहितेच्या अभावाच्या स्थितीत "**अज्ञानं बन्धः।।**" असे स्वीकारावे लागते. ज्ञान म्हणजे शरीरात आत्मबुद्धी अर्थात् शरीर म्हणजे मी नसून आत्मा म्हणजे मी आहे अशी बुद्धी किंवा जाणीव होय आणि आत्म्यात शरीरबुद्धी अर्थात् आत्म्याला शरीर समजणे हे अध्यासात्मक ज्ञान हाच बंध असून तोच संसाराला कारणीभूत होत असतो. अकाराचा प्रश्लेष केला असता अर्थात् अकार अधिक आणला असता "**अज्ञानं बन्धः।।**" अर्थात् "अज्ञान हेच बंधाला कारणीभूत होते," असा सूत्राचा अर्थ होतो.

अज्ञान म्हणजे माया होय. ही अघटितघटनापटीयसी अविद्या अर्थात् कधीही न घडणारे घडवून आणण्यात पटाईत असणारी अविद्या जीवात्म्याला स्वस्वरूप अशा परम श्रीशिवस्वरूपापासून खाली आणून त्याला उत्तरोत्तर संसारसागराच्या हजारो लाटांच्या जाळ्यांमध्ये टाकते अर्थात् निमज्जन म्हणजे बुडविणे व उन्मज्जन म्हणजे वर काढणे करविते.

यामुळेच "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या तंत्रग्रंथात असे म्हटले आहे की -

**मलमज्ञानमिच्छन्ति संसाराङ्कुरकारणम्।।१.२३।।**

**अर्थ :-** संसाराचा अंकुर उत्पन्न होण्याचे कारण म्हणून अज्ञानरूपी मलाची इच्छा करतात अर्थात् मलरूप अज्ञान हेच संसाराला कारणीभूत होणारे आहे.

त्याचप्रमाणे "**श्रीसर्वाचार**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**अज्ञानाद्बध्यते लोकस्ततः सृष्टिश्च संहृतिः।।**

**अर्थ :-** अज्ञानामुळे सर्व लोक बद्ध होतात आणि त्याच्यापासूनच सृष्टी

व संहार होतात.

हा तादात्म्याचा अर्थात् आत्मा म्हणजेच शरीर होय असा अध्यासात्मक मल श्रीपरमशिवतत्त्वाला झाकत नाही; तर जीवात्म्याला "आपण म्हणजे श्रीपरमशिवतत्त्वच आहोत," असे अभेदज्ञान होण्यापूर्वीच आवरण घालून टाकतो.।।२।।

## सूत्र क्रमांक ३

**संबंध :-** या श्रीशैवमतात संपूर्ण ज्ञानाभाव मानला नाही. श्रीशिवांच्या पिधानशक्तीमुळे अर्थात् महाशक्तीमुळे जीवाचे ज्ञान मर्यादित होते व त्याला "अणुत्व" येते. "**अण्**" या संस्कृत धातूचा अर्थ श्वासोच्छ्वास करणे असा आहे आणि "**अणिति श्वसति इति अणुः ।।**" म्हणजे "श्वासोच्छ्वास करणारा "जीव" अथवा "अणू" होय." या अणूच्या ठिकाणी "पुर्यष्टक" म्हणजे लिंगशरीर व प्राण असतात. अणुत्वामुळे येणारा बंध अर्थात् मल म्हणजे "आणवमल" हा अनादि पण सांत असतो. या बंधामुळे शरीर हे जरी आत्मा नसले तरी ते आत्मा असल्यासारखे वाटते; पण केवळ "आणवमल" हा एकच मल जीवाला मर्यादित करीत नाही; तर आणखी दोन मल किंवा बंध आहेत हे पुढील सूत्रात सांगतात म्हणजेच अशा प्रकारे मागच्या सूत्रात वर्णन केलेला आणवमलयुक्त अर्थात् भेदज्ञानाने युक्त आत्माच बंधन आहे का? असे विचारले असता "नाही" असे उत्तर देऊन पुढील सूत्र सांगतात.

**योनिवर्गः कलाशरीरम्।।३।।**

**शब्दार्थ :- योनि :-** सर्व जगाचे उत्पत्तिस्थान, माया किंवा भेदप्रथेचा हेतू असलेली मायारूप कुंडलिनी शक्ती. **वर्गः** - समुदाय. **योनिवर्गः** - विश्वाचे कारण असलेल्या मायेने म्हणजे कुंडलिनी शक्तीने निर्माण केलेल्या पंचमहाभूतादि तत्त्वांचा समुदाय. हा मायेपासून म्हणजे कुंडलिनी शक्तीपासून निर्माण झालेला "**मायीयमल**" होय. **कला :-** जगातील वस्तुजात भिन्न भिन्न आहेत असे जाणण्याची क्रिया. **कलाशरीरम् :-** क्रिया किंवा कर्म हे ज्याचे शरीर आहे असा कर्मापासून उत्पन्न होणारा "**कार्ममल**" किंवा कलातत्त्वापासून पृथ्वीतत्त्वापर्यंत शुभाशुभमय असा बंधनाचा हेतू असणारा व्यापार.

**अर्थ :-** मायेपासून म्हणजे कुंडलिनी शक्तीपासून उत्पन्न होणारा "मायीय" म्हणजे विविधतेच्या हेतूने प्रपंच, संसार किंवा पिंडब्रह्मांडाच्या रूपाने पसरणे हे मायीयमलरूप बंधन आहे आणि कर्मापासून निर्माण होणारा "कार्म" म्हणजे कलातत्त्वापासून पृथ्वीतत्त्वापर्यंत जो शुभाशुभ-वासनामय व्यापार

असतो तोही कार्ममलरूप बंधनाचा हेतू असतो. असे हे आणखी दोन मल किंवा बंध आहेत अर्थात् योनिवर्ग म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या बहिर्मुख विविध शक्ती या जीवाला कामोपभोगाकांक्षावासना-इच्छातृष्णासंकल्पादींनी संसारात गुंतविणाऱ्या असून त्याच तिच्या शरीर-रूपाने असणाऱ्या कला म्हणजे उपशक्ती आहेत.।।३।।

**विशेष व्याख्या :-** मायेचा समूह हाच भेदाला, द्वैताला किंवा भिन्नतेला कारण असतो. वेद्यवर्गात म्हणजे जाणावयाच्या तत्त्वामध्ये भिन्नतेच्या ज्ञानालाच मायीयमल असे म्हणतात. यामुळे "हे," "ते" व "मी" हे ज्ञानही बंधनच आहे. अशा प्रकारे आपल्या स्वस्वरूपाचा म्हणजे आत्मस्वरूपाचा संकोच करणाऱ्या शक्तीला मायाशक्ती असे म्हणतात.

ज्यावेळी जीवात "मी सुखी आहे," "मी दुःखी आहे," इत्यादि शुभ व अशुभ वासना उत्पन्न होतात त्यावेळी त्याला "कार्ममल" असे म्हणतात. या कार्ममलात जन्म आणि भोग देणाऱ्या कर्त्याचा जीवात्मा अबोध अवस्थेत राहतो. हेही जीवाच्या बंधनाचे कारण आहे.

**विशेष :-** योनी म्हणजे वस्तुयुक्त जगाचा आरंभ म्हणजेच मूळ स्रोत अर्थात् मायारूप कुंडलिनी शक्ती आणि वर्ग म्हणजे या शक्तीचा तत्त्वसमूह होय. त्यामुळे योनिवर्ग याचा एकत्रित अर्थ माया आणि ती ज्या तत्त्वसमूहाला निर्माण करते आणि त्याद्वारे या जगाचा मूळ स्रोत बनते ते कुंडलिनी तत्त्व होय.

कला म्हणजे क्रिया किंवा कर्म आणि शरीर म्हणजे आकार होय. कलाशरीर म्हणजे ज्याचा आकार क्रियायुक्त किंवा कर्मात्मक आहे अर्थात् ज्या क्रियेतून किंवा कर्मामुळे हे जग व्यवहाराला उद्युक्त होते ते तत्त्व होय.

तात्पर्य असे आहे की, योनिवर्ग म्हणजे मायीय बंध आणि कलाशरीर म्हणजे कार्ममल होय. "बंधः" हे येथेही अनुस्यूत करावयाचे असल्याने या सूत्राचा अर्थ मायीयमल आणि कार्ममल हे दोन्हीही बंध आहेत असा होतो.

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

"**योनिवर्गः कलाशरीरम्।।३।।**" अर्थात् "विश्वयोनी मायेचा साक्षात्संबंधी व पारंपारिकसंबंधी हा देह असून त्यालाच भुवनादिकांचा हेतू व कलादिपृथ्वीपर्यंत असणाऱ्या समुदायाचा हेतुरूप "**मायीयमल**" असे म्हणतात आणि स्वस्वरूपाने वस्तूला वेगळे दाखविण्याची क्रिया म्हणजे कला हेच ज्याचे शरीर आहे तो "**कार्ममल**" होय." हे दोन मल बंधच होत.

या दृष्टीने "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**निजाशुद्ध्यासमर्थस्य कर्तव्येष्वभिलाषिणः।**
**यदा क्षोभः प्रलीयेत तदा स्यात्परमं पदम्।।१.९।।**

**अर्थ :-** स्वतःच्या आत्मगत अशुद्धीमुळे अर्थात् आणवमलामुळे संसारामधील वासनात्मक कर्मांच्या अभिलाषांमध्ये किंवा इच्छेमध्ये पडलेल्या अर्थात् कार्ममलाने लिप्त झालेल्या मर्यादित सामर्थ्याच्या अर्थात् पूर्ण सामर्थ्य नसलेल्या पुरुषाच्या क्षुब्धवृत्ती आणि माया अर्थात् मल, अहंकार व भेदबुद्धी नाहीशी झाल्यावर त्या पुरुषाला परमपद प्राप्त होत असते.।।१.९।।

या दोन मलांचा अंतर्भाव बंधात आहे. आम्ही केलेल्या स्पंदनिर्णयावरूनही हे जाणून घ्यावे. या कलादिकांचे किंचित्कर्तृत्वस्वरूप आणवमलावर उमटलेले असते. ते जीवाचे आवरक आहे म्हणून त्याला मलत्व आहे.

"**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**मलप्रध्वस्तचैतन्यं कलाविद्यासमाश्रितम्।**
**रागेण रञ्जितात्मनं कालेन कलितं तथा।।**
**नियत्या यमितं भूयः पुंभावेनोपबृंहितम्।**
**प्रधानसंशयसम्पन्नं गुणत्रयसमन्वितम्।।**
**बुद्धितत्त्वसमासीनमहङ्कारसमावृतम्।**
**मनसा बुद्धिकर्माक्षैस्तन्मात्रैः स्थूलभूतकैः।।**

**अर्थ :-** मलाने लडबडलेले चैतन्य कलेचा आश्रय करते, अनुरागाने रंगते, कालाने उपहित म्हणजेच उपाधियुक्त होते, नियतीने म्हणजेच धर्माधर्माने जखडले जाते, पुरुषभावनेने पुष्ट होते, प्रकृतित्रिगुणाने युक्त होते आणि नंतर बुद्धी, अहंकार, मन, ज्ञानेंद्रिय, कर्मेंद्रिय, तन्मात्र व स्थूलपंचमहाभूत यांनी युक्त होते.

"**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात कार्ममलाचे आवरकत्व पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे. "**धर्माधर्मात्मकं कर्म सुखदुःखादिलक्षणम्।।**" अर्थात् "धर्माधर्मात्मक कर्म हेच सुखदुःखादींचे लक्षण होय."

"**श्रीअध्यात्मनय**" या ग्रंथात आणवमल, मायीयमल व कार्ममल यांचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे.

**गोपितस्वहिन्मोस्य सम्मोहाद्विस्मृतात्मनः।**
**सः सङ्कोचः स एवास्य आणवो मल उच्यते।।१।।**
**ततः षट्कञ्चुकव्याप्ति विलोपितनिजस्थितेः।**
**भूतदेहे स्थितिर्यासौ मायीयो मल उच्यते।।२।।**

**यदन्तःकरणाधीनारब्धिकर्मेन्द्रियादिभिः।**
**बहिर्व्याप्रियते कार्मं मलमेतस्य तन्मतम्।।३।।**

**अर्थ :-**

**आणवमल :-** स्वतःचे महत्त्व गुप्त ठेवणाऱ्या या जीवात्म्याला मोहाने आत्मविस्मृती होते व शक्तिसंकोच होतो. या स्थितीला आणवमल असे म्हणतात.।।१।।

**मायीयमल :-** सहा आवरणांनी झाकलेल्या जीवाची या भूतनिर्मित-देहात स्थिती असणे याला मायीयमल असे म्हणतात.।।२।।

**कार्ममल :-** अंतःकरणाधीन कर्मेंद्रियांच्या बाह्य व्यापाराला कार्ममल असे म्हणतात.।।३।।

मी ज्योतिष्टोमयाजी आहे म्हणून स्वर्गाला जाईन व हा अमुक अशुभ अर्थात् वाईट कर्मे करणारा म्हणून नरकात जाईल अशी दोन्ही प्रकारची धर्माधर्मात्मक कर्मे आवरक आहेत. **"भिन्नवेद्यप्रथात्रैव" मायाख्यं जन्म-भोगदम्। कर्तर्यबोधे कार्मं च ....।।"** अर्थात् "मायीयमल जन्मभोग देणारे व कार्ममल कर्त्याला अज्ञात ठेवणारे असतात," असे **"श्रीईश्वर-प्रत्यभिज्ञा"** या ग्रंथात म्हटले आहे. सगळे मल ज्ञानाला संकुचित करणारे आहेत.।।३।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

शब्दानुबंधाचे कारण कोणते किंवा काय आहे यावर श्रीमहादेवांनी पशूला म्हणजेच अज्ञ जीवाला मोहित करणाऱ्या कलांचे प्रतिपादक असे जे एक सूत्र सांगितले ते **"योनिवर्गः कलाशरीरम्।।३।।"** अर्थात् "शक्तिसमुदाय हे कलाशरीर होय," असे आहे.।।१८।।

योनी म्हणजे शक्ती होय. ती एकूण चार प्रकारची असून सर्वांचे कारण म्हणजे हेतुभूत आहे. त्यांची नावे अंबा, ज्येष्ठा, रौद्री आणि वामा अशी असून त्या सर्व श्रीशिवांच्या मूर्ती आहेत.।।१९।।

त्यांचा वर्ग म्हणजे समुदाय हे कलांचे शरीर असून "अ" पासून "क्ष" पर्यंत सर्व कला शब्दांचे कारण होत.।।२०।।

"माता" या दैवी शक्ती होत. त्यांची किरणे या कला मानल्या आहेत. या कला शब्दरूपाने पशूला म्हणजे जीवाला ज्ञान करून देतात.।।२१।।

त्यामुळे हा पशू त्यांचा भोग्य म्हणजे विषय होतो व त्याने उत्पन्न केलेल्या ज्ञानाभासाने स्व-वैभव म्हणजे स्व-ऐश्वर्य नेहमी लुप्त होते म्हणजे

झाकलेले राहते.।।२२।।

हे सूत्र श्रीभट्टभास्कराचार्यांनी श्रीक्षेमराजाचार्यांपेक्षा वेगळ्या पद्धतीने मांडले आहे.

**विवरण :-** दुसरे "**ज्ञानं बन्धः।।१.२।।**" हे सूत्र असे सांगते की, जीव त्याच्यात असलेल्या आणवमलामुळे बंधनात पडतो. परंतु या सूत्राने असे सांगितले आहे की, फक्त आणवमलच नाही तर मायीयमल आणि कार्ममल हे दोन्हीही जीवाला बंधनात टाकतात. मायीयमल जीवाला भौतिक आणि मानसिक माध्यम पुरवितो आणि त्यात तो जीव अडकून पडतो. कार्ममल त्याला सतत कर्मे करावयाला भाग पाडतो. हे कार्मिक बल जीवाला सारखे सारखे या पृथ्वीवर येण्याला बाध्य करते.

या सर्वांचे तात्पर्य असे आहे की, बंधनाचे कारण माया ही असून त्या मायेचे वर्गीकरण पाच कंचुकांनुसार केले जाते. त्यांचे तीन श्रेण्यांमध्ये वर्गीकरण केले आहे. मलाचे मायामल, आणवमल आणि कर्तृत्त्व-भोक्तृत्त्वमल हे तीन प्रकार आहेत. या तीन मलांमुळेच बाह्य ज्ञान जीवाला बंधनात पाडते. कला, चित्त आणि शरीर ही क्रमशः तीनही प्रकारच्या मलांचे कारण आहेत. शरीराद्वारे कर्ता व भोक्ता यांचा उदय होतो. चित्ताकडून समष्टिभाव हटवून व्यष्टिभावाचे अणुत्व निर्माण होते. या सर्वांचे कारण रागरूप मायाच आहे. "**श्रीपांतजलयोगदर्शन**" या ग्रंथात अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि अभिनिवेश या पाच क्लेशयुक्त चित्तवृत्तींना क्लिष्टा आणि पाच क्लेशरहित वृत्तींना अक्लिष्टा असे म्हणतात. पाच क्लेशांमधील अविद्या ही बाकीच्या चार क्लेशांची भूमी आहे. अविद्या ही "माये"चीच पर्यायवाची आहे आणि अस्मिता ही चैतन्यभाव आहे. अभिनिवेश आणि विरोधी द्वेष हे दोन्हीही "रागा"च्याच अंतर्गत येतात.।।३।।

**विवरणात्मक टीपा :-**

या सूत्रात आलेले काही महत्त्वाचे शब्द खालीलप्रमाणे आहेत.

१. मायेचे पाच कंचुक किंवा आवरणे ही विद्या, राग, काल, नियती व कला या आहेत.

**(१) कला :-** कला ही साधनामध्ये सामर्थ्य किंवा श्रेष्ठत्व आणि अभावामध्ये कमीपणा किंवा मर्यादा आणते.

**(२) विद्या :-** विद्या ही ज्ञानाबद्दल कमीपणा किंवा मर्यादा आणते.

**(३) राग :-** राग हा एखाद्या वस्तूची इच्छा मनात जागृत करतो.

**(४) काळ :-** काळ हा समयाच्या किंवा वेळेच्या बाबतीत भूत, भविष्य आणि वर्तमान अशा मर्यादा दाखवितो.
**(५) नियती :-** नियती ही कारण, अवकाश आणि आकार यांच्याबाबतीत मर्यादा दाखविते.

२. मायेमुळे जो मल निर्माण होतो किंवा ज्या मर्यादा निर्माण होतात आणि ज्या स्थूल व सूक्ष्म शरीराला व्यापृत करून विभिन्न जाणीवा निर्माण करतात त्याला मायीयमल असे म्हणतात. कर्म किंवा क्रियेमुळे ज्या वासनांचे संस्कार मनावर शिल्लक राहतात त्याला कार्ममल असे म्हणतात.

३. मायाशक्ती ही श्रीशिवांशी एकरूप किंवा अनवच्छेद्य अशी शक्ती असून तिच्यामुळे ते श्रीशिव निरनिराळ्या स्वरूपात प्रकट होऊ शकतात. मायाशक्ती ही मायातत्त्वापासून निराळी आहे. निरनिराळ्या भौतिक गोष्टींचे किंवा वस्तूंचे मूळ ज्यात सामाविलेले असते त्याला मायातत्त्व असे म्हणतात.।।३।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"योनिवर्गः कलाशरीरम्।।३।।"** या सूत्राचा सारार्थ असा आहे की, "मायाप्रपंचही बंध आहे व कर्मजन्यमलही बंधच आहे. कला म्हणजे व्यापार होय आणि व्यापार म्हणजे थोडासा कर्तेपणा होय."।।३।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

आणवमल म्हणजेच बंध आहे का? असा जर कोणी प्रश्न विचारला तर तो मलच फक्त बंधन नव्हे हे सांगताना **"योनिवर्गः कलाशरीरम्।।३।।"** हे सूत्र श्रीशिवांनी कथन केले आहे.।।१६.५।।

**"श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा"** या ग्रंथात आणवमल, कार्ममल व मायीयमल अशा तिन्ही मलांचे विवेचन केले आहे. त्यातील आणवमलाचे विवेचन वर केले आहे. भेदज्ञानाला कारण अशी माया आणि मायेपासून उत्पन्न झालेल्या मायात्मक असा सूक्ष्मापासून ते पृथ्वीअखेर अत्यंत स्थूल अशा सर्व तत्त्व-समूहाला मायीयमल असे म्हटले आहे. या मायीयमलामुळे सर्व वस्तू परस्पर भिन्न आहेत असे ज्ञान होते.।।१७-२०।।

कला ते पृथ्वी अखेर सर्वांच्या शरीरामधील भिन्नतादर्शक व्यापार अर्थात् क्रिया किंवा व्यवहार म्हणजे देहाची सर्व कर्मे होत. या दोन्हींमध्ये बंध आहे. अशा रीतीने आणवमल, मायीयमल व कार्ममल हे तीनही मायाशक्तीचेच मल आहेत. ज्ञानाची स्वातंत्र्यहानी व स्वातंत्र्याचे अज्ञान हे दोन आणवमल

आहेत. हे दोन्ही मल स्वस्वरूपाचे ज्ञान होऊ देत नाहीत.।।२१।।

मायीयमलामुळे सगळे वेगवेगळे आहेत असे वाटते अर्थात् सर्व काही श्रीशिवस्वरूप किंवा एकरसरूप आहे असे वाटत नाही आणि कार्ममलामुळे जन्मादि सर्व भोग भोगविले जातात व तो कर्त्याचे म्हणजे श्रीईश्वरादिकांचे ज्ञान होऊ देत नाही.।।३।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

हा बंध म्हणजे फक्त मायीय मलच आहे का? अशी शंका निर्माण झाली असता त्यावर उत्तर देताना सूत्रकार असे म्हणतात की, नाही; कारण "**योनिवर्गः कलाशरीरम्।।३।।**" या सूत्रानुसार "मायीय आणि कार्म असे आणखी दोन मल आहेत."

योनी म्हणजे शक्ती होत. त्या चार प्रकारच्या असून त्याच या सर्व विश्वाचे कारण आहेत. त्यांची नावे अंबा, ज्येष्ठा, रौद्री आणि वामा अशी आहेत. या चारही श्रीशिवमूर्ती असून यांचा वर्ग म्हणजेच समूह होईल. सर्व कलांमध्ये या शक्ती अर्थात् मूर्ती म्हणजे शरीर होय. "अ"कारापासून "क्ष"कारापर्यंतचे सर्व वर्ण म्हणजे कला होत. त्याच शब्दांचे कारण आहेत. अंबादि देवता शक्तिस्वरूप असून कला या त्यांची किरणे होत. पशुस्वभावी जीवात्म्याला त्या शब्दांच्या अनुगमाने त्या त्या प्रत्ययांचे उद्भासन करून देतात. यामुळे हा जीवात्मा या कलांच्या भोग्यरूपतेला प्राप्त होतो अर्थात् तो त्या कलांकडून म्हणजे पर्यायाने शब्दांकडून अर्थात् शक्तींकडून भोगला जातो. ज्या प्रत्ययामुळे हा जीवात्मा भोग्यरूपत्वाला जातो त्याच्यापासूनच जीवात्म्याचे स्वाभाविक स्वरूप अर्थात् श्रीपरमशिवस्वरूप त्या प्रत्ययापासून उत्पन्न होणाऱ्या ज्ञानाच्या आभासामुळे लुप्त होते.।।३।।

## सूत्र क्रमांक ४

**संबंध :-** अज्ञान, मायीयमल आणि कार्ममल यांमुळे जीव बंधनात कसा पडतो हे खालील सूत्राने सांगितले आहे.

**ज्ञानाधिष्ठानं मातृका।।४।।**

**शब्दार्थ :- ज्ञान** - (वरील दुसऱ्या सूत्राप्रमाणे) संकुचित, मर्यादित ज्ञान किंवा द्वैतज्ञान. **अधिष्ठान** - बैठक, पाया. **ज्ञानाधिष्ठानम्** - (वर उल्लेखिलेल्या तीन मलांनी मर्यादित केलेली) ज्ञानाची बैठक किंवा मूलभूत आधार. **मातृका** - (अज्ञात) शब्दशक्ती किंवा बहिर्मुखतेला प्राप्त झालेली संवित् कुंडलिनी शक्ती अर्थात् अज्ञातामाता.

**अर्थ :-** ज्याच्यामुळे आपल्याला अपूर्णतेची जाणीव होते **(अपूर्णमन्यता)** तो आणवमल, ज्याच्यामुळे वस्तूवस्तूंतील भेदांची जाणीव होते **(भिन्नवस्तु-वेद्यप्रथा)** तो मायीयमल आणि ज्याच्यामुळे आपल्यात शुभाशुभ वासना निर्माण होऊन पाप व पुण्यात्मक कर्म हातून घडते तो **कार्ममल** होय. या तिन्ही मलांमुळे मर्यादित झालेल्या ज्ञानाचे अधिष्ठान "अ" ते "क्ष" या मातृका आहेत अर्थात् श्रीशिवरूप चेतनपदावरून खाली उतरून ज्ञानरूप कुंडलिनी शक्ती आणव, मायीय व कार्ममलाच्या द्वारा संकुचित होऊन जो बाह्यसंसारोन्मुखतेने व्यवहार करते त्याचे अधिष्ठान तिच्या रूपानेच असणाऱ्या "अ" ते "क्ष"पर्यंतच्या मातृका म्हणजे शब्दरूप उपशक्ती आहेत.।।४।।

**विशेष व्याख्या :-** मलामुळे मर्यादित झालेल्या ज्ञानाचे अधिष्ठान "अ" ते "क्ष" पर्यंतची मूळाक्षरे असून त्या अर्थात् मातृका किंवा शब्दशक्ती ही विश्वजननी आहे. ही शब्दशक्ती सूक्ष्मशरीरी असल्यामुळे तिचे स्वरूप अज्ञात आहे हे स्पष्ट करण्यासाठी येथे **"का"** (मातृ-का) प्रत्यय लावला आहे.

या शब्दशक्तीला माता म्हणण्याचे कारण असे आहे की, सर्व ज्ञान मुळा-क्षरांत सामावलेले असते. वरील मलत्रयामुळे जे मर्यादित ज्ञान होते ते या वर्णांच्या ध्वनिसामर्थ्यामुळे होत असल्यामुळे वर्णांना मातृका असे म्हटले आहे.

या तीन मलांच्या आवरणाने जीवाचे द्वैतज्ञान दृढ होते. त्यामुळे तो स्वात्म-विश्रांतिरूप अंतर्मुख भावापासून वेगळा होतो आणि बहिर्मुखतेच्या ज्ञानात स्वतःला विसरून जातो. हे सर्व अज्ञात संवित्मुळे होते. त्यामुळेच जीव बंधनात राहतो.

आपण विचार करताना आणवमलामुळे "मी अपूर्ण आहे," मायीय-मलामुळे "मी स्थूल किंवा कृश आहे" आणि कार्ममलामुळे "मी अग्निष्टोम करणारा आहे," असे सर्व विचार व मर्यादित ज्ञान हे "अ"पासून "क्ष"पर्यंतच्या माध्यमातून येते. तंत्रशास्त्रात (हे श्रीशैवमत तंत्राधिष्ठित आहे) प्रत्येक अक्षराला व मातृकेला देवता स्वरूप मानून या अक्षरांच्या अधिष्ठात्री देवता पुढील प्रमाणे मानल्या आहेत.

| **वर्ण (अक्षरे, मातृका)** | **अधिष्ठात्री देवता** |
|---|---|
| १. अ-वर्ग (सर्व स्वर) | महालक्ष्मी किंवा योगीश्वरी |
| २. क-वर्ग | ब्राह्मी |
| ३. च-वर्ग | माहेश्वरी |

| | |
|---|---|
| ४. ट-वर्ग | कौमारी |
| ५. त-वर्ग | वैष्णवी |
| ६. प-वर्ग | वाराही |
| ७. य-वर्ग (य,र,ल,व) | ऐंद्री, इंद्राणी |
| ८. श-वर्ग (श,ष,स,ह,क्ष) | चामुंडा |

या अधिष्ठात्या देवतांना "कला", "शक्ती" व "पीठेश्वरी" याही संज्ञा आहेत.

श्रीवसुगुप्ताचार्यांनी "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**शब्दराशिसमुत्थस्य शक्तिवर्गस्य भोग्यताम्।**
**कलाविलुप्तविभवो गतः सन् स पशुः स्मृतः।।३.४५।।**

**अर्थ :-** "अ"कारापासून "क्ष"कारापर्यंत जो अक्षरसमूह किंवा शब्द-राशी आहे त्यापासून निर्माण झालेल्या श्रीब्राह्मी, श्रीमाहेश्वरी इत्यादि देवता किंवा कला आहेत. जरी आत्मा वस्तुतः अनियंत्रित, मर्यादारहित स्वातंत्र्याचा पतिप्रमाता असला तरी त्या कलांनी म्हणजे शक्तींनी त्याचे वैभव नाहीसे केलेले असते. या कलांच्या किंवा शक्तिसमूहांच्या ताब्यात गेलेला आत्मा मूळचा श्रीईश्वरस्वरूप असला तरी पाशबद्ध "पशू" म्हटला जातो.।।३.४५।।

वर उल्लेखलेल्या श्रीब्राह्मी व श्रीमाहेश्वरी इत्यादि शक्तिदेवता पुरुषाचे म्हणजे आत्म्याचे जे मूळस्वरूप आहे त्यावर आवरण घालण्यासाठी नेहमीच उद्युक्त असतात. हे आवरण विकल्प ज्ञानाचे अर्थात् प्रत्ययोद्भवाचे असते आणि स्थूल किंवा सूक्ष्म शब्दांनी अनुस्यूत असल्याशिवाय विकल्पज्ञानाचा प्रत्यय किंवा निर्मिती होऊ शकत नाही.।।४।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अज्ञानात्मकज्ञान, योनिवर्ग आणि कलाशरीररूप त्रिविधमलांचे बंधकत्व कसे असते हे सांगताना श्रीशिवांनी "**ज्ञानाधिष्ठानं मातृका।।४।।**" हे सूत्र कथन केले आहे.

हे जे त्रिविधमलांचे स्वरूप सांगितले ते विविध प्रकारच्या ज्ञानाने युक्त आहे. स्वतःला अपूर्ण समजणे आणि वेद्यपदार्थ भिन्न आहेत हे ज्ञान व अशाच रीतीने शुभाशुभ वासनात्मक ज्ञान या सर्वांची अधिष्ठात्री देवता "मातृका" होय. मातृका म्हणजे अज्ञाता-माता होत. मातृका या शब्दातील "कः" प्रत्यय अज्ञातार्थी आहे. त्या "अ" ते "क्ष"पर्यंतच्या अक्षरसमूहाने युक्त आहेत. या मातृका विश्वजननी अर्थात् सर्वांना उत्पन्न करणाऱ्या आहेत. याच शोक, गर्व, हर्ष व अनुरागादि अनेक मनोविकारांना जन्म देणाऱ्या

अशा त्या त्या रूपाच्या आहेत. त्यामुळे आत्मज्ञानात संकोच होऊन मी अपूर्ण, कृश, स्थूल आहे, मी अग्निष्टोम यज्ञ करीत आहे इत्यादि ज्ञान होते. ही उदाहरणे आणवादि त्रिमलांची होत. हे ज्ञान सविकल्पक व निर्विकल्पक स्वरूपाचे असते. हे ज्ञान शब्दाशिवाय कधीच होत नाही. त्यामुळेच या मातृका भिन्नभिन्न शब्दजन्य आहेत. या मातृका कळल्या नाहीत तर बंधन-कारक आणि कळल्या तर सिद्धी देणाऱ्या आहेत.

या दृष्टीने "**श्रीतिमिरोद्धाट**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**करन्ध्रचितिमध्यस्था ब्रह्मपाशावलम्बिका।**
**पीठेश्वर्या महाघोरा मोहयन्ति मुहुर्मुहुः।।**

**अर्थ :-** चिद्गगनातल्या चितीच्या अर्थात् कुंडलिनी शक्तीच्या मध्यभागी राहणाऱ्या, ब्रह्मपाशावलंबिनी, पीठेश्वरी व महाघोर अशा या मातृका असून त्या वारंवार मोह उत्पन्न करणाऱ्या आहेत.

त्या "क"वर्गादि आठ वर्गांच्या, निवृत्त्यादि कलांच्या व कंठ, टाळू आदि सहा स्थानांच्या, ब्राह्मी आदि शक्तिमालिकेत शोभणाऱ्या, आगमातीत लिपीने ज्ञात होणाऱ्या, अघोर, घोर व घोरतर शक्तींच्या, अंबा, ज्येष्ठा, रौद्री व वामादि शक्तिसमूहयुक्त अशा मातृका आहेत. त्यांपैकी वामा ही तुर्यातीत व श्रेष्ठ अशी मातृकाशक्ती आहे. शक्तींच्या अधिष्ठानावर असलेली सर्व ज्ञाने आत्मज्ञानापासून दूर असल्याने बहिर्मुख आहेत. त्यामुळेच ती बंधनकारक आहेत.

हा विषय "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात पुढील प्रमाणे आला आहे.

**शब्दराशिसमुत्थस्य शक्तिवर्गस्य भोग्यताम्।**
**कलाविलुप्तविभवो गतः सन् स पशुः स्मृतः।।३.४५।।**
**स्वरूपावरणे चास्य शक्तयः सततोत्थिताः।**
**यतः शब्दानुवेधेन न विना प्रत्ययोद्भवः।।३.४७।।**

**अर्थ :-** शब्दराशीपासून अर्थात् "अ"पासून "क्ष"कारापर्यंतच्या वर्णसमुदायापासून निर्माण होणाऱ्या श्रीब्राह्मी, श्रीमाहेश्वरी इत्यादि देवता-समूहाच्या वशीभूत असलेल्या स्वतंत्र पतिप्रमात्याला किंवा परमेश्वराला किंवा श्रीशिवांनाच "पशुप्रमाता" अर्थात् जीव असे नाव दिलेले आहे. पशुप्रमाता या कलासमूहाला वश होण्यामागील कारण असे आहे की, कलासमूहाने परमेश्वराच्या असीम वैभवाला किंवा स्वातंत्र्याला पूर्णपणे नष्ट-भ्रष्ट केलेले असते.।।३.४५।।

**अर्थ :-** ही गोष्ट निश्चित आहे की, पूर्वी वर्णिलेल्या शक्ती या पुरुषाच्या किंवा आत्म्याच्या स्वरूपाला झाकून टाकण्यासाठी नेहमी उद्युक्त किंवा प्रयत्न-

शील असतात; कारण स्थूल व सूक्ष्म शब्दांनी अनुस्यूत झाल्याशिवाय प्रत्य-योद्भव अर्थात् विकल्पज्ञानाची निर्मिती होऊ शकत नाही.।।३.४७।।४।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

ज्ञानाच्या आभासाला आणि त्या कलांना कोणता आधार असतो असे म्हटल्यावर **"ज्ञानाधिष्ठानं मातृका।।४।।"** हे सूत्र सांगून "ज्ञानाधिष्ठान अर्थात् ज्ञानाधार ही मातृका अर्थात् शब्दशक्ती म्हणजे कुंडलिनी शक्ती होय," असे श्रीशिवांनी उत्तर दिले. पर आणि अपर अशा दोन प्रकारचे हे ज्ञान आहे. या दोन्ही प्रकारच्या ज्ञानाचा आधार आणि अधिष्ठान एकच शक्ती असून ती मातृकाशक्ती आहे.।।२३।।

अभेदाभास ही पराशक्ती आणि भेदज्ञापन अर्थात् भेदाचे ज्ञान करून देणे ही अपरशक्ती होय. या दोन प्रकारांमुळे परापररूपी ज्ञानही दोन प्रकारचे आहे. या उभय ज्ञानाची जननी विश्वमाता शक्तीच अधिष्ठात्री होय. त्यांपैकी परज्ञानाची अघोराशक्ती होय; कारण ही आतबाहेर स्वात्ममयत्वाची आभासिका आहे व अपरज्ञानाविषयी अभेदानुसंधानाच्या विकलतेमुळे बाह्योन्मुख करणारी घोरनावाची शक्ती होय. ही श्रीशिवतेची आच्छादिका म्हणजेच त्यांना झाकणारी होय.।।२४।।

**विवरण :-** "मातृका" यातला "का" हा प्रत्यय अज्ञानार्थी आहे. तो "मातृ" या शब्दाला लावला असता त्याचा अर्थ "न जाणली गेलेली अथवा न जाणता येणारी माता" असा होतो. मातृका ही पूर्ण वाणीचे सूक्ष्म रूप आहे. अक्षरे आणि त्यांचे अंतिम आवश्यक स्वरूप म्हणजे मातृका होत. ज्यावेळेला या मातृका अज्ञानरूप असतात त्यावेळेला त्या लोकांना सर्व जगातले व्यवहार करावयाला लावतात व भावना वगैरे जाणवून देण्याची शक्ती देतात आणि ज्यावेळेला या मातृका ज्ञानरूप होतात अर्थात् त्यांची शक्ती जाणता येते त्यावेळेला त्या साधकभक्तयोगिशिष्याला मुक्तीकडे नेतात.

एकूण तीन शक्ती आहेत. त्या घोर, घोरतर किंवा महाघोर आणि अघोर या नावांच्या आहेत. शक्ती या असंख्य असून त्या मानवांना भौतिक आनंद व सुख देतात आणि त्यांच्या आत्मिक प्रगतीत अडथळे निर्माण करतात. घोरतरशक्ती आणि महाघोरशक्ती या वैश्विक मनोवृत्ती असलेल्या मानवांना फसवितात आणि त्यांना जगाकडे जास्तीत जास्त प्रवृत्त करतात. अघोरशक्ती ही जीवांना मुक्तीच्या पथाकडे अग्रेसर करते.

कुंडलिनीशक्तीच्या वर्णमय रूपाचे नावच मातृकाशक्ती आहे. ती सरस्वती-

रूप वाक्शक्ती आहे. वर्णमालेला मातृका असे म्हणतात.

शक्तीची एकूण तीन रूपे आहेत. इच्छाशक्ती, ज्ञानशक्ती आणि क्रियाशक्ती ही या तीन रूपांची नावे आहेत. "**भावनोपनिषद्**" या ग्रंथात क्रियाशक्तीला पीठ अर्थात् आधार, ज्ञानशक्तीला कुंडलिनी आणि इच्छाशक्तीला महात्रिपुरसुंदरी असे म्हटले आहे.

या सूत्रात मातृकाशक्तीने ज्ञानशक्ती कुंडलिनी अभिप्रेत आहे. "**श्वेताश्वतरोपनिषद्**" या ग्रंथातल्या प्रथम अध्यायातील तिसऱ्या मंत्रात या शक्तीलाच देवात्मशक्ती असे म्हटले आहे. सहाव्या अध्यायातल्या आठव्या मंत्रात असे म्हटले आहे की -

**पराऽस्य शक्तिर्विविधैव श्रूयते।**
**स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च।।६.८।।**

**अर्थ :-** ही पराशक्ती परमात्म्याची शक्ती आहे. ही पराशक्ती कुंडलिनी या नावाने प्रसिद्ध असून ती परमात्म्याची स्वाभाविक अर्थात् अनादिसिद्ध अशी शक्ती असून ती ज्ञान, बल व क्रियायुक्त आहे. ही साधकभक्तयोगिशिष्याची शक्ती नाही. या सूत्रात हेच सांगितले आहे की, सिद्धयोगसाधनाने अर्थात् श्रीसद्गुरूंनी केलेल्या कृपेमुळे म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेमुळे मूलाधारात जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीकडून स्वतःच होणाऱ्या शांभवोपायाच्या साधनाने ज्ञानशक्तिरूप वर्णयुक्त कुंडलिनीचा विकास होतो. अशी ही वर्णयुक्त मातृकाच अज्ञानासाठी अर्थात् तीन मलांसाठी कारणीभूत असते. हे वर्ण आपल्या कल्पनांवर प्रचंड प्रभाव टाकीत असून ते आपल्याला श्रीशिवचैतन्याच्या स्वरूपात असलेली शोभा व्यक्त करण्याला प्रतिबंधही करतात. ।।४।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**ज्ञानाधिष्ठानं मातृका।।४।।**" अर्थात् "अ"कारापासून "क्ष"कारापर्यंत सर्व अक्षरे ही मातृकारूप आहेत. शब्दांच्या साहाय्यावाचून कोणतेच ज्ञान होऊ शकत नाही." वस्तूंसंबंधी सर्व प्रकारचे ज्ञान शब्दांनी कळते. जर बोधाची शाश्वत वाग्रूपता नष्ट झाली तर प्रकाशाचे प्रकाशन होणार नाही; कारण वाणी म्हणजे शब्दच ज्ञान करून देणारे आहेत. मातृकांच्या अधिष्ठानामुळे व आंतरिक भेदाच्या संधिबंधामुळे बहिर्मुख अर्थात् बाह्यविषयक ज्ञानाला क्षणभरही विश्रांती असत नाही; कारण वृत्ती सदासर्वदा ज्ञानमय अर्थात् संसारोन्मुख होतच असते.।।४।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**ज्ञानाधिष्ठानं मातृका।।४।।**" या सूत्राचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे.

अपूर्ण आणि अन्य विपरीतरूप अर्थात् आणवमल, प्रमेयवस्तूंचे भिन्नता-रूप अर्थात् मायीयमल आणि बऱ्यावाईट किंवा शुभाशुभ अशा सर्व कर्मां-मुळे प्राप्त झालेले शरीर अर्थात् कार्ममल असे त्रिविध मल म्हणजे ज्ञान होय. ।।२३-२४।।

ज्याचा शब्दांशी संबंध नाही असे या जगात कोणतेच ज्ञान नाही. शब्दांचा व ज्ञानाचा नित्य संबंध आहे म्हणून शब्दांनी सर्व काही कळते.।।२५।।

या वचनाप्रमाणे विविध ज्ञानाला मातृकाच कारणीभूत आहेत. "अ"पासून "क्ष"कारापर्यंतचे सर्व पन्नास वर्ण ही या मातृकेची मूर्ती अर्थात् शरीर आहे.।।२६।।

या मातृका श्रीशिवांपासून ते पृथ्वीपर्यंतच्या तत्त्वसमूहाच्या जन्मभूमी आहेत.।।२६.५।।

ब्रह्मरंध्रामध्ये ब्रह्मपाशाचे अवलंबन करून राहणाऱ्या श्रीपीठेश्वरी इत्यादि देवता आहेत. त्या अतिशय भयानक असून त्या साधकभक्तयोगिशिष्यांना वारंवार मोहात पाडीत असतात.।।२७-२७.५।।

"**श्रीतिमिरोद्घाट**" या ग्रंथात वर्णन केल्याप्रमाणे ही श्रीपीठेश्वरी मातृका अर्थात् देवता स्वरादि म्हणजे अ, उ, इ इत्यादि वर्गांची अधिष्ठात्री असून ती अनेक मातृकांनी किंवा देवतांनी विस्तारलेली आहे म्हणजे ती शब्दस्वरूपिणी झाली आहे.।।२८-२८.५।।

"मी अपूर्ण आहे, मी पूर्ण आहे, मी कृश आहे, मी स्थूल आहे" इत्यादि शब्दांवरून हर्ष व शोकादि उत्पन्न करणारी ही मातृका म्हणजे देवता आहे अर्थात् शब्द हे हर्ष व शोक उत्पन्न करीत असतात.।।२९-३०।।

याकरिता अंतर्मुखतेने जी आत्मविश्रांती उत्पन्न होणे आवश्यक आहे ती होत नसल्यामुळे हे सर्व शब्दोत्पन्न ज्ञान बहिर्मुख असल्यामुळे तेच बंधनाला कारणीभूत होत असते.।।३१।।४।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

आता मलांचे बंधकत्व म्हणजे मल बंधाला कसे कारणीभूत होतात याचे सूत्रकार निरूपण करीत आहेत. "**ज्ञानाधिष्ठानं मातृका।।४।।**" या सूत्रात "**ज्ञान**" या शब्दाने तीन प्रकारच्या मलाने पूर्ण भरलेल्या, विभिन्न विषयांचे प्रथन करणाऱ्या स्वरूपाचे आणि शुभ व अशुभ कर्मांनी निर्माण झालेल्या

संस्काररूप शरीराचे जे पूर्वी "मल" या शब्दाने निरूपण केले आहे तोच अर्थ स्वीकारावा. ज्या ज्ञानाचे मातृका हे अधिष्ठान अर्थात् ज्ञानाला आधारभूत शक्ती असते, ती मातृका म्हणजे "अ"कारापासून "क्ष"कारापर्यंतची पन्नास वर्णांच्या समूहाने युक्त असणारी विश्व निर्माण करणारी परावाक्शक्ती होय. याच मातृकेमुळे विविध ज्ञेयांचे पूर्ण ज्ञान होते. कोणत्याही वेद्याचे म्हणजेच पदार्थांचे शब्दांशिवाय ज्ञान होत नाही.

याविषयी "**श्रीवाक्यपदीय**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**न सोऽस्ति प्रत्ययो लोके यः शब्दानुगमादृते।**
**अनुविद्धमिव ज्ञानं सर्वं शब्देन भासते(गम्यते)।।१।।**
**वाग्रूपता चेदुत्क्रामेदवबोधस्य शाश्वती।**
**न प्रकाशः प्रकाशेत सा हि प्रत्यवमर्शिनी।।२।।**
**सैषा संसारिणां संज्ञा बहिरन्तश्च वर्तते।**
**यदुत्क्रान्तो विसंज्ञोऽयं दृश्यते काष्ठकुड्यवत्।।३।।**

**अर्थ :-** जो प्रत्यय किंवा अनुभव शब्दांनी समजणारा नाही असा अनुभवच जगात नाही. सर्व ज्ञान हे शब्दांनी व्याप्त असल्याप्रमाणे भासते.।।१।।

जर ज्ञानाची शाश्वत वाक्‌रूपता अर्थात् ज्ञानाचे शब्दांमध्ये असणे त्यातून निघून गेले किंवा नष्ट झाले तर प्रकाश प्रकाशणार नाही अर्थात् कशाचेच ज्ञान होणार नाही; कारण ती वाग्रूपता ज्ञान करून देणारी आहे.।।२।।

तीच संसारात राहणाऱ्या प्राण्यांची आत व बाहेर असणारी जाणीव आहे. जर तीच निघून गेली तर हे जग म्हणजे चैतन्य नसलेल्या लाकडाच्या भिंतीप्रमाणे दिसेल.।।३।।

श्रीशिवांपासून पृथ्वीपर्यंतचा जो तत्त्वसमूह आहे त्याची जन्मभूमीही ही मातृकाच अर्थात् देवताच आहे. ब्रह्मपाशाचा अवलंब करून मस्तक आणि चिती यांच्या मध्ये स्थित राहून महाघोरा अशी ही विश्वजननी मातृका अर्थात् बहिर्मुख शक्ती पशुरूप जीवांना वारंवार मोहवीत असते. त्यामुळेच जीवात्मा मी अपूर्ण आहे, पूर्ण आहे, कृश आहे व स्थूल आहे असा विचार करतो. त्याचप्रमाणे या शब्दांनी ही मातृका अर्थात् देवता शोक, द्वेष, आसक्ती व हर्षादि भावना सुचविते. अशा प्रकारे जगज्जननी मातृका शक्तीच ज्ञानाचे अधिष्ठान अर्थात् अधिष्ठात्री असते. मानवांना त्या अधिष्ठानाच्या ताब्यात गेल्यामुळे अविरत किंवा अखंड असे बहिर्मुख ज्ञान बंधनात टाकण्याला कारणीभूत होते. त्यामुळे मनुष्य अंतर्मुख होत नाही.।।४।।

**सूत्र क्रमांक ५**

**संबंध** - या बंधाचे प्रशमन करणारा, मलत्रयांना दूर करणारा आणि पारमार्थिक विश्रांती देणारा उपाय या सूत्रात सांगितला आहे अर्थात् साधक-भक्तयोगिशिष्यांना आपल्यावर सत्ता गाजविणाऱ्या व त्यांचे ज्ञान मर्यादित ठेवणाऱ्या मातृकादेवतांपासून म्हणजे मूळ कुंडलिनी शक्ती व तिच्या उपशक्तींनी प्राप्त केलेल्या बाह्यसंसारोन्मुख गतीपासून सुटका करून घेऊन श्रीभैरव-संवित्मध्ये म्हणजे आपणच श्रीशिव आहोत या जाणिवेवर स्थिर होता यावे अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्यावस्थेत विश्रांती घेता यावी म्हणून श्रीशिवांनी पुढील सूत्र कथन केले आहे.

**उद्यमो भैरवः ।।५।।**

**शब्दार्थ :- उद्यम** - (दैवी विमर्शमय संवित्चे - Consciousness चे) अकस्मात् लक्कन (झगिति) उन्मेष, उन्मज्जन म्हणजे उचंबळून येणे अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे दर्शन, स्पर्श, शब्द व कृपा यांपैकी एका प्रक्रियेच्या द्वारा शक्तिपातयोगदीक्षा प्राप्त झाल्यावर जागृत होणारी, वर उसळणारी व स्वतःच साधनरत होऊन सुषुम्नागमन करून अंतिमतः सहस्रारात श्रीशिवांशी समरसता प्राप्त करणारी कुंडलिनी शक्ती. **भैरव**- श्रीशिवसंवित् म्हणजे श्रीशिव असण्याची अर्थात् स्वतःच्या श्रीशिवत्वाची जाणीव किंवा स्वस्वरूप प्रकट करण्याचा हेतू.

**अर्थ :-** अकस्मात् लक्कन आतूनच श्रीशिवसंवित् अर्थात् श्रीशिवत्वाची जाणीव उंचबळून येणे म्हणजे श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत होणे हा मातृकाचक्रातून सुटण्याचा मार्ग आहे. या लक्कन होणाऱ्या अर्थात् अकस्मात् उचंबळून येणाऱ्या जाणिवेने किंवा उद्यमाने श्रीभैरवत्वसंवित् येते म्हणून त्या जाणिवेच्या कारणालाच अर्थात् उद्यमाला श्रीभैरव म्हटले आहे. अर्थात् बाह्य श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने अंतर्मुखाने जागृत झालेली कुंडलिनी शक्ती ही आंतर श्रीसद्गुरुरूपाने स्वतः सिद्धयोगाचे साधन करून सुषुम्नामार्गाने सहस्रारात श्रीभैरवांशी म्हणजे श्रीशिवांशी एकरूप होत असल्यामुळे ही शक्तीच श्रीभैरव आहे किंवा श्रीशिवशक्ती अखंड समरस व समव्याप्तच आहेत.।।५।।

**विशेष व्याख्या :-** ज्या तीन मलांनी आवृत झाल्यामुळे आत्म्याला जीवभाव प्राप्त झालेला असतो त्या तीन प्रकारच्या मलांना हटविण्यासाठी आणि सर्व जगतात परिपूर्ण अहं-परामर्श करण्यासाठी उद्योग म्हणजे साधन

केले पाहिजे. स्पंदशक्तीच्या उसळण्याने क्षणभरातच स्वात्मसंवित्‌चा अनुभव प्राप्त होतो. सर्व जगत् याच प्रतिभेत बुडून जाते. पूर्णाहंतेचा अभ्यास करण्याने सर्व विश्वात समस्त विकल्पांचा भेद करणाऱ्या शक्तीचा उदय होतो. कोणत्याही प्रकारचा मल साधकभक्तयोगिशिष्याला दाबू शकत नाही. यालाच श्रीभैरवभाव किंवा श्रीभैरवसमाधी असे म्हणतात.

या श्रीभैरवरूप स्वस्वरूपाला प्रकट करण्यासाठी स्वरूपसंवित्‌च्या विमर्शात नित्यनूतनतेचा अनुभव येतो.

पूर्वी ऐकलेल्या अनुभवाने सिद्धयोगसाधनाभ्यास फलित होत नाही. यादृष्टीने "**श्रीअष्टावक्रगीता**" या ग्रंथात असे म्हटले आहे की, "**मूढो नाप्नोति तद्‌ब्रह्म यतो भवितुमिच्छति।।**" अर्थात् "मूढपुरुष योगाभ्यासरूप कर्म करून, देहाभिमान दूर न करताच ब्रह्मरूप होण्याची इच्छा करतो. यामुळे त्याला ब्रह्म प्राप्त होत नाही."

त्यामुळे साधकभक्तयोगिशिष्याने सावधान राहिले पाहिजे. जोपर्यंत देहाभिमान दूर होत नाही तोपर्यंत धैर्य धारण करून अभ्यासपथावर नवीन अनुभव घेत घेत पुढे जाण्याचा उद्योग करणे आवश्यक आहे.

श्रीअष्टावक्रांनी "**श्रीअष्टावक्रगीता**" या ग्रंथात श्रीजनकराजाला असे सांगितले आहे की -

**अनिच्छन्नपि धीरो हि परब्रह्मस्वरूपभाक्।।**

**अर्थ :-** धीर पुरुष मोक्षाची इच्छा न करताच परब्रह्म स्वरूपाला प्राप्त होतो; कारण त्याचा देहाभिमान दूर झालेला असतो.

**तावद्वै ब्रह्मवेगेन मथनं शक्तिविग्रहे।।**

**अर्थ :-** जोपर्यंत परब्रह्मस्वरूपाची प्राप्ती होत नाही तोपर्यंत निश्चयाने ब्रह्मवेगसमाधीनेच शक्तिसमूहाचे मंथन करीत राहिले पाहिजे.

अत्यंत दृढतापूर्वक निश्चयाने नियमबद्ध होऊन दीर्घकाल, निरंतर व श्रद्धाभक्तिसत्कारपूर्वक परब्रह्मस्वरूपाच्या चिंतनात मग्न राहणे याला ब्रह्मवेग-समाधी असे म्हणतात. या दृष्टीने "**श्रीरामगीता**" या ग्रंथात असे म्हटले आहे की, "**यावन्न पश्येदखिलं मदात्मकं तावन्मदाराधनतत्परो भवेत् ।।५८।।**" अर्थात् "जोपर्यंत साधकभक्तयोगिशिष्याला सर्वत्र मीच भरून राहिलो आहे अशी अनुभूती येत नाही तोपर्यंत त्याने माझी आराधना अर्थात् साधन करण्याला तत्पर राहिले पाहिजे."

याकरिता पूर्णाहंतेच्या विमर्शात साधकभक्तयोगिशिष्याला असे अभ्यासशील

राहिले पाहिजे की, त्याला जाग्रत अथवा व्युत्थान दशेमधल्या भेदाचा आभासही वाटता कामा नये. हा विमर्श साधकभक्तयोगिशिष्याला शक्तिपातानेच प्राप्त होतो. स्वरूप उपलब्धी होण्यासाठी मलत्रय हटविण्याची अत्यंत आवश्यकता आहे. त्यासाठी साधकभक्तयोगिशिष्याने अत्यंत तत्पर राहिले पाहिजे.

या दृष्टीने "**श्रीशिवमहिम्नस्तोत्र**" या स्तोत्रात असे म्हटले आहे की -

**नृणामेको गम्यस्त्वमसि पयसामर्णव इव।।**

**अर्थ :-** तीन मलांनी आवृत झालेला जीव त्या मलांना हटविण्याच्या दृढ अभ्यासाने चिदानंदस्वरूप श्रीशिवांशी एकरूप होतो. ज्याप्रमाणे सर्व लहान-मोठ्या नद्या एकाच समुद्रात जाऊन मिळतात त्याप्रमाणेच सर्व जीवही श्रीशिवांना जाऊन मिळतात.

त्यामुळे "**उद्यमो भैरवः।।५।।**" या सूत्राचे तात्पर्य असे आहे की, "**तद्-बुद्ध्यस्तदात्मानः।।**" अर्थात् "आत्म्यात मन आणि बुद्धी लावून राहिले पाहिजे."

श्रीभैरवत्व हेच आपले स्वरूप आहे अशी ज्या साधकभक्तयोगिशिष्याची आतूनच भावना होते त्याचेच मंत्र सिद्ध होतात असे "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात म्हटले आहे.

या सूत्रातील "उद्यम" या संज्ञेत कोशात दिलेल्या "**उद्यम**"च्या अर्थातील प्रयत्नाचा लवलेश सुद्धा नाही. यात श्रीशिवत्वाची आतून आपोआप होणाऱ्या उन्मेषाची संकल्पना आहे.

या उन्मेषाचे स्वरूप श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथात पुढील प्रमाणे दिले आहे.

**एकचिन्ताप्रसक्तस्य यतः स्यादपरोदयः।**
**उन्मेषः स तु विज्ञेयः स्वयं तमुपलक्षयेत्।।४.४१।।**

**अर्थ :-** एखादा मनुष्य विशिष्ट विचारात किंवा विशिष्ट विषयाच्या चिंतनात गढला असता त्याला नकळतच दुसऱ्या विचाराचा उदय होतो. अशा अलक्षित आत्मबलाच्या विकासामुळे या अचानक झालेल्या नव विचाराच्या उदयाला उन्मेष असे म्हणतात. त्या उन्मेषावर अनुसंधानपूर्वक लक्ष ठेवावे.।।४.४१।।

सलग दोन विचारांच्या संधिक्षणामध्ये नित्य उदित होणाऱ्या उन्मेषतत्त्वावर अनुसंधान ठेवून अनुभूती घेण्याची प्रक्रिया असणारा हा शांभवोपाय आहे. या उपायात मुद्दाम प्रयत्न करण्याचा दूरान्वयाने सुद्धा संबंध येत नाही.

या सूत्रातील दुसरा पारिभाषिक शब्द "**भैरव**" असा आहे. यातील **भ**

= भरण, विश्वाचे पोषण व स्थिती + **र** = रवण किंवा संहार आणि **व** = वमन किंवा विश्वोत्पत्ती असे द्योतक शब्द आहेत. यावरून "विश्वाची उत्पत्ती, स्थिती व लय करणारे श्रीशिवतत्त्व हा "भैरव" या संज्ञेचा अर्थ आहे. मंत्र सिद्धीसाठी श्रीभैरवभावनेची आवश्यकता असते.

असा उन्मेष ही फार प्रगत आध्यात्मिक अवस्था आहे. ही अवस्था जपतपादि कष्ट न घेता आपण होऊनच उद्भूत होते.।।५।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

यानंतर या बंधाचा प्रशम करणारा व पारमार्थिक विश्रांती देणारा उपाय सांगताना श्रीशिव **"उद्यमो भैरवः।।५।।"** हे सूत्र सांगतात.

प्रसरण पावणाऱ्या व विचारमय संवित्‌चा श्रेष्ठ असा आनंदरूप उन्मेष तसेच शक्तिपातामुळे स्फुरणारा ज्ञानांकुर हेच श्रीभैरव होत. हे श्रीभैरव सर्व शक्तींशी समरस होऊन संपूर्ण विश्वाचे भरण करतात, सर्व कल्पना ग्रासून टाकतात आणि आत्मस्वरूपाला प्रकट करतात.

"श्रीभैरव" शब्दाची निरुक्ती भरण, रमण व वमनरूप अशी आहे. श्रीभैरव हे संसारभीतांना अभय देणारे, संसारभयाने आक्रंदन करणाऱ्यांना शक्तिपाताने दिलासा देऊन निर्भय करणारे, नक्षत्रांच्या प्रेरक अशा कालाला ग्रासणाऱ्या योग्यांचा आंतरिक स्वभाव असणारे आणि पशुजनाला त्रासविणाऱ्या खेचर्यादि शक्तींचे स्वामी आहेत.

श्रीभैरव म्हणजे भयंकर संसाराची मोडतोड करणारे आहेत. **"घृतम् आयुः।।"** अर्थात् "ज्याप्रमाणे तूप हे आयुष्य वाढविणारे असल्याने त्यालाच लक्षणेने आयुष्य असे म्हटले आहे त्याचप्रमाणे उद्यमाने म्हणजे सिद्धयोग-साधनाने श्रीशिवज्ञानप्राप्ती होत असल्याने त्याला श्रीभैरव असे म्हटले आहे."

"**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात या दृष्टीने असे म्हटले आहे की-

**अकिञ्चिच्चिन्तकस्यैव गुरुणा प्रतिबोधितः।**
**जायते यः समावेशः शाम्भवोऽसावुदिरितः।।२.२३।।**

**अर्थ :-** काहीच चिंतन न करणाऱ्या श्रीसद्गुरूंनी ज्ञान दिल्याने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने ज्ञानशक्ती उत्थित केल्याने जागृत झालेल्या योग्यात जो शांभव समावेश होतो तोच श्रीभैरव होय.

या दृष्टीने श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**अकिञ्चिच्चिन्तकस्येति विकल्पानुपयोगिता।**

तया च झटिति ज्ञेयसमापत्तिर्निरूप्यते।।१.१७१।।
सा कथं भवतीत्याह गुरुणातिगरीयसा।
ज्ञेयाभिमुखबोधेन द्राक्प्ररूढत्वशालिना।।१७२।।
तृतीयार्थे तसि व्याख्या वा वैयधिकरण्यतः।
आवेशश्चास्वतन्त्रस्य स्वतद्रूपनिमज्जनात्।।१७३।।
परतद्रूपता शम्भोराद्याच्छक्त्यविभागिनः।
तेनायमत्र वाक्यार्थो विज्ञेयं प्रोन्मिषत्स्वयम्।।१७४।।
विनापि निश्चयेन द्राक् मातृदर्पणबिम्बितम्।
मातारमधरीकुर्वन् स्वां विभूतिं प्रदर्शयन्।।१७५।।
आस्ते हृदयनैर्मल्यातिशये तारतम्यतः।।१७५.५।।

**अर्थ :-** ज्यावेळी साधक चिंतनाची अवस्था पार करून निर्विचार दशेमध्ये स्थिर होतो त्यावेळी त्याच्याबाबतीत सर्व विकल्प अनुपयोगी ठरल्यामुळे ज्ञेयाची प्राप्ती अत्यंत शीघ्रतेने निश्चितपणे होते.।।१७१।। ही ज्ञेय समापत्ती कशी होते? हे सांगताना ग्रंथकार असे म्हणतात की, अत्यंत गौरवपूर्ण आणि तत्काळ अंकुर धारण करणाऱ्या श्रेष्ठ अशा ज्ञेयाकडे अभिमुख झालेल्या बोधाच्या द्वारा ही समापत्ती साधकभक्तयोगिशिष्याला प्राप्त होते.।।१७२।। श्लोक क्रमांक १६८ मध्ये **तसिल्** या प्रत्ययाचा प्रयोग **तृतीया** या अर्थी केला आहे. त्याचप्रमाणे त्याची वैयधिकरण्याने म्हणजेच भिन्न विभक्तिप्रत्यय असतानाही व्याख्या केली जाते. जो साधकभक्तयोगिशिष्यजीव जडबुद्धी इत्यादींनी युक्त असतो तो स्वतःच्या संकुचित रूपाचा अवलंब करून स्वतंत्र बोधाशी जे तादात्म्य प्राप्त करतो त्या तद्रूपतेला आवेश असे म्हणतात.।।१७३।। ही श्रेष्ठ तद्रूपता आद्य शक्तीशी अभिन्न असणाऱ्या श्रीशंभूंपासून आलेली आहे.।।१७४।। ही तद्रूपता किंवा बोध अगर अनुभूती परम विज्ञेय, पारमार्थिक व चिन्मयस्व-रूपाची आहे. ती साधकभक्तयोगिशिष्याच्या वृत्तिरूपी आरशात प्रतिबिंबित होते. हा बोध आत्माभिनिवेश नाहीसा करून स्वबोधात्मक विभूतीला प्रदर्शित करतो. हा बोध अत्यंत निर्मल अशा हृदयामध्ये तत्काळ प्रकर्षत्वाने उन्मेषित होऊन स्वतःच प्रकाशित होतो.।।१७५-१७५.५।।

**विवरण :-** ज्यावेळी साधकभक्तयोगिशिष्याचे सर्व विकल्प निघून गेलेले असतात व तो कोणत्याही प्रकारचे चिंतन करीत नाही त्यावेळी त्याला तत्काळ ज्ञेयसमापत्ती म्हणजे श्रीशिवशक्तिसामरस्य प्राप्त होते. विकल्पांच्या अनुपयोगितेमुळेच ज्ञेयाची समापत्ती म्हणजे श्रीशिवशक्तिसामरस्याची प्राप्ती

कशी होते? याचे उत्तर असे आहे की, श्रीसद्गुरूंनी केलेल्या कृपेमुळे अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीने साधकभक्तयोगिशिष्य अत्यंत गौरवपूर्ण रीतीने व तत्काळ ज्ञेयाभिमुख होऊन त्या अवस्थेवर आरूढ झाल्यामुळे बोधाच्या द्वारा हे घडून येते. ज्यावेळी श्रीसद्गुरूंच्या द्वारा बोध म्हणजे शक्तिपात केला जातो त्यावेळी जो आवेश प्राप्त होतो त्याला शांभवसमावेश असे म्हणतात. ज्यावेळी अस्वतंत्र व जड बुद्धी असलेल्या साधकभक्तयोगिशिष्याचे संकुचित जीवरूप हे प्रामुख्याने समाप्त होते व स्वतंत्रतेच्या बोधाशी साधकभक्तयोगिशिष्य तद्रूप होतो त्यावेळी त्या तद्रूपतेला आवेश असे म्हणतात. हा परम विज्ञेय, पारमार्थिक व चिन्मय बोध बुद्धिरूपी आरशात प्रतिबिंबित होतो. तो आत्माभिनिवेश नष्ट करतो व स्वबोधात्मक विभूतीला प्रकाशित करतो. असा साधकभक्तयोगिशिष्य तत्काळ अत्यंत निर्मळ अशा हृदयाच्या दशेमध्ये प्रकर्षाने उन्मेष प्राप्त करून घेऊन स्वतःच प्रकाशित होतो. या अवस्थेत साधकभक्तयोगिशिष्य "तर" आणि "तम" यांच्या तारतम्याने आपल्या बोधात्मक विभूतीचे प्रदर्शनही करतो. या अवस्थेत साधकभक्तयोगिशिष्याचे सर्व विकल्पच नष्ट होतात त्यामुळे तो कोणाच्याही साहाय्याशिवाय अर्थात् अपेक्षाविरहित रीतीने तत्काळ हृदयरूपी विमर्शाच्या निर्मळतेच्या अत्यंत श्रेष्ठ अवस्थेत स्वतःच प्रकाशित होतो. (१.१७१-१७५.५)

"**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथातही असेच म्हटले आहे की -

**आत्मनो भैरवं रूपं भावयेद्यस्तु पूरुषः।**
**तस्य मन्त्राः प्रसिद्ध्यन्ति नित्ययुक्तस्य सुन्दरि।।२.१३७।।**

**अर्थ :-** जो मनुष्य आपले रूप श्रीभैरवमय आहे अशी भावना करील त्याचे मंत्र सिद्धिप्रद होतात.

हे पार्वती! भ्रमर व कीटक या दृष्टान्ताने ही तन्मयता येते अर्थात् कीटक किंवा अळी ही कुंभारीणीचे चिंतन करता करता त्याच्याशी इतकी तन्मय होते की, ती शेवटी कुंभारीणच होऊन जाते.

भावना करणे म्हणजे अंतर्मुख होऊन अर्थात् इंद्रिये बाह्यविषयांकडून आत वळवून स्वरूपविचार करणे होय. एकाच चिंतनात राहणाऱ्या साधकयोग्याला जो श्रेष्ठ ज्ञानलाभ होतो वा त्याचा उदय होतो त्याला उन्मेष म्हणावे.

या दृष्टीने "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**एकचिन्ताप्रसक्तस्य यतः स्यादपरोदयः।**
**उन्मेषः स तु विज्ञेयः स्वयं तमुपलक्षयेत्।।४.४१।।**

**अर्थ :-** एका विचारात अर्थात् एकाच विषयाच्या चिंतनात गढलेल्या व्यक्तीच्या चित्तामध्ये ज्या अलक्षित आत्मबळाच्या विकासामुळे दुसऱ्या विचाराचा उदय होत असतो त्या आत्मबळामुळे अचानक झालेला प्रभाव किंवा विकास हा उन्मेष आहे असे जाणून घ्यावे. साधकभक्तयोगिशिष्याने आपणहून त्या उन्मेषावर लक्ष ठेवावे किंवा उन्मेषाचे अनुसंधान करावे. ।।४.४१।।५।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

आवरणात्मक ज्ञानाची निवृत्ती करण्यासाठी आणि स्वस्वरूपाच्या प्राकट्यासाठी अर्थात् स्वस्वरूप प्रकट होण्यासाठी श्रीशिवांनी "**उद्यमो भैरवः।।५।।**" हे सूत्र सांगितले आहे. पूर्णरूप चिदात्मा श्रीशिवांच्या स्वस्वरूपाला चिकटून राहण्याची इच्छा करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याला भाव, उद्योग व उन्मेषरूप उद्यम सांगितला आहे. त्यालाच जगत् असे म्हटले आहे व तेच शार्व अर्थात् श्रीशंकरांसंबंधीचे तत्त्व आहे. त्याला श्रीभैरव असे म्हटले आहे. त्यातही स्वस्पंदनाच्या स्फुरणामध्ये जे असतात ते "श्रीभैरव" होत.।।२५-२७।।

"भैरव" या शब्दाची निरुक्ती भरण, रमण आणि वमनक्रिया करणारे आणि निरंतर निजाभासाचे प्रकाशन व ज्ञापन करणारे असा आहे. त्याचप्रमाणे ते व्यापक चैतन्यावरील आवरण दूर करणारे आहेत. त्यामुळेच त्यांना "भैरव" असे म्हटले आहे.

शांभवोपायाने अर्थात् तीव्रतर शक्तिपातामुळे पवित्रचित्त झालेल्या साधकभक्तयोगिशिष्यांना सिद्धादि दर्शन, नैवेद्य व ग्रहणादिकांमुळे अनुग्रहीतांना आणि जपध्यानादिकांशिवाय श्रीभैरवावेश झालेल्यांना ज्ञान व क्रियात्मक शाक्तामृत सेवनामुळे स्वरूपज्ञान होते अर्थात् संवित् प्रकाशावरील आवरण सहज नाहीसे होते.।।२८।।

**विवरण :-** या सूत्रात शांभवोपाय अर्थात् शांभवयोग सांगितलेला आहे. हे दैविचैतन्यात निमग्न होणे एखाद्या तीव्रतम महत्त्वाकांक्षी मनुष्याच्या बाबतीतच घडून येते. हा उद्यम म्हणजे दैविचैतन्याची एखाद्या जीवाच्या आत सतत उपस्थित असणाऱ्या आंतरिक क्रियाशील चैतन्याकडे इच्छाभिमुख झालेली तीव्र चमक आहे. याकरिताच पूज्यपाद श्रीशंकराचार्यांनी श्रीभैरवात विभुप्राण आणि विभुबुद्धी या दोघांचाही समावेश केला आहे. त्यांनी त्यालाच हैरण्यगर्भ प्राण आणि हैरण्यगर्भ बुद्धी असे म्हटले आहे. शांभवोपायाचा साधकभक्तयोगिशिष्य व्यष्टीतून उठून समष्टिरूप प्राणात

या उद्यमाने प्रवेश करतो.

ही श्रीभैरवरूप कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर साधकभक्तयोगिशिष्यामध्ये विविध भाव प्रकट होतात. त्याला नवधा भाव किंवा रस असे म्हणतात. ते रस रौद्र, अद्भुत, शृंगार, हास्य, वीर, दया, भयानक, बीभत्स, शांत आणि सप्रेम भक्ती हे आहेत. शांत भाव सोडून अन्य सर्व भाव श्रीभैरवरूप आहेत. शांभवोपायात शक्ती विभू अर्थात् हिरण्यगर्भाने युक्त अशा प्राणात कार्य करते. त्यामुळे तिला "**कठोपनिषद्**" या ग्रंथात "**अदिति**" असे म्हटले आहे. "**या प्राणेन सम्भवति अदिति देवतामयी।**" अर्थात् "ती देवतामय अदिती प्राणाने निर्माण होते."।।५।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**उद्यमो भैरवः।।५।।**" अर्थात् विमर्शमयी संवित् म्हणजे दुसऱ्यावर अवलंबून नसलेली इच्छाशक्ती किंवा स्वातंत्र्य अर्थात् श्रीशिवांशी अभिन्न असलेली पण जीवरूपाने संकुचित झालेली कुंडलिनी शक्ती ही नवनवीन-स्वरूपाचे अर्थात् आपल्या श्रीशिवस्वरूपाचे अधिकाधिक विभू स्वरूप सिद्ध-योगाचे साधन करताना सुषुम्नागामी होऊन क्रमशः प्रकट करते. तिच्या या कार्याला उद्यम असे म्हणतात. आपले मूळचे संकुचित जीवरूप अर्थात् शक्तिस्वरूप जाऊन आपण श्रीभैरवात्मक स्वस्वरूप म्हणजे श्रीशिवस्वरूप व्हावे हाच या जागृत कुंडलिनी शक्तीचा या साधनेमागे हेतू असतो.।।५।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अज्ञानाच्या बंधाच्या संबंधाचे शमन करण्याचा उपाय श्रीब्रह्मदेवांनी जो सांगितला आहे तो असा आहे. हा उपाय परम प्राप्तव्य अशी सात्त्विकतत्त्वरूपी विश्रांती हाच आहे. हा उपाय म्हणजे "**उद्यमो भैरवः।।५।।**" अर्थात् "उद्यमरूपी म्हणजे शक्तिरूपी श्रीभैरव होय," असे या सूत्रात सांगितलेले आहे.।।३२।।

विश्वाची उत्पत्ती, स्थिती व लय करणारी आणि विश्वाकार व विश्व-प्रकाश असलेले अकृत्रिम अहंतेचे म्हणजे कुंडलिनी शक्तीचे जे विस्फुरण आहे त्याला विमर्श असे म्हणतात. ज्यावेळी बहिर्मुखाने म्हणजे संसाररूपाने प्रसरण पावलेली ही कुंडलिनी शक्ती श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोग-दीक्षेने जागृत होते त्यावेळी तिच्या रूपाने बुद्धी एकदम उसळून येऊन व प्रतिभा जागृत होऊन मी पूर्ण श्रीशिव आहे या भावनेचा आंतील परिसादाचा जो उद्यम म्हणजे कुंडलिनी शक्तीचा सुषुम्नागामी होऊन वर उसळणारा क्रिया-रूप व्यवहार अर्थात् वृत्ती तीच श्रीभैरव म्हणजे श्रीशिव होत अर्थात् ज्यावेळी

कुंडलिनी शक्ती सुषुम्नागामी होऊन ऊर्ध्वगमन करते त्यावेळी ती हळूहळू आपले संकुचित शक्तिस्वरूप सोडून देऊन श्रीभैरवस्वरूप म्हणजे श्रीशिव-स्वरूप धारण करीत जाते. जेव्हा ती सहस्रारात पोहोचते तेव्हा ती आपले सर्व संकुचित शक्तिस्वरूप टाकून श्रीभैरवस्वरूप होते.।।३३-३४.५।।

आता भैरव या शब्दाची निरुक्ती सांगतात. जो आपल्या सर्व शक्तींशी सर्व बाजूने समरस होऊन विश्वाचे भरण करतो अर्थात् पिंडब्रह्मांडादि समस्त विश्व आपल्या इच्छाशक्तीच्या द्वारा निर्माण करून त्याचे भरण-पोषण अर्थात् आपल्या क्रियाशक्तीच्याद्वारा पालन करतो आणि भेद उत्पन्न करणाऱ्या विकल्पांचा केवळ एक घास करून टाकतो अर्थात् आपल्या तम म्हणजे ज्ञानशक्ती कुंडलिनीच्या रूपाने मूलाधारात श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपात-योगदीक्षेने जागृत व सुषुम्नागामी होऊन सर्व विकल्पांना गिळून टाकतो आणि शेवटी स्वतःच स्वतःच्या शक्तिसाधनेने सहस्रारात श्रीभैरव अर्थात् श्रीशिवरूप होतो म्हणजे जो अशा रीतीने सहस्रारात श्रीशिवरूप होतो त्याला श्रीभैरव असे म्हणतात. या अन्वर्थक क्रियेवरून आत्म्याला अर्थात् श्रीशिवांना श्रीभैरव अशी सार्थ संज्ञा आहे.।।३५।।५।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

आता ग्रंथकार बंधसंबंधाचे ज्या उपायाने प्रशमन होईल तो उपाय "**उद्यमो भैरवः।।५।।**" या सूत्राने सांगत आहेत. प्रसरण हाच स्वभाव असणाऱ्या विमर्शात्मक स्वसंवित्चा तत्काळ होणारा उच्छलन-आकाराच्या प्रतिभेचा उन्मज्जनरूप हा जो पूर्णत्वाने असणारा अहंभावाने युक्त अंतःपरिस्पंद आहे तोच "उद्यम" या शब्दाने स्वीकारला जातो.

"**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात आचार्य श्रीअभिनवगुप्तपादाचार्य हे याविषयी असे म्हणतात की -

**अकिञ्चिच्चिन्तकस्येति विकल्पानुपयोगिता।**
**तथा च झटिति ज्ञेयसमापत्तिर्निरूप्यते।।१.१७१।।**
**स कथं भवतीत्याह गुरुणातिगरीयसा।**
**ज्ञेयाभिमुखबोधेन द्राक्प्ररूढत्वशालिना।।१७२।।**
**तृतीयार्थे तसि व्याख्या वा वैयधिकरण्यतः।**
**आवेशश्चास्वतन्त्रस्य स्वतद्रूपनिमज्जनात्।।१७३।।**
**परतद्रूपता शम्भोराद्या शक्त्यविभागिनः।**
**तेनायमत्र वाक्यार्थो, विज्ञेयं प्रोन्मिषत्स्वयम्।।१७४।।**

**विनापि निश्चयेन द्राङ् मातृदर्पणबिम्बितम्।**
**मातारमधरीकुर्वन् स्वां विभूतिं प्रदर्शयन्।।१७५।।**
**आस्ते हृदयनैर्मल्यातिशये तारतम्यतः।।१७५.५।।**

**अर्थ** :- ज्यावेळी साधक चिंतनाची अवस्था पार करून निर्विचार दशेमध्ये स्थिर होतो त्यावेळी त्याच्याबाबतीत सर्व विकल्प अनुपयोगी ठरल्यामुळे ज्ञेयाची प्राप्ती अत्यंत शीघ्रतेने निश्चितपणे होते.।।१.१७१।। ही ज्ञेय समापत्ती कशी होते हे सांगताना ग्रंथकार असे म्हणतात की, अत्यंत गौरवपूर्ण आणि तत्काळ अंकुर धारण करणाऱ्या श्रेष्ठ अशा ज्ञेयाकडे अभिमुख झालेल्या बोधाच्या द्वारा ही समापत्ती साधकभक्तयोगिशिष्याला प्राप्त होते.।।१७२।। श्लोक क्रमांक १६८ मध्ये **तसिल्** या प्रत्ययाचा प्रयोग **तृतीया** या अर्थी केला आहे. त्याचप्रमाणे त्याची वैयधिकरण्याने म्हणजेच भिन्न विभक्तिप्रत्यय असतानाही व्याख्या केली जाते. जो साधकभक्तयोगिशिष्यजीव जडबुद्धी इत्यादींनी युक्त असतो तो स्वतःच्या संकुचित रूपाचा अवलंब करून स्वतंत्र बोधाशी जे तादात्म्य प्राप्त करतो त्या तद्रूपतेला आवेश असे म्हणतात.।।१७३।। ही श्रेष्ठ तद्रूपता आद्य शक्तीशी अभिन्न असणाऱ्या श्रीशंभूंपासून आलेली आहे.।।१७४।। ही तद्रूपता किंवा बोध अगर अनुभूती परम विज्ञेय, पारमार्थिक व चिन्मयस्वरूपाची आहे. ती साधकाच्या वृत्तिरूपी आरशात प्रतिबिंबित होते. हा बोध आत्माभिनिवेश नाहीसा करून स्वबोधात्मक विभूतीला प्रदर्शित करतो. हा बोध अत्यंत निर्मल अशा हृदयामध्ये तत्काळ प्रकर्षत्वाने उन्मेषित होऊन स्वतःच प्रकाशित होतो.।।१७५-१७५.५।।

काहीही चिंतन न करता श्रीसद्गुरूंनी मूळ कुंडलिनी शक्ती प्रतिबोधित अर्थात् जागृत केल्यानंतर इतर सर्व विभेदी म्हणजे बहिर्मुख अशा शक्तींचे सामरस्याने मूळ कुंडलिनी शक्तीशी समरसीकरण करून ती सुषुम्नागामी म्हणजे भरणादि करणे हा उद्यम म्हणजे श्रीभैरव होय. येथे असा निष्कर्ष निघतो की, "मी परिपूर्ण असा श्रीशिवस्वरूपी आहे," असे तैलधारेप्रमाणे अखंड भावनेने सर्व भेदांचा घास घेऊन तशा प्रकारच्या भावनेचा प्रयोजक असणाऱ्या उद्यमाचे श्रीभैरवत्वस्थापन हे श्रीशैवागमआचार्यांना युक्तच आहे. ज्याप्रमाणे "**आयुर्वै घृतम्।।**" इत्यादि श्रुतींमध्ये तुपाचे आयुष्यत्व साक्षात् दिसून येत नाही; परंतु तूप खाऊन तुपाचे आयुष्य वाढविण्याचे वैशिष्ट्य दिसून येत असल्याकारणाने तुपाचे आयुष्यत्व औपचारिकच ठरते त्याचप्रमाणे उद्यमाचा श्रीभैरवस्वरूपाचा हा अवभास या कारणानेच उद्यम हाच श्रीभैरव

होतो. भरण अर्थात् रक्षण, रमण अर्थात् रमणे व वमन अर्थात् ओकणे किंवा येथे सृष्टी निर्मिती करणे यांमुळे होणारा उद्यम म्हणजे श्रीभैरव होय. भित्र्यांना अभयरूप या व्युत्पत्तीनुसार संसारी प्राण्यांना तो अभय देणारा आहे. भीः म्हणजे भय किंवा संसारत्रास होय. या त्रासाने निर्माण झालेला रव म्हणजे आवाज किंवा आक्रंदन अर्थात् आक्रोश म्हणजे भीरव होय. या भीरवाने जन्मणारा अर्थात् त्या आक्रोशयुक्तापासून प्रस्फुरण पावणारा याच भीरवाचा म्हणजे संसारभयाचा हा उद्यम श्रीभैरवरूप शक्तिपातामुळे विनाशक होतो. आणखी व्युत्पत्ती पुढीलप्रमाणे आहे. भ म्हणजे नक्षत्र होय. त्या नक्षत्रांना हलविणारा भीर म्हणजे काल होय. त्या काळाला गिळून टाकतो म्हणून भीरव होय. काळाचा ग्रास करणाऱ्या समाधीचे रसास्वादन करणाऱ्या योग्यांचा हा आंतर स्वभाव आहे. भिये म्हणजे पशूंच्या अर्थात् जीवांच्या त्रासासाठी उत्पन्न होणारा रवः म्हणजे शब्दांच्या समूहापासून उत्पन्न होणाऱ्या आकाशादि कलांचे ज्ञान होय. त्यांचा हाच स्वामी किंवा श्रीईश्वर म्हणजे श्रीभैरव होय. त्याचप्रमाणे श्रीभैरव म्हणजे भीषण संसारवृत्तींचे विघटन करण्याचा स्वभाव असणारा असे आगमशास्त्रांतून श्रीबृहस्पतींनी सांगितले आहे.।।५।।

## सूत्र क्रमांक ६

**संबंध :-** अशा रीतीने श्रेष्ठ अशा प्रतिभेच्या उन्मेषाने म्हणजे चिच्छक्तीच्या अर्थात् कुंडलिनी शक्तीच्या जागृतीने होणारे श्रीभैरवज्ञान हे अज्ञानबंधन दूर करणारे आहे असे सांगून याच्याच दृढाभ्यासाने भेद नष्ट करणारे व्युत्थानही अर्थात् निःशेष श्रीशिवस्वरूपता प्राप्त होऊन विश्वाची संहारणी होते असे सहाव्या सूत्रात सांगितले आहे.

**शक्तिचक्रसन्धाने विश्वसंहारः।।६।।**

**शब्दार्थ :- शक्तिचक्रसंधाने** - श्रीशैवशास्त्रात किंवा आम्नायात सांगितलेल्या पद्धतीने आणि उत्कट व एकाग्र जाणिवेने सर्व शक्तींच्या ठायी ऐक्य साधल्याने किंवा शक्ती म्हणजे शब्दादि उपशक्तींच्या, चक्र म्हणजे त्या शक्तींच्या समूहाच्या व संधाने म्हणजे उन्मेष आणि अहंपरामर्शरूप अनुसंधान झाल्यावर. **विश्वसंहारः** - आत्म्यापेक्षा विश्व भिन्न आहे ही जाणीव अर्थात् अहम् व इदम् यांमधील भेद नाहीसा होतो. (येथे "संहार" म्हणजे "प्रलय" किंवा कल्पांतीचा विश्वनाश अभिप्रेत नाही.) किंवा भेदप्रयारूप मलत्रययुक्त जगताचा संहार म्हणजे परसंवित्‌रूप अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेल्या अग्निरूप कुंडलिनी शक्तीत एकाकार होणे होय.

**अर्थ :-** श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने अनादि निद्रिस्त आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत झाल्यावर शरीरातील सर्व उपशक्ती मूळ प्राणशक्ती कुंडलिनीशी एकरूप होऊन ही मूळकुंडलिनी शक्ती सहस्त्रारात श्रीशिवांशी समरस झाली की, विश्वसंहार होतो अर्थात् शब्दादि शक्तींच्या समूहाचा उन्मेष व अहंपरामर्शरूप अनुसंधान झाल्यावर भेदप्रथारूप मलत्रय जगत् परमसंवितृरूप अग्नीत म्हणजे कुंडलिनी शक्तीत एकरूप होते.।।६।।

**विशेष व्याख्या :-** शरीरातील शक्ती म्हणजे शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या शक्तींचा समूह होय. त्या शक्तींचा स्वस्वरूपात विमर्श करावयाला पाहिजे अर्थात् एकत्रिकरण करावयाला पाहिजे. त्यामुळे परसंवित् अर्थात् श्रेष्ठ ज्ञानशक्तिरूप अग्नीमध्ये भेद निर्माण करणारे आणवमल, मायीयमल आणि कार्ममल हे तीन मल जळून भस्मसात् होतात. या शब्दादि श्रीभैरवरूप संवित्स्फाराच्या म्हणजे चैतन्याच्या विस्तारित अशा महान् शक्ती आहेत. या शांभवोपायात क्रम आणि अक्रमाचे सुद्धा उल्लंघन करतात. श्रीशिवभावाने पृथ्वीतत्त्वापर्यंत सर्व पाचही तत्त्वांचा हा शक्तिप्रसार प्रतिलोम वृत्तीने अर्थात् विपरीत रीतीने म्हणजे पिंड-ब्रह्मांडाच्या उभारणीच्या रूपाने होतो. या शक्तींचे अनुलोम प्रक्रियेच्या द्वारा सुषुम्नामार्गाने मूळ चैतन्यशक्तीशी अर्थात् स्वात्मरूपाशी किंवा श्रीशिवांशी म्हणजे श्रीभैरवांशी एकीकरण केले पाहिजे. यामुळेच भेदमय जगताचा ऱ्हास आणि श्रीशिवभावाची प्राप्ती होते. हीच शांभवोपायातली श्रीभैरवसमाधी होय. या श्रीभैरवसमाधीने सर्व बंधनांपासून मोक्ष मिळतो.

मागील सूत्रातील "**शांभवोपाय**" साध्य होण्यासाठी या सूत्रात "**शाक्तोपाय**" अर्थात् शक्तित्वावर व मंत्रशक्तीवर आधारलेली प्रक्रिया सांगितली आहे. मागील सूत्रात उल्लेखिलेले श्रीभैरवत्व म्हणजे पराप्रतिभेचा अकस्मात् होणारा उन्मेष होय. या प्रतिभेच्या ठिकाणी कोणतीही गोष्ट अर्थात् क्रिया किंवा घटना जाणण्याचे व करण्याचे म्हणजे "प्रकाश" व "विमर्श" यांचे संपूर्ण स्वातंत्र्य असते. ही शक्ती स्वतःच्या पार्श्वभूमीवर (स्वभित्तौ) दर्पणातील प्रतिबिंबाप्रमाणे आत्मक्रीडेसाठी निर्माण केलेले विश्व दाखवते; कारण सर्व विश्व या शक्तीपासून या शक्तीमध्येच निर्माण होते. त्यामुळे आपले शरीर व बाह्य पदार्थ भिन्न वाटले तरी परासंवित्च्या ठिकाणी तो भेद मावळून ते संविद्रूप होतात. या भेदशून्य अवस्थेला प्राप्त होण्याला "विश्वसंहार" असे म्हटले आहे.

याविषयी "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की-

**उच्चाररहितं वस्तु चेतसैव विचिन्तयन्।**

**यं समावेशमाप्नोति शाक्तः सोऽत्राभिधीयते।।२.२२।।**

**अर्थ :**-ज्यावेळी साधकभक्तयोगिशिष्य (aspirant) एकाग्र मनाने शब्दातीत असलेल्या सत्तत्वाचे ग्रहण करतो त्यावेळी त्याला "समावेश" अर्थात् दैवी जाणिवेत विलीनता म्हणजे (Absorption in divine consciousness) असे म्हणतात.

श्रीक्षेमराजाचार्यांच्या काव्यमय शब्दात यालाच "परसंविद्रूपी अग्नीत भस्मसात होणे," असे म्हणतात.

हा समावेश शाक्तोपायामुळे होतो.

पराशक्तीशी होणारी ही एकरूपता श्रीसद्गुरुचरणांची उपासना केल्यानेही प्राप्त होते. कुंडलिनी शक्तीचे प्रकटीकरण हे श्रीशिवांच्या स्वातंत्र्यशक्तीचे प्रकट रूप आहे ही धारणा किंवा अनुभूती आली म्हणजे विश्व हे आत्मस्वरूपा-पेक्षा भिन्न आहे असे भासणे संपते म्हणजेच सूत्रात म्हटलेला "विश्वसंहार" होतो. श्रीसद्गुरुचरणांच्या सेवेनेही ही अवस्था प्राप्त होते. या शाक्तोपायामुळे शांभवोपाय म्हटलेल्या "अकस्मात् साक्षात्काराची" पूर्वतयारी होते.।।६।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा रीतीने श्रेष्ठप्रतिभोन्मेषाने होणारे श्रीभैरवज्ञान हे अज्ञानबंधन दूर करणारे आहे असे सांगून याच्याच दृढाभ्यासाने भेदाचे प्रशमन करणारे व्युथानही होते हे सांगताना "**शक्तिचक्रसन्धाने विश्वसंहारः।।६।।**" हे सूत्र श्रीशिवांनी सांगितले आहे.

या परप्रतिभेतून अर्थात् अत्यंत श्रेष्ठ अशा प्रतिभेतून म्हणजेच श्रीशिवांच्या पूर्ण अहंज्ञानातून उसळून आलेल्या आणि आत्म्याची जाणीव हाच ज्यांचा स्वभाव आहे अशा ज्या श्रीभैरवांचे वर्णन केले त्या श्रीभैरवांची एक श्रेष्ठ स्वातंत्र्यशक्ती आहे. ही शक्ती अंतर्लक्ष्य बहिर्दृष्टियुक्त असून ती विश्वाचे उत्पत्ती, स्थिती व संहारात्मक कार्य क्रमाने, क्रमरहित किंवा एकदम करू शकते. क्रम म्हणजे सृष्टी, स्थिती व संहार यांच्या आभासाचे विच्छेदन अर्थात् तो आभास नष्ट करण्याचा स्वभाव होय. अक्रम म्हणजे सृष्ट्यादींचा एकदम अवभास म्हणजेच मिथ्याज्ञान होय. त्या क्रम आणि अक्रमाला आक्रमिणारी म्हणून क्रमाक्रमाक्रमिणी अशी ही स्वातंत्र्यशक्ती होय.

या दृष्टीने "**श्रीज्ञानगर्भ**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**क्रमत्रयसमाश्रयव्यतिकरेण या सन्ततं**
**क्रमत्रितयलङ्घनं विदधती विभात्युच्चकैः।**

**क्रमैकवपुरक्रमप्रकृतिरेव या शोभते करोमि**
**हृदि तामहं भगवतीं परां संविदम्।।**

**अर्थ :-** जी तीन क्रमांच्या आश्रयाच्या संबंधाने सतत तीन क्रमांचे उल्लंघन करणारी, मोठ्या प्रमाणात दिसणारी आणि जी क्रमरूप शरीराने व अक्रमरूप प्रकृतीने शोभून दिसणारी आहे त्या श्रीभगवती परा संवित्‌रूप कुंडलिनी शक्तीला मी हृदयात धारण करतो.

अशा प्रकारे सृष्ट्यादि तीन क्रमांचे अवभासन करून त्यांचे अनिवार्यपणे परिस्फुरण करणारी अर्थात् प्रकट करणारी आणि क्रम व अक्रमरूप शरीराची परा शक्तीच अनाख्या म्हणजेच वर्णन न करता येणारी पारमेश्वरी संविच्छक्ती कुंडलिनी ज्ञानरूप होते असा येथे अर्थ आहे.

या शक्तीला तिचे अंतःस्वरूप नीटपणे माहीत असूनही ती बाह्यदृष्टीने काही कामांमध्ये गुंतून राहिलेली असते. अशा प्रकारे सर्व शक्तींना आकर्षित करून घेऊन ती क्रम, अक्रम व क्रमाक्रमाच्या श्रेष्ठत्वामध्ये अतिरिक्त किंवा कृश म्हणजेच पूर्ण रिक्त, अरिक्त किंवा पूर्ण अरिक्त व अतिरिक्त या दोन्ही स्वरूपात प्रकट होते. ती जरी इतक्या स्वरूपांमध्ये प्रकट होते असे सांगितले असले तरी वास्तविक ती या कोणत्याही स्वरूपाची नाही. या अनुत्तर म्हणजे सर्वश्रेष्ठ व परा स्वातंत्र्य शक्तीच्या पडद्यावर म्हणजेच तिच्या स्व-रूपावर उत्पत्त्यादींचा खेळ दाखविला जातो. हा उभारणी इत्यादींचा खेळ पृथ्वीपासून ते परप्रमातृविश्रांतीपर्यंतच्या म्हणजे श्रीशिवांच्या किंवा श्रीपरमेश्वरांशी साम-रस्यापर्यंत उत्पत्त्यादि शक्तींच्या स्वरूपाचा असतो. ज्याप्रमाणे या शक्तिसमूहाचे जाणिवेतून जे एकत्रिकरण केले जाते म्हणजेच यथोचितक्रमाचे ज्ञान अर्थात् प्रकाश व विमर्शरूप क्रम प्रकट करून दाखविला जातो ते रहस्य शास्त्रां-मध्ये प्रकट केले असून त्याप्रमाणेच ते सिद्ध केले जाते. त्यानंतर कालाग्नीपासून ते श्रेष्ठ किंवा अंतिम कलेपर्यंतचा विश्वाचा संहार घडतो. या म्हणण्याचा अर्थ असा आहे की, जरी बाह्य अस्तित्व हे देह व इतर बाह्य वस्तूंच्या स्व-रूपात तसेच राहिले तरीही ते परसंविद्‌रूप अग्नीशी म्हणजेच श्रेष्ठ ज्ञानरूप अग्नीशी एकरूप होते अर्थात्‌च ते त्या परसंविदग्निरूपातच राहते.

या दृष्टीने "**श्रीभर्गशिखाग्रंथ**" या ग्रथांत असे म्हटले आहे की -

**मृत्युं च कालं च कलाकलापं विकारजालं प्रतिपत्तिसात्म्यम्।**
**ऐकात्म्यनानात्म्य विकल्पजातं तदा स सर्वं कवलीकरोति।।**

**अर्थ :-** त्यानंतर (विश्वसंहाराच्या वेळेला) तो शक्तिचक्रसंधान करणारा

साधकभक्तयोगिशिष्य मृत्यू, काल, कलासमूह, विकारांचे जाळे, आत्म्यासहित ज्ञान, ऐकात्म्य व नानात्म्य या विकल्पातून जन्माला येणाऱ्या गोष्टी इत्यादि सर्वांचा एकच घास करतो अर्थात् तो सर्वभक्षण करतो.

"**श्रीमद्वीरावली**" या ग्रंथामध्येही असे म्हटले आहे की -

**यत्र सर्वे लयं यान्ति दह्यन्ते तत्त्वसञ्चयाः।**
**तां चितीं पश्य कायस्थां कालानलसमत्विषम्।।**

**अर्थ :-** ज्या ठिकाणी सर्व तत्त्वे लीन होतात किंवा जळून जातात; परंतु संस्काररूपात मात्र शिल्लक राहतात ते कालाग्नीप्रमाणे तेजस्वी असे हृदयस्थ महास्मशान म्हणजेच चिती अर्थात् कुंडलिनी शक्ती एकदा पाहून तरी टाक अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षा घेऊन कुंडलिनी शक्तीच्या जागृतीचा, सुषुम्नागामित्वाचा व सहस्राररूप स्मशानात वास करणाऱ्या श्रीशिवांशी समरसता प्राप्तीचा अनुभव अवश्य घे.

"**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**उच्चाररहितं वस्तु चेतसैव विचिन्तयन्।**
**यं समावेशमाप्नोति शाक्तः सोऽत्राभिधीयते।।२.२२।।**

**अर्थ :-** उच्चाररहित वस्तूचा चित्तानेच विचार करीत जो समावेश प्राप्त केला जातो त्या आवेशाला शाक्त असे म्हणतात.

उच्चाररहित वस्तू म्हणजेच परावाणी अर्थात् कुंडलिनी शक्ती होय. त्यामुळेच ती उच्चार न करता येणारी आहे. उच्चार करता येणारी म्हणजे वैखरी वाणी असून या वैखरी वाणीरूप शक्तीचे एकत्रिकरणच वेगळ्या शास्त्रीय पद्धतीने सांगितले आहे. हे मी श्रीसद्गुरुचरणांच्या उपासनेने अभिव्यक्त केले आहे. जास्त काही प्रकट केले नाही.

यासंबधी कोणीतरी असे म्हटले आहे की -

**ज्ञेयत्वमप्युगता हृदये न रोढुं शक्ताः प्रमूढमनसामुपदेशवाचः।**
**आर्द्रत्वमादधति किं नलिनीदलानां**
**श्लिष्टा निरन्तरतयापि नभोऽम्बुधाराः।।**

**अर्थ :-** जरी उपदेशामुळे ज्ञेय वस्तू कळाली तरी ती सामान्य मानवांच्या चित्तात श्रीसद्गुरुसेवेवाचून स्थिर होऊ शकत नाही. जरी पावसाच्या धारा कमळाच्या पानावर सतत पडत राहिल्या तरी कमळाची पाने ओली होतील काय? अर्थात् होणार नाहीत. याकरिताच नुसते तत्त्व कळून उपयोग नाही; तर ते तत्त्व चांगल्या प्रकारे चित्तात आत्मसात करावे लागते.

हा शक्तिचक्रसंधानाचा विचारच "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात सांगताना असे म्हटले आहे की -

**यस्योन्मेषनिमेषाभ्यां जगतः प्रलयोदयौ।**
**तं शक्तिचक्रविभवप्रभवं शङ्करं स्तुमः।।१.१।।**
**यदा त्वेकत्र संरूढस्तदा तस्य लयोदयौ।**
**नियच्छन् भोक्ततामेति ततश्चक्रेश्वरो भवेत्।।४.५१।।**

**अर्थ :-** श्रीशंकरांच्या नेत्रांच्या उघडण्याने आणि मिटण्याने म्हणजेच स्पंदामुळे शक्तिचक्राचा संहार व उत्पत्ती होते. यामुळे जगाची उत्पत्ती व लय होत असतात. त्या अनंत शक्तींच्या समूहाच्या ऐश्वर्याचे उगमस्थान असलेल्या अर्थात् जगाच्या सर्व उत्पत्ती-लयाला आदिकारण असलेल्या श्रीशंकरांची आम्ही स्तुती करीत आहोत.।।१।।

**अर्थ :-** ज्यावेळी साधक स्थूल किंवा सूक्ष्म पुर्यष्टक यांपैकी एकात राहत असतानाही चित्ताला लीन करून अंतर्बाह्य एकाकार असेलल्या स्पंदतत्त्वाची अनुभूती प्राप्त करून घेतो त्यावेळी त्या प्रत्ययोद्भवाच्या स्वतंत्रतेने संहार व उदय संपन्न करीत असतो. यामुळे असा साधकभक्तयोगिशिष्य आपली आता-पर्यंत हरविलेली भोक्तेपणाची पदवी प्राप्त करून घेतो व शक्तिचक्राचा श्रीईश्वर अर्थात् पूर्ण श्रीशिव बनतो.।।५१।।६।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा उद्योगशील श्रीभैरवाविष्ट साधकभक्तयोगिशिष्याचा उन्मेष म्हणजे शक्तीचे प्रसरण होत असतानाही स्वस्वरूपाचा प्रकाश म्हणजेच ज्ञान नष्ट होत नाही.।।२९।।

ज्याप्रमाणे उन्मेषात ही स्थिती बदलत नाही त्याचप्रमाणे संकोचावस्थेतही स्वस्थिती कायमच राहते हे सांगण्यासाठी श्रीमहेश्वरांनी "**शक्तिचक्रसन्धाने विश्वसंहारः।।६।।**" अर्थात् "श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीत तिच्या सर्व उपशक्तींना सिद्धयोगसाधनद्वारा लीन होण्याला वाव देऊन मूळ कुंडलिनी शक्ती सुषुम्नागामी झाल्यावर विश्व-संहार होतो म्हणजे विश्व असून नसल्यासारखे होते किंवा श्रीशिवरूप भासते," हे सूत्र रचले आहे.।।३०।।

सर्व विश्व हे या श्रीभैरवाविष्ट साधकभक्तयोगिशिष्याच्या शक्ती आहेत. या शक्ती ज्ञानक्रियात्मक वृत्ती आहेत. त्यांच्या समुदायाला चक्र असे म्हटले आहे.।।३१।।

त्या शक्तिसमुदायरूप चक्राचा स्वीकार म्हणजेच संधान होय. त्या शक्तिचक्राचा संहार म्हणजे लय होय. हा लय म्हणजेच श्रीशिवत्व होय.।।३२।।

अशा रीतीने शब्दार्थरूपादि ज्ञानाच्या शक्तिप्रसराला कारणीभूत असणारे परमात्माच श्रीभैरव होत व तेच श्रीशिव होत.।।३३।।

**विवरण** :- ज्ञानक्रियाशक्तिमय जग प्रकाशरूप संवित्‌हून वेगळे नाही असे समजणे म्हणजे श्रीशिवाग्नीमध्ये म्हणजेच श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीमध्ये भावरूपाने लीन होणेच होय. अशा रीतीने कारणामध्ये कार्यच एकरूपत्वाने राहिल्यामुळे शक्तिसंकोचकाली श्रीशिवांची स्थिती आवृत होत नाही किंवा झाकली जात नाही.।।६।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती** :-

**शक्तिश्च शक्तिमांश्चैव पदार्थद्वयमुच्यते।**
**शक्तयोऽस्य जगत्कृत्स्नं शक्तिमांश्च महेश्वरः।।**

**अर्थ** :- जरी शक्ती व शक्तिमान् असे दोन पदार्थ गणले जात असले तरी ते एकरूपच आहेत. सर्व जगत् ही शक्ती आहे व श्रीपरशिव हे शक्तिमान् आहेत.

वरील श्लोकात सांगितलेली शक्तिचक्राची व्याख्याच "**शक्तिचक्रसन्धाने विश्वसंहारः।।६।।**" या सूत्राच्या वृत्तीत स्वीकारली आहे. त्याचे अनुसंधान म्हणजेच अंतर्विमर्शन म्हणजेच अंतर्ज्ञान होत असताना विश्वसंहार म्हणजेच परसंविदग्नीमध्ये त्या शक्तिचक्राचे एकत्रिकरण होते.

शक्तिचक्र म्हणजे संपूर्ण जगत् "**शक्तयोऽस्य जगत्कृत्स्नं।।**" अर्थात् "**त्या श्रीपरमेश्वराच्या शक्ती म्हणजेच सर्व विश्व होय.**" त्यांच्या अंतर्जागृतीने अर्थात् अनुसंधानाने किंवा सूक्ष्म विवेचनाने विश्वसंहार होतो. खरोखर याचा अर्थच असा आहे की, श्रीपरमेश्वराच्या संविद्रूप अग्नीने अर्थात् ज्ञानाग्नीने म्हणजे जागृत कुंडलिनी शक्तीमुळे विश्व हे असून नसल्यासारखे होते.।।६।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक** :-

आता "**शक्तिचक्रसन्धाने विश्वसंहारः।।६।।**" अर्थात् "कुंडलिनी शक्तीशी सर्व शक्ती समरूप झाल्यावर सुषुम्नागामी होऊन सहस्रारात श्रीशिवांशी समरस झाल्या" की, अशा प्रकारच्या श्रीभैरव समवेशामुळे सर्व बंधांचे शमन होते आणि चित्ताचे व्युत्थान अर्थात् जागरण म्हणजे लय होतो. भिन्नतेचा आभासही शांत होतो अर्थात् नष्ट होतो.।।३६।।

स्वसंवित् अर्थात् बुद्धीचा हा जो श्रीभैरवात्मक उद्यम म्हणजे अनादि-निद्रिस्थ कुंडलिनीला जागृत करण्याचा उद्योग सांगितला त्या श्रीभैरवांची एक महान् शक्ती आहे. ती क्रम आणि अक्रम अर्थात् विधी आणि निषेध यांच्या पलीकडे गेलेली आहे. ती चिच्छक्ती समुदायाला म्हणजे स्वतःच्या उपशक्तींना ओलांडून जाण्याच्या कामात नेहमी गुंतलेली असते. ती रिक्त म्हणजे मोकळी आणि अरिक्त म्हणजे पूर्ण भरलेली अशी उभय स्वरूपाची असूनही कोणत्याच स्वरूपाची नाही. अशा प्रकारे ती सर्वोत्तम आणि सर्वश्रेष्ठ पराशक्ती आहे.।।३७-३८।।

हीच पराशक्ती स्वात्मचैतन्यरूप भिंतीवर प्रपंचाचे चित्र काढते. ही पराशक्ती प्रमात्याच्या विश्रांतीपर्यंत स्पंदन पावणारी अर्थात् हालचाल करणारी आहे.।।३९।।

अनेक प्रमेयांना ती उजेडात आणते व आपल्या पाच शक्तींचा प्रसार करते. या पाच शक्ती म्हणजे सृष्टिशक्ती, लयशक्ती, अनाख्याशक्ती म्हणजेच नामराहित्य व अभासाशक्ती म्हणजे रूपराहित्य या होत.।।४०-४१।।

तिने प्रसारित केलेल्या पाच शक्तींचे संधान म्हणजे जुळणी असून आगमात सांगितलेल्या क्रमानुसार स्वतः पराशक्तीच ही जुळणी करते. यामुळे विश्वाचा कालाग्नी ते सूक्ष्मकलेपर्यंत संहार होतो. संहार म्हणजे स्वबुद्धीच्या अर्थात् बुद्धिरूप कुंडलिनी शक्तीच्या स्वरूपाने असलेल्या अग्नीचे अस्तित्वच होय.।।४२।।६।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

अशा प्रकारे पूर्वसूत्राने उद्यमात्मक श्रीभैरवांचा अज्ञानरूपी बंध नष्ट करण्याचा उपाय सांगून या परामर्शाच्या प्रकर्षामुळे म्हणजेच श्रेष्ठ प्रतिभेच्या अभ्यासाच्या दृढत्वामुळे व्युत्थानदशेत म्हणजेच समाधी उतरलेल्या अवस्थेतही प्रशांतभेदाचा अवभास होतो म्हणजेच सर्व भेद शांत झालेला बोध कायम राहतो असे "**शक्तिचक्रसन्धाने विश्वसंहारः।।६।।**" या सूत्रात सांगितले आहे. "**उद्यमो भैरवः।।१.५।।**" या सूत्रातल्या उद्यमात्मक श्रीभैरवांची एक महान् शक्ती आहे. ही शक्ती अतिक्रांतक्रमाक्रमस्वरूप अर्थात् क्रम आणि अक्रम यांना ओलांडलेल्या अशा स्वरूपाची आहे. ही शक्ती क्रम म्हणजे सृष्टी, स्थिती व विलय यांच्या आभासाचा क्रमाक्रमाने विच्छेद करणाऱ्या स्वभावाची व अक्रम म्हणजे युगपत रीतीने म्हणजे सर्वांचा एकदमच ग्रास करणाऱ्या स्वभावाची आहे.

या दृष्टीने "**श्रीज्ञानगर्भ**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**क्रमत्रयसमाश्रयव्यतिकरेण या सन्ततं**
**क्रमत्रितयलङ्घनं विदधती विभात्युच्चैः।**
**क्रमैकवपुरक्रमप्रकृतिरेव या शोभते**
**करोमि हृदि तामहं भगवतीं परां संविदम्।।**

**अर्थ :-** जी तीन क्रमांचा आश्रय न घेता सतत तीन क्रमांचे उल्लंघन करीत असते, जी श्रेष्ठत्वाने शोभून दिसते आणि जिचे स्वरूप क्रम व अक्रमरूप आहे अशा श्रीभगवती परासंवित्‌ला मी हृदयात धारण करतो.

या शक्तीकडून चित्रविचित्रप्रमेयरूप ग्रामांचे अर्थात् विविध प्रकारच्या ज्ञानाचे प्रकटीकरण केले जाते. समस्त जगच्छक्तिचक्रात्मक ज्या शक्ती आहेत त्या ज्ञानक्रियारूप आहेत. त्या तशा ज्ञानक्रियास्वरूप शक्तींचे स्वीकरण म्हणजे आपलेसे करणे हे आत्मस्वरूपाचे असेल तर निमेषमात्राने सर्व जगत् संहृत होईल अर्थात् सर्व जग संकुचित होऊन जाईल. अशा स्थितीत जगाचे प्रविलीनत्वच श्रीशिवस्वरूपाने प्रस्फुरित होते. अशा प्रकारे शब्दार्थ प्रभृतींचे कारण परमात्माच आहे. तेच श्रीभैरव आणि तेच श्रीशिव आहेत. येथे असा निष्कर्ष निघतो की, ज्ञान आणि क्रियात्मक विश्वाचा प्रकाश-विमर्शरूप श्रीपरमेश्वरापासून अभेद असलेल्या अर्थात् त्या श्रीपरमेश्वराशी एकरूप असलेल्या विमर्शनरूप संवित्प्रकाशात्मक श्रीशिवाग्नीमध्ये विलय होतो. अशा प्रकारे कारणात कार्य अभेदरूपाने स्थित असल्याने निमेषदशेतही म्हणजेच लयावस्थेतही स्वस्वरूप स्थितीचा विसर पडत नाही.

**विवरण :-** या सूत्रामध्ये शांभवोपायाला साहाय्य करणाऱ्या शाक्तोपायाचे अर्थात् शक्तीवर आधारित असलेल्या मार्गाचे वर्णन केले आहे. या शाक्तोपाया-मध्ये शक्तीचे पूर्ण प्रकटीकरण कसे होते हे मनाच्या पूर्ण एकाग्रतेने अशा प्रकारे समजून घेतले पाहिजे की, ते प्रकटीकरण म्हणजे श्रीशिवांच्या स्वातंत्र्य शक्तीचे केवळ प्रदर्शन आहे. त्यानंतर समस्त जगत् हे चैतन्ययुक्त वाटू लागते. हे जगत् म्हणजे चैतन्याहून पूर्णपणे वेगळे असलेले फक्त भौतिक वस्तू नसून चैतन्याचे एका विशिष्ट रचनेमध्ये प्रकटीकरण आहे. त्यानंतर तेथे विश्वसंहार येतो. विश्वसंहार म्हणजे चैतन्याच्या किंवा जाणिवेच्या बाहेरच्या जगताचे नाहीसे होणे होय. या संदर्भात विश्वसंहाराचा अर्थ प्रलय असा घ्यावयाचा नसून विश्वसंहार होतो म्हणजेच साधकभक्तयोगिशिष्याच्या दृष्टीने चेतनबाह्य जगत् नाहीसे होते किंवा त्या जडजगताची त्याला जाणीव होत नाही. त्याचप्रमाणे जगत् हे चैतन्यामध्ये लीन होण्यासाठी अर्थात् चैतन्या-

प्रमाणे होण्यासाठी लहान स्वरूप धारण करते म्हणजेच त्या चैतन्याबरोबर जगत् एकरूप होते. असे जगत् नाहीसे झाल्यावर साधकभक्तयोगिशिष्याचे मन श्रीशिवांचे पूर्ण स्वचैतन्य स्वीकार करण्याला तयार होते. यालाच शांभवोपाय असे म्हणतात.

सर्व विश्वाची कृती हेच शक्तीचे महान् चक्र आहे; परंतु साधकभक्त-योगिशिष्याला आपले लक्ष्य शरीरस्थ सुषुम्नेत असलेल्या षट्चक्रांवरतीच ठेवावयाला पाहिजे; कारण पिंडस्थ चक्रांचा संबंध ब्रह्मांडाशी आहे. शक्तिचक्र याचा अर्थ षट्चक्र असा आहे. शरीरामध्ये जेवढ्या क्रिया होतात त्यांचा आधार ही सुषुम्नेत असलेली चक्रेच आहेत. पाचव्या सूत्रामध्ये ज्या श्रीभैरव-भावांचा म्हणजे रौद्रादि नऊ भावांचा उल्लेख केलेला आहे त्यांचा संबंध विभिन्न चक्रांशीच आहे. कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यानंतर ते भाव दिव्य रूप धारण करतात. त्यांचा स्रोत सर्वव्यापक चेतनापासून निघून निम्न स्तरापर्यंत प्रवाहित होत होत अनुभवाला येतो. या भावांवरून लक्ष्य हटवून त्यांच्याशी संबंधित चक्रांचे अनुसंधान करण्याने त्या भावांचे विलिनीकरण झाल्यावर समाधी लागते. समाधीनेच किंवा समाधीमध्येच विश्वाचा संहार अभिप्रेत आहे. भावां-मध्ये रस घेणे साधनामध्ये विघ्न आहे. त्यामुळे त्या भावांच्या ताब्यात न जाता त्या भावांना सुषुम्नेमध्ये विलीन केले पाहिजे. प्रत्येक चक्रावर संयम करण्याने त्या त्या चक्राशी संबंधित सिद्धी प्राप्त होतात; परंतु त्या सिद्धी समाधीमध्ये विघ्न आहेत.।।६।।

## सूत्र क्रमांक ७

अशा रीतीने विश्वोपसंहार करणाऱ्या सिद्धयोग्याला समाधी किंवा व्युत्थान अर्थात् जागृती असा कसलाच भेद राहत नाही असे या सूत्रात सांगितले आहे.

**जाग्रत्स्वप्नसुषुप्तभेदे तुर्याभोगसम्भवः(संवित्)।।७।।**

**शब्दार्थ :- जाग्रत-स्वप्न-सुषुप्त-भेदे** - जागेपणा, स्वप्नावस्था व स्वप्नरहित गाढ झोप या तीन भिन्न अवस्थात किंवा या तिन्ही अवस्थांचा नावारूपाने निरनिराळ्या आत्मस्फुरणरूप रीतीने प्रत्यय आल्यावर. **तुर्या** - वरील तीन अवस्थांच्या पलीकडील तुर्या चौथी अवस्था. (ही अवस्था या तीन्ही अवस्थांना साक्षिभूत असते व हिच्यामुळे आपल्याला या तीन अवस्थांमधील भेद कळून येतात.) **आभोग** - अत्यंत श्रेष्ठ असा आनंद किंवा श्रीशिवानंद अर्थात् श्रीशिवांचे ठिकाणी असणारा आत्मानंद. "आभोगाला" श्रीक्षेमराजाचार्यांनी "चमत्कार" असे म्हटले आहे. त्यांनी **आभोगश्चमत्कारः** असा पर्यायी शब्द

दिला आहे. **सम्भवः** - उत्पत्ती; पण श्रीक्षेमराजाचार्य यांच्या मते "कायमचे अवस्थान" किंवा "नित्यस्थिती" किंवा चमत्काराची होणारी प्राप्ती. **संवित्** - तुर्यावस्थेमधील श्रीशिवानंदाचा अनुभव हा नित्य व स्थायी असतो.

**अर्थ :-** जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या जीवात्म्याच्या विविध अवस्था असतानाही आत्मस्फुरणरूप तुर्यावस्थेतील अद्भुत अनुभव सिद्धयोग्याला सतत येतच असतो अर्थात् त्याचा श्रीशिवानंद म्हणजे श्रीशिवशक्तिसामरस्यावस्थेची अपूर्व, अलौकिक व एकमेवाद्वितीय अनुभूती अखंड, नित्य व अबाधित असते.।।७।।

**विशेष व्याख्या :-** जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ती यांच्या भेदामध्ये नानारूपता म्हणजेच वैविध्य असते. या तीनही अवस्थांमध्ये वेगवेगळे अवभास होतात अर्थात् या अवस्था वेगवेगळ्या रीतीने प्रत्ययाला येतात; परंतु श्रीभैरवसमाधीचा म्हणजेच संसार खाऊन टाकणाऱ्या समाधीचा अभ्यास करणाऱ्या सिद्धयोग्याला निमेषरूप समाधी अर्थात् निर्विकल्प समाधी आणि उन्मेषरूप समाधी अर्थात् सविकल्प समाधी या दोनही अवस्थांमध्ये आत्मस्फुरणाच्या अनुभवाचा चमत्कार प्रत्ययाला येत असतो. या अवस्थेलाच "तुर्यावस्था" असे म्हणतात. अशा सिद्धयोग्याला समाधी आणि व्युत्थान या दोनही अवस्थांमध्ये काहीही फरक राहत नाही. तो ज्या अवस्थेत असतो त्याच अवस्थेत स्वरूपसंवित्शक्तीच्या चमत्काराचा अनुभव घेतो.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे.

**यथास्थितः तथैवासुः मा गा बाह्यं तथान्तरम्।**
**केवलं चिद्विकासेन विकारनिकराञ्जहि।।**

**अर्थ :-** हे साधकभक्तयोगिशिष्या! ज्या स्थितीत तू आहेस त्याच स्थितीत बसून राहा. बाहेर अथवा आत कोठेही जाऊ नकोस. केवळ चिच्छक्तीच्या अर्थात् कुंडलिनी शक्तीच्या विकासाने विकारसमूहांचा नाश कर.।।७।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा रीतीने विश्वोपसंहार करणाऱ्या सिद्धयोग्याला समाधी व व्युथान असा कसलाच भेद राहत नाही हे सांगताना "**जाग्रत्स्वप्नसुषुप्तभेदे तुर्याभोगसम्भवः।।७।।**" हे सूत्र श्रीशिवांनी सांगितले आहे.

पुढे ज्यांचे निरूपण केले जाईल त्या जागृती, स्वप्न व सुषुप्ती यांच्या वेगळेपणाच्या अनेक भेदांमध्ये "**उद्यमो भैरवः।।१.५।।**" हे ज्याचे लक्षण आहे अशा तुर्यावस्थेचा अनुभव सिद्धयोग्याला येत असतो. ही तुर्यावस्था

जागृदादि सर्व अवस्थांना व्यापून असते. काही विद्वान् "**सम्भवः**" या ठिकाणी "**संवित्**" असा पाठ गृहीत धरतात.

या तुर्याभोगसंभवाविषयी शास्त्रात सदृष्टान्त असे वर्णन केले आहे की-

**यथेन्दुः पुष्पसङ्काशः समन्तादवभासते।**
**आह्लादनसमूहेन जगदाह्लादयेत्क्षणात्।।**
**तद्वद्देवि महायोगी यदा पर्यटते महीम्।**
**ज्ञानेन्दुकिरणैः सर्वैर्जगच्चित्रं समस्तकम्।।**
**आह्लादयेत्समन्तात्तदवीच्यादिशिवान्तकम्।**

**अर्थ :-** तो सिद्धयोगी अवीचि इत्यादि कलांशात अर्थात् बुद्धिवृत्तीवर किंवा संसारात असो अथवा श्रीशिवपदी असो त्याच्या प्रकाशानंदात विच्छेद होत नाही अर्थात् त्याचा प्रकाशानंद नष्ट होत नाही; कारण तो तुर्यावस्थामय असतो. ज्याप्रमाणे फुलाप्रमाणे उमललेला पूर्णचंद्र चहूकडून सारखा दिसतो व शीतकिरणांनी जगताला आनंदवितो त्याप्रमाणे हा सिद्धयोगी हे पार्वती! ज्यावेळेला पृथ्वीवर पर्यटन करतो त्यावेळेला तो आपल्या ज्ञानरूप चंद्राच्या किरणांनी सर्व जगाला आह्लादवितो. ज्याप्रमाणे चंद्र हा बऱ्यावाईट वस्तूंना प्रकाशित करतो त्याप्रमाणे सिद्धयोगी जगाला नखशिखांत हर्षवितो. अशा प्रकारच्या उदाहरणांनी "**श्रीचंद्रज्ञान**" या ग्रंथात जागृती इत्यादि अवस्थां-मध्येही महायोगी तुर्यावस्थेचा अनुभव घेतो असे दाखविले आहे.

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात या अवस्थांचे पुढीलप्रमाणे एकत्रिकरण केले आहे.

**जाग्रदादिविभेदेऽपि तदभिन्ने प्रसर्पति।**
**निवर्तते निजान्नैव स्वभावादुपलब्धृतः।।१.३।।**

**अर्थ :-** जाग्रत इत्यादि भेदपूर्ण अवस्थांमध्येही तेच भेदरहित तत्त्व समानरूपाने वेदकाच्या म्हणजे श्रीशिवांच्या रूपात व्याप्त होत असते. त्यामुळे या जाग्रत, स्वप्न व सुषुप्ती या अवस्थांच्या प्रसाराच्या वेळेलाही हे स्पंदतत्त्व (श्रीशिवांच्या स्वतःच्या) अनुभवी स्वभावापासून निवृत्त होत नाही.।।३।।७।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

आत्मरूपाच्या स्पंदनापासून न ढळणाऱ्या चिदात्म्याला जाग्रत्सुषुप्त्यादि अवस्था झाकून टाकू शकत नाहीत, हे सांगण्यासाठी देवेशाने अर्थात् श्रीशंकरांनी जे यथार्थ अर्थात् योग्य सूत्र उद्धृत केले आहे ते "**जाग्रत्स्वप्नसुषुप्तभेदे तुर्याभोगसंवित्।।७।।**" असे आहे.

येथे "**सम्भवः**" याच्याऐवजी "**संवित्**" असा पाठ दिलेला आहे. त्याचा अर्थ तुर्यावस्थेतील श्रीशिवानंदाचा अनुभव हा नित्य व स्थायी असतो, असा मागे दिल्याप्रमाणे होतो.।।३४-३४.५।।

तुर्यावस्था म्हणजे केवळ स्वस्वरूपाचाच विचार ज्यामध्ये पूर्णत्वाने भरलेला असतो अशी स्थिती होय.।।३५।।

भ्रमावस्था नाहीशी झालेल्या साधकभक्तयोगिशिष्याच्या जाग्रदादि सर्व अवस्थांमध्ये ही अवस्था अनुस्यूत अर्थात् व्यापकरूपाने राहत असल्याने ही तुर्याभोगावस्था ज्ञानस्वरूपाची आहे.।।३६।।

त्यामुळे जाग्रदादि भिन्न भिन्न अवस्थांमध्ये ती स्पष्टपणे जा-ये करीत असते.।।३६.५।।

**विवरणात्मक टीप :-** स्मृती इत्यादि अवस्था स्वप्नामध्ये गृहित धरतात आणि मदमूर्च्छा इत्यादि अवस्था सुषुप्तीत गृहित धरल्या जातात. त्यामुळे तीन अवस्थांमध्येच म्हणजेच जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्थांमध्येच सर्व स्मृती व मदमूर्च्छादि अवस्थांचा समावेश होत असल्याने त्या अवस्थांचा वेगळा निर्देश केलेला नाही. अशा प्रकारे या तीनही अवस्थांचा वेगवेगळा व्यापार चालू असला तरी व्युत्थित म्हणजे जागृत अवस्थेतल्या योग्याचा आत्मविचार किंवा स्वरूपविचार चालू असल्यामुळे या तीन अवस्थांमुळे पारमार्थिक वस्तूचे आवरण होत नाही अर्थात् तिला कोणीही झाकून टाकू शकत नाही. त्यामुळे या सिद्धयोग्याला समाधी व यमनियमादि क्रियांचे अव-लंबन करण्याचे प्रयास करण्याचे कारण नाही. अपूर्ण योग्याला परिमित अवधानामुळे म्हणजेच संकुचिततेमुळे अर्थात् जीवभाव नष्ट न झाल्यामुळे अगर सामरस्यावस्था प्राप्त न झाल्यामुळे पूर्णता क्वचित्च असते असा "स्वस्वरूपया" म्हणजे ३५ व ३६ या दोन कारिकांचा आशय आहे.।।७।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**जाग्रत्स्वप्नसुषुप्तभेदे तुर्याभोगसम्भवः।।७।।**" अर्थात् भेद म्हणजेच अनेक रूपांचा किंवा अवस्थांचा वेगळेपणा होय. त्या व्यक्त होत असताना स्फुरणरूप आत्म्याचा चमत्कार अर्थात् प्रकटानुभव योगयुक्ताला म्हणजे सिद्धयोग्याला नेहमीच अनुभवावयास मिळतो.।।७।।

**श्रीवरदाजाचार्य वार्तिक :-**

अशा रीतीने स्व-संविद्रूप म्हणजे श्रीशिवांशी समवायसंबंधाने, अविना-भावाने, संघट्टपणे, लोलीभावाने, यामलभावाने आणि अनवच्छेद्यपणे एकरसरूप,

समव्याप्त व समरस असलेल्या कालाग्नीने म्हणजे श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीने ज्याचा भेदभाव अर्थात् भेददृष्टी पूर्णपणे होरपळून निघालेली आहे त्याची समाधी अवस्था व व्युत्थानावस्था या सारख्याच होत. त्यांच्यात यत्किंचितही भेद असत नाही.।।४३।।

उद्यम भैरव म्हणजे यापूर्वी सांगितलेली अर्थात् समाधिव्युत्थानात्मक अवस्था होय. त्यानंतरची तुर्यावस्था म्हणजे अत्यंत श्रेष्ठ अवस्था होय. त्या अवस्थेचा अनुभव घेणे म्हणजे तुर्यावस्थेत असणे हा एक चमत्कार होय.।।४४।।

"**जाग्रत्स्वप्नसुषुप्तभेदे तुर्याभोगसम्भवः।।७।।**" अर्थात् "जाग्रदादि अवस्थातूनही योग्याला ही तुर्यावस्था उपभोगता येते." या अवस्थेत ज्याप्रमाणे माळेच्या मण्यातून दोरा व्यापून असतो त्याप्रमाणेच परमानंद अर्थात् अत्यंत श्रेष्ठ आनंद व्यापून राहिलेला किंवा भरलेला असतो.।।४५।।७।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

ज्यावेळेला कधीही च्युत न होणाऱ्या अर्थात् आपल्या अवस्थेपासून न ढळणाऱ्या चित्तस्वरूपाचा स्वस्वरूप परिस्पंद होतो अर्थात् त्याची "स्व"-रूपात सगळीकडून हालचाल होते त्यावेळेला जाग्रदादि भेद त्या स्वरूपाला झाकून टाकण्याला ज्यामुळे समर्थ होत नाहीत म्हणजेच त्यांना "स्व"ला आवरण ज्या तत्त्वामुळे घालता येत नाही ते तत्त्व दाखविण्यासाठी "**जाग्रत्स्वप्नसुषुप्तभेदे तुर्याभोगसम्भवः।।७।।**" हे सूत्र सांगितले आहे. नंतरच्या सूत्रांनी निरूपित केल्या जाणाऱ्या जाग्रदादि अवस्थांच्या वेगवेगळ्या रूपात अर्थात् पृथक्रूपाने त्यांचे प्रकटन होत असतानाही भैरवयुक्त उद्यम शब्दाने पूर्वी सांगितलेल्या स्मरण इत्यादि स्वभावाच्या आत्म्याच्या सर्व दशांमध्ये अनुस्यूत असलेला जो चमत्काररूप आभोग असतो तो महायोगाने युक्त असलेल्या म्हणजेच शक्तिपातयोगाने सिद्ध झालेल्या सिद्धयोग्याचा नेहमीच असतो अर्थात् शक्तिपातयोगाचे साधन करणारा सिद्धयोगी या तुर्यावस्थेत नेहमीच राहत असतो. यामुळे महायोग्याच्या जागृती इत्यादि अवस्थांमध्ये असणारे तुर्याभोगमयत्व हे त्याला परानंदाची अनुभूती देत असल्याचे द्योतक आहे हेच स्पष्ट होते.

**विवरण :-** पाचव्या सूत्रात हे दाखवून दिले आहे की, शांभव योगामुळे एका तीव्र जाणिवेची अचानक उत्पत्ती होते; त्याला श्रीभैरवचैतन्य असे म्हणतात आणि हे श्रीभैरवज्ञान म्हणजेच श्रीशिवांचे स्व-चैतन्य होय.

या सूत्रामध्ये जीवात्म्याचे किंवा साधकभक्तयोगिशिष्याचे लक्ष पाच महत्त्वाच्या

गोष्टींकडे वेधले आहे.

१) चैतन्याची चौथी अवस्था ही नेहमी विद्यमान असणारी आणि इतर तीन अवस्थांना पाहणारी असते. उलट जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन अवस्थांचा अनुभव चैतन्याशिवाय म्हणजेच जो या तीनही अवस्थांचा ज्ञाता आहे त्याच्याशिवाय येऊच शकत नाही. चौथी अवस्था मात्र आपली शाश्वत "स्व" अवस्था होय. ही अवस्था म्हणजेच नेहमी विद्यमान असणारी अमृतमय आणि अखंड चैतन्यमय अवस्था होय. आपल्याला जी काही जाणीव होते, आपण जो विचार करतो आणि कर्म करतो त्या सर्वांचा हा आत्मा साक्षी असतो. तो अखंड असणारा शाश्वत "स्व" असून तो आपल्या सर्व बदलणाऱ्या "स्व"ना पाहत असतो.

२) आपल्या जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ती या अवस्था भिन्न स्वरूपाच्या असतात. ज्यावेळेला आपण जाग्रत अवस्थेत असतो त्यावेळेला आपल्याला स्वप्नावस्था नसते, ज्यावेळेला आपण स्वप्नावस्थेत असतो त्यावेळेला आपल्याला जाग्रतावस्थेची जाणीव नसते आणि ज्यावेळेला आपण सुषुप्ती अवस्थेत असतो त्यावेळेला आपल्याला जाग्रत आणि स्वप्नावस्थेची जाणीव नसते.

त्याचप्रमाणे प्रत्येक अवस्था ही काही विशिष्ट गोष्टींमुळे असते आणि त्या गोष्टी इतर अवस्थांमध्ये नसतात. जागृतावस्थेमध्ये शरीर, प्राण, इंद्रिये आणि मन ही कार्यरत असतात. स्वप्नावस्थेमध्ये डोळे, कान, त्वचा इत्यादि काम करीत नाहीत. एका शब्दात सांगावयाचे झाल्यास स्वप्नावस्थेमध्ये इंद्रिये काम करण्याचे थांबवितात. त्यांचे कार्य कल्पनेच्या द्वारा बुद्धी स्वतःकडे घेते. स्वप्नावस्थेमध्ये आपण पाहतो, पळतो, ऐकतो, खातो; परंतु ते सर्व मानसिक असते. स्वप्नावस्थेमध्ये फक्त प्राण आणि मन हे कार्यरत असतात.

सुषुप्तीमध्ये मनाचेही कार्य थांबून जाते. केवळ प्राणच कार्यरत असतो. त्यामुळे सुषुप्ती ही सुद्धा एक वेगळी अवस्था आहे.

मग या तीनही अवस्थांमध्ये समान रीतीने काहीच विद्यमान नसते का? त्यावेळेला श्रीशैव तत्त्वज्ञान असे सांगते की, समानत्वाने असणारी जाणिवेची चौथी अवस्था ही तुर्य किंवा तुरीय होय. ही अवस्था बाकीच्या तीन अवस्थांमध्ये गुंतलेली नसते आणि ही तीन अवस्थांना साक्षिभावाने पाहत असते. ही अवस्था बुद्धीमध्ये निर्माण व्हावयाला हवी. तिला चौथी अवस्था असे इतर तीन अवस्थांच्या संदर्भाने म्हटले आहे. "चौथी" हा शब्द केवळ भाषेच्या मर्यादितपणामुळे दिला गेला आहे. वास्तविक पाहता तिला एकही सांख्यिक

नाव देता येणार नाही. ती कायम अस्तित्वात असणारे सत्य आहे.

**३)** तुर्यावस्था ही नेहमीच आपल्या विचारांच्या, कामाच्या आणि जाणिवांच्या पाठीमागे आधार म्हणून असते; परंतु त्या अवस्थेचे भान आपल्याला सामान्य जाणिवेत नसते. ही कायमच तेथे म्हणजे आपल्यामध्ये असते. ही सिद्ध म्हणजे अनादि काळापासून विद्यमान आहे. ही साध्य म्हणजेच आपल्या विशिष्ट प्रयत्नांनी किंवा योगसाधनांनी निर्माण होणारी अवस्था नाही. जर हिला कोणी निर्माण करीत असेल तर ही शाश्वत राहू शकणार नाही; कारण उत्पन्न होणाऱ्या गोष्टीचा अंत हा ठरलेलाच असतो. हिच्या बाबतीत कोणतीही मागणी वगैरे आपण करू शकत नाही; मग या तुर्यावस्थेची प्राप्ती करून घेण्यासाठी ही व्यर्थ गडबड कशासाठी? त्यामुळे या श्रीशिवसूत्रात सांगितलेल्या उपायांचा किंवा योगसाधनांचा काय उपयोग आहे बरे?

या प्रश्नाला उत्तर असे आहे की, जरी ही अवस्था सर्वांच्या नंतरची असते तरीही आपल्याला त्याची जाणीव नसते. ही तुर्यावस्था म्हणजे आपल्या सामान्य जाणिवेचे लक्षण नाही. हे उपाय एवढ्यासाठीच सांगितले आहेत की, आपण या अवस्थेचे ग्रहण करण्यासाठी तयार राहावे.

शांभवोपाय हा अत्यंत प्रगत आत्म्यांसाठी असून असे साधकभक्तयोगिशिष्य आधीपासूनच या अवस्थेचे ग्रहण करण्यासाठी तयार असतात. त्यांच्यामध्ये उत् + यम = उद्यम असतो. या संदर्भामध्ये उद्यम म्हणजे प्रयत्न किंवा परिश्रम असा जो इतरांनी चुकीचा अर्थ लावला आहे तो नव्हे. "**उद्यम**" या शब्दाचा अर्थ श्रीक्षेमराजांनी केल्याप्रमाणे "**उन्मज्ञन किंवा उद्यंतृता**" होय अर्थात् कुंडलिनी शक्तीचे आतून जागरण होणे व सुषुम्नेतून ऊर्ध्वगामी होणे होय. ज्यावेळेला आपण सदाचारयुक्त आचरणाने आणि आपल्या सर्व जाणिवा, बुद्धी, मन व मीपणा नष्ट करून तयार राहतो त्यावेळला तुर्यावस्था ही तिच्या खोल व गूढ कप्प्यातून बाहेर येते आणि ती आपल्या सामान्य जाणिवेचा ताबा घेऊन अत्यंत कार्यक्षम लक्षण बनते. तुर्या ही अवस्था स्वतःसिद्ध आहे. ती प्रयत्नसाध्य नाही. तिचे उन्मज्ञन आतून होत असते. योगाभ्यासादि उपायांनी किंवा श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने अनादि निद्रिस्त आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत झाल्यावर या अवस्थेचे उन्मज्ञन होण्याची साधकभक्तयोगिशिष्यामध्ये पात्रता येते. कुंडलिनी शक्तीची जागृती ही श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेमुळे आपोआप अकस्मात् होत असल्यामुळे "उद्यम" या शब्दाचा "परिश्रम" हा अर्थ श्रीशैवदर्शनाला लागू

पडत नाही. या दर्शनातील "तुर्या" संकल्पनेतील आणखी विशेष म्हणजे ती
केवळ जाणीव किंवा ज्ञान असण्याची प्रकाश नामक अवस्था नसून तिच्या
ठिकाणी विमर्श म्हणजे क्रियाशक्ती आहे आणि या विमर्शामुळे म्हणजे
क्रियाशक्तीमुळे तुर्यानंदाचा आनंद अनुभविता येतो.

४) **"कठोपनिषद्"** या ग्रंथातील शब्दात जर सांगावयाचे झाले तर ही
अवस्था म्हणजे "प्रभव" किंवा श्रीशिवसूत्रात म्हटल्याप्रमाणे ती "संभव"
होय म्हणजेच आपल्यामध्ये एका नवीन जाणिवेचा उदय होय. अशा स्थितीत
जरी जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ती या तीनही अवस्था एकमेकांपासून भिन्न
असल्या तरीही अखंड जाणिवेच्या स्वरूपात ती स्थिर राहते. ही अवस्था
आपल्या सामान्य जाणिवेमध्ये बदल घडवून आणते. या सर्व भिन्न अवस्थां-
मध्ये एक संपूर्ण जाणीव शिल्लक असते. त्यानंतर आपण म्हणजेच साधक-
भक्तयोगिशिष्य सिद्धयोगी होऊन विश्वात्मक आणि विश्वोत्तीर्ण भावाने राहतो.

**५)** तुर्यावस्था ही श्रीशैव तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने केवळ प्रकाश किंवा
"स्व"ला पाहणारे सांख्य किंवा वेदान्त तत्त्वज्ञानातले साक्षी चैतन्य नाही;
परंतु तुर्यावस्था हे विमर्श म्हणजेच ज्ञानही आहे. हा विमर्श तुर्याभोगाने
म्हणजे श्रीशिवरूप चैतन्याच्या अद्भुत अनुभवाने भरलेला आहे.।।७।।

## सूत्र क्रमांक ८, ९ व १०

**संबंध :-** आता पुढच्या तीन सूत्रांमधून जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ती या
तीन अवस्थांची लक्षणे ग्रंथकारांनी सांगितली आहेत.

**ज्ञानं जाग्रत्।।८।।**

**स्वप्नो विकल्पाः।।९।।**

**अविवेको माया सौषुप्तम्।।१०।।**

**शब्दार्थ :- ८. ज्ञान** - बाह्य इंद्रियांपासून उत्पन्न झालेले सर्वसाधारण
अर्थाचे विषययुक्त ज्ञान. **जाग्रत्** - जागृत म्हणजे जागे असण्याची अवस्था.
**९. स्वप्न** - स्वप्ननामक अवस्था. **विकल्पाः** - विकल्पना. बाह्य जगाशी
इंद्रियद्वारा संपर्क नसताना केवळ मानसिक क्रियांद्वारा म्हणजे मनाच्या मार्फत
मिळविलेले ज्ञान. **१०. अविवेक** - जाणिवेचा अभाव किंवा विवेकराहित्य
अथवा निश्चयात्मक बुद्धी न राहणे. **माया-सौषुप्तम्** - माया नामक मोहमय
अवस्थेतील गाढ झोप किंवा मोहमयी अगर गाढतम सुषुप्ती अवस्था.

**।। ज्ञानं जाग्रत्।।८।।**

**अर्थ :-** बाह्य इंद्रियांनी म्हणजेच डोळे, कान, जीभ, त्वचा व नाक या

इंद्रियांनी उत्पन्न होणाऱ्या सर्वसाधारण अर्थांच्या किंवा पदार्थांच्या विषयांचे ज्ञान म्हणजेच जागृत अवस्था होय.।।८।।

**विशेष व्याख्या :-** जागृतावस्थेत असताना जर जीवाला कधी असाधारण पदार्थांच्या विषयाचा अस्फुट विवेक होत असेल तर त्याला "जागृतीमधील स्वप्न" असे म्हणतात. जागृत अवस्थेतच आपण कधी कधी काही सांगण्यासाठी अथवा बोलण्यासाठी प्रवृत्त होत असतो; परंतु याचा अस्पष्ट विवेक किंवा अस्पष्ट विचार कधी विस्मृतीत गेल्याने सांगितला जाऊ शकत नाही अथवा प्रकट होऊ शकत नाही. त्यामुळे जागत असतानाही सर्व दशांमध्येच जागृत अवस्था विद्यमान असत नाही. जागृत म्हणजे केवळ बाह्य इंद्रियांनी उत्पन्न होणारे सर्वसाधारण अर्थाच्या विषयाचे ज्ञान आहे.।।८।।

**।। स्वप्नो विकल्पा: ।।९।।**

**अर्थ :-** मनोमात्रांनी उत्पन्न होणाऱ्या असाधारण पदार्थांच्या विषयांचे विकल्प अर्थात् विचार म्हणजेच स्वप्नावस्था होय अर्थात् असामान्य विषयांचे विकल्परूप अनुभव हे स्वप्न किंवा स्वप्नावस्था होय किंवा बाह्य जगाशी इंद्रियद्वारा संपर्क नसताना केवळ मानसिक क्रियांद्वारा मनाच्या द्वारा मिळविलेले ज्ञान होय किंवा मनोव्यापारांनी जे संकल्पनात्मक ज्ञान मिळते त्या अवस्थेला स्वप्न असे म्हणतात.।।९।।

**विशेष व्याख्या :-** अस्फुट विवेकालाच स्वप्न असे म्हणतात. हे केवळ मनाच्या विकारांनीच होते. स्वप्नामध्ये बाह्य इंद्रियांचे काहीच काम नसते. स्वप्नावस्थेत मनाची कल्पित इंद्रियेच कल्पित अथवा असाधारण अर्थांनाच विषय करतात. या अवस्थेत स्पष्ट विवेक राहत नाही. जागृतावस्थेमध्ये शरीराच्या वर्तमान दशेचे ज्ञान खूपच अस्पष्ट राहत असते. या अवस्थेच्या दशासुद्धा स्वप्न-जागृत आणि स्वप्न-सुषुप्तीच्या रूपात भिन्न भिन्न असतात.।।९।।

**।। अविवेको माया सौषुप्तम् ।।१०।।**

**अर्थ :-** विवेकराहित्य किंवा जाणिवेचा संपूर्ण अभाव अगर निश्चित बुद्धी न राहणे आणि मोहमयी अर्थात् गाढ अंधःकार यांनाच सुषुप्त्यावस्था असे म्हणतात अर्थात् स्वप्नावस्था ही विकल्पामुळे उत्पन्न होत असल्यामुळे तिच्यात वस्तूचा किंवा जाणिवेचा संपूर्ण अभाव असतो. स्वप्नात बरे वाईट असे विवेचन करता येत नाही म्हणून स्वप्नाला अ-ख्याती असे म्हणतात. ही मायारूप मोहमय सुषुप्ती अवस्था होय.।।१०।।

**विशेष व्याख्या :-** विवेकबुद्धीच्या अभावालाच अख्याती असे म्हणतात.

ही अख्याती मोहात पडल्याने होते. या अवस्थेलाच सुषुप्ती अवस्था असे म्हणतात. सुषुप्ती अवस्थेत विवेक राहत नाही. ही गाढ तमोगुणाची अवस्था आहे.।।१०।।८,९ व १०।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

जागरादि तीन अवस्थांची तीन सूत्रांनी लक्षणे सांगताना "**ज्ञानं जाग्रत्।।८।।, स्वप्नो विकल्पाः।।९।।**" व "**अविवेको माया सौषुप्तम् ।।१०।।**" ही तीन सूत्रे श्रीशिवांनी सांगितली आहेत.

चक्षुरादि इंद्रियांमुळे जे सर्वसामान्य विषयज्ञान होते त्याला जाग्रदावस्था असे म्हणतात. केवळ मनामुळेच उत्पन्न होणारे असाधारण पदार्थविषयांचे विकल्प किंवा विचार यालाच स्वप्न किंवा स्वप्नावस्था असे म्हणतात. ही स्वप्नावस्था विकल्पप्रधान आहे. यात वस्तूंचा अभाव असतो. येथे बरे-वाईट असे विवेचन करता येत नाही. याला अख्याती असे म्हणतात. ही मायारूप मोहमय सुषुप्तीची अवस्था आहे. उदाहरणार्थ - एकाच घटाचे निर्विकल्पक म्हणजेच घट म्हणून ज्ञान ही जाग्रदावस्था होय. सविकल्पाने अर्थात् केवळ पदार्थ म्हणून ज्ञान म्हणजे स्वप्नावस्था होय. काहीच ज्ञान न होणे म्हणजे सुषुप्ती अवस्था होय.

शास्त्रामध्ये अन्यत्र असे म्हटलेले आहे की -

**अक्षैर्योऽर्थग्रहः पुंसां तज्जाग्रदिति कथ्यते।**
**यत्तैर्विनार्थस्मरणं मनसा स्वप्नसंज्ञितम्।**
**तं यत्रार्थस्मरणे न स्तस्तत्सौषुप्तमुदाहतम्।।**

**अर्थ :-** मनुष्यांना डोळ्यांनी पदार्थाचे होणारे ग्रहण अथवा ज्ञान ही जाग्रदावस्था होय. त्यांना डोळ्यांशिवाय मनाने होणारे पदार्थाचे स्मरण म्हणजे स्वप्नावस्था होय. जेथे पदार्थाचे स्मरणच नसते त्याला सौषुप्तावस्था असे म्हणतात.

सौषुप्त अवस्थेचे लक्षण सांगताना उच्छेद्य मायेचेही स्वरूप सांगितले आहे. मायेचे स्वरूप सर्वत्र मुख्यत्वाने "मोहमय" अशा स्वरूपात सांगितले आहे.

अशा प्रकारे जरी वरील लक्षणानुरूप पाहिले तरी जागरादि दशांमध्ये तीनही अवस्था आहेत. पहिली अविकल्पक अर्थात् विकल्परहित ज्ञान म्हणजे जागरावस्था होय. जेथे विकल्प किंवा विचार आहेत त्याला स्वप्नावस्था असे म्हणतात. तत्त्वांचा अविवेक म्हणजेच सौषुप्त्यावस्था होय. जरी सुषुप्त्या-

वस्थेत विकल्प किंवा विचारांच्या कल्पना साक्षात् भासत नसल्या तरी सुषुप्त्यावस्थेत प्रवेश करण्याच्या इच्छेमध्ये जाग्रत अवस्थेला उचित असे ज्ञान आणि त्यानंतर अनेक संस्कारांनी कल्पिलेले विकल्परूप स्वप्नही असतेच.

योग्याच्या दृष्टीने पाहता योगाच्या आठ अंगांपैकी धारणारूप ज्ञान म्हणजे जागृती होय. धारणा ही ज्ञानप्रवाहरूप असते. "मी वायू आहे, मी वायू आहे, मी शून्य आहे," अशा प्रकारचा प्रत्ययरूप अथवा ज्ञानरूप प्रवाह होय. त्यानंतर त्या प्रत्ययांचा प्रवाहरूप विकल्प अर्थात् विचार म्हणजेच स्वप्न होय. ग्राह्य म्हणजे विषय आणि ग्राहक म्हणजे विषयांना जाणणारा यांचा भेद ज्याच्यात नाही अशा प्रकारची समाधी म्हणजेच सुषुप्त्यावस्था होय. या वाक्यांनीही हेच सांगितले आहे. त्यामुळेच पूर्वशास्त्रात योग्याच्या दृष्टि-कोनातून जागृत्यादिकांचा परस्पर संबंध सांगितला आहे.

या दृष्टीने "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात उपरोक्त भेद स्पष्ट करताना असे म्हटले आहे की -

**चतुर्विधं तु पिण्डस्थमबुद्धं बुद्धमेवच।**
**प्रबुद्धं सुप्रबुद्धं च पदस्थं च चतुर्विधम्।।२.४३।।**

**अर्थ :-** पिंडस्थ व पदस्थ हे अबुद्ध, बुद्ध, प्रबुद्ध आणि सुप्रबुद्ध अशा चार प्रकारचे असतात.

योगिदृष्ट्या अबुद्धादि शब्दांनी जाग्रत, स्वप्न, सुषुप्ती व तुर्यावस्था या सूचित केल्या आहेत. अबुद्ध म्हणजे धारणा किंवा जागृती होय. बुद्ध म्हणजे ध्यान म्हणजेच स्वप्न होय. प्रबुद्ध म्हणजे समाधी म्हणजेच सुषुप्ती आणि सुप्रबुद्ध म्हणजे सर्वश्रेष्ठ तुर्यावस्था होय.।।८,९ व १०।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे सातव्या सूत्रात तुर्यावस्थेचे विवेचन करून जाग्रदादि अवस्थांचे स्पष्टीकरण करण्यासाठी आणि जीवन्मुक्तीची सिद्धी करण्यासाठी श्रीपरमेश्वरांनी "**ज्ञानं जाग्रत्।।८।।, स्वप्नो विकल्पाः।।९।।**" व "**अविवेको माया सौषुप्तम्।।१०।।**" ही तीन सूत्रे उद्धृत केली आहेत.।।३७-३७.५।।

निश्चय, अभिमान, संकल्प, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध व अन्य इंद्रिये यांच्यापासून होणारे जे ज्ञान आहे आणि चिदात्म्याच्या ग्रहितृ, ग्रहण व ग्राह्य या रूपात स्फुरणाऱ्या ज्ञानशक्तीलाच येथे जाग्रद्वृत्ती असे म्हणतात. या अवस्थेत पशूची म्हणजे जीवाची स्वरूपहानी होत असल्यामुळे या अवस्थेला जाग्रद्वृत्ती असे म्हटले आहे. ही वृत्ती पशूच्या म्हणजे जीवाच्या आत्मरूपाला

झाकणारी अर्थात् आत्मज्ञान होण्यात अडथळा आणणारी आहे. बाह्यज्ञानात सामान्य माणसे गुंततात व आत्मज्ञानापासून वंचित होतात. पशुपतींना अर्थात् श्रीपरमशिवांचे ज्ञान झालेल्या सिद्धयोग्यांना मात्र ही जागृती स्वरूपस्फूर्ती देणारी होते.।।३८-३९-४०।।

दर्शन अथवा दृष्टी हाच स्वभाव असणाऱ्या व्यापक आत्म्याच्या विकल्पांचा नवनवीन उदय म्हणजे स्वप्न होय. यात बाह्य विषयांचा निरास असतो. बाह्य विषयांचा अभाव असल्याने बाह्यवृत्तींचे उपशमन होते व बाह्यार्थ निरपेक्षते मुळे अंतःकरणात पसरणाऱ्या अर्थात् उत्पन्न होणाऱ्या नगर, पर्वत व उद्यान वगैरे पदार्थ विलक्षण रीतीने आभासविणाऱ्या आणि आपापले परिणाम करणाऱ्या हर्षभयखेदादि कल्पनांचा आविर्भाव अर्थात् या कल्पना उत्पन्न होणे म्हणजे स्वप्न होय. ही अवस्थाही पशुस्वरूपाचे अर्थात् जीवस्वरूपाचे आवरण करते.।।४१।।

पतिभावामुळे अर्थात् साधकभक्तयोगिशिष्याच्या श्रीशिवभावामुळे विकल्पांना दृढत्व येते. पशुभावामुळे विकल्पांना डळमळीतपणा येतो. यालाच आवरण असे म्हणतात. ज्ञान्याला स्वप्न हे कल्पनामय आहे असे ज्ञान दृढ असते व पशूला म्हणजे जीवाला ते ज्ञान नसतेच. ज्ञान असले तरी निश्चय नसतो. त्यामुळे स्वप्नामुळे आवरण पडते.।।४२।।

ज्यावेळेला शक्त्यात्म्या प्रभूंच्या ज्ञानज्ञेयरूप शक्तीचा अनुदय म्हणजेच अस्त होतो त्यावेळेला चिद्रूपाचे अज्ञान उत्पन्न होते व तिलाच मायावरणाने युक्त असल्यामुळे सुषुप्ती असे म्हटले जाते. ज्यावेळेला ही अज्ञानरूप सुषुप्ती जीवाला प्राप्त होते त्यावेळेला विषय व त्यांच्या स्मृती चिद्रूपात लीन म्हणजेच गुप्त झालेल्या असतात. मात्र या अवस्थेत विषय व त्यांच्या स्मृती मुळीच नसतात असे म्हणता येत नाही; कारण "मी सुखाने झोपलो होतो, त्यामुळे मला बाह्य व्यवहाराचे काही ज्ञान झाले नाही," असा सुषुप्तीचा अनुभव सांगता येतो.।।४३,४४।।

अशा रीतीने या तीन अवस्था पतीसाठी अर्थात् सिद्धयोग्यासाठी स्वविश्रांति-रूपाने व पशुजीवाला आवरणरूपाने सिद्ध होतात. चिदात्म्याच्या बाबतीत या अवस्था मुख्य व गौण अशा प्रकारे जाणून घ्याव्यात. अशा प्रकारे "सुषुप्ततुर्ये" या दोन पदातून पती म्हणजे श्रीशिवरूप झालेला सिद्धयोगी ज्ञानज्ञेयमय आहे आणि इतरांमध्ये म्हणजे जाग्रत्स्वप्नावस्थेमध्ये चिन्मय व व्यापक आहे हे स्पष्ट होते.।।४५ ते ४६.५।।

या तीन अवस्थांमध्ये पतिपशूंना स्वरूपावभास व अनवभास हे स्वभावसिद्ध आहेत, हा ज्ञानज्ञेयादि पदांचा अभिप्राय आहे.।।८,९ व १०।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**ज्ञानं जाग्रत्।।८।।**" अर्थात् सर्वसाधारणपणे किंवा सर्वसामान्य शब्दादि अशा अर्थविषयांचे बाह्य इंद्रियांपासून उत्पन्न होणारे ज्ञान म्हणजे जाग्रदावस्था होय.।।८।।

"**स्वप्नो विकल्पाः।।९।।**" अर्थात् केवळ मनाने उत्पन्न होणारे असाधारण पदार्थविषयांचे विकल्प म्हणजेच अस्तित्वात नसणाऱ्या पदार्थांची कल्पना म्हणजे स्वप्न होय.।।९।।

"**अविवेको माया सौषुप्तम्।।१०।।**" अर्थात् विवेचनाचा म्हणजे ज्या गोष्टीचे स्पष्टीकरणच करता येत नाही असा अभाव किंवा नसणे म्हणजे अख्याती होय. ही अख्याती म्हणजेच मायेने किंवा मोहाने युक्त अशी सुषुप्त्यावस्था होय.।।१०।।८,९ व १०।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**ज्ञानं जाग्रत्।।८।।, स्वप्नो विकल्पाः।।९।।**" व "**अविवेको माया सौषुप्तम्।।१०।।**" या जाग्रदादि तीन अवस्थांची लक्षणे या तीन सूत्रांनी क्रमाने सांगितली आहेत. सर्वसाधारण अर्थांनी युक्त बाह्य इंद्रियांनी होणारे ज्ञान म्हणजे जाग्रदावस्था होय.।।४६।।

स्वप्न म्हणजे आत्माच होय अर्थात्च आत्म्यापासून उत्पन्न होणारे अनेक संकल्प व विकल्प होत. आता सुषुप्त्यावस्थेचे लक्षण सांगतात. त्यात बरे-वाईट विवेचन करण्याची शक्ती नसते. निजाख्याती म्हणजे स्वविषयक अज्ञान होय. माया व मायेमुळे मूढत्व किंवा अज्ञान ही सुषुप्ती होय. योग्यांची धारणा, ध्यान व समाधी ही तीन अंगे जाग्रत, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्थांत अंतर्भूत होतात.

"**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथात या जाग्रदादि तीन अवस्थांची लक्षणे पुढीलप्रमाणे वर्णन केली आहेत.।।४७-४८।।

**शून्ये बुद्ध्याद्यभावात्मन्यहन्तकर्तृतापदे।**
**अस्फुटारूपसंस्कारमात्रिणि ज्ञेयशून्यता।।४९।।**
**साक्षाणामान्तरी वृत्तिः प्राणादिप्रेरका मता।**
**जीवनाख्याथवा प्राणेऽहन्ता पुर्यष्टकात्मिका।।५०।।**
**तावन्मात्रस्थितौ प्रोक्तं सौषुप्तं प्रलयोपमम्।।५०.५।।**

**अर्थ :-** सुषुप्ती ही प्रलयासारखी असते. यात ज्ञेय शून्य असते अर्थात् ज्ञेयाचा अभाव असतो. ही इंद्रियांची आंतरिक वृत्ती आहे. या अवस्थेत प्राणादि वायूंना प्रेरणा मिळते. यात बुद्ध्यादिकांचा अभाव असल्यामुळे अहंपणा व कर्तेपणा शून्यरूपाने म्हणजेच अभावरूपाने असतो. प्राणामध्ये प्रेरणादि असते त्यामुळे त्याला जीवन हे नाव आहे.।।४९-५०-५०.५।।

**सवेद्यमपवेद्यं च मायामलयुतायुतम्।**
**मनोमात्रपथेऽप्यक्षविषयत्वेन विभ्रमात्।।५१।।**
**स्पष्टावभासा भवानां सृष्टिः स्वप्नपदं मतम्।।५२।।**

**अर्थ :-** स्वप्न म्हणजे मनाच्या मार्गामध्ये इंद्रियांना विषय म्हणजेच ज्ञात होण्यासारखे भासणे होय. अनेक पदार्थांचे अस्तित्व या स्थितीत अथवा अवस्थेत स्पष्ट रीतीने दिसत किंवा भासत असते. या अवस्थेत मायामलाचा संबंध कधी असतो तर कधी नसतो. कधी स्वप्नातले लक्षात राहते, कधी राहत नाही; तर कधी अस्पष्ट लक्षात राहते.।।५१-५२।।

**सर्वाक्षगोचरत्वेन या तु बाह्यतया स्थिरा।**
**सृष्टिः साधारणी सर्वप्रमातृणां स जागरः।।३.२.१७।।**

**अर्थ :-** जागृती म्हणजे सर्व इंद्रियांना ज्ञात होणारी व बाह्यदृष्ट्या स्थिर असणारी आणि सर्व प्रमात्यांना म्हणजेच सर्व ज्ञात्या जीवांना साधारण अर्थात् सामान्य अशी अवस्था होय.।।५३।।

लोक म्हणजे जनसामान्य व साधकभक्तयोगिशिष्य यांना अनुलक्षून सांगितलेल्या या जागृत्यादि तीन अवस्थांमध्ये मोठ्या सावधगिरीने वागणाऱ्या साधकभक्ताला किंवा योगिशिष्याला विश्वसंहाराला अर्थात् उपसंहाराला कारण अशा शक्तिचक्राच्या अनुसंधानामुळे तुर्यावस्थेच्या अनुभवाने पूर्ण भरलेली अभेदख्याती अर्थात् अभेदज्ञान स्फुरू लागते. ही अवस्था अख्याती अथवा अज्ञानाला हरण किंवा नष्ट करणारी आहे. या तुर्यावस्थेमध्ये सिद्धयोग्याला पूर्वी वर्णिलेल्या चैतन्याचे ज्ञान होते.।।५४-५५-५६।।८,९ व १०।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

**"ज्ञानं जाग्रत्।।८।।"** या सूत्रात जाग्रत् अवस्थेचे श्रीशिवस्वरूप सांगितले आहे. चक्षू इत्यादि इंद्रियांपासून उत्पन्न होणारे पदार्थांच्या रूपादि विषयाचे ज्ञान हे "जाग्रत्" असे म्हणविले जाते. यासंबंधी असे म्हटले आहे की, **"अक्षैर्योऽर्थग्रहं पुंसां तज्जाग्रदिति कथ्यते।"** अर्थात् "डोळ्यांनी मनुष्यांना जो पदार्थांचा ग्रह किंवा ज्ञान होते त्याला जाग्रत् असे म्हणतात." त्याचप्रमाणे

"**श्रीपंचदशी**" या ग्रंथात जागृतावस्थेचे लक्षण करताना असे म्हटले आहे की, "**इन्द्रियैरर्थोपलब्धिजागरितम्।**" अर्थात् "इंद्रियांकडून होणारी अर्थांची म्हणजेच पदार्थांची उपलब्धी अर्थात् ज्ञान म्हणजे जागृतावस्था होय." मनुष्य ज्या दशेत त्या त्या इंद्रियांच्यापासून उत्पन्न होणारा व्यापार संपादन करतो त्याला जागृतावस्था असे म्हणतात.

या दृष्टीने "**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथात यासंबंधी असे म्हटले आहे की -

**सर्वाक्षगोचरत्वेन या तु बाह्यतया स्थिरा।**
**सृष्टिः साधारणी सर्वप्रमातृणां स जागरः।।३.२.१७।।**

**अर्थ :-** सर्व इंद्रियांना ज्ञात होणारी, बाह्यदृष्ट्या स्थिर असणारी व सर्व प्रमात्यांना म्हणजेच सर्व ज्ञात्या जीवांना साधारण असणारी अशी अवस्था म्हणजे जागृती होय.

जीवात्म्याचे पारमार्थिक स्वरूप श्रीपरमशिवात्मकच असते; परंतु जागृत अवस्थांनी त्याचे वास्तविक स्वरूप झाकले जाते. त्यामुळेच आचार्यांनी जाग्रत्कालीन वृत्तींना स्वरूपहानीकर असे म्हटले आहे. याचा भावार्थ असा आहे की, "निश्चय, अभिमान, संकल्प, शब्द, स्पर्श, रस व गंध हे उपादान असणाऱ्या बाह्य चक्षुरादि इंद्रियांमुळे उत्पन्न होणारे ज्ञान हीच प्रमात्यांची जाग्रत्कालीन वृत्ती असून ती प्राण्यांच्या स्वरूपाचे आच्छादन करणारी होते; परंतु तीच अवस्था पतींसाठी अर्थात् साधकभक्तयोगिशिष्यांसाठी स्वात्मस्फूर्ती देणारी असते.।।८।।

यानंतरच्या "**स्वप्नो विकल्पाः।।९।।**" या सूत्रात स्वप्नावस्थेचे स्वरूप सांगितले आहे. ज्या अवस्थेत केवळ मनाने संस्कारांच्या दृढ अशा सामर्थ्यामुळेच असाधारण अर्थविषयरूप नाना विकल्प असतात त्या अवस्थेलाच स्वप्नावस्था असे म्हणतात.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**यत्तैर्विनार्थस्मरणं मनसा स्वप्नसंज्ञितम्।।**

**अर्थ :-** इंद्रियांशिवाय मनानेच होणारे अर्थस्मरण म्हणजे पदार्थांचे स्मरण अर्थातच स्वप्नावस्था होय.

त्याचप्रमाणे "**श्रीपंचदशी**" या ग्रंथात "तत्त्वविवेक" या प्रकरणात असे म्हटले आहे की, "**करणेषूपसंहृतेषु जागरितसंस्कारज प्रत्ययः सविषयः स्वप्नः।।** अर्थात् "करणांनी म्हणजेच इंद्रियांनी उपसंहृत केलेल्या जागरित

अवस्थेतल्या संस्कारांनी उत्पन्न होणारे सविषय अर्थात् विषयांसहित असणारे ज्ञान म्हणजे स्वप्न होय."

या स्वप्नदशेत विविध विकल्प प्राधान्याने राहत असतात. यासंबंधी "**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**मनोमात्रपथेऽप्यक्षविषयत्वेन विभ्रमात्।**
**स्पष्टावभासा भावानां सृष्टिः स्वप्नपदं मतम्।।३.२.१६।।**

**अर्थ :-** स्वप्न म्हणजे मनाच्या मार्गामध्ये इंद्रियांना विषय म्हणजेच ज्ञात होणाऱ्या विभ्रमामुळे स्पष्टपणे अवभासित होणाऱ्या पदार्थांची सृष्टी होय.

त्यामुळेच बाह्य अर्थांचा अभाव असणाऱ्या अवस्थेत त्या त्या वृत्तींचा उपशम झाल्यावर बाह्य विषयांची अपेक्षा नसलेले पर्वत, वृक्ष, नगर इत्यादि त्याचप्रमाणे नदी, सागर, झरे इत्यादि विविध प्रकारांनी अवभासित होणाऱ्या स्व-अर्थ-क्रियाकारी अशा विविध कल्पनांचा नवीन नवीन उदय म्हणजे स्वप्नावस्था असून त्यामुळेही प्राण्याचे स्वरूप झाकले जाते.।।९।।

पुढच्या "**अविवेको मायासौषुप्तम्।।१०।।**" या सूत्रातून सुषुप्ती दशेचे स्वरूप सांगतात. ज्या अवस्थेत कोणत्याही विशिष्ट विषयाचे विवेचन होत नाही आणि अविवेकामुळे जीवाला "स्व"रूपाचा परिचय होत नाही त्या अवस्थेलाच मायारूप मोहात्मक सुषुप्ती अवस्था असे म्हणतात. या संबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की, "**यत्रार्थस्मरणे न स्तस्तत्सौषुप्तमुदाहतम्।।**" अर्थात् "जेथे अजिबात पदार्थांचे ज्ञान व स्मरण होत नाही त्याला सौषुप्तदशा असे म्हणतात."

सुषुप्ती दशेचे लक्षण सांगतानाच सूत्रकारांनी "माया" हा शब्द सूत्रात घालून उच्छेद्य अशा मायेचे स्वरूपही सांगितले आहे. या लक्षणांनी जाग्रदादि अवस्थांमध्येही त्रिविधता असते असे ज्ञान होते. जाग्रदावस्थेतले ज्ञान विकल्पात्मक असते. स्वप्नावस्थेमध्ये नाना प्रकाराचे विकल्प उत्पन्न होतात; परंतु सुषुप्त्यावस्थेत तत्त्वांचे विवेचन कदापी होत नाही. असे असूनही त्यांच्या अनेक प्रकारांमुळे व्युत्थान दशेमध्ये महायोग्यांची स्वस्वरूपापासून लेशमात्रही प्रच्युती होत नाही. हा महान् चमत्कार यातून सूचित केला आहे.।।१०।।

**विवरण :-** स्वप्न आणि सुषुप्ती याचे विवरण वरील सूत्रांमध्ये चांगल्या तऱ्हेने दिलेले आहे. परंतु श्रीक्षेमराजाचार्यांच्या "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात या अवस्थांबद्दल काही इतर माहितीही दिली आहे. त्याच्यासाठी थोडे जास्त स्पष्टीकरण आवश्यक आहे. "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या

ग्रंथानुसार स्वप्न आणि सुषुप्तीच्या विविध अवस्था या प्रमात्याच्या अर्थात् ज्ञात्याच्या दृष्टीने निश्चित केल्या पाहिजेत. ज्यावेळेला वस्तू ही बाह्य वस्तू अथवा वस्तुमात्र म्हणजेच प्रमेय म्हणून जाणली जाते म्हणजेच ती वस्तू त्या ठिकाणी प्राधान्याने असते त्यावेळेला आपली जागृत अवस्था असते. त्या अवस्थेला जाग्रत्-जाग्रत् अवस्था असेही म्हणता येईल; कारण ही अवस्था वास्तविक जागृत दशेतली जागृतावस्था आहे. साधकभक्तयोगिशिष्याच्या दृष्टीने ही अवस्था म्हणजे अबुद्ध अवस्था अर्थात् अजागृत किंवा निद्रावस्था होय.

ज्यावेळेला जागृतावस्थेतच ती वस्तू मुख्य ठरत नसून त्या वस्तूचे ज्ञान म्हणजेच प्रमाण हे मुख्य असते त्यावेळेला त्या अवस्थेला जागृत-स्वप्न अवस्था असे म्हणतात. ही अवस्था म्हणजेच जागे असताना पडलेल्या स्वप्नाप्रमाणे आहे. साधकभक्तयोगिशिष्याच्या दृष्टीने ही बुद्ध किंवा जागृत अवस्था होय.

ज्यावेळेला जाग्रत अवस्थेमध्ये जाणिवेत प्रमाता किंवा ज्ञाताच मुख्य ठरतो त्यावेळेला त्या अवस्थेला जागृत-सुषुप्ती असे म्हणतात म्हणजेच त्यावेळेला ज्ञाता हा कर्त्याच्या दृष्टीने जागृत असतो, वस्तूच्या नाही. साधक-भक्तयोगिशिष्याच्या दृष्टीने ही अवस्था प्रबुद्धावस्था असते.

ज्यावेळेला जागृतीत केवळ जाणीव अथवा प्रमिती किंवा ज्ञानाचेच मुख्यत्व असते त्यावेळेला त्या अवस्थेला जागृत-तुर्यावस्था असे म्हणतात. साधकभक्तयोगिशिष्याच्या दृष्टीने ही अवस्था सुप्रबुद्धावस्था म्हणजे संपूर्ण जागृतावस्था होय.

सामान्य मनुष्याच्या दृष्टीने या अवस्था जागृतीशी संबंधित आहेत. साधक-भक्तयोगिशिष्य या सर्व अवस्थांना पिंडस्थ अर्थात् पिंडात म्हणजे जीवात असणाऱ्या अवस्था असे म्हणतात. ज्ञानी अर्थात् ज्यांना श्रीशिवांचे संपूर्ण ज्ञान झाले आहे ते या अवस्थेला सर्वतोभद्र अवस्था असे म्हणतात; कारण त्यांच्या मते हे सर्व वस्तुमय जगत् हे दिव्य अस्तित्वाच्या तेजाने भरलेले आहे आणि या जगातील सर्व व्यक्त वस्तू या श्रीशिवांचीच अभिव्यक्ती असून हे जग म्हणजे संवित्‌ची लीला आहे.

आता स्वप्नावस्थेतल्या चार अवस्था घेऊ या. स्वप्नावस्थेचे सर्वसामान्य गुणधर्म पुढील प्रमाणे आहेत. ही स्वप्नावस्था म्हणजे विकल्प, कल्पना, कल्पनाशक्ती किंवा मनोराज्यांचे स्थान होय. ही अवस्था अबाह्य म्हणजेच बाह्य जगाची अपेक्षा नसणारी आहे आणि फक्त स्वप्न पाहणाऱ्यांशीच निगडीत आहे.

ज्यावेळेला विकल्पांनी युक्त स्वप्नजगत् स्वप्नात अत्यंत स्पष्ट, सुरचित आणि स्थिर भासते त्यावेळेची अवस्था स्वप्न-जागृतीची असते. "**श्रीमालिनी-विजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात याला "गतागत" असे म्हटले आहे; कारण या अवस्थेमध्ये प्राण आणि अपान यांची गतीच प्रामुख्याने होत असून त्यामुळेच स्वप्नातले जगत् हे स्पष्टपणे भासते.

ज्यावेळेला स्वप्नावस्थेमध्ये सर्व स्वप्नातल्या घटना या अस्पष्ट, अंधुक आणि विस्कळीत भासतात त्यावेळेला त्या अवस्थेला स्वप्न-स्वप्नावस्था अर्थात् स्वप्नातले स्वप्न असे म्हणतात. "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात या अवस्थेला "सुविक्षिप्त" असे म्हटले आहे; कारण या अवस्थेत स्वप्नातल्या घटना विस्कळीत आणि गोंधळलेल्या अशा भासतात.

ज्यावेळेला स्वप्नावस्थेमध्ये स्वप्न पाहणारा एका स्वप्नातल्या वस्तूचा दुसऱ्या वस्तूशी योग्य संबंध लावू शकतो त्यावेळेला त्या अवस्थेला स्वप्न-सुषुप्ती असे म्हणतात; कारण या अवस्थेत स्वप्न पाहणारा त्याच्या स्वप्नातल्या घटनांमध्ये कोणत्याही प्रकारची असंगती अनुभवीत नसल्यामुळे त्याला अत्यंत चांगली व शांत झोप लागते. ज्ञानी या अवस्थेला "संगत" असे म्हणतात; कारण या अवस्थेत स्वप्न पाहणारा जीव त्याच्या स्वप्नातल्या घटनांची परस्परसंगती अनुभवीत असतो.

ज्यावेळेला या सर्व स्वप्नातल्या घटना चालू असतात त्यावेळेला जीव त्याच्या स्वसंवेदनेवरचे नियंत्रण सोडीत नाही. त्याला स्वतःची पूर्णपणे जाणीव असते आणि त्याला हे ही माहीत असते की, आपण स्वप्न पाहत आहोत. त्यावेळेला या अवस्थेला स्वप्न-तुर्या असे म्हणतात. या अवस्थेला "सुसंहित अवस्था" असेही म्हणतात; कारण या अवस्थेत स्वप्न पाहणारा जीव हा पूर्ण व्यक्ती असतो.

सर्वसामान्य मनुष्याच्या दृष्टीने स्वप्नावस्था ही केवळ स्वप्नावस्था असते. या अवस्थेत तो बाह्य जगताशी संबंधित नसलेल्या अनेक स्वप्नांचे विकल्प पाहत असतो.

साधकभक्तयोगिशिष्य या चारही स्वप्नावस्थांना एकाच नावाने म्हणजे "पदस्थ" या नावाने ओळखतो; कारण तो सिद्धयोगाच्या साधनाने या सर्व अवस्थांतील पदामध्ये म्हणजेच स्वसंवेदनेमध्ये स्थित असतो. गतागत, सुविक्षिप्त, संगत आणि सुसंहित या चार अवस्था या पदस्थ अवस्थेच्या केवळ काही पायऱ्या आहेत.

या आधी सांगितल्याप्रमाणे साधकभक्तयोगिशिष्याच्या दृष्टीने या अवस्था पदस्थ अवस्था आहेत. परंतु ज्ञानी मनुष्याच्या दृष्टीने या अवस्था व्याप्तीअवस्था आहेत; कारण या अवस्थांमध्ये ज्ञानी मनुष्याला स्वप्नावस्थेतल्या अवस्थेप्रमाणे सर्व अवस्थांमध्ये "स्व"चे अस्तित्व सर्वव्यापकतेने जाणवून येत असते.

आता सुषुप्ती अवस्थेचा विचार करू. या अवस्थेच्याही चार पायऱ्या आहेत. सर्वात पहिली अवस्था म्हणजे सुषुप्ती-जाग्रत् अवस्था होय. या अवस्थेला "उदित" अवस्था असेही म्हणतात; कारण या अवस्थेत विविध प्रकारांमध्ये सर्व बाह्य विश्वाचा संस्कार शिल्लक राहत असतो.

"सुषुप्ती-स्वप्न" अवस्थेला तंत्रशास्त्रात "विपुल" असे म्हणतात. विपुल म्हणजे घनदाट अथवा भरपूर होय. या अवस्थेला विपुल असे म्हणतात; कारण या अवस्थेत बाह्य जगताच्या अनुभवाचे संस्कार हे इतके वाढलेले असतात की, त्यामुळे ते दृढ होतात.

सुषुप्ती-सुषुप्ती या अवस्थेला तंत्रशास्त्रात "सांत" असे म्हणतात; कारण शेष राहिलेले जगताचे अनुभव कमी आणि शांत होतात.

सुषुप्ती-तुर्य ही अवस्था तंत्रशास्त्रात "सुप्रसन्न" या नावाने ओळखली जाते; कारण सिद्धयोगी या अवस्थेत श्रीशिवांच्या पूर्ण संवित् अर्थात् पूर्ण चैतन्यामध्ये प्रवेश करतो व शांती आणि आनंदाने पूर्ण भरून जातो.

त्यामुळे साधकभक्तयोगिशिष्याच्या "रूपस्थ" दशेच्या एकूण चार पायऱ्या १) उदित, २) विपुल, ३) सांत व ४) सुप्रसन्न अशा आहेत.

थोडक्यात आपल्याला असे म्हणता येईल की, ज्यामध्ये जाणलेले किंवा जगताच्या अनुभूतीची बाजू प्रधान किंवा प्रमुख अथवा स्पष्ट असते त्या अवस्थेला जाग्रत् अवस्था असे म्हणतात. स्वप्नावस्थेमध्ये ज्ञान प्रमुख असते. सुषुप्ती अवस्थेत जाणणारा किंवा कर्ता प्रमुख असतो.

तुर्यावस्थेमध्ये तुर्य-जाग्रत्, तुर्य-स्वप्न आणि तुर्य-सुषुप्ती अशा तीन पायऱ्या आहेत. तुर्य-जाग्रत् ही अशी अवस्था आहे की, ज्यात मन पूर्णपणे निवृत्त होते, त्याचे कार्य थांबते आणि या मनाच्या वरती जे एक मन असते त्याचेच म्हणजेच उन्मन अवस्थेचे कार्य सुरू होते. यालाच मनोन्मन असे म्हणतात. या अवस्थेत सर्वसाधारण मनाचे कार्य थांबून जाते आणि उन्मन (Super Mind) कार्य प्रवण होते.

तुर्य-स्वप्न या अवस्थेत सिद्धयोगी ज्ञानाच्या मर्यादेची सीमारेषा पार करतो आणि अमर्याद ज्ञानाच्या कक्षेत प्रवेश करतो. त्यामुळे या अवस्थेला

तंत्रशास्त्रात "अनंत" असे म्हणतात.

तुर्य-सुषुप्ती या अवस्थेला "सर्वार्थ" असे तंत्रशास्त्रात म्हटलेले आहे; कारण या अवस्थेत प्रत्येक गोष्ट दिव्यशक्तीच्या अंशाने परिपूर्ण अशी अनुभवाला येते.

तुर्य-तुर्य अशी कोणतीही अवस्था नाही. तुर्यावस्थेत जीव "श्रीशिव-चैतन्य" म्हणून ओळखला जातो. ही जागृत, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन माहीत असलेल्या अवस्थांच्या पलीकडे असल्याने तुर्यअवस्थेला सर्वसाधारण मनुष्य तुर्यावस्था किंवा चौथी अवस्था म्हणून ओळखतो. या तुर्यावस्थेचा सामान्य मनुष्याला अनुभव नसतो. सिद्धयोगी या अवस्थेला "रूपातीत" असे म्हणतात; कारण या अवस्थेत कर्ता आणि वस्तू म्हणजेच ज्ञाता आणि ज्ञेय या दोन्ही गोष्टींचे सर्वसाधारण रूप जाणिवेच्या पलीकडे गेलेले असते. ज्ञानी जीव या अवस्थेला "प्रचय" असे म्हणतात. प्रचय याचा अर्थ समूह किंवा एकत्रित असणे होय; कारण या स्थितीमध्ये ज्ञानी मनुष्य प्रत्येक गोष्ट दिव्य प्रकाशात बुडालेली पाहतो.

तुर्यातीत ही अवस्था पूर्ण, अखंड व दिव्य अशा स्व-चैतन्याने भरलेली असते. या अवस्थेत काही पायऱ्या असणे शक्य नाही. ही पूर्ण जाणिवेची अवस्था आहे. या अवस्थेत कोणत्याही यौगिक प्रयत्नांची आवश्यकता नसते. ज्ञानी सिद्धयोगी या अवस्थेला "महाप्रचय" असे म्हणतात. जो या अवस्थेत गेलेला असतो त्याला सर्व काही श्रीशिवच भासते.

सारांशाने असे म्हणता येईल की, आत्मस्थिती ज्या अवस्थेत असते ती जाग्रत् अवस्था होय. मनाच्या संकल्प व विकल्पात्मक अवस्थेला म्हणजे शाब्दिक ज्ञानाने युक्त अशा अवस्थेला स्वप्नावस्था असे म्हणतात. मायेच्या पाच कंचुकांनी आवृत विवेकरहित ज्ञानच सुषुप्ती आहे.।।८,९ व १०।।

## सूत्र क्रमांक ११

**संबंध :-** सिद्धयोग्याच्या तुर्यावस्थेच्या विचारामध्ये लौकिक अशा जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन अवस्थांचे स्पष्टीकरण केले. आता त्याच्याच तुर्यावस्थेचा विचार पुढील सूत्रात करीत आहेत.

**त्रितयभोक्ता वीरेशः।।११।।**

**शब्दार्थ :- त्रितय** - जागृती, स्वप्न व सुषुप्ती या अवस्था. **श्रीभास्करा-चार्यांच्या** मते त्रय म्हणजे सत्त्व, रज, तम हे गुणत्रय. **भोक्ता** - आनंदाचा उपभोग घेणारा किंवा स्वतंत्रतेने चमत्कार करणारा सिद्धयोगी. **वीरेशः** -

इंद्रियांचा स्वामी किंवा भेदप्रथेचा ग्रास करणारा वीर हा उत्तमातला उत्तम वीर आहे.

**अर्थ :-** जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या अवस्थांचा स्वतंत्रतेने चमत्कार करणारा सिद्धयोगी हा भेदप्रथेचा ग्रास करणाऱ्या वीरांमध्ये उत्तम वीर आहे अर्थात् या तीन्ही अवस्थांमध्ये अत्यंत श्रेष्ठ अशा आत्मिक आनंदाचा उपभोग घेणारा सिद्धयोगी शक्तिस्वरूप असलेल्या खऱ्याखुऱ्या इंद्रियांचा स्वामी होतो अर्थात् सिद्धयोगसाधकभक्तयोगिशिष्य श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोग-दीक्षेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीकडून होणारे स्वतःसिद्ध असे सिद्धयोगाचे साधन दीर्घकाल, निरंतर व श्रद्धाभक्तिसत्कारपूर्वक होऊ देऊन जागृत, स्वप्न व सुषुप्ती किंवा सत्त्व, रज व तम यांना गिळून टाकून म्हणजे या तिन्ही अवस्था-स्वरूप शक्तींना मूळ कुंडलिनी शक्तीशी समरस व सुषुम्नागामी होऊ देऊन सहस्रारात श्रीशिवशक्तिसामरस्यावस्था प्राप्त केल्यानंतर सिद्धयोगी होऊन तिन्ही अवस्था व तिन्ही गुणांमध्ये आनंदावस्थेत अखंड व निरंतर राहत असल्यामुळे तोच सर्वश्रेष्ठ वीर म्हणजे सिद्धयोगिमहात्मा होय.।।११।।

**विशेषव्याख्या :-** जाग्रत् इत्यादि तीन अवस्थांमध्ये शक्तिचक्राचे अनु-संधान करणारा सिद्धयोगी तुर्यावस्थेच्या आनंदरसाने भरलेला असतो. त्याच्यामध्ये भेदप्रथेचा अभाव असतो. या आनंदरसात मग्न असलेला सिद्धयोगी हा प्रत्येक अवस्थेत म्हणजे खाताना, पिताना, जाताना, झोपताना व श्वास घेताना परमव्योम अथवा परमाकाशरूप श्रीशिवस्वरूपाच्या भावनेत मग्न राहतो आणि अशा प्रकारे या तीनही अवस्थांमध्ये स्वातंत्र्याच्या चमत्काराने पूर्ण असतो. या अवस्थेच्या स्थितीला "तुर्यातीत अवस्था" असे म्हणतात.

"**श्रीकैवल्योपनिषद्**" या ग्रंथात त्याचा स्वातंत्र्यरूप चमत्कार पुढील-प्रमाणे सांगितला आहे.

**त्रिषु धामसु यद्भोग्यं भोक्ता भोगश्च यद्भवेत्।**
**तेभ्यो विलक्षणः साक्षी चिन्मात्रोऽहं सदाशिवः।।१८।।**

**अर्थ :-** जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन अवस्थांमध्ये जे काही भोग्य म्हणजे विषय, भोक्ता म्हणजे विषयी आणि भोग म्हणजे विषयग्रहण आहे, त्यापासून विलक्षण असलेला मी चिन्मात्र श्रीसदाशिव साक्षी सर्वथा भिन्न आहे.

असा सिद्धयोगी केवळ चिन्मात्रच असतो. त्याच्याकडे संवित् साम्राज्याचे वैभव असल्याकारणाने तो भेदजगताचा ग्रास करणाऱ्या वीरांमध्ये उत्तम वीर असतो; कारण तो अंतर्गत त्याचप्रमाणे बाह्य प्रवणशील इंद्रियांचा अधीश्वर

असल्यामुळे त्याची इंद्रिये भेदप्रथारूप संसारामध्ये ग्रस्त राहत नाहीत. त्यामुळे सर्व योग्यांमध्ये तोच उत्तम सिद्धयोगी आहे आणि तोच तुर्यातीत आहे.।।११।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा रीतीने लोक आणि साधकभक्तयोगिशिष्य यांच्या दृष्टीने जागरादि तीन अवस्थांचे वर्णन झाल्यावर शक्तिचक्राच्या संधानाने विश्वसंहार साधल्यावर ज्या सिद्धयोग्यामध्ये अभेद व्यापून राहिलेला आहे त्याच्या ठिकाणी तुर्या-भोगमयत्व कसे स्फुरते ते "**त्रितयभोक्ता वीरेशः।।११।।**" या सूत्राने कथन केले आहे. तो सिद्धयोगी तुर्यावस्थेच्या सातत्याच्या साहाय्याने पूर्वोक्त तुर्यातीत चैतन्यात समाविष्ट होऊन जागरादि तीनही अवस्थांचा भोग घेणारा होत वीरातला उत्तम वीर होतो. जो साधकभक्तयोगिशिष्य शक्तिचक्रसंधानाच्या साहाय्याने जागृत्यादि तीन अवस्था या तुर्यानंदाशी संबंधित, भेदसंस्कार नष्ट झालेल्या आणि आनंदरसाने भरलेल्या आहेत असे जाणतो तो सिद्धयोगी जागरादि तीन अवस्थांचा खरा भोक्ता समजावा.

या दृष्टीने "**श्रीकैवल्योपनिषद्**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**त्रिषु धामसु यद्भोग्यं भोक्ता यश्च प्रकीर्तितः।**
**वेदैतदुभयं यस्तु स भुञ्जानो न लिप्यते।।१८।।**

**अर्थ :-** तीनही धामांमध्ये म्हणजेच अवस्थांमध्ये जे भोग्य म्हणजे विषय आणि भोक्ता म्हणजे विषयी सांगितले आहेत त्या दोघांना जो जाणतो तो विषयांचा भोग घेत असतानाही त्या भोगांनी लिप्त होत नाही.।।१८।।

असे शास्त्रात वर्णिल्याप्रमाणे जागरादि तीन अवस्थांमध्ये जे ग्राह्य आणि ग्राहक आहे त्यांचा जो सिद्धयोगी विचार करतो तो भोगांमध्ये मग्न असूनही ज्याप्रमाणे पाण्यात राहूनही कमळाचे पान ओले होत नाही त्या-प्रमाणे भोगकर्मांनी लिप्त होत नाही. या उक्तीनुसार हा सिद्धयोगी शत्रु-रहित, आत्मसाम्राज्य भोगणारा, परमानंदाने तृप्त झालेला व संसारातील भेदाचा ग्रास करणाऱ्या इंद्रियांचा स्वामी बनतो. त्या योग्याला महाम्नायात "**मंथानभैरव**" असे म्हटले आहे. त्याला "**मंथानभैरव**" असे म्हणण्याचे कारण म्हणजे तो सर्व वेद्य जगत् आत्म्यात लीन करतो व एकत्र करून पुनः घुसळून वरही आणतो. या कारणामुळे त्याला "**स्वच्छंदभैरव**" असेही म्हणतात. परंतु जो मनुष्य असा वर सांगितल्याप्रमाणे होत नाही तो जागरादि अवस्थांकडून भोगला जाणारा लौकिक पशूच समजला जातो. एवढेच नाही; तर साधकभक्तयोगिशिष्य असूनही या धारेचा किंवा

अवस्थेचा जो आश्रय घेत नाही त्याला "मूढ" असेच म्हटले जाते.
यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**विना स्वभावानुभवेन पुंसः कैवल्यमुत्क्रान्तिबलाद्यदि स्यात्।**
**अत्रापि पक्षे ननु मोक्षभाक्स उद्बन्धनं युत्कुरुते प्रमूढः।।**

**अर्थ :-** एखाद्या सिद्धयोग्याला स्वभावाचा अनुभव आल्या-शिवायच अर्थात् जागरादि अवस्थांच्या योग्य ज्ञानाशिवायच उत्क्रांतिबळाने जरी कैवल्य अथवा मोक्ष प्राप्त झाला तरीही त्याने जर उद्बंधन अर्थात् शक्ति-चक्रसंधानाचा त्याग केला तर तो मोक्षाचा उपभोग घेणारा असूनही प्रमूढ अर्थात् अत्यंत मूढ म्हणविला जातो.

त्याचप्रमाणे -

**विदेहा अपि बध्यन्ते प्रलये गुणवासिताः।**
**शरीरिणोऽपि मुच्यन्ते विशुद्धज्ञानसंश्रयात्।।**

**अर्थ :-** विदेही अर्थात् देहरहित असूनही जे सिद्धयोगी प्रल-यात सत्त्वादि गुणांनी युक्त होतात ते बंधनात पडतात आणि शरीरी असूनही जे सिद्धयोगी विशुद्ध ज्ञानाचा आश्रय घेतात ते बंधनातून मुक्त होतात.

"**श्रीज्ञानगर्भ**" या ग्रंथातही असे म्हटले आहे की -

**मयि स्थितमिदं जगत् सकलमेव सर्वत्र वा**
**स्थितोऽहमिति धारणाद्वितयभावनावेशतः।**
**जगत्त्रितयनाथतानतिचिरेण सम्प्राप्यते**
**नृभिस्तव सपर्यया दलितकिल्बिषोपप्लवैः।।**

**अर्थ :-** माझ्यात हे सर्व जगत् साठविलेले आहे किंवा या जगात सर्वत्र मीच भरलेलो आहे या दोन्ही धारणांचा जर आवेश साधला तर साधकभक्त-योगिशिष्य त्रैलोक्याचे स्वामित्व झटकन मिळवितो. त्याप्रमाणेच संसारातील दुःखांनी पीडित अशा लोकांनी अर्थात् साधकभक्तयोगिशिष्यांनी हे शक्ती! तुझी अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीची पूजा व उपासना इत्यादि केल्यास त्यांनाही सर्व जगाचे स्वामित्व लाभते.

हाच अर्थ "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथातील वचनातही पुढील प्रमाणे विस्तारून दाखविला आहे.

**योगी स्वच्छन्दयोगेन स्वच्छन्दगतिचारिणा।**
**स स्वच्छन्दपदे युक्तः स्वच्छन्दसमतां व्रजेत्।।७.२५७।।**

**अर्थ** :- सिद्धयोगी स्वच्छंदाच्या योगाने स्वच्छंद गतीत फिरणारा अथवा संचार करणारा होऊन तो स्वच्छंदपदात युक्त होतो व स्वच्छंदसमता प्राप्त करतो.

ज्यात परतत्त्वाशी ऐक्याचा अनुभव येतो तो येथे "स्वच्छंद" या शब्दाने सांगितला आहे. परतत्त्वात वृत्ती ठेवणे अर्थात् परतत्त्वात स्व-आत्म्याची प्रतिष्ठा ठेवणे ही स्वच्छंदगती होय. हा "**स्वच्छंद**" या शब्दाने वाच्य असणारा महायोगच आहे. त्यामुळे जो श्रीस्वच्छंदभैरवाच्या पदामध्ये युक्त अथवा अभिनिविष्ट अर्थात् समाविष्ट होईल तोच साम्यत्वाला प्राप्त होईल अर्थात् तो श्रीशिवांशी समरसता प्राप्त करील.

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातही हेच ज्ञान किंवा हे तत्त्व "**तस्योपलब्धिः सततं त्रिपदाव्यभिचारिणी।।२.१७।।**" अर्थात् "सुप्रबुद्ध योग्याला त्या चिद्रूप स्वभावाची उपलब्धी जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ती या तीनही अवस्थांच्या आदि, मध्य आणि अंत यांमध्ये समान आणि अखंड रूपात त्याचप्रमाणे प्रत्येक समयी येत राहते, या शब्दात या कारिकेत संगृहीत केले आहे.

या तत्त्वाची उपलब्धी म्हणजेच ज्ञान हे सतत म्हणजेच सर्व अवस्थांमध्ये होत असते.

यासंबंधी "**श्रीज्ञानगर्भ**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**बहिष्करणबुद्ध्यहङ्कृतिमनःसुषुम्नाश्रयात्**
**चतुर्दशसु चण्डिके पथिषु येन येन व्रजेत्।**
**कला शिवनिकेतनं जननि तत्र सा तादृशी**
**दशोदयति दुर्लभा जगति या सुरैरप्यहो।।**

**अर्थ** :- बाह्यज्ञानेंद्रिये, बुद्धी, अहंकार, मन आणि सुषुम्ना यांच्या आश्रयाने चौदा मार्गांमधून जो जो अर्थात् साधकभक्तयोगिशिष्य जाईल, हे जननी! तेथे श्रीशिवांचे आश्रयस्थान असणारी अशी कला आहेच. ही अवस्था प्राप्त करणे हे या जगात देवांनाही दुर्लभ आहे.

श्रीशिवनिकेतन म्हणजे ज्ञेयरूप श्रीशिवांचे आश्रयस्थान होय. तीनही पदांमध्ये म्हणजेच जागरादि तीन अवस्थांमध्ये भोक्तृत्वरूपाने ही संवित् अर्थात् कुंडलिनी शक्ती विद्यमान असते. तुर्यावस्थेत तर तिच्या स्थितीबद्दल वादच नाही.

यासंबंधी शास्त्रामधून असे म्हटले आहे की -

**काप्यवस्था न ते सास्ति यस्यां संविन्न वर्तते।**
**तेन चिद्धनमेव त्वां योगिनः पर्युपासते।।**

**अर्थ :-** हे श्रीशिवप्रभो ! तुमची संवित्शक्ती अर्थात् तुमच्याशी समवाय-संबंधाने, अविनाभावाने, संघट्टपणे,यामलभावाने, अनवच्छेद्यपणे, एकरसरूपतेने आणि अभेद्यपणे समरस व समव्याप्त असलेली कुंडलिनी शक्ती नाही अशी एकही अवस्था नसते. त्यामुळेच चिद्धन अर्थात् चैतन्याने परिपूर्ण अशा तुमची साधकभक्तयोगिशिष्य पूर्णरूपाने उपासना करतात.।।११।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

या तीन अवस्थांमध्ये सत्त्वादि तीन गुणांचा संबंध अनुषंगानेच येतो हे "**त्रितयभोक्ता वीरेशः।।११।।**" या सूत्रात सांगितले आहे.।।४७-४७.५।।

सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण म्हणून ओळखले जातात.।।४८।।

हे तीन गुण जाग्रत, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्थांना अनुगुण म्हणून स्वस्वरूपापासून उदय पावतात व पशूंच्या स्वस्थितीचे आच्छादन करतात. विभू अर्थात् व्यापक असा परमेश्वर सर्वांमध्ये अनुस्यूत किंवा समाविष्ट असल्याने हे तीन गुण त्याच्या स्व-रूपाचे आच्छादन करू शकत नाहीत. ।।४९-४९.५।।

अशा रीतीने श्रीशिव हे गुणांच्या स्पंदनांचे व प्रस्रवणांचे चिद्रूप भोक्ते आहेत. हे भोक्ते विभू किंवा व्यापक असल्यामुळे शक्तिप्रसराला स्वीकारतात. स्वप्रकाश हेच त्यांचे शील अथवा स्वभाव किंवा वृत्ती असल्याने त्यांना "वीरेश" असे म्हणतात.।।५०-५१।।

**विवरण :-** गुणसाम्यावस्था म्हणजे प्रकृती होय. या तत्त्वातील सत्त्वादि तीन गुणांपैकी प्राधान्याने जागृदादि तीन अवस्था क्रमशः प्रकाश, प्रवृत्ती व मोहमय आहेत. त्यांच्या वैभवाचा चमत्कार हे श्रीशिव करतात, म्हणून त्यांना "वीरेश" असे म्हणतात. साधकभक्तयोगिशिष्यही सिद्धयोगसाधनाने असा "वीरेश" म्हणजे सिद्धयोगी होतो.

अशा प्रकारे तीन गुणांपासून हा जो किरणांचा समुदाय उत्पन्न झालेला आहे तो या वैकल्पिक म्हणजेच विकल्पांनी युक्त अशा जगात किंवा काल्पनिक जगात वमन अर्थात् उत्पत्ती आणि ग्रास अर्थात् लय करण्यात तत्पर असतो.।।५२।।

त्यातही तो जगाचा ग्रास म्हणजेच लय करीत असल्याने त्याला "वीरेश्वर" असे म्हणतात.।।५२.५।।११।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**त्रितयभोक्ता वीरेशः ।।११।।**" अर्थात् जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ती या अवस्थांचा स्वातंत्र्याने चमत्कार करणारा सिद्धयोगी म्हणजेच वीरेश होय.।।११।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**त्रितयभोक्ता वीरेशः ।।११।।**" या सूत्राचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे. जनसामान्य व योगी यांना अनुलक्षून सांगितलेल्या या जागृत्यादि तीन अवस्थांमध्ये मोठ्या सावधगिरीने वागणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याला विश्वाच्या संहाराला कारण अशा शक्तिचक्रांच्या अनुसंधानामुळे तुर्यावस्थेच्या अनुभवाने पूर्ण भरलेली अभेदख्याती किंवा अभेदज्ञान स्फुरू लागते. हे अभेदज्ञान अख्यातीचे म्हणजेच अज्ञानाचे हरण करणारे आहे. या तुर्यावस्थेत सिद्धयोग्याला पूर्वी वर्णन केलेल्या चैतन्याचे ज्ञान होते.।।५४-५५-५६।।

वर सांगितलेल्या शक्तिचक्राच्या अनुसंधानामुळे जाग्रदादि तीन अवस्थां-मधला भेद नाहीसा होतो आणि तुर्यानंदाच्या वृष्टीमुळे आनंदरसमग्र अशा परमाकाशाची भावना करीत करीत साधकभक्तयागिशिष्य सिद्धयोगी होऊन या जाग्रदादि अवस्थांचा चमत्कारिक रीतीने भोक्ता होतो अर्थात् तो भोग भोगूनही निर्लेपच राहतो.।।५७-५८।।

जो त्रैकालिक म्हणजेच भूत, भविष्य आणि वर्तमानकाळी भोग्य विषय आणि भोगणारा यांना योग्य रीतीने जाणतो तो सिद्धयोगी सर्व विषयांचा उपभोग घेऊनही त्यात लिप्त होत नाही.।।५९।।

या उक्तीप्रमाणे तो सिद्धयोगी निष्कंटक ज्ञानसाम्राज्याच्या वैभवाचे भोग भोगतो, चिद्रूपात गढून जातो किंवा स्वात्मज्ञानरूप परमानंदात गढून जातो.।।६०।।

तो सिद्धयोगी भेदाचा ग्रास करणाऱ्या वीरांचा किंवा धैर्यवानांचा नायक अथवा स्वामी होतो. त्याचप्रमाणे आत-बाहेर पसरणाऱ्या अथवा संचार करणाऱ्या इंद्रियांचा स्वामी होतो. त्याला या सर्व सामर्थ्यामुळे वीरेश ही पदवी मिळते.।।६१।।११।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

वरील ८, ९ व १० या तीन सूत्रांमधून जाग्रदादि अवस्थांचे लोकांनुसार स्पष्टीकरण केले. आता "**त्रितयभोक्ता वीरेशः ।।११।।**" या सूत्रात ज्या सिद्धयोग्याचा शक्तिचक्रांच्या अनुसंधानामुळे तीन अवस्थांमध्ये विश्वाचा संहार झाला त्याला व्युत्थानदशेतही अर्थात् समाधी संपल्यानंतरही जाग्रदादि

अवस्था या प्रतिबंधक होत नाहीत, असे ग्रंथकार सांगत आहेत. सत्त्वादि गुणप्रकर्षाने उत्पन्न होणाऱ्या जाग्रदादि अवस्थांचा जो भोक्ता असतो त्याला "वीरेश" असे म्हणतात. याचा भावार्थ असा आहे की, शक्तिचक्रांच्या अनुसंधानाने तुर्यावस्थेत अनुभविलेल्या अखंड आनंदामुळे या तीन अवस्था तो सिद्धयोगी तशा प्रकारचे अनुसंधान करून समस्त भेदांनी रहित आणि आनंदाच्या रसप्रवाहाने युक्त अशाच पाहतो. त्यामुळेच तो जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन अवस्थांचा भोक्ता अर्थात् चमत्कर्ता बनतो.

यासंबंधी "**कैवल्योपनिषद्**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**त्रिषु धामसु यद्भोग्यं भोक्ता यश्च प्रकीर्तितः।**
**वेदैतदुभयं यस्तु स भुञ्जानो न लिप्यते।।१८।।**

**अर्थ :-** तीनही धामांमध्ये म्हणजेच सत्त्व, रज व तम या तीन अवस्थांमध्ये जे भोक्ता आणि भोग्य म्हणून सांगितले आहेत त्यांना जो सिद्धयोगी जाणून घेतो तो त्याचा उपभोग घेत असूनही त्याला त्याचा लेप लागत नाही.

याचा भावार्थ असा आहे की, तीन धामांमध्ये म्हणजेच जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ती या दशांमध्ये जो ग्राह्य आणि ग्राहक या दोघांचे ज्ञान करून घेतो तो सिद्धयोगी भोगांमध्ये रत असूनही पाण्यामध्ये असलेल्या कमळाच्या पानाप्रमाणे कर्मांनी लिप्त होत नाही अर्थात् ज्याप्रमाणे पाण्यात असूनही कमळाची पाने ओली होत नाहीत त्याप्रमाणे भोगांमध्ये मग्न असूनही तो सिद्धयोगी त्या भोगांनी लिप्त होत नाही.

वीरेश म्हणजे इंद्रियांचा श्रीईश्वर किंवा स्वामी होय. वीर शब्दाने इंद्रियांचे ग्रहण होते. ती इंद्रिये अत्यंत बलवान् अथवा सामर्थ्यवान् असल्याने इंद्रियांना "वीर" म्हणणे हे प्रकृताचार्यांचे कथन योग्यच आहे.

त्यामुळेच इतर ठिकाणी असे म्हटले आहे की, **"बलवान् इन्द्रियग्रामः।।"** अर्थात् "इंद्रियांचा समूह सामर्थ्यवान् असतो." जर एखादा जाग्रदादि अवस्थांचा उपभोग घेत असणारा सिद्धयोगी सामान्य मनुष्याप्रमाणे झाला तर तो वीरेश्वर म्हणजेच इंद्रियांचा स्वामी होण्याला योग्य ठरणार नाही व तो सिद्धयोगी मूर्खच ठरेल.

यासंबंधीच शास्त्रात असे म्हटले आहे की -

**विना स्वभावानुभवेन पुंसः कैवल्यमुत्क्रान्तिबलाद्यदि स्यात्।**
**अत्रापि पक्षे ननु मोक्षभाक्स उद्बन्धनं यत्कुरुते प्रमूढः।।**

त्याचप्रमाणे -

**विदेहा अपि बध्यन्ते प्रलये गुणवासिताः।**
**शरीरिणोऽपि मुच्यन्ते विशुद्धज्ञानसंश्रयात्।।**

**अर्थ :-** एखाद्या सिद्धयोग्याला स्वभावाचा अनुभव आल्याशिवायच अर्थात् जागरादि अवस्थांच्या योग्य ज्ञानाशिवायच उत्क्रांतिबलाने जरी कैवल्य अर्थात् मोक्ष प्राप्त झाला तरीही जो उद्बंधन अर्थात् शक्तिचक्रसंधानाचा त्याग करतो तो मोक्षाचा उपभोग घेणारा असूनही प्रमूढच म्हणविला जातो.

**अर्थ :-** महाप्रलयाच्या वेळेला गुणांनी युक्त असणारे विदेही सिद्धयोगीही बंधनात पडतात आणि विशुद्ध ज्ञानाचा आश्रय घेतल्यामुळे शरीर धारण करणारे सिद्धयोगीही मुक्त होतात.

त्याचप्रमाणे "**श्रीज्ञानगर्भ**" या ग्रंथातही असे म्हटले आहे की -

**मयि स्थितमिदं जगत् सकलमेव सर्वत्र वा**
**स्थितोऽहमिति धारणाद्वितयभावनावेशतः।**
**जगत्त्रितयनाथतानतिचिरेण सम्प्राप्यते**
**नृभिस्तव सपर्यया दलितकिल्विषोपप्लवैः।।**

**अर्थ :-** हे श्रीशिवप्रभो ! माझ्यामध्येच हे सकल जगत् स्थित आहे आणि सर्वत्र मीच स्थित आहे या दोन धारणांच्या भावनांमुळे ज्याचे सर्व विकल्प व मोह नष्ट झाले आहेत असा सिद्धयोगी तुझी पूजा करून या तीनही जगताचे आधिपत्य तत्काल प्राप्त करतो.

त्यामुळेच गुणांची साम्यावस्था असलेल्या आणि प्रकृतितत्त्वापासून उत्पन्न होणाऱ्या सत्त्व, रज व तम या गुणांपैकी एक एक गुणांच्या प्राधान्यामुळे तीन प्रकारच्या होणाऱ्या जाग्रदादि अवस्थांचे प्रकाश-प्रवृत्ति-मोहरूप असे आपले वैभव प्रकट करण्याच्या चमत्कारामुळे सिद्धयोग्याला वीरेश म्हणजेच किरणसमूहांचा घास घेणारा असे म्हटले जाते.

**विवरण :-** या सूत्रात तीनही अवस्थांचा उपभोग घेणारा जो सिद्धयोगी असतो तो इंद्रियांचा स्वामी बनतो असे सांगितले आहे. ज्यावेळेला इंद्रिये सामान्यपणे बहिर्मुखाने आयुष्यात कामे करीत असतात त्यावेळेला ती फक्त वृत्ती म्हणजेच बाह्य विषय ग्रहण करणारी असतात; परंतु ज्यावेळेला साधक-भक्तयोगिशिष्याला चौथ्या अवस्थेचा म्हणजेच तुर्यावस्थेचा अनुभव येतो त्यावेळेला त्याची इंद्रिये शक्ती बनतात. सर्व भेदज्ञान हे जिच्यामुळे नष्ट होते ती शक्ती होय. आता ती केवळ इंद्रिये नसतात तर "वीर" असतात. सिद्धयोगी आता त्यांचा श्रीईश्वर किंवा अधिपती बनतो. तो त्या इंद्रियांचा

उपयोग जीवनातील उच्च ध्येये प्राप्त करण्यासाठी करतो. सामान्य विषय-ग्रहणासाठी तो सिद्धयोगी त्या इंद्रियांचा कधीही वापर करीत नाही. अशा प्रकारे तुर्यावस्थेशी समरस झालेला सिद्धयोगी जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ती या तीनही अवस्थांमध्ये श्रीशिवात्मक अहंज्ञानाचा अनुभव घेत राहतो आणि आपल्या इंद्रियांवर विजय मिळवितो.

परंतु ज्या साधकभक्तयोगिशिष्याला या तुर्यावस्थेची जाणीव झालेली असत नाही अर्थात् ज्याला श्रीशिवशक्त्यात्मक सामरस्याचे ज्ञान झालेले असत नाही त्याला जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ती यांचे ज्ञान झालेले असूनही त्याला त्याच्या इंद्रियांवर पूर्णपणे ताबा मिळविता येत नाही. त्यामुळे त्याचे थोडेसे अधःपतन होऊन त्याला मोक्ष प्राप्त होत नाही.।।११।।

## सूत्र क्रमांक १२

**संबंध :-** तुर्यातीत सिद्धयोग्याची परचित्-तत्त्वामध्ये स्थिती सूचित करणाऱ्या अवस्था अर्थात् वर वर्णन केलेल्या महायोग्याच्या आध्यात्मिक प्रगती दाखविणाऱ्या म्हणजे परतत्त्वाशी होत जाणाऱ्या ऐक्याच्या निदर्शक भूमिका श्रीशिवांनी या सूत्रात सांगितल्या आहेत.

**विस्मयो योगभूमिकाः।।१२।।**

**शब्दार्थ :- विस्मय :-** सानंद किंवा अनवच्छिन्न आनंदमय किंवा अशा सिद्ध-योग्याची परविश्रांती सूचित करणाऱ्या भूमिका किंवा अवस्था अगर आश्चर्य. **योगभूमिका-** सिद्धयोग्याच्या प्रगतिदर्शक किंवा परतत्त्वाशी ऐक्य दाखविणाऱ्या भूमिका किंवा अखंड आनंदयुक्त असूनही तृप्ती न होणाऱ्या अशा अवर्णनीय आश्चर्यजनक मुद्रा असतात.

**अर्थ :-** तुर्यातीत किंवा वीरेश किंवा परतत्त्वाशी ऐक्य साधलेल्या सिद्धयोग्याच्या परविश्रांतीचे म्हणजेच अत्यंत श्रेष्ठ अशा सामरस्यात्मक विश्रांतीचे सूचन करणाऱ्या या अवस्था किंवा भूमिका अखंड आनंदयुक्त असूनही तृप्ती न होणाऱ्या अशा असतात अर्थात् अवर्णनीय व आश्चर्यजनक असतात.।।१२।।

**विशेष व्याख्या :-** ज्याप्रमाणे एखाद्याला अतिशय आनंद देणारी वस्तू प्राप्त झाली असता आश्चर्यपूर्ण हर्ष होतो त्याचप्रमाणे परानंदाच्या अनुभूतीत मग्न असणाऱ्या या तुर्यातीत अवस्थेमध्ये स्थित असणाऱ्या सिद्धयोग्याला परविश्रांती सूचित करणाऱ्या अवर्णनीय अशा आश्चर्यजनक मुद्रा होतात. त्याच्या बोधसुधारूप अर्थात् ज्ञानामृतरूप समुद्राला कोणतीही मर्यादा राहत

नाही. स्वात्मानंदामध्ये अतृप्त असल्यामुळे त्याच्याबाबतीत ही आश्चर्ये प्रकट होतात. त्याची स्थिती खालील वचनात सांगितल्याप्रमाणे होते.

**सुखे दु:खे विमोहे च स्थितोऽहं परमः शिवः।।**

**अर्थ :-** सांसारिक सुख म्हणजे सत्त्व, दु:ख म्हणजे रज आणि मोह म्हणजे तम यांच्या अवस्थांमध्येही मी श्रीपरमशिवस्वरूपच आहे, अशी सिद्धयोग्याची अखंड व निरंतर स्थिती असते.।।१२।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

या महायोग्याला ज्या भूमिकांमुळे छत्तीस तत्वांपेक्षा श्रेष्ठ असणारे स्थान दिसेल अशा प्रकारच्या तत्त्वावरोहणाला मदत किंवा सोपानासारख्या साहाय्य करणाऱ्या काही भूमिका किंवा स्थाने आहेत का? या प्रश्नाला "होय" असे उत्तर देऊन ग्रंथकारांनी "**विस्मयो योगभूमिकाः।।१२।।**" हे सूत्र सांगितले आहे.

ज्याप्रमाणे एखादे अभिनव दृश्य दिसले की, मनुष्याला आश्चर्य वाटते त्याप्रमाणे या महायोग्याचा नित्य त्या त्या वेद्य वस्तूंच्या म्हणजेच ज्ञेय वस्तूंच्या विचार, आभास आणि आभोग यांच्यामध्ये असामान्य व अत्यंत नवीन चमत्काराप्रमाणे चिद्धन आत्मावेश झालेला असतो. त्याला क्षणात स्तब्ध व क्षणात विकसित होणाऱ्या इंद्रियसमुदायाला पाहून आश्चर्य वाटते; कारण त्याची ही इंद्रिये आनंदरूप आत्मरूपाविषयी अतृप्त असतात. या इंद्रियांच्या अतृप्तीच परतत्त्वैक्यासंबंधी भूमिका किंवा पायऱ्या असतात. तत्त्वारोहण करीत असताना विश्रांतीची सूचना देणाऱ्या मोजक्या भूमिका किंवा पायऱ्या आहेत. योगशास्त्रांतर्गत मूलाधारआज्ञाचक्रादिकांना अर्थात् मूलाधारातील कंद व भ्रूमध्यस्थानातील बिंदू यांना भूमिका म्हटलेले नाही.

यासंबंधी "**श्रीकुलयुक्ती**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**आत्मा चैवात्मना ज्ञातो यदा भवति साधकैः।**
**तदा विस्मयमात्मा वै आत्मन्येव प्रपश्यति।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्यांकडून आत्म्याने आत्मा जाणला जातो त्यावेळेला आत्माच आत्म्याविषयी आश्चर्यचकित होतो.

याच अर्थाने "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील कारिकेतही असे म्हटले आहे की -

**तमधिष्ठातृभावेन स्वभावमवलोकयन्।**
**स्मयमान इवास्ते यस्तस्येयं कुसृतिः कुतः।।१.११।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला सिद्धयोगी स्वचैतन्याला सर्वाधिष्ठाता या भावनेने पाहतो त्यावेळेला तो आश्चर्यचकित होतो. अशा सिद्धयोग्याला दुःखद संसाराचा स्पर्श कसा होईल?।।११।।

याचा अर्थ असा आहे की, जो साधकभक्तयोगिशिष्य वर वर्णिलेल्या त्या स्वभावाचा किंवा स्पंदात्मक आत्मस्वरूपाचा सर्व विश्वातील स्थावर व जंगम वस्तूंमध्ये अर्थात् कणाकणामध्ये अनुस्यूत किंवा समाविष्ट असलेल्या मुख्य सत्तेच्या रूपात साक्षात्कार करून घेत विस्मयावस्थेत अर्थात् आश्चर्य करीत राहत असतो तो सिद्धयोगी झाल्यावर या तिरस्काराने पूर्ण आणि कुत्सित अर्थात् दूषित आवागमनामध्ये अर्थात् जन्म-मृत्यूच्या येरझाऱ्यामध्ये पडणे कसे शक्य आहे?।।१२।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे जरी स्वस्वभावाचे व्युत्थान म्हणजे सृष्ट्यादि कर्म झाले तरी या वीरेशाची म्हणजे सिद्धयोग्याची स्वस्थिती यत्किंचितही ढळत नाही. याविषयी श्रीशिवांनी **"विस्मयो योगभूमिकाः।।१२।।"** हे सूत्र सांगितले आहे.।।५३-५३.५।।

अशा प्रकारे सर्व सृष्टी इत्यादींचे कारण असणारा चैतन्यशरीरी प्रभू चैतन्याच्या आधारावर असणारे हे जगत् सर्व बाजूंनी अवलोकन करून आश्चर्यचकित झाल्याप्रमाणे प्रतिभायुक्त स्वज्ञानात स्थिर राहतो. त्याचे हे विस्मय पावणे किंवा आश्चर्यचकित होणे म्हणजे योगातील समाधी आदि अवस्थाच होत. या अवस्था "हा सिद्धयोगी परतत्त्वाच्या भूमिकेवर आरूढ झाला आहे," असे प्रतिपादन करतात; कारण तो चिद्घनस्वात्मावेशाने अर्थात् चैतन्याने परिपूर्ण अशा स्वात्म्याचा त्याच्यात प्रवेश झाल्याने नित्योदित व विकसित अशा आत्मविभूतीत अर्थात् वैभवात निमग्न असतो.।।५४-५५-५६।।१२।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"विस्मयो योगभूमिकाः।।१२।।"** या सूत्राचा भावार्थ असा आहे की, विस्मय म्हणजे सर्वश्रेष्ठ परतत्त्वाशी ऐक्य संपादून विश्रांती प्रदान करणाऱ्या विविध अवस्था याच योगभूमिका होत. या आश्चर्यकारक आहेत.।।१२।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा योग्याला म्हणजेच तुर्यातीत अवस्थेत असणाऱ्या सिद्धयोग्याला दुसऱ्याच्या चित्तातील गोष्टी ओळखणे व आत्मतत्त्वारूढ होऊन विश्रांती घेणे इत्यादि भूमिका असतात; कारण की, ज्यामुळे त्याला सर्वोत्कृष्ट

स्थितीचा लाभ होतो? अशी शंका निर्माण झाली असता श्रीसद्गुरुरूप श्रीशिव शिष्याच्या या शंकेचे उत्तर देण्यासाठी अशा भूमिका असतात असे "**विस्मयो योगभूमिकाः।।१२।।**" या सूत्रात सांगतात.।।६२-६२.५।।

ज्याप्रमाणे एखाद्याला अत्यानंद झाल्यास आश्चर्य वाटते त्याप्रमाणे या तुर्यातीत अवस्थेत स्थित असणाऱ्या सिद्धयोग्याला ते ते पदार्थ अवलोकन करून असाधारण परमानंद होतो. या अनुभवामुळे त्याची सर्व इंद्रिये निःस्तब्ध किंवा हालचालीने विरहित होतात. अशा वेळेला श्रेष्ठ अशा स्वात्म्याच्या ठिकाणी अतृप्तीमुळे निर्माण झालेले जे आश्चर्य असते तोच विस्मय म्हणजे निरभिमानावस्था होय.।।६३-६४-६४.५।।

हा विस्मय म्हणजेच परतत्त्वांशी ऐक्य साधून देणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याच्या भूमिका असून त्याच्यामध्ये क्रमाने आरोहण करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याला त्या परतत्त्वामध्ये विश्रांती देणाऱ्या आहेत अर्थात् त्याचे सूचन करणाऱ्या आहेत.।।६५-६५.५।।१२।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

जो महायोगनिष्ठ पुरुष आहे त्याच्या दृष्टीने तत्त्वामध्ये अधिरोहण करण्याच्या जवळ असणाऱ्या अर्थात् परतत्त्व किंवा परमात्म्यामध्ये स्थिर होण्याला मदत करणाऱ्या काही भूमिका अथवा अवस्था असतात का? आणि त्या अवस्थांनी छत्तीस तत्वांच्याही पलीकडे असलेले स्थान साधकभक्तयोगिशिष्याला पाहता येते का? या शंकेला उत्तर देताना श्रीशिव अशा अवस्था आहेत असे सांगून "**विस्मयो योगभूमिकाः।।१२।।**" हे सूत्र सांगतात.

ज्याप्रमाणे एखाद्या विशिष्ट व्यक्तीला नवीन वस्तू पाहिल्याने आश्चर्य होते त्याप्रमाणे अशा प्रकारच्या म्हणजेच तुर्यातीत अवस्थेत स्थिर असणाऱ्या महायोग्याला सामान्य रूपाने अहंतत्त्वात विश्रांती घेत असताना अतिशय नवनवीन व चमत्कारपरिपूर्ण अशा चिद्घन आत्म्याने स्वरूपात प्रवेश केल्याने करणचक्राद्वारे मोठे आश्चर्य वाटते.

यासंबंधी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**योगी स्वच्छन्दयोगेन स्वच्छन्दगतिचारिणा।**
**न स्वच्छन्दपदे युक्तः स्वच्छन्दसमतां व्रजेत्।।७.२५७।।**

**अर्थ :-** साधकभक्तयोगिशिष्य स्वच्छंदयोगाच्या साहाय्याने स्वच्छंदगतीत विचरण करणारा होऊन स्वच्छंदपदात युक्त होऊन स्वच्छंदपदाला प्राप्त होतो.

त्याप्रमाणे "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**जलस्येवोर्मयो वह्नेर्ज्वालाभङ्ग्यो प्रभा रवेः।**
**ममैव भैरवस्यैता विश्वभङ्ग्यो विनिर्गताः।।१०८।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे पाण्याच्या लाटा असतात, अग्नीच्या ज्वाळा असतात आणि सूर्याची प्रभा असते त्याचप्रमाणे माझ्या श्रीभैरवस्वरूपापासूनच हे सर्व विश्व बाहेर पडलेले आहे अर्थात् हे विश्व माझ्यापासूनच उत्पन्न झालेले आहे.

अशा प्रकारे अखंड आनंदरूप स्वात्म्यामध्ये अतृप्तीमुळे पुनःपुन्हा आश्चर्य होत राहते. या भूमिका परतत्त्वाशी ऐक्य साधणाऱ्या आहेत. यांच्यात क्रमाने प्रवेश करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याला या परविश्रांतीची सूचना देणाऱ्या असतात. या परिच्छिन्न भूमी आहेत. मूलाधार व भ्रूमध्य स्थानादींमध्ये येणारे अनुभव या काही अनुभववृत्ती नव्हेत.

या संबंधी "**श्रीकुलयुक्ती**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**आत्मा चैवात्मनो ज्ञातो यदा भवति साधकैः।**
**तदा विस्मयमात्मा वै आत्मन्येव प्रपश्यति।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्यांकडून आत्म्याने आत्मा जाणला जातो त्यावेळेला आत्माच आत्म्याला अत्यंत आश्चर्यचकित होऊन पाहतो.

त्याचप्रमाणे श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात यासंबंधी असे म्हटले आहे की -

**तमधिष्ठातृभावेन स्वभावमवलोकयन्।**
**स्मयमान इवास्ते यस्तस्येयं कुसृतिः कुतः।।१.११।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य स्व-चैतन्याला सर्वांचे अधिष्ठान म्हणजेच आधार म्हणून पाहतो त्यावेळेला तो आश्चर्यचकित होतो. अशा साधकभक्तयोगिशिष्याला या दुःखद संसाराचा स्पर्श तरी कसा होईल?

**विवरण :-** "विस्मय" याचा अर्थ शब्दकोशात "आश्चर्य" असा आहे; परंतु आश्चर्य आणि विस्मय यांच्यामध्ये मुख्य भेद आहे. जर तो भेद समजला नाही तर वेगवेगळ्या यात्रा सुरू होतात. जर आश्चर्य ही विज्ञानाची भूमिका आहे तर विस्मय ही सिद्धयोग्याची भूमिका आहे. जर आश्चर्य ही बहिर्मुख वृत्ती आहे तर विस्मय ही अंतर्मुख वृत्ती आहे. जर आश्चर्य हे दुसऱ्या वस्तूच्या संबंधाने होत असते तर विस्मय हा स्वतःसंबंधाने होत असतो.

जे आपण समजू शकत नाही, जे आपल्याला अवाक् करून सोडते, ज्याच्यावर आपल्या बुद्धीची पकड बसत नाही, जे आपल्यापेक्षा मोठे आहे असे सिद्ध होते, ज्याच्या समोर आपण अनायासच किंकर्तव्यमूढ होऊन

जातो आणि जे आपल्याला मिटवून टाकते अशा तत्त्वापासून विस्मय उत्पन्न होतो.

अशा प्रकारच्या विस्मयाचा तुर्यातीत अवस्थेत राहणाऱ्या सिद्धयोग्याला वारंवार अनुभव येत असतो आणि अशा या विस्मयभूमिका तो परतत्त्वात विश्रांती घेणारा आहे याचे सूचन करणाऱ्या असतात.

परंतु विस्मयाचा अर्थ अहंकार असाही होतो. वीरेश अर्थात् असा साधकभक्तयोगिशिष्य की, जो जागृत, स्वप्न आणि सुषुप्ती या तीनही अवस्थांमध्ये अलिप्त राहत योगभूमिकांमध्ये पदार्पण करतो. त्याला आश्चर्यजनक दिव्य अनुभव आल्याकारणाने अहंकार आणि विस्मय हे दोन्हीही होऊ शकतात. अशा वेळी त्या साधकभक्तयोगिशिष्याने या दोन्हीही गोष्टींपासून सावध राहिले पाहिजे.।।१२।।

**सूत्र क्रमांक १३**

**संबंध :-** अशा म्हणजेच ज्याने परतत्त्वाचा साक्षात्कार करून घेतलेला आहे व "विस्मयात्मा" ही योगभूमिका प्राप्त करून घेतलेली आहे त्या सिद्ध-योग्याच्या इच्छा कोणतीही शक्ती रोखू शकत नाही.

**इच्छाशक्तिरुमाकुमारी।।१३।।**

**शब्दार्थ :- इच्छाशक्ति** - इच्छा हीच शक्ती. **उमा** - उ = श्रीशिव व मा = लक्ष्मी किंवा तेज अर्थात् श्रीशिवांचे तेज किंवा परारूप पारमेश्वरी स्वातंत्र्यशक्ती कुंडलिनी **कुमारी** - उपभोग्य न झालेली उपभोक्त्री, उपभोग घेणारी किंवा विश्वाच्या उत्पत्ती, स्थिती व संहाराच्या क्रीडेमध्ये तत्पर असलेली कुंडलिनी शक्ती.

**अर्थ :-** अशा सिद्धयोग्याची इच्छाशक्ती म्हणजेच परारूप पारमेश्वरी स्वातंत्र्यशक्ती कुंडलिनी असून तीच विश्वाची सृष्टी म्हणजे उभारणी आणि संहाररूपी म्हणजे संहारणीरूप क्रीडा करण्यात तत्पर असते अर्थात् श्रीशिवांच्या संपूर्ण आत्मसंवित्‌चा अनुभव घेणाऱ्या श्रीशिवमय झालेल्या सिद्धयोग्याची इच्छाशक्ती "उमा" ही श्रीशिवांचे तेजोवैभव असून ती उपभोक्त्री "कुमारी" आहे.।।१३।।

**विशेष व्याख्या :-** तुर्यातीत सिद्धयोग्याची इच्छाशक्ती शक्तिपातदीक्षेमुळे मिळणाऱ्या युक्तीने श्रीपरभैरवरूपच असते. विश्वाच्या सर्जन आणि संहारा-मध्ये क्रीडनशीला म्हणजेच जिचा क्रीडा करण्याचा स्वभाव आहे अशा कुंडलिनी शक्तीच्या योगाने तो सिद्धयोगी दृश्य जगतामध्ये अप्रतिहत अर्थात्

कोणतेही अडथळे नसलेल्या स्वातंत्र्याने युक्त होतो. त्याला श्रीसदाशिवांपासून पृथ्वीपर्यंतची सर्व दृश्यवर्गे ही आपली अंगेच आहेत असे वाटू लागते. त्याला आवरणरहित चिद्धन तत्त्वाचे स्फुरण होते अर्थात् चैतन्यतत्त्वाचा साक्षात्कार होतो.

**या अस्य इच्छा सा अस्य शक्तिः सा च कुमारी।।**

**अर्थ :-** जी याची म्हणजे सिद्धयोग्याची इच्छा आहे तीच त्याची पारमेश्वरी कुंडलिनी शक्ती आहे आणि तीच जगाच्या सृष्टी, स्थिती आणि संहाररूप क्रीडेत मग्न असते.।।१३।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

**"इच्छाशक्तिरुमाकुमारी।।१३।।"** अर्थात् "श्रीपरभैरवता प्राप्त केलेल्या सिद्धयोग्याची जी इच्छा असते तिलाच शक्ती किंवा उमा असे म्हणतात." हीच अत्यंत श्रेष्ठ व पारमेश्वरी अर्थात् परमेश्वराशी संबंधित आणि स्वातंत्र्यरूप शक्ती आहे. ही कुमारी म्हणजेच शक्ती विश्वाच्या सृष्टी व संहाररूप क्रीडा करण्यात तत्पर असते. येथे कुमारी या शब्दाचा अर्थ क्रीडाशील असा घेतला आहे; कारण "कुमार" या धातूचा अर्थ "क्रीडा करणे" असा धातुपाठात दिलेला आहे.

त्याचप्रमाणे **"कु"** म्हणजे भेदाला उत्पन्न करणाऱ्या मायाभूमीला मारते अर्थात् त्या मायेचा पसारा वाढू देत नाही. हा तिचा स्वभावच आहे. कुमारी ही दुसऱ्याला उपभोगासाठी मिळणारी नाही. तिचा भोक्ता फक्त आत्माच आहे. ती आपल्याला हा पती किंवा आत्मा कधी प्राप्त होईल? या इच्छेने उत्सुक होऊन स्फुरणारी आहे.

ज्याप्रमाणे हिमालय पर्वताची कन्या उमाकुमारी सर्व आसक्तींचा त्याग करून श्रीमहेश्वरांशी एकात्मता साधण्यासाठी व आराधना करण्यासाठी सदैव तत्पर असते त्याचप्रमाणे हिची इच्छा सदैव तत्पर असते. अशा प्रकारे आमच्या श्रीसद्गुरुदेवांना असाच पाठ दिसला आणि त्यांनी त्याचे व्याख्यानही त्याचप्रमाणे केले.

इतर व्याख्याकारांनी **"इच्छाशक्तितमाः कुमारी।"** असा पाठ घेऊन ज्ञानशक्ती आणि क्रियाशक्ती यांच्यापेक्षा इच्छाशक्तीचे श्रेष्ठत्व प्रतिपादिले आहे.

अशा प्रकारे सिद्धयोग्याची इच्छा ही सर्वसामान्य लोकांप्रमाणे स्थूल इच्छा असत नाही; कारण परतत्त्वाचा साक्षात्कार केलेल्या सिद्धयोग्याची इच्छा पराशक्तिरूप असून ती सर्वत्र अप्रतिहत अर्थात् अडथळ्यांनी विरहित किंवा

निर्बाध असते.

यासंबंधी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सा देवी सर्वदेवीनां नामरूपैश्च तिष्ठति।**
**योगमायाप्रतिच्छन्ना कुमारी लोकभाविनी।।१०.७२३-२४।।**

**अर्थ** :- ही देवी अर्थात् इच्छाशक्ती योगमायेने इतर रूपे झाकणारी, कुमारी व लोकांना अभिष्ट फल देणारी अशी असून सर्व देवींच्या नाम आणि रूपांनी तीच स्थित असते.

**स्पष्टीकरण** :- योगामुळे म्हणजेच परतत्त्वाच्या ऐक्यामुळे उत्पन्न झालेली व स्वरूप लपविणारी अशी जी माया म्हणजे कुंडलिनी शक्ती आहे त्या मायेने इतर सर्वांचे स्वरूप झाकले जाते. हीच सर्व देवींच्या म्हणजेच संबंधित नाम-रूपांच्या प्रपंचाने स्थित असते; कारण ही ब्रह्मांडात आविर्भूत किंवा व्यक्त झालेली असून ही भगवच्छक्ती इतरांना अनुपभोग्य म्हणजेच उपभोगावयास न मिळणारी आहे. यामुळेच तिला "कुमारी" असे म्हणतात किंवा तिच्या ठिकाणी "कुमारीत्व" आहे. अशा प्रकारची ही कुंडलिनी शक्ती लोकांना अभीष्ट फलाने संपन्न करते किंवा लोकांना अभिष्ट फले प्राप्त करवून. देते.

"**श्रीमृत्युंजयभट्टारक**" या ग्रंथातही असे म्हटले आहे की -

**सा ममेच्छा परा शक्तिरवियुक्ता स्वभावजा।**
**वह्नेरूष्मेव विज्ञेया रश्मिरूपा रवेरिव।**
**सर्वस्य जगतो वापि सा शक्तिः कारणात्मिका।।१.२५-२६।।**

**अर्थ** :- ही माझी अर्थात् माझ्याहून अभिन्न असणारी व माझ्या स्व-भावापासून उत्पन्न होणारी श्रेष्ठ अशी कुंडलिनी नावाची इच्छाशक्ती आहे. ही इच्छाशक्ती अग्नीच्या उष्णतेप्रमाणे व सूर्याच्या किरणांप्रमाणे माझ्यापासून अभिन्न आहे. ही कुंडलिनी शक्ती सर्व जगाला कारणीभूत होणारी आहे किंवा सर्व जगाचे कारण आहे.

**स्पष्टीकरण** :- असे जे आधी सांगितलेले वीर्य किंवा सामर्थ्य आहे ते म्हणजेच माझ्याशी संबंधित असणारी ही पराशक्ती कुंडलिनी आहे. हीच इच्छारूपत्वाला प्राप्त होते. ही स्वभावजा अर्थात् सहज किंवा "स्व"भावापासून उत्पन्न होणारी आहे. ही शक्तियुक्त म्हणजेच सर्व विश्वशक्तींचे अभेदज्ञान आपल्यात सामावलेली आहे. शक्तियुक्त म्हणजेच जी सर्वांना व्यक्त करते ती होय. ही सर्वांची निर्माती आहे. "स्वा" म्हणजेच आत्म्याची चिदानंदस्वरूपाशी संबंधित असणारी अशी शक्ती आहे. ही कुंडलिनी शक्ती व्यतिरिक्त म्हणजेच

निराळी नाही, असा श्रीक्षेमराजाचार्यांनी "**शक्तियुक्ता, स्वा शक्तिः।।**" असा दुसरा पाठ घेऊन त्याचे स्पष्टीकरण केले आहे.

हाच आशय "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील कारिकेत पुढीलप्रमाणे प्रतिपादित केला आहे.

**न हीच्छानोदनस्यायं प्रेरकत्वेन वर्तते।**
**अपि त्वात्मबलस्पर्शात्पुरुषस्तत्समो भवेत्।।१.८।।**

**अर्थ :-** हा आत्मा अर्थात् पुरुष त्या म्हणजे मायाशक्तीचा किंवा इच्छाशक्तीचा अर्थात् कुंडलिनी शक्तीचा प्रेरक होत नाही तर आत्मबलस्पर्शाने तो पुरुषच तिच्यासारखा होतो.।।८।।

याचाच अर्थ असा आहे की, हा जीव किंवा लौकिक पुरुष किंवा मितप्रमाता हा इच्छेच्या बळाने आपल्या इंद्रियांना प्रेरणा देणारा अर्थात् प्रेरक या भूमिकेने व्यवहार करीत नाही किंवा वागत नाही; परंतु स्पंदाच्या अथवा आत्म्याच्या किंवा परमात्म्याच्या किंवा श्रीपरमेश्वराच्या समर्थ स्पर्शामुळे तो जीव स्वयं त्याच पतिप्रमात्याप्रमाणे किंवा श्रीपरमेश्वराप्रमाणे बनतो अर्थात् त्याच्याप्रमाणे कार्य करण्यास सक्षम होत असतो.।।१०८।।१३।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा त्या सिद्धयोग्याची म्हणजेच ज्याला परतत्त्वाचा साक्षात्कार झालेला आहे अशा सिद्धयोग्याची कोठेही निरुद्ध अथवा रोधली न जाणारी इच्छा प्रकट होऊन वाढू लागते असे भगवान् श्रीशंकरांनी "**इच्छाशक्तिरुमा कुमारी।।१३।।**" या सूत्रात सांगितले आहे. (या ठिकाणी "**इच्छाशक्तितमा कुमारी**"।।**१३**।। असा पाठ घेतला आहे.)।।५७।।

परमात्म्याची इच्छा हीच सर्वांपेक्षा श्रेष्ठ शक्ती आहे. ही सर्वद्रष्टी आणि सर्वकर्त्री असून कुत्साप्रमाणे अर्थात् दर्भाप्रमाणे तिरस्काराने सृष्टी अथवा संसाराचा नाश करणारी आहे.।।५८।।

निरावरण अर्थात् आवरणरहित चिद्रूपाच्या समावेशामुळे ही शक्ती सृष्ट्यादि सर्व व्यवहार करते. हीच त्या विभूचे म्हणजेच सर्वव्यापक श्रीपरमेश्वराचे अखंडित कारण आहे.।।५९।।१३।।

**स्पष्टीकरण :-** या कुंडलिनी शक्तीत इतर सर्व उपशक्ती समाविष्ट असतात. इच्छाशक्तीच्या योगाने सर्व जगत् दृश्यमान होते म्हणजे पिंडब्रह्मांडाच्या रूपाने विश्वाची उभारणी होते. हेच या कुंडलिनी शक्तीचे अप्रतिहत, अखंड व समस्त स्वातंत्र्य आहे. त्यामुळे ती जशी इच्छा करते तसे होते. तिच्या या

सामर्थ्यामुळे अनाश्रितापासून म्हणजे श्रीशिवांपासून पृथ्वीपर्यंत ती स्वतःच्या संकल्पाने निरावरण व चिद्धनरूप सर्व गोष्टींची निर्मिती करते.।।१३।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**इच्छाशक्तिरुमाकुमारी।।१३।।**" अर्थात् योग्याची इच्छा म्हणजेच अत्यंत श्रेष्ठ अशी पारमेश्वरी स्वातंत्र्यरूप शक्ती आहे. ही कुमारी अर्थात् जगताची सृष्टी व संहारादि क्रीडा अर्थात् मनोरंजनाचा खेळ करण्यात तत्पर किंवा मग्न असते.।।१३।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा विस्मययुक्त योगभूमिकेवर आरूढ झालेल्या म्हणजेच अशी विस्मययुक्त योगभूमिका ज्याला प्राप्त झाली आहे अशा सिद्धयोग्याची इच्छा-शक्ती ही उमाकुमारी असते, हे "**इच्छाशक्तिरुमाकुमारी।।१३।।**" या सूत्राने श्रीशिवांनी कथन केले आहे.।।६६।।

शाश्वत अर्थात् कधीही नष्ट न होणाऱ्या श्रीपरभैरवत्वाला सिद्धयोगाच्या अभ्यासाने प्राप्त झालेल्या त्या सिद्धयोग्याची जी इच्छाशक्ती आहे तीच उमा होय.।।६७।।

हीच श्रेष्ठ भट्टारिका व हीच कुमारी होय. ही श्रीसदाशिवांपासून पृथ्वी-पर्यंतच्या सर्व विश्वाला सहज लीलेने उत्पन्न करते.।।६८।।

कुमारी म्हणजेच "**कुं**" अर्थात् महामायाभूमी होय. हिला मारणारी म्हणजेच मायेचे आवरण नष्ट करणारी ही कुमारी होय. श्रीभैरवरूप झालेल्या सिद्धयोग्याची ही कुमारी उपभोग्य आहे.।।६९।।

ही कुमारी अन्य कोणाचीही उपभोग्य होत नाही अर्थात् तिचा इतर कोणालाही उपभोग घेता येत नाही. ही भोक्त्याशी अर्थात् सिद्धयोग्याशी एकनिष्ठतेने राहते.।।६९.५।।

ज्याप्रमाणे श्रीउमाकुमारी सर्व इतर संगआसक्तिइच्छाआकांक्षांचा त्याग करून श्रीमहेशांच्या आराधनेत अथवा सेवेत तत्पर असते त्याचप्रमाणे सिद्ध-योग्याची इच्छाशक्ती त्याच्या सेवेत सदैव तत्पर असते.।।७०-७०.५।।

पूर्वसांप्रदायिकांनी अर्थात् श्रीसद्गुरुजनांनी हाच पाठ योग्य असल्याचे पाहिले व तसेच व्याख्यानही केले. काही विद्वानांनी "**शक्तितमा**" असा पाठ स्वीकारला आणि ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती या दोन्हींचे अस्तित्व या कुमारीत आहे, असे आधिक्याने वर्णन केले.।।७१-७२।।१३।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

पूर्ववर्ती योगभूमिका प्राप्त केलेल्या सिद्धयोग्याचे काय होते? असा प्रश्न येथे उत्पन्न झाला असता त्याचे "**इच्छाशक्तिरुमाकुमारी।।१३।।**" या सूत्रात उत्तर दिलेले आहे. श्रीपरभैरवरूपात प्राप्त झालेल्या अर्थात् श्रीशिवांच्या संपूर्ण आत्मसंवित्‌चा अनुभव घेणाऱ्या म्हणजेच श्रीशिवमय झालेल्या महायोग्याची जी इच्छा निर्माण होते ती शक्ती श्रीउमा अर्थात् पारमेश्वरी स्वतंत्ररूप होते.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**या अस्य इच्छा सा अस्य शक्तिः सा च कुमारी।।**

**अर्थ :-** जी या योग्याची इच्छा आहे तीच त्याची शक्ती असून ती कुमारी आहे.

भगवती श्रीउमा ही कोणाचीही पत्नी नाही तर ती "कन्या" रूपी कुमारी आहे. त्यामुळेच भगवती श्रीउमादेवी विश्वाच्या अथवा संसाराच्या सृष्टि-संहाराच्या क्रीडेत संलग्न किंवा मग्न असते.

"कुमारी" या शब्दाची "कुं मारयति इति" अशीही एक व्युत्पत्ती दिली जाते. "कुं" म्हणजे भेद अथवा द्वैत उत्पन्न करणारी माया असून त्या मायेला मारते म्हणजेच त्या मायेला नष्ट करते ती कुमारी होय.।।१३।।

**विवरण :-** श्रीक्षेमराजाचार्यांनी या सूत्राचे अभेद, भेदाभेद व भेद या तीन दृष्टिकोनातून तीन भिन्न अर्थ केले आहेत व ते अनुक्रमे शांभवोपाय, शाक्तोपाय व आणवोपाय या नावांनी प्रसिद्ध असलेल्या श्रीशिवस्वरूप होण्याच्या तीन भिन्न मार्गांचे म्हणजेच उपायांचे दिग्दर्शन करतात.

श्रीपरमभैरव म्हणजेच श्रेष्ठ श्रीशिवपदापर्यंत पोहोचलेल्या सिद्धयोग्याची जी इच्छा तीच "उमा" नामक शक्ती होय. ही पारमेश्वरी शक्ती ज्ञान व क्रिया यांच्या बाबतीत संपूर्ण स्वतंत्र असते. ही "कुमारी" म्हणजे विश्वाची उत्पत्ती, स्थिती व संहार नामक क्रीडा करणारी असते. येथे "कुमारी" शब्द उणादि वर्गातील कुमार-कुमारयति, "खेळणे", "क्रीडा करणे" या वरून साधला आहे.

सारांश, सिद्धयोग्याची इच्छा ही श्रीशिवांच्या स्वातंत्र्यशक्तीशी एकरूप किंवा अभिन्न असते. हा शांभवोपायाला लागू पडणारा अर्थ आहे.

दुसरा अर्थ शाक्तोपायातील भेदाभेदवाददर्शक आहे. योग्याची "इच्छा-शक्ती" ही कुमारी आहे. "कु" म्हणजे माया होय. ती भेदोत्पादक किंवा भेद-प्रसारक असते. त्या "कु" ला "मारी" म्हणजे "मारणारी" आहे. ती मायेला

भेदाचा प्रसार करू देत नाही. त्यामुळे तिला "कुमारी" असे म्हटले आहे. योग्याची इच्छाशक्ती मायेने केलेले भेद निरसून श्रीशिवांशी अभेद असणारी म्हणजेच एकरूप असते.

तिसरा अर्थ पुढीलप्रमाणे आहे. पुराणकथेप्रमाणे श्रीउमा व श्रीशिव हे प्रारंभी भिन्न होते. हे द्वैत मान्य करणाऱ्या द्वैती किंवा "भेददर्शक" आणवोपायाचा अर्थ श्रीक्षेमराजाचार्यांनी सांगितला आहे. श्रीउमाने कुमारी असताना सर्वसंगपरित्याग करून श्रीशिवांशी ऐक्य साधण्याची उत्कटता व्यक्त केली आहे. त्याच प्रकारची साधकभक्तयोगिशिष्यांची इच्छा श्रीशिवांशी एकरूप होण्यासाठी उत्सुक असते.

कुमारी याचा अर्थ मुलीची अथवा बालिकेची अशी अवस्था आहे की, ज्यात ती स्वाभाविक अवस्थेत खेळण्या-बागडण्यात मग्न असते. "जीवनमुक्त" सिद्धयोग्याची अवस्थाही अशीच बालोन्मत्त पिशाचवत् असते अर्थात् अशा सिद्धयोग्याची इच्छाशक्ती सांसारिक भोगांची इच्छा न करता स्वाभाविक क्रीडा करीत असते.

"**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथात या असस्थेचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे.

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः।**
**आत्मन्येव च सन्तुष्टस्तस्य कार्यं न विद्यते।।३.१७।।**

**अर्थ :-** जो मनुष्य अर्थात् आत्मज्ञाननिष्ठ सिद्धयोगी आत्म्यातच मग्न असतो, आत्मस्वरूपातच तृप्त असतो आणि आत्म्यामध्येच संतुष्ट असतो त्याला कोणतेही शास्त्रविहित कर्तव्य नसते.।।१७।।

हा आत्मज्ञाननिष्ठ सिद्धयोगी केवळ आत्म्यातच रती असणारा असतो. त्याचे प्रेम विषयांवर नसून आत्म्यावरच असते. सामान्य माणसांप्रमाणे तो बाह्य विषयांच्या लाभातच संतुष्ट होत नाही; तर आत्मस्थितीतच त्याला समाधान व संतोष वाटतो. बाह्य विषयांमध्ये रमण तर स्वाभाविकच आहे. त्या क्रियेत तो मग्न असो किंवा नसो त्याला काहीच फरक पडत नाही. अशा प्रकारे आत्म्यात क्रिया करणारा आणि आत्म्यातच वास्तविक रमण करून संतुष्ट राहणारा क्रियावान् पुरुष ब्रह्मज्ञानी सिद्धयोग्यांमध्ये श्रेष्ठतम आहे.

या दृष्टीनेच "**मुंडकोपनिषद्**" या ग्रंथामध्ये असे म्हटले आहे की -

**आत्मक्रीड आत्मरतिः क्रियावानेष ब्रह्मविदां वरिष्ठः।।३.१.४।।**

**अर्थ :-** आत्म्यामध्ये क्रीडा करणारा आणि आत्म्यात रममाण होणारा

क्रियावान् पुरुष म्हणजे सिद्धयोगी सर्व ब्रह्मवेत्त्यांमध्ये श्रेष्ठ असतो.।।४।।

"**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथातही असे म्हटले आहे की -

**योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः।**
**स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति।।५.२४।।**

**अर्थ :-** जो सिद्धयोगी अंतरात्म्यातच सुख प्राप्त करतो, आत्म्यामध्येच आराम करतो आणि आत्मा हीच ज्याची ज्योती किंवा प्रकाश आहे तो आत्मनिष्ठ सिद्धयोगी ब्रह्मरूप होऊन ब्रह्मामध्ये निर्वाणाला किंवा मोक्षाला प्राप्त होतो.।।२४।।

"**भावनोपनिषद्**" या ग्रंथामध्ये इच्छाशक्तीला श्रीमहात्रिपुरसुंदरी अर्थात् जागृत, स्वप्न आणि सुषुप्ती या तीनही अवस्थांमध्ये आत्मक्रीडा व आत्मरमण करणारी सुंदरी अर्थात् कुंडलिनी शक्ती असे म्हटले आहे.।।१३।।

## सूत्र क्रमांक १४

**संबंध :-** अशा प्रभावशाली इच्छाशक्तीने युक्त सिद्धयोग्यासाठी दृश्य-वर्ग आपले स्वरूप असते, असे श्रीशिवांनी या सूत्रात सांगितले आहे.

**दृश्यं शरीरम्।।१४।।**

**शब्दार्थ :- दृश्यम्** - सर्व बाह्य व आंतर वस्तुजात अर्थात् विश्व. **शरीरम्-** शरीर किंवा देह. (शरीर = शरीराप्रमाणे असतात.)

**अर्थ :-** जगतात जे जे दृश्य पदार्थ आहेत ते ते सिद्धयोग्याचे स्वरूप आहे अर्थात् सर्व आंतर व बाह्य वस्तुजात अशा इच्छाशक्तिसंपन्न सिद्ध-योग्याला स्वतःच्या शरीराप्रमाणे असतात.।।१४।।

**विशेष व्याख्या :-** जो बाह्य अर्थात् घटपटादि व नीलपीतादि त्याचप्रमाणे आभ्यंतर म्हणजे देहादि जगद्रूप दृश्य अर्थात् वेद्यवर्ग आहे तो सर्व आपल्या स्वरूपापासून अभिन्न आहे, असा त्या सिद्धयोग्याला अनुभव येतो. तो सर्व दृश्य पदार्थ अहंरूपात पाहतो. सर्व विश्व हे आपले शरीरच आहे असे त्याला वाटते.

हे सर्व समजण्यासाठी एक गोष्ट सांगतात. एकदा इंद्र आपल्या सभेत प्रसन्न होऊन विराजमान झाले होते. नर्तकी नृत्य करीत होत्या. गायक आपल्या संगीताने सर्वांना आह्लादित करीत होते. समोरच दोन हत्ती एकमेकांना टक्कर देत आपले मनोरंजन करीत होते. इंद्र हे सर्व पाहून आनंदित होत होते.

एवढ्यात भगवान् श्रीशिव तेथे येऊन पोहोचले. इंद्र आपल्याच करमणुकीत मग्न होते. त्यावेळी भगवान् श्रीशिवांचे स्वागत करण्यासाठी ते आपल्या

आसनावरून उठलेही नाहीत. भगवान् श्रीशिव आत आले आणि त्यांनी आपल्या जटांना एक झटका दिला. त्याबरोबर शेजारचे दोन पर्वत एकमेकांना धक्के देऊ लागले. त्यामुळे नृत्य, संगीत आणि हत्तींची टक्कर हे सर्व नष्ट-भ्रष्ट होऊ लागले. इंद्रांनी घाबरून श्रीशिवांना असे विचारले, "भगवन्! हे काय झाले? आणि कसे झाले?" भगवान् श्रीशिव त्यावर असे म्हणाले की, "विषयभोगांमध्ये आपले मन रमविणे हे सांसारिक सुख-दुःख देणारेच असते. सर्व दृश्यवर्गामध्ये अहंतेचा अनुभव आल्याने विश्वाच्या सृष्टीची व संहाराची क्रीडा ही आपलीच क्रीडा असते."

या सूत्राचा अर्थ दुसऱ्याही प्रकारे पुढील प्रमाणे केला जाऊ शकतो.

**शरीरं दृश्यम्।।१४।।**

**अर्थ :-** ज्या देह, प्राण, पुर्यष्टक इत्यादींना सर्वसामान्य माणसे अहंतारूपात पाहतात त्यांनाही हा सिद्धयोगी इदंरूपात पाहतो.

**विशेष व्याख्या :-** हा सिद्धयोगी देह व प्राण इत्यादि सर्वांना आत्म-सत्तेहून वेगळे समजून स्वरूपचैतन्यापासून विचलित होत नाही. त्याचा असा निश्चय असतो की, आत्मसत्तेशिवाय देहादि स्थिरच राहू शकत नाहीत. त्यामुळे देहादि हे चित्स्वरूपापासून भिन्न आणि त्याज्य आहेत. त्याला त्याचे शरीरही असेच प्रतीत होते. अशा प्रकारे तो सिद्धयोगी देहादींना इदंरूप समजून भेदाचे निराकरण करून स्वतः पूर्णाहंतेमध्ये मग्न राहतो.।।१४।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा महान् इच्छाधारी सिद्धयोग्याचे श्रीशिवांनी **"शरीरं दृश्यम्।।१४।।"** या सूत्राने वर्णन कले आहे.

जे जे बाह्य व आभ्यंतर दृश्य जगत् आहे ते ते सर्व या सिद्धयोग्याला आपल्या गात्राप्रमाणेच वाटते व स्फुरते; कारण तो "अहंमिदम्" अर्थात् मीच ते आहे, असा श्रीसदाशिवांप्रमाणे महाज्ञानाने युक्त असतो. असा सिद्धयोगी भेददृष्टी ठेवीत नाही; कारण त्याला दृश्य जगात आणि स्वात्म्यात कोणताही भेद राहत नाही म्हणजेच त्याची भेददृष्टी नष्ट होऊन गेलेली असते.

शरीर व देह आणि बुद्धी व प्राण यांनी विरहित नीलादि पदार्थ इत्यादीं-प्रमाणे असलेले रूप दृश्य अर्थात् पाहिले जाणारे आहे. ते पशूंप्रमाणे पाहणारे नाही. शरीर मी आहे असे पशूंना वाटते, जीवांना वाटते; मात्र सिद्धयोग्यांना वाटत नाही. अशा प्रकारे देहात आणि बाह्य जगतात सर्वत्रच या सिद्धयोग्याला मोराच्या अंड्यातील रसाप्रमाणे अविभक्त असेच ज्ञान होते.

यासंबंधी "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**जलस्येवोर्मयो वह्नेर्ज्वालाभङ्ग्यः प्रभा रवेः।**
**ममैव भैरवस्यैता विश्वभङ्ग्यो विनिर्गताः।।१०८।।**

**अर्थ :-** जलाच्या तरंगांप्रमाणे, अग्नीच्या ज्वालांप्रमाणे व सूर्याच्या कांती-प्रमाणे माझ्यापासून अर्थात् श्रीभैरवापासून हे विविधतेने नटलेले विश्व निर्माण झाले आहे.।।१०८।।

समुद्ररूप चिदात्मा श्रीईश्वराचे विश्व हे तरंगांप्रमाणे आहे. हे विश्व श्रीईश्वराहून अभिन्न असूनही भिन्न असल्याप्रमाणे वाटते आणि ते तेथेच उदय पावून तेथेच लयही पावते, असा याचा अर्थ आहे.

हेच "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात पुढीलप्रमाणे कथन करताना असे म्हटले आहे की -

**तेन शब्दार्थचिन्तासु न साऽवस्था न यः शिवः।**
**भोक्तैव भोग्यभावेन सदा सर्वत्र संस्थितः।।३.२९।।**

**अर्थ :-** यामुळे सर्व वाचक अर्थात् जीव आणि वाच्य अर्थात् ज्ञेय अशा पदार्थांच्या संवेदनाची कोणतीही अशी अवस्था नाही की, जी श्रीशिवरूप नाही. खरी स्थिती अशी आहे की, प्रत्येक ठिकाणी भोक्ता अर्थात् भोग घेणारा आत्मा हाच भोग्य अर्थात् भोग घेण्याला योग्य अशा प्रमेय पदार्थांच्या रूपामध्ये उल्हसित किंवा आनंदित होऊन शाश्वतरूपाने राहिलेला आहे.।।२९।।

भोक्ताच भोग्यभावाने नेहमी सर्वत्र स्थित असतो, हेच या कारिकेत संगृहित केले आहे.

**विवरण :-** भोग्य म्हणजे प्रमेय होय. हे प्रमेय अर्थात् जाणून घेण्याचे विषय हे गौण असल्यामुळे प्रमाणांना उल्लंघून जात नाहीत अथवा प्रमाणांपेक्षा श्रेष्ठ ठरत नाहीत. अशा प्रकारे भोग्य हे भोक्त्यापेक्षा श्रेष्ठ नसते. वास्तविक पाहता सर्व वस्तू या प्रमात्यामध्येच म्हणजे जीवामध्येच विश्रांत होत असल्याने भोक्ताच भोग्य आणि भोक्ता या दोन्ही रूपांनी स्फुरित अर्थात् व्यक्त होतो असा या श्लोकाचा भाव आहे.।।१४।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे सर्वात्मक झालेल्या या सिद्धयोग्याचे शरीर प्रत्येक जीवमात्रा-प्रमाणे एकच आहे की, सर्व त्याचेच शरीर आहे? अशी शंका उत्पन्न झाली असता श्रीसुरेश्वर श्रीशिव "**दृश्यं शरीरम्।।१४।।**" हे सूत्र सांगतात.।।६०।।

सर्व पदार्थ ज्याच्यापासून उत्पन्न होतात, जो सर्वांचे बीज आहे, जो

सर्वांचा प्रभू आहे आणि ज्याचे स्वरूप चैतन्ययुक्त आहे असा तो सिद्धयोगी व्यापक असल्यामुळे त्याचे शरीर एकच नाही.।।६१।।

विकल्पजन्य अर्थात् विकल्पांपासून उत्पन्न होणारे जेवढे बाह्य विषय आहेत तेवढे सर्व त्याचे म्हणजे सिद्धयोग्याचे शरीरच आहे. त्यामुळे तो सिद्धयोगी सर्व भाव अर्थात् पदार्थांना उत्पन्न करणारा आहे.।।६२।।

तो सिद्धयोगी चित्स्वरूपाने सर्व वर्गांशी अर्थात् प्रमेयांशी तदाकार किंवा समरस असल्याने तोच सर्व देहांना धारण करणारा होतो.।।६३।।

ज्याप्रमाणे शरीर नसतानाही आरशातील प्रतिबिंबाला शरीर असते तसेच या सर्वव्यापक सिद्धयोग्याने दृश्याला व्यापून टाकलेले असते. तसेच तो मोक्षरूप ऐश्वर्याचे घर म्हणजेच स्थान असतो.।।६४।।१४।।

**विवरण** :- श्रीपरमशिवच सर्व वेद्याच्या आकाराने म्हणजे ज्ञेयवस्तूंच्या रूपाने नटलेले असतात. जरी ते स्फटिकाच्या शिळेप्रमाणे एकसंध असले तरी ज्याप्रमाणे निरनिराळ्या वस्तू स्फटिकाच्या खाली ठेवल्यावर ती स्फटिकशिळा विभिन्न दिसते त्याप्रमाणे श्रीपरमशिव संकुचित भूमिका धारण केल्याप्रमाणे आतबाहेर निरनिराळ्या भावाने दिसतात. असे जरी असले तरी श्रीपरमशिव आपला सत्ताप्रकाश सर्व वस्तूंना प्रदान करीत असल्यामुळे त्या सर्व वस्तू चेतनयुक्त व जीवित दिसतात व जीवभाव असलेल्या गोष्टी श्रीशिवच होत, असा या सूत्राचा सारांश होय.।।१४।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**शरीरं दृश्यम्।।१४।।**" अर्थात् बाहेरील किंवा आंतरिक जे काही दृश्य आहे ते सर्व या सिद्धयोग्याला अहंरूपात म्हणजे मीच सर्व काही आहे आणि इदंरूपात म्हणजेच जगत् व त्यातील समस्त पदार्थ आपल्या रूपा-प्रमाणे स्फुरतात व स्वतःच्या अवयवांप्रमाणेच भासतात. ते पदार्थ त्याला भेदरूपाने भासत नाहीत.।।१४।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा अतुलप्रभावी इच्छाशक्तीने युक्त असलेल्या सिद्धयोग्याला "**शरीरं दृश्यम्।।१४।।**" या सूत्रन्यायाने "जे जे सर्व काही दिसणारे पदार्थ अथवा वस्तुजात दिसते ते सर्व त्याचे शरीरच असते."।।७३।।

त्या सिद्धयोग्याच्या ठिकाणी शरीराविषयी मी असा वेगळेपणा नसतो किंवा स्वामीप्रमाणे म्हणजे श्रीशिवांप्रमाणे तो सिद्धयोगी भासमान होत असल्याने गात्रे, बुद्धी व प्राणादि नसलेले शरीर हे घटादिकांप्रमाणे त्या सिद्धयोग्याला

दृश्यच वाटते.।।७४।।

ज्याप्रमाणे पशूंना म्हणजेच जीवांना ते शरीर द्रष्टा म्हणजे पाहणारे वाटते त्याप्रमाणे सिद्धयोग्यांना ते पाहणारे वाटत नाही; कारण पाहणारा आत्मा हा एकच असतो. त्याच्यात आणि शरीरादि पदार्थात भिन्नत्व असल्याने ते शरीर हे पाहणारे नसून दृश्य अथवा आत्म्याकडून पाहिले जाणारे असते.।।७५।।

अशा प्रकारे त्या सिद्धयोग्याला देहाच्या आत आणि बाहेर सर्वत्र मोराच्या अंड्यातील रसाप्रमाणे अभेदभावना होते.।।७५.५।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

ज्या योगनिष्ठ पुरुषाची अशा प्रकारची महान् इच्छा उत्पन्न होते त्याला हे सर्व बाह्य आणि आंतर दिसणारे पदार्थरूप जग हे स्वशरीराप्रमाणेच होते असे "**दृश्यं शरीरम्।।१४।।**" या सूत्रात सांगितले आहे.

जे जे दृश्य ज्या जगात असते, ते बाह्य असो अथवा आंतर असो, ते ते सर्व अहमिदम् अर्थात् मीच ते सर्व आहे अशा प्रकारच्या श्रीसदाशिवां-प्रमाणे महाप्रकाशाच्या ज्ञानाने स्वतःच्या अवयवांप्रमाणे भासणारे हे विश्व "**स्वशक्तिप्रचयोऽस्य विश्वम्।।**" अर्थात् "सिद्धयोग्याच्या सर्व शक्तींचा समूह म्हणजेच हे विश्व आहे," असे सांगितल्या जाणाऱ्या स्व-स्वभावाशिवाय काहीच नसते. तो या विश्वाला स्वतःच्या शरीराशिवाय वेगळे पाहत नाही. त्याच्यासाठी हे शरीरही दृश्याप्रमाणे म्हणजेच देह, बुद्धी व प्राण यांनी विरहित अशा नीलादि वस्तूंप्रमाणेच असते. अज्ञानी जीवाला हे शरीर द्रष्ट्याच्या रूपाने अर्थात् हे शरीर म्हणजेच मी आहे अशा रूपात भासत असते; परंतु परसाक्षात्कार झालेल्या सिद्धयोग्याची शरीराबद्दलची अशी भावना कधीच नसते. या उलट या महायोगनिष्ठ पुरुषाला बाह्य आणि आंतर अशा सर्व ठिकाणी मोराच्या अंड्यातील रसाप्रमाणे अभिन्न प्रकारानेच ज्ञान होते.

"**श्रीविज्ञानभैरव**". या ग्रंथात यासंबंधी असे म्हटले आहे की -

**जलस्येवोर्मयो वह्नेर्ज्वालाभङ्ग्यः प्रभा रवेः।**
**ममैव भैरवस्यैता विश्वभङ्ग्यो विभेदिताः।।१०८।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे पाण्यापासून लाटा, अग्नीपासून ज्वाळा व सूर्यापासून कांती निर्माण होते त्याप्रमाणेच माझ्यापासून म्हणजेच श्रीभैरवांपासून हे विभिन्न प्रकारचे विश्व निर्माण झाले आहे.।।१०८।।

त्याचप्रमाणे श्रीवसुगुप्ताचार्यांनी "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथांमधील कारिकां-मध्ये असे म्हटले आहे की -

**यस्मात्सर्वमयो जीवः सर्वभावसमुद्भवात्।**
**तत्संवेदनरूपेण तादात्म्यप्रतिपत्तितः।।३.२८।।**
**तेन शब्दार्थचिन्तासु न सावस्था न यः शिवः।**
**भोक्तैव भोग्यभावेन सदा सर्वत्र संस्थितः।।२९।।**
**इति वा यस्य संवित्तिः क्रीडात्वेनाखिलं जगत्।**
**स पश्यन् सततं युक्तो जीवन्मुक्तो न संशयः।।३०।।**

**अर्थ :-** जीव किंवा पशुप्रमाता हा सर्वमय आहे; कारण हा जीव किंवा पशुप्रमाता पतिप्रमात्याप्रमाणे किंवा परमेश्वराप्रमाणे संसारामधील अर्थात् जगतामधील सर्व घट, सुख इत्यादि भावांसह संवेदनात्मक तादात्म्य प्राप्त करून घेऊन त्यांची सर्जना किंवा सृष्टी करीत असतो. (श्रीस्पंदशास्त्रामध्ये "सृष्टी" या शब्दाचा अर्थ सृष्टी, स्थिती, संहार, पिधान आणि अनुग्रह ही पाच कृत्ये असा केलेला आहे.)।।२८।।

**अर्थ :-** यामुळे सर्व वाचक अर्थात् जीव आणि वाच्य अर्थात् ज्ञेय अशा पदार्थाच्या संवेदनाची कोणतीही अशी अवस्था नाही की, जी श्रीशिवरूप नाही. खरी स्थिती अशी आहे की, प्रत्येक ठिकाणी भोक्ता अर्थात् भोग घेणारा आत्मा हाच भोग्य अर्थात् भोग घेण्यास योग्य अशा प्रमेय पदार्थांच्या रूपामध्ये उल्हसित किंवा आनंदित होऊन शाश्वतरूपाने राहिलेला आहे.।।२९।।

**अर्थ :-** अशा प्रकारे ज्याला हे सर्व जग संवित् आत्मस्वरूप अर्थात् मन्मय किंवा चिन्मय आहे असा स्वानुभव येतो तो हे सर्व विश्व ही आपली लीला आहे असे जाणतो. अशा प्रकारे आपल्या आंतरिक श्रीईश्वरी सत्तेशी तो पुरुष नेहमी युक्त असल्यामुळे जीवन्मुक्त असतो यात काहीही संशय नाही.।।३०।।

याचा निष्कर्ष असा आहे की, समस्त वेद्यवस्तुस्वरूप अर्थात् सर्व ज्ञेय पदार्थ हेच ज्यांचे स्वरूप आहे असे भगवान् श्रीपरमशिवच स्फटिकाप्रमाणे त्यांच्यामध्ये प्रतिबिंबित झालेल्या व त्यांच्या आधारावर असलेल्या परिमित अथवा संकुचित भूमिकेतही बाहेर आणि आत असणाऱ्या पदार्थांना सर्व ठिकाणी व्यापून राहत असल्यामुळे ती अवस्था अन्य प्रकाराने सिद्ध होत नसतानाही जीवनदशेतही ते सर्वांना आपला संवित्प्रकाश देतच राहतात.।।१४।।

## सूत्र क्रमांक १५

**संबंध :-** अशा प्रकारे जगद्रूप दृश्याला अहंरूपतेने स्वरूपात अथवा देह, प्राण व पुर्यष्टक आदींना इदंरूप दृश्यवर्ग मानून सिद्धयोगी संसार कसा पाहतो हे या पंधराव्या सूत्रात सांगितले आहे.

**हृदये चित्तसङ्घट्टाद्दृश्यस्वापदर्शनम्।।१५।।**

**शब्दार्थ :- हृदये** - (हृदय म्हणजे सर्व विश्वाचे प्रतिष्ठान अर्थात् आधार असल्यामुळे विश्व चैतन्याचा प्रकाश.) हृदयामध्ये म्हणजे चैतन्याच्या, संवित्शक्ती कुंडलिनीच्या पूर्णतेच्या म्हणजे श्रीशिवांशी समरस झालेल्या अनुभवामध्ये किंवा बोधा-वस्थेच्या केंद्रा (Core) मध्ये. **चित्तसंघट्टात्** - चंचलचित्ताच्या एकाग्रतेमुळे (चंचल असलेल्या चित्ताची मूलभूत जाणिवेवर अथवा चैतन्यावर एकाग्रता झाल्यामुळे हृदय -(बाह्य वस्तू (उदा. नीलवस्तू, शरीर इ.) आंतर वस्तू (उदा. प्राण, मन इ.) अशा) सर्व आंतरबाह्य वस्तू. **स्वाप** - शून्य अवस्था किंवा सुषुप्तिरूप दृश्य म्हणजे अहंतारूप प्रमातृवर्गाच्या. (या अवस्थेत व्यावहारिक, प्रातिभासिक अथवा प्रत्यय येऊ शकणाऱ्या सर्व वस्तुजाताचा अभाव असतो.) **दर्शनम्** - अभेद-दर्शन (शून्यापर्यंतच्या सर्व दृश्यादृश्य वस्तू स्वतःचाच भाव अथवा शरीर असल्याचा प्रत्यय) किंवा अद्वैतभावना दृढ झाल्यामुळे सर्वत्र आत्मस्वरूपाचे दर्शन होणे.

**अर्थ :-** असा सिद्धयोगी चंचल चित्ताच्या म्हणजे चेतनपदावरून खाली उतरून संकुचित चित्तरूप धारण करणारी कुंडलिनी शक्ती ज्यावेळी श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने अंतर्मुख होते त्यावेळी ती बहिर्मुखाने कामोपभोगविषयतृष्णाकांक्षासंकल्पनादींमध्ये रत झालेल्या आपल्या सर्व उपशक्तींना आपल्याशी एकरूप करून सुषुम्नागामी होते व सहस्रारात श्रीशिवांशी समरसतेने व समव्याप्तीने प्राप्त झालेल्या एकरसरूपतेमुळे व एकाग्रभावनेने संवित्मध्ये अथवा चेतनेच्या पूर्णतेच्या अनुभवात जाग्रत् त्याचप्रमाणे स्वप्नावस्थारूप दृश्य अर्थात् इदंतारूप प्रमेय वर्ग आणि सुषुप्तिरूप दृश्य अर्थात् अहंतारूप प्रमातृवर्गाला अद्वैत भावना दृढ असल्याकारणाने आत्मस्वरूपातच पाहतो अर्थात् जेव्हा चित्त हे चित्शी म्हणजे वास्तवतेचे केंद्र असलेल्या वैश्विक चैतन्याशी संपर्क साधते तेव्हा हे बाह्य वाटणारे विश्व व शून्य सुद्धा आपलेच स्वरूप आहे असा प्रत्यय येतो अर्थात् ज्यावेळी पिंडकुंडलिनी शक्ती व ब्रह्मांडकुंडलिनी शक्ती एकरूप होते त्यावेळी विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण अवस्था या एकरसरूप आहेत असा अनुभव येतो.।।१५।।

**विशेष व्याख्या :-** चित्त हे स्वभावतःच चंचल आहे. ज्यावेळेला सिद्ध-योगी एकाग्रभावनेत दृढ होतो त्यावेळेला त्याला चैतन्याच्या पूर्णतेमध्ये अहंतेचा अनुभव येतो. संवित्च्या या महाबोधात तो जाग्रत् त्याचप्रमाणे

स्वप्नरूप दृश्य आणि सुषुप्तिरूप दृश्याला आत्मस्वरूपातच पाहतो. या आरोहक्रमाच्या अभ्यासात तो भाव आणि अभावरूप जगताला आपले अंग मानून स्वरूपचमत्काराचा आनंद घेतो. ही उपायक्रमाभ्यासाने मुक्तशिवांची अवस्था आहे.।।१५।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

हे जे सर्व दृश्य आहे त्याचे शरीरत्वाने व बुद्ध्यादिशून्यात दृश्यरूपाने एकाच प्रकारचे ज्ञान होणे हे तसे कठीण नाही. याउलट हे जे सर्व दृश्य आहे ते शरीरत्वाने व बुद्ध्यादि शून्यात दृश्यरूपाने असे एकाच प्रकारचे आहे असे ज्ञान होणे हे काही तसे कठीण नाही हे सांगताना श्रीशिवांनी **"हृदये चित्तसङ्घट्टाद्दृश्यस्वापदर्शनम्।।१५।।"** हे सूत्र कथन केले आहे. हृदय हे विश्वाचे राहण्याचे स्थान असल्याने ते चित्प्रकाश आहे. तेथे म्हणजेच त्या हृदयात चंचल अशा चित्ताची एकाग्रता साधावी. **"समन्तात् घटनात्।।"** अर्थात् "सभोवतालच्या घटनांपासून" चंचल चित्ताच्या एकाग्रभावनेमुळे असा येथे अन्वय लावावा. ज्यावेळेला चितिशक्ती कुंडलिनी हीच संकोचून लहान होते त्यावेळेला तिला चित्त असे म्हणतात. त्या चित्ताच्या चित्प्रकाशात **"समन्तात्"** अर्थात् सभोवतालच्या घटना एकत्र करून समवधानता अर्थात् एकाग्रता करावी असा या वाक्याचा अर्थ आहे. या चित्तात देह व प्राणादि दृश्यांचे तसेच निद्रेचे व शून्याचे अर्थात् नीलादि अभावरूपाचे दर्शन म्हणजे प्रकाशन होते. याचा अर्थ असा आहे की, ग्राह्य व ग्राहक हा भेद नाहीसा होऊन सर्व वस्तू स्वतःच्या अवयवांप्रमाणेच भासावयाला लागतात. चित्प्रकाशात प्रविष्ट होणारे चित्त हे विश्व चित्प्रकाशाने युक्त आहे अशी भावना करते व विश्वाला चित्प्रकाशाने युक्तच पाहते.

यासंबंधी **"श्रीविज्ञानभैरव"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**हृद्याकाशे निलीनाक्षः पद्मसम्पुटमध्यगः।**
**अनन्यचेताः सुभगे परं सौभाग्यमाप्नुयात्।।४८।।**

**अर्थ :-** हे सुभगे! हृदयाकाशात बुद्धींद्रियांना लीन करणारा आणि ऊर्ध्व व अधर पद्मसंपुटांमध्ये राहून अनन्य अर्थात् एकाग्र चित्त झालेला सिद्धयोगी परमस्वातंत्र्य किंवा परमसौभाग्य मिळवितो.।।४८।।

सिद्धयोगी हा प्रमाण व प्रमेय संपुटांमध्ये म्हणजे प्रमाता होऊन सर्वेंद्रियांचा स्वामी होतो म्हणजेच स्वतंत्र होतो. तो श्रेष्ठ सौभाग्याला म्हणजेच सर्व विश्वाच्या नियामकत्वाला म्हणजेच स्वामित्वाला मिळवितो.

येथे "**परं सौभाग्यम्।।**" म्हणजेच विश्वेश्वरत्व होय. अशा प्रकारच्या तत्त्ववृत्तिरूप झालेल्या महायोग्याला उद्देशून "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथातही असे म्हटले आहे की -

**स च सर्वेषु भूतेषु भावतत्त्वेन्द्रियेषु च।**
**स्थावरं जङ्गमं चैव चेतनाचेतनं स्थितम्।।**
**अध्वानं व्याप्य सर्वं तु सामरस्येन संस्थितः।**

**अर्थ :-** तो सिद्धयोगी अचेतन व सचेतन अशा स्थावरजंगमात्मक विश्वाला म्हणजे संक्षेपानेच षड्विध मार्गांना व्यापून त्यात असणाऱ्या देव-योन्यादि चौदा लोक, धर्मघटादि भाव, पृथिव्यादि तत्त्वे व भोगसाधन इंद्रिये यांमध्ये अर्थात् सर्व पिंडब्रह्मांडामध्ये सर्वभावाने अर्थात् सामरस्याने स्थित असतो.

या श्लोकात "**सः**" असा ज्याचा उल्लेख केला आहे तो सिद्धयोगी म्हणजेच ज्याने श्रीशिवशक्तिसामरस्य प्राप्त केलेले आहे असा सिद्धयोगी होय. स्थावर म्हणजे अचेतन विश्व असून जंगम म्हणजे चेतन विश्व आहे. अशा प्रकारे संक्षेपाने दोन प्रकारांनी स्थित अशा सहा अध्वांना व्यापून तो स्थित असतो.

या अध्वांविषयी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**षोढा हि वाच्यवाचकरूपोऽध्वा।**

**अर्थ :-** वाच्य आणि वाचकरूप असे सहा अध्वा म्हणजे मार्ग आहेत.

त्यांच्या म्हणजे उपरोक्त सहा मार्गांच्या अंतर्गत असणाऱ्या सर्व देवयोनीं-मध्ये, चौदा भूतांमध्ये, धर्म-घटादि भावांमध्ये, पृथ्वी आदि तत्त्वांमध्ये आणि भोगाचे साधन असणाऱ्या इंद्रियांमध्ये हा सिद्धयोगी सामरस्याने स्थित असतो अर्थात् सर्व अवस्थांमध्ये असूनही आपले ऐश्वर्य न गमावता श्रीपरभैरवता अर्थात् श्रीशिवमय पूर्ण चैतन्यशक्ती प्राप्त करून स्थित असतो. हीच अत्यंत श्रेष्ठ रहस्याने युक्त अशी निर्व्युत्थान समाधी होय.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**जनः स्वदेहकण्डूतिं विजानाति यथा तथा।**
**परब्रह्मस्वरूपी च वेत्ति विश्वचेष्टितम्।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे मनुष्य आपल्या देहावर आलेली खाज ज्ञात करून घेतो त्याप्रमाणे परब्रह्मस्वरूपात निमग्न झालेला सिद्धयोगी सर्व क्रिया जाणून घेतो.

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील खालील कारिकेत हाच अर्थ पुढील प्रमाणे एकत्रित केलेला आहे.

**अनेनाधिष्ठिते देहे यथा सर्वज्ञतादयः।**
**तथा स्वात्मन्यधिष्ठानात्सर्वत्रैवं भविष्यति।।४.३९।।**

**अर्थ :-** स्वतःच्या शुद्ध आत्मस्वरूपात अधिष्ठान केले अथवा तेच स्वरूप आपण आहोत अशी जर अनुभूती घेतली तर साधकभक्तयोगि-शिष्याच्या ठिकाणी सर्व विश्वाबाबत सर्वत्र सर्वज्ञता असणे इत्यादि धर्म आविर्भूत होतात. याचाच अर्थ असा आहे की, ज्याप्रमाणे या स्पंदतत्त्वाने पांचभौतिक जड शरीरात अधिष्ठान केले तर त्या शरीराला साजेशा देश, काल व आकार यांच्या मर्यादेमध्ये सर्वज्ञता इत्यादि शक्ती येतात किंवा विद्यमान असतात त्याप्रमाणे ही गोष्टही निश्चित आहे की, देहाभिमानापासून दूर होऊन सरळ त्या आत्मतत्त्वाचा अहंरूपामध्ये अनुभव घेणाऱ्या सिद्ध-योग्यामध्ये सर्व विश्वामध्ये विश्वाबाबत सर्वज्ञता इत्यादि धर्म निश्चितपणे अभिव्यक्त होत असतात.।।४.३९।।१५।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा रीतीने ज्ञानाचा सद्भाव अर्थात् अस्तित्व सांगून स्वहृदयरूप मंदिरात गेलेल्या अर्थात् ज्याच्या प्राणशक्तीने सहस्त्रारात प्रवेश केलेला आहे अशा सिद्धयोग्याला हा ज्ञानसंबंध कसा होईल? अशी शंका उत्पन्न झाली असता श्रीशिवांनी "**हृदये चित्तसङ्घट्टाद्दृश्यस्वापदर्शनम्।।१५।।**" अर्थात् "हृदयात चित्त स्थिर झाले असता दृश्य हे स्वप्नाप्रमाणे होते," हे सूत्र सांगितले आहे.।।६४-६४.५।।

सर्व ज्ञानांना आधार असणाऱ्या हृदयात चित्ताची स्थिती स्थिर झाली असता त्याला संघट्ट असे म्हणतात. या संघट्टामुळे दृश्य हे स्वप्नासारखे अथवा झोपेसारखे वाटते.।।६५.५।।

किंवा सुषुप्तीअवस्थेतील आकाशाला हृदय असे म्हटले आहे; कारण ते जागृती आणि स्वप्न यांच्या मध्ये आहे.।।६६।।

येथे आत्म्याचे जे समाधान आहे त्याला संघट्ट असे म्हणतात; कारण चित्तातून निघणाऱ्या सर्ववृत्तिसमूहांचे स्वात्म्यात ऐक्य होते.।।६७।।

ज्यावेळेला शरीरापेक्षेने त्या सुषुप्ती-आकाशात हा चित्तसंघट्ट लीन होतो त्यावेळेला ब्राह्मणक्षत्रिय इत्यादि सर्व धर्म अनुषंगानेच म्हणजे सहजच नाहीसे होतात.।।६८।।

आवरणरहित उपलब्ध होणारे जे हृदय आहे ते ज्ञानयुक्त स्वस्वरूप होय. त्याच्या प्राप्तीला दर्शन असे म्हणतात.।।६९।।

झोप उत्पन्न करणाऱ्या मोहाची हानी किंवा नाश झाला असता दर्शन होते. दिव्य मुद्रेचा समावेश झाल्याने विभू हा नेहमी प्रबुद्ध अर्थात् सर्वदा जागा किंवा ज्ञानीच असतो.।।७०।।

ज्याची बुद्धी जागृत झालेली नाही त्याला निद्रा किंवा स्वप्नच दिसणार. ।।७०.५।।

तुरीयाकाशातील आत्मज्ञान म्हणजेच सोमपान होय. असे सोमपान ज्याने केलेले असते म्हणजे यामुळे जो जागा झालेला असतो त्याला स्वप्नस्वातंत्र्य असते म्हणजेच स्वप्न वा निद्रा त्याच्या ताब्यात असते.।।७१।।

यालाच तमरूप आवरणाचा नाश असे म्हणतात व हाच प्रतिभेचा उदयही होय.।।७१.५।।१५।।

**विवरण :-** सर्व इंद्रियनाड्यांना अधिष्ठानभूत हृदयामध्ये ऐहिक म्हणजे सांसारिक व आमुष्मिक म्हणजे पारलौकिक बाह्यविषयांपासून विरक्त अशा चित्ताला अभ्यासादि अर्थात् सिद्धयोगसाधनादि उपायांनी दृश्य अनर्थ बाधत नाहीत; कारण त्यांचा लय होतो. शुद्ध व अशुद्ध म्हणजे ऊर्ध्व व अध-स्तरमार्गांना मर्यादा अर्थात् सीमारूप असलेल्या सौषुप्त आकाशाला हृदय असे म्हणतात. ज्याप्रमाणे उष्णता नसलेल्या वह्नीप्रमाणे म्हणजे लाकडे, भस्म इत्यादि अग्नीचा आधार असलेल्या वस्तूंमधून अग्नी निघून गेल्यावर त्या वस्तू शांत होतात त्याप्रमाणे हृदयातील वृत्ती लय पावल्या की, मनाचाही लय होतो. त्या निर्मनस्क अर्थात् तेजतमरहित तुर्याकाशात अर्थात् सहस्रारात म्हणजे जेथे देहादिकांची अहंता नसल्याने ब्राह्मण व क्षत्रियादि शब्दांची आणि वेदाध्ययनादि व्यवस्थापनादि कर्मांची सहजच निवृत्ती होते तेथे अव्यवहित म्हणजे व्यवधानरहित स्वस्वभावाचे ज्ञान होते आणि जन्म-मरणादि संसाराच्या अनर्थाला मूलकारण असलेल्या अज्ञानाची निवृत्ती होते. अप्रबुद्धमती साधकाला अर्थात् पशुजीवाला स्वापाचा म्हणजे स्वप्नाचा किंवा निद्रेचाच अनुभव येतो असा ६५ ते ७१.५ या सर्व कारिकांचा आशय आहे.।।१५।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**हृदये चित्तसङ्घट्टाद्दृश्यस्वापदर्शनम्।।१५।।**" या सूत्राचा भावार्थ असा आहे की, चैतन्यप्रकाशित हृदयामध्ये चंचलचित्ताला एकाग्र केल्यामुळे

दृश्य पदार्थ म्हणजेच नील, देह, प्राण व बुद्ध्यादिक जे आहे ते आपले एक अंगच वाटते. तसेच स्वाप म्हणजेच यांचा अभाव अर्थात शून्य, त्याचेही ज्ञान अर्थात् दर्शन हे वस्तूच्या अनुरूप आपले अंगच आहे असे वाटते. खरे तर असे नुसते वाटत नाही तर तसेच होते.।।१५।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

सिद्धयोग्याच्या बाबतीत दृश्य शरीरत्वाला प्राप्त होते आणि शरीर दृश्यत्वाला प्राप्त होते हे जे पूर्वीच्या सूत्रात सांगितले ते दुर्घट किंवा कठीण नाही हे सांगण्यासाठी "**हृदये चित्तसङ्घट्टाद्दृश्यस्वापदर्शनम्।।१५।।**" हे सूत्र सांगितले आहे.।।७६-७६.५।।

"**हृदयं तद्विजानीयाद्विश्वस्यायतनं महत्।।**" अर्थात् "हृदय हे विश्वाचे मोठे घर आहे," या शास्त्रात सांगितलेल्या वचनानुसार हृदय हे विश्वाच्या विश्रांतीची जागा आहे. येथे चंचल चित्त राहते, मुक्काम करते आणि स्वसंवित् म्हणजे बुद्धिरूप चैतन्यशक्ती कुंडलिनी ही तेथील म्हणजेच हृदयातील ओटा किंवा चौथरा आहे.।।७७-७८।।

त्या श्रीशिवस्वरूप, चैतन्यरूप व बुद्धिरूप कुंडलिनी शक्तीशी अथवा हृदयाशी एकात्मता साधली की, जागृतीची जाणीव होते. त्याचप्रमाणे नील-देहादि दृश्य विश्वाचे दर्शन होते व त्याच्या अभावाचे म्हणजेच शून्याचेही दर्शन होते.।।७९-७९.५।।

या दृष्टीने "**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथात असे म्हटले आहे की, "**स्वाङ्गरूपेषु भावेषु प्रमाता कथ्यते पतिः।।**" अर्थात् "स्वतःच्या अंगरूप पदार्थांविषयी प्रमाता म्हणजेच ज्ञाता किंवा जीवात्मा पती म्हणविला जातो," या उक्तीनुसार त्या पतीला अर्थात् सिद्धयोग्याला सर्व दृश्ये अंगभूतच आहेत असे ज्ञान होते.।।८०-८१।। १५।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

सर्व दृश्यवस्तूंना शरीररूपाने आणि शरीराला दृश्यरूपाने पाहणाऱ्या महायोग्याला हे असे दर्शन मुळीच कठीण नाही. या उलट "**हृदये चित्तसङ्घट्टाद्-दृश्यस्वापदर्शनम्।।१५।।**" या सूत्रानुसार "त्याच्या हृदयात म्हणजे आज्ञाचक्रात चित्त म्हणजे जागृत कुंडलिनी शक्ती एकाग्र झाल्याने दृश्य आणि स्वप्न या दोन्हीही वस्तूंचे दर्शन होते."

हृदय म्हणजे विश्वाची अस्तित्वात असलेली आधारात्मक वस्तू आहे असे जाणावे. अशा प्रकारे सांगितल्यानुसार हृदयाचे विश्वविश्रांतिस्थान जाणले

जाते अर्थात् हृदय हे सर्व विश्वाचे विश्रांती घेण्याचे स्थान आहे अशी अनुभूती येते. जरी चित्ताचा स्वभाव अतिचंचल असला तरीही स्थिरता संपादन करण्याच्या उद्योगाने या चित्ताचा निग्रह करून परम श्रीशिवांच्या स्वरूपाच्या परामर्शाने म्हणजेच ज्ञानाने प्रयुक्त होऊन जागृतस्वभाव निर्माण होतो. अशा प्रकारे संपूर्ण प्रपंचाने युक्त अशा विश्वरूप दृश्याचे स्वतःच्या शरीररूपात दर्शन केल्याने म्हणजे विश्वच स्वतःचे शरीर समजल्याने त्या सिद्धयोग्याच्या दृष्टीने विश्वाचा अभावच निर्माण होतो अर्थात् स्वशरीराशिवाय असणारे त्याचे अस्तित्वच नष्ट होऊन जाते. त्याच्यासाठी सर्व शून्यात्मकच होते. त्यामुळेच स्वांगभूत भावांमध्ये जो प्रमाता अथवा जीव विद्यमान असतो तोच त्यांचा पती म्हणजेच त्या भावांचा मालक किंवा नियंता असतो. प्रत्यभिज्ञादर्शनानुसार श्रीपरमशिवात्मा प्रभू हे पतीच असतात.

यासंबंधी "**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथात आचार्य श्रीउत्पलपादांनी असे म्हटले आहे की -

**एष प्रमाता मायान्धः संसारी कर्मबन्धनः।**
**विद्याभिज्ञापितैश्वर्यश्चिद्घनो मुक्त उच्यते।।३.२.२।।**

**अर्थ :-** हा मायेने मोहित होऊन अंध झालेला संसारी आणि कर्मांनी बांधलेला असा प्रमाता म्हणजेच जीव विद्येने स्वतःचे ऐश्वर्य जाणवून घेतल्यानंतर चैतन्ययुक्त असा मुक्त म्हणविला जातो.।।२।।

**स्वाङ्गरूपेषु भावेषु प्रमाता कथ्यते पतिः।**
**मायातो भेदिषु क्लेशकर्मादिकलुषः पशुः।।३.२.३।।**

**अर्थ :-** जीव हा स्वांगरूप भावांमध्ये अर्थात् पदार्थांमध्ये पती म्हणविला जातो. तोच मायेमुळे भिन्न झालेला व क्लेशकर्मादींनी कलुषित झालेला पशू म्हणविला जातो.।।३।।

परंतु ग्राह्य-ग्राहक भाव टाकून दिल्याने प्रत्येक वस्तूचे त्याच्या त्याच्या अंगाप्रमाणेच प्रकाशन होते; कारण चित्प्रकाशात अभिनिविष्ट किंवा प्रविष्ट झालेले चित्त त्यावेळेला अभिन्न अशा विश्वाचे अवलोकन करते.

यासंबंधी "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**हृदाकाशे निलीनाक्षः पद्मसम्पुटमध्यगः।**
**अनन्यचेताः सुभगे परं सौभाग्यमाप्नुयात्।।४८।।**

**अर्थ :-** हे सुभगे! हृदयाकाशात बुद्धींद्रियांना लीन करणारा आणि वरच्या व खालच्या पद्मसंपुटामध्ये राहून अनन्य म्हणजेच एकाग्र चित्त

झालेला सिद्धयोगी परमस्वातंत्र्य किंवा परमसौभाग्य मिळवितो.।।४८।।

येथे "**परं सौभाग्यम्**" अर्थात् श्रेष्ठ सौभाग्य याचा अर्थ विश्वाचे श्रीईश्वरत्व अर्थात् नियामकत्व मिळविण्याच्या परमानंदाची प्राप्ती होय.।।१५।।

**विवरण :- "दृश्यं शरीरम्।।१.१४।।"** या सूत्रात ज्या सिद्धयोग्यामध्ये इच्छाशक्ती जागृत झालेली आहे त्याला हे सर्व दृश्य जगत् त्याचप्रमाणे त्याचे शरीर हे चैतन्याचा आविष्कार किंवा अभिन्न भागच वाटत असतो.

**"हृदये चित्तसङ्घट्टाद्दृश्यस्वापदर्शनम्।।१५।।"** या सूत्रात असे सांगितले आहे की, ही कल्पना म्हणजे आध्यात्मिक असंभाव्य कल्पना नाही. ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्याचे चित्त वैश्विक चैतन्याशी किंवा जाणिवेचे अथवा बोधाचे केंद्र असलेल्या चैतन्याशी अर्थात् चिच्छक्तीशी जाऊन मिळेल त्यावेळेला त्या सिद्धयोग्याला असे अनुभवाला येईल की, हे सर्व बाह्य जगत् म्हणजे त्या चैतन्याचा एक भाग आहे. त्यानंतर सिद्धयोग्याचे चित्त अथवा चैतन्य हे त्या वैश्विक चैतन्यात बुडून जाईल आणि अभेदाच्या जाणिवेचा उदय होईल.

ज्याप्रमाणे मोराच्या अंड्यामध्ये कोणत्याही भेदाशिवाय असणारा रस असतो त्याचप्रमाणे वैश्विक चैतन्याचे ज्ञान झाल्यावर शरीर आणि बाह्य वस्तू यांच्यामधला भेद नष्ट होतो.

आणखी एका मताप्रमाणे येथे चित्ताचा अर्थ मन असा घेतला पाहिजे. **"तैत्तिरीयोपनिषद्"** या ग्रंथातही चित्त आणि मन यांना एकमेकांचे पर्यायवाची मानले आहे.

**स य एषोऽन्तर्हृदय आकाशः।**
**तस्मिन्नयं पुरुषो मनोमयः अमृतो हिरण्मयः।।१.६.१।।**

**अर्थ :-** ते जे हे अंतर्हृदयातले आकाश आहे त्यात राहणारा हा पुरुष मनोमय, अमृतमय आणि हिरण्मय आहे.।।१।।

येथे मनोमय पुरुषाला चित्ताभिमानी पुरुष असे म्हटले पाहिजे; परंतु वीरेश असल्याकारणाने तो अमृतमय आणि हिरण्मय आहे. ज्यावेळेला त्याचे चित्त हृदयाकाशात एकाग्र होते त्यावेळेला हृदयावर संयम ठेवल्यामुळे त्याला जग हे स्वप्नाप्रमाणे भासू लागते. ज्याप्रमाणे स्वप्नाचे दृश्य आत्मोन्मेष-मात्रच असते; परंतु त्याच्यामध्ये ज्ञाता हा पूर्व संस्कारामुळे काम-क्रोधातून उत्पन्न होणाऱ्या भाव आणि भयांनी युक्त होऊन स्वतःच सुखी आणि दुःखी होतो व भयातुर होऊन दुसऱ्यांनी आपले रक्षण करावे अशी इच्छा करतो. मात्र तेथे दुसरा कोणीही नसतोच. अशाच प्रकारे जाग्रतावस्थाही जाणून

घेतली पाहिजे. बाह्य प्रपंचाचे निमित्त घेऊन आपल्याच काम-क्रोधादि भावांच्या उद्भवाने पशूप्रमाणे स्वतःला बांधून घेऊन तो दुसऱ्यांना अथवा दैवाला दोष देत राहतो.।।१५।।

**सूत्र क्रमांक १६**

**संबंध :-** ग्रंथकार उपायक्रमाभ्यास सांगून आता अनुपायक्रमाभ्यासामध्ये अनादिसिद्ध श्रीशिवदशेचे वर्णन करीत आहेत. पूर्णाहंता-विमर्श अर्थात् स्वचे किंवा परतत्त्वाचे पूर्ण ज्ञान मिळविण्यासाठी हा दुसरा उपाय सांगितला आहे.

**शुद्धतत्त्वसन्धानाद्वाऽपशुशक्तिः।।१६।।**

**शब्दार्थ :- वा** - किंवा (दुसरा उपाय). **शुद्धतत्त्व** - श्रीपरमशिवरूप शुद्धतत्त्व. **सन्धानात्**- विश्व श्रीपरमशिवमय आहे किंवा मीच विश्वात्मा श्रीपरमशिव आहे अशा अखंड जाणिवेमुळे किंवा प्रपंचाच्या तन्मयीभावामुळे. **अपशु-शक्ती** - आत्म्याला बंधन घालून पशू करणाऱ्या शक्तीचा अभाव किंवा जगत्पती श्रीशिवांचा अर्थात् जीवभावरहित कुंडलिनी शक्तीचा अनुभव सिद्ध-योग्याला येतो.

**अर्थ :-** दुसऱ्या उपायाने म्हणजेच ज्यावेळी तीव्रातितीव्र शक्तिपातामुळे अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्य कुंडलिनी शक्ती जागृत होऊन व ती स्वतःच श्रीसद्गुरुरूप होऊन स्वतःसिद्ध सिद्धयोगसाधन करू लागते त्यावेळी होणाऱ्या अनुपायक्रमाभ्यासाने श्रीपरमशिवरूप शुद्धतत्त्वात प्रपंचाचा अर्थात् विश्वात्मा श्रीशिव मीच आहे या तन्मयीभावाने जगताचे पती श्रीशिव अर्थात् जीवभाव-रहित कुंडलिनी शक्तीचा अनुभव साधकभक्तयोगिशिष्याला येतो किंवा दुसरा उपाय असा आहे की, विश्व हे श्रीपरमशिवमय आहे अशी श्रीपरमशिव या शुद्ध तत्त्वाविषयीच्या अखंड जाणिवेमुळे आत्म्याला बंध निर्माण करून त्याला मर्यादित करणाऱ्या, पशुत्व देणाऱ्या व बाह्यसंसारोन्मुखतेने कामोप-भोगइच्छातृष्णाकांक्षासंकल्पनादींमध्ये रत झालेल्या कुंडलिनी शक्तीचा अभाव होऊन तो सिद्धयोगी होतो श्रीशिवांप्रमाणे विश्वाचा पती बनतो.।।१६।।

**विशेष व्याख्या :-** दुसऱ्या उपायाने म्हणजेच अनुपायक्रमाभ्यासाने ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य श्रीपरमशिवरूप शुद्धतत्त्वामध्ये "विश्वात्मा श्रीशिव मीच आहे" या भावनेच्या दृढ अभ्यासाने प्रपंचाच्या तन्मयतेचा अनुभव घेतो त्यावेळेला त्याला पशू अर्थात् जीवभावाची बंधशक्ती राहत नाही. तो श्रीशिवांप्रमाणे जगताचा पती बनतो. पूर्णाहंतेमध्ये स्थित असणाऱ्या

सिद्धयोग्याने समाधीचा अभ्यास केला अथवा न केला तरी त्याच्याशी त्याचे काहीही प्रयोजन नसते.

यासंबंधी "**श्रीयोगवासिष्ठ**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**समाधिमथ कर्माणि मा करोतु करोतु वा।**
**हृदयेनास्तसर्वाशो मुक्त एवोत्तमाशयः।।**

**अर्थ** :- ज्याच्या अंतःकरणामध्ये "**श्रीशिवोऽहम्**" ही भावना दृढ झाल्याने सर्व प्रकारच्या द्वैतमूलक आशा नष्ट झालेल्या असतात तो सिद्धयोगी समाधीचा अभ्यास करील अथवा करणारही नाही; कारण त्याचा आशय उत्तम असल्याने तो नेहमीसाठी मुक्तच मानला जातो. अशा सिद्धयोग्यासाठी हठसमाधीचे अनुष्ठान हेही एक प्रकारचे बंधनच असते.

या दृष्टीने "**श्रीअष्टावक्रगीता**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**निःसङ्गो निष्क्रियोऽसि त्वं स्वप्रकाशो निरञ्जनः।**
**अयमेव हि ते बन्धः समाधिमनुतिष्ठसि।।१५.१।।**

**अर्थ** :- तू सर्वसंबंधशून्य, फलाकांक्षेच्या क्रियेने रहित, शुद्धतत्त्वरूप, स्वप्रकाश आणि अभेदभावनेने निर्मल आहेस. त्यामुळे सविकल्प हठसमाधीचे अनुष्ठानही तुला बंधनकारक आहे.।।१५.१।।

त्यामुळे स्वरूपज्ञानाव्यतिरिक्त कोणत्याही उपायांचे अनुष्ठान करणे हे अशा आत्मज्ञानी योग्यासाठी केवळ बंधनच ठरते. तो प्रारब्धानुसार ज्याप्रमाणे स्थिती प्राप्त झालेली असेल त्याप्रमाणे त्या स्थितीतही निरावरण स्वरूपलाभाने युक्त असतो.।।१६।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

दृश्य जगत् हे आपल्यापासून भिन्न आहे असे ज्या साधकभक्तयोगि-शिष्याला वाटते त्याच्या बाबतीत दुसरा उपाय "**शुद्धतत्त्वसन्धानाद्वाऽपशु-शक्तिः।।१६।।**" या सूत्रात सांगितला आहे.

शुद्ध तत्त्व म्हणजेच श्रीपरमशिव होत. शुद्ध शब्दाचे स्पष्टीकरण देताना असे म्हटले जाते की, "**मायोपरि महामाया।।**" अर्थात् "मायेच्या वर आणखी एक महामाया आहे." "**श्रीरहस्याम्नाय**" या ग्रंथातील या वचनाप्रमाणे मायाशक्तीने हे सर्व व्यापलेले आहे. त्यामुळे शुद्ध तत्त्व म्हणजे श्रीपरमशिवच होत; कारण त्यांच्याशिवाय जे जे काही आहे ते ते सर्व मायेने युक्त आहे. या सूत्रात तत्त्व हा शब्द ज्यांना उपदेश द्यावयाचा आहे त्यांच्यासाठी वापरलेला आहे.

ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य या तत्त्वात विश्वाचे अनुसंधान करतो म्हणजेच शुद्ध तत्त्व हे श्रीपरमशिव आहेत व "**शिवमयमेवैतद्विश्वम्**" अर्थात् "हे विश्व श्रीशिवांनी युक्त आहे," असे ज्ञान करून घेतो आणि या विश्वाला श्रीशिवमयच पाहतो त्यावेळेला ज्यांना पशू नावाची बंधशक्ती मुळीच असत नाही त्या श्रीसदाशिवांप्रमाणे तो साधकभक्तयोगिशिष्य संपूर्ण जगताचा पती अर्थात् नियामक किंवा सिद्धयोगी होतो.

यासंबंधी "**श्रीलक्ष्मीकौलार्णव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**दीक्षासिद्धौ तु ये प्रोक्ताः प्रत्ययाः स्तोभपूर्वकाः।**
**सन्धानस्यैव ते देवि कलां नार्हन्ति षोडशीम्।।**

**अर्थ :-** हे देवी! दीक्षासिद्धीमध्ये जे देशकालोपाधिक असे दूरच्या वस्तूचे ज्ञान व चित्ताचे आवरण वगैरे अनुभवलाभ सांगितले आहेत ते या शुद्धतत्त्वसंधानाच्या सोळाव्या कलेचीही बरोबरी करू शकणार नाहीत.

प्रत्यय म्हणजे देशादींनी व्यवहित अर्थात् आच्छादित असलेल्या दूरच्या वस्तूचे ज्ञान होय. स्तोभ म्हणजे चित्ताचे आवरण होय. संधानाचा म्हणजेच शुद्ध तत्त्वाच्या विमर्शाच्या किंवा ज्ञानाच्या सोळाव्या अंशाचेही ऐश्वर्य प्रकटन हे अनुभव करू शकत नाहीत; कारण त्यांची भूमिका ही विघ्न समाक्रांततत्वाची अर्थात् पादाक्रांत करण्याची असते.

"**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात यासंबंधी असे म्हटले आहे की -

**सर्वं देहं चिन्मयं हि जगद्वा परिभावयेत्।**
**युगपन्निर्विकल्पेन मनसा परमोद्भवः।।६२।।**

**अर्थ :-** सर्व देह व सर्व जगत् चिन्मय आहे अशी भावना निर्विकल्प अंतःकरणाने जो एकसमयावच्छेदाने करतो त्या साधकभक्तयोगिशिष्याला सर्वश्रेष्ठ लाभ होतो अथवा सर्वश्रेष्ठ अशा सिद्धपदाची प्राप्ती होते.

पायांपासून ते केसांपर्यंत सर्व देहाचा प्रत्येक अंश हा चिदंश अर्थात् चैतन्याच्या अंशाने भरलेला असतो व त्यामुळे देह हा चिद्रूपच असतो. "**युगपत्**" म्हणजेच अक्रम रूपाने होय. स्फुरण पावणाऱ्या चित्-चमत्काराच्या व्याप्तीने अंतर्बाह्य "**प्रकाशमानं न पृथक् प्रकाशात् अन्यथा चेत्यमानत्वा-नुपपत्तेः।।**" अर्थात् "प्रकाशमान हे प्रकाशाशिवाय वेगळे नाही; कारण अन्य चेत्यमान अर्थात् प्रकाशमान पदार्थाची चैतन्ययुक्त सिद्धी होऊ शकत नाही," या न्यायानुसार प्रकाशच प्रकाशतो अशी भावना करावी.

हाच आशय "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथामधील कारिकेत पुढील प्रमाणे

एकत्रित केला आहे.

**इति वा यस्य संवित्तिः क्रीडात्वेनाखिलं जगत्।**
**स पश्यन्सततं युक्तो जीवन्मुक्तो न संशयः।।३.३०।।**

**अर्थ :-** अथवा अशा रीतीने जो हे सर्व जगत् श्रीपरमेश्वरांची क्रीडा किंवा लीला आहे असे जाणतो, अनुभवितो किंवा सतत पाहतो अथवा चित्-संवित् म्हणजे हे सर्व जगत् आहे असे जाणतो तो सिद्धयोगी जीवन्मुक्तच होय, हे निःसंशय समजावे. याचाच अर्थ असा आहे की, अशा प्रकारे ज्याला हे सर्व जग संवित् आत्मस्वरूप अर्थात् मन्मय किंवा चिन्मय आहे असा स्वानुभव येतो तो हे सर्व विश्व ही आपली लीला आहे असे जाणतो. अशा प्रकारे आपल्या आंतरिक श्रीईश्वरीसत्तेशी तो पुरुष नेहमी युक्त असल्यामुळे जीवन्मुक्त असतो यात काहीही संशय नाही.।।३।।१६।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अंतर्बाह्यदृष्ट्या स्वरूपाचा विचार करूनच त्या अज्ञानाभासित स्व-रूपाचा त्याग करून अखंडमंडलाकार परिपूर्ण असे आत्मस्वरूप हस्तगत करावे.।।७२-७२.५।।

यासाठी श्रीशिव व शक्ती यांच्या भेदातली स्थिती कशा प्रकारची आहे हे कळावे आणि स्व-प्रकाशाचीही हानी होऊ नये म्हणून सर्वव्यापक श्रीमहेश्वरांनी तीन सूत्रे सांगितली आहेत.।।७३-७३.५।।

त्यांच्यापैकी पहिले सूत्र "**शुद्धतत्त्वसन्धानाद्वा।।१६।।**" हे आहे. "**विमर्शिनी**" टीकेमध्ये "**शुद्धतत्त्वसन्धानाद्वाऽपशुशक्तिः**" असा एकच सूत्राचा अभेदयुक्त पाठ आहे. या श्रीभट्टभास्कराचार्यांच्या "**श्रीवार्तिक**" ग्रंथात मात्र "**शुद्धतत्त्वसन्धानाद्वा**" आणि "**स्वपदशक्तिः**" असे वेगवेगळे दोन सूत्र पाठ आहेत.

**शुद्धतत्त्वसन्धानाद्वा।।१६।।**

**अर्थ :-** श्रीशिवनामक तत्त्व हे निरुपाधिक ज्योतिरूप असून हे तत्त्व स्वतः आपण आहोत असा विमर्श केल्यामुळे आपण व बाह्यवस्तू निराळे आहोत या द्वैतभावनेचा लोप होऊन अखंडित निजस्थितीची प्राप्ती होते. (त्यालाच श्रीशिवचैतन्य असे म्हणतात.)।।१६।।

अत्यंत शुद्ध, निरुपाधिक अर्थात् सर्व उपाधींनी रहित आणि ज्योती अथवा तेजोमय असे "**श्रीशिव**" नावाचे श्रेष्ठ तत्त्व आहे. त्याचे संधान केल्याने म्हणजेच ते तत्त्वच आत्मा आहे असा विचार केल्याने अज्ञानरूप

अंधकाराच्या आवरणाचा नाश होतो. परिपूर्ण एकरूपतेमुळे बाह्यवस्तूसंबंधी अहंभावाचा त्याग केल्याने द्वैतभावनेचा लोप होऊन अखंडित अर्थात् एकरस अशी निजस्थिती अथवा आत्मस्थिती किंवा श्रीशिवशक्तिसामरस्य प्राप्त होते.

या सूत्रात परमविश्रांतिस्थान जे परानंद श्रीशिवचैतन्य आहे त्याचे वर्णन करून त्याच्या प्राप्तीचा उपाय सांगितला आहे.।।७४ ते ७५.५।।

असे "**श्रीशिवचैतन्याचे**" वर्णन आहे.

**स्वपदशक्तिः ।।१७।।**

**अर्थ :-** स्वपद हीच शक्ती होय अर्थात् श्रीशिवनामक स्वपद हे त्या श्रीशिवांचे दृक्क्रियारूप म्हणजे प्रकाश-विमर्शरूप वीर्य किंवा सामर्थ्य आहे. त्यालाच कुंडलिनी शक्तिचैतन्य असे म्हणतात.

या सूत्रात परानंदरूप आत्मलाभाला कारण अशा शक्तिचैतन्याचे वर्णन केलेले आहे.

"**स्व**" या पदाचा "**सत्**" असा अर्थ होतो. सत् म्हणजेच श्रीशिव होत. त्याचे दर्शन आणि क्रियारूप असे जे वीर्य अथवा सामर्थ्य आहे त्यालाच शक्ती असे नाव आहे. त्या शक्तीच्या क्रियारूप अंशाची लीनता अर्थात् क्रियाहीनता म्हणजेच स्थिती होय. हाच केवळ प्रकाशाने युक्त असा प्रतिभालोक होय. ।।७६-७७.५।।

अशा प्रकारे या सूत्रात "**श्रीशक्तिचैतन्याचे**" निरूपण केले आहे.।।१६।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**शुद्धतत्त्वसन्धानाद्वाऽपशुशक्तिः ।।१६।।**" म्हणजे ज्यावेळेला साधक-भक्तयोगिशिष्य श्रीपरमशिवतत्त्वात हे विश्व श्रीपरमशिवांनीच युक्त आहे असे अनुसंधान करतो अथवा असा विचार करतो त्यावेळेला त्याच्या ठिकाणी पशू नावाची बंधशक्ती असूच शकत नाही. या स्थितीत तो सिद्धयोगी श्रीसदाशिवां-प्रमाणे जगताचा पती, नियंता अथवा स्वामी होतो.।।१६।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

पूर्वी उपाय सांगितलेले असूनही या दृश्यादि प्रमेयांच्या बाबतीत आणखी एक उपाय "**शुद्धतत्त्वसन्धानाद्वाऽपशुशक्तिः ।।१६।।**" या सूत्रात असा सांगितला आहे की, "शुद्ध तत्त्वाच्या अनुसंधानाने अपशुशक्ती म्हणजे श्रीशिवांची शक्ती अथवा पतिशक्ती प्राप्त होते."।।८२।।

श्रीपरशिवात्मक असे जे श्रेष्ठ व शुद्ध तत्त्व आहे त्याचे अनुसंधान

केल्यास म्हणजेच त्याची जोड दिल्यास पशुशक्ती नाहीशी होते. सर्व प्रपंच श्रीपरमशिवमय आहे अशी भावना करणे म्हणजे शुद्धतत्त्वसंधान होय. त्यामुळे श्रीसदाशिवांप्रमाणे साधकभक्तयोगिशिष्य सर्व जगाचा पती म्हणजेच सिद्धयोगी अर्थात् पालक होतो.।।८३-८३.५।।१६।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

प्रमेय पदार्थ अर्थात् ज्ञेय असणारे जग हेच सिद्धयोग्याचे शरीर आहे असे आधीच्या "**हृदये चित्तसङ्घट्टाद्दृश्यस्वापदर्शनम्।।१.१५।।**" या सूत्रात सांगून आता "**शुद्धतत्त्वसन्धानाद्वाऽपशुशक्तिः।।१६।।**" या सूत्रात दुसरा उपाय सांगितला आहे.

अज्ञानरूपी विहिरीत पडलेले सर्व देहधारी पशूच असतात. ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य परम श्रीशिवांचे निरंतर तादात्म्याने अनुसंधान करतात अर्थात् हे सर्व विश्व श्रीशिवमयच आहे असा विचार करतात त्यावेळेला त्यांचे पशुत्व नष्ट होते; कारण परम श्रीशिव हेच सर्वांमध्ये असणारे, विशुद्ध व सर्व लोकांच्या पलीकडे असणाऱ्या अशा तत्त्वांनी युक्त वस्तू म्हणजेच ब्रह्म आहेत. त्यांचे अनुसंधान केल्यास सर्व विश्वप्रपंचाचेच श्रीशिवमयत्व होते. अनुसंधान म्हणजे एक प्रकारची भावना होय. तशा प्रकारच्या भावनेने मनुष्यप्राण्याची पशुरूप असणारी बंधशक्ती नष्ट होते. या स्थितीत ज्याप्रमाणे श्रीसदाशिव या जगताचे पती आहेत त्याप्रमाणेच हा सिद्धयोगीही जगताचा पती होतो.

यासंबंधी "**श्रीलक्ष्मीकौलार्णव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**दीक्षासिद्धौ तु ये प्रोक्ताः प्रत्ययाः स्तोभपूर्वकाः।**
**सन्धानस्यैव ते देवि कलां नार्हन्ति षोडशीम्।।**

**अर्थ :-** हे देवी! दीक्षासिद्धीमध्ये जे देशकालोपाधिक अर्थात् देश व काल या उपाधी किंवा मर्यादा असणाऱ्या वस्तूचे ज्ञान आणि चित्त व त्यावरचे अनुभवलाभ सांगितले आहेत ते या शुद्धतत्त्वानुसंधानाच्या सोळाव्या कलेचीही बरोबरी करू शकत नाहीत.

"**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथातही असे म्हटले आहे की -

**सर्वं देहं चिन्मयं हि जगद्वा परिभावयेत्।**
**युगपन्निर्विकल्पेन मनसा परमोद्भवः।।६२।।**

**अर्थ :-** सर्व देह व सर्व जगत् हे चिन्मय आहे अशी भावना निर्विकल्प अंतःकरणाने जो एकाच वेळेला करतो त्याला सर्वश्रेष्ठ लाभ होतो अथवा

सर्वश्रेष्ठ पदाची प्राप्ती होते.।।६२।।

अशा प्रकारे या कारिकांमधून हे ज्ञान एकत्रित केले आहे.।।१६।।

**विवरण :-** शुद्धतत्त्वांच्या अनुसंधानाने साधकभक्तयोगिशिष्याचा पशुभाव नष्ट होऊन त्याच्यात दिव्यभावाचा उदय होतो. शांतिकलेची श्रीसदाशिव, श्रीईश्वर आणि शुद्धविद्या ही शुद्ध तत्त्वे आहेत असे सांगितले जाते आणि शांत्यातीता कलेची श्रीशिव आणि शक्ती ही दोन्हीही शुद्ध तत्त्वे आहेत. शांति-कला ही विद्याकलेच्या वरची कला आहे अर्थात् शांतिकलेत काल, कला, नियतीचे ज्ञान न राहता केवळ अखंड शांतिमय भूमिकेचा अनुभव येतो. ही संकल्प व विकल्प यांनी विरहित अशी अवस्था आहे. या अवस्थेत जीवाच्या आणव, कार्म आणि मायीय या तीनही मलांचा अभाव होतो. या सूत्रातला "**वा**" हा शब्द विकल्प वाचक आहे अर्थात् हृदयाकाशात चित्त एकाग्र करणे आणि शुद्ध तत्त्वांचे अनुसंधान करणे या दोघांचेही फळ एकच आहे.।।१६।।

**सूत्र क्रमांक १७**

**संबंध :-** या सूत्रात ग्रंथकारांनी शुद्धतत्त्वाचे अनुसंधान करणाऱ्या व ज्याची सर्व बंधने नष्ट झालेली आहेत अशा सिद्धयोग्यासाठी साधारण विचारही स्वात्मविमर्शरूपच असतात हे सांगितले आहे.

**वितर्क आत्मज्ञानम्।।१७।।**

**शब्दार्थ :- वितर्क** - विश्वात्मा जे श्रीशिव ते आपण स्वतःच आहोत अशा प्रकारच्या विमर्शाची किंवा विचाराची दृढ व निश्चित जाणीव. **आत्मज्ञानम्** - आत्म्याचे अर्थात् त्याच्या स्फाराचे ज्ञान.

**अर्थ :-** "विश्वात्मा श्रीशिव मीच आहे," अशा प्रकारचा जो विचार आहे किंवा विमर्श आहे तो निश्चयच आत्म्याच्या स्फाराचे म्हणजेच आत्म्याच्या स्पंदाचे किंवा आत्म्याच्या स्फुरणाचे या परमसिद्धयोग्यासाठी ज्ञान आहे किंवा सिद्धयोग्याला सर्व विश्वव्यापक विश्वात्मा जे श्रीपरमशिव ते मीच आहे अशी दृढ जाणीव किंवा निश्चित ज्ञान होणे म्हणजेच आत्मज्ञान होय.।।१७।।

**विशेष व्याख्या :-** आत्मानुसंधानात स्थित झाल्याने अशा सिद्ध-योग्याची सर्व बंधने नष्ट झालेली असतात. "शिवोऽहं" अर्थात् "मी श्रीशिवच आहे," या भावनेमध्ये प्रपंचाचा तन्मयीभाव अर्थात् हा प्रपंचही श्रीशिवमयच आहे हे ज्ञान त्याला झालेले असते. त्यामुळे त्याचे संकल्प व विकल्परूप साधारण विचारही आत्मरूपतेमध्ये स्फुरित होतात अर्थात् प्रकट होतात. त्यालाच "**स्याम तन, स्याम मन, स्याम ही हमारो धन।।**" या भावनेने

जगताचे सर्व विचार आत्ममयच असतात. असा जो सिद्धयोगी असतो तो "**अकिञ्चिच्चिन्तक**" सिद्धयोगी असतो.।।१७।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा प्रकारच्या ज्ञानरूप सिद्धयोग्याचा "विश्वात्मा श्रीशिव मीच आहे," अशा प्रकारचा जो विचार आहे तो विचारच त्याचे आत्मज्ञान होय," हे श्रीशिवांनी "**वितर्क आत्मज्ञानम्।।१७।।**" या सूत्राने कथन केले आहे.

यासंबंधी "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सर्वज्ञः सर्वकर्ता च व्यापकः परमेश्वरः।**
**स एवाहं शैवधर्मा इति दार्ढ्याच्छिवो भवेत्।।१०७।।**

**अर्थ :-** सर्वज्ञ, सर्वकर्ता, व्यापक व श्रीशैवधर्माने युक्त असा श्रीपरमेश्वर म्हणजे मीच आहे अशी दृढ भावना केल्याने जीव हा श्रीशिव होतो.।।१०७।।

**विवरण :-** श्रीशिवांचा हा श्रीशैवधर्म स्वच्छ, स्वातंत्र्यादींनी युक्त असून "तोच मी आहे आणि मीच तो आहे," अशा प्रकारच्या असंदिग्ध किंवा स्पष्ट भावनेने श्रीशिवत्व प्राप्त होते. हीच शक्तिभूमी किंवा शाक्तभूमिका आहे.

या दृष्टीने "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातही असे म्हटले आहे की -

**अयमेवात्मनो ग्रहः।।**

**अर्थ :-** हाच आत्म्याचा ग्रह आहे.

या ठिकाणी आत्म्याचे ग्रहण म्हणजे ज्ञान असा अर्थ आहे. याच ठिकाणी विश्वात्मक श्रीशिवांपासून आपण अभिन्नच आहोत हाही अर्थ विवक्षित आहे. ।।१७।।

उपरोक्त ग्रंथातील मूळ कारिका व तिचा अर्थ पुढील प्रमाणे आहे.

**इयमेवामृतप्राप्तिरयमेवात्मनो ग्रहः।**
**इयं निर्वाणदीक्षा च शिवसद्भावदायिनी।।४.३२।।**

**अर्थ :-** हीच तादात्म्यता आहे. हीच अमृततत्त्वाची प्राप्ती आहे. हेच आत्म्याचे ग्रहण किंवा आत्मज्ञान आहे. हिलाच वास्तविक पाहता "निर्वाण दीक्षा" असे म्हणतात. ही परम श्रीशिवांचे स्वरूपत्व किंवा सायुज्य अर्थात् श्रीशिवभाव प्राप्त करून देणारी या अर्थानेच या "निर्वाण दीक्षेला" "श्रीशिव-सद्भावदायिनी" असेही म्हणतात.।।४.३२।।१७।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

"**वितर्क आत्मज्ञानम्।।१७।।**" या सूत्रात प्रोल्लास म्हणजे महानंद नावाच्या आत्मचैतन्याचे वर्णन करून स्वप्रकाशाच्या प्राप्तीचा उपाय सांगितला आहे.

दोन उपाधींमध्ये असलेल्या भेदाचे ज्ञान म्हणजेच वितर्क होय. विशेष तर्क म्हणजेच वितर्क होय. हा वितर्क स्वस्वभावाच्या एकघन विमर्शाने म्हणजे ज्ञानाने अथवा विचाराने युक्त असलेल्या श्रीशिवस्वरूपी आत्म्याला ओळखण्याच्या सर्व साधनांमध्ये मुख्य साधन होय. हे साधन आत्म्याचे ज्ञान करून देते व त्यामुळे शुद्ध आत्म्याच्या प्रतिभेचा उन्मेष होतो अर्थात् आत्मप्रतिभा जागृत होते.।।७८-७९-८०।।

हे **"आत्मचैतन्याचे"** वर्णन आहे.

या व आधीच्या दोन सूत्रांमध्ये निरानंद असे श्रीशिव, परानंद अशी शक्ती आणि महानंद असा आत्मा अशा या तीन चैतन्यांचे वर्णन केले. या सूत्रांना विश्राम-भूमी, लाभ-भूमी व प्रोल्लास-भूमी अशा संज्ञा आहेत.।।८१-८१.५।।१७।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"वितर्क आत्मज्ञानम्।।१७।।"** म्हणजे "विश्वात्मा श्रीशिवच मी आहे असा जो वितर्क म्हणजे विचार आहे तेच आत्मज्ञान होय."।।१७।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

शुद्धतत्त्वानुसंधान साधलेल्या साधकभक्तयोगिशिष्याला वितर्क म्हणजेच आत्मज्ञान होते असे **"वितर्क आत्मज्ञानम्।।१७।।"** या सूत्रात सांगितले आहे.।।८४-८४.५।।

वर सांगितलेल्या संधानाने साधकभक्तयोगिशिष्याचा बंध नष्ट होतो आणि "विश्वात्मा श्रीशिव मीच आहे," असा वितर्क अथवा विचार चालू होतो. हे स्फुरणारे ज्ञान म्हणजे वितर्क म्हणजेच आत्मज्ञान होय.।।८५-८५.५।।१७।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

**"वितर्क आत्मज्ञाम्।।१७।।"** या सूत्रात विशुद्ध तत्त्वाच्या भावनेने साधकभक्तयोगिशिष्याला आत्मज्ञान होते असे सांगितले आहे. श्रीपरमशिव-तत्त्वाच्या भावनेने अथवा विचाराने या योगनिष्ठ पुरुषाच्या बंधांचा नाश होतो. त्याच्याकडूनच "मी विश्वात्मा श्रीशिवरूप आहे," अशा प्रकारचे निरंतर चिंतन घडत राहते. हे चिंतनच स्फुरणरूप आत्म्याचे ज्ञान होय. हाच वितर्क अथवा विचार होय.

यासंबंधी **"श्रीविज्ञानभैरव"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सर्वज्ञः सर्वकर्ता च व्यापकः परमेश्वरः।**

**स एवाहं शैवधर्मा इति दार्ढ्याच्छिवो भवेत्।।१०७।।**

**अर्थ** :- सर्वज्ञ, सर्वकर्ता, व्यापक आणि श्रीशैवधर्माने युक्त असा श्रीपरमेश्वर म्हणजे मीच आहे अशा प्रकारची दृढ भावना केल्याने साधक-भक्तयोगिशिष्य श्रीशिवच होतो.।।१०७।।

अशा प्रकारे हा जो विचाररूप वितर्क उत्पन्न होतो तेच या महायोग्याचे आत्मज्ञान आहे.

**विवरण** :- "**शुद्धतत्त्वसन्धानाद्वाऽपशुशक्तिः।।१६।।**" या सोळाव्या सूत्रात श्रीपरमशिव हे विश्वरूप विश्वात्मा आहे हे सांगितल्यावर ते श्रीशिव आपणच आहोत असे ज्ञान अथवा साक्षात्कार होणे हेच आत्मज्ञान होय, असे "**वितर्क आत्मज्ञानम्।।१७।।**" या सूत्रात स्पष्ट केले आहे. सोळाव्या सूत्रात बाह्य जग हे श्रीपरमशिवतत्त्वात अंतर्भूत होते असे सांगितले आहे; तर सतराव्या सूत्रात ग्राहक अर्थात् साधकभक्तयोगिशिष्य हेही श्रीपरमशिवच आहेत असे सांगितले आहे.

हे सर्व ज्ञान तर्काने अथवा अनुमानाने किंवा विकल्पाने जाणून घ्यावयाचे नसून वितर्काने म्हणजेच आपणच श्रीशिव आहोत अशा प्रकारच्या दुर्दम्य, अबाधित व दृढ विश्वासाने सर्व तर्क नष्ट झाले आहेत अशा जाणिवेद्वारा जाणून घ्यावयाचे असते.

श्रीक्षेमराजांच्या विमर्शिनी टीकेत ज्या "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील कारिकेचा संदर्भ आलेला आहे त्या "**अयमेव आत्मनो ग्रहः।।**"अर्थात् "हाच आत्म्याचा ग्रह आहे," या कारिकेचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे आहे.

**दीक्षा** :- दीक्षेची व्याख्या करताना श्रीरामकंठानी असे म्हटले आहे की, "**स्वरूपसम्बोधदानात्मको भेदमयबन्धक्षपणलक्षणश्च संस्कारविशेषः।**" अर्थात् "स्वरूपाचा संपूर्णपणे बोध करून देण्याच्या दानाने युक्त व भेदयुक्त बंधाचा नाश करण्याचे लक्षण असणारा एक विशिष्ट संस्कार म्हणजे दीक्षा होय."

**निर्वाण** :- निर्वाणाचे लक्षण सांगताना श्रीरामकंठाचार्य असे म्हणतात की, "**निर्वाणं निवृत्तिर्द्वैतप्रत्ययलक्षणक्षोभपरिक्षयाद् आन्त्यतिकी प्रशान्तिः संविदः स्वस्वभावव्यवस्थितिः।**" अर्थात् "निर्वाण म्हणजे अवर्णनीय आनंद अथवा परमसुख असून ते द्वैतभावावर विश्वास ठेवल्याने उत्पन्न होणाऱ्या मानसिक क्षोभाच्या अथवा खळबळीच्या नाशानंतर निर्माण होणाऱ्या आत्यंतिक शांतीने उत्पन्न होते. निर्वाण ही संवित्‌ची स्वस्वभावात व्यवस्थिती होय.

वितर्काचा अर्थ समाधी असाही आहे. "**श्रीपातंजलयोगदर्शन**" या दर्शन-ग्रंथातल्या समाधिपादातल्या सूत्र क्र. ४१, ४२ व ४३ मध्ये वितर्क समाधीचे वर्णन आहे. संकल्प व विकल्परहित चित्ताच्या एकाग्र अवस्थेत आपल्या चैतन्यस्वरूप आत्म्यावर लक्ष ठेवल्याने आत्म्याचे ज्ञान होते. "**श्रीपातंजल-योगदर्शन**" या दर्शनग्रंथातल्या समाधिपादात वितर्क, विचार, सानंद आणि सास्मिता या चार सबीज समाधींचे वर्णन आहे. वितर्क समाधी अथवा समापत्ती ही पहिली पायरी आहे. या सूत्रात केवळ वितर्क म्हटल्याने आणि त्याचे "**आत्मज्ञान**" हे फळ सांगितल्याने योगदर्शनाच्या निर्बीज समाधीपर्यंतच्या सर्व साधनरूप पायऱ्या यात येतात. चित्तावर दृश्याच्या उन्मेषाचा ज्ञेयाकार उदित झाल्याने रूप, नाम, आनंद आणि अहंता या चारही प्रकारांनी ज्ञान होते.

स्थूल जगतामध्ये शुद्ध तत्त्वानुसंधानाच्या द्वारे भगवद्भावना ठेवल्याने काम-क्रोधादि पाशवी किंवा पशूंशी संबंधित भाव नष्ट झाल्याची गोष्ट या आधीच्या सूत्रात सांगितली आहेच. त्यामुळे अशा योग्याला आत्मज्ञानाची प्राप्ती होते.

या संबंधी "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथात असे म्हटले आहे की-

**अहङ्कारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम्।**
**विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते।।१८.५३।।**

**अर्थ :-** अहंकार, बल, दर्प, काम, क्रोध व परिग्रह यांचा त्याग करून ममतारहित आणि शांत अंतःकरणाचा साधकभक्तयोगिशिष्य सच्चिदानंदघन ब्रह्मात ऐक्य पावण्याला योग्य होतो.।।१८.५३।।१७।।

## सूत्र क्रमांक १८

**संबंध :-** पुढच्या तीन सूत्रांमधून सिद्धयोगी हा मायावी जगतात योगैश्वर्याचा चमत्कार कशा प्रकारे अनुभवितो, हे सांगितले आहे. ही त्याची विश्वमय दशा आहे. आता "अकिञ्चिच्चिन्तक" स्वात्मविज्ञानाने सुशोभित सिद्धयोग्यासाठी समाधिसुख काय आहे? हे या सूत्रात सांगितले आहे.

**लोकानन्दः समाधिसुखम्।।१८।।**

या सूत्राचा **(१) लोकानन्दः समाधिसुखम्।** आणि **(२) समाधिसुखं लोकानन्दः।** असा अन्वय करून श्रीक्षेमराजाचार्यांनी पुढील प्रमाणे अर्थ दिलेले आहेत.

**शब्दार्थ :- लोक** - ज्या पाहिल्या जातात त्या सर्व वस्तू व वस्तू पाहणारा किंवा अंतःकरण आणि बहिष्करणातील चित्प्रकाशाचा चमत्कार.

**आनन्दः** - दृश्य वस्तू व द्रष्टे या उभयतांचे आपण ज्ञाते आहोत या स्व-भावात स्थित असलेल्या योग्याला मिळणारा आनंद. **समाधिसुखम्** - समाधी म्हणजे आपल्या उपर्युक्त ज्ञातेपणाची अखंड जाणीव आणि त्यामध्ये स्वात्माराम सिद्धयोग्याला मिळणारा अखंड आनंद म्हणजे समाधिसुख.

**अर्थ :-** अंतःकरण आणि बहिष्करण अर्थात् अंतरिंद्रिये आणि बाह्येंद्रिये यांच्यामध्ये चित्प्रकाशाचा चमत्कार हा स्वात्माराम सिद्धयोग्याचे समाधिसुख आहे अर्थात् या जगातील सर्व दृश्ये अथवा वस्तुजात आणि ते पाहणारे सर्व म्हणजे दृश्ये व द्रष्टे या उभयतांचे ज्ञान असणे हा आपला स्थायी स्वभाव आहे या जाणिवेने सिद्धयोग्याला होणारा जो आनंद ते समाधिसुख होय.।।१८।।

**विशेष व्याख्या :-** स्वात्माराम सिद्धयोगी हा सर्व देह धारण करणाऱ्या जीवांमध्ये विलक्षण चमत्कारपूर्ण असतो. तो पूर्णाहंतेच्या म्हणजे संपूर्ण आत्मसाक्षात्काराच्या सहज अनुभवाने किंवा प्रमातृपदामध्ये विश्रांती प्राप्त केल्याने जगातल्या प्रत्येक पदार्थामध्ये स्वरूपस्फुरणाचा चमत्कार प्राप्त करीत राहतो. हेच त्याचे समाधिसुख आहे.

यासंबंधी "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**ग्राह्यग्राहकसंवित्तिः सामान्या सर्वदेहिनाम्।**
**योगिनां तु विशेषोऽयं सम्बन्धे सावधानता।।**

**अर्थ :-** सर्व देहधारी प्राणिमात्रांसाठी ग्राह्य पदार्थ आणि ग्राहकाचे ज्ञान सामान्य असते; परंतु सिद्धयोग्यांमध्ये या दोनही गोष्टींच्या संधीमध्ये सावधान राहत असण्याची विशेष गोष्ट असते.

ही सावधानता अशा सिद्धयोग्याची समाधी आहे आणि नित्यानंदभावात स्थिती आहे.

या सूत्राचा दुसऱ्याही प्रकारे अर्थ होऊ शकतो. या सिद्धयोग्याचे हे समाधिसुख लोकांसाठी कल्याण व त्याचप्रमाणे आनंद देणारे ठरते. हा सिद्धयोगी समाधिसुखात राहण्याने लोकांचेच कल्याण होत असते.।।१८।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

त्याचप्रमाणे "**लोकानन्दः समाधिसुखम्।।१८।।**" या सूत्रन्यायाने या योग्याचे लोकानंद हेच समाधिसुख असते असे पाहिले जाते म्हणून लोक अशी लोक या शब्दाची व्युत्पत्ती आहे. सर्व वस्तूंना पाहतो म्हणूनही लोक असा अर्थ घेता येतो म्हणजेच ग्राहकवर्ग होय. त्या ग्राहकवर्गात श्रीशिव स्फुरत अथवा प्रकाशत असताना -

**ग्राह्यग्राहकसंवित्तिः सामान्या सर्वदेहिनाम्।**
**योगिनां तु विशेषोऽयं सम्बन्धे सावधानता।।**

**अर्थ :-** सर्व प्राण्यांना ग्राह्य व ग्राहक यांच्यातील भेद सामान्यतः माहिती असतोच. योग्याला मात्र "अहं" व "इदं" अर्थात् "हे मी" व "हे इतर" असा विकल्प नसतोच. एकत्व पाहण्यात तो सावध असतो.

या श्लोकाचा अर्थ असा आहे की, सर्व देहधारी प्राण्यांसाठी प्रत्येक ज्ञानामध्ये ग्राह्य-ग्राहक संबंध असतो. परंतु सामान्य मनुष्याला फक्त ग्राह्याचीच जाणीव असते; ग्राहकाची नसते. मात्र योग्याला ग्राह्य व ग्राहक यांच्यातील संबंध ज्ञात असतो. या संबंधाशिवाय ग्राह्याची जाणीवच होऊ शकत नाही.

सर्व देहधारी प्राण्यांना व सर्व जीवांना वेद्य व वेदक संवेदना ही निर्विशेषपणे असते. मात्र सिद्धयोग्यांना आदि, मध्य व अंत या सर्व दशांमध्ये जीवदशेचे विस्मरण झाल्यामुळे समाधान प्राप्त झालेले असते.

"**श्रीविज्ञानभट्टारक**" या ग्रंथात सांगितल्याप्रमाणे प्रमातृपद अर्थात् श्रीपरमशिवतत्त्वात विश्रांती घेत असताना अवधानपूर्वक होणारा व चमत्काराने युक्त असा जो आनंद आहे तेच त्याचे म्हणजे सिद्धयोग्याचे समाधिसुख होय.

वरील श्लोकात आलेल्या "**ग्राह्य-ग्राहक**" या पदाचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे आहे. सिद्धयोगी हा सामान्य लोकांनी कल्पित केलेल्या ग्राह्य-ग्राहक वर्गामध्ये स्फुरण पावत असूनही त्याचा "**अहमिदम्**" अर्थात् "मी" व "हे" या विकल्पांच्या अथवा विचारांच्या अभावी होणारा जो आनंद आहे तोच समाधिसुख होय.

यासंबधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**अविकारोभयपार्श्वे चाषपिच्छसदृशेऽर्थे।**
**अन्तर्मुखो योगी बहिर्मुख इति कलना कुतः।।**

**अर्थ :-** चास पक्षाच्या दोन्ही पंखांप्रमाणे अहंता व इदंता या भागांच्या विकारांनी रहित स्वात्मरूप अर्थाच्या दोन्ही बाजूंमध्ये योगी अंतर्मुख अथवा बहिर्मुख असतो. अशा प्रकारची कलना अर्थात् जाणीव किंवा ज्ञान कोठे आहे?

याचा अर्थ असा आहे की, आत्मा हा "अहंता" व "इदंता" यांनी रहित असा आहे.

या संबंधी "**श्रीविज्ञानभट्टारक**" या ग्रंथातच पुढे असे म्हटले आहे की -

**सर्वं जगत्स्वदेहं वा स्वानन्दभरितं स्मरेत्।**
**युगपत्स्वामृतेनैव परानन्दमयो भवेत्।।६५।।**

**अर्थ :-** हे सर्व जगत् किंवा स्व-देह स्व-आनंदाने भरलेला आहे असे जो स्मरण करील तो स्वतःच्याच अमृतमय ज्ञानाने परानंदमय अर्थात् श्रेष्ठ आनंदाने युक्त होईल.

स्वानंदभरित म्हणजेच विषयांपासून मिळणाऱ्या आनंदाचा ज्याने त्याग केला आहे असा होय. स्वामृताने म्हणजेच स्वानंदाने भरलेले व "स्व" च्या चिदानंदाने परिपूर्ण असलेले सर्व काही आहे असा विचार करावा. येथे आश्यान अर्थात् घनदाट चिद्रसरूप अशा जगाचे भासन किंवा प्रकाशन दुसऱ्या धारणांपेक्षा विशेष आधायक अर्थात् विशिष्ट प्रकारचे स्थापन आहे.

हाच अर्थ "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथामध्ये पुढील कारिकेत एकत्रित केला आहे.

**इयमेवामृतप्राप्तिरयमेवात्मनो ग्रहः।।**
**इयं निर्वाणदीक्षा च शिवसद्भावदायिनी।।४.३२।।**

**अर्थ :-** हीच तादात्म्यता आहे. हीच अमृतत्वाची प्राप्ती आहे. हेच आत्म्याचे ग्रहण किंवा आत्मज्ञान आहे. हिलाच वास्तविक पाहता "निर्वाण दीक्षा" असे म्हणतात. ही परम श्रीशिवांचे स्वरूपत्व किंवा सायुज्य अर्थात् श्रीशिवभाव प्राप्त करून देणारी असल्याने या अर्थानेच या "निर्वाण दीक्षेला" "श्रीशिवसद्भावदायिनी" असेही म्हणतात.।।४.३२।।

त्याचप्रमाणे जे या स्वात्माराम सिद्धयोग्याचे समाधिसुख आहे ते योग्याशी संबंधित असे स्वानंदमय आणि स्वानुभवाने समजणारे समाधिसुख आहे. हा सिद्धयोगी दृष्टिगोचर होणाऱ्या लोकांमध्ये आनंदसंक्रमणयुक्तीने ते सुख प्रविष्ट करतो व ते सुख लोकांनाही आनंदविते अर्थातच लोकांना स्वानंदाच्या अभिव्यक्तीत हे सुख विश्रांती देणारे असते, असे "**श्रीचंद्रज्ञान**" या ग्रंथात सांगितले आहे. हे मत या सूत्राशी सुसंवादी आहे, विसंवादी अथवा प्रतिकूल नाही. (सूत्र क्रमांक सातमध्ये "**श्रीचंद्रयान**" या ग्रंथात उद्धृत केलेले मूळ वचन व अर्थ तेथे पाहावा.")।।१८।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

मागच्या "**वितर्क आत्मज्ञानम्।।१.१७।।**" या सूत्रानंतर परत "**लोकानन्दः समाधिसुखम्।।१८।।**" या सूत्रात असे म्हटले आहे की, "साधकभक्तयोगि-शिष्याला अशी प्रतिभा लाभली की, स्वरूपलाभ होतो आणि सुखलाभ व परमप्रकाशाचीही प्राप्ती होते."।।८२-८२.५।।

स्वात्मस्फूर्ती स्फुरित झालेल्या सिद्धयोग्याला स्वरूपलाभाचा आनंद

मिळतो व त्याला सर्व वस्तूंमध्ये एक प्रकाशच फक्त दिसतो. याचे कारण म्हणजे मागील श्रीशिव, शक्ती व आत्मा यांचे स्वरूपज्ञान हे तीन उपाय होत. ते तत्काळ फल देणारे व स्फूर्तिदायक आहेत.

श्रेष्ठ, शुद्ध अथवा निर्मल, आतल्याप्रमाणे बाहेरही उदित होणारा, अविनाशी, सर्वव्यापक, सर्वरूप, सर्वभाववस्तूंचा उत्पादक व विशेषत्वाने असणारा असा जो चित्प्रकाश किंवा चैतन्याचा प्रकाश आहे तोच **"लोक"** किंवा **"प्रकाश"** म्हणून जाणावा. त्यालाच आनंद असे म्हटले आहे.।।८३-८४।।

जेथे केवळ चित्प्रकाशाचे किंवा चैतन्यप्रकाशाचे अस्तित्व असते व जेथे यंत्रणेशिवाय म्हणजेच नियामकाशिवाय शरीरस्फुरण असते ते चैतन्यास्वादामध्ये चित्ताची एकरूपता झाल्यामुळे **"समाधिसुख"** म्हणविले जाते.।।८५।।

किंवा ग्रहण करणारा व ग्राह्य वर्ग म्हणजे प्रसरणयुक्त अर्थात् वाढणाऱ्या दोन पदांमध्ये असणारा स्वप्रमोद अथवा स्वानंद हेच समाधिसुख होय. ।।८६।।१८।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"लोकानन्दः समाधिसुखम्।।१८।।"** म्हणजे लोक्यते अर्थात् प्रकाशित केला जातो म्हणून "लोक" म्हणजेच वस्तूंचा समूह अर्थात् बाह्य जग होय. त्याचप्रमाणे "लोकयति" म्हणजेच पाहतो म्हणून "लोक" म्हणजेच ग्राहकवर्ग अर्थात् ग्रहण करणारे प्राणिमात्र होत. त्यांच्यामध्ये म्हणजे जग व प्राणिमात्र यांच्यामध्ये स्फुरत असताना ज्ञातृपदाच्या विश्रांतीच्या अनुसंधानामुळे उत्पन्न होणारा जो चमत्कारमय आनंद आहे तेच या सिद्धयोग्याचे समाधिसुख होय.।।१८।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

एवढेच नव्हे; तर **"लोकानन्दः समाधिसुखम्।।१८।।"** या सूत्र न्यायाने "अशा आत्मविज्ञानाने शोभणाऱ्या सिद्धयोग्याला लोकानंद म्हणजे समाधिसुख मिळते."।।८६।।

सिद्धयोग्याला लोक्य अर्थात् दृश्य, लोकयिता अर्थात् द्रष्टा व लोक अर्थात् दर्शन अशा प्रकाराने अचिद्रूप अर्थात् जडरूप अशा वस्तूंविषयी त्या त्या रूपाने स्फुरण होते.।।८७।।

ग्राह्य-ग्राहकाचे ज्ञान सर्व देहधारी जीवांना सामान्यतः असते; परंतु सिद्धयोग्याच्या बाबतीत ते जरा वेगळे असते. या त्रिपुटीच्या संबंधाच्या

बाबतीत तो ज्ञानपूर्वक सावधगिरी बाळगतो.।।८८।।

या वचनानुसार **"हे सर्व मी आहे"** अशा ज्ञानाचा जो आंतरिक आनंद सिद्धयोग्याला होतो त्यालाच **"समाधिसुख"** असे म्हणतात.।।८९।।

स्वात्म्यात रमणाऱ्या सिद्धयोग्याचे जे समाधिसुख असते तेच या मृत्यु-लोकात अंतर्मुख होणाऱ्या लोकांचा आनंद असतो.।।९०।।१८।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

लोकांचा आनंद हेच समाधिसुख कशा प्रकारे होते, हे **"लोकानन्दः समाधिसुखम्।।१८।।"** या सूत्रात सांगितले आहे. **"लोकानंद"** हे पद **"लोक"** या शब्दाने घटित आहे. लोक्यते अर्थात् दाखविले जाते म्हणून लोक आणि लोकयति अर्थात् पाहतात म्हणून लोक अशा **"लोक"** शब्दाच्या दोन व्युत्पत्तींनी **"लोक"** हा शब्द ग्राह्य व ग्राहकरूप अशा दोन अर्थांचा बोध करून देतो. अशा प्रकारे आत्म्याचे अनुसंधान करणाऱ्या योगनिष्ठ पुरुषाच्या चिदात्म्यात त्या त्या रूपाने ही दोन्ही तत्त्वे स्फुरण पावतात अर्थात् ग्राह्य व ग्राहक हे दोन रूपाने प्रकाशतात. सामान्य देह धारण करणाऱ्या लोकांना ग्राह्य व ग्राहक यांचे ज्ञान एकरूप किंवा एकमेकाशी अभिन्नस्व-रूपातच होत असते. उदाहरणार्थ - हा घट आहे. या घटाचे मला ज्ञान होत आहे; परंतु सिद्धयोग्यांचे मात्र हे ज्ञान विशेष प्रकारचे असते.

या दृष्टीने **"श्रीशिवदृष्टी"** या ग्रंथात श्रीसोमानंदपादाचार्य असे म्हणतात की -

**मदात्मना घटो वेत्ति वेद्म्यहं वा घटात्मना।।५.१०५।।**
**सदाशिवात्मना वेद्मि स वा वेत्ति मदात्मना।।५.१०५।।**
**नानाभावैः स्वमात्मानं जानन्नास्ते स्वयं शिवः।।५.१०८।।**

**अर्थ :-** घट म्हणजे मी आहे व मी म्हणजे घट आहे असे साधकभक्त-योगिशिष्याला ज्ञान होत असते. घट हा आपल्याला श्रीसदाशिवरूपात आणि श्रीसदाशिव आपल्याला घटरूपात जाणत असतो. अशा प्रकारे नाना प्रकारांनी भिन्न भिन्न पदार्थांच्या रूपात स्वात्म्याला किंवा स्वतःला जाणत स्वतः श्रीशिव बसलेले असतात.।।५.१०५,१०५ व १०८।।

त्याचप्रमाणे **"श्रीविज्ञानभैरव"** या ग्रंथामध्ये असे म्हटलेले आहे की -

**ग्राह्यग्राहकसंवित्तिः सामान्या सर्वदेहिनाम्।**
**योगिनां तु विशेषोऽयं सम्बन्धे सावधानता।।१०४।।**

**अर्थ :-** सर्व देहधाऱ्यांसाठी ग्राह्य व ग्राहकभावाचे ज्ञान सामान्य असते;

परंतु सिद्धयोग्यासाठी मात्र हे विशेष प्रकारचे असून तो या संबंधामध्ये सावधान असतो.।।१०४।।

सर्वसामान्य लोकांसाठी ज्ञातृ, ज्ञान व ज्ञेय हे निर्विशेष म्हणजेच कोणत्याही विशेष प्रकारांनी रहित असतात. परंतु महायोगाचा अर्थात् सिद्धयोगसाधनाचा आश्रय घेतलेल्या सिद्धयोग्यांसाठी आदि, अंत व मध्य अशा अवस्थांमध्ये प्रवेश करणारी व आपल्या ज्ञातृस्वरूपाचे कधीही विस्मरण होऊ न देणारी अशी सावधानता असते.

**"हे सर्व मीच आहे,"** अशा भावनेमुळे जो लोकोत्तर आनंद निर्माण होतो तोच योग्याचे समाधिसुख होय म्हणजे आपल्यातच रमणाऱ्या अशा महायोगनिष्ठ पुरुषांमध्ये जे समाधिसुख निर्माण होते त्या सुखात सामान्य प्राणिमात्रांचाही आनंद अंतर्भूत असतो. त्यामुळेच योग्यांना अनुभवाला येणाऱ्या समुद्राएवढ्या आनंदात कणरूपाने असणारा व साधारण लोकांच्या अनुभवाला येणारा आनंद अंतर्भूत होतो.।।१८।।

**विवरण :-** समाधिसुख म्हणजे ज्ञातेपणाच्या अखंड जाणिवेतून मिळणारा आनंद होय. **या सूत्रातल्या "समाधी" या शब्दाचा अर्थ मन थांबणे अथवा देहातीत अवस्था प्राप्त होणे असा नसून सर्व ज्ञानाचे ग्राहक असण्याची अखंड जाणीव होय.**

**"स्व"** किंवा **"आत्मा"** हा केवळ **"चित्"** नसून तो चिदानंदस्वरूप आहे. वस्तूंचे वरवर दिसणारे स्वरूप दुःखी किंवा क्लेशदायक दिसत असले तरीही विश्वाच्या अगदी आतल्या भागात एक विलक्षण ऐक्य आहे. तो आनंद, सुख अथवा ऐक्य हे जाणिवेचा अथवा चैतन्याचा गुणधर्म आहे. त्या चैतन्यापासूनच हे उभ्या व आडव्या विणीने विणलेले जगत् बनलेले आहे. जो साधकभक्तयोगिशिष्य या वरवरच्या भागाला किंवा दृश्याला भेदून आतला आनंद जाणू शकेल त्यालाच हा आनंद अथवा सुख पूर्णपणे मिळू शकेल; कारण त्याचा आत्मा म्हणजे दुसरे तिसरे काहीच नसून ते आनंददायक चैतन्य आहे.

या सूत्रात असे सांगितले आहे की, साधकभक्तयोगिशिष्याने स्वतःला एखाद्या खोलीत बंद करून आत्मानंद कसा असतो हे समजण्यासाठी त्या देहातीत अवस्थेत बुडी मारण्याची काहीही आवश्यकता नाही. जर त्याला प्रत्येक ज्ञानामध्ये अंतर्भूत असणारा ग्राह्य व ग्राहकभाव समजला तर त्याला हा आनंद सामान्य जीवनामध्येही अनुभवाला येऊ शकेल. ज्यावेळेला मनुष्य

एखादी वस्तू जाणतो त्यावेळेला बाह्य वातावरणात गुंतून तो पूर्णपणे बहिर्मुख होतो; परंतु जर प्रत्येक ज्ञान होण्याच्या प्रसंगी तो आत पाहील तर त्याला त्याच्या "**स्व**"ची जाणीव होईल. त्या एकमात्र "**स्व**" मुळेच ज्ञान होणे शक्य होते. त्या "**स्व**"च्या जणिवेत त्याला "**स्व**" चैतन्याचा शाश्वत आनंद घेता येतो. हाच कायम अस्तित्वात असणारा समाधीचा आनंद आहे.

त्याचप्रमाणे हा आनंद त्या सिद्धयोग्यापुरताच मर्यादित नसतो; कारण जे या सिद्धयोग्याला या अवस्थेत पाहतात त्या लोकांमध्ये तो सिद्धयोगी हा आनंद पसरवून टाकतो. त्याचा आनंद सांसर्गिक असतो. त्याचप्रमाणे ही समाधी म्हणजेच व्युत्थानदशा आहे. "**लोकानंद**" या शब्दाने दृश्य जगताचा आनंद हा अर्थ स्पष्ट केला जातो. त्याच्यात द्रष्टा, दृश्य आणि दर्शन ही त्रिपुटी असलीच पाहिजे. त्यामुळे हे व्युत्थानदशेचेच वर्णन आहे. या दशेमध्ये समाधिसुखाचा अभिप्राय योगदर्शनात सांगितलेला अध्यात्मप्रसाद समजला पाहिजे. येथे आणखी एक गोष्ट समजून घेतली पाहिजे की, अकाराव्या सूत्रात ज्या विशेष अवस्थेचे वर्णन केले आहे ती आत्मज्ञानापूर्वीची अवस्था आहे; परंतु या सूत्रात आत्मज्ञानासहित अवस्थेचे वर्णन केले आहे.।।१८।।

## सूत्र क्रमांक १९

**संबंध :-** आता अशा या सिद्धयोग्याच्या विभूतियोगांचे म्हणजेच सिद्धींचे वर्णन या सूत्रात केले आहे.

**शक्तिसन्धाने शरीरोत्पत्तिः।।१९।।**

**शब्दार्थ :- शक्तिसन्धाने** - (श्रीशिवसूत्रे १.१३ मध्ये उल्लेखलेल्या) शक्तीशी अनुसंधान केले किंवा दृढतेने तन्मय झाले असता अगर इच्छाशक्तीशी तन्मयी भाव झाल्यावर. **शरीरोत्पत्तिः** - योगी आपल्या इच्छेप्रमाणे हव्या त्या शरीराची निर्मिती करू शकतो.

**अर्थ :-** इच्छाशक्तीशी अर्थात् कुंडलिनी शक्तीशी तन्मयीभाव झाल्यावर जशी पाहिजे तशी शरीराची उत्पत्ती होते अर्थात् "**श्रीशिवसूत्रे १.१३**" मध्ये "**उमा कुमारी**" म्हणून उल्लेख असलेल्या इच्छाशक्तीशी अर्थात् कुंडलिनी शक्तीशी अनुसंधान करून संपूर्ण तन्मयता झाली की, त्या योगे तो सिद्धयोगी आपल्या इच्छेप्रमाणे हव्या त्या व हव्या तशा शरीराची उत्पत्ती करू शकतो. ।।१९।।

**विशेष व्याख्या :-** तेराव्या सूत्रात साधकभक्तयोगिशिष्याच्या पारमेश्वरी इच्छाशक्तीला क्रीडनशीला असे म्हटले आहे. यानुसार साधकभक्तयोगि-

शिष्याची इच्छा ज्यावेळेला व्यापकरूप धारण करते त्यावेळेला तो आंतर आणि बाह्यरूपामध्ये याच इच्छेच्या द्वारा कोणत्याही शरीराची उत्पत्ती करू शकतो. ही शक्ती त्याला स्वप्न आणि सुषुप्तीमध्येही सहजपणे प्राप्त होते.।।१९।।

**विवेचन :-** ही शक्ती "ज्ञानरूपा क्रियात्मिका" आहे. या दृष्टीने "**श्रीमृत्युंजय**" अर्थात् "**श्रीनेत्रभट्टारकतंत्र।।७.३६.४०।।**" चा आधार देऊन तिच्या निर्मितीची प्रक्रिया सांगितली आहे. "जर या सर्व विश्वाचे धारणकर्ते जे श्रीशिव त्यांची इच्छापूर्तीसाठी प्रार्थना केली तर ते साधकभक्तयोगिशिष्याचे मनोरथ "चंद्र व सूर्य" यांचे उदय करून पुरे करतात."

येथे "सोम व सूर्य" अथवा "चंद्र व सूर्य" यांचे "उपायांच्या" पातळीप्रमाणे भिन्न अर्थ होतात.

| उपाय | चंद्र-सूर्य यांचे अर्थ |
|---|---|
| १. आणवोपाय | : चंद्र (अपानशक्ती) व सूर्य (प्राणशक्ती). |
| २. शाक्तोपाय | : चंद्र (ज्ञानशक्ती) व सूर्य (क्रियाशक्ती). |
| ३. शांभवोपाय | : चंद्र अथवा सोम (विमर्श) व सूर्य (प्रकाश). |

ही "जाग्रत्-स्वातंत्र्या"ची अवस्था सिद्धयोग्याला स्वप्नात किंवा सुषुप्तीत म्हणजे गाढ झोपेत काही इच्छा झाल्यास त्याची तृप्ती कशी होते ते "स्वप्न-स्पंद-स्वातंत्र्य" वर्णन करताना श्रीवसुगुप्ताचार्यांनी सांगितले आहे.

त्याचप्रमाणे योगसाधना परिपक्व झालेल्या सिद्धयोग्यांच्या स्वप्नात सुद्धा जरी त्यांना काही पदार्थ हवेसे वाटले तरी ते पदार्थ न चुकता श्रीशिव प्रकाशमान करतात; कारण अशा प्रगत सिद्धयोग्यांच्या सुषुम्ना नाडीत ते श्रीशिव नेहमी अधिक स्पष्ट रीतीने प्रकट असतात व त्या सिद्धयोग्यांच्या संकल्पनात्मक इच्छेचे (प्रणय) ते अतिक्रमण करीत नाहीत.

सारांश, जर सिद्धयोग्याला जागृतावस्थेत किंवा स्वप्नातसुद्धा इच्छा झाली तर तिची पूर्तता होते.।।१९।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

"**शक्तिसन्धाने शरीरोत्पत्तिः।।१९।।**" या सूत्रात या आधी वर्णन केलेल्या सिद्धयोग्याचा विभूतियोग म्हणजेच अणिमादि ऐश्वर्याने जसे पाहिजे तसे विविध प्रकारच्या निर्माणसंपादनाचे सामर्थ्य सांगितले आहे.

"**इच्छाशक्तिरुमाकुमारी।।१.१३।।**" या सूत्राने त्या सिद्धयोग्याची जी शक्ती सांगितली आहे त्या शक्तीचे हा सिद्धयोगी ज्यावेळेला अनुसंधान करतो म्हणजेच दृढपणे अर्थात् अणिमादि अष्टसिद्धींच्या सामर्थ्याने यथेष्ट

निर्माण करण्याच्या वैचित्र्याच्या संपादनसामर्थ्याने त्या परमशाक्ततेजाशी तन्मय होतो त्यावेळेला त्या सामर्थ्याने या सिद्धयोग्याला जशी पाहिजे तशी अर्थात् ऐच्छिक शरीराची उत्पत्ती करता येते. दृढपणे म्हणजेच रुद्रशक्तीचे दुसरे नाव असणाऱ्या परशाक्तधामात समाविष्ट होऊन अव्युच्छिन्न अर्थात् अखंडपणे त्या विमर्शाच्या अभ्यासाने होय.

यासंबंधी "**श्रीमृत्युंजयभट्टारक**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**ततः प्रवर्तते शक्तिर्लक्ष्यहीना निरामया।**
**इच्छा सा तु विनिर्दिष्टा ज्ञानरूपा क्रियात्मिका।।७.३६।।**

**अर्थ** :- त्यानंतर लक्ष्यहीन व निरामय अशी शक्ती प्रवृत्त होते. ती इच्छाशक्ती असून ती ज्ञानरूप व क्रियात्मक आहे.

**स्पष्टीकरण** :- लक्ष्यहीन म्हणजेच वेद्य किंवा ज्ञेय यांनी रहित श्रेष्ठ स्फुरणाने युक्त व निरामय म्हणजे ज्या तत्त्वातून आमय म्हणजेच महामाया निघून गेलेली आहे अशी महामायादींना उल्लसविणारी शक्ती होय. त्या शक्ती-पासून द्वादशांतधाम प्रवर्तित होतात म्हणजेच इच्छा, ज्ञान व क्रियारूपाने क्रमाने स्फुरतात असा याचा अर्थ आहे.

"**श्रीमृत्युंभट्टारक**" या ग्रंथातील वरील श्लोकाने या विषयाचा आरंभ करून पुढील श्लोकाने त्याचा शेवट केला आहे.

**सा योनिः सर्वदेवानां शक्तीनां चाप्यनेकधा।**
**अग्नीषोमात्मिका योनिस्तस्यां सर्वं प्रवर्तते।।७.४।।**

**अर्थ** :- ही शक्ती सर्व देवांची त्याचप्रमाणे अनेक प्रकारच्या शक्तींची कारण आहे. ही सर्व देवांची अग्निषोमात्मक अर्थात् अग्नी आणि चंद्र यांनी युक्त अशी योनी आहे. त्यामुळे तिच्यापासूनच सर्व विश्वाची निर्मिती होते.

**स्पष्टीकरण** :- ज्याला परतत्त्वाचे अभेद ज्ञान झालेले आहे अशा साधकभक्तयोगिशिष्यामध्ये जी शक्ती उत्पन्न होते तिला पराशक्ती असे म्हणतात. ती सर्वदेवांची म्हणजेच श्रीसदाशिव, श्रीईश्वर व श्रीरुद्र इत्यादि देवांची आणि शक्तींची म्हणजेच वामाज्येष्ठादि व ब्राह्म्यादि शक्तींची अग्निषोमात्मक योनी किंवा कारण आहे. त्यामुळेच ती सोमप्रधान आहे. त्या अग्निषोमात्मक शक्तीपासूनच हे सर्व विश्व प्रवर्तित होत असल्यामुळे अग्नी व सोम यांनी युक्त अशी प्रकृती असणारे हे विश्व अग्नी व सोममय आहे. त्याचप्रमाणे अग्नीसुद्धा आह्लाद देतो आणि बर्फही जाळते असे तत्त्वज्ञानी म्हणतात. अशा प्रकारे शक्तीचे सृष्टी, स्थिती आणि संहार यांचे कर्तृत्व सांगितले. अग्नी आणि सोम

यांचा शब्दशः अर्थ आग आणि चंद्र असा आहे; परंतु या ठिकाणी असा अर्थ घ्यावयाचा नाही. अग्नी आणि सोम यांचा येथे प्रतीकात्मक अर्थ आहे. अग्नी म्हणजे प्राणशक्ती आणि सोम म्हणजे अपानशक्ती होय. प्राण आणि अपान या शक्ती प्राण आणि अपान वायूंशी संबंधित आहेत. प्राण हा उच्छ्वास असून अपान हा श्वास आहे.

शक्तीचे अनुसंधान करणे हे किती आवश्यक आहे हे **"श्रीलक्ष्मी-कौलार्णव"** या ग्रंथात पुढीलप्रमाणे सांगितले आहे.

**न सन्धानं विना दीक्षा न सिद्धीनां च साधनम्।**
**न मन्त्रो मन्त्रयुक्तिश्च न योगाकर्षणं तथा।।**

**अर्थ :-** संधानाशिवाय दीक्षा नाही, सिद्धींचे साधनही नाही, मंत्र नाही, मंत्रयुक्ती नाही आणि योगाकर्षणही नाही.

**स्पष्टीकरण :-** जरी मंत्र आदींनी जशी पाहिजे तशी शरीराची उत्पत्ती होताना दिसत असली तरीही ती स्वाभाविक नसते; कारण ती उत्पत्ती व्यभिचारात्मक किंवा कृत्रिम असते. त्यामुळे संधान किंवा अनुसंधान हेच अन्य शरीरांच्या उत्पत्तीचे कारण आहे असा याचा भावार्थ आहे.

हाच अर्थ **"श्रीस्पंदशास्त्र"** या ग्रंथातील पुढील कारिकेत संगृहीत केला आहे.

**यथेच्छाभ्यर्थितो धाता जाग्रतोऽर्थान्हृदि स्थितान्।**
**सोमसूर्योदयं कृत्वा सम्पादयति देहिनः।।४.३३।।**

**अर्थ :-** देहाभिमानी सवासन योग्याच्या हृदयात असलेल्या वेगवेगळ्या निर्माणरूप विषयांना धाता म्हणजेच श्रीमहेश्वर प्रकाशानंदरूपाने व सोमसूर्यरूप प्राणापानांच्या विकासाने सोमसूर्यांच्या सामरस्यमयशक्तीला म्हणजे जीवनप्रद शरीरव्यापक समान शक्तीला चालना देऊन त्यांना बाहेर वाट फोडून निर्मिती करतो.।।४.३३।।

याचाच अर्थ असा आहे की, ज्याप्रमाणे धाता अर्थात् प्रत्येक प्राण्याच्या अंतर्हृदयामध्ये राहत असलेली चिच्छक्ती देहाभिमानामध्ये असलेल्या; परंतु नियमित रूपाने योगाभ्यास करणाऱ्या योग्याच्या द्वारा संकल्पात्मक इच्छेच्या रूपाने असणारी प्रार्थना केली असता सोमसूर्य अर्थात् दोन्ही नेत्रांमध्ये अत्यंत तीव्र अशा अवधानात्मक शक्तीचा उदय करवून साधकभक्तयोगिशिष्याला जे पदार्थ हृदयात पाहावयाची इच्छा असेल त्या पदार्थाचे दर्शन जागृत अवस्थेमध्ये करवीत असते.

या ठिकाणी सोम व सूर्य हे प्रतीकात्मक शब्द आहेत. चंद्र अथवा सोम अपान शक्तीचे प्रतीक असून सूर्य प्राणशक्तीचे प्रतीक आहे. हे आणवोपायाशी संबंधित आहे. शाक्तोपायाच्या संबंधामध्ये चंद्र किंवा सोम हे ज्ञानशक्तीचे प्रतीक आहे तर सूर्य हे क्रियाशक्तीचे प्रतीक आहे. शांभवोपायामध्ये सोम विमर्शाचे प्रतीक आहे तर सूर्य हा प्रकाशाचे प्रतीक आहे.

हाच अर्थ "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील कारिकेत पुढीलप्रमाणे व्यक्त केला आहे.

**तथा स्वप्नेऽप्यभीष्टार्थान् प्रणयस्यानतिक्रमात्।**
**नित्य स्फुटतरं मध्ये स्थितोऽवश्यं प्रकाशयेत् ।।४.३४।।**

**अर्थ :-** त्याचप्रमाणे प्राण्यांच्या अंतर्हृदयामध्ये असलेली ही चिच्छक्ती परिपक्व सिद्धयोग्यांना स्वप्नावस्थेमध्येही इच्छित पदार्थांचा साक्षात्कार करवीत असते. याचे कारण असे आहे की, ही चिच्छक्ती या स्तरावरील सिद्धयोग्यांच्या मध्यधामामध्ये अर्थात् सुषुम्नाधामामध्ये प्रतिक्षण स्फुटतर रूपामध्ये प्रकाशमान राहत असते आणि त्यांच्या अर्थात् सिद्धयोग्यांच्या प्रणयाचे म्हणजेच संकल्पात्मक अभ्यर्थनेचे कधीही अतिक्रमण करीत नाही.।।४.३४।।

अशा प्रकारे या श्लोकात सांगितलेला स्वप्नस्वातंत्र्य हा प्रति दृष्टान्त योजला आहे, हे स्पंदनिर्णयात मीच दाखविले आहे.।।१९।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

"**शक्तिसन्धाने शरीरोत्पत्तिः।।१९।।**" म्हणजे "अशा प्रकारे स्वतंत्र सिद्धयोग्याला आपल्या इच्छेप्रमाणे वाटेल ते करता येते." अकृत्रिम अथवा सहज फलाच्या बाबतीत तो स्वतंत्र असतो; कारण पशूमध्ये क्रियाशक्ती असते पण ती बंधनकारकअसते. मात्र ती सिद्धयोग्यांच्या स्वाधीन असते.।।८७,८७.५।।

हा शक्तियुक्त सिद्धयोगी उपादानसामग्रीवाचूनच स्वेच्छेने अंतःस्थित सर्व वस्तूंचे बाहेर प्रकाशन करतो. या शक्ती म्हणजे इच्छा, ज्ञान व क्रिया असून या तीन शक्ती धरून पाच शक्ती सांगितल्या आहेत.।।८८,८८.५।।

ईशानी, आपूरणी, हार्दी, वामा आणि मूर्ती या त्या शक्ती आहेत. त्याचप्रमाणे विज्ञानदेहा नावाची या शक्तींच्या मागोमाग जाणारी एक शक्ती आहे. या शक्तींच्या देह निर्माण करण्याच्या प्रक्रियेला संधान असे म्हणतात.।।८९,९०।।

हे संधान केले की पशू, मनुष्य व देव यांची यथायोग्य शरीरे निर्माण होतात.।।९१।।

अशा प्रकारे या संधानाचे सर्वत्र अक्षय्य आणि अखंडित असणारे

कर्तृत्व आहे. त्याचप्रमाणे आलोक असतानाही कार्याचा क्षय येथे निरूपित केला आहे अर्थात् हे संधान उत्पन्न केलेल्या शरीरांचा क्षयही करू शकते.।।९२।।

**विवरण :-** चित्स्वरूप शक्तिमान् सिद्धयोगी शक्तिरूप पदार्थांच्या उपादानकरणादि साहित्याशिवाय स्वत:वरच स्वेच्छेने आत्मप्रकाशाशी एकरूप झालेले वस्तुसमुदाय उकलून दाखवितो किंवा प्रकट करतो. पूर्वोक्त स्वातंत्र्यशक्तीला तादात्म्याने परामृष्ट करून म्हणजे स्वातंत्र्यशक्तीशी एकरूप होऊन हा स्वतंत्र सिद्धयोगी यथेच्छ विलक्षण शरीराची रचना करतो.।।१९।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**शक्तिसन्धाने शरीरोत्पत्तिः।।१९।।**" म्हणजे "पूर्वी सांगितलेल्या सिद्धयोग्याची इच्छाशक्तीशी तन्मयता दृढ झाल्यावर त्या इच्छाशक्तीच्या सामर्थ्याने सिद्धयोग्याला वाटेल तसे शरीर धारण करता येते."।।१९।।

**श्रीवरदराज वार्तिक :-**

"**शक्तिसन्धाने शरीरोत्पत्तिः।।१९।।**" या सूत्राद्वारा श्रीशिव सिद्धयोग्याचा विभूतियोग अर्थात् ऐश्वर्ययोग सांगतात.।।९०.५।।

मागील सूत्रातून "**इच्छाशक्तीरुमा**" इत्यादि जे सांगितले त्या शक्तीशी तन्मयभावना केली किंवा साधली की, त्या शक्तीच्या सामर्थ्याने सिद्धयोग्याची जशी इच्छा असेल तशी शरीरे त्याला धारण करता येतात.।।९१-९२.५।।१९।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

आता "**शक्तिसन्धाने शरीरोत्पत्तिः।।१९।।**" या सूत्रात अणिमादि आठ ऐश्वर्याने जशा पाहिजे तशा वस्तू निर्माण करण्याची सिद्धयोग्याची विलक्षण संपादनशक्ती सांगितली आहे. पूर्वी "**इच्छाशक्तिरुमाकुमारी।।१.१३।।**" या सूत्रात सांगितल्याप्रमाणे या प्रक्रियेने त्या शक्तीच्या निरंतर भावनेने जशी भावना असेल तशा प्रकारच्या वस्तूंचे संधान झालेले असते. त्यामुळे हा सिद्धयोगी जशा प्रकारच्या स्वत:च्या शरीराची इच्छा करतो तशा प्रकारच्या शरीराची उत्पत्ती होते.

"**श्रीलक्ष्मीकौलार्णव**" या ग्रंथात शक्तिसंधानाचे रहस्य पुढीलप्रमाणे सांगितले आहे.

**न सन्धानं विना दीक्षा न सिद्धीनां च साधनम्।**
**न मन्त्रो मन्त्रयुक्तिश्च न योगाकर्षणं तथा।।**

**अर्थ :-** संधानाशिवाय दीक्षा, सिद्धींचे साधन, मंत्र, मंत्रयुक्ती व योगाकर्षणही होत नाही.

त्यामुळे संधानच इतर देहांच्या उत्पत्तीसाठी निमित्त असते.

उमाकुमारीरूप इच्छेच्या शक्तिसामर्थ्याने भावना करणाऱ्या योगनिष्ठ पुरुषाच्या बाबतीत कोणतीही गोष्ट दुर्घट नाही.

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथामध्ये श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी असे म्हटले आहे की -

**यथेच्छाभ्यर्थितो धाता जाग्रतोऽर्थान्हृदि स्थितान्।**
**सोमसूर्योदयं कृत्वा सम्पादयति देहिनः।।४.३३।।**

**अर्थ :-** देहाभिमानी सवासन योग्याच्या हृदयात असलेल्या वेगवेगळ्या निर्माणरूप विषयांना धाता म्हणजेच श्रीमहेश्वर प्रकाशानंदरूपाने सोमसूर्यरूप प्राणापानांच्या विकासाने सोमसूर्याच्या समरसमय शक्तीला म्हणजे जीवनप्रद शरीरव्यापक समान शक्तीला चालना देऊन त्यांना बाहेर वाट फोडून निर्मिती करतो.।।४.३३।।

याचाच अर्थ असा आहे की, ज्याप्रमाणे धाता अर्थात् प्रत्येक प्राण्याच्या अंतर्हृदयामध्ये राहत असलेली चिच्छक्ती देहाभिमानामध्ये असलेल्या; परंतु नियमित रूपाने योगाभ्यास करणाऱ्या योग्याच्या द्वारा संकल्पात्मक इच्छेच्या रूपाने असणारी प्रार्थना केली असता सोमसूर्य अर्थात् दोन्ही नेत्रांमध्ये अत्यंत तीव्र अशा अवधानात्मक शक्तीचा उदय करवून सिद्धयोग्याला जे पदार्थ हृदयात पाहावयाची इच्छा असेल त्या पदार्थांचे दर्शन जागृत अवस्थेमध्ये करवीत असते।।४.३३।।

भावपदार्थ हे शक्तिस्वरूप असतात. त्यांचा निरुपादानादि सामग्रीसमूह हा "**स्व**" भिंतीवर भासविण्याच्या हेतूमुळे तशा प्रकारच्या विशिष्ट शक्तीने युक्त असा चिदात्मस्वरूपच होतो. त्यामुळे स्वतःच्या इच्छेने स्वात्म्यात प्रकाश-ऐक्यापासून अस्तित्वात येणाऱ्या पदार्थांचा समूह विकसित होतो. अशा स्थितीत पूर्वी सांगितलेल्या स्वातंत्र्यशक्तीचे तादात्म्यभावनेने अनुसंधान करणारा स्वाधीन असा हा सिद्धयोगी स्वतःच्या इच्छेनुरूप किन्नर, मनुष्य व देव अशी विलक्षण शरीरोत्पत्तीची रचना करतो.।।१९।।

**विवरण :-** या सूत्रात असे सांगितले आहे की, इच्छाशक्तीने युक्त असणारा सिद्धयोगी हा काही विभूती अथवा दिव्य शक्ती निर्माण करू शकतो. त्या शक्तींच्या सामर्थ्याने त्याच्या इच्छेप्रमाणे कोणत्याही प्रकारचे शरीर तो निर्माण करू शकतो; परंतु ही गोष्ट लक्षात घेणे आवश्यक आहे की, इच्छा अथवा पराशक्तीशी युक्त होऊनच तो सिद्धयोगी या गोष्टी करू शकतो.

श्रीस्पंदशास्त्रातील कारिका उद्धृत करून श्रीक्षेमराजाचार्यांनी हा सिद्ध-योगी इच्छेनुरूप निर्मिती कशा प्रकारे करू शकतो हे सांगितले आहे. तो त्याच्या जागृत अवस्थेत त्याला इच्छा झालेल्या वस्तूच्या सिद्धीसाठी परा-शक्तीची प्रार्थना करतो. त्यानंतर ज्यावेळेला तो समाधीत जातो त्यावेळेला त्याचे प्राण आणि अपान हे त्याच्या शरीराचे कार्य करण्याचे थांबवितात; परंतु ज्यावेळेला तो समाधीतून खाली उतरतो त्यावेळेला परत त्याचे प्राण आणि अपान हे त्याच्या शरीराची सर्व कार्ये करू लागतात. त्यावेळेला त्याच्या असे लक्षात येते की, त्याने ज्या वस्तूसाठी प्रार्थना केली होती ती वस्तू तो ज्या शक्तीने युक्त आहे त्या शक्तीने सिद्ध केली आहे. जर सिद्धयोगी स्वप्नावस्थेत काही असामान्य गोष्ट अनुभविण्याची इच्छा करीत असेल तर तीही इच्छा सिद्धयोगी ज्या शक्तीशी संबंधित आहे त्या दिव्य शक्तीकडून पूर्ण केली जाते.।।१९।।

**सूत्र क्रमांक २०**

**संबंध :-** या सूत्रात सिद्धयोग्याला मिळणाऱ्या आणखी सिद्धींचे वर्णन केले आहे.

**भूतसन्धानभूतपृथक्त्वविश्वसङ्घट्टाः।।२०।।**

**शब्दार्थ :- भूत** - झालेले, अस्तित्वात असलेले शरीर, प्राण, वस्तुजात इत्यादि. **सन्धान** - परिपोषण करण्यासाठी किंवा वृद्धी करण्यासाठी जोडणे अगर एकत्र आणणे. **भूतसन्धान** - परिपोषण किंवा वृद्धी करण्यासाठी जोडणे किंवा एकत्र आणणे हा एक सिद्धीचा प्रकार. **भूतपृथक्त्व** -शरीर किंवा वस्तुजात विभक्त करण्याचे सामर्थ्य. **विश्व** - सर्व वस्तू व घटना इत्यादि. **सङ्घट्ट** - एकत्र आणणे. **विश्वसङ्घट्ट** - स्थल व काल यानी विभक्त केलेल्या किंवा स्थल व काल भिन्न असलेल्या व्यक्ती, वस्तू व घटना एकत्र आणण्याचे सामर्थ्य किंवा विश्वात्म्याच्या बरोबर समरसता प्राप्त झाल्यावर आपले शरीर एकाचवेळी एकापेक्षा अधिक स्थानांमध्ये प्रकट करणे या सारख्या अनेक सिद्धी असणे.

**अर्थ :-** या सिद्धयोग्याच्या देह, प्राण व पुर्यष्टकादींचे पोषण अथवा त्यांना साहाय्यता करणे, देहादींचे वेगळेपण आणि विश्वात्म्याबरोबर एकी-भाव झाल्याने आपल्या शरीराला एकापेक्षा अधिक स्थानी एकाच वेळेला प्रकट करणे अशा आणखी सिद्धी आहेत अर्थात् योगसामर्थ्याने आणखी पुढील प्रकारच्या सिद्धी सिद्धयोग्याला प्राप्त होतात.।।२०।।

(१) आप्यायन म्हणजे परिपोषण करण्यासाठी संहिती करण्याची अथवा एकत्रीकरणाची शक्ती. उदाहरणार्थ भिन्न शरीरे किंवा वस्तू एकत्र करणे.

(२) पृथक्करण किंवा विभक्त करण्याचे सामर्थ्य. उदाहरणार्थ व्याधीचा उपशम करण्यासाठी शरीर वगैरेंपासून अवयव वेगळे काढता येणे.

(३) भावी किंवा भूतकाळातील विशिष्ट स्थळी किंवा इतरत्र झालेल्या घटना सिद्धयोग्याला वर्तमान काळात तो असेल त्या स्थळी ज्ञात होणे.

**विशेष व्याख्या :-** मागील सूत्रांमधून ज्याचे वर्णन केले आहे असा सिद्धयोगी विश्वात्मस्वरूपाचा अनुभव करीत देह व प्राण आदींची साहाय्यता करण्याला समर्थ होतो. तो व्याधी आदि क्लेश शांत करण्यासाठी देहादींपासून थोड्या कालावधीसाठी वेगळा होतो आणि वेगवेगळ्या जागांवर एकाच वेळेला आपले शरीर प्रकट करतो. विश्वमय दशेत या काही परिमित सिद्धी आहेत. या सिद्धींची काही उदाहरणे खाली दिली आहेत.

**(१)** जर सिद्धयोग्याचे शरीर वृद्ध असेल आणि तरुण साथीदारांबरोबर त्याला एखाद्या पर्वतावर चढावयाचे असेल तर अशा स्थितीत तरुण माणसे साहजिकच कमी त्रासात पर्वतावर चढू शकतात. परंतु देहप्राणादींना मदत करण्याला समर्थ असलेल्या सिद्धयोग्यामध्ये असे सामर्थ्य असते की, देहादींना वेगळे करून विश्वात्म्यात समरस होण्याच्या युक्तीने वृद्ध देह असूनही तो पर्वतावर अनायासानेच चढून जातो. देहाची शिथिलता त्याला कोणत्याही प्रकारे बाधा किंवा अडथळा आणू शकत नाही.

**(२)** जर सिद्धयोग्याचे शरीर प्रारब्धकर्मानुसार एखाद्या रोगाने ग्रस्त झाले असेल आणि त्याच वेळेला त्याला एखादे कर्तव्य करावयाचेच असेल; परंतु असे असताना तो रोग जर त्याला अडथळा आणीत असेल तर तो सिद्धयोगी त्या व्याधीला काही काळापर्यंत शांत करू शकतो. व्याधीला शरीरापासून काही काळापर्यंत वेगळे करून कार्यसिद्धी झाल्यावर परत त्या व्याधीचे प्रारब्धभोगासाठी ग्रहण करतो.

असे ऐकण्यात आहे की, एक सिद्धयोगी आपल्या आसनावर बसून स्वरूप-चिंतनात मग्न होते. त्यांच्या जवळच एक रजई पडली होती. ती आपोआपच थरथरत होती. एक भक्त आल्यानंतर त्या सिद्धयोगिमहाराजांनी डोळे उघडले आणि ती रजई आपल्या अंगावर घेतली. त्याबरोबरच त्या सिद्धयोगिमहाराजांच्या अंगाला कंप सुरू झाला. ते पाहून आश्चर्यचकित झालेल्या त्या भक्ताने सिद्धयोगिमहाराजांना असे विचारले की, "महाराज ! हे

मी काय पाहत आहे ? आपण आता तर चांगले होता; परंतु ज्या क्षणी आपण रजई अंगावर घेतली त्या क्षणी आपले शरीर तापाने थरथर कापत आहे." हा प्रश्न ऐकताच ते त्या भक्ताला असे म्हणाले की, "प्रियवर ! प्रारब्धानुसार हे शरीर रोगग्रस्त आहे. ज्वराने पीडित असल्यामुळे ते कापत होते. ईश्वराचे भजन शांततेत व्हावे म्हणून या व्याधीला मी काही काळासाठी रजईत ठेवले होते."

**(३)** योगिराज भगवान् श्रीकृष्णांच्या विश्वमयदशेचे वर्णन आपल्याला पुराणांमध्ये दिसून येते. ते एकाच वेळेला अनेक स्थानी आपले दिव्य शरीर प्रकट करीत असत. रासक्रीडा करीत असताना प्रत्येक गोपीबरोबर एक एक श्रीकृष्ण नृत्य करीत असत आणि मध्ये श्रीराधेबरोबर मुरली वाजवीत असत.।।२०।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

"सिद्धयोग्याला इच्छित असलेल्या अन्यही सिद्धी याच संधानमाहात्म्याने प्राप्त होतात," हे "**भूतसन्धानभूतपृथक्त्वविश्वसङ्घट्टाः।।२०।।**" या सूत्रात सांगितले आहे.

भूते म्हणजे स्व-शरीरप्राणेंद्रियादि पदार्थ होत. त्यांना पुष्ट वगैरे करणे हेच संधान होय. व्याधी इत्यादींना शांत करण्यासाठी अर्थात् त्या व्याधी शरीरापासून वेगळे करणे म्हणजेच शरीरादींचे विश्लेषण म्हणजे भूतांचे व्याधींपासून विश्लेषण किंवा वेगळे काढणे होय. देशकालादिकांनी दूर, लहान व मोठ्या अशा विश्वाचे ज्ञान होणे आणि दिसणे म्हणजेच विश्वाचे संघट्ट होय. नित्य, विभू, स्वतंत्र आणि चिन्मात्र असे स्वरूप हे देशकालादि मर्यादांनी विरहित आहे. सिद्धयोग्यांमध्ये अशा चिन्मात्रस्वरूपाचा समावेश झालेला असल्यामुळे तेही त्या चिन्मात्रस्वरूपाप्रमाणे होतात. चिन्मात्रस्व-रूपाच्या विरुद्ध गुण त्यांच्यामध्ये दिसत नाहीत. हे शक्तिसंधानाने साधते. हा विषय सर्वागमातील साधनाधिकारामध्ये आला आहे.

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथामधील पुढील कारिकांमध्येही या विषयाचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे.

**दुर्बलोऽपि तदाक्रम्य यतः कार्ये प्रवर्तते।**
**आच्छादयेद्बुभुक्षां च तथा योऽतिबुभुक्षितः।।४.३८।।**

**अर्थ :-** दुर्बल म्हणजे क्षीणधातूमुळे कृश झालेला मनुष्य स्पंदतत्त्वाच्या आश्रयाने कार्याला प्रवृत्त होतो. तो भुकेला शांतही करू शकतो आणि

वाढवूही शकतो. (या कारिकेत बुभुक्षानिवृत्ती ही सुद्धा सिद्धींमध्ये गणली आहे.)

याचाच अर्थ असा आहे की, ज्याप्रमाणे दुर्बल शरीराची व्यक्ती कोण-तेही अशक्य कार्य आवेशामध्ये करून टाकण्याच्या परिस्थितीमध्ये अलक्ष्य आत्मबलाच्या प्रेरणेने करण्याला प्रवृत्त होते व त्यात यश मिळविते त्याच-प्रमाणे परिपक्व सिद्धयोगी शरीर अत्यंत निर्बल झाले तरीही स्पंदात्मक आत्मबलावर आरूढ होऊन मोठमोठी दुष्कर कामे सहजपणे करीत असतो आणि अत्यंत भुकेलेला असतानाही आपल्या भुकेला इच्छित काळापर्यंत नियंत्रणामध्ये ठेवू शकतो. (येथे "क्षुधा" हा शब्द सर्व देहधर्मांचे प्रतीक आहे. याचाच अर्थ असा आहे की योग्याला क्षुधा, निद्रा, स्त्रीचिंता इत्यादि देहधर्म विचलित करू शकत नाहीत.।।४.३८।।

**ग्लानिर्विलुण्ठिका देहे तस्याश्चाज्ञानतः सृतिः।**
**तदुन्मेषविलुप्तं चेत् कुतः सा स्यादहेतुका।।४.४०।।**

**अर्थ :-** मानसिक उदासीनता ही साधकभक्तयोगिशिष्याच्या शरीरा-मधील धातू, सामर्थ्य, उत्साह, तेज इत्यादि सर्व चोर-दरोडेखोराप्रमाणे लुटून नेते. मानसिक औदासीन्य किंवा ग्लानी ही स्वतः अज्ञानामुळे प्रसार पावत असते. उन्मेषाच्या अर्थात् ज्ञानोदयाच्या द्वारा अज्ञानाचा समूळ उच्छेद झाल्यावर अज्ञान हे कारण न उरल्याने ग्लानी उत्पन्न होणे कसे शक्य आहे?।।४.४०।।

(या कारिकेतील "तत्" हे पद "अज्ञान" या अर्थी आले आहे. "सा" हे पद "ग्लानी" या अर्थी आले आहे. तिचे कारण म्हणजे अज्ञान होय. त्यामुळे सिद्धयोग्यांच्या ठिकाणी शरीराची गलितगात्रता यांचा अभाव आणि शरीराचे दृढत्व असते. "ग्लानिर्विलुम्पिका देहे" असा मूळ पाठ आहे.)

**यथा ह्यर्थोऽस्फुटो दृष्टः सावधानेऽपि चेतसि।**
**भूयः स्फुटतरो भाति स्वबलोद्योगभावितः।।४.३६।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे एखादा दूर असलेला पदार्थ माणसाने जरी लक्ष-पूर्वक सावधान मनाने पाहिला तरी पहिल्या नजरेमध्ये तो अस्पष्ट दिसतो; पण विशेष प्रयत्न करून आत्मबळाच्या साहाय्याने परीक्षण केले असता तो पुन्हा अधिक स्पष्ट दिसतो.।।४.३६।।

**विवरण :-** स्वबलोद्योग म्हणजे संविद्बलप्रयत्न अर्थात् जागृत कुंडलिनी शक्तीकडून होणारा प्रयत्न होय.

**तथा यत्परमार्थेन यदा यत्र यथा स्थितम्।**

**तत्तथा बलमाक्रम्य न चिरात् सम्प्रवर्तते।।४.३७।।**

**अर्थ :-** त्याप्रमाणे अर्थात् तसाच प्रयत्न केला असता सिद्धयोग्याला स्पंदात्मक आत्मबलावर आरूढ होण्याच्या अवस्थेमध्ये अल्प काळातच ते सर्व पदार्थ त्रैलोक्यात कोठेही असले तरी जसे आहेत त्या अवस्थेत दिसू लागतात.।।४.३७।।

अशा प्रकारे हा विषय "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथाच्या विभूतिस्पंदात कार्यकारणसंबंधपूर्वक वर्णित केला आहे.।।२०।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

मागील सूत्रातून वर्णन केलेल्या सिद्धयोग्याच्या स्वातंत्र्याचे वैभव सांगण्यासाठी त्याची यथेच्छ क्रीडा सांगणारे "**भूतसन्धानभूतपृथक्त्वविश्वसङ्घट्टाः ।।२०।।**" हे सूत्र भगवान् श्रीशिवांनी सांगितले आहे अर्थात् "आकाशादि महाभूतनिर्मिती, त्याचेच पृथक्करण व विश्वाचा पसारा तो सिद्धयोगी आपल्या स्वातंत्र्यशक्तीने निर्माण करू शकतो."।।९३,९३.५।।

**विवरण :-** हा जो चिदात्म्याचा शुद्धमार्गाला उपादानकारण असलेला, अत्यंत स्पष्ट असा चित्, आनंद, इच्छा, ज्ञान व क्रिया या पाच शक्तींचा समूह आहे तोच अधस्तनमार्गातील पंचपंचक रूपाने अर्थात् पंचवीस या संख्येने तत्त्वोत्पत्तीला कारणीभूत आहे. त्याचप्रमाणे आकिंचत्यदशेचे अर्थात् स्वामित्वाच्या इच्छेचे प्रकाशन होत असताना मायेचा आश्रय केलेल्या संकुचित स्वशक्तीच्या साहाय्याने चिदात्म्याने "पुरुष" तत्त्वाची भूमिका स्वीकारली. चिदादि शक्तिपंचक हे उपभोगासाठी त्याचे कंचुक म्हणजे आवरणासारखे असते. त्याला अनुसरून पुढील तत्त्वोत्पत्तीसाठी इच्छादि शक्तित्रयांनी युक्त प्रकृतीच्या त्रिगुणांच्या साम्यावस्थेतील स्वीकाराने त्या पुरुषाला पुर्यष्टकभावाची प्राप्ती होते. मन, बुद्धी व अहंकार ही तीन तत्त्वे इच्छा, ज्ञान व क्रिया यांपासून निर्माण झाली. चिदादि शक्तिपंचकाच्या अनुषंगाने ज्ञानशक्तिप्राधान्यामुळे ज्ञानेंद्रियोत्पत्ती होते. क्रियाशक्तीच्या प्राध्यान्याने कर्मेंद्रियोत्पत्ती होते. बाह्यदृष्ट्या स्थूलभावाने शब्दादि विषयांसह आकाशादि भूतोत्पत्ती होते. अशा रीतीने भिन्न भिन्न प्रकारे विश्वरचना अर्थात् विश्वसंघट्ट होते. तसेच त्या तत्त्वांमध्ये अनुगत म्हणजे त्या तत्त्वांना अनुसरून असलेले एक सामान्यप्रकाशस्वरूपी, भिन्नांमध्ये अभिन्न व विलक्षण पुर्यष्टक भूमिकांच्या अर्थात् भिन्न शरीरांच्या आश्रयाने म्हणजे धारणेने हे विश्वाचे नाटक हा चिदात्मा करतो. हे त्याचे इष्ट म्हणजे आवडत्या खेळाचे

स्फुरण किंवा प्रात्यक्षिक समजावे.

शब्द हा आकाशाचा गुण असून तो शक्त्यादि अवयवांनी आकाशादि भूतांची निर्मिती करतो म्हणजेच भूतसंधान होय. आकारभिन्नतेच्या दृष्टीने प्रत्येक भूतांशी स्व-अस्तित्व व प्रतिभूतांचा वेगळेपणा म्हणजे पृथक्त्व होय. हा सिद्धयोग्याच्या क्रियाशक्तीचा श्रेष्ठ अंश होय. वृत्ती म्हणजे असणे किंवा वागणे, आल्हाद, प्रकाश व स्पर्श यांचा अनुभव म्हणजे ज्याला ज्ञान आहे अशा चैतन्यरूपाने व्यापून असणाऱ्या सिद्धयोग्याच्या ज्ञान व क्रिया या दोन्ही गोष्टी सूर्य व चंद्र असून त्या प्रकाशक आहेत. आकारयुक्त चार भूते म्हणजे व्यापक चैतन्याच्या क्रियेतील मिश्रण होय. पुर्यष्टकाचे एकीकरण म्हणजेच विश्व समजावे.।।९४ ते ९८।।२०।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**भूतसन्धानभूतपृथक्त्वविश्वसङ्घट्टाः ।।२०।।**" म्हणजे पूर्वी सांगितलेले शक्तिसंधान साधले की, भूत म्हणजे मानवजीवांचे शरीरप्राणादींचे पोषण करणे म्हणजे संधान होय. त्याप्रमाणेच सिद्धयोगी त्यांना झालेल्या व्याध्यादि पीडांना त्यांच्या शरीरापासून दूर करू शकतात व देशकालादिकांनी दूर असणाऱ्या विश्वाला जाणू शकतात अथवा पाहू शकतात. याचे तात्पर्य असे आहे की, मानवादि जीवांवर अनेक उपकार करण्याचे सामर्थ्य इच्छाशक्तीने सिद्धयोग्यांना प्राप्त होते.।।२०।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**भूतसन्धानभूतपृथक्त्वविश्वसङ्घट्टाः ।।२०।।**" या सूत्रात पूर्वी वर्णन केलेल्या व्यतिरिक्त इतरही सिद्धी सिद्धयोग्याला प्राप्त होतात असे सांगितले आहे.।।९२.५।।

आकाशादिभूते, देह, बुद्धी व प्राणरहित भूते, ग्रहणशक्ती असलेले, ग्राह्य होणारे व वृक्षपाषाणादि यांचे संधान म्हणजे परिपोषण करणे, त्याचप्रमाणे व्याधी आदि दु:खे दूर करण्यासाठी पंचभूतांचे विभाजन करणे, देशकालादि दृष्ट्या दूर असलेल्या विश्वाला इंद्रियांच्या द्वारा पाहणे अथवा जाणणे (दूरदर्शन, दूरश्रवण व दूरग्रहण सिद्धी, स्वशरीरगत पंचभूतांना एकत्र आणणे, पोसणे, वेगळे करणे) या सर्व गोष्टी सिद्धयोग्यांना शक्तिसंधानामुळे साधतात.।।९३ ते ९५.५।।२०।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

"**भूतसन्धानभूतपृथक्त्वविश्वसङ्घट्टाः ।।२०।।**" या सूत्रात सिद्धयोग्याच्या

अन्य अभिलषित सिद्धी या शक्तिसंधानाच्या माहात्म्यानेच संभव होतात हे सांगितले आहे.

महाभूतांचे संधान म्हणजे भूतसंधान होय. भूते म्हणजे देह, बुद्धी व प्राण यांनी विरहित अर्थात् शरीर, बुद्धी व प्राणभावादींनी युक्त गोष्टी होत. त्यांची क्वचित् वृद्धी आदि म्हणजेच परिपोषण अर्थात्च संधान होय. अशा प्रकारे भूतांचे शरीरादींच्या व्याधी आदींमध्ये पृथक्त्व म्हणजेच विश्लेषण व देशकालादींनी दूर असणाऱ्या विश्वाचे संघट्ट म्हणजे चक्षू आदि इंद्रियांनी हे विश्व प्रत्यक्ष होणे हे सर्व पूर्वी सांगितलेल्या शक्तीच्या अनुसंधानाने होते.

यासंबंधी श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**दुर्बलोऽपि तदाक्रम्य यतः कार्ये प्रवर्तते।**
**आच्छादयेद्बुभुक्षां च तथा योऽतिबुभुक्षतः।।४.३८।।**
**यथा ह्यर्थोऽस्फुटो दृष्टः सावधानेऽपि चेतसि।**
**भूयः स्फुटतरो भाति स्वबलोद्योगभावितः।।४.३६।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे दुर्बल शरीराची व्यक्ती कोणतेही अशक्य कार्य आवेशामध्ये करून टाकण्याच्या परिस्थितीमध्ये अलक्ष्य आत्मबलाच्या प्रेरणेने ते करण्याला प्रवृत्त होते व त्यात यश मिळविते त्याचप्रमाणे परिपक्व सिद्धयोगी आपले स्वतःचे शरीर अत्यंत निर्बल झाले तरीही स्पंदात्मक आत्मबलावर आरूढ होऊन मोठमोठी दुष्कर कामे सहजपणे करीत असतो आणि अत्यंत भुकेलेला असतानाही आपल्या भुकेला इच्छित काळापर्यंत नियंत्रणामध्ये ठेवू शकतो. (येथे "क्षुधा" हा शब्द सर्व देहधर्माचे प्रतीक आहे. याचाच अर्थ असा आहे की योग्याला क्षुधा, निद्रा, स्त्रीचिंता इत्यादि देहधर्म विचलित करू शकत नाहीत.)।।४.३८।।

ज्याप्रमाणे एखादा दूर असलेला पदार्थ माणसाने लक्षपूर्वक सावधान मनाने पाहिला तरी पहिल्या नजरेमध्ये तो अस्पष्ट दिसतो; पण विशेष प्रयत्न करून आत्मबळाच्या साहाय्याने परीक्षण केले असता तो पुन्हा अधिक स्पष्ट दिसतो. त्याप्रमाणेच सिद्धयोगी स्वात्मबळाने सर्व काही करतो.।।४.३६।।

अशा प्रकारे श्रीस्पंदशास्त्राच्या विभूतिस्पंदात जे वर्णन केले आहे ते जिज्ञासूंनी अवश्य पाहावे.।।२०।।

**विवरण :-** "**शक्तिसन्धाने शरीरोत्पत्तिः।।१९।।**" हे सूत्र असे सांगते की, "सिद्धयोगी त्याचे चैतन्य दिव्य इच्छाशक्तीशी युक्त करून त्याच्या

इच्छेला हवे तसे शरीर उत्पन्न करण्याचे सामर्थ्य प्राप्त करतो." आता "**भूतसन्धानभूतपृथक्त्वविश्वसङ्घट्टाः ।।२०।।**" या सूत्रात सिद्धयोग्याच्या आणखी काही असामान्य शक्ती सांगितल्या आहेत. सिद्धयोग्याला भरणपोषणासाठी शरीरामध्ये काही तत्त्वांची जुळणी करण्याची शक्ती, वस्तू अथवा देहापासून तत्त्वे बाजूला करण्याची शक्ती, सर्व तत्त्वांचे चैतन्य परत आणण्याची शक्ती आणि देश व काल आदींनी दूर असलेल्या वस्तू जाणण्याची व पाहण्याची शक्ती या सिद्धी प्राप्त होतात. परंतु हा सिद्धयोगी नवीन ब्रह्मांडाची रचना करू शकत नाही.।।२०।।

## सूत्र क्रमांक २१

**संबंध :-** ज्यावेळेला सिद्धयोग्याला या परिमित सिद्धींची इच्छा नसते व त्याला फक्त विश्वात्मप्रथारूप परासिद्धीचीच इच्छा असते त्यावेळेला हा सिद्धयोगी तुर्यदशेचा अनुभव घेतो.

**शुद्धविद्योदयाच्चक्रेशत्वसिद्धिः ।।२१।।**

**शब्दार्थ :- शुद्धविद्योदयात् -** शुद्ध विद्येचा अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत झाल्यावर म्हणजे तिचा उदय झाल्यावर. **चक्रेशत्वसिद्धिः -** सर्व सिद्धींच्या समुदायावर म्हणजे चकांवर प्रभुत्व असणे किंवा मिळणे ही सिद्धी किंवा स्वस्वरूपसमाधीची किंवा सहस्रारातील श्रीशिवशक्तिसामरस्याची अंतिम सिद्धी.

**अर्थ :-** शुद्ध निर्मळ विद्येने अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोग-दीक्षेने अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत झाल्यावर होणाऱ्या बोधाने स्वरूपसमाधीची सिद्धी होते अर्थात् शुद्ध विद्येचा उदय झाल्यामुळे सिद्धयोग्याला सर्व सिद्धींच्यावर प्रभुत्व असण्याची सिद्धी प्राप्त होते अर्थात् त्याला सहस्रारात श्रीशिवशक्तिसामरस्याची अंतिम सिद्धी प्राप्त होते.।।२१।।

**विशेष व्याख्या :-** ज्यावेळेला विश्वात्मरूपतेचे निर्मल ज्ञान होते त्यावळेला अंतर्मुखभाव सिद्ध होतो. ही सिद्धयोग्याची विश्वोत्तीर्ण दशा आहे. याला तुर्यदशा असे म्हणतात. "मीच हे जगत् आदि सर्व काही आहे," ही माहेश्वरी दृष्टी सिद्ध होते.।।२१।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

ज्यावेळेला सिद्धयोगी मागच्या सूत्रात सांगितलेल्या मितसिद्धींची अपेक्षा न करता विश्वात्मप्रथा अर्थात् विश्वात्मरूप ज्ञानाची अपेक्षा करतो त्यावेळेला त्याच्या ठिकाणी शुद्धविद्येचा उदय होतो हे कथन करताना "**शुद्धविद्योदया-**

**श्चक्रेशत्वसिद्धिः।।२१।।**" हे सूत्र कथन केले आहे.

विश्वात्मप्रथेची म्हणजेच विश्वात्मरूप ज्ञानाची इच्छा करणारा सिद्धयोगी ज्यावेळेला शक्तीचे अनुसंधान करतो त्यावेळेला त्याच्या ठिकाणी "**अहमेव सर्वम्**" म्हणजे "मीच सर्व आहे," अशा प्रकारच्या शुद्ध विद्येचा उदय होतो. त्यामुळे हा सिद्धयोगी विश्वात्मक सर्वशक्तिसमुदायांचा स्वामी अथवा नियामक होतो. या सिद्धीला "**श्रीमाहेश्वरी सिद्धी**" असे नाव आहे.

यासंबंधी "**श्रीस्वच्छंदशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**तस्मात्सा तु परा विद्या यस्मादन्या न विद्यते।**
**विन्दते ह्यत्र युगपत्स्वार्वज्यादिगुणान्परान्।।४.३९१।।**

**अर्थ :-** त्यामुळे सिद्धयोग किंवा शक्तिपातयोगसाधन ही एक सर्वश्रेष्ठ विद्या असून तिच्याशिवाय अन्य कोणतीही विद्या अस्तित्वातच नाही. तिच्यामुळे साधकभक्तयोगिशिष्य एकदमच सर्वज्ञतादि श्रेष्ठ गुण प्राप्त करतो.

**स्पष्टीकरण :-** मायेपर्यंतच्या सर्व तत्त्वांच्या वर असणाऱ्या शुद्धविद्यादि शक्तीपर्यंत अध्वांना व्यापून असलेल्या विद्यातत्त्वाशिवाय असणारी ही एक विशिष्ट विद्या आहे. ही शुद्ध विद्या म्हणजे सर्वश्रेष्ठ चैतन्य असून या चैतन्यात सर्व गोष्टी या "स्व" म्हणूनच अनुभवाला येतात. ही उन्मना अवस्था होय. अन्य विद्या म्हणजे अपरा विद्या होत; कारण परा विद्येने सर्व विश्वाला आपल्या ताब्यात घेतलेले असते. पर गुण म्हणजेच अभेदरूप सर्वज्ञतादि गुण होत. हे गुण हा सिद्धयोगी उन्मनी अवस्थेत एकदम प्राप्त करतो. ही परा विद्या "विद्‌ऌ लाभे" या लाभार्थक धातूच्या अर्थाचे अनुगमन करते.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**सर्वज्ञता तृप्तिरनादिबोधः स्वतन्त्रता नित्यमलुप्तशक्तिः।**
**अनन्तशक्तिश्च विभोर्विधिज्ञाः षडाहुरङ्गानि महेश्वरस्य।।**

**अर्थ :-** सर्वज्ञता, तृप्ती किंवा समाधान, अनादिबोध अर्थात् अखंड स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची उपलब्धी, स्वतंत्रता, कधीही लुप्त न होणारी शक्ती आणि अनंतशक्ती ही सर्वव्यापक श्रीमहेश्वरांची सहा अंगे आहेत असे तत्त्वज्ञ म्हणतात.

**वेदनानादिधर्मस्य परमात्मत्वबोधना।**
**वर्जनापरमात्मत्वे तस्माद्विद्येति सोच्यते।।४.३९२।।**

**अर्थ :-** अनादि धर्माची वेदना किंवा विचारणा, परमात्मत्वाचे बोधन किंवा ज्ञान व अपरमात्मत्वाचा म्हणजे परमात्मतत्त्वविरहित इतर विषयांचा

त्याग या विद्येमुळे होतो म्हणून ही परा विद्या होय.

**स्पष्टीकरण :-** अनादि धर्म म्हणजे स्वातंत्र्यशक्तीने युक्त स्वभाव होय. त्याची वेदना म्हणजे विचारणा होय. आत्म्याचे जे परमात्मत्व आहे ते म्हणजे श्रीशिवरूपत्व होय. त्याची बोधना म्हणजेच ते स्वरूप जाणून घेण्याचा हेतू होय. त्यामुळेच अपरमात्मत्वात म्हणजेच परमात्म्याशिवाय इतर सर्व विषयात ही वर्जना संपन्न होते. त्यामुळे "विद् विचारणे" अर्थात् विद् = विचार करणे व "विद् ज्ञाने" अर्थात् विद् = जाणणे या धातूंच्या अर्थांचा अनुगम करणारी ही श्रेष्ठ विद्या सांगितली आहे.

**तत्रस्थो व्यञ्जयेत्तेजः परं परमकारणम्।**
**परस्मिंस्तेजसि व्यक्ते तत्रस्थः शिवतां व्रजेत्।।**

**अर्थ :-** तेथे म्हणजे श्रीशिवशक्तिसामरस्यावस्थेत असणारे सर्वश्रेष्ठ व सर्वांचे परमकारण असणारे तेज सिद्धयोग्याला प्राप्त होते. हे श्रेष्ठ तेज व्यक्त अथवा प्रकट झाले असता तेथे म्हणजे सहस्रारात असणारा सिद्धयोगी श्रीशिवत्वाला प्राप्त होतो.

**स्पष्टीकरण :-** तत्र म्हणजे उन्मना नावाच्या विद्येत साधकभक्तयोगिशिष्य आत्म्यालाच जाणून घेतो अथवा त्याच्यामध्ये आत्म्याचे उन्मीलन होते. तेज म्हणजेच चैतन्यज्योती होय. पर म्हणजे असंकुचित अर्थात् विशाल होय. परमकारण हे श्रीपरमशिवरूप आहे. त्यामुळे सिद्धयोगी श्रीशिवत्वाला प्राप्त होतो अर्थात् श्रीशिवांशी एकरूप होतो.

हेच **"श्रीस्पंदशास्त्र"** या ग्रंथाच्या पुढील कारिकेत संगृहीत केले आहे.

**दिदृक्षयेव सर्वार्थान् यदा व्याप्यावतिष्ठते।**
**तदा किं बहुनोक्तेन स्वयमेवावभोत्स्यते।।४.४३।।**

**अर्थ :-** सर्व भावांमध्ये केवळ स्पंदात्मक स्वरूप पाहण्याच्या तीव्र इच्छेने सिद्धयोगी प्रत्येक भाव हा आत्मतत्त्वात लीन झालेला आहे हे जाणून घेऊन राहतो. तो विविधतेचे व नानात्वाचे दर्शन ही भ्रांती नसून सर्वांना एकच तत्त्व व्यापून राहिलेले आहे हे ज्ञात करून त्यावरच स्थिरपणे विसावतो. अशा सिद्धयोग्याच्या बाबतीत जास्त काय बोलावे? असा सिद्धयोगी स्वतः स्वभावभूत स्पंदतत्त्वाची अनुभूती घेत असतो.।।४.४३।।२१।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

या जगाचे कारण (चित्-इच्छादि) शक्ती कशा होतात? त्याचप्रमाणे आत्म्याला या जगाचे किंवा शक्तीचे स्वामित्व कसे येते? अशी शंका उत्पन्न

झाली असता भगवान् श्रीशिव त्याचे उत्तर, "**शुद्धविद्योदयाच्चक्रेशत्वसिद्धिः ।।२१।।**" अर्थात् "शुद्ध विद्येमुळे तो चक्रेश होतो," असे सांगून या सूत्रात देतात.।।९९।।

शुद्ध, निरुपाधिक व सर्व भासविणारे असे जे चित्तेज म्हणजेच सर्व प्रकाशित करणारी ज्योती आहे.।।१००।।

ती अनंत पदार्थांना निर्माण करते म्हणून तिचा धर्म श्रेष्ठ स्वातंत्र्याने युक्त आहे. ही विद्या वेदनारूप म्हणजेच हे सर्व मीच आहे, अशा ज्ञानाने युक्त आहे.।।१०१।।

"हे सर्व मीच आहे," हे ज्ञान उदित झाले किंवा व्यक्त झाले की, तो सिद्धयोगी चक्रेश होतो. त्याला माहेश्वर्यादि सामान्यसिद्धी सर्वत्र अवगत किंवा प्राप्त होतात.।।१०२।।२१।।

**स्पष्टीकरण :-** विश्वमय, अनुत्तर व चिद्घन श्रीपरमशिवरूप स्वात्म्याचा साक्षात्कार झाल्यामुळे सिद्धयोग्याला पर व अपर स्वातंत्र्य प्राप्त होते. त्यामुळे सिद्धयोग्याला परममाहेश्वर शक्तीच्या बळाने अणिमादि ऐश्वर्यांनी युक्त असणाऱ्या चक्रेश्वरींची चक्रेश्वरता प्राप्त होते. (१) अणिमा म्हणजे स्वेच्छेने लगेचच अवयवांना क्षीण करून देहाचे सूक्ष्मत्व संपादण्यामुळे परमाणूतही प्रवेशाचे सामर्थ्य असणे होय. (२) लघिमा म्हणजे वजनदार शरीर असूनही काडी किंवा कापसाप्रमाणे वायूच्या खांद्यावरून संचार करणे होय. (३) महिमा म्हणजे मोठे होणे होय. (४) प्राप्ती म्हणजे भूमीवर बसून अवयव लांबवून बोटाने चंद्रादिवस्तूंना स्पर्श करणे होय. (५) प्राकाम्य म्हणजे इच्छेच्या अप्रतिबंधाने पाण्यातल्याप्रमाणे पृथ्व्यादि कठीण वस्तूतही बुडता येणे होय. त्याच्या या रूपाला महाभूते काही अडथळा आणून विघ्ने करू शकत नाहीत. (६) वशिता म्हणजे सर्व भूतांना व प्राणिमात्रांना आज्ञानुरूप वागविणे होय. (७) ईशिता म्हणजे भूतांचे उत्पत्तिविनाशाच्या बाबतीत नियमन करणे होय आणि (८) यत्रकामावसायिता म्हणजे संकल्पानुरूप रूपे धारण करणे होय किंवा चक्र म्हणजे संविद्देविरूप ब्राह्मीमाहेश्वर्यादि सप्तमातृमंडल होय. त्यांचा स्वामी झाल्यामुळे या सिद्धयोगिराजाला प्रातिभ व ऋतंभरादि योगशास्त्रातील ज्ञानप्रकर्षाची प्राप्ती होते. अखंडित ऐश्वर्यांनी पूर्ण असा हा चक्रेश्वर होतो. असाही चक्रेश्वरत्वाचा आशय आहे.।।२१।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**शुद्धविद्योदयाच्चक्रेशत्वसिद्धिः ।।२१।।**" म्हणजे विश्वात्मज्ञानाच्या

इच्छेने ज्यावेळेला हा सिद्धयोगी शक्तीचा विकास श्रीशिवरूपापर्यंत करतो त्यावेळेला "मीच सर्व काही आहे," अशी विश्वात्मक शुद्ध विद्या त्या सिद्धयोग्याला प्राप्त होते व त्यामुळे तो चक्रेश होतो. त्याला श्रीमाहेश्वर्यसिद्धी प्राप्त होते.।।२१।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**शुद्धविद्योदयाश्चक्रेशत्वसिद्धिः।।२१।।**" म्हणजे ज्यावेळेला हा योगी मर्यादित सिद्धींची इच्छा टाकून विश्वात्मतारूप अर्थात् विश्वाला स्वात्मा समजणे या सिद्धीची इच्छा करतो त्यावेळेला त्याला शुद्धज्ञानाचा लाभ होऊन चक्रेशत्वसिद्धी प्राप्त होते.।।९६-९६.५।।

ज्यावेळेला सिद्धयोगी विश्वात्मत्वाची इच्छा धरून आपल्या इच्छाशक्तीला शक्तिसर्वस्वाने धारण करतो त्यावेळेला त्याला श्रीसदाशिवाच्या पदाला अर्थात् स्थानाला किंवा चरणाला स्पर्श केल्यामुळे "सर्व जगत् मीच आहे," अशी मती उत्पन्न होते. हीच शुद्धविद्या होय.।।९७-९७.५।।

याला प्रमाण देताना शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की -

**ईश्वरो बहिरुन्मेषो निमेषोऽन्तः सदाशिवः।**
**सामानाधिकरण्यं च सद्विद्याहमिदं धियोः।।**

**अर्थ :-** बाह्य उन्मेष हा श्रीईश्वर असून अंतरुन्मेष म्हणजे श्रीसदाशिव होय. "बाह्य म्हणजे इदं" व "अंतः म्हणजे अहं" या इदं व अहं चे एकच अधिकरण अर्थात् स्थान आहे, असे ज्ञान होणे हीच शुद्धविद्या होय.।।९८-९८.५।।

ज्यावेळी या शुद्धविद्येचा म्हणजे "मीच सर्व जगत् आहे," अशा बुद्धीचा उदय होतो त्यावेळी या शुद्धविद्येच्या उदयाने व त्याच्या सतत विचाराने या चिच्छक्तीला सिद्धयोगी ज्यावेळेला सतत चिकटून राहतो त्यावेळेला त्याला आवेशोत्कर्षामुळे श्रीमहेश्वरासंबंधी श्रेष्ठ चक्रेशता अथवा सिद्धी प्राप्त होते.।।९९-१०१।।२१।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

"**शुद्धविद्योदयाश्चक्रेशत्वसिद्धिः।।२१।।**" म्हणजे "ज्यावेळेला सिद्धयोगी परिमित सिद्धींची इच्छा करीत नाही आणि विश्वस्वरूप परममाहेश्वरात्मक निरवच्छिन्न अर्थात् असंकुचित म्हणजे महान् किंवा विभू महाप्रकाशाची इच्छा करतो त्यावेळेला त्याचे "चक्रेश" हे स्वरूप त्याला प्राप्त होते." ज्या काळात ज्यावेळी तो सिद्धयोगी विश्वस्वरूप प्रकाशाची इच्छा करीत तशा प्रकारच्या शक्तीचे अनुसंधान करतो त्यावेळेला "अहमेव सर्वम्" अर्थात् "मीच सर्व

आहे," अशा प्रकारच्या आकारात्मक निर्मल ज्ञानाच्या समुदयामुळे अर्थात् असे निर्मल ज्ञान पूर्णपणे उदित झाल्यामुळे विश्वस्वरूप शक्तिचक्रेशत्व अर्थात् अनुत्तरात्मक माहेश्वर्य सिद्ध होते.

यासंबंधी "**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**ईश्वरो बहिरुन्मेषो निमेषोऽन्तः सदाशिवः।**
**सामानाधिकरण्यं च सद्विद्यामिदं धियोः।।**

**अर्थ :-** बाह्य उन्मेष हा श्रीईश्वर असून अंतरुन्मेष हा श्रीसदाशिव आहे. अहं म्हणजे अंतः व इदं म्हणजे बाह्य अशा बुद्धीने त्यांचे समानाधिकरण्य अर्थात् त्यांच्या एकाच स्थानाचे ज्ञान होणे यालाच शुद्धविद्या असे म्हणतात.

अशा प्रकारे "हे स्थावरजंगमात्मक विश्व म्हणजे मीच आहे," अशी ज्याची शुद्ध निर्मल विद्या आहे त्याचे निर्मलज्ञानच शुद्धविद्या शब्दाने प्रकृत सूत्रात सांगितले आहे.।।२१।।

**विवरण :-** चौदा ते वीस क्रमांकापर्यंतच्या सूत्रांमधून इच्छाशक्तीशी एकरूप झालेल्या सिद्धयोग्याच्या परिमित विभूतिसिद्धी सांगितल्या आहेत. एकविसाव्या सूत्रात सिद्धयोग्याने प्राप्त केलेल्या वैश्विक चैतन्यशक्तीविषयी सांगितले आहे. ही शक्ती मिळविल्यानंतर सिद्धयोग्याला सर्व जग अथवा विश्व हे आपण स्वतःच आहोत हे एका क्षणात समजते, तुकड्यातुकड्याने नाही. चौदा क्रमांकाच्या सूत्रात योग्याला त्याच्या "स्व" ची जाणीव प्रत्येक वस्तूविषयी होत असते असे सांगितले आहे. त्याची जाणीव "अहमिदम्" अर्थात् "मी हे आहे," अशी प्रत्येक वस्तूविषयी वेगवेगळेपणाने असते. सिद्धयोगी वैश्विक चैतन्य मिळवितो आणि त्याची जाणीव ही "अहमेव सर्वम्" अर्थात् "मी सर्व आहे," अशी असते, असे हे एकविसावे सूत्र आहे.

यासंबंधी "**श्रीब्रह्मसूत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**जगद्व्यापारवर्जं प्रकरणादसन्निहितत्वाच्च।।४.४.१७।।**

**अर्थ :-** त्याचे म्हणजे सिद्धयोग्याचे ऐश्वर्य जगाला उत्पन्न करणे इत्यादि व्यापाररहित आहे; कारण जगद्व्यापार हे श्रीपरमेश्वरांचेच कार्य आहे. कारण सृष्टिवाक्यामध्ये सर्वत्र प्रकरणवशात् श्रीपरमेश्वरच प्रकृत आहे व विद्वान् अर्थात् सिद्धयोगी तेथे संनिहित नाही.।।४.४.१७।।

## सूत्र क्रमांक २२

**संबंध :-** आता या सूत्रात योग्याच्या तुर्यातीत दशेचा अनुभव सांगितला आहे.

**महाह्रदानुसन्धानान्मन्त्रवीर्यानुभवः ।।२२।।**

**शब्दार्थ :- महाह्रद** - मोठा डोह अगर दैवी शक्तीचा अनंत साठा किंवा निधी अगर स्वच्छ, अनावृत व गंभीर धर्मांनी युक्त असल्याने बोधालाच महासमुद्र असे म्हणतात. **अनुसन्धानात्** - अनुसंधान केल्यामुळे अंतर्मुख होऊन आत्माशी अखंड तादात्म्य साधल्यामुळे किंवा त्या बोधाचे अखंड अनुसंधान केल्यावर अर्थात् निरंतर त्याच्याशी विचारात्मक तादात्म्य साधल्यावर. **मन्त्रवीर्यानुभवः** - सर्वश्रेष्ठ श्रीशिवांच्या तत्त्वाची जाणीव (Supreme Consciousness) ही सर्व मंत्रांची निर्माती म्हणजे मंत्रवीर्य आहे. त्या मंत्रवीर्याची अनुभूती सिद्धयोग्याचा पूर्णाहंतेमध्ये प्रवेश करविते.

**अर्थ :-** (स्वच्छ, अनावृत अर्थात् कशानेही न झाकलेला व गंभीर धर्मांनी युक्त असल्याकारणाने बोध म्हणजे श्रीशिवांशी समवायसंबंधाने, अविनाभावाने, संघट्टपणे, यामलभावाने, संश्लेशाने, एकरसरूपतेने, समव्याप्त व अद्वयपणे समरस असलेली आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत होऊन ज्यावेळी सुषुम्नामार्गाने सिद्धयोग-साधनाच्या द्वारा ऊर्ध्वगमन करते त्यावेळी सहस्रारात प्राप्त होणारे श्रीशिव-शक्तिसामरस्य हाच) मोठा समुद्र आहे. त्या बोधामध्ये अर्थात् श्रीशिवशक्ति-सामरस्यामध्ये अनुसंधान करण्याने अर्थात् अखंड त्याच्याबरोबर तादात्म्य-विमर्शनाने सिद्धयोगी पूर्णाहंतेमध्ये प्रविष्ट होतो अर्थात् महाह्रदाशी अनुसंधान केल्यामुळे सर्व मंत्रांची निर्माती असलेल्या परासंवित्‌ची अनुभूती सिद्धींची इच्छा न करता केवळ स्वात्मसुखाची इच्छाच होणाऱ्या सिद्धयोग्याला प्राप्त होते.।।२२।।

**विशेष व्याख्या :-** श्रीक्षेमराजाचार्यांच्या मते हाच मुद्दा श्रीवसुगुप्ताचार्यांनी "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील कारिकेत पुढील शब्दात मांडला आहे.

**तदाक्रम्य बलं मन्त्राः सर्वज्ञबलशालिनः ।**
**प्रवर्तन्तेऽधिकाराय करणानीव देहिनाम्।।२.२६।।**

**अर्थ :-** मंत्र किंवा यंत्रदेवता या स्पंदतत्त्वाच्या म्हणजे चिद्रूप आत्मबलाच्या आश्रयाने त्याच्याशी तादात्म्य पावून त्याच्या सर्व इच्छा, तृप्ती, अप्रतिहत स्वातंत्र्य इत्यादि शक्तींनी संपन्न होऊन ज्याप्रमाणे शरीर धारण करणाऱ्या जीवाच्या इच्छेप्रमाणे इंद्रिये काम करतात त्याप्रमाणे आपल्या अनुग्रह, निग्रह, रोग निवारण इत्यादि कार्यात प्रवृत्त होतात.

याचा अर्थ असा आहे की, प्रत्येक प्रकारचे मंत्र त्या स्पंदरूप आत्मबळाशी

तादाम्य प्राप्त केल्याने सर्वज्ञता, तृप्ती, अनादिबोध, अप्रतिहत स्वातंत्र्य-शक्तीचा अडथळारहित प्रसार आणि विश्वरूपामध्ये विकसित असलेले अनंत शक्तींचे ऐश्वर्य या सहा प्रकारच्या माहेश्वर बलांना प्राप्त करून घेऊन शोभित होऊ लागतात. अशा परिस्थितीत कोणतेही मनोवांछित कार्य अधिकारपूर्वक सिद्ध करण्यासाठी हे मंत्र जितक्या सहजपणे प्रवृत्त होतात तितक्या सहज-पणे शरीरधारींची इंद्रिये केवळ संकल्पानेच आपापली कार्ये सिद्ध करीत असतात.।।२.२६।।

परासंवित् किंवा परचैतन्यशक्ती ही स्वच्छ, निर्मळ आणि गंभीर असल्याने महासमुद्र आहे. या बोधसुधाब्धीचे अंतर्मुखभावाने अखंड अनुसंधान झाल्यावर सिद्धयोग्याला श्रीशिवस्थितिरूप निर्व्युत्थानसमाधीचा अनुभव येतो. तो पूर्णाहंते-मध्ये प्रविष्ट होतो. ही विश्वमयदशा आहे. सिद्धयोगी या दशेमध्ये जगताच्या देण्याघेण्याच्या व्यवहारातही युक्त असतो आणि स्वस्वरूपस्थितही असतो. यालाच ऊर्ध्व कुंडलिनीपद असेही म्हणतात. पूर्वी सांगितलेल्या एकोणीस आणि वीस सूत्रांमधले ऐश्वर्य सिद्धयोग्याला स्वस्वरूपापासून दूर घेऊन जाऊ शकते; परंतु एकवीस आणि बावीस या सूत्रांमधले ऐश्वर्य त्याला अधिकाधिक बोधसुधाब्धीत मज्जन करविण्यात समर्थ असते अर्थात् सिद्धयोगी ज्ञानामृताच्या सागरात आनंदाने बुडत राहतो.।।२२।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

ज्यावेळेला योगी स्वात्मारामतेची म्हणजेच आत्मस्वरूपातच संपूर्णपणे रमून जाण्याची इच्छा करतो त्यावेळेला त्याला महाह्रदाशी अनुसंधान केल्यामुळे सर्व मंत्रांची निर्माती असलेल्या परासंवित्‌ची अनुभूती प्राप्त होते हे कथन करताना "**महाह्रदानुसन्धानान्मन्त्रवीर्यानुभवः।।२२।।**" असे सूत्र श्रीशिवांनी कथन केले आहे.

परा भट्टारिका संवित् म्हणजेच चैतन्यशक्ती कुंडलिनी ही इच्छाशक्ती-पासून स्थूल अशा ज्ञेयविषयांपर्यंत सर्व सृष्टीचे वमन करते अर्थात् निर्मिती करते. ही संवित् खेचरी आदि चक्रांच्या सर्व प्रवाहांची प्रवर्तिका आहे व विश्वाचे प्रतिबिंब ती सहन करते म्हणून स्वच्छ आहे. विश्वप्रतिबिंब सहन करीत असूनही विश्वाने ती झाकली जात नाही. ती दृष्टीच्या टप्प्यात येत नाही म्हणून गंभीर म्हणजेच खोल आहे. असे बरेचसे धर्म तिच्या म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या ठिकाणी आहेत म्हणून संविच्छक्तीला महाह्रद असे म्हटले आहे. तिचे अनुसंधान केल्यामुळे अर्थात् अंतर्मुख होऊन सतत त्या तादात्म्याच्या

विमर्शनामुळे किंवा सामरस्याचे ज्ञान झाल्यामुळे सिद्धयोग्याला मंत्रवीर्याचा अनुभव येतो.

मंत्रवीर्य म्हणजेच मंत्रांचा वीर्यभूत किंवा सामर्थ्यभूत असा महामंत्र किंवा पूर्णाहंता होय. या पूर्णाहंतेचा अनुभव येतो म्हणजेच स्वात्मरूपतेने स्फुरण होते. पूर्णाहंता म्हणजे पदवाक्यादि रूपाने विभक्त अशा स्थूल शब्दांचे स्फुरणकर्तृत्व होय. स्वतःवर विश्व भासविण्याची इच्छा हीच पराहंता होय. तिचा विचार म्हणजेच पूर्णाहंता होय. हिच्यामुळे मंत्रवीर्यानुभव येतो.

त्यामुळेच "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**या सा शक्तिर्जगद्धातुः कथिता समवायिनी।**
**इच्छात्वं तस्य सा देवि सिसृक्षोः प्रतिपद्यते।।३.५।।**

**अर्थ :-** ही जी जगत् निर्माण करणाऱ्या श्रीपरमेश्वरांची समवायिनी अर्थात् नित्य संबंधित अशी शक्ती सांगितली आहे ती शक्ती म्हणजेच सृष्टि-कर्त्याचे इच्छात्व अर्थात् श्रीपरमेश्वराची इच्छाशक्ती होय.

अशी सुरुवात करून इच्छादि प्रमुख शक्ती पन्नास भेदांनी म्हणजे "अ" ते "क्ष"पर्यंत पन्नास वर्णरूपाने मातृका-मालिनीच्या रूपात शक्तीचे विश्वमय रूप दाखवितात. परप्रमात्याशी एकरूप असल्याने व ती त्याच्याशिवाय नसल्याने अक्षुब्ध अशी पराशक्ती सर्वमंत्रविद्यांचे कारण असल्याने पशू अर्थात् अज्ञानी जीव तिला "अज्ञाता मातृका" असे म्हणतात. जर ती क्षुब्ध झाली तर बीजयोनींमध्ये परस्परांशी संघटित होऊन लोलीभावामुळे अर्थात् चंचलतेमुळे तिला नादि-फान्तरूप मालिनी असे नाव मिळते. "**मलते विश्वम्-अन्तर्दर्पणवत् धत्ते।।**" अर्थात् "विश्वाला अंतर्दर्पणाप्रमाणे म्हणजे प्रतिबिंबा-प्रमाणे धारण करते" म्हणून तिला "**मालिनी**" असे म्हटले आहे अर्थात् ही मालिनी विश्वस्वरूपिणी आहे. त्या मालिनीपासूनच मंत्रांची उत्पत्ती होते. त्यामुळे पराशक्तीला महाह्रद असे म्हटले आहे. त्याच्या अनुसंधानाने म्हणजेच विमर्शनामुळे तत्त्वासहित असणाऱ्या मातृका किंवा मालिनीरूप मंत्रवीर्याचा अनुभव येतो असे योग्यच सांगितले आहे. हेच "**तदाक्रम्य बलं मन्त्राः ...........।।श्रीस्पंदशास्त्र २.२६।।**" अर्थात् "प्रत्येक प्रकारचे मंत्र त्या स्पंदरूप आत्मबळाशी तादात्म्य प्राप्त केल्याने सर्वज्ञता, तृप्ती, अनादिबोध, अप्रतिहत स्वातंत्र्यशक्तीचा अडथळारहित प्रसार आणि विश्वरूपामध्ये विकसित असलेले अनंत शक्तींचे ऐश्वर्य या सहा प्रकारच्या माहेश्वर बलांना प्राप्त करून

घेऊन शोभित होऊ लागतात. अशा परिस्थितीत कोणतेही मनोवांछित कार्य अधिकारपूर्वक सिद्ध करण्यासाठी हे मंत्र जितक्या सहजपणे प्रवृत्त होतात तितक्या सहजपणे शरीरधारींची इंद्रिये केवळ संकल्पानेच आपापली कार्ये सिद्ध करीत असतात," असे या स्पंदकारिकेत सांगितले आहे.

अशा प्रकारे "**चैतन्यमात्मा।।१.१।।**" या सूत्राने प्रारंभ करून चैतन्य-स्वातंत्र्याने अवभासित केलेला आणवमल हाच बंध होय, हे कथन केले. त्याचा नाश करण्यासाठी उद्यमयुक्त श्रीभैरवप्राप्ती सांगितली. ही उद्यम-भैरवता विश्वाला स्वानंदमय करते आणि मंत्रानुप्रवेशापर्यंतच्या सर्वसिद्धींची प्राप्ती करून देते. अशा प्रकारे शांभवोपाय सांगणारा हा प्रथमोन्मेष सांगितला. या उन्मेषात मध्येच शक्तीचे स्वरूप सांगितले आहे. त्याचे कारण म्हणजे शांभवरूपाची शक्तिमत्ता म्हणजे स्वातंत्र्यसारता दाखविण्याचाच उद्देश होय.

शांभव म्हणजे जे प्रकाशरूप श्रीशंभूसंबंधी आहे ते शांभव होय किंवा प्रकाशरूप श्रीशंभूपासून आलेला असा उपाय तो "शांभव उपाय" होय.।।२२।।

**।।इति श्रीमन्महामाहेश्वराचार्यवर्याभिनवगुप्तपादपद्मोपजीवि श्रीक्षेम-राजविरचितायां श्रीशिवसूत्रविमर्शिन्यां शाम्भवोपायप्रकाशनं नाम प्रथम उन्मेषः।।१।।**

**अशा प्रकारे श्रीमन्महामाहेश्वराचार्यवर्य अभिनवगुप्तपादाचार्यांच्या चरणकमलावर निष्ठा व श्रद्धा असणाऱ्या किंवा चरणकृपेवरच उपजीविका करणाऱ्या श्रीक्षेमराज यांनी रचलेल्या श्रीशिवसूत्रविमर्शिनीतील शांभवोपाय प्रकाशन या नावाचा प्रथम उन्मेष समाप्त झाला.।।१।।**

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

असे असताना त्या सिद्धयोगिश्रेष्ठाला मंत्रवीर्याचे म्हणजे मंत्रांच्या सामर्थ्याचे ज्ञान कसे होते? असा प्रश्न जर उपस्थित झाला असेल तर त्याचे उत्तर देताना महावीर्याचे स्वरूप प्रतिपादन करणारे "**महाह्रदानुसन्धाना-न्मन्त्रवीर्यानुभवः।।२२।।**" अर्थात् "महाह्रदाच्या अनुसंधानाने मंत्रवीर्याचे ज्ञान होते," हे सूत्र श्रीशिवांनी सांगितले आहे.।।१०३।।

**विवरण :-** शक्तियुक्त श्रीशिवांच्या श्रीशिवशक्तिसंघट्टालाच म्हणजे त्यांच्यापासून उत्पन्न होणाऱ्या विसर्ग म्हणजे निर्मिती, प्रसरण म्हणजे विस्तार व आधारात अवगाहन अर्थात् स्नान करण्याच्या स्वभावामुळे "**महाह्रद**" असे औपचारिकतेने म्हटले आहे. या महाह्रदाच्या आतील सारसर्वस्व असा, स्वतःलाच ज्ञात होणारा "**अहं**" परामर्शरूप, निरपेक्ष, कल्पनारहित महामंत्र

आणि जो परवाणीरूप आहे तोच महाह्रद होय. त्याच्या पोटात अनंत वाच्य व वाचक यांनी युक्त मंत्रानुभावक आहेत. हाच मिळवावयाचा पदार्थ असून विश्रांतीचे स्थान आहे. जे विश्वाला पेलून धरणारे, आद्यंतरूपी व असामान्य वीर्य आहे ते उपभोगाधिकारी जे सिद्धमहायोगी आहेत त्यांनाच पूर्वोक्त अनुसंधानामुळे अनुभवावयाला मिळते.

शक्तियुक्त शक्तीचा मूर्तिमंत आकार असा चिदात्माच हा महाह्रद अर्थात् मोठा डोह होय. मोठ्या डोहाप्रमाणे तो खोल अथवा गंभीर असल्याने त्याला महाह्रद असे म्हटले आहे. तो चिदात्मा श्रेष्ठ, शुद्ध व सृष्टिस्वभावी अर्थात् उत्पत्त्यादि करण्याचा चाळा असलेला असा असून पदार्थांच्या उत्पत्तीला कारणीभूत अशी श्रेष्ठभूमी आहे. हा चिदात्मा दिग्देशकालादि उपाधिरहित, निरंतर व शाश्वत असा आहे.।।१०४-१०५।।

चिदात्म्याचे हे स्वाभाविक सामर्थ्य आहे. दृष्टी व आनंद या दोन मंथनकाष्ठातून उत्पन्न झालेला स्वरस आत्म्याच्या ठिकाणी अकृत्रिम किंवा स्वाभाविकच असतो. विकस्वराने उन्मेष पावलेल्या आत्म्याच्या शाक्तशक्तीने सोमांशात अर्थात् मनात आत्मा स्थिर होतो. यालाच "उदानवायूत प्रवेश" असे म्हणावे किंवा "अनुसंधान" असेही त्याचे दुसरे नाव आहे. (उदान-वायूची वाक्प्रवृत्ती, प्रयत्न, स्मृती वर्ण, बल व क्रिया वगैरे कार्ये आयुर्वेदात आली आहेत.) तेथे आत्मस्थैर्य झाले की, हव्या असलेल्या ज्ञेयवस्तूचा आकार त्या वायूला प्राप्त होतो. योग्य प्रकाराने उच्छूनता अर्थात् विस्तार झाल्याने त्याला उल्लसित अशा अंकुराचे स्वरूप प्राप्त होते. तो सूक्ष्मवाणी-रूपात अव्यक्तवर्णांमध्ये उन्मेषित होतो. ककारार्धवृत्तियोगामुळे स्पष्ट मंत्रो-दय होतो. हाच मंत्रासंबंधी वीर्यानुभव होय. हा साधकांना सिद्धिलाभ करून देतो.।।१०६ ते ११०।।२२।।

**सामान्य चित्प्रकाशाचे मुख्य स्वरूप सांगणारे असे पहिले श्रीशिवसूत्राचे प्रकरण समाप्त झाले.।।१११।।**

पुढील प्रकरणात मंत्रस्वरूप व विद्योदय यांचे वर्णन केले जाईल.।।११२।।

**।। इति काश्मीरिक श्रीमदाचार्यभट्टदिवाकरात्मज-**
**श्रीमदाचार्यभट्टभास्कर विरचिते**
**श्रीशिवसूत्रवार्तिके सामान्यचित्प्रकाशस्वरूपनिरूपणाख्यः**
**प्रथमः प्रकाशः ।।**

**अशा प्रकारे काश्मीरवासी श्रीमदाचार्यभट्टदिवाकरांचे पुत्र श्रीमदाचार्य**

**भट्टभास्कराचार्यांनी रचलेल्या श्रीशिवसूत्रवार्तिकातला सामान्यचित्प्रकाश-स्वरूपनिरूपण नावाचा प्रथम प्रकाश समाप्त झाला.।।१।।**

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**महाह्रदानुसन्धानान्मन्त्रवीर्यानुभवः।।२२।।**" म्हणजे परा संवित् अर्थात् कुंडलिनी शक्ती हीच महाह्रद आहे; कारण तिच्या ठिकाणी स्वच्छ, अनावृत म्हणजेच न झाकलेले, गंभीर किंवा खोल इत्यादि धर्म किंवा वैशिष्ट्ये आहेत. या महाह्रदाच्या अनुसंधानाने म्हणजे त्याचा सतत अंतर्मुख होऊन विचार केल्याने मंत्राचा सामर्थ्यभूत असा पूर्णाहंतात्मक विचाररूप महामंत्राचा अनुभव येतो म्हणजेच स्वात्मरूपतेने त्याचे स्फुरण होते.।।२२।।

**।। इति श्रीशिवसूत्रवृत्तौ शाम्भवोपायप्रकाशनं नाम प्रथम उन्मेषः।।**

**अशा प्रकारे श्रीभट्टकल्लटाचार्य विरचित श्रीशिवसूत्रवृत्तीमधील शांभवोपायप्रकाशन नावाचा पहिला उन्मेष समाप्त झाला.**

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**महाह्रदानुसन्धानान्मन्त्रवीर्यानुभवः।।२२।।**" म्हणजे "ज्यावेळेला तो सिद्धयोगी निर्मल चिद्रूपत्व प्राप्त झालेला होऊन विश्वात्मकतेच्या दृष्टीने आत्मस्वरूपाची इच्छा करतो त्यावेळेला त्याला महाह्रदाच्या अनुसंधानाने मंत्रशक्तीचा अनुभव येतो."।।१०२।।

श्रेष्ठ भट्टारिका अर्थात् कुंडलिनीशक्ती ही ज्ञान व इच्छा या दोन शक्तींनी युक्त होऊन आपल्या आतील विश्वाला स्थूल प्रमेयांपर्यंत म्हणजेच स्थूल वस्तूंपर्यंत बाहेर टाकते म्हणजेच उत्पन्न करते. महाह्रद अर्थात् श्रीभगवंताशी समवायसंबंधाने, अविनाभावाने, अनवच्छेद्यपणे, संघट्टपणे, यामलभावाने, अभेद्यरीतीने आणि लोलीभावाने एकरसरूप, समव्याप्त व समरस असलेली कुंडलिनी नावाची श्रेष्ठ शक्ती, ही जगद्व्यापक व देशकालादिकांना न कळणारी अशी आहे. ही कुंडलिनी शक्ती अर्थात् तो महाह्रद प्रमात्याच्या आतील व बाहेरील शब्दादिग्राहकांचा म्हणजे इंद्रियादिकांचा तसेच स्वच्छ व गंभीरत्वादि धर्मामुळे खेचर्यादि सिद्धिसमूहांचा प्रवर्तक होतो.।।१०३ ते १०५।।

त्या महाह्रदाच्या अनुसंधान व तादात्म्य यांच्या विचारामुळे, पृथ्वी ते श्रीशिवांपर्यंतच्या तत्त्वांचा अंतःक्षोभ करणारे, "अ"कार ते "क्ष"कारापयंत शब्दज्ञानरूप असलेले, सर्वमंत्रांचे प्राणरूप असलेले व "श्रेष्ठ अहं"चा विचार ज्यात आहे असे जे मंत्रसामर्थ्य त्याचा अनुभव येतो. सर्व काही वाचणारा व वाचनीय ग्रंथादि शब्दसमुदाय मीच आहे, असे ज्ञान सावधान

असणाऱ्या सिद्धयोग्याला होते. त्याला मंत्राच्या सामर्थ्याचा अनुभव येतो. ।।१०६ ते १०८.५।।

याचे स्पष्टीकरण संक्षेपाने करतो. जे पूर्वी विस्ताराने सांगितले आहे त्याचा गोषवारा ऐका.।।१०९।।

भगवती पराशक्ती कुंडलिनी हीच महाह्रद आहे. त्यांच्या म्हणजे श्रीशिवांच्या किंवा तिच्या म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या तादात्म्याचा अनुभव किंवा ज्ञान म्हणजे अनुसंधान होय.।।११०।।

मंत्रवीर्य म्हणजे "सर्व किंवा पूर्ण मी आहे," असा विचार होय. त्याचा अनुभव म्हणजे आत्म्याचे स्पष्ट स्फुरण होय.।।१११।।

ज्यामध्ये स्व-रूपाची उकल केली आहे अशा शांभवोपायाचे प्रकाशन करणारा पहिला उन्मेष येथे संपला.।।११२।।२२।।

**।। इति श्रीकृष्णदासापरपर्यायवरदराजविरचिते श्रीशिवसूत्रवार्तिके शाम्भवोपायप्रकाशनं नाम प्रथम उन्मेषः समाप्तः।।१।।**

**अशा प्रकारे श्रीकृष्णदास ऊर्फ श्रीवरदराज यांनी रचलेल्या श्रीशिवसूत्र वार्तिकातील शांभवोपायप्रकाशन या नावाचा पहिला उन्मेष समाप्त झाला.।।१।।**

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

"**महाह्रदानुसन्धानान्मन्त्रवीर्यानुभवः।।२२।।**" या सूत्रात योगनिष्ठपुरुष ज्यावेळेला स्वात्म्यात राहण्याची इच्छा करतो त्यावेळेला त्याला स्वस्वरूपाचे स्फुरण होते असे सांगितले आहे. महाह्रदाच्या अनुसंधानाने सिद्धयोगी मंत्र-वीर्याचा अनुभव करतो. संविद् ही महाह्रद कशी काय होऊ शकते? तिला महाह्रदत्व कसे काय येऊ शकते? याचे उत्तर देताना ग्रंथकार असे म्हणतात की, संविद् ही खेचरी आदि समस्त प्रवाहांना प्रवर्तित करणारी असल्यामुळे व विश्वाचे प्रतिबिंब सहन करीत असल्यामुळे ती निर्मल आहे. ती विश्वाचे प्रतिबिंब आपल्यात पाडून घेऊनही विश्वाकडून झाकली न जाणारी असल्या-मुळे आणि दिसण्याला अत्यंत दुर्लभ असल्यामुळे गंभीर किंवा खोल आहे. त्यामुळे संविद्चे महाह्रदाशी स्पष्ट सादृश्य आहे. या गुणांमुळे सूत्रकारांनी संविद्ला महाह्रदत्व दिले आहे. या महावीर्याच्या अनुसंधानाने अर्थात् अंतर्मुख-रूपाने निरंतर अथवा सतत त्याच्या तादात्म्याच्या अथवा सामरस्याच्या विमर्शनाने किंवा ज्ञान अर्थात् विचाराने मंत्रवीर्याचा अनुभव येतो. याचा भावार्थ असा आहे की, पुढे सांगण्यात येणाऱ्या शब्दराशींच्या स्फुरणकर्तृत्वाने

युक्त पराहंतारूप विमर्शमय अशा मंत्रवीर्याच्या साक्षात् अनुभवाने निरंतर स्वात्मस्वरूपाचे सिद्धयोग्याला स्फुरण होते.

**विवरण :-** महाह्रदाच्या म्हणजेच संवित्च्या अनुभवाने मंत्राच्या शक्तीचा अनुभव येतो. "**श्रीपातंजलयोगदर्शन**" या ग्रंथाच्या सूत्र ३.४८ मध्ये असे म्हटले आहे की, "बुद्धी किंवा चित्त यांपासून आत्मा भिन्न आहे असे ज्ञान झाल्यानंतर योग्याला सर्वशक्तिमानता आणि सर्वज्ञता प्राप्त होते. ह्रद याचा अर्थ एखादा तलाव किंवा डोहाप्रमाणे असणारा एक मोठा जलाशय आहे. महाह्रद म्हणजे सीमारहित समुद्र होय. जर चित्ताला कूप आणि जीवाला कूपमंडुक असे म्हटले तर त्याच्या उलट समष्टी बुद्धी अर्थात् ज्याच्यात देशकालादि सीमांचा अभाव आहे अशा महत्तत्त्वाला महाह्रद आणि त्या सिद्धयोग्याला सर्वज्ञाची म्हणजेच समुद्राच्या ज्ञात्याची संज्ञा दिली जाऊ शकते. साधकभक्तयोगिशिष्य ज्यावेळेला व्यष्टिचित्तातून वर येऊन समष्टि-चित्तात प्रवेश करतो त्यावेळेला त्याच्या ठिकाणी सर्वज्ञता येते. "**मननात् इति मन्त्रः ।।**" अर्थात् "ज्याचे मनन केले जाते तो मंत्र होय." या व्युत्पत्ती-मुळे मंत्रांची सार्वभौमिकता महद्बुद्धीत समाविष्ट असते. मंत्रांची शक्ती हीच वास्तविक चित्ताची शक्ती आहे व तिचे उद्गमस्थान महत् आहे."

परासंवित्, पराशक्ती, पराहंता, परावाक् आणि स्वातंत्र्य ही सर्व नावे श्रेष्ठ अशा श्रीशिवांच्या स्वचैतन्यशक्तीची अर्थात् कुंडलिनी शक्तीची आहेत.

**या सूत्रात आलेल्या खेचर्यादि चक्रांचे थोडेसे स्पष्टीकरण :-**

खेचरी, गोचरी, दिक्चरी आणि भूचरी या सर्व शक्ती आहेत. खेचरी ही प्रमाता अथवा जीवाशी युक्त आहे. गोचरी ही त्याच्या अंतरिंद्रियांशी संबंधित आहे. दिक्चरी बाह्य इंद्रियांशी संबंधित आहे तर भूचरी ही भाव म्हणजेच बाह्य विषयांशी संबंधित आहे.

शक्तिचक्रे ही वैश्विक चैतन्याचे विषयीकरण सुचवितात. खेचरी चक्रामुळे सर्वज्ञ अशा चैतन्यत्वाच्या अवस्थेपासून संकुचित जीवाच्या रूपात पतन होते. गोचरी चक्रामुळे तो जीव अंतरिंद्रियांना दिला जातो. दिक्चरी चक्रामुळे तो जीव बाह्येंद्रियांच्या ताब्यात जातो. भूचरी चक्रामुळे तो जीव बाह्य पदार्थां-मध्ये मर्यादित होतो.

खेचरी म्हणजे जी आकाशात संचरण करते ती शक्ती होय. येथे आकाश हे चैतन्याचे प्रतीक आहे. या शक्तीचा अधिकार अथवा मर्यादा ही "**ख**" किंवा चैतन्य आहे. गोचरीची मर्यादा ही अंतःकरण किंवा अंतरिंद्रियांपर्यंत

आहे. **"गो"** या संस्कृत शब्दाने हालचाल सुचविली आहे. अंतःकरण हे इंद्रियांचे स्थान आहे. ते इंद्रियांना हालचाल करण्याला प्रवृत्त करते. ते आत्म्याच्या बरोबरीने असणाऱ्या उत्कृष्ट गुणांचे एक शक्तिशाली साधन आहे. त्यामुळेच त्याला गोचरीचे अधिकारक्षेत्र म्हटले आहे. दिक्चरी ही दिशा अथवा जागेत संचरण करणारी शक्ती होय. बाह्य इंद्रिये ही अवकाशाशी संबंधित आहेत. त्यामुळे त्यांना दिक्चरीचे अधिकारक्षेत्र म्हटले आहे. भूचरी या पदातील **"भू"** हा शब्द म्हणजे अस्तित्व होय. त्यामुळे अस्तित्वात असणाऱ्या वस्तू या भूचरीचे अधिकारक्षेत्र आहेत.



# श्रीशिवसूत्रे

## द्वितीय उन्मेष

## दुसरा अध्याय

## द्वितीय विकास

## शाक्तोपाय

### सूत्र क्रमांक १

**संबंध :-** या द्वितीय उन्मेषात शाक्तोपायाच्या द्वारा श्रीशिवस्वरूपाचा अनुभव कसा घ्यावा याचे वर्णन केले आहे. याचा दक्षिण किंवा वामाचारी शाक्तपंथाशी काहीही संबंध नाही. येथे "शक्ती"चा अर्थ "मंत्राच्या सामर्थ्याचा प्रसार किंवा वृद्धी असा आहे. या विभागात प्रथमतः मंत्राचे स्वरूप सांगितले आहे.

"**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात शाक्तोपाय म्हणजे काय? याचे वर्णन करताना असे म्हटले आहे की -

**उच्चाररहितं वस्तु चेतसैव विचिन्तयन्।**
**यं समावेशमाप्नोति शाक्तः सोऽत्रभिधीयते।।२.२२।।**

**अर्थ :-** मंत्राचे उच्चारण केल्याशिवायच आपल्या मनामध्ये त्याच्या अर्थाचे म्हणजेच ध्येयाचे चिंतन करण्याने जो समावेश प्राप्त होतो त्याला शाक्तोपाय असे म्हटले आहे.

शाक्तोपाय ही शांभवोपायाची पूर्व भूमिका आहे. कुंडलिनी शक्ती श्रीसद्गुरु-कृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झाल्यावर जेव्हा ती नाना तऱ्हेच्या क्रिया करून सुषुम्नागामी होण्याचा प्रयत्न करते तेव्हा ती क्रियावतीच्या रूपात दृग्गोचर होते. "**भावनोपनिषद्**" या ग्रंथात क्रियाशक्तीला पीठ अर्थात् आधार आणि ज्ञानशक्तीला कुंडलिनी असे म्हटले आहे. ही ज्ञानवती कुंडलिनी शक्ती शांभवोपायात इच्छाशक्तीच्या रूपात विकसित होते. या उन्मेषात आत्म्याची व्याख्या केलेली नाही. याकरिता शांभवोपायातील "**चैतन्यमात्मा**" हे सूत्र या उन्मेषात गृहित धरले पाहिजे. कुंडलिनी शक्तीच्या अंतर्बाह्य जागृतीला "**उन्मेष**" असे म्हणतात. बाह्यसंसारोन्मुखाने ही शक्ती अखंड जागृत असून ती जीवाला त्याच्या कर्माप्रमाणे भोगाकांक्षादि वासनात लिप्त करून "**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेर्जुन तिष्ठति। भ्रामयन्**

**सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया।।श्रीमद्भगवद्गीता १८.६१।।**" या न्यायाने सतत जन्ममरणचक्रपरंपरेत फिरवीत असते. याला बाह्य "उन्मेष" असे म्हणतात. मात्र ज्यावेळी ही कुंडलिनी शक्ती श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने अंतरतः मूलाधारात जागृत होते त्यावेळी तिच्या या जागृतीला आंतर उन्मेष असे म्हणतात. ज्यावेळी सिद्धयोगसाधकभक्तयोगि-शिष्य या रीतीने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीला सुषुम्नागामी होण्यासाठी सिद्धयोगाचे दीर्घकाल, निरंतर व श्रद्धाभक्तिआदरसत्कारपूर्वक साधन करून वाव देतो त्यावेळी ती ऊर्ध्वगामी होऊन सहस्रारात श्रीशिवांशी समरस होऊन सिद्धयोगसाधकभक्तयोगिशिष्याला श्रीशिवशक्तिसामरस्यावस्था प्राप्त होते. या अवस्थेत कुंडलिनी शक्तीचा सर्व बाह्य उन्मेष आत खेचला जाऊन ती अंतर उन्मेषात लीन होते व साधकभक्तयोगिशिष्याला शांतीची प्राप्ती होते. अशा प्रकारे कुंडलिनी शक्ती जागृत होण्यासाठी या उन्मेषात मंत्रादींचे साधन कथन केले आहे.

**चित्तं मन्त्रः ।।१।।**

**शब्दार्थ :- चित्तम्** - ज्याच्यामुळे परतत्त्व जाणले किंवा अनुभवले जाते ते अर्थात् "**चितिरेव चेतनपदादवरूढा चेत्यसङ्कोचिनी चित्तम्।।**" म्हणजे "ज्यावेळी चितिशक्ती कुंडलिनी श्रीशिवरूप चेतनपदापासून खाली उतरून चैतन्याचा संकोच करते त्यावेळी ती चित्त या नावाने ओळखली जाते."
**मन्त्रः - सामान्य अर्थ** :- देवतेला उद्देशून असलेला अक्षर वा शब्द समुदाय. उदाहरणार्थ सोऽहम्! ॐ नमः शिवाय!; पण येथील विशिष्ट अर्थ असा आहे की, मंत्रात गुप्त असलेल्या श्रीपरमेश्वररूपाशी आपला आंतरिक अभेद आहे व परतत्त्वापेक्षा आपण भिन्न नाही अशी मानसिक जाणीव (awareness) होऊन किंवा अनुभूती येऊन देवतेशी चित्त समरस होणे होय.

**अर्थ :-** चित्त म्हणजे श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेली कुंडलिनी शक्ती हाच मंत्र आहे अगर शाक्तपरामर्शाने रंगलेले आराधन अथवा सिद्धयोगसाधन करणाऱ्याचे मन आहे. हे मन अहंपरामर्शात मग्न होते किंवा मंत्रात गुप्त असलेले परतत्त्व त्याच्यामुळे जाणले जाते. हे परतत्त्व किंवा श्रीपरमेश्वर व आपण भिन्न नाही अशी तीव्र आंतरिक जाणीव असलेले आणि अशा रीतीने देवतेशी किंवा परतत्त्वाशी एकरूप व समरस झालेले चित्त हे मंत्र किंवा मंत्ररूप असते.।।१।।

**विशेष व्याख्या :-** ज्याने परमतत्त्वाचे विमर्शन अथवा ज्ञान किंवा विचार केला जातो त्याला चित्त असे म्हणतात. शाक्त किंवा शांभवप्रणव म्हणजे "**ह्रीं**" अथवा प्रासादप्रणव म्हणजे "**सौः**" यांच्या द्वारा प्रमातृदशेत म्हणजे जीवदशेत अभेदरूपाने विमर्श करणे म्हणजेच विचार करणे हाच मंत्र होय. भेदमय संसाराचे प्रशमनरूप त्राण म्हणजेच भेदाचा नाश करून जीवाला परमात्मशक्तीशी त्याच्या अभिन्नत्वाचे ज्ञान करून देऊन त्याचे रक्षण करणे म्हणजेच मंत्र होय.

येथे सिद्धयोगसाधकभक्तयोगिशिष्याचे मनच मंत्र होऊन जाते. मंत्रदेवतेच्या विमर्शाने सामरस्य स्थितीला प्राप्त झालेल्या आराधकाचे चित्त हाच मंत्र आहे. केवळ "**ह्रीं**" इत्यादि मंत्रांचे उच्चारण करणे हा मंत्र नव्हे.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**शिवो भूत्वा शिवं यजेत्।।**

**अर्थ :-** श्रीशिव होऊन म्हणजेच प्रमातृभावात स्थिर होऊन साधकभक्त-योगिशिष्याने श्रीशिवांचे यजन किंवा आराधना करावी.।।१।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

आता शाक्तोपाय सांगत आहेत. शक्ती अर्थात् विश्वाला प्रकट करणारी पूर्णाहंता म्हणजे पराशक्ती किंवा संविच्छक्ती ही मंत्रवीर्याचे प्रकटन करणारी आहे, असे प्रथम उन्मेषाच्या शेवटच्या सूत्रात सांगितलेले शक्तिस्वरूपवर्णन घेऊनच दुसरा उन्मेष सुरू करणारे ग्रंथकार मंत्रस्वरूपाचे निरूपण करीत आहेत.

"**चित्तं मन्त्रः।।१।।**" अर्थात् मंत्राने परतत्त्वाचा विचार केला जात असल्यामुळे त्याला चित्त असे म्हणतात. हे चित्त पूर्णस्फुरणरूप तत्त्वासहित प्रासादप्रणवादींचा विचार करणारे संवेदनरूप असते. त्या चित्तालाच गुप्तपणे मंत्रणा म्हणजे मंत्र प्रेरित करतो. (मनु-अवबोधने अर्थात् जाणणे व तृ पाळणे अर्थात् पालन करणे या धातूपासून "मंत्र" हा शब्द व्युत्पन्न झालेला आहे.) श्रीपरमेश्वररूपाचा याच्याकडून आंतरिक अभेदाने विचार केला जातो म्हणून "**मंत्र**" अशी संज्ञा दिली जाते. त्यामुळेच चित्ताच्या ठिकाणी परमस्फुरत्ता-रूप मननधर्म व भेदमय संसाराचा नाश करणारा प्राणधर्म अर्थात् रक्षणधर्म आहे असे म्हटले जाते.

शिवाय मंत्रदेवताविमर्शपर अर्थात् मंत्रदेवतेच्या विचारात असणाऱ्या त्या मंत्रदेवतेशी सामरस्य प्राप्त केलेले म्हणजे मंत्राच्या अधिदेवतेशी ऐक्य प्राप्त

केलेले आराधकाचे चित्त हेच मंत्र होय. मंत्र म्हणजे विविध प्रकारच्या वर्णांचा समूह नव्हे.

यासंबंधी "**श्रीमत्सर्वज्ञानोत्तर**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**उच्चार्यमाणा ये मन्त्रा न मन्त्राश्चापि तान्विदुः।**
**मोहिता देवगन्धर्वा मिथ्याज्ञानेन गर्विताः।।**

**अर्थ :-** जे उच्चार करण्यात येणारे मंत्र आहेत त्यांना मंत्र असे म्हणत नाहीत. मोहात पडलेले देवगंधर्व या मिथ्या म्हणजेच खोट्या ज्ञानाने मोहित किंवा भ्रमित झालेले आहेत.

"**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथातही असे म्हटले आहे की -

**मन्त्राणां जीवभूता तु या स्मृता शक्तिरव्यया।**
**तया हीना वरारोहे निष्फलाः शरदभ्रवत्।।**

**अर्थ :-** हे सुंदरी! मंत्रांची प्राणभूत अशी अव्यय म्हणजे कधीही व्यय न पावणारी पूर्णाहंविमर्शाने युक्त कुंडलिनी संविच्छक्ती सांगितली आहे. तिच्याशिवाय मंत्रांना शारदीय मेघाप्रमाणे निष्फलत्व येते.

त्याचप्रमाणे "**श्रीश्रीकंठीयसंहिता**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**पृथङ्मन्त्रः पृथङ्मन्त्री न सिद्ध्यति कदाचन।**
**ज्ञानमूलमिदं सर्वमन्यथा नैव सिद्ध्यति।।**

**अर्थ :-** मंत्र व मंत्री यांचे वेगळेपण कधीही सिद्धिप्रद होत नाही. हे सर्व ज्ञानमूलकच आहे. या ज्ञानाशिवाय सिद्धीची आशा करणे व्यर्थ होय.

वाच्यवाचक यांच्या अभेदोपचारामुळे मंत्र ही मंत्रदेवताच होय. अशा प्रकारे जर मंत्री व मंत्रदेवतेमध्ये आराध्य अर्थात् आराधना करण्याला योग्य व आराधक भावाने वेगळी बुद्धी असली तर सिद्धी होत नाही. मनन व त्राण-धर्मामुळे मंत्र हे ज्ञानशक्तीत असणारी ज्ञानशक्ती प्राप्त झाल्याने महावीर्य किंवा महासामर्थ्यसंपन्न होतात. हे सर्व मंत्र सिद्धी देणारे व प्रत्येक नियत कार्य संपादन करण्याला समर्थ होतात.

हेच "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात पुढीलप्रमाणे प्रतिपादित केले आहे.

**तत्रैव सम्प्रलीयन्ते शान्तरूपा निरञ्जनाः।**
**सहाराधकचित्तेन तेनैते शिवधर्मिणः।।२.२७।।**

**अर्थ :-** दुसरीकडे हे मंत्र मायेच्या काजळीपासून अलिप्त होऊन, संसारातील भोगसिद्धीपासून निवृत्त होऊन आणि शुद्ध संविद्रूप किंवा शांतरूप अर्थात् ज्यांचे विशिष्ट देवतास्वरूप समाप्त झालेले असे होऊन भक्ताच्या किंवा

आराधना करणाऱ्या व्यक्तीच्या चित्तासह त्याच ठिकाणी सामान्य स्पंदरूप चिदाकाशात किंवा स्पंदतत्त्वात विलीन होतात. या कारणामुळे हे सर्व मंत्र श्रीशिवस्वरूप आहेत.।।२.२७।।

ज्यांच्यात श्रीशिवस्वरूप श्रीपरमेश्वराचे अनन्यसाधारण सर्वज्ञत्वादि गुण म्हणजेच धर्म राहतात ते मंत्र होत. ते मंत्र मननत्राणरूप व श्रीशिवस्वरूपाहून अभिन्न आहेत.।।१।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

**अथ सहजविद्योदयाख्यः द्वितीयः प्रकाशः।**

**संबंध :-** सर्वज्ञानक्रियायुक्त आत्म्याला अर्थात् जीवाला श्रीशिवत्त्व आहे, हे मागील प्रकाशात सांगितले. तसेच मंत्रवीर्याचे स्वरूपही सांगितले. या प्रकरणात मंत्राचे स्वरूप, वीर्य वगैरे सांगितले आहे. खरा मंत्र कोणता? व त्याचे वीर्य कोणते? या प्रश्नांची उत्तरे स्वतः अजन्मा भगवान् श्रीशिवांनी या प्रकाशात सांगितली आहेत.।।१-२।।

**चित्तं मन्त्रः।।१।।**

**अर्थ :-** चित्त किंवा मन हाच खरा मंत्र होय.।।१।।

**स्पष्टीकरण :-** ज्यांच्यावर तीव्रतर शक्तिपात झालेला आहे त्यांनाच प्रथम प्रकाशात सांगितलेला उपाय करता येण्यासारखा आहे. ज्यांना मंद शक्तिपात झालेला आहे त्यांना मंत्रवीर्य मिळविण्यासाठी दुसरा उपाय उपेयपद प्राप्तीसाठी म्हणजेच श्रीशिवशक्तिसामरस्यासाठी सांगितला आहे. या उपायात वारंवार ऐकलेल्या विषयाचे अस्पष्ट स्मरण करणे, क्रमाने स्पष्ट ज्ञान होईपर्यंत विकल्पांवर संस्कार करणे, मंत्रादींचा विचार करणे इत्यादि गोष्टी येतात. या गोष्टी केल्यामुळे परस्फुरत्तेचे म्हणजेच पराशक्तीचे संवेदन अर्थात् ज्ञान होते आणि भेदप्रथेचा अर्थात् द्वैताचा उपशम होऊन सहजविद्येचा उदय होतो. चित् किंवा चैतन्य हेच पूर्वी विश्वक्रीडा करण्याच्या इच्छेने देशकालादि परिच्छेदांनी रहित अशा चिन्मयपदवीपासून खालच्या भूमिकेवर येते. ते मर्यादित पदार्थांचे ग्रहण करते व संकुचित वृत्तीचे बनते. त्यावेळेला त्याला "चित्त" असे म्हटले जाते. तेच चित्त पुन्हा स्वपदाची प्राप्ती करण्यासाठी पायरी-पायरीने मर्यादित स्वरूपात ग्रहण केलेले ज्ञान सोडून नियमनशील चित्प्रकाशमय श्रीशिवरूप बनते. त्यामुळे ते मन वेद्यवस्तूंचा उपसंहार करून अंतर्मुख होऊन स्वातंत्र्यामुळे स्वतेजाचा अर्थात् शक्तीचा विचार करावयाला समर्थ किंवा योग्य होते. या शक्तीचा परामर्श अर्थात् विचार किंवा ज्ञान

करावयाचा स्वभाव हा चित्त आणि मंत्र यांचा एकच असल्याने चित्त व मंत्र या दोघांमध्ये अभेद आहे, असे औपचारिकतेने म्हटले आहे.

चित्त हेच श्रीशिव आहे. ते सर्व प्रमाणांना जाणणारे व निरुपाधिक अर्थात् उपाधिरहित म्हणजेच कोणत्याही विशेष गुणांनी रहित आहे. त्याच्या ठिकाणी सर्वज्ञतादि गुण आहेत. ते देशकालांच्या पलीकडे आहे. त्याच्या ठिकाणी स्वात्म्याचा अनुभव घेण्याचा धर्म आहे. श्रीशिवही या सर्व गुणांनी युक्त आहेत. त्यामुळे या चित्ताला "**मंत्र**" अशी संज्ञा आहे.।।३।।१।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**चित्तं मन्त्रः।।१।।**" अर्थात् "मंत्रदेवतांचा विचार ज्यामध्ये प्रामुख्याने असेल आणि त्या विचारांशी जे समरस झाले असेल असे साधकभक्तयोगि-शिष्याचे किंवा आराधकाचे चित्त हेच मंत्र होय."।।१।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे श्रीब्रह्मदेवाने अर्थात् श्रीपरमेश्वराने शांभवोपाय सांगून झाल्यावर आता त्याच्या आत असलेला शाक्तोपाय सांगण्याला सुरुवात केली आहे.।।१।।

त्यापैकी शक्ती ही महामंत्राच्या वीर्याचा विस्तार करणारी आहे, असे प्रथम उन्मेषापर्यंत सांगून झाले.।।२।।

या शक्तीच्या स्वातंत्र्याचे विवेचन केल्यानंतर उन्मेषातील काही आंतरिक भाग दाखविताना मंत्रांचे स्वरूप सांगितले आहे.।।३।।

"**चित्तं मन्त्रः।।१।।**" अर्थात् "ज्याच्यामुळे परम स्वात्मतत्त्वाचा विचार होतो ते चित्त म्हणजेच मंत्र होय;" कारण आत्म्याच्या प्रसन्नतेबद्दल तेच विचार करते व स्वस्वरूपाशी सर्वांचा अभेद असल्याचे ज्ञान करून देते. त्यामुळे देशिकांनी म्हणजे श्रीसद्गुरूंनी या चित्ताला "**मंत्र**" अशी संज्ञा दिली आहे;।।४-५।।

कारण या चित्तात ज्याप्रमाणे पूर्णाहंतेच्या अनुसंधानाने आत्मस्फुरणाचे मनन करण्याचा धर्म आहे त्याप्रमाणेच संसाराचा क्षय करून त्राण म्हणजेच रक्षण करण्याचा धर्म आहे.।।६।।

त्या मंत्राच्या देवतेचा विचार व देवतेशी समरसता हे सर्व साधकाचे चित्तच करते. त्यामुळे या चित्तालाच "**मंत्र**" असे म्हटले आहे.।।७।।१।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

तीव्रशक्तिपात झालेल्या सुप्रबुद्ध योग्यांसाठी शांभवोपायात तत्त्वोपदेश

केला; परंतु मध्यम अधिकाऱ्यांनीही ज्ञानवान् व्हावे यासाठी आता शाक्तांचा उपाय सांगत आहेत. त्यात आधीच्या प्रकरणात शक्ती म्हणजेच परसंविच्छक्ती अर्थात् कुंडलिनी शक्ती ही पूर्णाहंतेने युक्त व मंत्रवीर्याचा विस्तार करणारी आहे असे सांगितले. या ठिकाणी कोणता बरे मंत्र असावा? अशा जिज्ञासेने आता "**चित्तं मन्त्रः ।।१।।**" असे सूत्र सांगून मंत्राच्या स्वरूपाचे विवेचन करीत आहेत. "**चेत्यते विचार्यते परतत्त्वम् अनेन इति चित्तम्।।**" अर्थात् "परतत्त्वाचा विचार ज्याच्याकडून होतो त्याला चित्त असे म्हटले आहे." याचा दुसरा अर्थ असाही होतो की, चित्त हे अहंस्फुरणात्मक तत्त्वासहित विशेष तेजस्वी अशा प्रणवादींचा परामर्श किंवा विचाररूप संवेदनाचे गोपनीय किंवा गुप्तरूपाने मंत्रणा किंवा विचार करते. अंतरानुसंधानात्मक अभेदरूपाने श्रीपरमेश्वराचे स्वरूप याच्याकडून विमृशित केले जाते अर्थात् त्या स्वरूपाचा विचार केला जातो म्हणूनही त्याला "**मंत्र**" असे म्हटले आहे. यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की, "**स्वात्मानुभवधर्मित्वात् स मन्त्र इति गीयते।।**" अर्थात् "चित्ताला स्वात्म्याचा अनुभव येत असल्यामुळे त्याला "**मंत्र**" असे म्हटले आहे." त्यामुळे मंत्राच्या ठिकाणी परस्फुरणस्वरूप मननधर्म म्हणजेच पराशक्तीच्या स्फुरणाचे मनन अथवा विचार हा धर्म आणि भेदात्मक अर्थात् द्वैतात्मक संसाराची शांती करण्याच्या रूपाचा त्राणधर्म म्हणजेच रक्षणधर्म आहे, असे म्हटले जाते.

मंत्रदेवतेचे स्मरण केल्याने मंत्रदेवतेशी ऐक्य प्राप्त होते. असे ऐक्य प्राप्त झालेल्या आराधकाचे चित्त हेच मंत्र होय. विविध वर्णांचा समुदाय म्हणजे मंत्र नव्हे.

यासंबंधी "**श्रीसर्वज्ञानोत्तर**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**उच्चार्यमाणा ये मन्त्रा न मन्त्राश्चापि तान्विदुः।**
**मोहिता देवगन्धर्वा मिथ्याज्ञानेन गर्विताः।।**

**अर्थ :-** जे उच्चार करण्याला योग्य असे मंत्र आहेत ते खरे मंत्र नाहीत. गर्विष्ठ असे देवगंधर्व हे या खोट्या ज्ञानाने मोहित झालेले आहेत.

त्याचप्रमाणे "**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**मन्त्राणां जीवभूता तु या स्मृता शक्तिरव्यया।**
**या हीना वरारोहे निष्फला शरदभ्रवत्।।**

**अर्थ :-** हे सुंदरी! मंत्रांची प्राणभूत अशी जी अव्यय शक्ती आहे तिच्याशिवाय हे मंत्र शारदीय मेघांप्रमाणे निष्फल ठरतात.

अशा प्रकारे मंत्री अर्थात् मंत्र म्हणणारा व मंत्रदेवता यांच्यामध्ये आराध्य आणि आराधक अशी भिन्नबुद्धी मानणाऱ्याला सिद्धी प्राप्त होत नाहीत; कारण मननत्राणरूप मंत्र हे ज्ञानशक्तीमध्ये स्थित असतात. त्यामुळेच ज्ञानशक्तिरूप महान् सामर्थ्य प्राप्त झालेले मंत्र सर्व सिद्धी देणारे होतात.

यासंबंधी श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**तदाक्रम्य बलं मन्त्राः सर्वज्ञबलशालिनः ।**
**प्रवर्तन्तेऽधिकाराय करणानीव देहिनाम् ।।२.२६।।**
**तत्रैव सम्प्रलीयन्ते शान्तरूपा निरञ्जनाः ।**
**सहाराधकचित्तेन तेन ते शिवधर्मिणः ।।२७।।**

**अर्थ :-** प्रत्येक प्रकारचे मंत्र त्या स्पंदरूप आत्मबळाशी तादात्म्य प्राप्त केल्याने सर्वज्ञता, तृप्ती, अनादिबोध, अप्रतिहत स्वातंत्र्यशक्तीचा अडथळारहित प्रसार आणि विश्वरूपामध्ये विकसित असलेले अनंत शक्तींचे ऐश्वर्य या सहा प्रकारच्या माहेश्वर बलांना प्राप्त करून घेऊन शोभित होऊ लागतात. अशा परिस्थितीत कोणतेही मनोवांछित कार्य अधिकारपूर्वक सिद्ध करण्यासाठी हे मंत्र जितक्या सहजपणे प्रवृत्त होतात तितक्या सहजपणे शरीरधारींची इंद्रिये केवळ संकल्पानेच आपापली कार्ये सिद्ध करीत असतात. ।।२.२६।।

दुसरीकडे हे मंत्र मायेच्या काजळीपासून अलिप्त होऊन, संसारातील भोगसिद्धींपासून निवृत्त होऊन आणि शुद्ध संविद्रूप किंवा शांतरूप अर्थात् ज्यांचे विशिष्ट देवतास्वरूप समाप्त झालेले आहे असे होऊन भक्ताच्या किंवा आराधना करणाऱ्या व्यक्तीच्या चित्तासह त्याच ठिकाणी सामान्य स्पंदरूप चिदाकाशात किंवा स्पंदतत्त्वात विलीन होतात. या कारणामुळे हे सर्व मंत्र श्रीशिवस्वरूप असतात. ।।२७।।

अनुत्तरधामरूप परम श्रीशिवांच्या ठिकाणी अनन्यसाधारण सर्वकर्तृत्व-ज्ञातृत्वादि गुणधर्म असतात. त्यामुळेच हे मंत्र मननत्राणरूप असून भगवान् परम श्रीशिवांच्या ठिकाणी अभिन्नरूपाने स्थित असतात. ।।१।।

**विवरण :-** चैतन्य हे चित्तावर प्रकाशिलेला आत्म्याचा प्रकाश आहे. येथे त्याला "**मंत्र**" ही उपाधी दिली आहे. चित्ताला मंत्र का म्हटले आहे ? हे विचारणीय आहे. मंत्र हा विद्यासिद्धीचे साधन असतो. मंत्राच्या जपादि द्वारा त्याच्याशी संबंधित असलेल्या विद्येची जागृती चित्तातच होते. त्यामुळे विद्येचे वास्तविक स्थान चित्त आहे. जपादि हे तर चित्ताची केवळ क्रिया आहे.

त्यामुळे मंत्राचे स्थान गौण किंवा दुय्यम आहे.

श्रीसद्गुरुदेव मंत्रांद्वारा दीक्षा देतात हे पहिल्यांदा सांगितले आहेच. येथे चित्ताला मंत्र म्हणण्याचा अभिप्राय असा आहे की, शक्तिपातयोगदीक्षेमध्ये स्पर्शादींद्वारा शक्तीचे जागरण होते. त्या ठिकाणी मंत्रांची अपेक्षा असत नाही; कारण चित्तामध्ये शक्तीचा प्रादुर्भाव झाल्यानंतर मंत्रचैतन्यासारखे लक्षण प्रतीत होऊ लागते. चेतन असल्याकारणानेच कुंडलिनी शक्तीला चितिशक्ती असे म्हटले जाते. ही चितिशक्ती चिन्मात्र ब्रह्माची एकमेव शक्ती आहे. चित्त हे चितिशक्तीच्या एखाद्या ग्रंथीप्रमाणे आहे. मंत्राच्या शक्तीचे मूळ तर चितिशक्तीच आहे. चिदाकाश आणि चित्ताकाश हेही क्रमशः चिति आणि चित्त यांचे पर्याय आहेत. त्यांच्यामध्ये कोणाच्याही मदतीशिवाय अनेक विद्यांची जागृती झालेली पाहावयास मिळते.

मंत्रांमध्ये शक्ती असते आणि मंत्र किंवा वर्णांची पदे असतात. त्यामुळे मंत्रांच्या शक्तीचा आधार वर्णांची शक्ती आहे. हे वर्ण मंत्ररूपच आहेत. एकाक्षरी कोशात सर्व वर्णांचा अर्थही सांगितलेला आहे. वर्णांना मातृका असेही म्हणतात व वर्णांच्या शक्तीला मातृकाशक्ती असे म्हटले जाते. शांभवोपायाच्या चौथ्या सूत्रात "**ज्ञानाधिष्ठानं मातृका।।१.४।।**" अर्थात् "ज्ञानाचे अधिष्ठान मातृका आहेत," असे म्हटले असून हे ज्ञान म्हणजे क्रियारूप वैखरीचा विषय आहे. मंत्रांच्या शक्तीचा वाक्‌शक्तीशी संबंध आहे किंवा वाक्‌शक्तीच मंत्रशक्तीचा आधार आहे असे म्हणावयाला हरकत नाही. त्यामुळेच मंत्रांचा जप केला जातो. मनन करण्याच्या वेळेला मनाचा बुद्धीशी संबंध असतो. हा इच्छारूप मध्यमेचा विषय आहे. बुद्धी आणि मन हे निर्विषय झाल्यानंतर चित्ताची एकाग्र भूमिका येते. तेथे फक्त निर्विषय असे ध्यान शिल्लक राहते. यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की, "**ध्यानं निर्विषयं मनः।।**" अर्थात् "मन निर्विषय म्हणजेच विषयांनी रहित होणे हेच ध्यान होय." हा ज्ञानरूप पश्यंतीचा विषय आहे. अशा प्रकारे हा क्रम समजला असता मंत्रांचा चित्ताशी असलेला संबंध स्पष्ट होतो. परावाणीचे स्थान आत्मतत्त्व आहे. ती सर्वांचे केंद्र आहे.

त्यामुळे या सूत्रात मंत्र, वाक्, मन, बुद्धी आणि चित्त या सर्वांचाच समावेश होतो. चित्ताचा आधार महत्तत्त्व अर्थात् हिरण्यगर्भ बुद्धी आहे. त्यामुळे चित्ताच्या शक्तीचे मूलस्थानही महत्तत्त्वालाच समजले पाहिजे. चित्ताच्या चिंतनासहित मंत्राचा जप करण्याने मंत्र वीर्यवान् किंवा सामर्थ्यवान् होतो.

वास्तविक हा सर्व पसारा एका चितिशक्ती कुंडलिनीचाच आहे.।।१।।

**विवरणात्मक टीपा :-**

वरील टीकांमधील काही पारिभाषिक संज्ञांचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे.

**(१) प्रासाद :-** श्रीशैवदर्शनातील हा शब्द तांत्रिक शब्द असून त्याचा अर्थ कोणत्याही शब्दकोशात मिळणे शक्य नाही. "सौः" या मंत्राचे नाव प्रासाद असे आहे. या मंत्रात सर्व विश्वाच्या उभारणीचे रहस्य साठविलेले आहे. हा मंत्र स् + औ + : असा तयार झालेला असून यातील "स" म्हणजे सत् अर्थात् पृथ्वीपासून मायातत्त्वापर्यंत असलेल्या श्रीशैवतत्त्वज्ञानातील एकतीस तत्त्वांचा प्रतिनिधी आहे. "अस्" या धातूला "अत्" हा प्रत्यय लागून "सत्" हा शब्द तयार झाला. "सत्" या शब्दाचा अर्थ प्रत्यक्ष असणे असा आहे.

"सत्" मधील "त्" हे अक्षर गाळून "सौः" हा मंत्र तयार झाला आहे. "स" हे अक्षर पृथ्वीपासून मायेपर्यंतच्या एकतीस तत्त्वांचे प्रतिनिधित्व करीत असते तर "औ" हे अक्षर शुद्धविद्या, श्रीईश्वर व श्रीसदाशिव या तत्त्वांचे प्रतिनिधित्व करीत असते आणि ही तत्त्वे ज्ञान व क्रिया यांनी परिपूर्ण असतात. या मंत्रातील ":" विसर्गातील वरच्या बिंदूचा अर्थ श्रीशिव असा असून खालच्या बिंदूचा अर्थ शक्ती असा आहे. अशा प्रकारे "सौः" हा मंत्र सर्व छत्तीस तत्त्वांचे प्रतिनिधित्व करतो. "सौः" हे मंत्रबीज श्रीशिवांचे हृदय-बीज आहे. या बीजाशी सामरस्य साधणारा मंत्रजप करणारा साधकभक्तयोगि-शिष्य हा श्रीशिवरूप होऊन संसारमुक्त होतो.

**(२) प्रणव :-** प्रणव अर्थात् "ॐ" हा अत्यंत रहस्यमय व पवित्र मंत्र आहे. श्रीशैवागमानुसार प्रणव हा पुढील चार प्रकारांचा आहे. (१) वैदिक प्रणव "ॐ" हा आहे. (२) श्रीशैव प्रणव "हूं" आहे. (३) शाक्त प्रणव "क्लीं" आहे. (४) माया प्रणव "ह्रीं" आहे.

**(३) शांतरुपायः :-** याचा अर्थ असा आहे की, सर्व द्वैतभाव निघून जाऊन फक्त शुद्ध आत्मस्वरूप शिल्लक राहणे होय.

**(४) निरंजन :-** श्रीअभिनवगुप्तपादाचार्य यांच्या मते **"न अञ्जन्ते प्रकृतिक्रियान्ते प्रमेयरूपेण इति निरञ्जनः।।"** अर्थात् "वस्तू अथवा प्रमेयरूपाने जे कधीही प्रकट केले जात नाही ते निरंजन होय." मंत्र हे नेहमी स्व-स्वरूपाच्या जाणिवेने परिपूर्ण असतात. या प्रमातास्वरूपामुळे म्हणजे विषयस्वरूपामुळे ते प्रमेयस्वरूप अर्थात् वस्तुस्वरूप होऊ शकत नाही.।।१।।

## सूत्र क्रमांक २

**संबंध :-** या आराधनेसाठी प्रयत्न अर्थात् अभ्यास करण्याची अत्यंत आवश्यकता आहे अर्थात् मंत्र साध्य कसा करावा याविषयी श्रीशिव पुढील सूत्रातून मार्गदर्शन करतात.

**प्रयत्नः साधकः ।।२।।**

**शब्दार्थ :- प्रयत्नः** - श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेमुळे अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्य शक्ती कुंडलिनी जागृत होऊन तिच्या कडून स्वतःहूनच नानाविध मंत्राचे उच्चारण, प्रकटीकरण किंवा अनुसंधान होणे म्हणजे उत्साहपूर्वक, आतूनच आपोआप स्वाभाविकपणे व अकृतक म्हणजे काहीही न करता तो होणे. **साधक :-** (प्रयत्न हा) जपकर्त्याचा मंत्रदेवतेशी तादात्म्य करणारा किंवा घडवून आणणारा असतो. (मन्त्रदेवता-तादात्म्यप्रदः)

**अर्थ :-** आतून आपोआप होणारे मंत्राचे अनुसंधान अर्थात् मंत्रजप हा मंत्रदेवतीशी तादात्म्यरूपी फल देणारा असतो म्हणजे सिद्धयोगांतर्गत श्रीसद्गुरु-कृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने मूलाधारात जागृत झालेल्या अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्य कुंडलिनी शक्तीकडून स्वतःहूनच आतून आपोआप होणाऱ्या नानाविध मंत्रांचे अनुसंधान अर्थात् मंत्रजप हा मंत्रदेवतेशी तादात्म्यरूपी फल प्राप्त करून देणारा असतो म्हणजे जो स्वाभाविक किंवा सहज प्रयत्न होतो तो अर्थात् ही कुंडलिनी शक्ती स्वतःच स्वतःसिद्ध साधन करून मंत्रजप करणाऱ्या सिद्धयोगसाधकाचे मंत्रदेवतेशी तादात्म्य करते.।।२।।

**विशेष व्याख्या :-** पहिल्या विकासामध्ये शांभवोपायाने परिपूर्ण असा अहं-परामर्श करण्यासाठी म्हणजेच "स्व" चे यथार्थ ज्ञान मिळविण्यासाठी उद्योग करण्याची आवश्यकता सांगितली आहे. "**उद्यमो भैरवः ।।१.५।।**" या सूत्रात वरील प्रतिपादन केले आहे. आता या सूत्रात शाक्तोपायानेही योग्याच्या चित्ताला अहं-परामर्शात मग्न करण्याची आवश्यकता सांगितली गेली आहे. यासाठी एवढीच आवश्यकता आहे की, अभ्यास स्वाभाविक बनला पाहिजे. ज्याप्रमाणे ससाणा पक्षाचे दूरवरच्या मांसाच्या तुकड्यावर लक्ष गेल्यावर तो इतर सर्व काही विसरून तत्काळ त्याच्यावर झडप घालतो व हे त्याचे करणे अत्यंत स्वाभाविक असते त्याप्रमाणेच साधकभक्तयोगि-शिष्याचे मन परप्रकाशाचे स्वाभाविक व सहजतेने ग्रहण करते. त्यामुळे हा अभ्यास सहज बनविण्यासाठी कुंडलिनी शक्तीकडून आपोआप होणाऱ्या अभ्यासाची आवश्यकता आहे.।।२।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

"**प्रयत्नः साधकः।।२।।**" अर्थात् "या मंत्राचा प्रयत्न म्हणजे श्रीसद्गुरु-कृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेली कुंडलिनी शक्ती हीच साधक असते म्हणजे तीच आतून जागृत झाल्यावर नानाविध मंत्रोच्चारण करून साधनरूप होऊन साध्याशी म्हणजे सहस्रारात श्रीशिवांशी एकरूप होते."

उक्तरूपी मंत्राचा अनुसंधानाच्या इच्छाविषयक श्रेष्ठ प्रतिभोन्मेषाच्या निरोधाविषयी जो अकृत्रिम म्हणजे नैसर्गिकरीत्या होणारा प्रयत्न आहे तोच साधक आहे. साधक म्हणजे मंत्रकर्त्याचे मंत्रदेवतेशी तादात्म्य प्राप्त करून देणारा होय.

यासंबंधी "**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**आमिषं तु यथा स्वस्थः सम्पश्यंशकुनिः प्रिये।**
**क्षिप्रमाकर्षयेद्यद्वद्वेगेन सहजेन तु।।**
**तद्वदेव हि योगीन्द्रो मनो बिन्दुं विकर्षयेत्।**
**यथा शरो धनुःसंस्थो यत्नेनाताड्य धावति।।**
**तथा बिन्दुर्वरारोहे उच्चारेणैव धावति।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे आकाशात फिरणारा पक्षी पृथ्वीवरील मांसखंड पाहताच सहजवेगाने खाली येतो त्याप्रमाणेच साधकभक्तयोगिशिष्याने मनाला अविभक्त अर्थात् एकत्रित प्रकाशरूप बिंदूकडे न्यावे. हे सुंदरी! ज्याप्रमाणे धनुष्यात असणारा बाण प्रयत्नाने खेचून सोडल्यावर वेगाने धावतो त्याप्रमाणे बिंदू हा उच्चाराबरोबरच धावतो.

बिंदूविषयी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**उदितायां क्रियाशक्तौ सोमसूर्याग्निधामनि।**
**अविभागः प्रकाशो यः स बिन्दुः परमो हि नः।।**

**अर्थ :-** चंद्र, सूर्य व अग्नी यांच्या स्थानी उदित किंवा जागृत झालेल्या क्रियाशक्तीमध्ये जो अविभक्त म्हणजेच वेगळेपणा नसलेला प्रकाश आहे तोच आमचा सर्वश्रेष्ठ बिंदू होय.

शास्त्रात अन्य ठिकाणीही "**तद्ग्रहो मन्त्रसद्भावः।।**" अर्थात् "त्याचे म्हणजे प्रकाशाचे किंवा श्रीईश्वराचे ग्रहण म्हणजे मंत्रसद्भाव अर्थात् मंत्राचे अस्तित्व होय," असे म्हटले आहे. ते ज्ञान म्हणजेच मंत्रसद्भाव किंवा मंत्रवीर्य अर्थात् मंत्रांचे सामर्थ्य होय.

येथे सिद्धयोगींद्र कोणतीही कृती न करता सहज अशा आपल्या उद्योगाच्या

बलाने किंवा सामर्थ्याने मन म्हणजेच कर्म व बिंदूला आकर्षून घेतो अर्थात् परप्रकाशयुक्तता प्राप्त करवून देतो. त्याचप्रमाणे बिंदू म्हणजे परप्रकाश हा सहज उच्चारानुसार धावतो म्हणजेच पसरतो.

उच्चाराने म्हणजेच विमर्शरूपाने किंवा विचाररूपाने होय. स्थान, करण म्हणजे साधन व प्रयत्न या सर्वांच्या साहाय्याने उत्पन्न होणाऱ्या बीजाक्षररूप म्हणजेच अक्षररूप उच्चाराने नाही; कारण अशा प्रकारचा व्यक्त उच्चार हा आणवमलात पर्यवसित होऊ शकतो किंवा रूपांतरित होऊ शकतो. पर-प्रमात्यात म्हणजेच परमात्म्यात विश्रांती घेण्यासाठी हा बिंदू सहज उद्योगाच्या क्रियेने युक्त होऊन विमर्शाने किंवा विचाराने व्यक्त होतो. उच्चार म्हणजे उत् चार अर्थात् वरच्या बाजूला हालचाल करणे किंवा वर चढणे. या सूत्रात उच्चार या पदाचा अर्थ मनाची किंवा चित्ताची ऊर्ध्वगतीकडे म्हणजेच अहंविमर्शाच्या श्रेष्ठ प्रकाशाकडे जाण्याची हालचाल असा आहे.

हाच भावार्थ खालील "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील कारिकेतही आला आहे.

**अयमेवोदयस्तस्य ध्येयस्य ध्यायिचेतसि।**
**तदात्मतासमापत्तिरिच्छतः साधकस्य या।।४.३१।।**

**अर्थ :-** मंत्रदेवतेचे ध्यान करणाऱ्या साधकभक्ताच्या किंवा योगिशिष्याच्या चित्तात मंत्ररूप ध्येयाचा उदय होणे म्हणजेच साधकाचे मंत्रदेवतेशी पूर्णपणे एकरूप होणे यालाच साक्षात्कार असे म्हणतात.।।४.३१।।

"**तदात्मतासमापत्तिः।।**" म्हणजे "मंत्रदेवतात्म्याची भेट घडणे अर्थात् त्याच्याशी एकरूप होणे होय," असे येथे तात्पर्य आहे. न्यासादि हेतूंच्या मंत्रांनी रुद्ध केलेल्या म्हणजेच अडकवून ठेवलेल्या देवताकारांमध्ये म्हणजेच मंत्रोच्चारणांच्या अवस्थेमध्ये साधकभक्तयोगिशिष्याच्या चित्तात स्वतः प्रयत्न न करताच प्राप्त होणारे जे अभिन्नरूपत्व आहे तेच परामर्शक्षम म्हणजे विचार करण्याला समर्थ असणाऱ्या संविद्रूप अर्थात् चैतन्यशक्तिरूप ध्यात्याच्या आराध्यदेवतेच्या प्रत्यक्ष दर्शनरूपाने होणारा असा मुख्य उदय होय. ही व्यतिरेकविभाव्यमानाकारता म्हणजेच वेगळेपणाने किंवा भिन्नपणे समजून येणारी आकारता नाही. अशा प्रकारे संवित्मुळे श्रीशिवरूपत्वाची प्राप्ती होते. "**शिवो भूत्वा शिवं यजेत्।।**" अर्थात् "श्रीशिव होऊन श्रीशिवांना यजावे." यामुळे विधिवाक्य कारणी लागले.।।२।।

(या श्लोकात इच्छतः हे साधकस्य या पदाचे विशेषण आहे. हा देवतेशी

एकात्मता पावण्याच्या तीव्र इच्छेने युक्त असा साधकभक्तयोगिशिष्य होय आणि या साधकभक्तयोगिशिष्याच्या एकरूप होण्याबद्दल या श्लोकात वर्णन केले आहे.)

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

साधकभक्तयोगिशिष्यांना तो मंत्र कसा सिद्ध होईल यावर श्रीपरमेश्वर "**प्रयत्नः साधकः।।२।।**" म्हणजे "प्रयत्न हाच साधकभक्तयोगिशिष्य असतो," हा उपाय सांगतात. चित्तरूपात समावेश होण्यासाठी अतिशय प्रयत्नांची आवश्यकता सांगितली आहे.।।४।।

पूर्वी सांगितलेल्या सामर्थ्याने व वारंवार अभ्यासाने हा प्रयत्नच सर्व काही साधून देतो. त्यामुळे प्रयत्नच या ठिकाणी प्रकृष्ट अर्थात् सर्वश्रेष्ठ साधक सांगितला आहे.।।५।।

**विवरण :-** वारंवार बाह्य विषयांकडे धावणाऱ्या वृत्तींचा उपसंहार केल्याने ज्ञातृज्ञेयादि त्रिपुटींचा लय होतो. मंत्राविषयी आत्मतादात्म्याची एकतानता झाली व हीच प्रवाहरूपाने कायम राहिली की, साध्यप्राप्तीला बरीच मदत होते.

आत्म्याचे चित्तत्व पुढे सांगण्यात येणाऱ्या न्यायाने सिद्ध होते. हे श्रीशिवांनी "**श्रीत्रिकसार**" आणि "**श्रीषट्सहस्र**" या ग्रंथांतून सांगितले आहे.।।६।।

चिच्छक्तीचा म्हणजेच चैतन्यशक्तीचा जो स्वभाव आहे त्याला मंत्र असे म्हणतात. त्याचे निरंतर म्हणजे सतत मनन केल्याने साधकभक्तयोगिशिष्य श्रीशिवभूमिकेवर आरूढ होतो. त्याच्या म्हणजेच चैतन्याच्या स्व-स्वभावरूप मंत्राच्या सामर्थ्यामुळेच योगचिंतक साधकभक्तयोगिशिष्य परम किंवा श्रेष्ठ अर्थाला अर्थात् श्रीशिवांना जाणतो.।।७।।२।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**प्रयत्नः साधकः।।२।।**" म्हणजे "जो अकृतक म्हणजेच सहज अथवा कोणाकडूनही काहीही क्रिया न करता केला जाणारा प्रयत्न आहे तोच साधक होय." हा प्रयत्नच मंत्रयित्या साधकाला अर्थात् मंत्राचा जप करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याला मंत्रदेवतेशी तादात्म्य प्राप्त करून देतो.।।२।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

प्रथम सूत्रात सांगितलेल्या मनन आणि रक्षण असा धर्म असणाऱ्या या मंत्राचा अर्थात् चित्ताचा "**प्रयत्नः साधकः।।२।।**" अर्थात् "प्रयत्न म्हणजे

जागृत कुंडलिनी शक्तीकडून होणारी क्रिया हीच साधक आहे."।।७.५।।

श्रीसद्गुरूंनी सांगितलेल्या मंत्राच्या अनुसंधानाच्या स्थिरतेसाठी उद्युक्त होण्याची जी आतील हालचाल तोच प्रयत्न होय. त्यालाच साधकभक्तयोगिशिष्य म्हटले आहे; कारण हा प्रयत्न मंत्रयिता म्हणजे मंत्र म्हणणारा आणि मंत्रदेवता यांचे ऐक्य घडवून आणणारा असतो.।।८-९।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

मनन आणि रक्षण यांचा स्वभाव असणाऱ्या या आधीच्या सूत्रात सांगितलेल्या मंत्राचा "**प्रयत्नः साधकः।।२।।**" या सूत्राने साधकभक्तयोगिशिष्य कोण? हे दाखवितात. या मंत्रस्वरूपाच्या अनुसंधानात कोणता बरे प्रयत्न यशस्वी होईल? अर्थात् अंतरुद्योग हाच साधकभक्तयोगिशिष्य होय; कारण हा प्रयत्न साधकभक्तयोगिशिष्याचे मंत्रदेवतेबरोबर ऐक्य संपादन करवितो. त्यामुळे प्रयत्नाचे साधकभक्तयोगिशिष्यत्वसमर्थन हे सूत्रकारांच्या शोभेप्रमाणे भासते.

**विवरण :-** प्रयत्न केला पाहिजे. खूप प्रयत्न केला पाहिजे. आळशीपणात राहण्याने कोणीही या चित्ताच्या वर्तुळातून बाहेर पडणार नाही. प्रयत्नाचा असा अर्थ आहे की, चित्त अथवा मनाला सोडण्याचा प्रयत्न करणे; पण चित्त मात्र तुम्हाला वारंवार असे समजावील की, अरे! हे तू काय करीत आहेस. हा तुझा वेडेपणा आहे. कारण चित्ताला माहीत आहे की, तुम्ही सोडले की, तत्काळ त्याचा नाश होणार आहे. या चित्ताच्या चक्रातून बाहेर पडण्याचा प्रयत्न करणे हाच या सूत्राचा अर्थ आहे. जे बाहेर पडले आहेत ते सिद्ध आहेत आणि जे प्रयत्न करीत आहेत ते साधकभक्तयोगिशिष्य आहेत.

परंतु जोपर्यंत तुम्ही साधकभक्तयोगिशिष्य होत नाही तोपर्यंत तुम्ही प्रयत्नही करीत नाही. तसा प्रत्येकजण प्रयत्न करीत असतो; पण तो अर्धवट असतो. त्या प्रयत्नाचे स्वरूप एका हाताने चाक धरले असून एका हाताने सोडलेले आहे, अशा प्रकारचे असते. अशा अर्धवट प्रयत्नांनी काही उपयोग होणार नाही. ज्यावेळेला तुम्ही पूर्ण होता त्यावेळेला तुमच्या प्रवासाची दिशा अधोगामी न होता ऊर्ध्वगामी होते.

प्रयत्न हा साधक आहे याचाच दुसरा अर्थ असा आहे की, साधकाने आळस सोडून दिला पाहिजे. रोज नियमितपणे सिद्धयोगसाधन केले पाहिजे. काही काही साधकांची अशी तक्रार असते की, सकाळी सहा वाजता उठून साधनाला बसावयाला होत नाही. जर सहा वाजता उठावयाला एवढी अडचण

होत असेल व ते इतके अशक्य कोटीतले वाटत असेल तर मनाच्या बाहेर येण्यासाठी भयंकर कष्ट होतील. एवढी छोटीशी सवय स्वतःला लावणे एवढे अशक्य आहे का? चार-आठ दिवस तुम्हाला आळस वाटेल; पण जर आळसाने तुम्हाला जिंकले आणि तुम्ही तसे होऊ दिले तर मात्र सगळे बिघडून जाते. आळशीपणासाठी तुम्ही ध्यान सोडून देऊ शकता. याचा अर्थ असा आहे की, ध्यानाची तुम्हाला काहीही किंमत नाही. जर किंमत असती तर तुम्हाला असा प्रश्नच पडला नसता. त्यामुळे जर परमात्म्याची प्राप्ती करून घ्यावयाची असेल तर असे अर्धवट प्रयत्न कामी येणार नाहीत. जोपर्यंत तुम्ही परम ऊर्जा प्राप्त करीत नाही तोपर्यंत प्रयत्न करणे आवश्यक आहे व तोपर्यंत विश्रांतीही घेता येणार नाही. त्याच्या आधी विश्रांती ही आत्महत्त्या ठरेल.

एकदा कुंडलिनी शक्ती जागृत झाली की, हा प्रयत्न तीच साधकभक्त-योगिशिष्याकडून करून घेत असते. साधकाला जागृत कुंडलिनी शक्तीला शरणागत राहण्याव्यतिरिक्त काहीही साधन करावे लागत नाही. त्यामुळे श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेली कुंडलिनी शक्तीच साधकभक्तयोगिशिष्य आहे आणि तिने सुषुम्नागामी होण्यासाठी स्वतः केलेले साधन हाच प्रयत्न आहे. अशा प्रकारे होणारे हे शाक्तोपायाचे साधन शांभ-वोपायाप्रमाणेच जागृत कुंडलिनीशक्तिसाध्य असल्यामुळे व ते आणवी दीक्षे-प्रमाणे प्रयत्नसाध्य नसल्यामुळे त्याला सिद्धोपाय असे म्हटले आहे.

साधकाला येथे केवळ जागृत कुंडलिनी शक्तीच्या साहाय्याने परम-तत्त्वाला प्राप्त करावयाचे असते. शक्तीच्या जागरणापूर्वी श्रीगुरुप्रदत्त मंत्राच्या जपाने शक्ती जागृत करण्याचे प्रयत्न केले जातात; परंतु कुंडलिनी शक्तीच्या जागरणानंतर मंत्राच्या केवळ ध्यानाने शक्तीचे कार्य अनुभवावयाला येऊ लागते.

यासंबंधी "**योगशिखोपनिषद्**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यदानुध्यायते मन्त्रं गात्रकम्पोथ जायते।।१.७०।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला मंत्राचे अनुसंधान केले जाते त्यावेळेला कुंडलिनी शक्ती जागृत होऊन अंगाला कंप सुटणे इत्यादि क्रिया सुरू होतात. ।।१.७०।।

शक्तियुक्त मंत्राला सजीव आणि शक्तिहीन मंत्राला निर्जीव अक्षरांचा समूह समजले पाहिजे. शक्तिसंपुटित मंत्रच चैतन्यमय असतो.।।२।।

## सूत्र क्रमांक ३

**संबंध :-** वरील सूत्रात वर्णन केलेल्या साधकभक्तयोगिशिष्याच्या साध्यमंत्राच्या वीर्य अर्थात् शक्तीबाबत ज्याचा उल्लेख पहिल्या उन्मेषाच्या बाविसाव्या सूत्रात केलेला आहे, तोच पुढच्या सूत्रात सांगत आहेत.

**विद्याशरीरसत्ता मन्त्ररहस्यम्।।३।।**

**शब्दार्थ :- विद्या** - परमोच्च अद्वयत्वाचे ज्ञान किंवा पराद्वयप्रथा अर्थात् कुंडलिनी शक्तियुक्त शब्दराशिरूप श्रीभैरव. **शरीर** - स्व-रूप. **विद्या-शरीर** - ज्या कुंडलिनी शक्तियुक्त शब्दसमूहाचे स्वरूप विद्या म्हणजे श्रेष्ठ व अद्वयज्ञान आहे. असे स्वरूप असणारा तो विद्याशरीरी होय. **सत्ता** - अस्तित्व. सर्व विश्वाशी एकरूप किंवा अभेदमय असलेल्या मी-त्वाची (supreme and perfect I-consciousnessची) जाणीव असलेली स्फुरता. **मन्त्ररहस्यम्** - मंत्राचे रहस्य किंवा सामर्थ्य, वीर्य अगर बल होय.

**अर्थ :-** मंत्राचे रहस्य मंत्राक्षरात असलेल्या सर्व विश्वाशी एकरूप किंवा अभेदमय असलेल्या संपूर्ण "मी"त्वाची जाणीव अथवा स्फूर्ती हे आहे अर्थात् विद्या म्हणजे पराद्वयप्रथेला कुंडलिनी शक्तिरूप शब्दराशीयुक्त श्रीभैरव असे म्हणतात. हे ज्याचे स्वरूप आहे व त्याची जी सत्ता म्हणजे शक्ती आहे ती सर्व विश्वाबरोबर अभेदरूपाने राहणारा पूर्णाहंतेचा विमर्शरूप विकास आहे आणि हेच मंत्राचे वीर्य आहे.।।३।।

**विशेष व्याख्या :-** पहिल्या उन्मेषाच्या बाविसाव्या सूत्रात शांभवोपायाच्या आधारावर जो बोधसुधासमुद्राबरोबर तादात्म्याच्या विमर्शाने, विचाराने अथवा ज्ञानाने पूर्णाहंतेमध्ये प्रवेश मिळतो असे सांगितले आहे तोच प्रवेश आता शाक्तोपायाच्या द्वारा शब्दराशी श्रीभैरवांच्या स्वरूपात विश्वासह अभेद दाखविणाऱ्या पूर्णाहंतेच्या विमर्शाच्या विकासात दाखविला आहे. ही पूर्णाहंता म्हणजे "अ" ते "क्ष" या पन्नास अक्षरांच्या स्थितिरूप सर्व शब्दराशींचा समन्वय, संघटन अथवा एकत्रीकरण आहे. याचे विस्तृत वर्णन **"श्रीतंत्रालोक"** या ग्रंथाच्या मातृकाचक्राच्या त्याचप्रमाणे न-फ कोटी मालिनीच्या वर्णनामध्ये आचार्य श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनी अत्यंत स्पष्ट स्वरूपात केले आहे.

शब्दच चराचरामध्ये व्याप्त आहे आणि या चराचरामुळेच वाच्य आहे. हा शब्द हृदयामध्ये एक अणू (पश्यंती), कंठात दोन अणू (मध्यमा) आणि जिभेच्या टोकावर तीन अणू (वैखरी) होऊन वर्णांच्या माध्यमातून प्रकट होतो. या शब्दाची पर त्याचप्रमाणे सूक्ष्म शक्ती सर्व प्राण्यांमध्ये सामावलेली

असते. ही शक्तीच हृदयबिंदू किंवा हृद्बिंदू अर्थात् चित्त-प्रकाशरूप साडेतीन वेटोळे घालून बसलेली कुंडलिनी शक्ती असून ती स्वतःच स्वतःला आच्छादून झोपलेल्या सापाच्या आकारात असते. ज्यावेळेला प्राणापानांच्या दृढ संघर्षरूप साधनेने ही पराशक्ती कुंडलिनी जागी होते त्यावेळेला ती प्राणशक्तीच्या समूहातून नादद्वारा प्रकट होते अर्थात् परज्ञानरूप निनादद्वारा प्रबुद्ध होते आणि शरीर केंद्रातून बाहेर पडून सर्व शरीरातील कणाकणाला व्यापून राहते. हा नाद सावध साधकाला जाग्रत आणि स्वप्न त्याचप्रमाणे स्वप्न आणि सुषुप्ती यांच्या संधी काळात ऐकू येतो. त्यामुळे अशा साधकभक्तयोगिशिष्याला शुद्ध निर्विषय भावामध्ये अद्वयानंदाची अनुभूती प्राप्त होते.

भगवत्पाद श्रीमदाद्यशंकराचार्यांनी याचा संकेत "**श्रीप्रबोधसुधाकर**" या ग्रंथात पुढीलप्रमाणे केला आहे.

**यद्भावानुभवः स्यान्निद्रादौ जागरस्यान्ते।**
**अन्तः स चेत्स्थिरः स्याल्लभते तदाद्वयानन्दम्।।१६०।।**

**अर्थ :-** निद्रेच्या आरंभी आणि जागृतावस्थेच्या अंती ज्या शुद्ध आणि निर्विषय भावाचा अनुभव येतो तो जर अंतःकरणामध्ये स्थिर झाला तर त्यापासून अद्वयानंदाची प्राप्ती होते.।।१६०।।

प्राणापान संघर्षामध्ये दृढाभ्यास करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याला ब्रह्मवेगामुळे अर्थात् हे जाणल्याशिवायच की पुढे काय होणार आहे? याचा सूर्यकोटिसमप्रभ म्हणजे करोडो सूर्यांच्या प्रकाशाप्रमाणे असणाऱ्या प्रकाशरूप आकारत्वाचा अनुभव येतो. हा परज्ञानरूप नाद आहे. हेच सूक्ष्म कुंडलिनीचे जागरण आहे.

पराशक्तीच्या उदरात बिंदू म्हणजेच कुंडलिनी शक्तीच्या चार कला आहेत. ते चार प्रकार असे आहेत.

१) प्रमेय-प्रधान पहिले वलय.

२) प्रमाण-प्रधान दुसरे वलय.

३) प्रमातृ-प्रधान तिसरे वलय.

४) प्रमिति-प्रधान चौथे अर्धवलय. (हे परप्रमातृभावरूप अर्धवलय आहे.)

अशा प्रकारे कुंडलिनीची साडेतीन वलये आहेत. प्राणापान संघर्षाद्वारा पराशक्ती ज्यावेळेला दोन बिंदूंमध्ये अर्थात् मूलाधारचक्रात आणि ब्रह्मरंध्राच्या मध्ये साध्या रेषेचे रूप धारण करते त्यावेळेला ती ज्येष्ठाशक्ती आहे असे जाणून घेतले पाहिजे. अशा अवस्थेत ही शरीरदशेच्या बाहेर व्याप्त होते. ही

सिद्धयोग्याची समाधिदशा आहे. हीच इच्छा, ज्ञान व क्रियारूप त्रिवेणी तीर्थ आहे. ही प्रकाशरूप दशा वीर्यामुळे प्राप्त होते.

ही कुंडलिनी शक्ती सुप्तावस्थेमध्ये मोक्षमार्गाचा निरोध करते म्हणून हिला रौद्रीशक्ती असे म्हणतात. ही शक्ती मोह आदि विघ्ने व अडथळे आणून साधकभक्तयोगिशिष्यामध्ये पराशक्तीचा विकास होऊ देत नाही. ज्यावेळेला ही पराशक्ती साधनाभ्यास स्वाभाविक झाल्यानंतर योग्याच्या व्युत्थान दशेतच अंतर्भूत होते त्यावेळेलाच ही चंद्राच्या कलेप्रमाणे असणारी पूर्णानंदमय अवस्थाच त्याची पूर्णसिद्धी असते. यालाच अंबिकाशक्ती असे म्हणतात.

अशा प्रकारे एकाच पराशक्तीची ही तीन रूपे आहेत. याच तीन शक्तींपासून "अ" ते "क्ष" या वर्णमालेचे नऊ वर्ग उत्पन्न झाले. या नऊ वर्गांच्या शक्तिदेवता खालीलप्रमाणे आहेत.

१) अमा (अवर्ग), २) कामा (कवर्ग), ३) चार्वङ्गी (चवर्ग), ४) टङ्कधारिणी (टवर्ग), ५) तारा (तवर्ग), ६) पार्वती (पवर्ग), ७) यक्षिणी (यवर्ग), ८) शारिका (शवर्ग) आणि ९) क्षेमङ्करी (क्षवर्ग). याला नवार चक्र असे म्हणतात.

या नऊ वर्गातून पाच मंत्रदेवतांचा प्रादुर्भाव झालेला आहे. त्या देवता अशा प्रकारच्या आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| १) सद्योजात | (इच्छा) | इ | प्रत्यवमर्शनरूप. |
| २) तत्पुरुष | (आनंद) | ऌ | विश्रांतिरूप. |
| ३) वामदेव | (ज्ञान) | उ | आनंदरूप. |
| ४) ईशान | (चित्) | अ | स्वभावरूप. |
| ५) अघोर | (क्रिया) | ऋ | प्रकाशरूप. |

याला पंचारचक्र असे म्हणतात.

"अ," "इ" व "उ" दीर्घ स्वरांमध्ये मिसळल्यावर अर्थात् क्षोभावस्थेला प्राप्त झाल्यानंतर त्यांना जन्मस्थान किंवा बीजस्थान असे म्हणतात. "ऋ" आणि "ऌ" हे आपल्या दीर्घ स्वरांसहितही बीज पण नाहीत आणि योनीही नाहीत; कारण हे श्रीशिवतत्त्वातच अनादिरूपाने आनंदाचा भोग घेण्यात मग्न असतात.

अशा प्रकारे या पंचारचक्रातून परा शक्तीचा विस्तार बारा स्वरांमध्ये होतो. त्यानंतर व्यंजनाची सृष्टी करून वर्णमालेच्या पन्नास अक्षरांमधून तिचा विस्तार होतो. परारूप पराशक्तीमध्ये ही शब्दराशी श्रीभैरवांच्या सनातन

रूपात ब्रह्मरंध्रात थांबलेली असते. हीच प्राण्याच्या हृदयात एका अणूने पश्यंती, कंठात दोन अणूंनी मध्यमा आणि परत जिभेच्या मुळाशी तीन अणूंनी वैखरीद्वारे प्रकट होते. अशा प्रकारे शब्दानेच चर आणि अचर व्याप्त झालेले आहे.

त्यामुळेच श्रीपरभैरवीय परावाक् शक्तिरूप जी मातृका आहे ती ज्येष्ठा, रौद्री आणि अंबा शक्तींच्या द्वारा विचित्ररूप धारण करून सर्व वर्णांमध्ये उदित झालेली असते. या वर्णांच्या संघट्टाचे अथवा त्यांचे समूहस्वरूप मंत्रांमध्ये प्रकट होते. या मंत्रांच्या श्रीभगवतीलाच येथे विद्याशरीरसत्तेचे रहस्य असे म्हटले आहे. याचा साक्षात्कार झाल्यानंतर साधकभक्तयोगिशिष्य कृतकृत्य होतो; कारण त्याच्यात शब्दराशी श्रीभैरवांच्या स्वरूपात विश्वाशी अभेदाने राहणाऱ्या पूर्णाहंतेच्या विमर्शाचा विकास झालेला असतो.

हा विषय अत्यंत गहन असल्याकारणाने जर हे विवरण समजत नसेल तर श्रीसद्गुरूंचा आश्रय घेणेच उचित आहे.।।३।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा प्रकारच्या साधकाला साध्य होणाऱ्या मंत्राचा पूर्वी सांगितलेला वीर्यशब्दार्थ "**विद्याशरीरसत्ता मन्त्ररहस्यम्।।३।।**" या सूत्राने श्रीशिवांनी सांगितला आहे.

विद्या म्हणजे परम अद्वय ज्ञान होय. हे ज्ञान हेच ज्याचे स्वरूप आहे तो विद्याशरीररूप भगवान् शब्दराशीयुक्त असून त्याची सत्ता म्हणजे संपूर्ण विश्वाशी अभिन्नत्वाने असणारी पूर्ण अहं विचाररूपिणी स्फुरत्ता किंवा स्फूर्ती होय. ती स्फुरत्ता हीच मंत्रांचे रहस्य म्हणजे वीर्य होय. हे उपनिषदासारखे आत्म्याजवळ पोहोचविणारे असते म्हणून याला उपनिषद् किंवा उपनिषदातील रहस्य म्हटले आहे.

यासंबंधी "**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सर्वे वर्णात्मका मन्त्रास्ते च शक्त्यात्मकाः प्रिये।**
**शक्तिस्तु मातृका ज्ञेया सा च ज्ञेया शिवात्मिका।।**

**अर्थ :-** सर्व मंत्र हे ककारादि वर्णरूप आहेत. ते वर्ण शक्तीने युक्त असतात. शक्ती ही मातृका म्हणून जाणावी आणि ही मातृका श्रीशिवात्मक असते.

"**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथात हा अर्थ अत्यंत रहस्यमय आहे असे सांगून तो तसा असूनही पुढे सांगण्यात येणाऱ्या आगमाने विस्ताराने स्पष्ट करताना

असे म्हटले आहे की -

**न जानन्ति गुरुं देवं शास्त्रोक्तान्समयांस्तथा।**
**दम्भकौटिल्यनिरता लौल्यार्थाः क्रिययोज्झिताः।।**
**अस्मात्तु कारणाद्देवि मया वीर्यं प्रगोतितम्।**
**तेन गुप्तेन ते गुप्ताः शेषा वर्णास्तु केवलाः।।**

**अर्थ :-** क्रियात्यागी, अतिलोलुप अर्थात् रसादि पांच विषयांबद्दल लोलुप, दांभिक व कपटी असे लोक श्रीसद्गुरुदेवांकडे आणि देवांनी व शास्त्रांनी सांगितलेल्या सिद्धान्ताकडे ढुंकूनही पाहत नाहीत. त्यामुळे हे देवी! मी हे वीर्य अत्यंत गुप्त ठेविले आहे. त्या गुप्तरहस्यसामर्थ्याने मंत्रही गुप्त आहेत. इतर मंत्र नुसते वर्णसमुदायच समजावेत.

**विवरण :-** लोला म्हणजे रसना अर्थात् जीभ होय. तिचे हे रसास्वादन म्हणजे लौल्य होय. तोच ज्यांचा अर्थ म्हणजे विषय आहे ते रसास्वादासक्त होत. हे उपलक्षण असून याचा अर्थ शब्दादि विषयांची चमत्कारनिरता असा आहे.

अशा रीतीने थोडेसे शास्त्रवर्णन करून म्हणजे शास्त्रांमधला संबंध सांगून तोच विस्ताराने सांगण्यासाठी "**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथात श्रीमहेश्वर पुढे असे म्हणतात की -

**या सा तु मातृका देवि परतेजःसमन्विता।**
**तया व्याप्तमिदं विश्वं सब्रह्मभुवनान्तकम्।।**
**तत्रस्थं च यदा देवि व्यापितं च सुरार्चिते।**
**अवर्णस्थो यथा वर्णः स्थितः सर्वगतः प्रिये।।**
**तथाहं कथयिष्यामि निर्णयार्थं स्फुटं तव।**

**अर्थ :-** हे देवी! पराहंतेने म्हणजे अत्यंत श्रेष्ठ तेजाने युक्त अशी जी मातृका आहे तिने अनाश्रित श्रीशिवांपासून ते स्थूलज्ञेयअखेरपर्यंत म्हणजे ब्रह्मासहित भुवनांपर्यंतचे सर्व विश्व व्यापिले आहे. हे देवांनाही पूजनीय अशा देवी! तुला ते स्पष्टपणे कळावे म्हणून मी आता त्याचे विस्ताराने वर्णन करून सांगीन.

**विवरण** :- "**परतेज**" म्हणजे पराहंता अर्थात् श्रेष्ठ अहंता होय. "**सब्रह्मभुवनान्तकम्**" म्हणजेच आश्रय न घेणाऱ्या अनाश्रित अशा श्रीशिवांपासून स्थूल प्रमेय अर्थात् ज्ञेय वस्तूपर्यंत सर्व प्रकारचे जगत् होय. "**तत्रस्थम्**" म्हणजेच मातृकेच्या ठिकाणी असणारे पर किंवा श्रेष्ठ तेज होय.

"**अवर्णस्थ**" म्हणजे अनुत्तरस्थित अर्थात् सर्वांच्या पलीकडे असणारे तत्त्व होय.

असा प्रारंभ करून श्रीशिव कुंडलिनी शक्तीचे वर्णन करताना पुढे असे म्हणतात की -

**या सा शक्तिः परा सूक्ष्मा निराचारेति कीर्तिता।।१।।**
**हृद्बिन्दुं वेष्टयित्वान्तः सुषुप्तभुजगाकृतिः।**
**तत्र सुप्ता महाभागे न किञ्चिन्मन्यते उभे।।२।।**
**चन्द्राग्निरविनक्षत्रैर्भुवनानि चतुर्दश।**
**क्षिप्त्वोदरे तु या देवी विषमूढेव सा गता।।३।।**

**अर्थ :-** ही जी कुंडलिनी नावाची शक्ती परा अर्थात् श्रेष्ठ, सूक्ष्म आणि आचारांपलीकडची आहे असे सांगितले जाते ती हृदयबिंदूला आत वेढून झोपलेल्या सापाच्या आकारासारखी आहे. तेथे म्हणजे मूलाधारात झोपलेली ती महाभाग्यवान् देवी कोणताही विचार करीत नाही. चंद्र, अग्नी, सूर्य, नक्षत्रे आणि भुवने यांना आपल्या उदरात ठेवून ती विषाने गुंगल्याप्रमाणे पडून असते.।।१ ते ३।।

**विवरण :-** अनुत्तरशक्ती कुंडलिनी ही स्व-स्वातंत्र्यामुळे ग्राह्य आणि ग्राहकरूप पदार्थांच्या इयत्तेप्रमाणे अर्थात् पायरी किंवा पातळीप्रमाणे परिच्छेद करते. ती आपले स्वरूप लपवून ठेवून स्वतःला संकुचित अथवा मर्यादित करून घेऊन आपल्या पातळ्यांचे सर्वोच्चतत्त्वाने अवस्थितीचे प्रकटीकरण करणारी असूनही बिंदुस्वरूपिणी आहे. जाणतो तो बिंदू होय. जाणण्याच्या क्रियेमध्ये प्रमाता स्वतंत्र असतो. त्याचे स्वरूप म्हणजे अविभक्त प्रकाश असून तो त्याचा स्वभावच असतो. त्यामुळेच ही अनुत्तरशक्ती कुंडलिनी परा म्हणजे श्रेष्ठ संविद्रूप, सूक्ष्म प्राणनारूप अर्थात् प्रेरणा देणारी व नित्य आत्मध्यानपूजादिकांमुळे सर्व आचारांपासून पुढे निघालेली अर्थात् निराळी किंवा पलीकडची असल्यामुळे निराचारा अशी आहे. ही हृदयबिंदूला म्हणजेच हृदयमंडलातील आतल्या भागाला संकुचितात्म्याला प्राधान्य दिल्यामुळे बाह्यरूपाने भेदभूमीवरच चांगल्या प्रकारे रूढत्व प्राप्त केलेली असून ही नरात्मक बिंदूला आतून वेष्टन घालून स्वतः अंतर्लीन होते. ही कुंडलिनी शक्ती झोपलेल्या सापासारखी आहे. बाह्यभावांचे औन्मुख्य अर्थात् प्रकटन यांनी ही कुंडलिनी शक्ती विरहित असल्यामुळे ही केवळ स्वात्म्यातच विश्रांत होते. बिंदू हा परप्रकाशयुक्त असून स्वातंत्र्यामुळे विश्वाला प्रकट करण्याची

इच्छा करणारा असतो. तो द्वादशांत, भ्रूमध्य आणि हृदय या स्थानांमध्ये विश्रांती घेत असल्यामुळे नर, शक्ती व श्रीशिवात्मक म्हणून जाणावा. याचा अर्थ असा आहे की, इच्छादींनी युक्त श्रीशिव हे विद्या व आत्म अर्थात् "स्व" या लक्षणांनी व्यक्त होतात.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**अत्र प्रकाशमात्रं यत्स्थिते धामत्रये सति।**
**उक्तं बिन्दुतया शास्त्रे शिवबिन्दुरसौ मतः।।**

**अर्थ :-** येथे प्रकाशमात्रत्वाने जो तीन धामांमध्ये स्थित आहे त्याला बिंदुत्वाने जाणले जाते. शास्त्रामध्ये त्याला श्रीशिवबिंदू असे म्हटले आहे.

चतुर्दश भुवने म्हणजे प्रमा, प्रमाण, प्रमेय व प्रमात्यांसह चौदा महास्वर या कुंडलिनी शक्तीच्या उदरात आहेत. त्यांना ती आत्मसात् करते. विषाने मोहित झाल्याप्रमाणे स्वतःलाही विसरून जाते असा याचा भावार्थ आहे.

त्यानंतर या कुंडलिनी शक्तीचे अधिक वर्णन करताना श्रीशिव पुढे असे म्हणतात की -

**प्रबुद्धा सा निनादेन परेण ज्ञानरूपिणा।**
**मथिता चोदरस्थेन बिन्दुना वरवर्णिनी।।४।।**
**तावद्वै भ्रमवेगेन मथनं शक्तिविग्रहे।**
**भेदात्तु प्रथमोत्पन्ना बिन्दवस्तेऽतिवर्चसः।।५।।**
**उत्थिता तु यदा तेन कला सूक्ष्मा तु कुण्डली।**
**चतुष्कलमयो बिन्दुः शक्तेरुदरगः प्रभुः।।६।।**
**मध्यमन्थनयोगेन ऋजुत्वं जायते प्रिये।**
**ज्येष्ठाशक्तिः स्मृता सा तु बिन्दुद्वयसुमध्यगा।।७।।**
**बिन्दुना क्षोभमायाता रेखैवामृतकुण्डली।**
**रेखिणी नाम सा ज्ञेया उभौ बिन्दू यदन्तगौ।।८।।**
**त्रिपथा सा समाख्याता रौद्री नाम्रा तु गीयते।**
**रोधिनी सा समुद्दिष्टा मोक्षमार्गनिरोधनात्।।९।।**
**शशाङ्कशकलाकारा अम्बिका चार्धचन्द्रिका।**
**एकैवेत्थं परा शक्तिस्त्रिधा सा तु प्रजायते।।१०।।**
**आभ्यो युक्तवियुक्ताभ्यः सञ्जातो नववर्गकः।**
**नवधा च स्मृता सा तु नववर्गोपलक्षिता।।११।।**
**पञ्चमन्त्रगता देवि सद्य आदिरनुक्रमात्।**

**तेन पञ्चविधा प्रोक्ता ज्ञातव्या सुरनायिके।।१२।।**
**स्वरद्वादशगा देवि द्वादशस्था उदाहृता।**
**अकारादिक्षकारान्ता स्थिता पञ्चाशता भिदा।।१३।।**
**हृस्था एकाणवा प्रोक्ता कण्ठे प्रोक्ता द्वितीयका।**
**त्रिराणवा तु ज्ञातश्या जिह्वामूले सदा स्थिता।।१४।।**
**जिह्वाग्रे वर्णनिष्पत्तिर्भवत्यत्र न संशयः।**
**एवं शब्दस्य निष्पत्तिः शब्दव्याप्तं चराचरम्।।१५।।**

**अर्थ :-** ही कुंडलिनी शक्ती ज्ञानरूप परेच्या निनादाने म्हणजेच अनाहत-नादाने अथवा ध्वनीने जागृत होते अर्थात् अनाहत नादरूपाने ही कुंडलिनी शक्ती अखंड जागृत असल्याचे प्रत्ययाला किंवा अनुभूतीला येते. हे सुंदरी! ही शक्ती उदरस्थ बिंदूने घुसळली जाते. या शक्तिविग्रहाला अर्थात् शक्तिस्व-रूपिणी कुंडलिनीला तेवढ्या भ्रमणाच्या वेगाने घुसळले असता आधी उत्पन्न झालेल्या बिंदूपासून अत्यंत तेजस्वी असे अनेक बिंदू उत्पन्न होतात. त्यामुळे ही कुंडलिनी शक्ती कला व सूक्ष्मा अशा रूपाने जागृत होते. हा बिंदू चतुष्कलमय शक्तीच्या उदरात जाणारा आणि सामर्थ्ययुक्त असतो. हे प्रिये! मथ्य म्हणजे घुसळला जाणारा आणि मंथन म्हणजे घुसळणे यांच्या संबंधाने ऋजुत्व म्हणजे मृदुत्व निर्माण होते. दोन बिंदूंच्या सुमध्यातून जात असणाऱ्या या कुंडलिनी शक्तीला ज्येष्ठा शक्ती असे म्हणतात. बिंदूने जिच्यात क्षोभ निर्माण झाला आहे अशी ही अमृतरूप कुंडली अर्थात् कुंडलिनी शक्ती रेखेप्रमाणे भासते. दोन्ही बिंदू जिच्यात आहेत अशा हिला रेखिणी असे म्हणतात. हिला त्रिपथा असेही म्हणतात. त्याचप्रमाणे हिचे रौद्री या नावानेही वर्णन केले जाते. ही मोक्षमार्गाला अडविते म्हणून तिला रोधिनी असे म्हणतात.।।४ ते ९।।

**विवरण :-** बिंदूच ती ती परामर्शता अर्थात् विचार प्रकट करण्याच्या इच्छेने स्फुरण पावतो. तोच अनाहतनादात्मक शब्दाने स्फुरण पावतो व शब्द करवितो अर्थात् "स्व"च्या अभेदाने विश्वाचा परामर्श करतो किंवा विचार करतो म्हणून त्याला शब्द असे म्हटले आहे. तोच तो बिंदू परावाग्रूप विमर्श आहे. तोच शब्द करतो म्हणजे सर्वांच्या जीवकलात्वाने स्फुरतो. त्यामुळे त्याला नादात्मा असे म्हणतात.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**योऽसौ नादात्मकः शब्दः सर्वप्राणिष्ववस्थितः।**

**अर्थ :-** हा जो नादात्मक शब्द आहे तो सर्व प्राण्यांमध्ये अवस्थित असतो.

**विवरण :-** ही पराशक्तीच सूक्ष्म अमाकलारूप कुंडलिनी शक्ती आहे. ही श्रीशिवांसह परस्परांच्या म्हणजेच श्रीशिव आणि शक्ती यांच्या सामरस्यरूप मथ्य म्हणजे घुसळला जाणारा आणि मंथकभाव म्हणजे घुसळणारा यांनी युक्त संघट्ट प्राप्त करून उत्थित किंवा जागृत होते. त्यानंतर ही कुंडलिनी शक्ती इच्छा, ज्ञान आणि क्रिया या रूपांचा आश्रय घेऊन रौद्रीत्व उन्मुद्रित करून श्रृंगाटकाच्या आकाररूप अंबिकात्वाचा अवलंब करते आणि उकारात्मक चंद्राच्या अर्थभागाने युक्त ज्येष्ठपणाचा आधार घेते. त्याचप्रमाणे ही कुंडलिनी शक्ती श्रीशिवबिंदूमधून उगविलेल्या किंवा निर्माण झालेल्या स्पष्ट रेखेला व्यक्त करते. अशा प्रकारे ही वर्ण कालाग्निरूप रेफयुक्त बिंदूमध्ये विश्रांत झालेल्या स्पष्ट रेखेला व्यक्त करते. या रीतीने ती वर्णशरीराचे उल्लसन करते. असा "उत्थिता" याने आरंभ करून "एकैव" याने शेवट केलेल्या पाच श्लोकांचा तात्पर्यार्थ आहे.

**अर्थ :-** चंद्रकोरीप्रमाणे किंवा अर्धचंद्राप्रमाणे असणारी ही शक्ती अंबिका म्हणूनही ओळखली जाते. अशा प्रकारे एकच असणारी ही पराशक्ती कुंडलिनी तीन प्रकारांनी उत्पन्न होते. यांच्यामध्ये सरमिसळ होऊन नऊ प्रकार तयार होतात. त्यामुळे ही नऊ प्रकारची होऊन नऊ वर्गांनी दाखविली जाते.।।१०-११।।

**विवरण :-** हे सुरनायिके! ही कुंडलिनी शक्ती अनुत्तर इच्छा व उन्मेषरूप आहे.

**अर्थ :-** ही कुंडलिनी देवी सद्योजात, वामदेव, ईशान, तत्पुरुष व अघोर या पाच मंत्रांमध्ये स्थित असल्याने ही पाच प्रकारची आहे असे जाणावे. हे देवी! ही कुंडलिनी शक्ती बारा स्वरात स्थित असल्याने बारा प्रकारची आहे. "अ"कारापासून "क्ष"कारापर्यंत असल्याने ही पन्नास प्रकारची आहे. ही कुंडलिनी शक्ती हृदयात एकाक्षरा, कंठात द्व्यक्षरा व जिभेच्या मुळाशी तीन अक्षरांची होते. या कुंडलिनी शक्तीमुळेच जिभेच्या टोकाशी सर्व वर्णांची उत्पत्ती होते यात कोणताही संशय नाही. अशा प्रकारे शब्दाची निष्पत्ती असून हे सर्व जगत् शब्दांनी व्यापलेले आहे.।।१२ ते १५।।

**विवरण :-** परावाणीरूप अहम्परामर्श अथवा विचार हा अनन्यापेक्ष म्हणजेच कोणावरही अवलंबून नसणारा आणि श्रेष्ठ आहे. त्यामुळे परावाग्रूपा परमेश्वरी कुंडलिनी शक्ती स्वस्वातंत्र्यामुळे बाह्यरूपता व्यक्त करण्याची इच्छा

करते. या अवस्थेत वाच्य व वाचक अशा क्रमाचा उदय झालेला नसतो, त्यांचे विभाग हे अस्पष्ट असतात आणि चिज्ज्योतीचे प्राधान्य असते. यावेळेला ही कुंडलिनी शक्ती केवळ पाहणारी अर्थात् द्रष्टा असल्याने पश्यंती या शब्दाने ओळखली जाते. त्याच्या नंतर वाच्यवाचकक्रमाचे आसूत्रण अर्थात् सुरुवात होऊनही हा विभाग स्पष्ट व अस्पष्ट असा दोन्ही प्रकारचा असतो व तो केवळ बुद्धीमध्येच स्थिर असल्याने दर्शनप्राधान्यामुळे द्रष्टा आणि दृश्य यांच्यात अंतरालवर्तित्व अर्थात् हृदयामध्ये एकरूपत्व असते. ही वाणी पश्यंती आणि वैखरी यांच्या मधली आहे म्हणून ही एका अणूने बनलेली असते. ही हृदयात स्थित असते असे म्हटले जाते म्हणून या वाणीला मध्यमा असे म्हणतात. ही दोन अणूंची बनलेली असून गळ्यामध्ये हिचे स्थान आहे. त्यानंतर स्थान, करण व प्रयत्नबलामुळे त्या त्या वर्णाचा उपग्रह अर्थात् वेगवेगळेपणा केल्यामुळे, विभाग स्पष्ट झाल्यामुळे व दृश्यालाच प्राधान्य असल्यामुळे या वाणीला वैखरी असे म्हणतात. ही वैखरी वाणी जिभेच्या मार्गामध्ये स्थित असून तीन अणूंनी बनलेली आहे. अशा प्रकारे सूक्ष्म आणि स्थूल रूपाने तीन प्रकार आहेत. असा वरील श्लोकांचा सारार्थ आहे.

वरील सर्व विवेचनावरून मातृका ही श्रीपरभैरवाच्या शक्तीने युक्त अशी परावाणी आहे. त्यामुळेच ज्येष्ठा, रौद्री व अंबा नामक शक्तींच्या प्रसाराने किंवा भेदातील विविधतेने परावाणीपासून सर्व वाणींचा उदय होतो. तसेच ज्यांचे वर्णसमूहरूप शरीर आहे अशा मंत्रांची ही व्याख्यातरूपा व विद्या-शरीरसत्ता हेच परावाणीचे रहस्य आहे, असे दाखविले आहे. प्रत्येक आगमातून मातृका-मालिनी यांच्या प्रस्तारपूर्वक मंत्रोद्धार कथनाचा हाच आशय आहे. श्रीशिवसूत्रे ही रहस्यागमसारसंग्रहरूपी आहेत म्हणून ही आगमात जोडली गेली आहेत. याकरिता आम्हाला नावे ठेवू नका. अशा आगमविवेचनानेही रहस्य न कळल्यास श्रीसद्गुरूंचा आश्रय करावा.

हाच सूत्रार्थ या दृष्टीनेच "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात सांगताना असे म्हटले आहे की -

**तदाक्रम्य बलं मन्त्राः सर्वज्ञबलशालिनः।**
**प्रवर्तन्तेऽधिकाराय करणानीव देहिनाम्।।२.२६।।**

**अर्थ :-** प्रत्येक प्रकारचे मंत्र त्या स्पंदरूप आत्मबळाशी तादाम्य प्राप्त केल्याने सर्वज्ञता, तृप्ती, अनादिबोध, अप्रतिहत स्वातंत्र्यशक्तीचा अडथळारहित प्रसार आणि विश्वरूपामध्ये विकसित असलेले अनंत शक्तींचे ऐश्वर्य या सहा

प्रकारच्या माहेश्वर बलांना प्राप्त करून घेऊन शोभित होऊ लागतात. अशा परिस्थितीत कोणतेही मनोवांछित कार्य अधिकारपूर्वक सिद्ध करण्यासाठी हे मंत्र जितक्या सहजपणे प्रवृत्त होतात तितक्या सहजपणे शरीरधारींची इंद्रिये केवळ संकल्पानेच आपापली कार्ये सिद्ध करीत असतात.।।२.२६।।

**तत्रैव सम्प्रलीयन्ते शान्तरूपा निरञ्जनाः।**
**सहाराधकचित्तेन तेन ते शिवधर्मिणः।।२.२७।।**

**अर्थ :-** दुसरीकडे हे मंत्र मायेच्या काजळीपासून अलिप्त होऊन, संसारातील भोगसिद्धींपासून निवृत्त होऊन, शुद्ध संविद्रूप किंवा शांतरूप अर्थात् ज्यांचे विशिष्ट देवतास्वरूप समाप्त झालेले आहे असे होऊन, साधकभक्तयोगिशिष्याच्या किंवा आराधना करणाऱ्या व्यक्तीच्या चित्तासह त्याच ठिकाणी सामान्य स्पंदरूप चिदाकाशात किंवा स्पंदतत्त्वात विलीन होतात. या कारणामुळे हे सर्व मंत्र श्रीशिवस्वरूप आहेत.।।२.२७।।३।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१) मंत्र :-** आवरणरहित चिद्रूपाच्या बलाचा आश्रय घेऊन मंत्र हे अनुग्रहादि अधिकारांमध्ये देहधारी मनुष्यांच्या इंद्रियांप्रमाणे स्वाधिकारात प्रवृत्त होतात. त्याचप्रमाणे मंत्र हे अधिकारापासून निवृत्त झालेल्या त्यांच्या आराधकाच्या चित्ताबरोबर स्व-स्वभावरूप आकाशात लीन होतात व साधकभक्तयोगिशिष्यांना श्रीशिवधर्मत्व प्राप्त करून देतात.

**२) "अ"मातृका :-** ते तेज त्या मातृकेत असून सर्वत्र व्यापूनही राहते. आता **"अ"** हा वर्ण इतर सर्व वर्णांना व्यापून राहतो. **"अ"** हा वर्ण अनुत्तर म्हणजेच पराशक्तीचे प्रतिनिधित्व करतो. तोच सर्व वर्णांचे उत्पत्तिस्थान आहे.

**३) बिंदू :-** बिंदू म्हणजे अहंतेचा सर्वात महत्त्वाचा, सामर्थ्यवान् किंवा शक्तियुक्त आणि क्रियाशील असा थेंब किंवा बिंदू होय.

**४) निद्रा :-** ही झोप म्हणजे नवीन सृष्टी होण्याआधीची वैश्विक निद्रा होय. या निद्रेत सर्व वस्तुविषयक किंवा बाह्य घटना आत ओढून घेतलेल्या असतात.

**५) चंद्राग्नि... चतुर्दश। :-** ही ओळ विश्वाच्या बाह्य वस्तुविषयक घटनाक्रमाचा निर्देश करण्याबरोबरच खालील प्रतिकांचाही निर्देश करते.

चंद्र हा प्रमेय म्हणजेच वस्तूंचे प्रतीक आहे. अग्नी हा प्रमेयप्रमाता म्हणजे ज्ञाता अथवा कर्ता होय. रवी म्हणजे प्रमाण अर्थात् ज्ञान होय. नक्षत्रे म्हणजे संकल्प व विकल्प म्हणजेच विचार होत. चतुर्दश भुवनानि म्हणजे "अ" ते

"औ" पर्यंतचे चौदा स्वर होत.

**६) निनाद :-** निनाद म्हणजे या संदर्भात स्थूल ध्वनी अथवा आवाज नव्हे; तर अहंतेचे उडणे, धडधडणे अथवा ठोका होय किंवा जी पुढे व्यक्त होणार आहे त्या सृष्टीची मूळ अंकुरयुक्त निर्मिती होय.

**७) चतुष्फल किंवा चार कलांचा बिंदू :-** हा चतुष्फल किंवा चार कलांचा बिंदू शक्तीशी संबंधित असलेल्या १) इच्छा, २) ज्ञान, ३) क्रिया यांनी आणि श्रीशिवांशी संबंधित असलेल्या ४) स्वातंत्र्य या चार गोष्टींनी युक्त असतो.

**८) इच्छा, ज्ञान आणि क्रिया यांचे बिंदू :-** इच्छा, ज्ञान आणि क्रिया यांचे बिंदू आता एक सरळ रेषा तयार करतात. या रेषेला रेखिणी अर्थात् जी एका रेषेने युक्त आहे असे म्हणतात. या रेखेच्या वरती एक बिंदू असतो आणि खालच्या भागात एक बिंदू अर्थात् विंदू असतो. खालच्या भागातला बिंदू अर्थात् विंदू हा शक्तीचा असतो आणि वरच्या भागातला बिंदू अर्थात् विंदू श्रीशिवांचा असतो.

**९) रौद्री :-** रौद्री ही इच्छा, ज्ञान व क्रिया यांची एक रेषा असते आणि म्हणूनच तिला त्रिपथा अर्थात् तीन मार्गांनी युक्त असे म्हणतात.

**१०) रोधिनी :-** रोधिनी ही तत्त्व आणि तत्त्वरहित अवस्था यांना वेगळे करणारी रेषा आहे. या विभाजक रेषेच्या खालच्या बाजूला अशुद्धाध्वा म्हणजेच अनुभवाला येणारे प्रकटीकरण आहे; तर दुसऱ्या किंवा वरच्या बाजूला शुद्धाध्वा म्हणजेच अनुभवाला न येणारे अप्रकटीकरण आहे. रोधिनी ही या दोघांच्या मध्ये एखाद्या खांबाचे काम करते. जे सर्वार्थाने पवित्र अथवा शुद्ध झालेले असतात तेच हा खांब किंवा रेषा ओलांडून जाऊ शकतात.

**११) पराशक्ती कुंडलिनी :-** ही पराशक्ती कुंडलिनी तीन प्रकारांनी युक्त होते. हे तीन प्रकार असे आहेत. १) अनुत्तर म्हणजे **"अ"** वर्ण, २) इच्छा म्हणजे **"इ"** वर्ण आणि ३) उन्मेष म्हणजे ज्ञान म्हणजेच **"उ"** वर्ण होय.

**१२) अक्षरांचे नऊ प्रकार :-** अक्षरांचे नऊ प्रकार खालीलप्रमाणे आहेत.

(१) **अ वर्ग :-** या वर्गात सर्व स्वरांचा समावेश होतो.

(२) **क वर्ग :-** यात क, ख, ग, घ, ङ या पाच वर्णांचा समावेश होतो.

(३) **च वर्ग :-** यात च, छ, ज, झ, ञ या पाच वर्णांचा समावेश होतो.

(४) **ट वर्ग :-** यात ट, ठ, ड, ढ, ण या पाच वर्णांचा समावेश होतो.

(५) **त वर्ग** :- यात त, थ, द, ध न या पाच वर्णांचा समावेश होतो.
(६) **प वर्ग** :- यात प, फ, ब, भ, म या पाच वर्णांचा समावेश होतो.
(७) **य वर्ग** :- यात य, र, ल, व हे चार वर्ण येतात.
(८) **श वर्ग** :- यात श, ष, स, ह हे चार वर्ण समाविष्ट होतात.
(९) **क्ष वर्ग** :- यात फक्त क्ष हा वर्ण आहे.

काहींच्या मते "क्ष" वर्ण "श" वर्गातच येत असल्यामुळे अक्षरांचे फक्त आठच वर्ग आहेत.

हे बारा प्रकार म्हणजे संस्कृत वर्णमालेतील "ऋ," "ॠ," "ऌ" आणि "ॡ" हे सोडून बारा स्वर होत.।।३।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे वाचकांचे म्हणजेच मंत्राचे स्वरूप सांगून मग वाच्य म्हणजेच मंत्रादि आणि वाचक म्हणजे कलादि यांचे रूप अभिन्न आहे अथवा भेदाने युक्त आहे असा प्रश्न उपस्थित झाला असता त्याचे उत्तर देण्यासाठी श्रीपरमेश्वर "**विद्याशरीरसत्ता मन्त्ररहस्यम्।।३।।**" हे सूत्र सांगत आहेत.।।८।।

शुद्ध चित्तात चित् म्हणजे चैतन्याचा सहसा किंवा एकदम जो ज्ञानोदय होतो त्याला "स्व" म्हणजेच आत्म्याच्या विकासाची अथवा विस्ताराची विद्या असे म्हटले जाते. तीच मंत्रशरीराची सत्ता किंवा अस्तित्व असून तेच परम रहस्य होय.।।९,१०।।

**विवरण** :- अशा प्रकारे मंत्रांचे सामर्थ्य सांगत असताना साधकभक्त-योगिशिष्याच्या ठिकाणी भेदस्वरूपात प्रकाशित होत असणारा वाचक मंत्र स्वतःच्या व्यापारानंतर अर्थात् चित्तप्रवेशानंतर सर्व विश्वाशी अभिन्न असणाऱ्या अशा "अहं विमर्शाशी" म्हणजे पूर्ण अहंज्ञानाचे सार व्यक्त करीत असणाऱ्या वाच्याशी म्हणजेच कला इत्यादींशी अभिन्नच असतो. "**प्राक् संवित् प्राणे परिणता।।**" अर्थात् "पूर्वीची संवित् अथवा चैतन्यशक्ती प्राणात परिणत झाली," या शास्त्रात सांगितलेल्या वचनानुसार बिंदुस्वरूप असणारी परावाणी-रूप शक्ती विस्तारित क्रियाशक्तीने युक्त नादरूपाने सूक्ष्म प्राणांचा आश्रय घेऊन श्रेष्ठ नादाने युक्त होते. त्यानंतर हीच नादरूपी शक्ती चित्प्रकाशाच्या प्राधान्याने अथवा प्रामुख्याने ज्यात वाच्य आणि वाचक यांचा क्रम अजून स्पष्ट झालेला नाही अशा पश्यंती वाणीचे स्वरूप उघड करून त्यानंतर लगेच बुद्धिरूप अधिष्ठान असणाऱ्या व ज्यात क्रम स्पष्ट व अस्पष्ट अशा दोन्ही प्रकारचा आहे अशा स्पष्ट व अस्पष्टयुक्त मध्यमा वाणीला जागे करते.

त्यानंतर इंद्रियांचे प्राधान्य असणाऱ्या आणि ज्यात क्रम स्पष्ट झालेला आहे अशा वैखरी वाणीला खुलविते. अशा प्रकारचा प्रसरक्रम आहे. त्यामुळे प्राच्यतर रूपात गेल्याशिवाय प्रकाशमानता नाही आणि हे सिद्ध करण्याची दुसरी उपपत्ती अथवा उपाय नसल्याने हे मंत्रचक्र परतर अशा वाच्याशी म्हणजे कलादींशी अभिन्नच असते.

अशा प्रकारे मंत्ररूप रहस्यार्थ असून साधकांनी मंत्रांसंबंधी असणाऱ्या उदयाची म्हणजेच परमोदयाची अपेक्षा करावी.।।११।।३।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"विद्याशरीरसत्ता मन्त्ररहस्यम्।।३।।"** अर्थात् विद्याशरीर म्हणजेच शब्दराशी होय. या शब्दराशीची सत्ता म्हणजेच संपूर्ण विश्वात असणारी अभेदमय अथवा कोणत्याही प्रकारच्या भेदांनी रहित असणारी अहंविमर्शात्मक अर्थात् "अहं" किंवा "स्व" किंवा श्रीशिवांच्या ज्ञानाने युक्त स्फुरत्ता किंवा चैतन्यशक्ती अर्थात् कुंडलिनी होय. तीच मंत्राचे रहस्य किंवा उपनिषत् होय.।।३।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा म्हणजे साधन करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याकडून साध्य होणाऱ्या मंत्राचे वीर्य म्हणजे काय याचे वर्णन आता **"विद्याशरीरसत्ता मन्त्ररहस्यम्।।३।।"** या सूत्राद्वारा लक्षणासहित केले जाईल. याचे थोडे विवेचन यापूर्वी केलेले आहेच.।।१०।।

परमाद्वैतज्ञान करून देणारी ती विद्या होय. तिचे शरीर म्हणजेच अकारादि क्षकारान्त पन्नास अक्षरे होत.।।११।।

त्याची सत्ता म्हणजे कुंडलिनी शक्ती म्हणजे सर्व मार्गाला कारणीभूत होणारी व पूर्णाहंतास्वरूप आहे. तीच मनन व रक्षण असा धर्म असणाऱ्या मंत्रांची स्फुरत्ता आहे अर्थात् मंत्र स्फुरण पावण्याला किंवा व्यक्त होण्याला तीच कारणीभूत आहे.।।१२।।

या गुप्त अर्थाच्या उत्पत्तीलाच रहस्य असे म्हटले आहे. हे श्रीक्षेमराजांनी "**तंत्रसार**" या ग्रंथातील योग्य प्रकारच्या ऊहापोहाने व सर्वसंमत संवादाने उत्तमरीतीने वर्णिले आहे.।।१३,१३.५।।

असे यथातथ्य महाहृदाच्या अनुसंधान प्रकारामुळे कळलेले मंत्रसामर्थ्य अर्थात् मंत्रवीर्य श्रीमहेशांच्या इच्छेनेच आवडते होते किंवा झालेले आहे.।।१४,१५।।३।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

"**विद्याशरीरसत्ता मन्त्ररहस्यम्।।३।।**" या सूत्रात या मंत्राच्या पूर्वी सांगितलेल्या साधकसाध्याच्या वीर्यलक्षणाच्या द्वारा तत्संबंधीचे सविस्तर व योग्य तऱ्हेने प्रतिपादन केले आहे. या सूत्रात एक घटक अर्थात् एक अंश अथवा एक भाग म्हणून प्रवेश केलेली विद्या ही श्रीपरमशिवांसह अद्वैतभावाने राहते असे जाणावे. हे शरीर म्हणजे श्रीभगवान् शब्दराशी होत. त्यांची सत्ता म्हणजे कुंडलिनी शक्ती ही त्यांच्याशी सर्व अध्वांमध्ये पूर्णाहंतारूपाने असते. ही सत्ता किंवा त्यांच्याशी अभिन्नरूपाने असणारी शक्ती ही अस्तित्व, मनन व त्राण अर्थात् रक्षण करणाऱ्या स्वरूपरूप मंत्राचे स्फुरण करणारी आहे. गूढ अशा अर्थस्वरूपाचा जन्म म्हणजे रहस्य होय. या ठिकाणी श्रीक्षेमराजाचार्यांची संमती अथवा अशा अर्थाला त्यांची मान्यता ही "**श्रीतंत्रसार**" या ग्रंथावरच्या वृत्तीवरून जाणली जाते.

त्याचप्रमाणे हे गूढरहस्य शास्त्रात पुढीलप्रमाणे प्रकट केले आहे.

**सर्वे वर्णात्मका मन्त्रास्ते च शक्त्यात्मकाः प्रिये।**
**शक्तिस्तु मातृका ज्ञेया सा च ज्ञेया शिवात्मका।**

**अर्थ :-** सर्व मंत्र वर्णात्मक आहेत. ते वर्ण शक्तीने युक्त असून ही शक्ती म्हणजे मातृका आहे आणि ही मातृका श्रीशिवस्वरूप किंवा श्रीशिवात्मक आहे म्हणजेच सर्व मंत्र हे श्रीशिवात्मक आहेत.

"**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथात हे पुढीलप्रमाणे प्रकट केले आहे.

**न जानन्ति.......। ......... वर्णास्तु केवला।।३।।**

**विवरण :-** मंत्र चैतन्ययुक्त झाल्यानंतर जी शक्ती जागृत होते त्या शक्तीला विद्या असे म्हणतात. कुंडलिनी शक्तीचे श्री आणि कुंडलिनी जागृतीचे श्रीविद्या अशी नावे प्रसिद्धच आहेत. मंत्रातली अक्षरे तर केवळ त्याच्या स्थूल शरीराप्रमाणे आहेत. मंत्रांशी संबंधित विद्येची अधिष्ठात्री देवता साक्षात् प्रकट झाल्यानंतरच ते मंत्र "सिद्ध" झाले असे मानले जाते. त्यामुळे विद्येची सत्ता अथवा अस्तित्व अधिष्ठात्या देवतेत आहे आणि ते त्या शक्तीद्वारे अभिव्यक्त किंवा प्रत्यक्ष होते. मंत्र म्हणजे त्या देवतेचे स्थूल शरीर होय.

शक्तीची अभिव्यक्ती चित्तामध्ये प्रकट होते. श्रीसद्गुरूंनी दिलेल्या मंत्रामध्ये श्रीसद्गुरूंच्या संकल्पाच्या द्वारा चित्तामधली आंशिक शक्ती बीजरूपाने शिष्यामध्ये संक्रमित केली जाते. त्यानंतर ती शिष्याच्या चित्तात अंकुरित होऊन विकास पावते. मंत्रांची अक्षरे एका वाहकाचे अर्थात् वाहून नेणाऱ्याचे काम करतात.

ज्याप्रमाणे बीजामध्ये फळ, फूल, पान या अवयवांसकट सगळा वृक्ष अस्तित्वात असतो त्याप्रमाणेच विद्येचे पूर्ण शरीर बीजरूपाने मंत्रामध्ये ठेवलेले असते. विद्येची सत्ता म्हणजेच शक्ती ही चित्ताशी संबंधित असते. अक्षरांशी नाही. त्यामुळे केवळ पुस्तकांमध्ये लिहिलेले मंत्र स्वतःच स्वतः जपण्याचा निषेध शास्त्रकारांनी केलेला आहे; कारण ते मंत्र म्हणजे केवळ अक्षरे आहेत. ज्याप्रमाणे पाषाणमूर्ती प्राणप्रतिष्ठा झाल्यानंतरच पूजनीय ठरते त्याप्रमाणेच कोणताही मंत्र श्रीसद्गुरुमुखातून प्राप्त झाल्यानंतरच प्राणप्रतिष्ठित होऊन जप करण्याला योग्य होतो. मंत्राच्या पुरश्चरण इत्यादि द्वारा साधकातली पहिल्यापासून विद्यमान असलेली शक्ती वाढू लागते. मंत्र हा दिवा लावण्याऱ्या काड्याच्या पेटीप्रमाणे काम करतो. मंत्र ज्या देवतेसंबंधी असतो ती जागृत झाल्यानंतर शक्ती त्याच देवतेचे रूप धारण करून वरदायिनी होते. त्यामुळेच तिला विद्या असे म्हणतात म्हणजे येथे या विद्येला चेतनशक्तिवाचक मानले पाहिजे.

या दुसऱ्या भागात जो शाक्तोपाय सांगितला आहे त्याच्याच स्वरूपाचे ज्ञान होण्यासाठी मंत्र हा प्रमुख शाक्तोपाय आहे असे म्हटले आहे. पहिले सूत्र मंत्र म्हणजे खरोखर काय तत्त्व आहे? हे सांगते. मंत्र म्हणजे "श्रीशिवांशी आपली तादात्म्यता आहे हे ज्याच्यामुळे कळते ते तत्त्व होय. केवळ अक्ष-रांनी मंत्र बनत नसून त्या मंत्राचा ज्या देवतेशी संबंध आहे त्या देवतेशी आपले सामरस्य आणि पर्यायाने सर्व मंत्रांचे हृदय अशा परमात्म्याशी तादात्म्य यांची जाणीव असे मंत्र या शब्दाचे स्वरूप आहे." मंत्राचा उद्देश मनाला देवाकडे वळविणे हा आहे. अशा प्रकारचे देवतास्वरूप झालेले मन हेच मंत्र होय.

हे तिसरे सूत्र आश्चर्यजनक माहितीच्या खजिन्यासह पहिल्या सूत्रातील कल्पनेला बळकटी देते.

या सूत्राचा प्रारंभ विद्याशरीरसत्ता ही मंत्राच्या रहस्याची बांधणी करते असे सांगण्याने होतो. ही विद्याशरीरसत्ता म्हणजे विश्वात्मक श्रीशिवांच्या पराहंतेची जाणीव होय. सर्व मंत्रांची उत्पत्ती म्हणजे हा दिव्य अहंपरामर्श होय आणि या अहंविमर्शाकडेच सर्व मंत्र उद्देशिलेले असले पाहिजेत. मंत्र हे अक्षरांनी बनलेले असतात.

यानंतर असे सांगण्यात आले आहे की, अहंविमर्शाचे क्रियात्मक स्वरूप म्हणजे परावाक् किंवा पराशक्ती होय. ही पराशक्ती म्हणजे कुंडलिनी शक्ती असून ज्यावेळेला व्यक्त जग विसर्जित होते अथवा नष्ट होते त्यावेळेला ही

शक्ती वैश्विक निद्रेत जाते. त्यानंतर श्रीशिव आणि शक्ती यांच्यामध्ये मिसळण्याची प्रक्रिया होते आणि ती प्रक्रिया सुरू असतानाच "**अ**" हा वर्ण अस्तित्त्वात येतो. हा "**अ**" वर्ण सर्व वर्णांचे उत्पत्तिस्थान आहे. त्यामुळे मंत्रातली अक्षरे ही केवळ मृत चिह्ने किंवा निर्जीव खुणा नसून त्यांचा अंगुलीनिर्देश हा त्यांचे उत्पत्तिस्थान असणाऱ्या श्रीशिवांच्या अहंतेकडे असतो. त्यामुळेच प्रत्येक मंत्र म्हणत असताना आपले चित्त हे त्या अहंतेकडे लावलेले असावे.।।३।।

**सूत्र क्रमांक ४**

**संबंध :-** ज्या साधकभक्तयोगिशिष्यांना वर सांगितलेल्या विवरणानुसार पूर्णाहंतेच्या विमर्शाचा विकास जर श्रीपरमेश्वराच्या इच्छेने समजला नाही तर त्यांचे मन बिंदू व नाद यांच्या शक्तींनी उत्पन्न होणाऱ्या मितसिद्धींमध्ये रमते आणि ज्याप्रमाणे मार्गावरून चालणारा पथिक आपले ध्येय विसरून गवत आणि पाने गोळा करीत बसतो **(रथ्यां गमने तृणपर्णानि इति नीत्या)** त्याप्रमाणे हा साधकभक्तयोगिशिष्य आपले ध्येय विसरून या मितसिद्धींच्या मागे लागतो. हा विषय श्रीशिवांनी पुढच्या सूत्रात सांगितला आहे.

**गर्भे चित्तविकासोऽविशिष्टविद्यास्वप्नः ।।४।।**

**शब्दार्थ :- गर्भे -** गर्भात. गर्भ म्हणजे मूल अज्ञान, अख्याती किंवा महामाया होय. मायेच्या मर्यादित शक्तीत किंवा योगमायाभूमीत म्हणजे अख्याति-रूप महामायेत अर्थात् मित मंत्रसिद्धींच्या प्रपंचात. (**तदात्मके मित-मन्त्रसिद्धिप्रपञ्चे** - श्रीक्षेमराजाचार्य.) **चित्तविकासः -** मनाचे समाधान. ज्याच्या मनाचा विकास अर्थात् ज्याचे मन प्रसन्न आहे त्याला. (मर्यादित शक्तींमध्ये संतोष - श्रीक्षेमराजाचार्य.) **अविशिष्ट -** सामान्य किंवा सर्वजन साधारण विद्या. (सर्वजनसामान्यरूप - श्रीक्षेमराजाचार्य.) **विद्या -** किंचित् ज्ञान, मर्यादित ज्ञान असणारी अशुद्ध विद्या. (श्रीक्षेमराजाचार्य.) **स्वप्न -** स्वप्न किंवा स्वप्नासारखी भासात्मक अर्थात् त्याची स्वप्नाप्रमाणे. (भेदनिष्ठ विकल्पात्मक भ्रम - श्रीक्षेमराजाचार्य.) **अविशिष्ट विद्यास्वप्नः -** स्वप्नाप्रमाणे गोंधळवून टाकणारे मर्यादित ज्ञान.

**अर्थ :-** दुय्यम सिद्धींचा मोह पडणाऱ्यांना मायेच्या म्हणजे कुंडलिनीच्या मर्यादित शक्तीत मनाचे समाधान मिळते; परंतु सर्वसामान्य मर्यादित ज्ञान हे स्वप्न किंवा भेदनिष्ठ विकल्पात्मक भ्रमाप्रमाणे अगर स्वप्नाप्रमाणे असते म्हणजे योगमायाभूमीत अर्थात् अख्यातिरूप महामायेत म्हणजे मित मंत्रसिद्धींच्या प्रपंचातच ज्याच्या मनाचा विकास होतो अर्थात् ज्याचे मन प्रसन्न होते त्याची

ती सर्वसाधारण विद्या अर्थात् किंचित् ज्ञानाची अशुद्धविद्या स्वप्नासारखी भ्रमात्मक आहे अर्थात् त्याची समाधी स्वप्नाप्रमाणे आहे.।।४।।

**विशेष व्याख्या :-** जो साधकभक्तयोगिशिष्य श्रीईश्वराच्या इच्छेनेच त्या परप्रमातृभावाची स्थिती प्राप्त करण्याला असमर्थ होऊन मार्गातल्या प्रलोभनांमध्येच रमतो त्याचे मन योगमायाभूमीतच अर्थात् सहा मितसिद्धींमध्येच प्रसन्न राहते. जरी त्या साधकभक्तयोगिशिष्याला थोडेसे ज्ञान प्राप्त झाले तरीही तो अशुद्ध-विद्येच्या म्हणजेच सर्व जनसाधारण विद्येच्या विशेष चमत्कारांमध्येच गुंतून राहतो आणि परलाभापासून वंचित राहतो. त्याची समाधिदशा ही स्वप्नात असणाऱ्या जीवाप्रमाणे भ्रामक असते. व्युत्थानदशेत जरी त्याने या मित-सिद्धींचा प्रयोग केला तरी समाधीमध्ये या सिद्धी त्याच्यासाठी अडथळाच बनतात. त्यामुळे असा साधक स्वच्छंद परमार्थलाभापासून वंचितच राहतो.

"**श्रीपातंजलयोगदर्शन**" या ग्रंथामध्ये यासंबंधी असे म्हटले आहे की-

**ते समाधावुपसर्गा व्युत्थाने सिद्धयः।।३.२७।।**

**अर्थ :-** या सहा प्रकारच्या सिद्धी म्हणजे समाधीच्या सिद्धीमध्ये म्हणजेच ज्ञानप्राप्तीमध्ये विघ्ने आहेत आणि व्युत्थानात सिद्धी आहेत.।।३.२७।।

अशा साधकभक्तयोगिशिष्याची देहवासना संपलेली नसते. त्यामुळे त्याच्या बिंदू व नादाच्या शक्तींपासून उत्पन्न झालेल्या मितसिद्धी अस्थायी असतात आणि त्या साधकभक्तयोगिशिष्याला नेहमी क्षुब्ध करीत असतात. त्यामुळे साधकभक्तयोगिशिष्याने नेहमी सावध राहिले पाहिजे. हे सर्व श्रीसद्गुरूंचे कृपापात्र बनून राहण्यानेच होऊ शकते.।।४।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

ज्यांना हे अशा प्रकारचे मंत्रवीर्य महाह्रदाच्या अनुसंधानासाठी उपयोगी आहे असे जर श्रीपरमेश्वराच्या इच्छेमुळेच हृदयभूत झाले नाही अथवा अनुभवास आले नाही तर केवळ आनुषंगिक असणाऱ्या बिंदू व नादादि कलेतून उत्पन्न होणाऱ्या मितसिद्धींमध्ये ज्या साधकभक्तयोगिशिष्याचे चित्त गुंतून राहते त्यांचे वर्णन करताना श्रीशिवांनी "**गर्भे चित्तविकासोऽविशिष्ट-विद्यास्वप्नः।।४।।**" हे सूत्र कथन केले आहे.

गर्भ म्हणजे अख्यातिरूप म्हणजे जिचे वर्णन करता येत नाही किंवा जी स्पष्ट करून सांगता येत नाही अशी महामाया होय. या मायेने युक्त असणाऱ्या मितमंत्रसिद्धींच्या विस्तारामध्ये साधकभक्तयोगिशिष्याच्या चित्ताचा जेवढा विकास होतो तेवढ्याच प्रसारात त्याला संतोष वाटतो. हेच अवशिष्ट अर्थात्

सर्व जनांमध्ये साधारण असणारे किंचिज्ज्ञत्व अर्थात् अत्यंत अल्प अशी अशुद्धविद्या होय. हेच स्वप्न होय म्हणजेच भेदावर आधारलेला विचित्र विकल्पांनी युक्त असा भ्रम होय.

यासंबंधी "**श्रीपातंजलयोगदर्शन**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**ते समाधावुपसर्गा व्युत्थाने सिद्धयः।।३.३७।।**

**अर्थ :-** ती अशुद्धविद्या म्हणजे समाधीतील उपसर्ग आणि जागृत अवस्थेमधील सिद्धी होत.।।३.३७।।

**विवरण :-** ते म्हणजे या प्रतिभादि सिद्धी या एकाग्र झालेल्या चित्ताचे होणारे उपसर्ग होत. त्या दर्शनप्रत्यनीकत्वामुळे अर्थात् दर्शनांच्या विघ्नांमुळे जागृत झालेल्या चित्ताच्या उत्पद्यमान सिद्धी होत. योगजधर्माने अनुग्रहीत केलेल्या मन, श्रोत्र, त्वचा, चक्षू, जीभ व घ्राण अर्थात् नाक यांपासून अनुक्रमे प्रातिभ, श्रावण, वेदन, आदर्श, आस्वाद व वार्ता या सिद्धी उत्पन्न होतात. त्यांचे वर्णन असे आहे.

**१) प्रातिभ :-** या सिद्धीमुळे सूक्ष्म, दूर अंतरावरच्या, होऊन गेलेल्या आणि समोर न आलेल्या सर्व गोष्टींचे ज्ञान होते.

**२) श्रावण :-** या सिद्धीमुळे दिव्य शब्दांचे ज्ञान होते.

**३) वेदन :-** या सिद्धीमुळे दिव्य स्पर्शाचे ज्ञान होते.

**४) आदर्श :-** या सिद्धीमुळे दिव्य रूपाचे दर्शन होते.

**५) आस्वाद :-** या सिद्धीमुळे दिव्य रसाचे ज्ञान होते.

**६) वार्ता :-** या सिद्धीमुळे दिव्य गंधाचे ज्ञान होते.

येथे सूत्र आणि भाष्य यांचे प्रयोजन आहे. ज्या साधकभक्तयोगिशिष्यांचे चित्त अथवा मन बाह्य विषयांमध्ये गुंतलेले आहे त्यांनाच या सिद्धी वाटतात. ज्याप्रमाणे जन्मापासून दरिद्री असणाऱ्या माणसाला द्रव्याचा कणही द्रव्याच्या संभाराप्रमाणे वाटतो त्याप्रमाणेच निम्न दर्जाच्या बहिरोन्मुख व संसारोन्मुख साधकभक्तयोगिशिष्यांना या सिद्धी महत्त्वाच्या वाटतात. अंतःकरण एकाग्र झाल्यानंतर समाधिप्रियसिद्धयोग्यांनी या सिद्धी आपण होऊन आल्या तरी या सिद्धींपासून विरक्त असावे. तापत्रयांना उत्पन्न करणाऱ्या गोष्टींना शांत करणाऱ्या परमपुरुषार्थाला या सिद्धी अडथळा करतात. त्यामुळे या सिद्धींना साधकभक्तयोगिशिष्यांनी व सिद्धयोग्यांनी दूरच ठेवावे.

हाच आशय खालील "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील कारिकेत एकत्रित केलेला आहे.

**अतो बिन्दुरतो नादो रूपमस्मादतो रसः।**
**प्रवर्तन्तेऽचिरेणैव क्षोभकत्वेन देहिनः।।४.४२।।**

**अर्थ :-** असा योगाभ्यास किंवा सिद्धयोगसाधना करताना साधकभक्त-योगिशिष्यामध्ये अल्प काळातच विशेष तेजयुक्त बिंदू नजरेसमोर दिसणे, अनाहत नाद ऐकू येणे, मिट्ट काळोखातही पदार्थ दिसण्याचे सामर्थ्य येणे, मुखात अमृतासारखी चव असणारा रस पाझरणे अशा अमित अर्थात् अमर्यादित सिद्धी अभिव्यक्त होतात. परंतु ज्या योग्याचा देहाभिमान पूर्णपणे गळालेला नाही त्या साधकभक्तयोगिशिष्याच्या मनामध्ये त्या गोष्टी क्षोभ उत्पन्न करतात.।।४.४२।।

**विवरण :-** बिंदू म्हणजे भ्रूमध्याच्या ठिकाणी ध्यानाचा सतत व चिरकाळ अभ्यास केल्याने उत्तरोत्तर वाढत जाणारा प्रसाद किंवा श्रीपरमेश्वराची कृपा असलेला तेजोविशेष होय. हा बिंदुभेद करण्याच्या अभ्यासामुळे पृथ्वीतत्त्वाचा अभ्यास करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यांच्या ठिकाणी तेजोविशेष अभिव्यक्त होतो. त्याचप्रमाणे नाद अर्थात् अनाहतनाद म्हणजेच आकाशतत्त्वाच्या ध्यानाने उत्पन्न होणारा ध्वनिविशेष आहे. हा नाद प्रथम वेगवान् नदीच्या प्रवाहाच्या आवाजासारखा असतो. नंतर ज्यावेळेला क्रमाक्रमाने तो सूक्ष्म सूक्ष्म होत जातो त्यावेळेला तो मध पिऊन उन्मत्त झालेल्या भुंग्यांच्या आवाजासारखा असतो. तो स्वतःच उच्चारित होणारा म्हणजेच आपोआप उत्पन्न होणारा असतो. तो नाद आकाशतत्त्वाचा अभ्यास करणारेच ऐकतात. त्याचप्रमाणे रूप म्हणजे अंधाराचे आवरण असूनही त्या त्या दृश्य वस्तूच्या आकाराचे दर्शन होय. हे रूप तेजस्तत्त्वामध्ये चक्षू व मन स्थिर करणाऱ्यांनाच निरीक्षण करता येते किंवा पाहता येते. रस म्हणजे रसाने युक्त असणाऱ्या व भोगण्याला योग्य वस्तूंचा अभाव असतानाही म्हणजे अशा वस्तू नसतानाही मुखामध्ये अमृताचा स्वाद उत्पन्न होणे होय. हा स्वाद फक्त पडजीभेच्या ठिकाणी लक्ष एकाग्र केलेल्या जलतत्त्वाच्या अभ्यासूंनाच अनुभविता येतो. जे वायुतत्त्वाचा अभ्यास करतात त्यांना स्पर्शसुखाचा अनुभव येतो. परंतु उन्मेषाभ्यासी साधकभक्तयोगिशिष्यांनी या सिद्धींमध्ये संतोष मानू नये; कारण या सिद्धी श्रेष्ठपद मिळविण्यात अडचणी आहेत.।।४।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

या सिद्धी कशा प्राप्त होतात ? हे सांगताना "सर्वव्यापी श्रीपरमेश्वररूप मंत्रोदय झाला की, विशिष्ट चित्तविकास होतो व अविद्या लुप्त होते," हे **"गर्भे**

**चित्तविकासोऽविशिष्टोविद्यास्वप्नः ।।४।।"** या फलप्रद सूत्राने सांगतात. ।।११-११.५।।

स्वप्रकाशरूप आनंदात चित्त खेचले गेले की, वेगळे होण्याच्या बलामुळे ते विषयांपासून निवृत्त होते अर्थात् मागे फिरते. ही मनाची चिन्मयी स्थिती असून हाच पर विकास आहे. या स्थितीत चैतन्यचंद्राच्या चांदणीचे अमृत भरलेले असते.।।१२.५-१३।।

शाक्तामृताच्या अलोट प्रवाहाने हे विश्व आनंदमय होऊन जाते. त्या पर-विकासाच्या अस्तित्वामुळे पृथ्व्यादि तत्त्वसमूहांनी व्यक्त होणाऱ्या अविद्येचा अलंग्रासयुक्तीने अर्थात् संपूर्णपणे गिळून टाकण्याच्या युक्तीने लोप होतो. ।।१४-१४.५।।

तर हे अशा प्रकारे असताना या सूत्रातून उपायांसहित सर्वमंत्रमुद्रास्वरूप अशी विद्याच श्रीशिवांनी यथायोग्य प्रकाराने सांगितली आहे.।।१५-१५.५।।४।।

**विवरण :-** मंत्रोदयासाठी चित्ताचा प्राकृतस्वभाव नष्ट होऊन चित्तात राहणाऱ्या सत्त्वादि गुणोत्पन्न जाग्रदादि तीन अवस्थांचे स्वरूप लुप्त झाल्याने अतिश्रेष्ठ परपदाचा अवलंब करणे हा उपाय आहे. मंत्रवीर्याची अशा प्रकारे प्राप्ती झाली असता इतर मंत्र व त्या मंत्रांनी संजीवित मांत्रिकांना योग्य अधिकार प्राप्त झाला नसल्यास शक्तीचे आधान करावे लागते. नाही तर वर-खाली असलेल्या आत्मरूप श्रीशिवांची मंत्रयोजना जडत्व आणि निष्फलत्व आणणारी होऊन व्यर्थच होईल, असा याचा भावार्थ आहे.

हाच भाव **"श्रीस्पंदशास्त्र"** या ग्रंथातील पुढील कारिकेत स्पष्ट केला आहे.

**अतो बिन्दुरतो नादो रूपमस्मादतो रसः।**
**प्रवर्तन्तेऽचिरेणैव क्षोभकत्वेन देहिनः।।४.४२।।**

**अर्थ :-** असा योगाभ्यास किंवा सिद्धयोगसाधना करताना साधकभक्त-योगिशिष्यांमध्ये अल्प काळातच विशेष तेजयुक्त बिंदू नजरेसमोर दिसणे, अनाहत नाद ऐकू येणे, मिट्ट काळोखातही पदार्थ दिसण्याचे सामर्थ्य येणे, मुखात अमृतासारखी चव असणारा रस पाझरणे अशा अमित अर्थात् अमर्यादित सिद्धी अभिव्यक्त होतात. परंतु ज्या साधकभक्तयोगिशिष्यांचा देहाभिमान पूर्ण-पणे गळालेला नाही त्यांच्या मनामध्ये त्या गोष्टी क्षोभ उत्पन्न करतात.।।४.४२।।४।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"गर्भे चित्तविकासोऽविशिष्टविद्यास्वप्नः ।।४।।"** अर्थात् गर्भात म्हणजे

मंत्रसिद्धीच्या खटाटोपात चित्ताचा होणारा विकास म्हणजेच तात्पुरता होणारा संतोष होय. हा तात्पुरता संतोष हीच अशुद्ध विद्या होय; कारण ही विद्या सर्वजनसामान्य आणि थोड्याशा ज्ञानाने किंवा ज्ञातृत्वाने युक्त असते. ही अशुद्धविद्या हीच स्वप्न आहे; कारण ती भेदनिष्ठ अर्थात् भेदांवर आधारलेली आणि विचित्र विकल्प किंवा कल्पनांनी युक्त आहे. स्वप्नाचे स्वरूपही याच प्रकारचे असल्याने अशुद्धविद्येला स्वप्न असे म्हटले आहे. यालाच भ्रम असे म्हटले आहे. "**श्रीपातंजलयोगसूत्र**" या ग्रंथात या संबंधी असे म्हटले आहे की, "**ते समाधावुपसर्गा व्युत्थाने सिद्धयः ।।३-३७।।**" अर्थात् "या सिद्धी म्हणजे समाधीच्या सिद्धीत म्हणजेच ज्ञानप्राप्तीत विघ्न असून जागृतावस्थेत सिद्धी आहेत."।।४।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

ज्या साधकभक्तयोगिशिष्यांचे चित्त बिंदुनादादींपासून उत्पन्न होणाऱ्या क्षुल्लक, तुच्छ किंवा क्षुद्र सिद्धींमध्ये वसत नाही किंवा गुंतत नाही अथवा अडकून पडत नाही त्या मित योग्यांच्या "**गर्भे चित्तविकासोऽविशिष्ट-विद्यास्वप्नः ।।४।।**" अर्थात् "गर्भात सामान्यविद्यारूप चित्तविकास होतो," तो स्वप्नाप्रमाणे समजावा.।।१६।।

गर्भ म्हणजे अख्याती अर्थात् ज्या गोष्टीला कोणतेही नाव नाही म्हणजे ज्या गोष्टीच्या स्वरूपाचे वर्णन करून सांगता येणार नाही अशी वस्तू होय. ही अख्याती म्हणजेच अज्ञान अर्थात्च महामाया होय. या महामायेने युक्त अशा सिद्धिसमूहामध्ये चित्ताचा विकास म्हणजेच अंतःकरणाला तेवढीच कृतार्थता प्राप्त होते.।।१७।।

किंवा हीच अविशिष्ट अथवा अशुद्ध विद्या होय. ही विद्या किंचिज्ज्ञत्व म्हणजेच सामान्यस्वरूपाची आहे. हिला स्वप्न अशी संज्ञा दिलेली आहे; कारण यामध्ये जे ज्ञान होते ते खरे नसते म्हणजे विकल्पात्मक असते अर्थात् खरे व खोटे असे संमिश्र असते.।।१८।।४।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

महाह्रदाचे अनुसंधान करण्याचा जो उपाय म्हणून पूर्वी सांगितला आहे तो उपाय म्हणजेच मंत्रवीर्य हे सुद्धा भगवान् श्रीपरमेश्वराच्या इच्छेनेच हृदयंगम होत नाही; तर बिंदुनादादि कलांपासून उत्पन्न होणाऱ्या परिमित अर्थात् मर्यादित किंवा क्षुद्र सिद्धींपासून उत्पन्न होऊन त्या साधकभक्तयोगि-शिष्यांचे चित्त खेचून घेते. अशा प्रकारे साधकभक्तयोगिशिष्यांचा चित्ताचा

विकास कसा होतो हे "**गर्भे चित्तविकासोऽविशिष्टविद्यास्वप्नः ।।४।।**" या सूत्रात प्रदर्शित केले आहे. गर्भ म्हणजे अख्याती अर्थात् ज्या गोष्टीचे कधीच वर्णन करता येत नाही आणि ज्याचे स्वरूप सांगता येत नाही अथवा जिला नाव देता येत नाही अशी महामाया होय. या महामायारूप परिमित अर्थात् क्षुद्र मंत्रसिद्धींच्या प्रसारात चित्ताचा जो विकास म्हणजेच तेवढ्यापुरताच संतोष होतो किंवा समाधान होते त्या संतोष किंवा समाधानालाच सर्व लोकात साधारण व सामान्य रूपात अस्तित्वात असणारी अविशिष्ट विद्या असे म्हणतात. हिलाच किंचित् ज्ञान करून देणारी अशुद्धविद्या असे म्हणतात. हीच स्वप्न होय. स्वप्न म्हणण्याचे कारण हिच्यामुळे अनेक भेद उत्पन्न करणारे विचित्र व विकल्पात्मक भ्रम निर्माण होतात किंवा गोंधळ निर्माण होतो.

यासंबंधी "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथामध्ये असे म्हटले आहे की -

**अतो बिन्दुरतो नादो रूपमस्मादतो रसः ।**
**प्रवर्तन्तेऽचिरेणैव क्षोभकत्वेन देहिनः ।।४.४२।।**

**अर्थ :-** असा योगाभ्यास किंवा सिद्धयोगसाधना करताना साधकभक्त-योगिशिष्यांमध्ये अल्प काळातच विशेष तेजयुक्त बिंदू नजरेसमोर दिसणे, अनाहत नाद ऐकू येणे, मिट्ट काळोखातही पदार्थ दिसण्याचे सामर्थ्य येणे, मुखात अमृतासारखी चव असणारा रस पाझरणे अशा अमित अर्थात् अमर्यादित सिद्धी अभिव्यक्त होतात. परंतु ज्या साधकभक्तयोगिशिष्यांचा देहाभिमान पूर्णपणे गळालेला नाही त्यांच्या मनामध्ये या गोष्टी क्षोभ उत्पन्न करतात. ।।४.४२।।

बिंदू म्हणजेच श्रीशिवांपासूनही विभक्त नसलेला असा श्रीशिवप्रकाश होय. त्याची व्याख्या करताना असे म्हटले आहे की, भ्रूमध्यादि प्रदेशात सततच्या ध्यानाभ्यासानंतर उत्तरोत्तर वाढत जाणारे विशिष्ट तेज होय. भ्रूमध्य-स्थानी ध्यानाभ्यासामुळे पृथ्वीतत्त्वाचे ध्यान करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यां-समोर हे तेजोविशेष प्रकट होते.

नाद म्हणजे प्रणवरूप विशिष्ट ध्वनी किंवा आवाज होय. आकाशतत्त्वाचे ध्यान करणारे साधकभक्तयोगिशिष्यजन हा आवाज ऐकतात.

रूप म्हणजे घनदाट अंधाराने भरलेला प्रदेश असूनही तेथे असणाऱ्या सर्व दृश्य म्हणजे दिसण्याजोग्या वस्तूंचा आकार स्पष्टपणे दिसून येणे.

रस म्हणजे रस निर्माण करणारे पदार्थ उपस्थित नसूनही मुखामध्ये अमृतस्वादाचा अनुभव येणे होय. हा अनुभव आपतत्त्वाचा म्हणजेच जलत-

त्वाचा अभ्यास करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यांना येतो. त्याचप्रमाणे वायु-तत्त्वाचे ध्यान करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यांना स्पर्शानंदाचा अनुभवही यामुळेच येतो.

साधकभक्तयोगिशिष्यांनी आपले चित्त दुसरीकडे कोठेही जाऊ न देता एकाग्र करून प्राप्त झालेल्या सिद्धींपासून विरक्त व्हावे. आध्यात्मिक, अधिभौतिक व आधिदैविक या तीन प्रकारच्या तापांपासून उत्पन्न होणाऱ्या दुःखांना शांत करणारा मोक्ष नावाचा परमपुरुषार्थ प्राप्त करण्याची इच्छा करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यांनी या परमश्रेष्ठ पद प्राप्त करण्यात अडथळा आणणाऱ्या सिद्धींची इच्छा करू नये.।।४।।

**विवरण :-** गर्भ म्हणजे शक्तीच्या सुप्तावस्थेमध्ये चित्ताचा विकास, प्रयत्न किंवा क्रिया असून संकल्प-विकल्पादींच्या रूपात अवशिष्ट म्हणजेच सामान्य स्तरावर ती होत असते. ती जागृत शक्तीच्या अपेक्षेने स्वप्नाप्रमाणे असते.

कुंडलिनी शक्ती जागृत होण्याआधी मनुष्याच्या सर्व शारीरिक, मानसिक व बाह्याभ्यंतर आदि क्रिया ही शक्ती झोपलेल्या अवस्थेप्रमाणे किंवा स्वप्नाप्रमाणे करवून घेत असते अर्थात् बंधनयुक्त मनुष्याचे जीवन वास्तवात एखाद्या स्वप्नाप्रमाणे असते. त्याची वास्तविक जागृती ज्यावेळेला कुंडलिनी शक्ती जागृत होते त्यावेळेलाच होते असे समजले पाहिजे.

या दृष्टीने भगवान् श्रीगोपालकृष्णनाथमहाराज **"श्रीमद्भगवद्गीता"** या ग्रंथात असे म्हणतात की -

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी।**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः।।२.६९।।**

**अर्थ :-** जी सर्वसामान्य प्राण्याची रात्र असते अशा नित्य शुद्ध बोधस्वरूप परमानंदाच्या ठिकाणी सिद्धयोगिपुरुष जागृत असतो आणि ज्या नाशवंत क्षणभंगुर सुखाच्या ठिकाणी सगळे सामान्य प्राणी जागे असतात ती तत्त्वज्ञ मनुष्याची रात्र असते.।।२.६९।।

श्रीभास्कराचार्यांनी हे सूत्रे वेगळ्या प्रकाराने स्पष्टकृत केले आहे. त्यांच्या मते हे सूत्र **"गर्भे चित्तविकासो विशिष्टोविद्यास्वप्नः।।"** असे असून बाकीच्यांच्या मते हे सूत्र **"गर्भे चित्तविकासोऽविशिष्टविद्यास्वप्नः।।"** असे आहे. श्रीभास्कराचार्यांच्या मताने या सूत्राचा अर्थ गर्भात चित्ताचा विशेष विकास झाला असता अविद्येचा स्वप्नाप्रमाणे नाश होतो. त्यांच्या मते गर्भ

म्हणजे पराहंतेचा प्रकाशस्वरूप आनंद होय. ज्यावेळेला मन अथवा चित्त या प्रकाशाकडे वळते त्यावेळेला चित्ताचा सर्वोच्च विकास होतो म्हणजे चित्त महान् आनंदाने भरून जाते. असे झाल्यामुळे ज्याप्रमाणे एखादे स्वप्न जाग आल्यावर संपून जाते त्याप्रमाणे अविद्येचा म्हणजेच प्राथमिक अज्ञानाचा नाश होतो.।।४।।

**सूत्र क्रमांक ५**

**संबंध :-** परंतु या मितसिद्धी प्राप्त होत असूनही ज्यावेळेला साधकभक्त-योगिशिष्य श्रीईश्वरकृपेने त्यांचा आश्रय घेत नाही आणि परमस्थितीचा आधार घेऊ शकतो त्यावेळेला तो परप्रमातृभावाच्या सहजस्थितीला प्राप्त करू शकतो. यासाठी पुढील सूत्र सांगितले आहे.

**विद्यासमुत्थाने स्वाभाविके खेचरी शिवावस्था।।५।।**

**शब्दार्थ :- विद्यासमुत्थाने** - परमश्रेष्ठ ज्ञानाचा अर्थात् पराद्वयप्रभारूप शुद्धविद्येचा उदय झाला असता अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत होऊन सिद्धयोगसाधनाने सुषुम्नागामी झाली असता. **स्वाभाविक** - आपोआप, सहज किंवा श्रीईश्वरी इच्छेमुळे नैसर्गिक. **खेचरी** - चिदाकाशगामी खेचरी मुद्रेत अर्थात् ज्ञानरूपी गगनात म्हणजे सहस्रारात विहार करणारी. **शिवावस्था** - श्रीशिवांची स्वानंदपूर्ण अवस्था किंवा परसंविद्रूप श्रीशिवावस्था सिद्धयोग्याला प्राप्त होते.

**अर्थ :-** ज्यावेळी श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत होऊन सिद्धयोगसाधनाने सुषुम्नागामी झाली असता श्रीईश्वरी इच्छेने आपोआप किंवा नैसर्गिक असे परमश्रेष्ठ ज्ञान उदय पावते म्हणजे श्रीशिवस्वरूपात विकसित होते त्यावेळी भगवान् श्रीशिवांची ज्ञानरूपी, अथांग, मर्यादातीत, विशाल व गगनात म्हणजे सहस्रारात विहार करणारी अशी जी आनंदोल्लासपूर्ण सामरस्य अवस्था अर्थात् श्रीशिवशक्ति-सामरस्यावस्था आहे ती सिद्धयोग्याला प्राप्त होते अर्थात् सिद्धयोग्याच्या ठिकाणी स्वाभाविक व सहज अशा शुद्धविद्येचा उदय झाल्यावर त्याला चिदाकाशगामी खेचरीमुद्रा म्हणजे सहस्रारात परसंविद्रूप श्रीशिवावस्था प्राप्त होते.।।५।।

**विशेष व्याख्या :-** अंतःकरण खूप निर्मळ झाल्यानंतर साधकभक्त-योगिशिष्य शुद्धविद्येची प्राप्ती करून घेतो. येथे त्याच्या ठिकाणी परम अद्वैत-स्वरूपाच्या ज्ञानाचा उदय होतो. श्रीपरमेश्वराच्या केवळ इच्छेनेच तो अनेक जन्मांमध्ये मिळविलेल्या पुण्यसमूहाच्या फलस्वरूपाने पराद्वयस्वरूपात डुबकी

मारतो. येथेच मितसिद्धींचा अनादर होतो आणि सर्व मायीय भेद शांत होतात. साधकभक्तयोगिशिष्य बोधरूप किंवा ज्ञानरूप आकाशामध्ये विचरण करीत असणाऱ्या खेचरी मुद्रेच्या आस्वादनामध्ये स्वाभाविक स्थिती प्राप्त करून घेतो. ही त्याची पराहंतारूप स्वानंदपूरित श्रीशिवावस्था आहे. हे स्वाभाविक विद्यासमुत्थान त्याच्या केवळ अनुसंधानाने होते.

यासंबंधी श्रुती असे म्हणते की -

**शरवत् संहितो भवेत्।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे एखादा बाण आपल्या लक्ष्यावर जाऊन लागतो त्याचप्रमाणे सिद्धयोगी चिदात्मस्वरूपाशी एकरूप होतो.

ही सिद्धयोग्याची परम सिद्धी आहे. ही अवस्था प्राप्त होण्यासाठी आचार्य श्रीउत्पलदेवांनी भगवान् श्रीशंकरांना अशी प्रार्थना केली आहे की -

**तद्विलोकनसमुत्कचेतसो योगसिद्धिरीयती सदास्तु मे।**
**यद्विशेयमभिसन्धिमात्रतस्त्वत्सुधासदनमर्चनाय ते।।**

**।।श्रीशिवस्तोत्रावली २२.६।।**

**अर्थ :-** हे परमेश्वरा! तुझ्या दर्शनासाठी अत्यंत उत्कंठित झालेल्या मला एवढीच योगसिद्धी नेहमी मिळत असू दे की, मला केवळ इच्छा होत असताना म्हणजेच मला जेव्हा पाहिजे तेव्हा तुझी पूजा करण्यासाठी तुझ्या चिदानंद सदनात अर्थात् परमानंद धामात मी प्रवेश करू शकेन.।।२२.६।।

अशा परमश्रेष्ठ सिद्धयोग्याचे या सर्व सिद्धी अनुसरण करीत असतात; परंतु तो त्यांच्याकडे पाहत देखील नाही. परम भक्त श्रीसंत श्रीपरमानंद-महाराजांनी काश्मीरी भाषेत या संबंधी एक सुंदर कविता केली आहे.

**पत लारनस् ऋद् त सिद्ध स्योद वुछ्यक् न जांह्।**

**अर्थ :-** ऋद्धी आणि सिद्धी सिद्धयोग्याच्या मागे लातात; परंतु तो त्यांच्याकडे वर डोळा करून देखील पाहत नाही.

श्रुतीनुसार अशा योग्याचा अनुभव **"सर्वं इदं अहं च ब्रह्मैव।।"** अर्थात् "हे सर्व चराचर विश्व आणि मी ब्रह्मच आहे," अशा प्रकारचा स्वरूप-चमत्कारपूर्ण असतो. काश्मीरीय श्रीशैवदर्शनात याला कुलमार्ग असे म्हणतात. कुलरूप परम श्रीशिव आहेत. "कुल" याचा अर्थ विश्वाभेद अवस्था असा आहे. यावरूनच याला "कौल" अर्थात् "त्रिक" असे नाव दिले गेले आहे. येथे सर्व प्रकारच्या क्षोभांचा लय होतो. अशा प्रकारे मंत्रवीर्याच्या स्वरूपकथनातून मुद्रावीर्याचेही एकत्रिकरण होते. **"श्रीतंत्रालोक"** या ग्रंथात श्रीअभिनव-

गुप्तपादाचार्य हे या अवस्थेला जगदानंदाची संज्ञा देतात. ही स्थिती पुढील-प्रमाणे आहे.

**यत्र कोऽपि व्यवच्छेदो नास्ति यद्विश्वतः स्फुरत्।**
**यदनाहतसंवित्ति परमामृतबृंहितम्।।**
**यत्रास्ति भावनादीनां न मुख्या कापि सङ्गतिः।**
**तदेव जगदानन्दमस्मभ्यं शम्भुरूचिवान्।।**

**अर्थ** :- ज्या निजानंद दशेमध्ये कोणताही अडथळा नसेल, जो स्वात्मलाभ-रूप चमत्कार विकासाने युक्त नसेल, जेथे कोणत्याही दुसऱ्या अपेक्षेने रहित प्रमाता-प्रमेयादि रूपाने संवित् परिपूर्ण विकसित होत असेल आणि ज्या अवस्थेत समाधी, धारणा आदि कोणत्याही गोष्टींची विशिष्ट उपयोगिता नसेल तीच सिद्धयोग्याची जगदानंद दशा असेल असे श्रीशंभुनाथांनी आम्हाला अर्थात् श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांना सांगितले आहे.।।५।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा स्थितीत साधकभक्तयोगिशिष्य मनाला थांबवून किंवा त्याला बांधून आकाशत्रयाने ऊर्ध्वगमन करण्यासाठी प्रेरणा देतो.

ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य आपोआप उत्पन्न झालेल्या अशा सहजप्राप्त मितसिद्धींना बाजूला सारून परास्थितीचाच आश्रय घेतो किंवा श्रेष्ठस्थितीची अपेक्षा किंवा अवलंब करतो त्यावेळेला "**विद्यासमुत्थाने स्वाभाविके खेचरी शिवावस्था।।५।।**" होते अर्थात् "पूर्वी सांगितलेल्या शुद्धतत्त्वासहित असणाऱ्या विद्येचे स्वाभाविक प्रकटन होत असताना श्रीपरमेश्वराच्या इच्छेने मितसिद्धी म्हणजेच क्षुद्रसिद्धी अगदी सहजपणे डावलल्या जातात. त्यावेळेलाच आकाशात अर्थात् ज्ञानरूप आकाशात संचार करणारी खेचरी मुद्रा प्रकट होते. ही खेचरी मुद्रा कशी आहे ? हे सांगताना ग्रंथकार असे म्हणतात की, ही खेचरी मुद्रा चैतन्यनाथ अवस्थानयुक्त श्रीशिवांशी संबंधित आहे. तिच्यात स्वानंदाच्या लाटा किंवा कारंजी उसळत असतात. या खेचरी मुद्रेचे स्वरूप "**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथात वर्णन केल्याप्रमाणे असत नाही.

**बद्ध्वा पद्मासनं योगी नाभावक्षेश्वरं न्यसेत्।**
**दण्डाकारं तु तावत्तन्नयेद्यावत्कखत्रयम्।।**
**निगृह्य तत्र तत्तूर्णं प्रेरयेत् खत्रयेण तु।**
**एतां बद्ध्वा महायोगी खे गतिं प्रतिपद्यते।।**

**अर्थ** :- सिद्धयोगी पद्मासन घालून नाभीच्या ठिकाणी मनाला म्हणजेच

इंद्रियांच्या श्रीईश्वराला ठेवतो. त्यानंतर दंडाकार सुषुम्नेतून भ्रुकुटी ते ब्रह्मरंध्रा-पर्यंत असलेल्या शक्ती, व्यापिनी व समनारूपाने असलेल्या तीन आकाशां-मध्ये पाठवितो. या क्रियेने सिद्धयोग्याला आकाशगती प्राप्त होते.

ही खेचरी मुद्रा अशा प्रकारच्या स्थानविशेषांचे अनुसरण करणारी नाही. तिचे स्वरूप "**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथात वर्णन केल्याप्रमाणे परसंवित्तिस्वरूप म्हणजेच परचैतन्यस्वरूप आहे.

**................................पराम्।**

**गतिमेत्यर्थभावेन कुलमार्गेण नित्यशः।।**

**चरते सर्वजन्तूनां खेचरी नाम सा स्मृता।**

**अर्थ :-** इंद्रियसमूहांच्या द्वारा नित्य श्रेष्ठ गतीला प्राप्त होणारी आणि सर्व प्राणिमात्रांमध्ये असणारी ही खेचरीमुद्रा आहे.

अशा प्रकारे येथे म्हणजे खेचरीमुद्रेत सर्व भेदांनी युक्त अशा मायीय मलांचा सर्व क्षोभ शांत होतो आणि चिदात्मक स्वरूपाशी संबंधित मंत्रवीर्य आणि मुद्रावीर्य यांची उत्पत्ती होते.

या संबंधी "**श्रीकुलचूडामणी**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**एकं सृष्टिमयं बीजमेका मुद्रा च खेचरी।**

**द्वावेता यस्य जायेते सोऽतिशान्तपदे स्थितः।।**

**अर्थ :-** एक सृष्टीने युक्त बीज आणि एक खेचरी मुद्रा या दोन गोष्टी ज्याला आत्मसात होतात तोच अत्यंत शांत स्थानी म्हणजेच परम पदात निवास करतो.

सृष्टीमय बीज म्हणजे मंत्रवीर्यरूप अहम् बीज होय आणि मुद्रा म्हणजे श्रीपरभैरवीय स्वरूप होय.

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात मंत्रवीर्याचे स्वरूप स्पष्ट करताना त्यातच मुद्रावीर्याचा संग्रह अथवा एकीकरण केले आहे.

**यदा क्षोभः प्रलीयेत तदा स्यात्परमं पदम्।।१.९।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला क्षोभ लयाला जातो त्यावेळेला परम पदाची प्राप्ती होते.

मूळ सर्व श्लोक व त्याचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे.।।१.९।।

**निजाशुद्ध्यासमर्थस्य कर्तव्येष्वभिलाषिणः।**

**यदा क्षोभः प्रलीयेत तदा स्यात्परमं पदम्।।१.९।।**

**अर्थ :-** स्वतःच्या आत्मगत अशुद्धीमुळे अर्थात् आणव मलामुळे संसारा-

मधील वासनात्मक कर्मांच्या अभिलाषांमध्ये किंवा इच्छेमध्ये पडलेल्या अर्थात् कर्ममलाने लिप्त झालेल्या मर्यादित सामर्थ्याच्या अर्थात् पूर्ण सामर्थ्य नसलेल्या पुरुषाच्या क्षुब्धवृत्ती आणि माया अर्थात् मल, अहंकार व भेदबुद्धी नाहीशी झाल्यावर त्या पुरुषाला अर्थात् साधकभक्तयोगिशिष्याला परमपद प्राप्त होत असते.।।१.९।।

या दुसऱ्या विषयासंबंधात असलेल्या अर्ध्या श्लोकाने "**श्रीकुलचूडामणी**" या ग्रंथात सांगितलेले खेचरीचे स्वरूप थोड्या वेगळ्या अंगाने सांगितले आहे.।।५।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

मंत्राचे वीर्य, स्वरूप, त्याचा विमर्श अथवा ज्ञान त्याचप्रमाणे त्याचा उदय इत्यादि गोष्टी सांगून झाल्यानंतर परत मुद्रेचे वीर्य अर्थात् मुद्रेचे सामर्थ्य सांगण्यासाठी श्रीशंकरांनी "**विद्यासमुत्थाने स्वाभाविके खेचरी शिवावस्था।।५।।**" हे सूत्र सांगितले आहे.।।१६,१६.५।।

पूर्वी सांगितलेल्या स्वप्रकाशरूपिणी व शुद्ध विद्येचा उदय झाला की, आत्म्याच्या ठिकाणी सहज जातिवंत बल येते.।।१७ ते १८.५।।

**विवरण :-** ज्या सिद्धयोगसाधनाच्या साहाय्याने साधकभक्तयोगिशिष्य परचिदाकाशात संचार करतो ती खेचरी मुद्रा म्हणजे साक्षात् श्रीशिवावस्थाच होय. यात मुद्रा व मंत्र यांच्या वीर्याला म्हणजे सामर्थ्याला सर्व मायिक क्षोभाच्या शांतीमुळे चिदात्मस्वरूपात डुंबणे या लक्षणावरून श्रीशिवावस्थेशी समत्व आहे. बाह्यार्थ ज्ञानात कार्यभेदामुळे अर्थभेद जाणवितो एवढेच काय ते!

ज्यावेळी या आत्म्यात मुद्रेचे वीर्य प्रकट होते त्यावेळी मुद्रेला खेचरी मुद्रा असे म्हणतात. ती श्रीशिवावस्थाच होय; कारण ती श्रीशिवाकाशात उदय पावते.।।१९।।

ही मुद्रा स्वचैतन्याकाशात संचार करते म्हणून हिला खेचरी मुद्रा असे म्हणतात. या मुद्रेत ध्येयाचे अनुकरण करणाऱ्या तादात्म्यज्ञानाचा उदय होत असल्यामुळेच ही स्वरूपावेश युक्त अशी श्रीशिवावस्था होय.।।२०।।५।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**विद्यासमुत्थाने स्वाभाविके खेचरी शिवावस्था।।५।।**" या सूत्राद्वारा श्रीशिवांनी हे कथन केले आहे की, "श्रेष्ठ अशा अद्वयज्ञानरूप शुद्धविद्येचा उदय झाला असता बोधरूप किंवा ज्ञानरूप आकाशात संचरण करणारी

खेचरी मुद्रा अभिव्यक्त होते."।।५।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

ज्यावेळेला सिद्धयोगी अशा सामान्य सिद्धींना एकत्र करून थोपवून धरतो व तिकडे लक्ष देत नाही त्यावेळेला त्याला श्रेष्ठ सिद्धी कशी प्राप्त होते हे कथन करताना "**विद्यासमुत्थाने स्वाभाविके खेचरी शिवावस्था।।५।।**" अर्थात् "विद्येचे स्वभावतः समुत्थान म्हणजे संपूर्ण उत्थान झाले की, जी खेचरी मुद्रा प्रादुर्भूत होते ती श्रीशिवावस्था होय." हे सूत्र श्रीशिवांनी कथन केले आहे.।।१९।।

पूर्वी सांगितलेल्या विद्येचे श्रीशंकरांच्या इच्छेने स्वाभाविक आणि सहज उत्थान झाले असता।।२०।।

क्षुद्रसिद्धींमध्ये संतोष मानणारे चित्त त्यातून अर्थात् क्षुद्रसिद्धी टाकून वर आले की, इतर अवस्थांचा भेद करणारी अशी श्रीशिवरूपावस्था उप्रन्न होते.।।२१।।

तीच स्फुरत्ता म्हणजे स्फुरण समजावे. ही अवस्था स्वानंदात उसळी मारून मिळणाऱ्या आनंदाला प्राप्त करून देते. ही आकाशात संचार करणारी खेचरी मुद्रा होय. जी मुद म्हणजे आनंद देते ती मुद्रा होय.।।२२।।

ही मुद्रा विश्वातून उत्तीर्ण झालेल्या सिद्धयोग्याच्या ठिकाणीच व्यक्त होते.।।२२.५।।५।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

ज्यावेळेला सिद्धयोगी अनायासे मिळालेल्या सिद्धींची उपेक्षा करून परास्थितीचे अनुसंधान करतो त्यावेळेला तो श्रीशिवावस्थेचा खात्रीने लाभ मिळवितो किंवा या अवस्थेपर्यंत जातो असे "**विद्यासमुत्थाने स्वाभाविकी खेचरी शिवावस्था।।५।।**" या सूत्रात सांगितले आहे.

विद्यासमुत्थान म्हणजे या आधी अनेक ठिकाणी सांगितलेल्या तत्त्वामध्ये प्रवृत्त झालेल्या विद्येचे ज्यावेळी समुत्थान होते म्हणजेच ही विद्या श्रीपरमेश्वराच्या संकल्पाने युक्त अशा परिमित सिद्धींच्या तिरस्काराचे विचार धारण करणारी होऊन स्वभावतःच प्रकट होते त्यावेळी ती श्रीशिवावस्थारूप खेचरी मुद्रेला व्यक्त करते. "खे" म्हणजे आकाशात संचार करते म्हणून खेचरी अशी या मुद्रेची व्याख्या केली जाते किंवा "खे" म्हणजेच ज्ञानरूप आकाशात जाते म्हणून खेचरी अशीही खेचरीची व्युत्पत्ती दिली जाते. मुद म्हणजे आनंद आणि राति म्हणजे देते म्हणजेच आनंद देते ती मुद्रा होय. ज्यावेळेला खेचरी

मुद्रा प्रकट किंवा व्यक्त होते त्यावेळेला सिद्धयोग्याला असीम आनंदाचा अनुभव येतो. त्याची हीच श्रीशिवावस्था होय.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**ध्येयानुकारतादात्म्यप्रतिपत्त्युदयात्मिका।**
**अत एव शिवावस्था स्वरूपावेशशालिनी।।**

**अर्थ :-** ही मुद्रा ध्येय वस्तूशी सादृश्य असणाऱ्या तादात्म्याचे किंवा सामरस्याचे ज्ञान उदित करणारी असल्यामुळेच स्वरूपात प्रविष्ट होण्याचा स्वभाव असणारी अशी असून ती श्रीशिवावस्था म्हणून ओळखली जाते.

योगनिष्ठ पुरुष अर्थात् सिद्धयोगी संविदाकाशात म्हणजेच ज्ञानाकाशात अर्थात् सहस्रारात हिंडतो. हिलाच खेचरी मुद्रा असे म्हणतात. ही खेचरी मुद्रा साक्षात् श्रीशिवावस्थाच असते. त्यामुळेच ही मुद्रा मंत्र आणि सामर्थ्य यांच्या मायीय समग्र क्षोभांचे शमन करून संवित्प्रकाशात्मक स्वरूपाचे उन्मज्ञन अर्थात् प्रकटीकरण करणारी व हेच लक्षण असणारी साम्यावस्था होय. परंतु केवळ बाह्य अर्थज्ञानात कार्यांच्या वेगवेगळ्या प्रकारांनी वस्तूंची पृथग्रूपता अनुभविली जाते.।।५।।

**विवरण :-** कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर आणि त्यानंतर ती स्वाभाविक रीतीने क्रियाशील झाल्यानंतर त्या शक्तीला शेवटी जी अवस्था प्राप्त होते ती खेचरी श्रीशिवावस्था असते. "**खे**" म्हणजे आकाश होय म्हणून "**खेचरी**"ची व्युत्पत्ती "**खे चरति इति खेचरी**" अशी दिली जाते. येथे सहस्रार चिदाकाश म्हणजे "**ख**" होय. ज्यावेळेला शक्ती चित्ताकाशातून चिदाकाशात आणि चिदाकाशातून परमाकाशरूप परमतत्त्वात जाते त्यावेळेला तिला "**खेचरी**" असे म्हणतात. ही तिची श्रीशिवावस्था अर्थात् कल्याणकारक मोक्षदायिनी अवस्था आहे.

आणखी वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास या सूत्राचा अर्थ असा आहे की, मंत्र किंवा मुद्रेचे सामर्थ्य किंवा शक्ती साधकभक्तयोगिशिष्याला श्रीशिवस्वरूप खेचरीची प्राप्ती करवून देण्यासाठी अधिकारी बनवीत असते.

ज्यावेळेला जगताचे चैतन्य असणारी श्रीशिवस्वरूप अहंता साधक-भक्तयोगिशिष्याला जाणवेल त्यावेळेलाच हे शक्य होईल व तिचा अनुभव येईल.।।५।।

### सूत्र क्रमांक ६

**संबंध :-** आता या स्थितीच्या प्राप्तीचा उपाय सांगतात.

**गुरुरुपायः ।।६।।**

**शब्दार्थ :- गुरुः** - १) तात्त्विक सत्याचा उपदेशक. २) बाह्य श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत होऊन आंतर श्रीसद्गुरुकृपेने पारमेश्वरी अनुग्रह करणारी कुंडलिनी शक्ती. **उपाय** :- उपाय, मार्ग किंवा सिद्धयोगसाधन.

**अर्थ** :- मंत्र किंवा मुद्रा यांचे सामर्थ्य मिळविण्याचा उपाय अगर पारमेश्वरी अनुग्रह करणारी कुंडलिनी शक्ती अथवा तात्त्विक उपदेश करणारे श्रीसद्गुरू होत अर्थात् संप्रदायपरंपरेने शक्तिपातयोगदीक्षेद्वारा दिव्य शक्तीच्या संक्रमणाने साधकभक्तयोगिशिष्याची अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्य कुंडलिनी शक्ती जागृत करणारे बाह्य शरीरधारी श्रीसद्गुरू आणि त्यांच्या कृपेने अंतरतः जागृत झालेली श्रीसद्गुरुरूप व श्रीशिवरूप कुंडलिनी शक्ती ही स्वतः सिद्धयोगाचे साधन करून सुषुम्नागमनाने सहस्रारात श्रीशिवांशी समरस होऊन स्वस्वरूप प्राप्त करीत असल्यामुळे हे दोन्ही बाह्य व आंतर श्रीसद्गुरू उपायरूप आहेत.।।६।।

**विशेष व्याख्या :-** मंत्रवीर्य आणि खेचरी मुद्रा म्हणण्याने सृष्टी बीज "हंसः" अथवा "अहम्" आणि संहार बीज "सोऽहं" अथवा "म्" "ह" व "अ" हे येथे क्रमशः अपेक्षिले जातात. येथे सृष्टिबीजाचेच प्राधान्यत्व सांगितले आहे. या तात्त्विक अर्थाचा जे कोणी उपदेश करतील त्यांना श्रीसद्गुरू असे म्हणतात. **"मनुष्यदेहमास्थानं छन्नास्ते परमेश्वरः ।।"** अर्थात् "श्रीपरमेश्वरच श्रीसद्गुरुरूपात मनुष्यदेह धारण करून लपलेला असतो" किंवा असे समजा की, **"गुरुर्वा पारमेश्वरी अनुग्राहिका शक्तिः ।।"** अर्थात् "श्रीसद्गुरू म्हणजे श्रीपरमेश्वराची अनुग्रह करणारी शक्ती आहे." त्यामुळे श्रीसद्गुरू वर सांगितलेल्या परमसिद्धीच्या उपायाला वाव देतात हे स्पष्टच आहे. **(सैवावकाशं ददतीत्युपायः भवति।।)**।।६।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

परंतु हे मंत्र आणि मुद्रा यांचे सामर्थ्य मिळविण्यासाठी **"गुरुरुपायः ।।६।।"** हे सूत्र कथन केले आहे.

"गुरु" या शब्दाची व्युत्पत्ती देताना शास्त्रात **"गृणाति उपदिशति तात्त्विकमर्थम्।।"** अर्थात् "तात्त्विक किंवा यथार्थ ज्ञानाचा उपदेश करतात म्हणून ते श्रीसद्गुरू होत," असे म्हटले आहे. ते श्रीसद्गुरू येथे व्याप्ती दाखविणारे म्हणून "उपाय" या अर्थी सांगितले आहेत. व्याप्ती म्हणजेच या संदर्भात मुद्रावीर्य आणि मंत्रवीर्य स्वरूप होय.

यासंबंधी "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**स गुरुर्मत्समः प्रोक्तो मन्त्रवीर्यप्रकाशकः।।**

**अर्थ :-** ते श्रीसद्गुरू माझ्या म्हणजे श्रीशिवांप्रमाणे मंत्रवीर्याचे प्रकाशक म्हणून सांगितले आहेत.

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात मात्र हे गुर्वादि आधीपासूनच प्रसिद्ध असल्याने याचा उल्लेख केलेला नाही.

परंतु शास्त्रात इतरत्रही असे म्हटले आहे की -

**यो गुरुः स शिवः प्रोक्तो यः शिवः स गुरुः स्मृतः।**
**उभयोरन्तरं नास्ति गुरोरपि शिवस्य च।।**

**अर्थ :-** जे श्रीसद्गुरू आहेत ते श्रीशिव असून श्रीशिव म्हणजे श्रीसद्गुरूच होत. श्रीसद्गुरू आणि श्रीशिव यांच्यात कोणतेही अंतर, फरक किंवा भेद असत नाही.

या दृष्टीने "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**अगाधसंशयाम्भोधिसमुत्तरणतारिणीम्।**
**वन्दे विचित्रार्थपदां चित्रां तां गुरुभारतीम्।।४.५२।।**

**अर्थ :-** माझ्या श्रीसद्गुरूंची अर्थात् श्रीवसुगुप्ताचार्यांची वाणी अर्थात् वाङ्मयकृती म्हणजे स्पंदकारिकेमधील शब्द आणि अर्थ आश्चर्यकारक असून ही महासागराप्रमाणे अगाध असलेला संशयरूपी महासागर तरून नेणारी नौका आहे. अशा श्रीस्पंदकारिकेच्या अर्थात् श्रीस्पंदशास्त्राच्या रूपातील श्रीसद्गुरुवाणीला मी नमस्कार करीत आहे.।।४.५२।।

"**गुरुर्वा पारमेश्वरी अनुग्राहिका शक्तिः।।**" अर्थात् "श्रीसद्गुरू ही पारमेश्वरी अनुग्राहिका शक्ती म्हणजे कृपा करणारी कुंडलिनी शक्ती होय."

यासंबंधी "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**शक्तिचक्रं तदेवोक्तं गुरुवक्त्रं तदुच्यते।।**

**अर्थ :-** तेज हे शक्तिचक्र असून श्रीसद्गुरुवाणी किंवा श्रीसद्गुरुमुखही तेच म्हणजे तेजच आहे.

"**श्रीत्रिशिरोभैरव**" या ग्रंथात यासंबंधी असे म्हटले आहे की -

**गुरोर्गुरुतरा शक्तिर्गुरुवक्त्रगता भवेत्।।**

**अर्थ :-** श्रीसद्गुरूंपेक्षा श्रीसद्गुरुमुखात असणारी शक्ती अधिक सामर्थ्यवान् असते.

ती कुंडलिनी शक्तीच अवकाश, प्रकाश अथवा ज्ञान देते त्यामुळे तिला

उपाय असे म्हटले आहे.।।६।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

असे मुद्रा व मंत्र यांचे एक प्रकारचेच म्हणजे समानच वीर्य सांगितले आणि बाह्यविषयदृष्ट्या कार्यभेदामुळे वीर्यभिन्नताही सांगितली. त्यानंतर त्यांच्या प्राप्तीचा उपाय "**गुरुरुपायः।।६।।**" या सूत्रात सांगितला आहे.।।२१-२२।।

**विवरण :-** येथे "गुरु" म्हणजे मंत्रमुद्रादि बल प्राप्त करण्यासाठी श्रीपरमेश्वराशी नित्य युक्त असणारी अनुग्रह किंवा कृपा करणारी कुंडलिनी शक्ती असून ती इच्छित पद अर्थात् सहस्रारात श्रीशिवशक्तीसामरस्य मिळवून देणारी आहे. तिच्यामुळेच साधक श्रेष्ठ अशा श्रीपरमशिवांच्या उन्मनीस्थानात विश्रांती घेण्याला योग्य होतो.

या बाबतीत "**प्राप्तावत्र गुरुः शक्तिरुपायः परमः स्मृतः। यतः सा शाम्भवी शक्तिरनुग्रहकरी सदा।।२३।।**" अर्थात् "गुरू" म्हणजे शक्तीच श्रेष्ठ प्रकारचा उपाय आहे; कारण ती नित्य अनुग्रह करणारी किंवा कृपा करणारी शांभवी शक्ती आहे."।।२३।।

या शक्तिपातामुळे अनुग्रहित साधकभक्तयोगिशिष्य संसारविरक्त होतो. त्याचा तशा प्रकारचा शक्तिपतित देह म्हणजे देही साधकभक्तयोगिशिष्य श्रीसद्गुरूकडे नेला जातो.।।२४।।

ते त्याला तत्त्वार्थ सांगून हवे असेल ते मिळवून देतात. या सर्व गोष्टीं-मुळे उन्मनी अवस्थेत विश्रांती प्रदान करणारी अशी ही कुंडलिनी शक्तीच श्रीसद्गुरू होत.।।२५।।६।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

या ठिकाणी म्हणजे मुद्रा व मंत्र यांच्यात सामर्थ्य येण्यासाठी उपायाची विचारणा केली असता त्याचे उत्तर "**गुरुरुपायः।।६।।**" अर्थात् "श्रीसद्गुरू हेच उपाय आहेत," असे आहे. श्रीगुरू म्हणजेच श्रीसद्गुरूंचा प्रसाद अर्थात् श्रीसद्गुरूंनी कृपापूर्वक शिष्याला कुंडलिनी जागृतीसाठी दिलेली शक्तिपात दीक्षा होय. श्रीसद्गुरूंच्या कृपेने मुद्रामंत्रात वीर्य म्हणजेच सामर्थ्य येते.।।६।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा प्रभावी मंत्रमुद्रांच्या वीर्य किंवा सामर्थ्यप्राप्तीसाठी "**गुरुरुपायः ।।६।।**" अर्थात् "श्रीसद्गुरू हेच उपाय किंवा साधन आहेत."।।२३।।

सम्यक् किंवा योग्य ज्ञान, चांगली क्रिया, प्राणायाम, मंत्र व मुद्रा या सर्वांचे यथायोग्य विवेचन करणे आणि या सर्वांचे सामर्थ्य सांगणे या सर्व

गोष्टी हेच सांगतात किंवा उपदेशितात म्हणून तेच श्रीसद्गुरू अर्थात् उपाय होत.।।२४।।

हे श्रीसद्गुरूच मंत्र व मुद्रांचे सामर्थ्य आणि व्याप्ती यांचे प्रकाशन करतात व त्यांपासून परम उपेयप्राप्ती म्हणजेच परमतत्त्वाची प्राप्ती होण्यासाठी उपाय सांगतात.।।२५।।

किंवा श्रीईश्वरानुग्रहरूप परम अर्थात् स्वतःच आपले मूळ स्वरूप साधक-भक्तयोगिशिष्याला प्राप्त करून देत असल्यामुळे ही कुंडलिनी शक्ती म्हणजे श्रीसद्गुरू होय किंवा ती शक्तीच अवकाशदानाने म्हणजे स्वतःच्या श्रीशिव-रूपाला देण्यामुळे उपेय म्हणजे श्रीशिवरूप होते.।।२६।।

"**स गुरुर्मत्समः भोक्तो मन्त्रवीर्यप्रकाशकः।।**" अर्थात् "मंत्रवीर्याचे प्रकाशन करणारे जे कोणी श्रीसद्गुरू असतील ते माझ्या म्हणजे श्रीशिवां-सारखेच समजावेत."।।२६.५।।

मंत्र हे शरत्कालीन मेघाप्रमाणे आदि व अंत नसलेले असे असतात. जे त्याचा आदि व अंत सांगतात ते श्रीसद्गुरू होत.।।२७-२७.५।।

असे श्रीमालिनीशास्त्रासारख्या सिद्धतंत्रात सांगितल्याप्रमाणे अकृत्रिम म्हणजे स्वभावसिद्ध अशा "अहम्"च्या स्वरूपाचे आदि आणि अंत सांगतात; म्हणून ते श्रेष्ठ उपाय असून त्यांना श्रीसद्गुरू समजावे. ते श्रीब्रह्मदेवांपासून उत्पन्न होतात असे मानावयाला हरकत नाही.।।२८-२९।।६।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

जरी मुद्रा आणि मंत्र यांचे सामर्थ्य एकरूप असले तरीही ते कार्यभेदा-मुळे बाह्य अर्थज्ञानानुसाराने वेगळेपणाने भासते. त्यामुळे मंत्र व मुद्रा यांच्या प्राप्तीच्या उपायाचे स्वरूप "**गुरुरुपायः।।६।।**" या सूत्रात निर्देशित करतात. मुद्रादि वीर्यप्राप्तीसाठी सर्वश्रेष्ठ उपाय श्रीसद्गुरू हेच आहेत अर्थात् श्रीसद्गुरुशक्तीच अशा प्रकारच्या मुद्रादींचे सामर्थ्य प्राप्त करवून देऊ शकते. श्रीसद्गुरुशक्तिशिवाय कोणताही दुसरा उपायच नाही. श्रीसद्गुरुशक्ती म्हणजे शांभवीशक्ती अर्थात् कुंडलिनी शक्ती होय. तीच निरंतर, सतत व अखंडित अनुग्रह करीत असते. सांसारिक उत्पातांपासून रक्षिलेला जीव संसाराबद्दल निस्पृह होतो व सर्व इच्छांपासून विरक्त होतो. वैराग्य प्राप्त झालेला देह बलात् श्रीसद्गुरूंच्या जवळ जातो. तात्त्विककार्यांच्या निरूपणापासून आणि उपेयपदाच्या वर्णनापासून श्रीसद्गुरू मनापलीकडे असणाऱ्या परमधामरूप श्रीशिवांमध्ये विश्रांती घेण्यासाठी मार्गदर्शनही करतात.।।६।।

**विवरण :-** जर जीवाला स्वरूपाचे यथार्थ ज्ञान होण्याची इच्छा असेल आणि शक्तीचे म्हणजे जीवाचे सहस्त्रारात श्रीशिवांशी सामरस्य होण्याची इच्छा असेल तर श्रीसद्गुरू करणे अत्यंत आवश्यक आहे; कारण हे एकटे कोणीही करू शकत नाही. जो जीव आपल्या वर्तुळात बंद आहे त्याला त्या वर्तुळातून बाहेर काढण्यासाठी एखाद्या समर्थ श्रीसद्गुरूंची गरज भासतेच. श्रीसद्गुरूंचा केवळ इतकाच अर्थ आहे की, ज्याला अनुभव आला आहे व ज्याने जाणले आहे अथवा ज्याला यथार्थ ज्ञान झाले आहे. जो कारागृहातून मुक्त झाला आहे तोच तुम्ही कारागृहात आहात हे जाणवून देऊ शकतो. तोच तुम्हाला असे सांगू शकतो की, जर माझ्या मागून याल तर या कारागृहाच्या दरवाजातून सहीसलामत सुटू शकाल. परंतु या कारागृहाचे मुख्य द्वार उघडण्यासाठी तुम्हाला तुमच्यामधला संसार बाहेर काढावा लागेल. पण श्रीसद्गुरू तुम्हाला संसारातून बाहेर पडण्याला सांगणार नाहीत; कारण त्यांना हे माहीत आहे की, या दरवाजातून बाहेर पडणे अत्यंत कठीण आहे. त्यामुळे ते तुम्हाला या तुरुंगातून सुटण्याचे गुप्त द्वार सांगतील. त्यांनी मार्गदर्शन केल्याप्रमाणे जर तुम्ही वागाल तर खरोखरच तुम्हाला या जन्ममरणचक्रपरंपरेतून बाहेर पडण्याची सगळी दारे मुक्त होतील.

पण जर तुम्ही श्रीसद्गुरूंना शास्त्रातून शोधावयाला जाल तर तुम्हाला ते कधीही मिळणार नाहीत; कारण जोपर्यंत शास्त्र लिहिले जाते तोपर्यंत ज्यांच्या-साठी ते लिहिले जाते ते नष्ट झालेले असतात. प्रत्येक श्रीसद्गुरू वेगळे आहेत व वेगळ्या प्रकारचे आहेत. एका सारखे दुसरे श्रीसद्गुरू तुम्ही कधीही शोधू शकणार नाही. श्रीसद्गुरूंना शोधायचे असेल तर अशा व्यक्तीच्या सहवासात जा की, ज्यांची मते व विचार तुम्हाला पसंत आहेत. तुम्ही त्यांच्या हृदयाशी तुमचे हृदय जोडा; परंतु अशा वेळेला बुद्धीला मध्ये आणू नका. जर बुद्धी मध्ये आली तर हृदयाचे मिलन होऊ शकणार नाही आणि तुम्ही श्रीसद्गुरूंना शोधू शकणार नाही. श्रीसद्गुरूंची ओळख हृदयापासून होते, बुद्धीने नाही. त्यामुळे ज्याक्षणी तुमचे मन व हृदय त्यांच्या मनाशी जोडले जाईल त्याक्षणी तुमच्या उन्नतीचा मार्ग मोकळा होईल. त्यावेळेला तुम्हाला असे जाणवेल की, आपण त्यांच्यात सामावून जात आहोत आणि तेही आपल्यात मिसळून जात आहेत. तुम्ही त्यांचे एक अभिन्न अंग बनला आहात. अशा रीतीने एकदा श्रीसद्गुरूंची ओळख पटली आणि त्यांनी तुम्हाला स्वीकारले की, पुढच्या सर्व गोष्टींची जबाबदारी ते आपल्या शिरावर घेतात

आणि एखाद्या आईप्रमाणे आपल्या शिष्याची काळजी घेतात. त्यामुळेच श्रीसद्गुरूंना श्रीगुरुमाउली असे म्हणतात. त्यांच्या प्रेमळ कृपाकटाक्षाने शिष्याची सगळी दुःखे व अडचणी दूर होऊन जातात. ते आपल्या शिष्याच्या प्रगतीसाठी त्याला आवश्यक ती सर्व साधने त्याच्याकडून करवून घेतात. श्रीसद्गुरूंशिवाय या जगातून सुटण्याचा दुसरा कोणताही उपाय नाही. त्यांच्यासारखा समर्थ त्राता दुसरा कोणताही नाही. याकरिता शिष्याच्या पूर्ण शरणागतीची आवश्यकता आहे. एकदा का शिष्याने आपले तन, मन व धन त्यांच्या चरणी वाहिले की, त्याला स्वतःला काहीही करावे लागत नाही. त्याच्या बाबतीत विषवत् वाटणारे; पण अंती अमृताचे फळ देणारे कार्य करून श्रीसद्गुरू त्याला अंतिम स्थितीची प्राप्ती करवून देतात यात काहीच संशय नाही.

**सूत्र क्रमांक ७**

**संबंध :-** त्यामुळे श्रीसद्गुरूंच्या प्रसादाने शिष्याला स्वात्मरूपतेचे संपूर्ण ज्ञान प्राप्त होते. त्या प्रसादाने अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने होणारी कुंडलिनी शक्तीची जागृती हा अहंपरामर्शाचा म्हणजेच आत्म्याचे पूर्ण ज्ञान होण्याचा तात्त्विक क्रम आहे. याचेच कथन पुढील सूत्रात केले आहे.

**मातृकाचक्रसम्बोधः ।।७।।**

**शब्दार्थ :- मातृकाचक्र** - मातृकांचा समुदाय किंवा अहं परामर्शाचा तात्त्विक क्रम. **सम्बोधः** - सम्यक् बोध किंवा ज्ञान अगर कुंडलिनी शक्तीची जागृती.

**अर्थ :-** (प्रसन्न झालेल्या बाह्य श्रीसद्गुरूंकडून शक्तिपातयोगदीक्षा झाल्याने अनादिनिद्रिस्थ श्रीशिवरूप आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत झाल्यावर साधकभक्तयोगिशिष्याला) मातृकासमूहाचा सम्यक् बोध अथवा योग्य ज्ञान होते अर्थात् अहंपरामर्शाच्या म्हणजे श्रीशिवशक्तिसामरस्याच्या तात्त्विक क्रमाचा सम्यक् बोध अंतरात जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तिरूप श्रीसद्गुरूंच्या प्रसन्नतेने शिष्याला होतो.।।७।।

**विशेष व्याख्या :-** ज्या सामान्य माणसांना स्वरूपज्ञानाची जाणीव नसते त्यांना प्रतिलोमरूप अर्थात् निम्नबाजूकडे असलेली श्रीपरमेश्वराची जी शक्ती बहिर्मुख करून विषयांकडे धावावयाला लावते तिला मातृका असे म्हणतात. हाच जीवाचा संसार आहे. परंतु जे विरळे सिद्धयोगी मंत्रवीर्याचे रहस्य जाणून खेचरी मुद्रेमध्ये "अ-ह" वाचक-वाच्यरूप जगताच्या अर्थात् शब्दार्दींच्या शब्द-राशी श्रीभैरवांमध्ये श्रीसद्गुरूंच्या प्रसन्नत्वामुळे मिळणारी स्थिती प्राप्त

करतात त्यांनाच चिदानंदघन स्वरूपाचे सम्यक् ज्ञान होते अर्थात् त्यात त्यांचा समावेश होतो. त्यांच्या ठिकाणी विश्वाशी अभिन्नत्वाने राहणाऱ्या पूर्णाहंतेच्या विमर्शाचा अर्थात् ज्ञानाचा विकास होतो.

अहं-विमर्श दोन प्रकारचा आहे. पहिला अहं-विमर्श म्हणजे स्वरूपांतर्गत अहंची प्रथम कला होय. हिलाच कुल असे म्हणतात. यालाच "कौलमत" किंवा "त्रिकमत" असे म्हणतात. दुसरा अहं-विमर्श म्हणजे श्रीशिवरूप प्रसरोन्मुख द्वितीय कला होय. हिला अकुल अर्थात् "विमर्शोन्मुख अहं" असे म्हणतात. या शाक्तोपायात दुसऱ्या प्रकारच्या विमर्शाची अपेक्षा आहे. मातृका-चक्राची यत्किंचित् व्याख्या याच विकासातल्या तिसऱ्या सूत्रात केलेली आहे.

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

त्या प्रसन्न किंवा आनंदित झालेल्या श्रीसद्गुरूंपासून "**मातृकाचक्र-सम्बोधः ।।७।।**" हा शिष्याला होतो अर्थात् "श्रीसद्गुरुकृपेने शक्तिपातयोग-दीक्षा झाल्यावर साधकभक्तयोगिशिष्याला मातृकासमूहाचे योग्य ज्ञान होते," असा अर्थ येथे घ्यावा. "**श्रीपरात्रिंशिका**" इत्यादि ग्रंथात सांगितल्याप्रमाणे "अहम्" यातील प्रथमकला ही अनुत्तराकुलस्वरूप आहे अर्थात् तीच परमतत्त्व आहे.।।७।।

**विवरण :-** येथे ज्याला कोणतेही नाव देता येत नाही अर्थात् ज्याचे कोणत्याही शब्दात वर्णन करता येणार नाही अशा परामर्शाने म्हणजेच ज्ञानाने युक्त आणि अनुत्तर अर्थात् सर्वांच्या पलीकडे असणारे अर्थात् सर्वांपेक्षा श्रेष्ठ, श्रीशिवशक्त्यादींचे अढळत्व अथवा स्थिरत्व सांगणारे व ज्याला कोणतेही नाव देता येत नाही अर्थात् ज्याच्याविषयी काहीही सांगता येत नाही असा परप्रकाश हेच परमतत्त्व आहे. हे परमतत्त्व किंवा हा परप्रकाश स्वातंत्र्यामुळे विश्वाचे अवभासन करण्याची इच्छा करतो आणि स्वात्म्यावर श्रीशिवशक्तीचे स्वरूप दाखवितो. त्या "श्रीशिव" हे लक्षण असणाऱ्या तत्त्वाची कधीही व कोणताही बदल न होणारी, पूर्णाहंतेने युक्त, सर्वश्रेष्ठ आणि अकुल स्वरूपाची कुंडलिनी शक्ती असते. अशा प्रकारे "अ"कार युक्त कुल हेच याचे म्हणजे प्रकाशाचे किंवा श्रीशिवांचे शरीर आहे. अशा रीतीने आद्य वर्ण सांगितला. ती शक्तीच पसरून आनंदस्वरूप होते म्हणजेच "आ"कार रूपाची होते. ती इच्छाभूमिका भासविण्यात अग्रेसर असते म्हणजेच "इ"कार व "ई"कार यांच्या स्वरूपाची ती होते. इच्छा म्हणजे अहं विमर्शरूप प्रथम कलाच होय. तीच ज्ञानाने युक्त अशा उन्मेषदशेमध्ये ज्ञेयाचा आभास एकत्र

करून ऊनता दाखविते. उन्मेषदशा ही "उ"कारस्वरूप असून ऊनता म्हणजे "ऊ"काररूप होय.

यानंतर जगताच्या प्रकट व्यक्ततेमध्ये एक किंचित् उलटी हालचाल होते. ज्याप्रमाणे वीज चमकत असताना सुरुवातीला थोडीशी अथवा अस्पष्ट चकाकी दिसते व नंतर अधिक प्रकाश दिसतो त्याचप्रमाणे अक्षुब्ध इच्छाशक्तीतला "अ" "र"शी युक्त होऊन "ऋ" बनतो. "र" हे अग्नीचे बीजाक्षर असून ते तेजोरूप आहे. तसेच अक्षुब्ध इच्छाशक्तीतला "इ" हा "ल"शी जोडला जातो व "ऌ" हा वर्ण तयार होतो. "ऌ" हा वर्ण स्थिरता सूचित करणाऱ्या पृथ्वीचे बीजाक्षर आहे. अशा प्रकारे "र" आणि "ऌ" हे निव्वळ ऐकू येणारे ध्वनी आहेत म्हणजेच ते साक्षात् उत्पन्न झालेले वर्ण नाहीत. "र" आणि "ल" ही अग्नी आणि पृथ्वीची बीजाक्षरे इच्छाशक्तीचे सूक्ष्म अंश आहेत व तिच्यावर केवळ "र" व "ल" या ध्वनीने आरोप केला जातो. त्याचप्रमाणे हे चार वर्ण म्हणजे "ऋ," "ॠ," "ऌ" व "ॡ" हे त्यांच्या स्वतःच्या तेजात समरस झालेले आहेत अर्थात् ते केवळ त्यांच्यातच स्थित असतात. त्यामुळे त्यांना अमृत वर्ण म्हणजे कधीही नष्ट न होणारे वर्ण असे म्हणतात अर्थातच् ते कोणत्याही वर्णांना जन्मही देत नाहीत म्हणजे ते कोणालाही उत्पन्न करीत नाहीत. ते केवळ वस्तूंच्या सादृश्याने अथवा सारखेपणाने रंगलेले असल्यामुळे ते कोणत्याही अन्य वर्णांना उत्पन्न करू शकत नाहीत म्हणून त्यांना षंढ स्वर असे म्हणतात. या स्वरांना षंढ म्हणण्याचे कारण असे आहे की, ते शुद्ध स्वरही नाहीत आणि व्यंजनेही नाहीत. ज्याप्रमाणे षंढामध्ये स्त्रीत्व व पुरुषत्व अशा दोघांचेही सादृश्य पाहावयास मिळते त्याचप्रमाणे या वर्णांमध्ये स्वर व व्यंजन या दोघांचेही सादृश्य अथवा साम्य पाहावयाला मिळते. दुसरेही एक कारण असे आहे की, हे चार वर्ण इतर कोणत्याही अक्षराला उत्पन्न करू शकत नाहीत.

पूर्वी उल्लेखिलेला अनुत्तर म्हणजेच "अ" वर्ण आणि आनंद म्हणजेच "आ" वर्ण इच्छाशक्तीच्या "इ"मध्ये मिसळून त्रिकोणबीज "ए"कार उत्पन्न होतो. "ए"ला त्रिकोणबीज म्हणण्याचे कारण असे आहे की, पूर्वी शारदा लिपीमध्ये "ए" हे अक्षर तीन कोनांनी युक्त असे लिहिले जात असे. त्याचप्रमाणे चिद्, आनंद आणि इच्छा या तीनही शक्ती या अक्षराच्या उत्पत्तीमध्ये क्रियान्वित होत असतात. हा एकारच योनिबीजही आहे.

अनुत्तर म्हणजे "अ" वर्ण, आनंद म्हणजे "आ" वर्ण आणि उन्मेष

म्हणजे "उ" वर्ण यांच्या एकत्र येण्याने "ओ" हा वर्ण बनतो. तो क्रियाशक्तीचा सहवास दाखवितो. तोच निर्माणशक्तीचा अंगीकाररूपही आहे.

पूर्वी सांगितलेल्या "ए" व "अ" किंवा "आ" या दोन बीजाक्षरांचे एकत्रिकरण होऊन षट्कोन रूप "ऐ"ची निर्मिती होते आणि "अ" किंवा "आ" बरोबर "ओ" चे एकत्रिकरण होऊन शूलबीजरूप "औ"ची निर्मिती होते. "ऐ"ला षट्कोण असे म्हटले आहे; कारण शारदा लिपीत ते लिहिताना सहा कोन निर्माण होतात. तसेच "औ"ला त्रिशूलबीज असे म्हटले आहे; कारण की, इच्छा, ज्ञान आणि क्रिया या तीनही शक्ती त्याच्यात अत्यंत स्पष्ट रूपात अस्तित्वात असतात. या "औ"च्या निर्मितीत इच्छा, ज्ञान आणि क्रिया या तीनही शक्तींचे एकत्रिकरण असते; पण त्यातही क्रिया शक्ती तिच्या पूर्ण रूपात प्राधान्यत्वाने वर्तमान असते.

त्यानंतर पराहंता ही "अं"मधल्या बिंदूच्या रूपात जगताचे अभेद ज्ञान व्यक्त करते. यामधली कल्पना अशी आहे की, या सर्व "अ", "आ", "इ"च्या स्वरूपात पुढे आलेले अंश अथवा उत्पत्ती असूनही अनुत्तर शक्ती हीच सर्वश्रेष्ठ ज्ञाता अथवा कर्ता आहे असे या "बिंदू"कडून सुचविले जाते. संस्कृत "बिंदू" या पदाचे ज्ञाता आणि बिंदू असे दोन्हीही अर्थ होतात. **"वेत्ति इति बिन्दुः।।"** अर्थात् "जो जाणतो तो बिंदू होय." या पराहंता अथवा अनुत्तर शक्तीपासून निर्माण होणाऱ्या जगत् अथवा पदार्थांचा विचार करताना असे दिसून येते की, ही अहंता परिणामविरहित व शाश्वत तत्त्वच राहते. ही "इदंता" म्हणजे पदार्थत्व असूनही ही "अहंता" तिच्या पारिणामविरहित शाश्वत अवस्थेपासून कधीही ढळत नाही. यानंतर परत एकमेकांना लंब असणाऱ्या दोन बिंदूंनी, जे एकाच वेळेला आंतर आणि बाह्य प्रकटीकरण दाखवितात, त्याने विसर्गावस्था दाखविली जाते. हे विसर्गाचे दोन बिंदू (:) हे सत्य सांगतात की, खालच्या बिंदूने दर्शविल्या गेलेल्या शक्तीच्या दृष्टिकोनातून बाह्य जगताचा विस्तार होत असतो आणि त्याच वेळेला वरील बिंदूने दर्शविल्या गेलेल्या श्रीशिवांच्या दृष्टिकोनातून सर्व विश्व हे श्रीशिवांच्या अहंतेमध्ये विश्रांत झालेले असते.

एकाच वेळेला अंतर्विसर्ग म्हणजे अंतःसृष्टी व बाह्यविसर्ग म्हणजे बाह्यसृष्टी अशा दोन बिंदूंनी युक्त विसर्गभूमी किंवा सृष्टीचे उद्दर्शन अर्थात् उत्कट दर्शन करीत असल्यामुळेच अंतर्विमर्शनाने अर्थात् अंतर्ज्ञानाने अनुत्तरातच हे विश्व विश्रांती घेते असे दाखविते. बाह्यविमर्शन, बाह्यज्ञान

अथवा बाह्यविचाराच्या दृष्टिकोनातून हा विसर्ग क्रियायुक्त अहम् "अ," "इ," "उ," "ऋ" व "ऌ" यांच्या द्वारा पाच अक्षरांच्या प्रत्येक वर्गामध्ये असणाऱ्या पाच तत्त्वांच्या समूहाच्या विस्ताराचे प्रदर्शन करतो व "क" वर्गापासून "प" वर्गापर्यंत असणारी अक्षरे पृथ्वीपासून पुरुषापर्यंत सर्वांचे भासन अर्थात् प्रकटन करतात म्हणजे चित्, आनंद, इच्छा, ज्ञान व क्रिया या पाच शक्तीच वर्णांमध्ये प्रवेश करून त्यांना व्यक्त करतात. या एकेक शक्तीमध्ये पाच शक्तींचे अंश असतात. त्यामुळे एकेका शक्तीपासून पाचांचा उदय होतो. या पाचशक्तींपासूनच व्याकरणशास्त्रातील शिक्षाच्छंदादि क्रमानुसार ज्ञातृभूमिकेत नियती, कला, विद्या व रागादिकांनी "य," "र," "ल" आणि "व" या अंतःस्थ वर्णांना ही पराशक्तीच भासविते. त्यानंतर भेद नाहीसा झाल्याने अभेदरूपाने "श," "ष," "स" व "ह" या उष्मवर्णांना आभासित करते. या "श," "ष," "स," व "ह" या ऊष्मवर्णांमध्ये शेवटी सर्वसृष्टीच्या अंतात परिवर्तित होणारे परिपूर्ण असे अमृत म्हणजे भोग्यमेय म्हणजे ज्ञेयरूप वर्ण दाखवून त्याच्या शेवटी प्राणबीज दाखविले जाते. ते प्राणबीज "ह" कलेने युक्त असून पराशक्तीने परिपूर्ण आणि अनाहतनादाने युक्त आहे. असे हे वाच्य म्हणजे कला-तत्त्व-भुवनाध्वरूप आणि वाचक म्हणजे मंत्र-वर्ण-पदाध्व-रूप सहा अध्वांनी विस्तारलेले विश्व आहे. हे जाणवून देण्यासाठी वरचे सर्व विवरण केले आहे. त्यामुळेच प्रत्याहाराच्या युक्तीने अनुत्तर किंवा सर्वश्रेष्ठ व अनाहततत्त्वांच्या स्वरूपाच्या श्रीशिव व शक्तींनी आपल्यात सामावून घेतलेले श्रीशिवशक्तिरूप हे विश्व आहे. असे महामंत्राच्या सामर्थ्याने युक्त अहंविमर्शाचे तत्त्व आहे.

यासंबंधी आमचे श्रीगुरुवर्य श्रीउत्पलदेवांनी असे म्हटले आहे की -

**प्रकाशस्यात्मविश्रान्तिरहम्भावो हि कीर्तितः।**<br>
**उक्ता सैव च विश्रान्तिः सर्वापेक्षानिरोधतः।।**<br>
**स्वातन्त्र्यमथ कर्तृत्वं मुख्यमीश्वरतापि च।। अजडप्रमातृसिद्धी।।**

**अर्थ :-** प्रकाशाची आत्म्यात विश्रांती म्हणजेच अहंभाव होय. ही विश्रांतीच सर्व अपेक्षांचा निरोध करणारी किंवा आवरून धरणारी असल्याने तीच विश्रांती स्वातंत्र्य, कर्तृत्व आणि प्रमुख श्रीईश्वरता या नावांनी संबोधिली जाते.

येथपर्यंत जे मातृकांचे तत्त्व आहे तेच "क"कार व "स"कार यांच्या एकत्र येण्याने निर्माण होणाऱ्या अनुत्तराला सर्व वर्गाचे सार असे म्हटले

आहे; कारण "क" हा वर्ण अनुत्तर हे लक्षण असणाऱ्या "अ"पासून निर्माण होतो. अनुत्तर विसर्ग म्हणजेच श्रेष्ठ सृष्टीच्या समूहाचे सार अशा कूट-बीजाने शेवटी दाखविले. अनुत्तरात्मक "क"कार, विसर्गात्मक "स"कार आणि त्यांचा समूह म्हणजे "क्ष" हेच कूटबीज होय. आता रहस्य प्रकट करणें पुरे.

अशा प्रकारच्या **"...न विद्या मातृकापरा।।"** अर्थात् "मातृकांशिवाय दुसरी विद्या नाही," अशा उल्लेखाने वेदांमध्ये सांगितल्या गेलेल्या मातृकांच्या संबंधित असणाऱ्या चक्राचे म्हणजेच आधी सांगितलेल्या अनुत्तर इच्छादि शक्तिसमूहाचे चिदानंदघन स्वस्वरूपसमावेशाने युक्त योग्य ज्ञान होते म्हणजेच साधकात चिदानंदघन "स्व"चा म्हणजेच आत्म्याचा समावेश होऊन त्याला चक्रांचे ज्ञान होते.।।७।।

**विवरण :-** याचे येथे दिग्दर्शन म्हणूनच उल्लेख केला आहे. उल्लेख कसा केला आहे ते पुढीलप्रमाणे स्पष्ट करतात. येथे स्पष्ट वर्णनिर्णय असा आहे की, "अ" म्हणजे अनुत्तर प्रथमकलारूप अकुलस्वरूप पूर्णाहंता होय. "आ" म्हणजे त्याच्यातील म्हणजे अकुलस्वरूप पूर्णाहंतेतील विश्रांती होय. त्यामुळेच ही विश्रांती दोन अकारांमधली मिलनस्वरूप किंवा सामरस्यस्वरूप आनंदशक्ती होय. "इ" म्हणजे श्रीशिवशक्तिसामरस्यरूप संघट्टातून बाहेर येण्याची इच्छा असणारी अघोरा नावाची इच्छाशक्ती होय. "ई" म्हणजे अघोरा नामक इच्छाशक्तीच नियमनरूपाची होऊन स्वात्म्यात विश्रांती घेणारी असते. त्यामुळे ही शक्ती दोन "इ"कारांची संधिरूप आहे. "उ" म्हणजे इच्छेची बाहेर उन्मुखता झाली असता विश्वोन्मेषरूप अशी ज्ञानशक्ती होय. "ऊ" म्हणजे त्या ज्ञानशक्तीत संवित्पासून अभिन्न असूनही ज्ञेयाच्या आधिक्यामुळे संवित्तत्त्वाचे न्यूनत्वाने भासणे होय. ज्याप्रमाणे एखाद्या नगराचे प्रतिबिंब आरशात पडते त्याप्रमाणेच हे आहे असे समजावे. "ऋ" आणि "ॠ" म्हणजे दोन प्रकारच्या शून्यभूमीत शयन करणाऱ्या इच्छेचे ज्ञानशक्तीच्या प्राधान्याने व तेजाच्या स्पर्शामुळे "र" श्रुतीने विजेप्रमाणे आणि विद्योतनाप्रमाणे म्हणजे स्पष्ट करणाऱ्या गोष्टीप्रमाणे अवभासन होणे होय. "ऌ" आणि "ॡ" म्हणजे त्याच अत्यंत शून्यभूमीत प्रसरण पावणाऱ्या शक्तीचे किंचित् ज्ञानशक्तीच्या अभावाने काष्ठ-पाषाण यांचे रूपत्व आणणाऱ्या "ल" श्रुतीने स्थैर्यात्मकत्वाने विद्युत व विद्योतनसमूहांचे अवभासन होय. त्यामुळेच त्या प्रमातृका स्वात्मविश्रांतियुक्त असल्याने त्यांना अमृतत्व आहे. त्याचप्रमाणे बाह्य औन्मुख्याच्या अभावामुळे

त्यांच्या ठिकाणी अन्य बीज निर्माण करण्याचे सामर्थ्य नाही. त्यामुळे त्यांना नपुंसक किंवा षंढ असे म्हटले आहे. "ए" म्हणजे अनुत्तरानंद इच्छेमध्ये प्रसर पावलेल्या अनुत्तरप्राधान्यामुळे होणारे त्रिकोणबीज आहे. त्या त्रिकोण-बीजाचे इच्छा, ज्ञान व क्रिया या शक्तींशीही साम्य आहे. "ऐ" हे त्याच इच्छेमध्ये आणि नियामक शक्तीच्या अत्यंत प्रसरणामुळे झालेले दीर्घीकरण होय. याला मात्राधिक्यही काही प्रमाणात कारणीभूत असते. "ओ" हा वर्ण म्हणजे अनुत्तरआनंदाच्या बाहेर उफाळून येण्याच्या इच्छेने ज्ञानशक्तीत म्हणजेच विश्वाच्या उन्मेष अवस्थेत होणारे प्रसरण किंवा पसारा होय. "औ" म्हणजे या "ओ"चेच अत्यंत प्रसारामुळे इच्छा, ज्ञान व क्रियांचे स्पष्टपणाने त्रिशूलबीजत्व होय. "अं" म्हणजे अशा प्रकारे येथपर्यंत झालेल्या विश्वाचा संवेदनाने बिंदूच्या साहाय्याने झालेला पहिला शक्तियुक्त परामर्श अर्थात् बिंदूच्या दर्शनाने साधकाला कुंडलिनी शक्तीचे होणारे ज्ञान होय. "अः" म्हणजे पूर्वी सांगितलेल्या अनुत्तराचेच म्हणजेच अविभक्त आनंदशक्तीचे विसर्गरूपाने किंवा निर्मितिरूपाने ज्यात शक्तीचे प्राधान्याने ज्ञान आहे असा वर्ण होय. श्रीपरमेश्वराच्या एकूण पाच शक्ती आहेत. त्यांच्यापैकी एकेक शक्तीचा पाचांशीही योग होतो. त्यामुळे अनुत्तरापासून प्रसृत झालेल्या "क" वर्गाला, स्वरूपात स्थित असणाऱ्या इच्छेपासून निर्माण झालेल्या "च" वर्गाला, अलुब्ध आणि लुब्ध अशा दोन प्रकारच्या इच्छेपासून निर्माण झालेल्या "ट" वर्गाला आणि "त" वर्गाला व उन्मेषापासून उत्पन्न झालेल्या "प" वर्गाला पंचकत्व आहे म्हणजे या प्रत्येक वर्गात इतर चारही वर्गांचे अंश असतात. "अ" वर्गाची अधिष्ठात्री "ब्राह्मी-देवता" आहे. "क" वर्गाची "माहेश्वरी देवता" असून त्याचा स्वभाव पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश असा पंचमहाभूतात्मक आहे. "च" वर्गाची अधिष्ठात्री देवता "वाराही" असून त्याच्या ठिकाणी गंध, रूप, रस, स्पर्श आणि शब्द हे तन्मात्रपंचक आहे. "ट" वर्गाची अधिष्ठात्री देवता "कौमारी" असून त्याच्या ठिकाणी उपस्थ, पायू, पाद, हात व वाचा हे कर्मेंद्रियपंचक आहे. "त" वर्गाची अधिष्ठात्री देवता "चामुंडा" असून त्याच्या ठिकाणी घ्राण म्हणजे नाक, जिह्वा म्हणजे जीभ, चक्षू म्हणजे डोळे, त्वक् म्हणजे त्वचा आणि श्रोत्र म्हणजे कान हे ज्ञानेंद्रियांचे पंचक आहे. "प"वर्गाची अधिष्ठात्री देवता "चर्चिका" असून त्याच्या ठिकाणी मन, बुद्धी, अहंकार व प्रकृती आणि पुरुष हे तत्त्वपंचक आहे. अंतस्थ वर्णांच्या ठिकाणी नियती, राग, कला व विद्यातत्त्व या चार गोष्टी असतात. माया आणि काल यांचाही या

अंतस्थ वर्णातच समावेश होतो. "श", "ष" व "स" यांच्या ठिकाणी श्रीईश्वर, श्रीसदाशिव आणि शक्ती ही तत्त्वे आहेत. "ह" हे पूर्वी सांगितलेल्या विसर्गाचे स्थूल रूप होय. त्याच या अनुत्तर आणि "ह"कार यांच्या "स"मरस अवस्थेत सर्व वाच्य आणि वाचकमय सहा अध्वारूप विश्व अनुत्तरातच विश्रांत होते. हे दाखविण्यासाठी अनुत्तरात्मक "क"काराचे व "स"काराचे अर्थात् शक्तिमय संघट्टात्मक कूटबीजाचे शेवटी प्रदर्शन केले आहे. हा वर्णनिर्णय झाला.

हा विषय आणखी विस्ताराने आमच्या पूज्य श्रीसद्गुरुदेवांनी "**श्रीपरात्रिंशिका विवरण**" व "**श्रीतंत्रालोक**" इत्यादि ग्रंथांमध्ये सांगितला आहे.

यासंबंधी "**श्रीसिद्धामृत**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सात्र कुण्डलिनी बीजजीवभूता चिदात्मिका।**
**तज्ञं ध्रुवेच्छोन्मेषाख्यं त्रिकं वर्णास्ततः पुनः।।१।।**
**आ इत्यवर्णादित्यादि यावद्वैसर्गिकी कला।**
**ककारादि सकारान्ताद्विसर्गात्पञ्चधा स च।।२।।**
**बहिश्चान्तश्च हृदये नादेऽथ परमे पदे।**
**बिन्दुरात्मनि मूर्धान्ते हृदयाद्व्यापको हि सः।।३।।**
**आदिमान्त्यविहीनास्तु मन्त्राः स्युः शरदभ्रवत्।**
**गुरोर्लक्षणमेतावदादिमान्त्यं च वेदयेत्।।४।।**
**पूज्यः सोऽहमिव ज्ञानी भैरवो देवतात्मकः।**
**श्लोकगाथादि यत्किञ्चिदादिमान्त्ययुतं यतः।।५।।**
**तस्माद्विदंस्तथा सर्वं मन्त्रत्वेनैव पश्यति।।५.५।।**

**अर्थ :-** तीच कुंडलिनी शक्ती येथे बीजांमधे जीव म्हणून चैतन्यात्मक होऊन येते. तिच्यापासून जन्मणारे दृढ इच्छारूप उन्मेष नावाचे तीन वर्ण आहेत.।।१।।

अशा प्रकारे "अ" वर्णापासून "आ" निर्माण करणारी ती विसर्गकला आहे आणि त्या विसर्गापासून निर्माण होणाऱ्या "क" वर्गापासून "स"कारापर्यंत ती पाच प्रकारची आहे.।।२।।

तो म्हणजे विसर्ग अर्थात् श्रीशिवांशी समवायसंबंधाने समरस असलेली कुंडलिनी शक्ती ही बाहेर, आत, हृदयात, नादात, परम पदात, बिंदू, आत्मा व मूर्धास्थान या सर्वांमध्ये हृदयापासून व्यापलेली आहे.।।३।।

आदिमांत्यांशिवाय असलेले मंत्र हे शरदऋतूतील ढगाप्रमाणे निष्फळ

असतात. मंत्रांचे आदि व अंत जाणवून देणारे असे श्रीसद्गुरूंचे लक्षण आहे.।।४।।

ते श्रीसद्गुरूच पूजनीय, ज्ञानी, श्रीभैरवरूप व देवतास्वरूप असतात; कारण आदि व अंतासहित असणारे जे श्लोकगाथादि साहित्य असते ते सर्व त्यांच्यामुळेच विद्वान् लोक मंत्ररूपाने पाहतात.।।५ -५.५।।

**विवरण :-** वरील पहिल्या श्लोकात आलेल्या "सा" या शब्दाविषयी अधिक विवरण करताना असे म्हटले आहे की, ती परमेश्वरी शक्ती संविन्मात्ररूप असून तीच विसर्गशक्ती म्हणजेच निर्माणशक्ती आहे. तिने सर्व विश्वाला आपल्यात सामावून घेतलेले आहे. त्यामुळे ती कुंडलिनी या नावाने ओळखली जाते. ही अनच्ककलारूप वाच्य व वाचक अशा या विश्वात अविद्यादींना कारणीभूत होणाऱ्या गोष्टींपासून दूर असल्याने बीजभूता म्हणजे मूळ कारण आहे. ही कुंडलिनी शक्ती तत्त्वांमध्ये संनिविष्ट असल्याने सर्व व्यवस्थांची जीवभूत आहे. संविद्‌शिवाय काहीही स्फुरण पावणार नाही असा याचा भावार्थ आहे. तर अशा प्रकारे असणाऱ्या या "कुंडलिनी शक्तीपासून" अनुत्तर, इच्छा व ज्ञान या नावांचे तीन परामर्श म्हणजे "अ", "इ" व "उ" हे तीन वर्ण निर्माण झाले. त्या परामर्शापासून इतर सर्व अंतरपरामर्श अर्थात् बाकीचे सर्व वर्ण निर्माण झाले.

वरील दुसऱ्या श्लोकात आलेला "एक" हा शब्द स्वरूपपरामर्शक अर्थात् स्वरूपाचे ज्ञान करविणारा आहे. त्याचप्रमाणे दुसऱ्या प्रकारात त्यामुळे अनुत्तरापासून म्हणजे "अ"पासून ज्याप्रमाणे आनंद निर्माण झाला त्याप्रमाणेच इच्छेपासून "ई"शित्री म्हणजे नियामकता किंवा नियंत्रण, उन्मेषापासून "ऊ"नता, तिच्या "क"कारापासून "स"कारापर्यंत त्याचप्रमाणेच "ह"कारात्मक विसर्गकलाही निर्माण झाली. सर्व वर्णच उत्पन्न झाले असा याचा भावार्थ आहे. "म"कारात ज्याप्रमाणे "क"कारादि पासून "स"कारापर्यंत व्यंजनरूपत्व आहे त्याचप्रमाणे "क" वर्गाचा जन्म अनुत्तरापासून म्हणजे "अ"पासून झाला हे दाखविण्यासाठी असे म्हटले आहे. **"अ-कु-ह विसर्जनीयानां कण्ठः।।"** अर्थात् "अ," "क" वर्ग, "ह"कार आणि विसर्ग यांचे उच्चारणस्थान कंठ आहे. अशा न्यायाने "क" वर्ग, "ह"कार व विसर्ग यांची उत्पत्ती "अ"कारापासूनच होते असे आपल्याला म्हणता येते. "वैसर्गिकी कला" असे म्हणताना परापर विसर्जनीयात्मा असा विसर्ग निर्देशित केला जातो. हे सर्व विसर्गापासून उत्पन्न झाले. विसर्गच त्या त्या वृत्तींनी

स्फुरण पावतो असा याचा भावार्थ आहे. तो विसर्गच परप्रमात्याशी एकरूप होऊन सर्व विश्वाला आलिंगन देऊन अनुत्तर व "ह"कार यांनी युक्त होऊन प्रस्फुरण पावतो म्हणजेच व्यक्त होतो आणि अंतर्बाह्य रूपाने नर-शक्ति-शिवात्मतांचे आभासन अथवा प्रकाशन करवितो. त्यामुळेच "**पञ्चधा स च।।**" अर्थात् "तो पाच प्रकारचा आहे," असे म्हटले आहे. तो विसर्ग म्हणजेच बिंदू होय. ज्ञानाच्या प्रक्रियेमध्ये स्वतंत्र प्रमाता बाह्यरूपाने हृदयात नररूपाने, बाह्यरूपत्व असूनही विश्रांतीच्या अंतरूपतेमध्ये, नादात शक्तिरूपाने, परमपदात अंतारूपाने व सहस्रारात श्रीशिवरूपाने अशा पाचरूपांनी प्रकाशित होत असतो. त्यामुळेच तो विसर्ग शरीरातही हृदयापासून मूर्धापर्यंत म्हणजे मस्तकापर्यंत म्हणजेच हृदय, कंठ, कपाळ, शक्त्यन्त आणि द्वादशान्त अर्थात् सहस्रार यांच्यामध्ये स्थित आहे. विसर्ग हा अशा पाच रूपांचा असूनही तो तीन रूपात पर्यवसित होतो. असे असल्याने त्याचे पूर्वत्व व परत्व नष्ट होते अशी शंका घेऊ नये. आता हा एकच असून हृदयादींमध्ये कसा काय बरे असतो? अशी शंका उत्पन्न झाली असताना त्यावर उत्तर देताना टीकाकार असे म्हणतात की, "**व्यापको हि सः।।**" अर्थात् "कारण तो विसर्ग व्यापक म्हणजे सर्वांच्या ठिकाणी राहणारा आहे." "आ" "इ"त्यवर्णेति या दोन पदांच्या अर्थाचा येथे निर्देश केला आहे.

वरील चौथ्या श्लोकाचा भावार्थ असा आहे की, केवळ परमंत्रवीर्यात्मत्वाने अर्थात् श्रेष्ठ मंत्रांच्या सामर्थ्याने युक्त असल्याने मातृकांना अज्ञाता किंवा निष्फळता नाही. त्याप्रमाणेच मननत्राण अर्थात् मनन केल्याने रक्षण करणे हाच धर्म असणाऱ्या मंत्रांचेही असेच आहे असे म्हटले आहे. येथे "तु" हा शब्द "आणि" या अर्थी आला आहे. "आदिमः" म्हणजे अनुत्तर "अ" आणि "अंत्य" म्हणजे "ह"कार होय. त्यामुळे जर मंत्र अहंपरामर्शरूप आदिम आणि अंत्य यांनी रहित झाले तर ते त्या रूपामुळे जाणले न जाणारे होऊन शरद ऋतूतील पाऊस न पाडणाऱ्या ढगांप्रमाणे निष्फळ होतात अर्थात् काहीच करून शकणारे असे होतात, नाही तर परत अहं-परामर्शात्म-परतंत्रवीर्य-युक्त झाल्याने जाणल्या जाणाऱ्या त्या त्या स्वतःच्या कार्यात काम करणारे होतात. हा याचा तात्पर्यार्थ आहे.

हे ज्ञान हेच श्रीसद्गुरूंचे मुख्य लक्षण आहे. या बाबतीत श्रीपरमेश्वराचे असे वचन आहे की, "अशा ज्ञानित्वादि संबंधामुळे द्योतनस्वभावाचा विश्व-समूह असलेला मीच सर्वांमध्ये पूज्य आहे."

अशा प्रकारचे श्रीसद्गुरू केवळ स्वभावतःच परिस्फुरण पावणाऱ्या व शक्तीचे सामर्थ्य असणाऱ्या मंत्रांना जाणतात असे नाही; तर लौकिक श्लोकांनाही मंत्रात्मक म्हणूनच जाणतात, असे पुढे सांगितले आहे. हे श्रीसद्गुरू खरोखर त्या निरतिशय सर्व ज्ञानाच्या योगामुळे किंवा संबंधामुळे सर्व बाह्य श्लोकांना अहंपरामर्शाने जाणून घेतात व सर्व ज्ञातृत्वयुक्त मनन म्हणजे सर्वज्ञानयुक्त मननाने युक्त होऊन अर्थात् संसारात येणाऱ्या सर्व संकटांवर मात करण्यासाठी अनुग्रहाने युक्त होऊन रक्षण करण्याच्या रूपाने साक्षात्कार करतात; कारण तेही आद्यमान्त्ययुक्त अहंपरामर्शाचे अर्थात् आदिम म्हणजे "अ" व अंत्य म्हणजे "ह" अशा प्रकारच्या अहंपरामर्शाचे रूप आहेत; कारण प्रकाशात्मपरप्रमात्याशिवाय काहीही स्फुरण पावणार नाही अर्थात् प्रकाशित किंवा व्यक्त होणार नाही.

हाच अर्थ **"श्रीस्पंदशास्त्र"** या ग्रंथातील खालील कारिकेत सांगितला आहे.

**सेयं क्रियात्मिका शक्तिः शिवस्य पशुवर्तिनी।**
**बन्धयित्री स्वमार्गस्था ज्ञाता सिद्ध्युपपादिका।।४.४८।।**

**अर्थ :-** ती ही श्रीशिवांची क्रियात्मिका शक्ती मातृकाशक्तीचे ज्ञान असणाऱ्या योग्यांना भुक्तिमुक्तिरूप सिद्धी देते आणि अज्ञानी पशुजीवांना बंधनात टाकणारी होते अर्थात् जी श्रीशिवांची स्वतंत्र क्रियाशक्ती आहे ती बहिर्विमर्श अर्थात् बर्हिज्ञानाच्या किंवा अज्ञान अवस्थेमध्ये पशुवर्तिनी अर्थात् जीवात्मा होते. यामुळे ही क्रियाशक्ती अज्ञानावस्थेमध्ये जीवाच्या बंधनाला कारण होत असते. श्रीपरमेश्वराची स्वतंत्र क्रियाशक्ती आपल्या खऱ्या स्वरूपामध्ये आपल्या मूळच्या श्रीशिवमार्गावर स्थिर होते व मनुष्यांना पर अर्थात् श्रेष्ठ आणि अपर अर्थात् कनिष्ठ सिद्धी प्रदान करीत असते.।।४.४८।।

**विवरण :-** ज्यांना मातृकातत्त्वाचे ज्ञान आहे अशा सिद्धयोग्यांनाच ही शक्ती भुक्तिमुक्तिरूप सिद्धी देते; नाहीतर त्या त्या वाचकाच्या अनुवेधद्वारा अर्थात् प्रतिबंध करून हर्षशोकादि वृत्ती धारण करते व पशू म्हणजेच जीवांना बंधनकारक होते. अशा प्रकारे भुक्तिमुक्तिलक्षणरूप फलाशी तिचा संबंध न आल्याने ती निष्फळच होते, असा याचा सारार्थ आहे.।।७।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१) अकुल :-** कुल ही अशी एक अवस्था आहे की, ज्यात श्रीशिव आणि शक्ती हे एकाच अभेदरूप ऐक्यात स्थिर असतात. अकुल ही यापेक्षा

वेगळी स्थिती आहे म्हणजेच ती श्रीशिवांची एक अवस्था आहे. हा अकुलचा एक अर्थ आहे. दुसऱ्या स्पष्टीकरणानुसार अकुल म्हणजे "अ" हे अक्षर श्रीशिवांचे शरीर अथवा स्वरूप आहे. "अ" म्हणजेच चिच्छक्तीचा एक प्रकार होय. त्यामुळे "अकुल" या शब्दाचे दोन अर्थ आहेत.

**२)** याठिकाणी अशी शंका येणे स्वाभाविक आहे की, एकाच शक्तीपासून उदाहरणार्थ अनुत्तराच्या एकाच "अ"पासून "क", "ख", "ग", "घ" व "ङ" असा पाच अक्षरांचा समूह कसा काय उत्पन्न होतो? त्याचप्रमाणे "च", "छ", "ज", "झ" व "ञ" हा पाच अक्षरांचा वर्ग हा इच्छाशक्तीच्या "इ"पासून कसा काय निर्माण होतो? अशाच प्रकारे पुढच्याही वर्गांबाबत म्हणता येते. ही शंका दूर करण्यासाठी श्रीक्षेमराजाचार्य असे म्हणतात की, अनुत्तराचा "अ", इच्छेचा "ई" आदि सर्वांमध्ये पाचही शक्तींचा अंतर्भाव असतो. या पाच शक्ती म्हणजे चित्, आनंद, इच्छा, ज्ञान व क्रिया या होत. त्याचप्रमाणे इच्छेच्या "इ"मध्ये इच्छा, चित्, आनंद, ज्ञान व क्रिया या शक्ती असतात. यापुढेही असेच समजावे. ज्या प्रमाणात या प्रत्येकात "अ", "ई" वगैरेंमध्ये पाच शक्तींचे सामर्थ्य असते त्या प्रमाणात या प्रत्येकातून पाच अक्षरांचा वर्ग म्हणजे वाचक अर्थात् दर्शविणारा आणि त्याला पूरक असा पाच तत्त्वांचा म्हणजेच वाच्यांचा अर्थात् वाचकवर्गाने दाखविला जाणाऱ्या वस्तूंचा उदय होत असतो.

**३)** अंतःस्थ वर्ण म्हणजेच "य", "र", "ल" व "व" हे वर्ण होत. श्रीक्षेमराजाचार्यांच्या मते या वर्णांना अंतःस्थ म्हणण्याचे कारण असे की, हे वर्ण मनुष्यांच्या मनातून क्रियान्वित होणाऱ्या माया आणि तिच्या पाच कंचुक म्हणजेच आवरणांकडून निश्चित केले जातात. अशा प्रकारे नियतीकडून "य", काळाकडून "र", राग या कंचुकाकडून "ल" आणि माया व कला यांच्याकडून "व" असे निश्चित केले जातात.

परंतु श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथाच्या तिसऱ्या आह्निकाच्या १५४ ते १५६ या श्लोकांमधून वर्णन केल्याप्रमाणे ज्यावेळेला क्षुब्ध आणि अक्षुब्ध इच्छाशक्ती चित्स्वरूप अनुत्तराकडे प्रवृत्त होते त्यावेळेला "य" निर्माण होतो. ज्यावेळेला इच्छाशक्तीने ओळखला जाणारा "ऋ" अनुत्तराकडे प्रवृत्त होतो त्यावेळेला "र" निर्माण होतो आणि इच्छाशक्तीसह ओळखला जाणारा "ऌ" अनुत्तराकडे मुख करतो त्यावेळेला "ल" वर्ण अवतरित होतो. त्याप्रमाणेच ज्यावेळेला उन्मेष अनुत्तराकडे जावयाला निघतो त्यावेळेला

"व" निर्माण होतो.

याच आह्निकातल्या १५८व्या श्लोकात श्रीअभिनवगुप्तपादाचार्य असे म्हणतात की, हे "य", "र", "ल" व "व" आदि अंतःस्थ वर्ण उन्मेष व इच्छाशक्ती यांनी निर्मिले जातात आणि ते आंतरिक बळ असून प्रमात्यासह ओळखले जातात. त्यामुळे या वर्णांना अंतःस्थ असे म्हणतात; परंतु शिक्षा-शास्त्रात यांना अंतःस्थ म्हणण्याचे कारण असे आहे की, ते स्वर आणि व्यंजने यांच्यामध्ये स्थित आहेत अर्थात् ते धड स्वरही नाहीत की धड व्यंजनेही नाहीत.

**४)** श्रीअभिनवगुप्तपादाचार्य असे म्हणतात की, इच्छा शक्ती ही "इ", "ऋ" व "ऌ" या तीन स्वरूपात व्यक्त होते आणि हे तीन वर्ण "स्व"च्या आंतरिक प्रकाशाने प्रेरित होऊन बाह्य जगात "श", "ष" व "स" या वर्णांनी व्यक्त होतात. "ह" हे अक्षर विसर्गाचे स्थूल रूप आहे. "श", "ष" व "ल" यांनी अनुक्रमे शुद्धविद्या, श्रीईश्वर व श्रीसदाशिव ही तीन तत्त्वे निर्देशित केली जातात.

**५)** "स" या वर्णाला परिपूर्ण अमृत वर्ण असे म्हणतात; कारण या वर्णामध्ये जगताचे प्रकटीकरण सामावलेले असते. श्रीशैवतत्त्वज्ञानाच्या दृष्टि-कोनातून श्रीशिवांकडून जगताचे प्रकटीकरण होणे हे त्याच्या महत्त्वपूर्ण नैसर्गिक तत्त्वातून काहीतरी काढून घेणे नाही तर त्याला पूर्ण करणे होय. "ऋ", "ॠ", "ऌ" व "ॡ" हे चार वर्ण केवळ "अमृत" असे म्हणविले जातात. त्या अमृताला अर्थात् त्या चार वर्णांना कोणतेही विशेषण लावले जात नाही; कारण की, हे वर्ण केवळ त्यांच्यातच विश्रांत झालेले असतात आणि कोणतीही गोष्ट निर्माण करीत नाहीत. याउलट "स" वर्णाने "श्रीसदाशिव" ही अवस्था दर्शविली जाते म्हणून त्याला महत्त्व आहे.

**६) षडध्वा :-** संक्षेपाने असे म्हणता येईल की, जगत् हे वर्ण, मंत्र आणि पद हे वाचक अथवा कर्तृत्वाच्या बाजूने व कला, तत्त्व आणि भुवन हे वाच्य किंवा कर्मत्वाच्या म्हणजेच जगताच्या बाजूने बनलेले असते. षट् म्हणजे सहा आणि अध्वा म्हणजे मार्ग अथवा रस्ता होय.

**७)** "ह" हा वर्ण श्रीशिवांच्या विसर्गशक्तीचे स्वरूप आहे. त्यामुळे सूक्ष्म स्वरूपामध्ये "ह" हा प्रत्येक प्राण्यामध्ये त्याने कोणताही प्रयत्न न करता अखंडपणे ऐकू येत असतो. त्यालाच श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनी "**हकालात्मः ।।**" ("**श्रीतंत्रालोक**" तिसरे आह्निक, श्लोक १४६) असे म्हटले आहे.

यावर श्रीजयरथ टीका करताना असे म्हणतात की -

**अव्यक्तानादमात्ररूपत्वादनुद्भिन्नवर्णप्रविभागा,**
**येयं हकला-हकारार्धार्धभागः तदात्मकोयं विसर्गः।।**

**अर्थ :-** अव्यक्त अर्थात् अस्पष्ट असणारी आणि केवळ नादरूपांची म्हणजेच ऐकू येणारी असल्यामुळे वर्णांचे प्रकार आणखी उत्पन्न न झालेली ही जी "ह"लका अर्थात् "ह"काराचा अर्धार्धभाग आहे त्याने युक्त असा हा विसर्ग आहे.

त्यानंतर श्रीजयरथ यांनी खालील श्लोकाचा उल्लेख केला आहे.

**नास्योच्चारयिता कश्चित्प्रतिहन्ता न विद्यते।**
**स्वयमुच्चरते देवः प्राणिनामुरसि स्थितः।।**

**अर्थ :-** कोणीही याचे अर्थात् "ह"काराचे म्हणजे अनाहतनादाचे पूर्ण मनन करून उच्चारण करू शकत नाही की, त्याचा उच्चार होण्यावाचून कोणीही त्याला अडवूही शकत नाही. हा प्राणिमात्रांच्या हृदयात स्वतःच किंवा आपणहून उच्चारिला जात असतो.

हा "ह"कार प्रत्येकामध्ये अखंड, स्वयंस्फूर्तपणे कोणीही न उच्चारता व कोणाकडूनही कोणताही प्रयत्न न होता चालू असतो. त्यामुळेच त्याला अनाहतमाया म्हणजेच कोणत्याही वाणीच्या इंद्रियांकडून आघात न केलेला किंवा न उच्चारिलेला असे म्हणतात. "ह" हे शक्तीचे प्रतीक आहे. अशाच प्रकारे तो सर्व प्राणांचा स्रोत आहे. त्यामुळेच त्याला प्राणबीज असे म्हटले आहे.

८) **"प्रत्याहार"** हा शब्द येथे संस्कृत व्याकरणातील तांत्रिक कल्पनेच्या विचाराने वापरला आहे. त्याचा अर्थ असा आहे की, ज्यामध्ये सुलभतेसाठी वर्णांचा संक्षेप केला जातो अर्थात् समजण्याला सोपे व्हावे म्हणून दोन वर्णांना एकत्र आणले जाते, त्यांना प्रत्याहार असे म्हणतात. आता या "अहं"मध्ये वर्णमालेतले सगळ्यात पहिले अक्षर "अ" व सगळ्यात शेवटचा वर्ण "ह" घेऊन तो "अह" असा प्रत्याहार निर्माण केला आहे. त्याचा अर्थ "मी" किंवा "स्व" असा होतो. या "अह"मध्ये संस्कृत वर्णमालेतले सर्व वर्ण आहेत आणि ज्याप्रमाणे प्रत्येक वर्ण हा एका वस्तूचा निदर्शक असतो त्याप्रमाणे "अह" हा संपूर्ण वस्तूंचे म्हणजेच जगताचा निदर्शक आहे. यातून याच तात्त्विक परम सत्याचे सूचन केले आहे की, संपूर्ण जगत् हे अभिन्न अवस्थेत श्रीशिवांमध्ये किंवा सर्वश्रेष्ठ सत्यात सामावलेले आहे.

"मी" या अर्थी संस्कृतमध्ये प्रतिशब्द "अहं" म्हणजे "ह" वर एक बिंदू म्हणजेच अनुस्वार देऊन लिहितात. हा बिंदू किंवा अनुस्वार तात्त्विक दृष्ट्या अत्यंत महत्वाचा आहे.

अनुत्तर किंवा परमोच्च सत्याच्या असंदिग्ध, स्पष्ट अथवा निश्चित अशा अप्रक्षुब्ध अवस्थेत एका तत्त्वज्ञानीय ताणाचा बिंदू निर्माण होतो. यालाच "विंदू" असे म्हणतात. यात संपूर्ण जगत् एका लहानशा बिंदूत सामावून जाते. हा बिंदू म्हणजे घनीभूत शक्ती आहे व तिचे कार्यबल एका लहानशा बिंदूत एकत्रित झालेले आहे; परंतु अजून ते ज्ञाता आणि ज्ञेय अशा विभागात विभागलेले नसते अर्थात् ते अविभाज्यच असते. सर्व व्यक्त होणारी जगते आणि जीव हे एका अविभाज्य समूह अथवा गठ्ठ्याच्या अजून व्यक्त न झालेल्या; परंतु प्रभावीपणे व्यक्त होण्याचे सामर्थ्य असलेल्या स्वरूपात चिद्घनात सामावलेले असतात. हा "ह"वर असणारा विंदू किंवा बिंदू "अ" आणि "ह"ला एकत्र आणतो आणि असे दर्शवितो की, जरी सर्व प्रकारचे प्रकटीकरण हे उत्पन्न झालेले आणि अलगपणे भासत असले तरी वास्तवात ते श्रीशिवांमध्ये विश्रांत झालेले असते आणि त्यांच्याहून अजिबात वेगळे नसते. "अ" हा श्रीशिवांचे प्रतिनिधित्व करतो तर "ह" हा श्रीशक्तीचे निर्देशन करतो. "ह"वरील बिंदू या वास्तवाचे सूचन करतो की, श्रीशिव हे जरी पार पृथ्वीपर्यंत श्रीशक्तींच्या द्वारा व्यक्त अथवा प्रकट होत असले तरीही ते या व्यक्ततेमुळे विभक्त होत नाहीत. ते एकसंध आणि अविभक्तच राहतात. "बिंदू" म्हणजे जो जाणतो तो. हा शब्द "विद्" जाणणे या अर्थाच्या धातूपासून निर्माण झाला आहे. **"वेत्ति इति विन्दुः।।"** अर्थात् "जो जाणतो तो विंदू होय." त्यामुळेच श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांनी असे म्हटले आहे की, **"अविभागः प्रकाशो यः।।"** अर्थात् "तो अविभक्त प्रकाश आहे." ही पूर्ण पंक्ती पुढीलप्रमाणे आहे. **"अविभागः प्रकाशो यः स विन्दुः परमो हि नः ।।३.३।। श्रीतंत्रालोक।।"** अर्थात् "जो विभक्त अर्थात् वेगळा न झालेला प्रकाश अथवा तेज आहे तोच आमचा विंदू होय. हा विंदू कधीही कोणत्याही भेदाच्या परिस्थितीत न बदलणारा, परिणाम न होणारा आणि त्याच्या अखंड एकतेपासून न ढळणारा आहे."

वाचक म्हणजेच नावांच्या प्रत्येक पाच वर्णांनी युक्त व प्रत्येक तत्त्वाला पूरक असा वाच्य अर्थात् त्या नावांच्या वस्तुतत्त्वांचा समूह असतो. हे खालील तक्त्यावरून स्पष्ट होईल.

| अनुक्रम | अक्षरांचे वर्ग निर्माण होणाऱ्या शक्तींची नावे | अक्षरांची नावे | पूरक तत्त्वांचे नाव |
|---|---|---|---|
| १ | अ | क, ख, ग, घ, ङ | पृथ्वी, जल, अग्नी, वायू व आकाश ही पाच महाभूते. |
| २ | इ | च, छ, ज, झ, ञ | शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पंचतन्मात्रा. |
| ३ | ऋ | ट, ठ, ड, ढ, ण | उपस्थ, पायू, पाद, पाणि व वाक् ही पाच कर्मेंद्रिये. |
| ४ | ऌ | त, थ, द, ध, न | घ्राण, रसना चक्षुष्, त्वक् व श्रोतृ ही पाच ज्ञानेंद्रिये. |
| ५ | उ | प, फ, ब, भ, म | मन, अहंकार, बुद्धी, प्रकृती व पुरुष म्हणजे मानसिक साधन, प्रमुख तत्त्व आणि संकुचित ज्ञाता होय. |

**९)** कूट म्हणजे सर्वश्रेष्ठ, एकमेवाद्वितीय व गूढ अथवा रहस्यमय होय. कूटबीज हे "क्ष" या वर्णाचे गूढार्थक नाव आहे. कूट हे अशा वर्णाला म्हणतात की, जो दोन हलन्त अर्थात् व्यंजनांनी शेवट होणाऱ्या वर्णांपासून निर्माण होतो. ही तांत्रिक बाब आहे. येथे "क्ष" वर्णात असणारी दोन हलन्त अक्षरे म्हणजे "क्" आणि "श्" ही होत. त्यांचा संयोग "क्ष" हा वर्ण निर्माण करतो. त्यामुळे "क्ष"ला कूट वर्ण असे म्हणतात.

**१०)** अव्यक्तावस्थेत कुंडलिनी ही बीज आहे. बीज म्हणजेच सर्व प्रकटीकरणाचे व उत्पत्तीचे कारण अथवा बी होय. व्यक्तावस्थेत ती जीव म्हणजेच सर्वांचे जीवन असते.

"कुंडलिनी" म्हणजे श्रीशिवांच्या संवित्‌ची दिव्य क्रियात्मक शक्ती होय. ती साडेतीन वेटोळे घालून बसलेली असते. एक वेटोळे सर्वश्रेष्ठ अहंतेच्या वस्तुयुक्त किंवा प्रमेयात्मक तत्त्वाचे अथवा दृष्टिकोणाचे प्रतिनिधित्व करते. दुसरे वेटोळे प्रमाण किंवा ज्ञात्याच्या बाजूचे व तिसरे वेटोळे प्रमाता अथवा

कार्यात्मक तत्त्वाच्या बाजूचे आणि अर्धे वेटोळे प्रमा बाजूचे असते. त्यात कर्म आणि कर्ता अर्थात् जगत् आणि त्यांचा ज्ञाता या दोन्ही बाजू अभिन्न अवस्थेत अंतर्भूत असतात.

ज्यावेळेला श्रीशिवांची परमश्रेष्ठ क्रियाशक्ती असणारी पराशक्ती क्रियाशील अथवा सर्जनशील असूनही जोपर्यंत कार्यमग्न न झालेली आणि एखाद्या वेटोळे घालून पहुडलेल्या सर्पाप्रमाणे साडेतीन वेटोळे घालून बसलेली असते तोपर्यंत तिला कुंडलिनी शक्ती असे म्हणतात. ज्यावेळेला ती बाहेरून जीवनाचे प्रकटीकरण करण्याला प्रवृत्त होते त्यावेळेला तिला प्राणकुंडलिनी असे म्हणतात. या अवस्थेत संवित् शक्ती ही चैतन्य अथवा संवेदना अथवा प्राण अथवा जीवन या रूपात परिवर्तित होते. ही प्राणकुंडलिनी सर्व प्राणिमात्रांमध्ये विद्यमान असते. यानंतर उलट्या प्रवासामध्ये म्हणजेच जीवनाकडून संविच्छक्तीकडे परत येण्याच्या क्रियेमध्ये ज्यावेळेला ही प्राणकुंडलिनी आपले स्वाभाविक रूप म्हणजे श्रीशिवरूप धारण करते त्यावेळेला तिला पराकुंडलिनी असे म्हणतात. या पातळीवर "**अहं**" आणि "**जगत्**" यांच्या आनंदकारक एकतेची जाणीव असते. त्याचप्रमाणे "स्व" आणि स्वरहित यांचीही एकता असते आणि प्रत्येक गोष्ट अहंस्वरूप दिसू लागते.

"**श्रीसिद्धामृत**" या ग्रंथातील लांबलचक संदर्भ देऊन लेखक हे दर्शवीत आहेत की, क्रियाशक्ती कुंडलिनी कशा प्रकारे वाच्य अर्थात् शब्दपद व वाचक अर्थात् त्यांच्या अर्थवर्गाला व्यक्त करीत प्राणकुंडलिनीच्या अवस्थेत प्रवेश करते आणि तिची विसर्ग शक्ती म्हणजे सृजनशक्ती कशा प्रकारे स्वतःला मनुष्य जीवनात व्यक्त करते व अंततः सर्व जीवांना अथवा साधकांना त्यांची दिव्य अहंता अर्थात् संवित् म्हणजे ज्यातून कुंडलिनीचेच स्वरूप असणाऱ्या विसर्ग शक्तीने जगताचा खेळ आरंभिला होता, ती संवित् परत प्राप्त करविण्यासाठी आग्रहपूर्वक विनंती करीत असते.

अशा प्रकारे यात तीनही दृष्टिकोनांचे स्पष्टीकरण आलेले आहे.

१) शक्ती २) प्राणशक्ती ३) पराकुंडलिनी शक्ती

**११) विसर्ग :-** विसर्गाचा शब्दशः अर्थ उत्पत्ती, प्रकटीकरण, योजना अथवा प्रकल्प असा आहे. या श्लोकात विसर्गाचा अर्थ विसर्ग शक्ती व प्रकल्पित प्रकटीकरण करणारी सर्जनशील अशी दिव्य शक्ती आहे. तीच अनुत्तर किंवा परमोच्च सत्याची सर्वश्रेष्ठ सृजनशक्ती आहे.

या विसर्गाच्या तीन बाजू आहेत.

**अ) परविसर्ग :-**परविसर्ग म्हणजे "आ" हा वर्ण किंवा आनंद होय. त्यालाच आनंद विसर्ग असे म्हणतात. तोच अभेद अथवा एकता दाखविणारा शांभव विसर्ग आहे.

**आ) परापरविसर्ग :-** परापरविसर्ग म्हणजेच "अः" होय. हाच भेदाभेद म्हणजेच भेदाच्या अंतर्गत "स्व"ची ओळख दाखविणारा शाक्त विसर्ग आहे. "अः"मधला खालचा बिंदू सृजनशक्ती अथवा विसर्ग शक्तीचा बाह्य जगतातला पसारा अथवा विस्तार दाखवितो. ही अवस्था श्रीशिवांपासून वेगळी झाल्याची द्योतक असते. वरचा बिंदू श्रीशिव हे जगाहून भिन्न नाहीत असे दाखवितो. त्यामुळेच ही अवस्था परापर म्हणविली जाते. "**बहिश्चान्तश्च...।।३।।**" या श्लोकामधील पद विसर्गाच्या "परापर" बाजूचे सूचन करते.

**इ) अपरविसर्ग :-** अपरविसर्ग म्हणजेच "ह" होय. हा भेदविसर्ग म्हणून ओळखला जातो व भेद किंवा फरक दाखवितो. यालाच आणव विसर्ग असे म्हणतात. हा विसर्ग जगताच्या प्रकटीकरणाचा त्याच्या मूळ स्रोतांशी कोणत्याही प्रकारे संबंधित न होता संदर्भ देतो.।।७।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे श्रीसद्गुरू प्रसन्न झाल्यानंतर काय होईल? ते "**मातृकाचक्र-सम्बोधः।।७।।**" अर्थात् "मातृकासमूहाचे सम्यक अथवा योग्य ज्ञान होते," असे या सूत्रात सांगितले आहे. श्रीपरमेश्वराची श्रेष्ठ प्रकारची क्रियाशक्ती हीच स्वप्रकाश अशी मातृका होय.।।२६।।

तिचा जो कलासमूह आहे त्याला चक्र असे संबोधिले जाते.।।२६.५।।७।।

**विवरण :-** अनुत्तरमूर्ती अर्थात् ज्यांच्या पलीकडे काहीही नाही असे स्वरूप असणाऱ्या व स्वेच्छेने विश्व निर्माण करणाऱ्या श्रीपरमशिवांची प्रथमस्पंदरूप, स्वरूपज्ञानोत्पादक व स्वतः अभिन्न अशी मातृका नावाची क्रियाशक्ती आहे. तीच अंबा, ज्येष्ठा, वामा व रौद्रीरूप चार शक्तींची भावना करून ध्रुव, इच्छा, उन्मेष इत्यादि कलांना प्रसर, विश्रांती वगैरे कार्यात एकमेकात मिश्रण झाल्यामुळे उत्पन्न होणाऱ्या बीजात्मक शुद्धमार्गाला व अभेद ज्ञानरूप बिंदूला उल्लसित करून उत्पन्न होणाऱ्या अधर भूमीचा अथवा अधःसृष्टीचा आविर्भाव दाखविणारी होऊन शाक्तोल्लासमय अशुद्ध मार्गाचा विस्तार करविते. त्यावेळेला तेथे सर्व शक्तिचक्राला आपल्यात सामावून घेणाऱ्या इच्छाशक्तीपासून जीवात्म्याच्या प्रकट होण्याच्या वेळी अनाहत-ध्वनीसह पदवाक्यादियुक्त प्राणक्रियेचा उद्भव होतो. त्यामुळे मातृका हीच

सर्व वाच्य-वाचकात्मक विश्वाचा विस्तार करणारी आणि मंत्रांची मुख्य अथवा मूल किंवा आदिकारण आहे असे याचे तात्पर्य आहे.

त्या चक्राला म्हणजेच कलासमूहाच्या यथायोग्य ज्ञानाला संबोध असे म्हटले जाते.।।२७।।

त्यामुळे जे वाच्य-वाचकरूपाचे अर्थ व मंत्ररूपाचे विवर्त म्हणजेच मिश्रण आहे ते क्रियाशक्तीपासून उत्पन्न झाल्यामुळे भिन्न, अभिन्न आणि विस्तृतरूपाचे भासते.।।२८।।

त्यानंतर नित्योदित अखंड प्रकाशमान शरीराच्या व वीर्यवान् अशा श्रीपरमेश्वराच्या इच्छाशक्तीचा उदय होतो.।।२९।।

त्यानंतर संवेदन व स्पर्श उत्पन्न होतात. त्यानंतर परत सर्वार्थाचा प्रतिभास आणि अनाहतध्वनी निर्माण होतो.।।३०।।

त्यानंतर पद व वाक्य यांनी अंतर्भूत असणारी, पन्नास वर्णांनी युक्त, सर्व गोष्टींच्या उत्पत्तीचे कारण असणारी वाणी व प्राणयुक्त क्रिया निर्माण होते.।।३१।।

त्यामुळे मंत्रादि वस्तुसमूहाचे मूळ ही मातृका आहे. हीच श्रीशिवांची क्रियाशक्ती अशा रीतीने विस्तार पावते.।।३२।।

ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्याला मातृकाचक्रसंबोध अर्थात् वर्णसमुदायाचे ज्ञान होते त्यावेळी तो सिद्धयोगी जे बोलेल ते मंत्रश्रेष्ठतेला पावते अर्थात् सत्य होते.।।३३।।७।।

**विवरण :-** अशा प्रकारे संबोधिल्या जाणाऱ्या प्रबुद्धाचे जे काही निरन्वय अर्थात् अन्वय नसणारे म्हणजेच असंबद्ध आणि लौकिक बोलणे असते तेही मंत्राप्रमाणे आपले कार्य पूर्ण करते. त्यांच्या बाबतीत कोणतेही नियंत्रण असत नाही.

श्रीसद्गुरूंचा प्रसाद प्राप्त होऊन चिच्छक्ती कुंडलिनी जागृत झाल्यानंतर अत्यंत श्रेष्ठ आनंद, इच्छा व उन्मेष इत्यादि तत्त्वे प्रदर्शित झाल्याने चिदानंदघनस्वरूपाच्या समावेशाने युक्त, सम्यक् किंवा योग्य ज्ञान होते अर्थात् प्रसन्न झालेले श्रीसद्गुरू शिष्याला हे ज्ञान देतात असे अध्याहृत घ्यावे.।।७।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"मातृकाचक्रसम्बोधः।।७।।"** या सूत्राच्या द्वारा श्रीशिवांनी असे सूचित केले आहे की, अत्यंत श्रेष्ठ आनंद, इच्छा व उन्मेष इत्यादिकांचे तत्त्व सांगून झाल्यावर चिदानंदघन अशा स्वस्वरूपाचा समावेश ज्यामध्ये आहे असे ज्ञान होते असे श्रीसद्गुरू सांगतात अर्थात् साधकभक्तयोगिशिष्यावर प्रसन्न झालेले

बाह्य श्रीसद्गुरू कृपापूर्वक म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने अनादिनिद्रिस्थ आत्म-चैतन्यशक्ती कुंडलिनी श्रीसद्गुरुरूपाने जागृत करून तिच्या द्वारा ज्ञान त्याच्या ठिकाणी संक्रांत करतात.।।७।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**मातृकाचक्रसम्बोधः।।७।।**" अर्थात् "मातृकाचक्र म्हणजे अक्षर-समूहाची माहिती किंवा ज्ञान होय." हे अक्षरसमूहाचे ज्ञान मंत्र व मुद्रा यांच्या अनुसंधानासाठी सतत उत्साही असणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याला प्रसन्न झालेल्या श्रीसद्गुरूंकडून मिळते.।।३०।।

"अ" पासून बिंदू अखेर पंधरा स्वर हे पंधरा तिथींप्रमाणे असून त्यांचे अंत हे कालानुरूप चंद्र आणि सूर्य होत किंवा अनुस्वार व विसर्ग हे चंद्र व सूर्य होत किंवा कालानुरूप या तिथींमध्ये शुक्लपक्षात चंद्र आणि कृष्णपक्षात सूर्य या दोन देवता समजाव्यात.।।३१।।

हे सुव्रते! पृथ्वीपासून ते पुरुषापर्यंतची तत्त्वे क्रमशः "क" वर्ग ते "प" वर्ग या पाच वर्गात विभागलेली आहेत.।।३२।। (सुव्रते हे श्रीपार्वतीदेवींचे संबोधन असून श्रीशिव हे पार्वतीला हे सुव्रत धारिणी गिरिजे असे संबोधून श्रीशिवसूत्रे सांगत आहेत.)

"य", "र", "ल" व "व" हे चार वर्ण वायू, अग्नी, पाणी म्हणजे वरुण व इंद्र या चार देवतांचे बोधक आहेत. तसेच "श", "ष", "स", "ह" व "क्ष" हे पाच वर्ण ब्रह्मपंचकाचे द्योतक आहेत.।।३३।।

"अ"पासून ते "क्ष"पर्यंत सर्व अक्षरांनी ही सर्व सृष्टी सांगितली जाते. सृष्टी म्हणजे ही स्थूल पांचभौतिकसृष्टी होय. तसेच सर्व मंत्रांना व सर्व विद्यांना हाच अक्षरसमूह कारणीभूत आहे असे सर्व तंत्रांमधून सांगितले आहे.।।३४,३४.५।।

अशा श्रीत्रिंशिकाशास्त्रात सांगितलेल्या मातृका समजाव्यात.।।३५।।

ही मातृका "अ"कारापासून विसर्गापर्यंत सोळा स्वर धारण करणारी आहे. त्यामुळेच तिचे बिंदूपासून पंधराव्या तिथीपर्यंत क्रमशः वर्णन केले आहे.।।३६।।

ही स्वरात्मक असून तिच्यापलीकडे असणाऱ्या व तदात्मक अशा दोन बिंदूंनी म्हणजे (:) विसर्गाने शोभून दिसते. त्यामुळेच हे सर्वश्रेष्ठ देवी! ही सर्व जग निर्माण करते.।।३७।।

त्या पंधरामध्ये "अ," "इ," "उ," "ऋ" व "ऌ" हे पाच स्वर मुख्य

होत. त्यांना वेगवेगळ्या ठिकाणी व निरनिराळ्या प्रकारे म्हणजे दीर्घ, सानुस्वार व सविसर्ग या प्रकाराने ठेवल्याने जग निर्माण झाले म्हणजेच शब्दसमूह उत्पन्न झाला. यांपैकी "क"पासून "म"पर्यंत पाच वर्ग म्हणजे पंचवीस व्यंजने वाचक आहेत.।।३८।।

पृथ्वीपासून पुरुषापर्यंत सर्व तत्त्वसमुदायाचे वाचक आणि ही तत्त्वे वाच्य म्हणजे द्रव्ये किंवा पदार्थ होत. पाच पाचच्या भेदाने पाच पाचांचे विस्तृतीकरण होऊन "अ"कारादि स्वरांच्या भिन्नभिन्नसंबंधाने पंचावन्न प्रकारात ही मातृका बाह्य जगाची उत्पत्ती करते.।।३९।।

अशा प्रकारचे बाह्य विश्व अनुत्तरापासून निर्माण होत असते. वायू, अग्नी, जल आणि इंद्र यांचे "य", "र", "ल" आणि "व" हे वर्ण वाचक आहेत.।।४०।।

यांमध्ये इच्छा, उन्मेष व आख्या यांच्या परस्पर मिश्रणाने त्याचप्रमाणे अनुत्तर व षंढ या दोघांच्या संधींमुळेही।।४१।।

उत्थित किंवा उत्पन्न झालेल्या कला, विद्या, माया व राग यांच्या स्वरूप लपविण्यामुळे त्याचप्रमाणे सर्वकर्तृत्वाच्या अपसरणामुळे।।४२।।

खंडित म्हणजेच अज्ञानी जीवाला थोडेसे स्वातंत्र्य देणाऱ्या तत्त्वांना ही महामायारूपी मातृका खालून वर आणि वरून खाली जाऊ व येऊ देत नाही।।४३।।

आणि मूळापासून खालचे व अवरोहाचे निरोधन करून त्रिशंकुप्रमाणे मध्येच स्थित असणाऱ्या तत्त्वांनी युक्त होऊन।।४४।।

षड्विधतत्त्वांच्या शरीराचे प्रकाशन किंवा प्रकटन करते. त्यावेळी भाव व अभावांची व्यवस्था लावणारी जी नियती तिला कालही अनुसरतो. ती नियती अर्थात् महामाया स्वतंत्र आहे.।।४५,४५.५।।

नंतर त्या षड्विध तात्त्विक शरीराच्याही वर किंवा पलीकडे "श", "ष", "स", "ह" व "क्ष" ही पाच अक्षरे सद्योजात, श्रीसदाशिव, तत्पुरुष, अघोर व ईशान या पाच देवतारूप असून सूक्ष्म अशा पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाशमय आहेत. तसेच या शक्ती श्रीशिवात्मक आहेत. यांना ही मातृका विसर्गरूप अंशाने बाहेर पसरविते.।।४६ ते ४८।।

या अक्षरांमध्ये "क्ष" हे अक्षर शेवटी आहे. ते सोडून "क" ते "स"ची सर्व अक्षरे मध्ये येतात. त्यामुळे "अ"कार व "ह"कार यांपासून अपृथक्त्वाने म्हणजेच वेगळे न होता.।।४९।। ("अ" व "ह" या दोन अक्षरात सर्व

अक्षरे सामावलेली आहेत म्हणजे सर्व प्रपंच सामावलेला आहे.)

ही मातृका श्रीशिवशक्तीच्या साहाय्याने या प्रपंचाला आपल्या पुढ्यात घेऊन प्रकाशित करते म्हणजे उजेडात आणते किंवा त्याची उभारणी करते. हिच्या अशा प्रकारच्या प्रभावाने युक्त असे जे चक्र येथे सांगितले आहे अर्थात् अशा परमसमर्थ मातृकेचे हे जे चक्र म्हणजे मंडलसमूह सांगितला आहे।।५०।।

त्यात श्रेष्ठ अशी इच्छा, उन्मेष व स्पंद इत्यादि क्रियाशक्तीचा साठा आहे. अशा मातृकेचे ज्ञान म्हणजे चिदानंदघन अशा आत्मरूपाची जवळीक आहे.।।५१।।७।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

श्रीसद्गुरू प्रसन्न झाले तर काय होईल? या सर्वांचे "**मातृकाचक्र-सम्बोधः।।७।।**" या सूत्रात प्रदर्शन केले आहे. परमेश्वर परम श्रीशिवांची स्वाभासयुक्त मातृका ही क्रियाशक्तिस्वरूप म्हणून जाणली पाहिजे. या क्रिया-शक्तिरूप मातृकेचा जो कलासमूह आहे त्याला चक्र असे म्हणतात. त्या चक्राचे ज्यावेळेला संपूर्ण ज्ञान होते त्यावेळेला वाच्यवाचकरूप विवर्त निर्माण होते. हे विवर्त क्रियाशक्तीच्या उदयाने अभिन्नापासून भिन्न होते. नंतर उदित व कधीही अस्त न होणाऱ्या प्रकाशशरीररूप प्रभूंच्या इच्छाशक्तीचा संपूर्ण उदय होतो. त्यानंतर संवेदन व स्पर्श प्रादुर्भूत होतात. त्यानंतर सर्व पदार्थांचा प्रतिभास होतो. त्यानंतर अनाहतध्वनी निर्माण होतो. तो अनाहतध्वनी पद-वाक्यार्थांनी युक्त असतो. त्यानंतर प्राणयुक्त क्रिया, त्यानंतर पन्नास वर्णांची वाणी व त्यापासून प्रपंचात्मक विश्वाची उत्पत्ती होते. या मंत्रादि वस्तुसमूहाचे मातृका हेच एकमेव कारण आहे. हीच अनुत्तर मूर्ती श्रीशिवांची क्रियाशक्ती आहे. या मातृकाचक्राचे योग्य व सर्व ज्ञान झाले असता प्रबुद्ध सिद्धयोगी जे जे काही बोलतो ते ते सर्व मंत्ररूपच असते किंवा होते.।।७।।

**विवरण :-** "मातृका" म्हणजे वर्णमाला होय अर्थात् प्रत्येक अक्षरात शक्ती आहे. त्या शक्तीला जागृत करण्यासाठी त्या प्रत्येक वर्णावर अनुस्वार लावून त्याला मंत्राचे रूप दिले जाते. चक्र म्हणजे सुषुम्नागत षट्चक्र होय. या मूलाधारादि सहा चक्रांमध्ये पूर्ण वर्णमाला भरलेली आहे. विशुद्ध चक्रात सोळा स्वर, अनाहत चक्रात "क"पासून "ठ"पर्यंत बारा अक्षरे, मणिपूर चक्रात "ड"पासून "फ"पर्यंत दहा अक्षरे, स्वाधिष्ठान चक्रात "ब"पासून "ल"पर्यंत सहा अक्षरे, मूलाधार चक्रात "व", "श", "ष" व "स" ही चार अक्षरे आणि आज्ञाचक्रात "क्ष" आणि "ह" ही दोन अक्षरे असतात अर्थात्

या वर्णांशी संबंधित शक्ती या चक्रांमध्ये स्थित असतात.

या मातृकाशक्ती अर्थात् वाक्शक्ती जागृत झाल्यानंतर चक्रांचे ज्ञान करवून देतात. या शक्तींची नावे आणि स्थाने पुढीलप्रमाणे आहेत. परा शक्ती अथवा वाणीचे स्थान मूलाधार चक्र आहे. पश्यंती वाणीचे स्थान मणिपूर चक्र आहे. मध्यमा वाणीचे स्थान हृदयस्थ अनाहत चक्र आहे आणि वैखरीचे स्थान विशुद्ध चक्र आहे. स्वरांशिवाय कोणत्याही मंत्र किंवा पदाचे उच्चारण होऊ शकत नाही. या चक्रांवर धारणा अथवा ध्यानरूप संयम केल्याने अनेक सिद्धींची प्राप्ती होते असे शास्त्रात वर्णिले आहे.

या मातृकांचा संबंध नाड्यांशीही आहे. स्वरांचा संबंध इडा नाडीशी, "क"पासून "म"पर्यंतच्या व्यंजनांचा संबंध पिंगला नाडीशी आणि उरलेल्या आठ अक्षरांचा म्हणजेच "य", "र", "ल", "व" आणि "श", "ष", "स" व "ह" यांचा संबंध सुषुम्ना नाडीशी आहे. जर चक्र या पदाचा अर्थ संसार-चक्र असा घेतला तर योगदर्शनानुसार **"सूर्य संयमात् भुवनज्ञानम्।।"** या सूत्रात "सूर्य" या पदाने सूर्यद्वार अर्थात् सुषुम्ना नाडी सांगितली गेली आहे.

संसारचक्राच्या प्रकटीकरणात वाच्य आणि वाचक अथवा नाम आणि रूप किंवा शब्द आणि वस्तू या दोन गोष्टी असतात. यथार्थ तत्त्वाच्या उच्च पातळीवर या सर्व गोष्टी समानच असतात. प्रकटीकरणात मात्र त्या वाचक आणि वाच्य अशा विभागल्या जातात. प्रकटीकरणात वाचक ही कर्तृवाच्य बाजू आणि वाच्य ही वस्तुवाच्य किंवा कर्मवाच्य बाजू असते.

सर्व मानवी क्रिया या वाचक किंवा शब्दांच्या द्वारा पार पाडल्या जातात. वाचक हे मातृकांनी रचलेले असतात. मातृका म्हणजे अक्षरे किंवा अक्षरयुक्त ध्वनी होय. त्यामुळे पर्यायाने मातृकाच सर्व मानवी व्यवहार पार पाडतात. या मातृकांचे गूढ कित्येक काळापासून उलगडलेले नसून आपण फक्त जीवनाच्या गोंधळलेल्या आणि तापदायक गोष्टीतच अडकून पडलेले आहोत. "आपण माना हलवितो, घाई करतो आणि निघून जातो; परंतु एकदाही आपला आत्मा प्राप्त करीत नाही." जर मानवाला त्याच्या आयुष्याचे गूढ जाणावयाचे असेल आणि त्याला त्याच्या अस्तित्वाकडे जावयाचे असेल तर त्याला मातृकांचे रहस्य समजून घ्यावे लागेल. अशा या योग्य प्रकारे ज्ञान न झालेल्या मातृका आपल्याला जीवनाच्या अशांत गोष्टीत अडकवून ठेवतात आणि अशा प्रकारे त्या बंधनाचा स्रोत बनतात. या मातृकाच जर चांगल्या प्रकारे समजल्या तर आपल्या मुक्तिदात्री ठरतात.

जो जीव अथवा साधकभक्तयोगिशिष्य स्वतःच्या अस्तित्वाच्या स्रोताच्या शोधात असतो त्याच्यासाठी हे मातृकांचे रहस्य कळणे अत्यंत आवश्यक असते. शाक्तोपाय हा प्रामुख्याने मंत्रांशी संबंधित आहे. मंत्र हे अक्षरांनी म्हणजेच पर्यायाने मातृकांनी बनलेले असतात. त्यामुळे साधकाला मातृका आणि तिच्या शक्तींचे ज्ञान होणे हे परम आवश्यक आहे.

त्यामुळे हे सूत्र आपल्याला ज्यामध्ये अक्षरांच्या उभ्या आडव्या वीणीने बांधलेले अनाकलनीय व गूढ मंत्र आहेत अशा मातृकाचक्राचे पूर्ण व अचूक ज्ञान आणि योग्य संबोध करून घेण्याला सांगते.

हे सूत्र आपल्याला असे सांगते की, ही अक्षरे म्हणजे परावाक्, पराशक्ती, पराहंता, अनुत्तर शक्ती अर्थात् ऐहिक किंवा वैश्विक उत्पादक ताण व स्पंद किंवा सर्वश्रेष्ठ उत्पादक जाणीव आहे. ही जाणीव श्रीशिव या नावाने ओळखली जाते व तेच या सर्वांचे केवळ व्यक्त स्वरूप आहेत. ही सृष्टी निर्माण करण्याची जी शक्ती आहे तिला ऐहिक किंवा लौकिक तत्त्वामध्ये कुंडलिनी शक्ती असे म्हणतात.

श्रीशिवांच्या पाच प्रमुख शक्ती आहेत. त्यांची नावे चित् किंवा अनुत्तर शक्ती, आनंद, इच्छा, ज्ञान आणि क्रिया अशी आहेत. अनुत्तर शक्ती "अ" या अक्षरातून स्वतःला व्यक्त करते, आनंद शक्ती "आ" या स्वरातून व्यक्त होते. इच्छा शक्ती दोन प्रकारातून व्यक्त होते. "इ" व "ई" आणि "ऋ", "ॠ", "ऌ" व "ॡ" हे ते दोन प्रकार आहेत. ज्ञान शक्ती "उ" व "ऊ" या दोन स्वरातून व्यक्त होते. "अ", "इ" व "उ" या स्वरांच्या अनेक प्रकारच्या स्वरमिसळीतून क्रियाशक्ती "ए", "ऐ", "ओ" व "औ" या स्वरांमधून व्यक्त होते. बिंदू हा सर्व प्रकटीकरणाचे एका चैतन्यात म्हणजे श्रीशिवांमध्ये एकत्रिकरण व्यक्त करतो तर विसर्ग श्रीशिवांची अंतर्विश्रांती आणि त्यांच्या शक्तीचा विश्वाच्या स्वरूपातील बाह्य विस्तार दाखवितो. सर्व स्वरांपैकी अनुत्तर शक्तीचा प्रतिनिधी असणारा "अ" हा स्वर सगळ्यात महत्त्वाचा आहे. यासंबंधी श्रीजयरथ यांनी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथाच्या टीकेत असे म्हटले आहे की, "**अकारः सर्ववर्णानामन्तर्यामितया स्थितः ।।**" अर्थात् "अकार हा सर्व वर्णांच्या अंतर्गत नियामक म्हणून स्थित आहे."

"अ", "इ", "उ", "ऋ" व "ऌ" हे विविध व्यंजनांना जन्म देतात. ही व्यंजने श्रीसदाशिवांपासून पृथ्वीपर्यंत विविध तत्त्वांना सूचित करतात. त्यामुळे सर्व अक्षरांच्या आणि प्राणिमात्रांच्या हृदयात हे श्रीशिवच राहत असतात

आणि ही सर्व सृष्टी त्यांच्याशी साम्यावस्थेत आहे असे व्यक्त करतात.

निष्कल अर्थात् कलारहित किंवा श्रीपरमशिव हे सर्वश्रेष्ठ व उत्कृष्ट श्रीशिव आहेत. ते सर्व सृष्टीच्या पलीकडचे आहेत. श्रीशिव हे त्या श्रीपरम-शिवांचे पहिले सृष्ट्यात्मक स्पंदन असून त्यांच्यातच अहम्ची उत्पत्ती होते. विमर्श या नावाने ओळखल्या जाणाऱ्या या "अहम्"मध्ये एखाद्या प्रकाश-रूप आरशाप्रमाणे सर्व वर्ण किंवा अक्षरे म्हणजे वाचक आणि वाच्य अर्थात् सर्व वस्तू गुप्त स्वरूपात असतात. ज्याप्रमाणे एखाद्या मोराच्या अंड्यामध्ये विविध रंगांनी युक्त पिसाऱ्याचा जीवनरस गुप्त रूपात असतो त्याप्रमाणेच हे वर्णादि गुप्त आणि प्राथमिक स्वरूपात "अहम्"मध्ये स्थित असतात.

"अहम्"मधल्या "अ" या स्वराने अनुत्तर अर्थात् सर्वोच्च सत्य आणि "ह" या स्वराने विसर्ग शक्ती सूचित केली जाते. अशा प्रकारे "अहम्" हा "अ" ते "ह" पर्यंतच्या पन्नास अक्षरांचा साचा आहे. "अहम्" ही परा मातृका शक्ती असून तिच्यात इच्छा, ज्ञान आणि क्रिया सामावलेल्या आहेत. यांच्यापासूनच इच्छा मातृका, पश्यंती मातृका, ज्ञान मातृका, मध्यमा मातृका, क्रिया मातृका व वैखरी मातृका निर्माण होतात. या "अहम्"मध्ये वाच्य आणि वाचक विश्व गूढ स्वरूपात स्थित असते.

मातृकाचक्राचे ज्ञान आपल्याला सर्व वर्ण आणि पृथ्वीपासून श्रीसदा-शिवांपर्यंतची सर्व तत्त्वे एकाच वेळेला "अहम्"पासून कशी उत्पन्न होतात हे समजून देते. मातृका शक्तींच्या समूहाचा अक्षर आणि वस्तूंची निर्मिती करणाऱ्या श्रीशिवांच्या इच्छा, ज्ञान आणि क्रियाशक्तींशी संबंध असतो.

मातृकाचक्राचे पूर्ण ज्ञान किंवा संबोध हा जीवाला त्याचा यथार्थ "अहम्" हाच आनंदयुक्त श्रीशिवांचे चैतन्य आहे याचे ज्ञान करून देण्याला प्रवृत्त होतो. हे यथार्थ चैतन्य हेच मंत्रांचे रहस्य आहे. हेच जीवाला त्याच्या खोट्या "अहम्"च्या जाणीवेतून बाहेर काढते; त्यामुळे त्याला आपण, श्रीशिव आणि त्याचे प्रकटीकरण हे एकच आहोत असे समजून येते.।।७।।

## सूत्र क्रमांक ८

**संबंध :-** अशा प्रकारे "अहं" परामर्शाच्या तात्त्विक क्रमाचा सम्यक् बोध किंवा योग्य ज्ञान प्राप्त करण्यासाठी साधकभक्तयोगिशिष्य चिद्रूप अग्नी-मध्ये स्थूल व सूक्ष्मादिरूप शरीरांच्या आहुती देतो. यासंबंधी पुढील सूत्रात असे म्हटले आहे की -

**शरीरं हविः ।।८।।**

**शब्दार्थ :- शरीरम् -** स्थूल, सूक्ष्म, कारण आणि पररूप शरीर किंवा देह व त्याचा अहंभाव यांची. **हविः -** चिदग्नीत म्हणजे श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीत आहुती देतो.

**अर्थ :-** मातृकाचक्राचे सम्यक् ज्ञान झालेल्या साधकभक्तयोगिशिष्याचे शरीर ही परमश्रेष्ठ चैतन्यरूपी अग्नीमध्ये अर्थात् चिदग्नीत म्हणजे श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीत दिलेली आहुती होते अर्थात् साधकभक्तयोगिशिष्य हा सिद्धयोगसाधन करून स्थूल, सूक्ष्म, कारण आणि पररूप शरीराच्या अहंभावाची चिदग्नीत म्हणजे श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तिरूप आंतर श्रीसद्गुरूत आहुती दतो म्हणजे अहंभावाच्या रूपाने असणाऱ्या उपशक्तींचे कुंडलिनी शक्तीत सिद्धयोगसाधनाने समरसीकरण होऊ देऊन मूळकुंडलिनी शक्ती सुषुम्नागामी करून सहस्त्रारात श्रीशिवांशी विलिनीकरण करतो.।।८।।

**विशेष व्याख्या :-** देह स्थूल, सूक्ष्म, कारण आणि पर असा चार प्रकारचा आहे. अशा प्रकारे जीव हा शरीरामध्ये चार प्रमात्यांनी अभिषिक्त असतो. हे चार प्रमाते म्हणजे देह, पुर्यष्टक, प्राण आणि शून्य हे होत. त्यामुळे जीवाचे मितप्रमातृत्व अर्थात् अल्प जाणीव जाग्रत, स्वप्न, सुषुप्ती आणि शून्य अवस्थांमध्ये राहते. महायोगी पूर्णाहंता प्राप्त करण्यासाठी या चारही प्रमात्यांची परप्रमातृरूप अर्थात् श्रेष्ठ प्रमाता असणाऱ्या चिदग्नीमध्ये ज्यावेळेला आहुती देतो त्यावेळेला तो कृतकृत्य होतो.

त्यामुळे देहप्रमातृत्वाचे शमन अर्थात् शांत होणे किंवा नष्ट होणे हेच येथे अपेक्षित आहे.

यासंबंधी **"श्रीमद्भगवद्गीता"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च।**
**शब्दादीन् विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च।।१८.५१।।**
**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः।**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः।।५२।।**
**अहङ्कारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम्।**
**विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते।।५३।।**

**अर्थ :-** संशय व विपर्यय आदींपासून मुक्त झालेल्या शुद्ध बुद्धीने युक्त अशा सात्त्विक धैर्याने बाह्य विषयांमध्ये गुंतलेल्या चित्ताचा निरोध करून,

शब्दादि विषयांचा त्याग करून अर्थात् शब्दादि विषयांचे अनुसंधान न करता राग आणि द्वेष यांचा त्याग करून, जो निर्जन अरण्य आदि देशांमध्ये राहतो, जो थोडेसे म्हणजेच शरीर राखण्यासाठी आवश्यक एवढेच अन्न खातो, जो वाणी, शरीर आणि मन यांना ताब्यात ठेवतो, जो सतत ध्यान आणि योग यांमध्ये तत्पर राहतो, जो नेहमी वैराग्याने परिपूर्ण असतो, जो अहंकार, बल, दर्प, काम, क्रोध आणि परिग्रह यांचा त्याग करून देहादींमध्ये ममत्व ठेवीत नाही आणि जो अत्यंत शांत असतो तो यती किंवा साधकभक्तयोगिशिष्य ब्रह्मभावाला प्राप्त होतो.।।१८.५१-५३।।

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात यासंबंधी असे म्हटले आहे की -

**यदा क्षोभः प्रलीयेत तदा स्यात्परमं पदम्।।१.९।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला क्षोभ म्हणजेच देहामध्ये आत्म्याचा अभिमान धरणारा "अहं" पूर्णाहंतेमध्ये लीन होऊन जातो त्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्याची प्रतिष्ठा परमपदामध्ये होते.।।१.९।।

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील पूर्ण श्लोक व त्याचा अर्थ पुढील प्रमाणे आहे.

**निजाशुद्ध्यासमर्थस्य कर्तव्येष्वभिलाषिणः।**
**यदा क्षोभः प्रलीयेत तदा स्यात्परमं पदम्।।१.९।।**

**अर्थ :-** स्वतःच्या आत्मगत अशुद्धीमुळे अर्थात् आणवमलामुळे संसारामधील वासनात्मक कर्मांच्या अभिलाषांमध्ये किंवा इच्छेमध्ये पडलेल्या अर्थात् कर्ममलाने लिप्त झालेल्या मर्यादित सामर्थ्याच्या अर्थात् पूर्ण सामर्थ्य नसलेल्या पुरुषाच्या क्षुब्धवृत्ती आणि माया अर्थात् मल, अहंकार व भेदबुद्धी नाहीशी झाल्यावर त्या पुरुषाला परमपद प्राप्त होत असते.।।१.९।।८।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा प्रकारे ज्याला मातृकाचक्राचे ज्ञान झाले आहे अशा सिद्धयोग्याला "**शरीरं हविः।।८।।**" अर्थात् "शरीर हे हविर्द्रव्याप्रमाणे वाटते."

सर्वांनी ज्या शरीराला प्रमाता किंवा ज्ञाता म्हणून मानले आहे ते स्थूल-सूक्ष्मादिस्वरूपाचे शरीर महायोग्याच्या श्रेष्ठ चिदग्नीमध्ये हविर्द्रव्य बनते. त्यामुळे सिद्धयोग्याचे "शरीर म्हणजे मी किंवा आत्मा," असे ज्ञान नष्ट होऊन त्याच्या ठिकाणी चैतन्याहंता किंवा मी म्हणजे चैतन्य अशा प्रकारचे ज्ञान प्रतिष्ठित होते.

यासंबंधी "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**महाशून्यालये वह्नौ भूताक्षविषयादिकम्।**
**हूयते मनसा साकं न होमः स्त्रुक्चेतना।।१४६।।**

**अर्थ :-** महाशून्यालयात म्हणजेच परतत्त्वाच्या अग्नीत पंचमहाभूते, इंद्रिये व विषयादि सर्व गोष्टींचे मनासहित चेतनारूप पळीच्या योगाने हवन केले जाते.।।१४६।।

**विवरण :-** महाशून्य म्हणजे जेथे शून्यातिशून्यपदाचा सर्व बाजूंनी लय होतो असे परतत्त्व होय. त्या परतत्त्वरूप अग्नीत भूत, इंद्रिये, विषय, भुवन व तत्त्वादिरूप जगताचे आणि त्याची विभागकल्पना करण्याला कारण असलेल्या अशा मनासह चेतनारूप स्त्रुकेने म्हणजे विश्वाचे अनुसंधान करणारी शक्तीच पळी होऊन त्या पळीने जे हवन केले जाते तो होम होय. अग्नीमध्ये आहुती टाकणे असा याचा ढोबळ अर्थ घेता येईल. "**चितिः स्त्रुक् चित्त-माज्यम्।।**" अर्थात् "चितिशक्ती ही पळी असून चित्त हे तूप आहे अशी एक श्रुती आहे."

या दृष्टीने "**श्रीतिमिरोद्घाट**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यः प्रियो यः सुहृद्बन्धुर्यो दाता योऽतिवल्लभः।**
**तदङ्गभक्षणाद्देवि ह्युत्पतेद्गगनाङ्गना।।**

**अर्थ :-** जे प्रिय, सुहृद, बंधू, दाता व अत्यंत आवडते आहेत त्या सर्व सांसारिक अंगांचे भक्षण करून सिद्धयोगी गगनात उडतो अर्थात् अनुभव-सृष्टीत रमतो.

या सर्वांचा एकत्रित अर्थ म्हणजे देह अर्थात् मी अशी देहाहंता नष्ट होते.

**विवरण :-** स्वात्म्याला अनुकूल अशा गोष्टींचा आश्रय घेतलेल्या प्रियपुत्रादिरूप धर्मीमध्ये स्थित असलेल्या प्रियत्वादि धर्मरूप अंगांचे भक्षण करून अर्थात् त्यांना नष्ट करून त्याद्वारे अहंतेला शांत करून सिद्धयोगी प्रत्ययसृष्टीचा उपभोग घेतो, असा याचा अर्थ आहे.

"**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे।**
**आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते।।४.२७।।**

**अर्थ :-** ज्ञानाने प्रदीप्त झालेल्या आत्मसंयमरूप योगाग्नीत साधकभक्त-योगिशिष्य सर्व इंद्रियकर्मे आणि इतर प्राणकर्मे यांचे हवन करतो.।।४.२७।।

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील कारिकेत यासंबंधी असे म्हटले आहे की -

**यदा क्षोभः प्रलीयेत तदा स्यात्परमं पदम्।।१.९।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला देहेंद्रियांचा क्षोभ लय पावतो म्हणजेच नष्ट होतो किंवा थांबतो त्यावेळेला परमपदाचा लाभ होतो.।।१.९।।

ही मूळ संपूर्ण कारिका व तिचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे.

**निजाशुद्ध्यासमर्थस्य कर्तव्येष्वभिलाषिणः।**
**यदा क्षोभः प्रलीयेत तदा स्यात्परमं पदम्।।१.९।।**

**अर्थ :-** स्वतःच्या आत्मगत अशुद्धीमुळे अर्थात् आणव मलामुळे संसारामधील वासनात्मक कर्मांच्या अभिलाषांमध्ये किंवा इच्छेमध्ये पडलेल्या अर्थात् कर्ममलाने लिप्त झालेल्या मर्यादित सामर्थ्याच्या अर्थात् पूर्ण सामर्थ्य नसलेल्या पुरुषाच्या क्षुब्धवृत्ती आणि माया अर्थात् मल, अहंकार व भेदबुद्धी नाहीशी झाल्यावर त्या पुरुषाला परमपद प्राप्त होत असते.।।१.९।।

या कारिकेवरील वृत्तीत श्रीभट्टकल्लट असे म्हणतात की, "हा क्षोभ देहादि अहंचा अनुभव होय."

**विवरण :-** साधकभक्तयोगिशिष्य सर्व इंद्रियव्यापारांचा, मानसव्यापारांचा आणि तोंड, नाक इत्यादि अवयवांमधून बाहेर पडणाऱ्या वायवीय व्यापारांचा आत्म्यात म्हणजेच मनात संयम करून योग्य ज्ञानाच्या दीपांनी वेढलेल्या एकाग्रतेच्या अग्नीत त्यांना एकत्रित करतो किंवा त्यांचे त्यात हवन करतो अर्थात्च तो साधकभक्तयोगिशिष्य ग्रहण करण्यात येणारे किंवा संकल्प करण्यात येणारे विषय हे अन्य सर्व व्यापारांचा त्याग केलेल्या बुद्धीने केवळ एकाग्रता साधूनच ग्रहण करतो, असा याचा मतितार्थ आहे.।।८।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे प्रज्वलित झालेल्या मंत्रतेजात कर्मापासून परत परत संसार उत्पन्न करणारे कर्मजन्य शरीर जळून जाते असे श्रीशंकर **"शरीरं हवीः।।८।।"** अर्थात् "हे शरीर हविर्द्रव्याप्रमाणे होते असे समजावे," म्हणून या सूत्रात सांगतात.।।३४।।

मंत्रतादात्म्यरूप अर्थात् मंत्र हे ज्याचे लक्षण आहे असा ज्ञानरूप अग्नी प्रज्वलित झाला असता त्यात कर्मबंधन अर्थात् सर्व प्रकारच्या कर्मांची बंधने आणि भौतिक म्हणजेच जड महाभूतांपासून बनलेले शरीर जळून जाते.।।३५।।

**विवरण :-** मंत्रमय दिव्यदेहाचा आश्रय घेऊन असणाऱ्या सर्व वस्तूंचे चिदग्नीत हवन करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्य यजमानाचे मायिक अर्थात् भासणारे प्रमातृत्व अर्थात् जीवभाव नष्ट होतो आणि सर्वाहंभावरूप श्रेष्ठ वीर्ययुक्त व मंत्रयुक्त शरीराची प्राप्ती झाली की, त्याच्या देहबंधनाला कारणीभूत

असणाऱ्या कार्ममलाचा नाश होतो, असा याचा आशय आहे.

त्यामुळेच या शरीराला हविर्द्रव्य असे म्हटले आहे. या हवनामुळे ज्ञान-रूप दिव्यदेहाची प्राप्ती होते. हाच चिद्व्यापक अशा यजमानाचा पर अथवा श्रेष्ठ देह होय.।।३६।।

असा श्रेष्ठ देह अप्रतिबंध व नित्यप्रज्ज्वलित अशा शक्तिसंपन्न मंत्रज्ञानरूप महाअग्नीमध्ये शरीरादि सर्व वस्तूंचे हवन अथवा अर्पण केल्याने प्राप्त होतो.।।३७।।८।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**शरीरं हविः।।८।।**" अर्थात् सर्वांनी जे प्रमातृत्वाने अर्थात् ज्ञातृत्वाने मानलेले स्थूल, सूक्ष्म,कारण व महाकारण इत्यादि स्वरूपाचे शरीर आहे ते महायोग्यांचे परमचैतन्यरूप अग्नीत हवन केले जाणारे हविर्द्रव्य आहे.।।८।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

या मातृकाचक्राच्या सांनिध्यामुळे ज्या सिद्धयोग्याची ज्ञानजागृती झाली आहे त्याचे।।५१.५।। "**शरीरं हविः।।८।।**" अर्थात् "शरीर हविर्द्रव्याप्रमाणे समजावे."

शून्य, बुद्धी व प्राण हे उत्पन्न होतात आणि क्षीणही होतात.।।५२।।

परंतु त्यांना देहाच्या अपेक्षेने थोडे स्थैर्य असते; पण तत्त्वतः किंवा यथार्थ रीतीने मात्र असत नाही. अशा प्रकारे या शून्यादिकांची आधारभूमी हा प्रमाता म्हणजे ज्ञाता होय.।।५३।।

त्या पर अर्थात् श्रेष्ठ अशा साधकभक्तयोगिशिष्याचे स्थूलसूक्ष्मादि शरीर चैतन्यरूप अग्नीत हवन केले जाते. त्यामुळे या शरीराला हविर्द्रव्य म्हटले आहे;।।५४।।

कारण हे शरीर स्वतःच्या उत्पत्तिस्थानी लीन होते व परिपूर्ण प्रकाशरूप आत्म्याला म्हणजेच जीवाला वर काढते अर्थात् त्याचा उद्धार करते. ।।५४.५।।८।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

या प्रकाराने मंत्रात्मक तेज झळाळून उठल्यावर पुनर्जन्म प्राप्त करवून देणारे काहीही कर्म शिल्लक न राहता जळून जाते असे "**शरीरं हविः।।८।।**" अर्थात् "मंत्ररूप कुंडलिनी शक्ती जागृत होऊन स्वतःच साधनरत झाली की, शरीर व तदंगभूत सर्व गोष्टी हविर्द्रव्याप्रमाणे जळून जातात" असे या सूत्रात सांगितले आहे. मंत्रतादात्म्यरूप ज्ञानाग्नी प्रज्वलित झाल्यानंतर हविर्द्रव्य

झालेले व कर्मबंधनात बांधलेले भौतिक शरीर निःशेष नष्ट होऊन जाते. या मंत्रात्मक दिव्य देहाचा आश्रय घेतलेल्या सर्व पदार्थसमूहांच्या ज्ञानाग्नीचे भक्षण करणाऱ्या अर्थात् इष्टी म्हणजे यज्ञ करणाऱ्या यजमानाच्या मायीय-ज्ञातृत्वाचे प्रशमन झाल्यामुळेच अहंभावाच्या परवीर्यरूप मंत्रशरीराच्या ऐश्वर्यात शरीराला बंधनात टाकण्याला कारणीभूत होणाऱ्या कार्ममलाचा नाश होतो अर्थात् नंतर तो जीव दिव्य देहाचा आश्रय करतो. यजमानस्वरूप श्रीपरमेश्वराचा चिदात्मा हाच परदेह होय. साधकभक्तयोगिशिष्य ज्याला कोणतीही बंधने नाहीत अशा सत्तेने युक्त शरीरादि समस्त पदार्थांचे सदोदित महान् अग्नीत अखंडपणे समर्पण करीत असतो अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपात-योगदीक्षेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीकडून आपोआप होणाऱ्या सिद्धयोग साधनाला वाव देऊन सर्व शरीरे, इंद्रिये, मन, अहंकार, अष्टपाश, अष्टबंध, मल, विक्षेप व आवरणे जळू जाऊ देऊन सहस्रारात श्रीशिवरूप होतो.

**विवरण :-** श्रीसद्गुरूंच्या कृपेने ज्याची अनादिनिद्रिस्थ कुंडलिनी शक्ती जागृत झालेली आहे अशा साधकभक्तयोगिशिष्याचे शरीर योगाग्नीसाठी हवी म्हणजे आहुतिस्वरूप असते. कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यानंतर ती अग्निरूप होते किंवा असते. तिच्यामुळे शरीराची शुद्धी होत असल्यामुळे शरीराला हवी असे म्हणतात.

ही कुंडलिनी शक्ती साधकभक्तयोगिशिष्याला **"श्वेताश्वतरोपनिषद्"** या उपनिषदात खाली वर्णन केलेल्या अवस्थेपर्यंत घेऊन जाते.

**पृथ्व्यप्तेजोऽनिलखे समुत्थिते**
**पञ्चात्मके योगगुणे प्रवृत्ते।**
**न तस्य रोगो न जरा न मृत्युः**
**प्राप्तस्य योगाग्निमयं शरीरम् ।।२.१२।।**

**अर्थ :-** पृथ्वी, जल, तेज, वायू व आकाश यांचे उत्थान झाल्यावर पंच-भूतात्मक योगगुण प्रवृत्त झालेल्या अर्थात् त्यांचा अनुभव आलेल्या योग्याचे शरीर योगाग्निमय होते व त्याला म्हातारपण येत नाही. त्याला कोणत्याही प्रकारचे रोग होत नाहीत आणि त्याचा अकाली मृत्यूही होत नाही.।।२.१२।।

ही अवस्था पंचमहाभूतांवर जय मिळविल्यानंतर प्राप्त होते.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**धर्माधर्म हविः प्रदीप्ते योगाग्नौ मनसा।।**

**अर्थ :-** मनाने प्रदीप्त केलेल्या योगाग्नीत धर्म व अधर्मरूप हवी असतो

म्हणजे या सर्वांची आहुती पडते.

सामान्य माणूस शरीरालाच सर्वस्व समजत असतो; परंतु हे शरीर आहुतीशिवाय आणखी काहीही नाही. यज्ञात जशी आहुती घालतात तशी या शरीराची योगाग्नीत आहुती घालावी लागते. बाकी लौकिक आहुत्या व्यर्थ आहेत.।।८।।

**सूत्र क्रमांक ९**

**संबंध :-** कारण पूर्णता प्राप्त करीपर्यंत सहा कंचुके म्हणजे आवरणे साधकभक्तयोगिशिष्याबरोबरच असतात. त्यामुळे तो साधकभक्तयोगिशिष्य घटपटादि आणि रागद्वेषादिरूप भेदप्रथेच्या ज्ञानाचा ग्रास करण्यात तत्पर राहतो.

**ज्ञानमन्नम्।।९।।**

**शब्दार्थ :- ज्ञानम्** - (१) मर्यादित ज्ञान. ("**ज्ञानं बन्धः।। श्रीशिवसूत्र १.२।।**" या सूत्रात स्वीकारलेला अर्थ) किंवा घटपटादि आणि रागद्वेषादि रूपाच्या भेदप्रथेचे ज्ञान अर्थात् बाह्यसंसारोन्मुखाने कामोपभोगाकांक्षातृष्णा-इच्छावासनासंकल्पनादि रूपाने संकुचित झालेली कुंडलिनी शक्ती. (२) स्वतःच्या मूळ स्वरूपाचे विमर्शात्मक ज्ञान. **अन्नम्** (१) भक्षण करून नाहीसे करावयाचे असते ते अन्न. (२) पूर्ण तृप्ती देऊन आत्म्याच्या ठिकाणी विश्रांती देणारे अन्न.

**अर्थ :-** (१) अशा साधकभक्तयोगिशिष्याला मर्यादित ज्ञान हे भक्षण करून नाहीसे करावयाचे असते म्हणून तेच अन्न होते किंवा साधकभक्त-योगिशिष्य हा घटपटादि आणि रागद्वेषादि रूप भेदप्रथेच्या ज्ञानाचा ग्रास करण्यात तत्पर राहतो. (२) अशा साधकभक्तयोगिशिष्याला स्वतःच्या मूल-स्वरूपाचे विमर्शात्मक ज्ञान हे पूर्ण तृप्ती देऊन आत्म्याच्या ठिकाणी विश्रांती देणारे अन्न होते किंवा ठरते अगर अशा साधकभक्तयोगिशिष्याला बाह्य-संसारोन्मुखाने कामोपभोगाकांक्षातृष्णाइच्छावासनासंकल्पनादि रूपाने संकुचित झालेली कुंडलिनी शक्ती श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झाल्यानंतर तिच्याकडून होणाऱ्या स्वतःसिद्ध अशा सिद्धयोगसाधनाने ती सुषुम्नागामी होताना सर्व बाह्योन्मुख उपशक्ती तिच्याशी समरस होऊ देणे हेच तिचे अन्न होते म्हणजे सर्व कामोपभोगवासनादि गिळून टाकणे हेच तिचे अन्न ठरते. (या अन्नामुळेच शेवटी साधकभक्तयोगिशिष्याला सहस्रारात श्रीशिव-शक्तिसामरस्यावस्था प्राप्त होते.)।।९।।

**विशेष व्याख्या :-** पहिल्या उन्मेषातील दुसरे सूत्र "**ज्ञानं बन्धः।।**"

अर्थात् "द्वैतज्ञानच बंधन आहे," असे असून यानुसार साधकभक्तयोगिशिष्य हा या द्वैतज्ञानरूप बंधनाचा ग्रास अर्थात् घास करण्यात अत्यंत तत्पर असतो. भेदज्ञान बाह्येंद्रियांद्वारा घटपटादि पदार्थांमध्ये असते आणि अंतःकरण-द्वारा रागद्वेषादींमध्ये प्रकट होते. अशा अवस्थेमध्ये हे भेदज्ञानच साधकभक्त-योगिशिष्याला ग्रास करण्याला योग्य अन्न आहे. सर्व प्रकारच्या भेदप्रथेचा तो ग्रास करतो आणि अद्वयानंदात मग्न राहतो.

"**श्रीभर्गशिखा**" या ग्रंथात यासंबंधी असे म्हटले आहे की -

**मृत्युं च कालं च कलाकलापं**
**विकारजातं प्रतिपत्तिसात्म्यम्।**
**ऐक्यात्म्यनानात्मविकल्पजातं**
**तदा स सर्वं कवलीकरोति।।**

**अर्थ :-** त्यावेळेला म्हणजे स्वरूपसाक्षात्कार होत असताना तो महासिद्ध-योगी स्थूलदेहाच्या विनाश, महाकाल, क्रियासमूह, हास्यक्रोधादि द्वंद्वविकार, भेदप्रथेच्या ज्ञानाने त्या त्या भावात तन्मय होणे, जीवांबरोबर एकात्मता आणि स्थाणू इत्यादि पदार्थांबरोबर नानात्वाचा अथवा भिन्नत्वाचा विकल्प या सर्वांचा ग्रास करतो.

अशा उदारचरित सिद्धयोग्यांचे कुटुंब म्हणजेच ही सर्व सृष्टी होय.

यासंबंधी असेही म्हटले आहे की -

**उदारचरितानां तु वसुधैव कुटुम्बकम्।।**

**अर्थ :-** उदारचरित म्हणजे जे अंतिम श्रीशिवशक्तिसामरस्यसिद्धीला प्राप्त झालेले असतात त्यांचे सर्व विश्वच कुटुंब किंवा घर झालेले असते.

या सूत्राचा आणखी एक अर्थ खालीलप्रमाणे होतो.

**अर्थ :-** स्वरूप विमर्शक ज्ञान साधकभक्तयोगिशिष्याला पोषक आहे.

**विशेष व्याख्या :-** अशा महायोग्याचे स्वरूपविमर्शरूप ज्ञान हेच अन्न आहे अर्थात् पूर्णरूपाने परितृप्त होण्याने हे स्वरूपज्ञानच त्याच्या विश्रांतीचे कारण बनते. यातील युक्ती प्राप्त करण्यासाठी "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात सांगितलेल्या एक शे बारा धारणा साहाय्यक बनू शकतात. असा सिद्धयोगी संकोचरहित स्वातंत्र्यशक्तिसंपन्न राहतो.

स्वातंत्र्यशक्तिसंपन्न असण्याने तो महासिद्धयोगी नेहमी स्वरूपज्ञानात प्रबुद्ध असतो.

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**प्रबुद्धः सर्वदा तिष्ठेज्ज्ञाननेनालोच्य गोचरम्**
**एकत्रारोपेयत् सर्वं ततोऽन्येन न पीड्यते।।४.४४।।**

**अर्थ :-** जागृत असलेल्या अर्थात् प्रबुद्धावस्थेतील साधकभक्तयोगिशिष्याने सर्वदा अर्थात् जागृती, स्वप्न व सुषुप्ती या अथवा अनुभवाच्या आदि, मध्य व अंत या सर्व अवस्थांमध्ये इंद्रियगोचर अर्थात् इंद्रियांनी जाणता येणारे सर्व विषय आपल्या ज्ञानशक्तीच्या द्वारा विश्लेषित करून अर्थात् स्पंदतत्त्व हे प्रत्येक विषयाचे खरे रूप आहे हे जाणून घेऊन सावधान राहावे. योग्याने या सर्व गोचर विषयांचा एका तत्त्वात अर्थात् शुद्ध स्पंदतत्त्वात ज्ञाता जो आत्मा त्याच्या ठिकाणी लय करावा किंवा ते विषय त्याला अर्पण करावेत अर्थात् सर्व विषयस्पंद आत्मतत्त्वापेक्षा भिन्न नाहीत असे जाणावे. जर साधकभक्त-योगिशिष्याने असे केले तर त्याला दुसऱ्या कोणाकडूनही कसलाही त्रास होत नाही किंवा त्याला दुसरा कोणी त्रास देऊ शकत नाही.।।४.४४।।९।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

या योग्याचे "**ज्ञानमन्नम्।।९।।**" अर्थात् "ज्ञान हेच अन्न असते." या-पूर्वी "**ज्ञानं बन्धः।।१.२।।**" अर्थात् "आत्मस्वरूपाविषयी योग्य ज्ञान नसणे अथवा संकुचित ज्ञान असणे हे बंधन किंवा बंधाचे कारण आहे," असे या सूत्रामध्ये सांगितले आहे. ते संकुचित ज्ञान हा साधकभक्तयोगिशिष्य खाऊन टाकत असल्यामुळे किंवा त्याचा ग्रास करीत असल्यामुळे ते संकुचित ज्ञान त्याचे अन्न म्हणून या सूत्रात सांगितले आहे.

यासंबंधी आधीही असे म्हटले आहे की -

**मृत्युं च कालं च कलाकलापं**
**विकारजातं प्रतिपत्तिसात्म्यम्।।**
**ऐकात्म्यनानात्म्यवितर्कजातं**
**तदा स सर्वं कवलीकरोति।।**

**अर्थ :-** त्यावेळेला म्हणजे श्रीशिवशक्तिसामरस्यावस्थेत तो साधक-भक्तयोगिशिष्य मृत्यू, काळ, कलासमूह, विकारांपासून निर्माण होणारे पदार्थ, ज्ञानाची स्वरूपता आणि एकात्मता व अनेकात्मता अशा प्रकारचे सर्व तर्कवितर्क यांचा घास करतो.

यानंतर याचाच दुसरा अर्थ असा सांगता येईल की, जे स्वरूपविमर्शात्मक म्हणजेच आपले खरे रूप सांगणारे व आपण कोण आहोत? याचा विचार करणारे जे ज्ञान आहे तेच साधकभक्तयोगिशिष्याचे अन्न असते; कारण ते

पूर्णपणे तृप्ती करणारे असून स्वात्म्यात विश्रांती मिळवून देणारे आहे.

यासंबंधी "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**अत्रैकतमयुक्तिस्थे योत्पद्येत दिनाद्दिनम्।**
**भारिताकारिता सात्र तृप्तिरत्यन्तपूर्णता।।१४५।।**

**अर्थ :-** यांपैकी एका भूमिकेत असणारी, दिवसेंदिवस वाढत जाणारी व जी भारिताकार अर्थात् पूर्णाकार अवस्था असते तीच पूर्णरूप तृप्ती होय. ।।१४५।।

**विवरण :-** "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात कथन केलेल्या एकशेबारा भूमिकांमध्ये कोणत्याही एका भूमिकेत समाधी लावलेल्या सिद्धयोग्याची जी विश्वपूर्ण श्रीभैरवावस्था आहे तीच तृप्ती होय.

युक्ती म्हणजे येथे एकशेबारा अवस्थांची ज्ञानरूप अवस्था होय. शांभव, शाक्त आणि आणव हे तीन उपाय वेगळेपणाने सांगितले असल्यामुळे या ज्ञानभूमिकांची संख्या एकशेबारा एवढी होते.

हेच "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथात पुढीलप्रमाणे एकत्रित केले आहे.

**प्रबुद्धः सर्वदा तिष्ठेत्.........।।४.४४।।**

**अर्थ :-** प्रबुद्ध हा नेहमीच उभा असतो. (प्रबुद्ध म्हणजे ज्याच्या ठिकाणी कोणताही संकोच नसणारी स्वातंत्र्यशक्ती असते असा सिद्धयोगी होय.) ।।४.४४।।

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील उपरोक्त पूर्ण श्लोक व त्याचा अर्थ पुढील प्रमाणे आहे.

**प्रबुद्धः सर्वदा तिष्ठेज्ज्ञाननेनालोच्य गोचरम्।**
**एकत्रारोपेयत् सर्वं ततोऽन्येन न पीड्यते।।४.४४।।**

**अर्थ :-** जागृत असलेल्या अर्थात् प्रबुद्धावस्थेतील योग्याने सर्वदा अर्थात् जागृती, स्वप्न व सुषुप्ती या अथवा अनुभवाच्या आदि, मध्य व अंत या सर्व अवस्थांमध्ये इंद्रियगोचर अर्थात् इंद्रियांनी जाणता येणारे सर्व विषय आपल्या ज्ञानशक्तीच्या द्वारा विश्लेषित करून अर्थात् स्पंदतत्त्व हे प्रत्येक विषयाचे खरे रूप आहे हे जाणून घेऊन सावधान राहावे. योग्याने या सर्व गोचर विषयांचा एका तत्त्वात अर्थात् शुद्ध स्पंदतत्त्वात ज्ञाता जो आत्मा त्याच्या ठिकाणी लय करावा किंवा ते विषय त्याला अर्पण करावेत अर्थात् सर्व विषयस्पंद आत्मतत्त्वापेक्षा भिन्न नाहीत असे जाणावे. जर साधकयोग्याने असे केले तर त्याला दुसऱ्या कोणाकडूनही कसलाही त्रास होत नाही किंवा

त्याला दुसरा कोणी त्रास देऊ शकत नाही.।।४.४४।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे श्रेष्ठ अशा ज्ञानशरीरात असणाऱ्या योग्याचे अन्न कोणते आहे? या प्रश्नाचे उत्तर देताना श्रीपरमेश्वराने **"ज्ञानमन्नम् ।।९।।"** अर्थात् "संकुचित ज्ञान म्हणजे अज्ञान हेच साधकभक्तयोगिशिष्याचे अन्न आहे," हे सूत्र लिहिले आहे.

**विवरण :-** परावस्थेत स्वात्मवैभवाच्या विकासाचे परिशीलन करणारा हा साधकभक्तयोगिशिष्य अतिशय आशारहित असतो; कारण अंतर्बाह्य स्वात्मस्फुरणमय विश्वात तो स्वाभाविकदृष्ट्या भरून असतो; परंतु व्यवहारात कदाचित् शरीरभूमिकेत राहणारा हा एखाद्या कुशल नटाप्रमाणे नानाविध पात्रांचे अभिनय करीत करीत चक्षुरादि इंद्रियांनी विषयातील सुखरूपी अमृताचा स्वात्मरूपाने आस्वाद घेतो. विषयासक्तीने पशू जसा स्वस्वरूप विसरून निकृष्टावस्था भोगतो तसे मात्र हे नाही अर्थात् हा पशुजीव व साधक यांच्यातील भेद आहे.

ज्ञान म्हणजेच येथे दोन प्रकरणात योग्य प्रकारे सांगितलेले अन्न होय.।।३८।।

हे ज्ञानच या साधकाचे तृप्ती करणारे अन्न होय. वरचेवर त्याचा उपयोग केल्याने परिपूर्णता अथवा तृप्ती होते.।।३९।।९।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"ज्ञानं बन्धः।।१.२।।"** या पहिल्या उन्मेषातल्या सूत्रात जे सांगितले आहे ते ज्ञान योग्याचे अन्न होय; कारण **"ज्ञानमन्नम्।।९।।"** अर्थात् "ते बंधरूप ज्ञान साधकभक्तयोगिशिष्य खाऊन टाकतात म्हणजेच त्यांचा बंध नष्ट होतो."

किंवा

**"ज्ञानमन्नम्।।९।।"** अर्थात् "जे स्वरूपाचा विचार करणारे ज्ञान आहे ते या साधकभक्तयोग्याचे अन्न बनते;" कारण ते त्याला पूर्ण तृप्त करून आत्म्याला विश्रांती देते.।।९।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा शरीराच्या हवनाने ज्ञानाग्निरूप तेजाने प्रकाशित झालेल्या साधकभक्तयोगिशिष्याचे।।५५।। **"ज्ञानमन्नम्।।९।।"** अर्थात् "ज्ञान हेच अन्न असते."

पूर्वी सांगितलेले अनात्मवस्तूला आत्मा समजणारे जे बंधनात्मक ज्ञान असते त्याचाच परयोगी ग्रास अर्थात् घास करतात म्हणजे तेच अन्न म्हणून

खातात;।।५६।।

कारण जे जे प्रकाशरूप आहे त्याचा विचार होतो आणि ते विचारात्मक ज्ञान परमानंद प्राप्त करवून देणारे असते म्हणून त्याला अन्न असे म्हणतात. ।।५७।।

(ज्याप्रमाणे अन्नामुळे भूक शांत होऊन तृप्ती होते तशीच या ज्ञानानेही तृप्ती होते.)।।९।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

"**ज्ञानमन्नम्।।९।।**" या सूत्रात ज्ञानाची अन्नरूपता वर्णन केली आहे. पूर्वी "**ज्ञानं बन्धः।।१.२।।**" या सूत्रात जे सांगितले आहे त्या ज्ञानाला अद्यमानता अर्थात् भक्षणत्व किंवा खाण्यास योग्य असणे असल्यामुळे किंवा ग्रास अर्थात् घासरूपाने ग्रस्यमानत्व आहे अर्थात् ते खाता अर्थात् भक्षिता येते म्हणून साधकभक्तयोगिशिष्यांसाठी ते अन्नच होते.

यासंबंधी "**श्रीगर्भशिखा**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**मृत्युं च कालं च कलाकलापं**
**विकारजातं प्रतिपत्तिसात्म्यम्।**
**ऐकात्म्यनानात्म्यवितर्कजातं**
**तदा स सर्वं कवलीकरोति।।**

**अर्थ :-** मृत्यू, काळ, कलासमूह, पदार्थसमूह, ज्ञानाची सरूपता, एकात्मता व नानात्मता इत्यादि विविध तर्कांपासून उत्पन्न होणाऱ्या या सर्व गोष्टींचा तो साधकभक्तयोगिशिष्य घास करतो अर्थात् त्यांचा नाश करतो.

या सूत्रात ज्ञान या शब्दाने "अज्ञान" हे अपेक्षित आहे. अज्ञान हेच सर्व प्रकारच्या बंधनांचे कारण असते. त्यामुळे परमतत्त्व भोगण्याची इच्छा असणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याने त्या अज्ञानाचा नाश करण्यासाठी अन्नाप्रमाणे त्याचे भक्षण करावे अथवा त्याचा घास करावा.

जरी या सूत्रातल्या "ज्ञान" या शब्दाचा अर्थ स्वरूपभूत परम श्रीशिवविमर्शात्मक "ज्ञान" असा स्वीकारला तरीही त्याची अन्नरूपता त्यागली जात नाही अथवा नष्ट होत नाही; कारण सिद्धयोग्यासाठी ते ज्ञान स्वात्म्यात विश्रांती देणारे असल्याने त्या ज्ञानामुळे अन्नाप्रमाणेच संपूर्ण तृप्ती मिळते.

त्याचप्रमाणे "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**अत्रैकतमयुक्तिस्थे योत्पद्येत दिनाद्दिनम्।**
**भारिताकारिता सात्र तृप्तिरत्यन्तपूर्णता।।१४५।।**

**अर्थ** :- एकाच युक्तीत अथवा धारणेत राहणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यात दिवसेंदिवस जी भारिताकारिता उत्पन्न होते तिलाच येथे तृप्ती असे म्हटले आहे. तृप्ती म्हणजेच आत्यंतिक पूर्णता होय.।।१४५।।

याचा भावार्थ असा आहे की, कोणत्यातरी धारणेत स्थित असणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यात उत्तरोत्तर निर्विकल्प समावेशदशेच्या रसास्वादामुळे जी अद्वयस्वरूप अर्थात् द्वैतविरहित आत्मोपलब्धिरूप अत्यंत पूर्णता प्राप्त होते तिलाच येथे तृप्ती असे म्हटले आहे.

याचा निष्कर्ष असा आहे की, परमतत्त्वदशेत गेलेला साधकभक्तयोगिशिष्य स्वात्मवैभवाचा विस्तार वारंवार अभ्यासून अत्यंत निराकांक्ष अर्थात् आकांक्षा, इच्छा, वासना व कामना यांनी विरहित होतो. ग्राह्य अशा आत्मस्फुरणाने युक्त सर्व प्रपंचविस्तारात भारितस्वभावामुळे अर्थात् तृप्तीमुळे तो कशाचीही इच्छा करीत नाही. व्यवहारदशेत मात्र कदाचित् देहभूमिकेत असणारा प्रबुद्ध सिद्धयोगी नटाप्रमाणे स्वस्वरूपाच्या चमत्काराने युक्त होऊन विविध पात्रांची भूमिका घेऊन अनेक प्रकारचा अभिनय करीत असतो व शब्दादि विषयेंद्रियांनी विषयसमूहाचे स्वस्वरूपात समर्पण करीत असतो; परंतु विषयांच्या वासना प्रबळ झाल्याने स्वात्म्याला विसरून पशूप्रमाणे म्हणजे अज्ञानी जीवाप्रमाणे निम्नावस्थेत कधीच राहत नाही.।।९।।

**विवरण** :- या साधकभक्तयोगिशिष्याचे ज्ञान हेच अन्न आहे. **"ज्ञानं बन्धः।।१.२।।"** या परिभाषेनुसार साधकभक्तयोगिशिष्य बंधरूपी ज्ञान खाऊन टाकतो अर्थात् तो आपल्याला आपल्यात विलीन करून टाकतो. साधकभक्तयोगिशिष्य जेवढा जागृत होऊ शकेल तेवढा तो ज्ञानपूर्ण होऊ शकेल. त्याच्यात तुरीयावस्था जेवढी सघन व विवेकपूर्ण होऊ शकेल तेवढी त्याच्या आत्म्यात जीवनधारा प्रवाहित होईल. साधकभक्तयोगिशिष्यांनी जीवनाचे सर्व प्रयत्न आत्म्याला ज्ञानरूपी अन्न द्यावयाच्या दृष्टीने करावेत.

या सूत्राचे दोन तऱ्हेने स्पष्टीकरण देता येऊ शकते. पहिल्या स्पष्टीकरणानुसार ज्ञान म्हणजे संकुचित अथवा मर्यादित ज्ञान होय. अन्न म्हणजे नाश होणे होय म्हणजेच सर्व संकुचित ज्ञान योग्याकडून खाऊन टाकले जाते म्हणजेच सर्व संकुचित ज्ञान हे "स्व"शी साम्यस्थितीत आणले जाते.

दुसऱ्या स्पष्टीकरणानुसार ज्ञान म्हणजे स्वरूपज्ञान होय. अन्न म्हणजे समाधान देणारे अन्न होय. त्यामुळे या सूत्राचा असा अर्थ होतो की, स्वरूपज्ञान हे सर्वोच्च समाधान देते.।।९।।

**सूत्र क्रमांक १०**

**संबंध :-** परंतु ज्यावेळेला तो साधकभक्तयोगिशिष्य सतत रूपाने समाहित किंवा एकाग्रचित्त राहत नाही त्यावेळेला ज्ञानवान् असूनही त्याला स्वरूपामध्ये स्वेच्छानुसंधानाचा उणीवरूप अडथळा भासतो.

यासंबंधी पुढील सूत्रात असे म्हटले आहे की -

**विद्यासंहारे तदुत्थस्वप्रदर्शनम्।।१०।।**

**शब्दार्थ :- विद्यासंहार** - शुद्ध विद्येचा म्हणजे सिद्धयोगसाधनेचा ऱ्हास किंवा लोप अर्थात् संहार झाला असता. **तदुत्थ-स्वप्र-दर्शनम्** - जसजसा शुद्धविद्येच्या संस्कारांचा लोप होत जाईल तसतसा त्या अनुषंगाने निर्माण होणारे भेदमय विकल्परूप प्रपंचाचे दर्शन परत उचंबळून येणे अर्थात् उन्मज्जन होणे.

**अर्थ :-** शुद्ध विद्येचा अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीकडून होणाऱ्या स्वतःसिद्ध अशा सिद्धयोगसाधनाचा संसारोन्मुखतेने व कामोपभोगाकांक्षावासनाइच्छातृष्णासंकल्पनादींमुळे ऱ्हास अथवा लोप झाला असता जसजसे शुद्ध विद्येचे संस्कार लोपत जातात म्हणजे बहिरोन्मुखता तीव्रतमपणे वाढत जाते तसतसे तदनुषंगिक भेददर्शक प्रपंचरूप संकल्प वर उचंबळून येतात.।।१०।।

**विशेष व्याख्या :-** शुद्ध विद्येचा एकदा उदय झाल्यावर साधकभक्तयोगिशिष्याचा अभ्यास नेहमी उत्थितच राहतो; परंतु एखाद्या वेळेला जरी तो बेसावध राहिला तरीही त्याच्या अभ्यासात अडथळे उत्पन्न होतात. त्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य स्वप्ररूप भेदाला प्राप्त होतो अर्थात् तो भेदमय विकल्पप्रपंचामध्ये डुंबून जाऊन त्रिशंकुप्रमाणे अर्धवट लटकत राहतो. तो जाग्रत अवस्थेच्या विकल्पमय भ्रमामुळे स्वप्रात जातो आणि पूर्णत्व मिळविण्यापासून वंचित राहतो. त्यामुळे साधकभक्तयोगिशिष्याने सावध राहूनच अभ्यासात मग्न राहिले पाहिजे.

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

परंतु ज्यावेळेला सिद्धयोगी असा सावधपणा ठेवीत नाही त्यावेळेला त्याची बेसावधपणामुळे "**विद्यासंहारे तदुत्थस्वप्रदर्शनम्।।१०।।**" अर्थात् "सर्व ज्ञानाने प्रकाशित अशी शुद्धविद्या लुप्त होते, त्यापासून भेदमय विकल्परूप प्रपंच निर्माण होतो व अज्ञानामुळे भेद दिसू लागतो."

यासंबंधी "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**न चैतदप्रसन्नेन शङ्करेणोपदिश्यते।**
**कथञ्चिदुपदिष्टेपि वासना नैव जायते।।**

**अर्थ :-** याचा उपदेश श्रीशंकरांनी अप्रसन्न होऊन केलेला नाही; तर पूर्णपणे सावध होऊनच त्यांनी हे सांगितले आहे आणि जरी कसेही सांगितले असले तरी सिद्धयोग्याला सिद्ध्यादिकांविषयी वासना उत्पन्न होत नाही. अशी सुरुवात करून त्यांनी असे म्हटले आहे की -

**वासनामात्रलाभेऽपि योऽप्रमत्तो न जायते।**
**तमनित्येषु भोगेषु योजयन्ति विनायकाः।।**

**अर्थ :-** वासनेचा लाभ होऊनही जो साधकभक्तयोगिशिष्य सावध होत नाही त्याला विनायकगण अनित्य अशा भोगात रमवितात.

**विवरण :-** विनायक म्हणजे ते ते दिव्यगण, दिव्यभोग देणाऱ्या अवस्थांचे अधिष्ठाते देव व परसिद्धी मिळविण्यात अडचणी निर्माण करणारे गण होत. ते ऋतंभरा प्रज्ञेने युक्त अशा ब्राह्मणांची सत्त्वशुद्धी पाहत त्यांना भोगस्थानां-मध्ये उपनिमंत्रित करतात व त्यांना असे म्हणतात की, "अहो सिद्धयोगि-राज! या येथे श्रेष्ठ आसनावर विराजमान व्हा. किती सुंदर भोग आहेत हे! ही सुंदरी कन्या किंवा तरुण स्त्री पाहा. हे रसायन पाहा. याच्या सेवनाने म्हातारपण व मृत्यू सहज नाहीसे होतात. हे विमान पाहा. हे कल्पवृक्ष, ही पुण्यनदी, ही आकाशगंगा, हे सिद्धमहर्षी, उत्तम आणि तुम्हाला अनुकूल अशा रंभादि अप्सरा, हे दिव्य डोळे व कान आणि वज्रशरीरी लोक हे सर्व तुम्ही आपल्या स्वतःच्या गुणांनी व तप आदि क्रियांनी मिळविले आहे. हे देवप्रिय, देवदुर्लभ असे अक्षय व अमर स्थान आपण स्वीकारावे." अशा रीतीने "**श्रीपातंजलयोगदर्शन**" या ग्रंथात सांगितलेल्या प्रकारे विनय व आदरपूर्वक दिव्य वस्तूंची वर्णने ऐकवून त्या सिद्धयोग्याच्या मनात प्रलोभन उत्पन्न करतात. त्यामुळे हे सर्व श्रेष्ठसिद्धींच्या मार्गात विघ्नभूत आहे असे समजून त्यापासून सिद्धयोग्याने विरक्त व्हावे असा त्याचा तात्पर्यार्थ आहे.

हेच "**श्रीस्पंदकारिका**" या ग्रंथात एकत्रितपणे सांगितले आहे.

**अन्यथा तु स्वतन्त्रा स्यात्सृष्टिस्तद्धर्मकत्वतः।**
**सततं लौकिकस्येव जाग्रत्स्वप्नपदद्वये।।४.३५।।**

**अर्थ :-** जर सिद्धयोगी हा स्वरूप साक्षात्कार करून घेतल्यानंतरही किंवा स्वरूपानुभूती घेऊनही त्या साक्षात्कारामध्ये किंवा अनुभूतीमध्ये स्थित झाला नाही तर अशा सिद्धयोग्याच्या जागृत आणि स्वप्न या दोन्ही पदांमधील

भावांची सृष्टी सर्वसाधारण लौकिक लोकांप्रमाणे स्वतंत्रपणे होत असते. स्वतंत्र रूपामध्ये उत्तरोत्तर भावाची निर्मिती करीत राहणे हा स्पंदशक्तीचा अकाट्य अर्थात् अनुल्लंघनीय स्वभाव आहे.।।४.३५।।

**विवरण :-** एक व स्वतंत्र अशा श्रीपरमेश्वराच्या "हे सर्व जग माझेच आहे," अशा प्रकारच्या विश्वपूर्ण संवित्स्वरूपाच्या समाधानाच्या पूर्ण त्यागाने साधकभक्तयोगिशिष्याला दोन पदांमध्ये ज्ञान व क्रियात्मकतेने विविध भ्रम उत्पन्न करण्याला समर्थ असणाऱ्या या नानाविध विचित्र भावांना दूर सारणे पशुजीवाप्रमाणेच अवघड किंवा अशक्य होऊन जाते. पशुजीव हा नीलसुखादि सामान्य सृष्टीनेच स्वायत्त केला जातो, असा याचा तात्पर्यार्थ आहे. जो सावधचित्ताचा साधकभक्तयोगिशिष्य आहे त्याला मात्र ज्ञान व ज्ञेय या रूपांनी स्फुरण पावणारी पारमेश्वरी शक्ती चिन्मयस्वरूपावर आवरण घालण्याला प्रतिबंध करण्यासाठी प्रगल्भ होत नाही अर्थात् ती त्याच्याबाबतीत आवरण म्हणून सिद्ध होत नाही.

त्यामुळे सिद्धयोग्याने नित्य शुद्धविद्याविचार करण्याला युक्त व्हावे असा येथे उपदेश केला आहे.

यासंबंधी "**श्रीपूर्वशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**तस्मान्न तेषु संसक्तिं कुर्वीतोत्तमवाञ्छया।।**

**अर्थ :-** त्यामुळे त्या सिद्धीची अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्याची उत्तम इच्छा करणाऱ्याने कशाचीही आसक्ती धरू नये.

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**अतः सततमुद्युक्तः स्पन्दतत्त्वविविक्तये।**
**जाग्रदेव निजं भावमचिरेणाधिगच्छति।।२.२१।।**

**अर्थ :-** शाक्ततत्त्वाच्या स्वरूपाविर्भावासाठी सदैव उत्सुक असा साधक जाग्रदावस्थेतच निरावरण चिद्रसघन अशा श्रीभैरवदेवांची श्रेष्ठ सत्ता अनुभवितो.

अशा रीतीने "**चित्तं मन्त्रः।।१।।**" येथपासून मंत्रवीर्य व मुद्रावीर्याच्या अनुसंधान प्राधान्याने युक्त अशा शाक्तोपायाचे वर्णन करताना श्रीक्षेमराजाचार्य असे म्हणतात की -

**उच्चाररहितं वस्तु चेतसैव विचिन्तयन्।**
**यं समावेशमाप्नोति शाक्तः सोऽत्राभिधीयते।।**

**अर्थ :-** ज्याचा उच्चार करता येत नाही अशा वस्तूचे मनानेच चिंतन करून जो समावेश प्राप्त होतो त्याला शाक्त समावेश असे म्हणतात.

अशा प्रकारे दृढ एकाग्रतेने विमर्शनाला विषय करून व शाक्तोपायाचे विवेचन करून अनवधानी किंवा बेसावध योग्याला "**विद्यासंहारे तदुत्थ-स्वप्नदर्शनम्।।२.१०।।**" अर्थात् "शुद्ध विद्येचा ऱ्हास किंवा लोप झाला असता जसजसे शुद्ध विद्येचे संस्कार लोप होत जातील तसतसे तदनुषंगिक भेददर्शक प्रपंचरूप संकल्प वर उसळून येतात," या सूत्राने भेदमय प्रपंचाचा नाश व्हावा म्हणून कोणता उपाय आहे? अशा प्रसंगाच्या अनुषंगाने आणवोपाय प्रकाशित करण्याला संधी दिली.।।१०।।

**।। इति श्रीमन्महामाहेश्वराचार्यवर्याभिनवगुप्तपादपद्मोपजीवि श्रीक्षेमराजविरचितायां श्रीशिवसूत्रविमर्शिन्यां शाक्तोपायप्रकाशनं नाम द्वितीय उन्मेषः।।२।।**

**अशा प्रकारे श्रीमन्महामाहेश्वराचार्यवर्य श्रीअभिनवगुप्तपादाचार्यांच्या चरणकमलांवर निष्ठा व श्रद्धा असणाऱ्या किंवा चरणकृपेवरच उपजीविका करणाऱ्या श्रीक्षेमराज यांनी रचलेल्या श्रीशिवसूत्रविमर्शनीमधील शाक्तोपायप्रकाशन या नावाचा दुसरा उन्मेष समाप्त झाला.।।२।।**

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

तर हे अशा प्रकारे असताना अविद्येचा संहार त्या ज्ञानाने कसा होतो? याची निष्पत्ती करण्यासाठी देवांनी पूजिलेल्या श्रीशिवांनी पुढील सूत्र सांगितले आहे. "**विद्यासंहारे तदुत्थस्वप्रदर्शन्।।१०।।**" अर्थात् "शुद्ध विद्येचा ऱ्हास किंवा लोप झाला असता जसजसे शुद्ध विद्येचे संस्कार लोप होत जातील तसतसे तदनुषंगिक भेददर्शक प्रपंचरूप संकल्प वर उसळून येतात." मात्र हा सिद्धयोगी शुद्धविद्येमध्ये बुडाला की, भेदमय असा जो कल्पनाप्रपंच आहे तो वर तरंगत राहतो. त्याचा संपर्क या सिद्धयोगिश्रेष्ठाला बिल्कुल होत नाही.।।४०।।

**विवरण :-** उपर्युक्त प्रक्रियेप्रमाणे पाहिल्यास किंचिज्ज्ञरूप अविशिष्ट विद्येचा लोप झाला की, तेथून उत्पन्न होणारे स्वरूपरहित पण भासमान असे विकल्पमय जगत् स्वप्नाप्रमाणे वाटते. स्वप्न हे उपादानावाचून स्वतःच्या स्वातंत्र्यामुळे गिरिनगरवनादि वस्तू दाखविते. हा सिद्धयोगी निर्मल ज्ञानदर्पणामध्ये या विश्वगत वस्तूंची उत्पत्ती, स्थिती व विनाशादि चित्सत्तेव्यतिरिक्त नाही असे जाणतो व श्रीशिवांप्रमाणे नित्य सर्वज्ञतादि शक्तींनी युक्त होऊन सहजविद्योदयपदात विहार करतो.

संसाराचे ज्ञान करून देणारी ही अविशिष्ट विद्या सांगितली.।।४१।।

स्वप्रकाशाचा उदय झाला असता या अविशिष्ट विद्येचा नाश होतो. या विद्येचा संहार होत असताना अविद्येतून उत्पन्न होणारे मोहक पदार्थ साधक-भक्तयोगिशिष्याला स्वप्ररूपच वाटतात.।।४२।।

असे स्मरलेले जे पदार्थ आहेत त्यांचे दर्शन किंवा पाहणे म्हणजे स्वप्न होय असे श्रीपरमेश्वराने एकत्र करून सांगितले आहे.।।४३।।

वृत्तीचा म्हणजेच विद्येचा उदय झाला की, तीच प्रबुद्धता होय आणि असा प्रबुद्ध झालेला साधकभक्तसिद्धयोगिशिष्य निरंकुश म्हणजे स्वतंत्र होतो. तो स्वप्रकाशात्मा होतो अर्थात् ध्येयाशी एकरूप होतो. त्यामुळे त्याला नित्य-तृप्ती कधीही सोडून जात नाही.।।४४।।१०।।

याच्यापुढे ज्ञान व योग यांचे बल अथवा सामर्थ्य प्राप्त करण्यासाठी चिंतामणीप्रमाणे असणारे विभूतिस्पंद नावाचे तिसरे प्रकरण सांगण्यात येईल. ।।४६।।

**।। इति काश्मीरिक-श्रीमदाचार्यभट्टदिवाकरात्मज श्रीमदाचार्य-भट्टभास्करविरचिते श्रीशिवसूत्रवार्तिके सहजविद्योदयाख्यो द्वितीयः प्रकाशः।।२।।**

**अशा प्रकारे काश्मीरवासी श्रीमदाचार्यभट्टदिवाकरांचे पुत्र श्रीमदाचार्यभट्टभास्कर यांनी लिहिलेल्या श्रीशिवसूत्रवार्तिकामधील सहजविद्योदय नावाचा दुसरा प्रकाश समाप्त झाला.।।२।।**

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**विद्यासंहारे तदुत्थस्वप्नदर्शनम्।।१०।।**" अर्थात् "शुद्ध विद्येचा ऱ्हास किंवा लोप झाला असता जसजसे शुद्ध विद्येचे संस्कार लोप होत जातील तसतसे तदनुषंगिक भेददर्शक प्रपंचरूप संकल्प वर उसळून येतात." मात्र हा सिद्धयोगी ज्यावेळेला शुद्धविद्येमध्ये बुडतो त्यावेळेला भेदयुक्त विकल्प-प्रपंच वर तरंगत राहतो. त्याचा या सिद्धयोगिश्रेष्ठाला कधीही संपर्क होत नाही.।।१०।।

**।। इति श्रीशिवसूत्रवृत्तौ शाक्तोपायप्रकाशनं नाम द्वितीयः उन्मेषः।।२।।**

**अशा प्रकारे श्रीभट्टकल्लटाचार्य विरचित श्रीशिवसूत्रवृत्तीमधला शाक्तोपाय नावाचा द्वितीय उन्मेष समाप्त झाला.।।२।।**

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

ज्यावेळेला सिद्धयोगी या ज्ञानाच्या बाबतीत सावधानता ठेवीत नाही

त्यावेळेला जरी सामान्य समाधानाने तो ज्ञानवान् असला तरी।।५८।। "**विद्यासंहारे तदुत्थस्वप्नदर्शनम्।।१०।।**" अर्थात् "खऱ्या विद्येचे उत्थान न झाल्याने त्याला मातृकोत्पन्न सर्वसृष्टिरूप स्वप्नाचे दर्शन होते."।।५८।।

पूर्वी सांगितलेल्या ज्ञानाचा विस्फार करणारी जी विद्या आहे ती शुद्धविद्या असून तिचा संहार, अनुत्थान व निमज्ञन अथवा नाश झाला असता।।५९।।

त्यापासून क्रमशः उत्पन्न झालेले भेदयुक्त विकल्पसमुदायरूप असलेले स्वप्न दिसू लागते.।।६०।।

पूर्वी सांगितल्याप्रमाणे या शुद्ध विद्येत जागरूक असलेल्या साधकाला मात्र भेदनिष्ठ स्वप्नदर्शन होत नाही तर अभेदज्ञान होते.।।६१।।

अशा प्रकारे शाक्तोपायावर प्रकाश टाकणारा द्वितीय उन्मेष समाप्त झाला.।।१०।।

**।। इति श्रीकृष्णदासापरपर्यायवरदराजविरचिते श्रीशिवसूत्रवार्तिके शाक्तोपायप्रकाशनं नाम द्वितीय उन्मेषः समाप्तः।।२।।**

**अशा प्रकारे श्रीकृष्णदास ऊर्फ श्रीवरदराज यांनी रचलेल्या श्रीशिव-सूत्रवार्तिकातील शाक्तोपायप्रकाशन नावाचा दुसरा उन्मेष समाप्त झाला.।।२।।**

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

ज्यावेळी पूर्वी सांगितलेल्या प्रकाराने सिद्धयोगी सावधान होत नाही त्यावेळी ज्ञानी असूनही अवधानाचा अभाव असल्यामुळे विकल्पात्मक भेद-प्रपंचाचे दर्शन होते, असे "**विद्यासंहारे तदुत्थस्वप्नदर्शनम्।।१०।।**" अर्थात् "शुद्ध विद्येचा ऱ्हास झाल्यावर अशुद्ध अशा प्रपंचरूपाचे स्वप्नदर्शन होते," म्हणून या सूत्रात सांगितले आहे.

या आधी सांगितलेल्या प्रकाशात्मक शुद्ध विद्येच्या संहारामध्ये म्हणजे नाशामध्ये अवधान नसल्यामुळे विद्येचा नाश होतो व त्यामुळे त्यातून निर्माण होणाऱ्या अर्थात् क्रमशः विद्येच्या संहारातून जन्मणाऱ्या भेदात्मक आणि विकल्पप्रपंचरूप स्वप्नाचे दर्शन होते. त्यामुळेच सिद्धयोग्याने सतत शुद्धविद्येच्या विमर्शासाठी तत्पर राहावे. थोडीशीही विचारांची उपेक्षा करू नये. त्यामुळेच किंचिज्ज्ञत्वरूपशून्य म्हणजे किंचित्ही न जाणण्याच्या अवस्थेत असलेल्या व अर्थांपासून उत्पन्न होणाऱ्या विकल्पांनी युक्त अशा उन्मत्त जगात सिद्ध-योगी संवेदन किंवा जाणिवेने युक्त अशा अत्यंत स्वच्छ आरशात पाहून निरंकुश अर्थात् कोणताही अंकुश नसणारा म्हणजे कोणाच्याही ताब्यात

नसणारा असा होऊन स्वप्नाप्रमाणे स्वतंत्र श्रीपरमशिवांसारखा सहजविद्योदयपदात निरंतर विहार करतो.।।१०।।

**विवरण :-** विद्या समाधीत विलीन झाल्यानंतर त्याच्यातून निर्माण होणाऱ्या त्या विद्येशी संबंधित स्वप्न अर्थात् ज्योती आदींचे दर्शन होते. देवता, महात्मा आणि देवमंदिराच्या दर्शनांनासुद्धा या श्रेणीत ठेवले जाऊ शकते. वर सांगितलेली ज्योतिदर्शने समाधी लागण्याच्या बरोबर आधी किंवा समाधीच्या तत्काळ नंतर होत असतात. त्यामुळेच त्यांना येथे स्वप्नदर्शन असे म्हटले आहे. ही ज्योतिर्दशने बाह्य, मध्यम आणि अंतर्दर्शन अशा तीन प्रकाराची आहेत. जागेपणीच्या अवस्थेत उघड्या डोळ्यांनी जी ज्योतींची दर्शने होतात ती बाह्य दर्शने होत. डोळे बंद असताना त्रिपुटीसहित ध्यानावस्थेत जी दर्शने होतात ती दर्शने मध्यम म्हणून ओळखली जातात. त्रिपुटीच्या अर्धविलीनावस्थेत जी दर्शने होतात ती अभ्यंतर दर्शने होत. त्या वेळेला द्रष्टेपणाचा अर्थात् मी पाहत आहे अशा भावनेचा अभाव असतो. ज्यावेळेला त्रिपुटीची जागृती होते त्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य असे म्हणतो की, मला अशा अशा प्रकारची दर्शने झाली.

प्रत्येक विद्येची देवता असते आणि प्रत्येक देवतेच्या विशिष्ट सिद्धी असतात. उदाहरणार्थ श्रीसरस्वती ही विद्येची देवता आहे आणि श्रीलक्ष्मी ही धनाची देवता आहे. त्यांचे मंत्रही विभिन्न आहेत. ज्यांचा जप आदि करून समाधी सिद्ध होते. त्यांच्याबाबतीत ते मंत्र सिद्ध होतात आणि साधकभक्तयोगिशिष्यालाही तशी सिद्धिसूचक स्वप्नेही पडतात. कलियुगात देवतांची प्रत्यक्ष दर्शने होत नाहीत.

हे जर ज्ञान झाले नाही तर मात्र स्वप्न म्हणजेच भ्रम उत्पन्न होतो. ज्यावेळेला आत ज्ञान नसते व आत्मा जागृत झालेला नसतो त्यावेळेला जीव स्वप्नात भ्रमून जातो. अतीत म्हणजे भूतकाळ आणि भविष्य हेच सर्वस्व होऊन जातात आणि वर्तमानाची जाणीवच राहत नाही. ज्यावेळेला जीवाला पूर्ण जागृती येते त्यावेळेला फक्त वर्तमान राहतो. त्यावेळेला भविष्यही राहत नाही आणि भूतकाळही राहत नाही. जेव्हा हे राहत नाही तेव्हा त्यातले सारे रोग, सर्व पुनरुक्ती व सारी वर्तुळे नष्ट होतात. त्यावेळेला जीव पूर्ण, निर्मळ व शुद्ध होतो. हेच परमात्म्याचे अस्तित्व आहे.।।१०।।



# श्रीशिवसूत्रे

## तृतीय उन्मेष

## तिसरा अध्याय

## तृतीय विकास

# आणवोपाय

या तिसऱ्या भागात आणवोपायाद्वारा श्रीशिवस्वरूपाच्या आनंदानुभवाचे वर्णन केले आहे. आणवोपायाचे "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथामध्ये पुढीलप्रमाणे लक्षण सांगितले आहे.

**उच्चारकरणध्यानवर्णस्थानप्रकल्पनैः ।**
**यो भवेत्स समावेशः सम्यगाणव उच्यते ।।२.२१।।**

**अर्थ :-** प्राणादि पाच प्रवाहांद्वारा उच्चाराने, मुद्रेने, ध्वनीच्या अभ्यासाने आणि केळीच्या संपुटाप्रमाणे हृदयादि देशांमध्ये धारणा केल्याने साधकभक्तयोगिशिष्यांमध्ये जो समावेश होतो त्याला आणवोपाय असे म्हणतात. ।।२.२१।।

### सूत्र क्रमांक १

**संबंध :-** हा साधारण जीवोपाय आहे. अणू म्हणजे जीवात्मा होय. त्याच्यापासूनच आणव म्हणजे जीवात्म्यासंबंधी असा अर्थ होतो. आता आणवोपायाचे वर्णन करण्याच्या इच्छेने प्रथम अणू म्हणजे जीवाचे स्वरूप पुढील सूत्रात सांगितले आहे.

**आत्मा चित्तम् ।।१।।**

**शब्दार्थ :- आत्मा -** व्यक्तिगत आत्मा किंवा जन्ममरणचक्रपरंपरेमध्ये अडकलेला जीव अगर आत्मा म्हणजे श्रीशिव होय. **चित्तम् -** मन, बुद्धी व अहंकार यांचा समुच्चय असलेले चित्त किंवा श्रीशिवरूप चेतनपदावरून खाली उतरून संकुचित झालेली कुंडलिनी शक्ती होय.

**अर्थ :-** व्यक्तिगत जीवात्मा म्हणजे चित्त होय किंवा जन्ममरणचक्रपरंपरेमध्ये अखंड फिरत राहिलेला व कामोपभोगविषयवासनातृष्णाइच्छासंकल्पनादींमध्ये रंगून गेलेला जीवात्मा म्हणजे चित्त किंवा मन होय अगर आत्मा म्हणजे श्रीशिव व चित्त म्हणजे श्रीशिवांशी समवायसंबंधाने, अविनाभावाने, संघट्टरूपाने, अनवच्छेद्यपणे, अद्वयरूपाने, अभिन्नपणे, यामलरूपाने

आणि लयप्रक्रियेने समव्याप्त, एकरसरूप व समरस असलेली कुंडलिनी शक्ती होय अर्थात् श्रीशिवशक्तिसामरस्य होय.।।१।।

**विशेष व्याख्या :-** अत् धातू सातत्य अर्थात् सतत गमन करणे या अर्थी वापरला जातो. जो सतत गमनशील आहे त्याला आत्मा असे म्हणतात. ज्याप्रकारे परमात्मा तीन काळात म्हणजे भूत, वर्तमान आणि भविष्य या तीन काळात किंवा स्वप्न, जाग्रत आणि सुषुप्ती या तीन अवस्थांमध्ये गमन करतो अर्थात् ज्याप्रमाणे एक आत्मा संविद्रूपात स्वयंप्रभ आहे त्याच प्रकारे जीवात्मा सुद्धा जन्म-जरादि किंवा स्वप्न-जाग्रदादींमध्ये सत्त्व, रज, तम वृत्तींतून गमन करीत असतो. तोच आत्मा मन अर्थात् अंतःकरण आहे. तो सत्त्वगुण, रजोगुण आणि तमोगुणरूपी निश्चय, विकल्प आणि अभिमानप्रधानत्रय वृत्तींमध्ये, विषयवासनांमध्ये, प्रकाश म्हणजे अविद्यासत्त्वविशेषांमध्ये आणि चंचलता व आवरण यांमध्ये रंगलेला असतो. त्यालाच जीव किंवा अणू असे म्हणतात. हा जीव किंवा अणूच मन, बुद्धी आणि अहंकाराच्या व्यापाराने युक्त चित्त आहे. शांभवपरामर्शात हा आत्मा भाव व अभावरूप जगताच्या स्वभावाचा असून तो ज्ञानरूप क्रियेत स्वतंत्र असतो. आत्म्याचे बोधसुधाब्धीबरोबर तादात्म्य असल्याकारणाने या स्थितीत आत्मा पूर्णाहंतेत प्रवेश करणारा असतो. चिदैकरूप आत्म्याचे उत्क्रमण अर्थात् जन्मांतरात किंवा देशांतरामध्ये गमन होत नाही. या अर्थानेच **"न तस्य प्राणा उत्क्रमन्त्यत्रैव समवलीयन्ते।।सुबालोपनिषद्।।३.३।।"** अर्थात् "त्याचे प्राण उत्क्रमित होत नाहीत अर्थात् बाहेर जात नाहीत तर येथेच लीन होतात," अशी श्रुती आहे. त्यामुळे **"चैतन्यमात्मा"।।१.१।।** अर्थात् "चैतन्य म्हणजे श्रीशिवांशी समवायसंबंधाने, अविनाभावाने, संघट्टरूपाने, अभिन्नपणे, अनवच्छेद्यपणे, अद्वयरूपाने आणि यामलरूपाने एकरसरूप, समरस व समव्याप्त असलेली कुंडलिनी शक्ती हीच आत्मा म्हणजे श्रीशिव होय." या सूत्राने सांगितलेल्या स्वभावभूत तात्त्विक स्वरूपाच्या प्रतिपादनाने येथे पूर्णात्माच लक्षित केला आहे.

शाक्तपरामर्शात रंगलेला हा आत्मा **"चित्तं मन्त्रः।।२.१।।,"** अर्थात् "चित्त म्हणजे श्रीशिवांशी समवायसंबंधाने, अविनाभावाने, संघट्टरूपाने, अनवच्छेद्यपणे, अद्वयरूपाने, यामलरूपाने एकरसरूप,समव्याप्त व समरस असलेली कुंडलिनी शक्तीच मंत्र किंवा मंत्रस्वरूप आहे म्हणजे अहंपरामर्शात मग्न होऊन आराधन करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याचे मन आहे."

आणव विमर्शामध्ये हा आत्मा मन, बुद्धी व अहंकाराच्या व्यापारांनी युक्त असे चित्त आहे.।।१।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

आता आणवोपायाचे प्रतिपादन करण्याची इच्छा करणारे सूत्रकार सर्वात आधी अणूचे स्वरूप "**आत्मा चित्तम्।।१।।**" अर्थात् "आत्मा म्हणजे श्रीशिवच चित्त म्हणजे त्यांच्याशी समरस व समव्याप्त असलेली कुंडलिनी शक्ती आहे," असे या सूत्रातून सांगत आहेत.

**विवरण :-** आणवोपाय म्हणजे पाशवव्यापार अर्थात् पशुविषयक म्हणजे जीवविषयक व्यापार अथवा व्यवहार होय. ज्यावेळेला हा विकल्प स्वसंस्कारासाठी दुसऱ्या उपायाची अपेक्षा करतो त्यावेळेला परिमित किंवा संकुचित स्वरूपाच्या बुद्धिप्राणादिकांना उपाय म्हणून स्वीकारून अणुत्व प्राप्त झालेला जीवात्मा आणवज्ञानाचा आविर्भाव करवितो आणि चित्ताच्या विश्रांतीने युक्त होतो.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**पूर्वं विसृज्य सकलं कर्तव्यं शून्यतानले।**
**चित्तविश्रान्तिसंज्ञोऽयआणवः परिकीर्तितः।।**

**अर्थ :-** शून्यत्व किंवा पोकळीरूप अग्नीमध्ये पूर्वीच्या सर्व कर्तव्यांचे म्हणजे करण्याजोग्या कर्मांचे विसर्जन करून चित्तात विश्रांती घेण्याच्या या उपायाला आणव असे म्हटले जाते.

हे जे विषयवासनेने गढूळ झालेले, विषयांच्या निश्चय, अभिमान व विकल्प यांच्या व्यापारात गुंतलेले आणि बुद्धी, अहंकार व मनोरूप चित्त आहे तेच "अतति" अर्थात् "अत सातत्यगमने" या धातूच्या अर्थानुरूप सतत गतीने युक्त असते. ते चिदात्मक स्वस्वरूपाच्या अज्ञानामुळे सत्त्वादि गुणवृत्तींचा आश्रय करून अनेक योनींमधून संचार करते म्हणून या चित्ताला म्हणजे श्रीशिवरूप चेतनपदावरून खाली उतरून अणुरूप किंवा जीवरूप धारण केलेल्या कुंडलिनी शक्तीलाच आत्मा असे म्हटले आहे.

**विवरण :-** प्रकाश म्हणजे ज्ञान, चंचलपणा आणि आवरण अर्थात् झाकणे आदि ज्यांचे कार्य आहे अशा सत्त्वादि गुणांच्या वृत्तींचा आश्रय घेऊन हे चित्त संचार करीत असते. सत्त्व हे लघुप्रकाशक असून ते बुद्धीचे कार्य आहे, रज हे चल उपष्टंभक असून ते मनाचे कार्य आहे आणि तम हे गुरू अर्थात् जड आवरक असून ते अहंकाराचे कार्य आहे. प्रकाश हा

बुद्धीचा व्यापार आहे, चंचलता हा मनाचा आणि आवरण हा अहंकाराचा व्यापार आहे; कारण ते स्वस्वरूपाला झाकून टाकते. त्यामुळे आत्म्याला अणू असे म्हटले आहे.

वास्तविक पाहता एकमात्र चैतन्य हेच स्वरूप असणाऱ्या आत्म्याची कोठेही गती असत नाही; कारण वास्तवात चैतन्यरूप आत्मा नित्यव्यापक व नित्यबुद्ध अर्थात् नित्य ज्ञानयुक्त असल्याने कोणत्याही अन्य देशादींमध्ये गमन करीत नाही. त्यामुळेच "**चैतन्यमात्मा।।१.१।।**" या सूत्रात श्रीशिव-शक्त्यात्मक असे स्वाभाविक तात्त्विक स्वरूप सांगण्याच्या आशयाने पूर्वी आत्मा सांगितला. या सूत्रातून याच आत्म्याचे संकोच, अवभासप्रधान आणि आणव असे स्वरूप सांगितले त्यामुळे पूर्वीच्या आणि आत्ताच्या सूत्रात कोणताही विरोध नाही.।।१।।

## विभूतिस्पंद नावाचा तृतीय प्रकाश

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

स्वरूपाचे प्रत्यभिज्ञान म्हणजे स्वरूपाची ओळख झाल्यानंतर मंत्रवीर्या-मुळे आणि सहजोदय झाल्यामुळे विभूती प्रकट होतात. आता त्या विभूतीच येथे सांगण्यात येणार आहेत.।।१।।

पूर्व आणि अपर विचाराने साधकभक्तयोगिशिष्याच्या ठिकाणी ज्ञान अथवा बोध प्रकट होतो. त्याच्या विकासामुळे तो साधकभक्तयोगिशिष्य स्वतः निरंतर परमानंदरूप होतो.।।२।।

त्यामुळे अखंडित स्वातंत्र्यशक्तिरूप स्वाभाविक आणि स्फुट विभूती त्याला प्राप्त होते. याविषयी श्रीशिवांनी एक खंडच सांगितला आहे.।।३।।

त्यापैकी पहिल्यांदा चित्तात्म्याच्या प्रत्यवेक्षणासाठी म्हणजेच ज्ञानासाठी पहिले "**आत्मा चित्तम्।।१।।**" अर्थात् "ज्यावेळी आत्मा म्हणजे श्रीशिव हेच चित्त म्हणजे कुंडलिनी चितिशक्तिरूपाने चित्पदावरून खाली उतरून चैतन्याचा म्हणजे स्वतःचा संकोच करतात त्यावेळी ते चित्त या नावाने ओळखले जातात," हे या सूत्राने सांगतात.।।३.५।।

शास्त्रामध्ये सर्वत्र चित्ताला मनाचा पर्याय म्हणून सांगितले आहे. इंद्रियत्वा-मुळे म्हणजेच मन हे इंद्रिय असल्यामुळे ते ज्यावेळेला संकल्पाने म्हणजेच इच्छा, हेतू, उद्देश, विचार, कल्पना अथवा निश्चयात्मक ज्ञानाने युक्त होते त्यावेळेला त्याला मंत्र असे म्हटले जाते.।।४-४.५।।१।।

**विवरण :-** मनाच्या बहिर्मुख अवस्थेत केलेला विचार म्हणजे संकल्प

होय; तर अंतर्मुख अवस्थेत केला जाणारा विचार म्हणजे स्वात्ममननयुक्त अर्थात् आत्म्याचे मनन करतो म्हणून मंत्र होय. मनाच्या अंतर्मुख अवस्थेत विक्षेपांचा म्हणजेच अडथळ्यांचा अभाव असल्याकारणाने ते संकुचित चैतन्यत्वाचा अंगिकार करते. त्यावेळी ते चित्त म्हणजे तो मंत्र इंद्रियांच्या अधीन नसल्यामुळे त्याची ज्ञान व क्रिया अविरुद्ध म्हणजे कोणीही न अडविलेली अशी असते. त्या बलाने तो सिद्धयोगी श्रीशिवांप्रमाणे यथेच्छ रीतीने पृथ्वी, वायू व अग्नी इत्यादि भूतांची अपेक्षा न करता त्याने संकल्पिलेली वस्तू सर्व माणसे पाहू शकतील अशा प्रकारे म्हणजेच सगळ्यांच्या समोर उत्पन्न करू शकतो. अयुक्त म्हणजेच अयोगिलोकांच्या अशा प्रकारच्या संकल्पादि गोष्टी इतर लोकांना न पाहता येणाऱ्या म्हणजेच अबाह्यप्रकाशित असतात; परंतु सिद्धयोग्याचे मंत्रादि सुद्धा श्रीशैवविशिष्टगुणांमुळे जे काही कठीण पदार्थ आहेत तेही प्रकट करण्याला समर्थ असतात असा याचा आशय आहे.

ज्यावेळेला आत्मा वाणी इत्यादींनी रहित असतो त्यावेळेला त्याला चित्त असे म्हणावे.।।५।।

ज्यावेळेला ते चित्त फक्त संकल्पानुरूप कार्य करते त्यावेळेला त्याला मंत्र म्हणावे.।।५.५।।

त्याच्या म्हणजे मंत्राच्या स्वरूपाकडे पाहता संकल्पसिद्धी होत नाही असे दिसून येते.।।६।।१।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**आत्मा चित्तम्।।१।।**" अर्थात् हे जे विषयांच्या वासनांनी भरलेले किंवा इच्छांनी युक्त, एखाद्या गोष्टीचा निश्चय करणे इत्यादि कार्ये करणारे आणि बुद्धी, अहंकार व मनोरूप चित्त आहे तेच सत्त्वादि वृत्तींचा अवलंब करून म्हणजेच सत्त्वादि वृत्तींचा आधार घेऊन अनेक योनींमध्ये संचरण करते म्हणजे त्यांना व्यापून टाकते. "हे चित्त म्हणजे आत्मा होय." हा आत्मा अणू आहे.।।१।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

आता क्रमाने आणवोपायाचे प्रतिपादन करीत असताना अणूचे अत्यंत संकुचित व मर्यादित असे स्वरूप "**आत्मा चित्तम्।।१।।**" अर्थात् "आत्मा म्हणजे श्रीशिवच चित्त म्हणजे शक्ती आहेत," असे या सूत्राने सांगतात.

विशेष भोग असे जे शब्दस्पर्शादि विषय असतात त्यांच्या वासनांमुळे

मलिन होणारे आणि त्यांच्या विषयींचा निश्चयादि करण्यामध्ये प्रवृत्त होणारे, सत्त्व, रज आदि वृतींना आधार असलेले, बुद्धी, अहंकार व मन या तीनही रूपाचे असे जे चित्त ते सांगितलेल्या चैतन्यस्वरूपाचा विचार करीत नाही आणि त्या त्या कर्मानुसार अनेक योनींमध्ये जाऊन त्यांना व्यापून टाकते म्हणून त्यालाच आत्मा असे म्हटले आहे व त्या आत्म्यालाच अणू असे म्हटले आहे.।।२ ते ४।।

संविद्रूप अर्थात् ज्ञानरूप आत्म्याला व्यापणारा असा व्यापक दुसरा कोणीही नाही. तोच सर्वांना व्यापून राहणारा आहे. म्हणून चैतन्य हेच आत्मा आहे.।।५।।

त्यामुळे बुद्धिक्रियात्मक व विश्वोत्पत्तीच्या स्वभावाचे असणे हे आत्म्याचे तात्त्विक रूप आहे.।।५.५।।

या आत्म्याच्या स्वातंत्र्याने अवभासित होत असल्याने आणि संकुचित व अणुत्व अर्थात् अल्पत्व असल्याने चित्तालाच आत्मा म्हटले आहे. त्यामुळे पूर्वी सांगितलेले व आता सांगितलेले या दोन विवेचनात विषमता नाही असे समजावे.।।६ ते ७।।१।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

आता ग्रंथकार आणवोपायाचे क्रमशः विवेचन करून अत्यंत संकुचित किंवा मर्यादित अशा अणूचे स्वरूप "**आत्मा चित्तम्।।३.१।।**" या सूत्राने निरूपण करीत आहेत. "निरंतर किंवा सतत विषयांच्या वासनांनी भरलेले, निश्चयादि व्यापारांनी युक्त असणाऱ्या बुद्धी, अहंकार व कर्तृत्व यांनी युक्त असे मनोरूप जे चित्त असते तोच आत्मा होय." तो आत्मा चिदात्मक अर्थात् चैतन्ययुक्त अशा स्वस्वरूपाचे ज्ञान न झाल्यामुळे प्रकाश, चंचलता आणि आवरण किंवा अज्ञान हे विशेष असणाऱ्या सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांच्या कर्तृत्वाच्या वृत्तींचे अवलंबन करून नाना योनींमध्ये भटकत राहतो. त्यामुळेच आत्म्याला अणू अथवा संकुचित प्रमाता किंवा जीव असे म्हटले आहे. आणवोपाय अर्थात् आणव म्हणजे अणुविषयी म्हणजे पशूविषयक म्हणजेच अज्ञानी जीवांविषयक व्यापार अथवा व्यवहार होय. ज्यावेळेला हा विकल्प स्वसंस्कारासाठी निरनिराळ्या किंवा अन्य उपायांची अपेक्षा करतो त्यावेळेला परिच्छिन्न अर्थात् मर्यादित किंवा संकुचित स्वरूपाच्या बुद्धिप्राण-प्रभृतींचा उपाय म्हणून स्वीकार करून अणुत्वाला प्राप्त झालेला आत्मा आणव ज्ञानाचे जे प्रकटीकरण करतो ते ज्ञानच त्याला चित्तविश्रांतियुक्त होते.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**पूर्वं विसृज्य सकलं कर्तव्यं शून्यतानले।**
**चित्तविश्रान्तिसंज्ञोऽयमाणवः परिकीर्तितः।।**

**अर्थ :-** शून्यत्व किंवा पोकळीरूप अग्नीमध्ये पूर्वीच्या सर्व कर्तव्य म्हणजे करण्याजोग्या कर्मांचे विसर्जन करून चित्तात विश्रांती घेण्याच्या या उपायाला आणव असे म्हटले जाते.

वास्तविक पाहता, चित्स्वरूप आत्म्याचे कधीही पतन होऊ शकत नाही; कारण तो नित्यशुद्धबुद्धस्वरूपाचा असून निष्क्रियतेने युक्त असतो. आत्म्याला निष्क्रिय म्हणण्याचे कारण असे आहे की, उत्तरदेशाशी म्हणजेच ज्या ठिकाणी आत्मा आहे त्यापासून दुसऱ्या ठिकाणी संयोग अथवा संबंध येण्यासाठी अनुकूल अशा व्यापाराचा म्हणजेच क्रियेचा त्याच्या ठिकाणी अभाव असल्याने कोणत्याही अन्य स्थानी त्याची गती होऊच शकत नाही. त्यामुळेच "**चैतन्यमात्मा।।१.१।।**" अर्थात् "चैतन्य म्हणजे कुंडलिनी शक्तीच आत्मा म्हणजे श्रीशिव आहे," या पहिल्या उन्मेषातल्या पहिल्या सूत्राने आत्म्याचे वास्तविक म्हणजेच यथार्थ स्वरूप सूत्रकारांनी सांगितले आहे. परंतु आता जरी सूत्रकार या आत्म्याचे संकोच व अवभास हे आणवदशेमुळे प्राधान्याने असणाऱ्या दशेचे औचित्यपूर्वक निरूपण करीत असले तरी त्यांचा पूर्वीच्या मताशी विरोध आहे अशी शंका घेऊ नये.।।१।।

**विवरण :-** आणवोपायालाच तिसरा उन्मेष असे म्हटले आहे. त्यामुळे या उन्मेषाला निम्नस्तरीय म्हणजे खालच्या पातळीवरचा उन्मेष असेच समजले पाहिजे. आत्मतत्त्वातून चैतन्यभावाचा उन्मेष अर्थात् विकसन किंवा उमलणे हा प्रथम उन्मेष आहे. चैतन्यभावातून उदित झालेली शक्ती हा दुसरा उन्मेष होय व चैतन्यभावाचे चित्ताशी तादात्म्य झाल्यावर अहंभावाचे अणुत्व अर्थात् व्यष्टिरूपाने उदय होणे हा निम्नस्तरावरचा तिसरा उन्मेष आहे. शक्तिपाताशिवाय ज्या साधनक्रमाद्वारा या अणुत्वभावातून वरच्या अवस्थेत जाता येते, त्याला "**आणवोपाय**" असे म्हणतात.

कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यानंतर शाक्तोपाय आणि शांभवोपाय यांचे उत्थान होते हे आधी सांगितलेलेच आहे; परंतु बहुसंख्य साधक असे आहेत की, जे कुंडलिनीच्या जागरणाविषयी सर्वथा अपरिचित असूनही कोणत्या ना कोणत्यातरी आध्यात्मिक साधनात मग्न असतात. त्यांच्यासाठीच आणवोपाय सांगितलेला आहे. असेही पाहण्यात आले आहे की, योग्य श्रीसद्गुरूंकडून

शक्तिपातरहित साधन घेऊन त्याचे योग्य विधीनुसार अनुष्ठान केल्यास काही अंशांमध्ये कुंडलिनी शक्ती जागृत होते आणि योग्य वेळ येताच सिद्ध श्रीसद्गुरू मिळतात. असेही अनुभवाला आलेले आहे की, देवताही समोर उभ्या राहून साधकभक्तयोगिशिष्यांवर अनुग्रह करतात. जरी साधन करता करता कुंडलिनी शक्तीची जागृती झाली नाही तरीही आणवोपायाची साधना व्यर्थ जात नाही. त्याच्यामुळे अंतःकरणाची शुद्धी तर होतेच होते.

आणवभावात चित्त आणि आत्मा या दोघांचेही तादात्म्य होत असल्याने साधक चित्तालाच आत्मा समजतो. चित्तावर पडलेल्या आत्म्याच्या चैतन्य-प्रकाशाला तो भिन्न किंवा वेगळा समजत नाही. ज्याप्रमाणे सोन्यावर सूर्याचे किरण पडल्याने जे तेज पाहावयाला मिळते ते तेज सोन्याहून वेगळ्या असणाऱ्या प्रकाशामुळे असते, सोन्यामुळे असत नाही. प्रकाशाअभावी ते तेज दृष्टीगोचर होत नाही; परंतु सामान्य मनुष्य सोन्याच्या तेजाला सोन्या-हून वेगळे समजत नाही. हे तादात्म्य काही अंशांपर्यंत शाक्तोपाय आणि शांभवोपायातही राहिलेले असते; परंतु शांभवोपायात आत्म्याला "**चैतन्यं आत्मा।।१.१।।**" असे म्हणून साधकाचे लक्ष्य चित्तावरून काढून घेऊन चित्तावर प्रतिभासित होणाऱ्या आत्म्याच्या चैतन्यप्रकाशाकडे अर्थात् सोन्याच्या तेजाप्रमाणे असलेल्या प्रकाशाकडे वळविण्यात आले आहे.

वास्तविक पाहता आणवोपायाच्या साधकालाही अंततः आत्मज्ञान प्राप्त करण्यासाठी शांभवोपायाच्या लक्ष्यापर्यंत पोहोचावे लागते. त्यामुळेच या दोन्हीही उपायांच्या साधनांमध्येच फरक आहे, लक्ष्य अथवा अंतिम ध्येयामध्ये कोणताही फरक नाही. कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यानंतर चित्ताला आत्मा मानणारा साधकही आपल्या अंतरात एका चैतन्यमय शक्तीचा अनुभव करू लागतो व हा अनुभव त्याच्या दृष्टिकोनात परिवर्तन करण्याला पर्याप्त असतो.

येथे हा ही विचार करण्याजोगा विषय आहे की, चित्त म्हणजे काय? कारण त्याचे नाव छत्तीस तत्त्वांमध्ये कोठेही येत नाही. वरती पाच कला सांगितलेल्या असून त्यांच्या अंतर्गत छत्तीस तत्त्वे अथवा सांख्यांची चोवीस तत्त्वे सांगितली आहेत. ती समष्टिब्रह्मांडाशी संबंधित आहेत. "**ऐतरेयोपनिषद्**" या ग्रंथात समष्टीतून व्यष्टीत येण्यासाठी लोक आणि लोकपालांचे वर्णन आहे. उदाहरणार्थ श्रीब्रह्माच्या मुखातून वाणीचा उदय झाला आणि त्यातून अग्नीचा, नासिकेतून प्राणाचा आणि प्राणातून वायूचा, दृष्टीतून चक्षूचा आणि चक्षूपासून आदित्याचा, हृदयातून मन आणि मनातून चंद्राचा उदय झाला

इत्यादि. पुराणांमध्ये आणखी विस्ताराने याचे वर्णन केले आहे. हे सर्व ब्रह्मांडाच्या सृष्टीचे वर्णन आहे. त्याच्यापुढे असे म्हटले आहे की, अग्नीच वाणी बनला आणि त्याने नासिकेत प्रवेश केला, आदित्याने चक्षू बनून दृष्टीत प्रवेश केला आणि चंद्राने मन बनून हृदयात प्रवेश केला, इत्यादि.

अंतःकरणचतुष्टयाची मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार ही चार कार्ये आहेत. अन्य शास्त्रकारांनुसार महत्तत्त्वापासून बृहस्पती, बृहस्पतीपासून व्यष्टीची बुद्धी, समष्टी अहंकारापासून सगुण श्रीशिव, सगुण श्रीशिवांपासून व्यष्टीचा अहंकार आणि सगुण श्रीविष्णूंपासून चित्त इत्यादींची उत्पत्ती होते. श्रीब्रह्मा, श्रीविष्णू आणि श्रीशिव या त्रिमूर्तींना मायेच्या अंतर्गत मानले असून ते सत्त्वगुण, रजोगुण आणि तमोगुण यांचे अधीश्वर आहेत. यावरून असे अनुभवावयाला येते की, चित्त व्यष्टीचे अंग आहे आणि त्याला समष्टि-महत्तत्त्वाचा अणू असे समजले पाहिजे. त्यामुळेच आणवमल व्यष्टिस्तरावरच असतो. समष्टीत नाही. त्यामुळे चित्ताला आत्मा मानणे म्हणजे आणव मलाने आवृत होणे आहे. चित्तच मन, बुद्धी व अहंकार या तिघांची पृष्ठभूमी आहे. या चित्तातच सर्व संस्कार साठून राहतात. त्यामुळेच "**श्रीपातंजल-योगदर्शन**" या ग्रंथात "**योगश्चित्तवृत्तिनिरोधः।।१.२।।**" अर्थात् "चित्ताच्या म्हणजे बहिर्मुख झालेल्या कुंडलिनी शक्तीच्या सर्व भोगाकांक्षावासनाइच्छा-तृष्णासंकल्पनादि संसारोन्मुख वृत्ती अंतर्मुख होऊन व ही कुंडलिनी शक्ती सुषुम्नागामी होऊन अंतिमतः सहस्रारात श्रीशिवांशी समरस होणे हाच योग होय," असे मुख्य साधन मानले आहे.

"**आत्मा चित्तम्।।३.१।।**" अर्थात् "आत्मा म्हणजे श्रीशिवच चित्त म्हणजे कुंडलिनी शक्ती होय." याचाच अर्थ असा आहे की, चिच्छक्तिरूप साधकाने स्वतःला श्रीशिवरूपाहून वेगळे मानता कामा नये. ऋषी असे म्हणतात की, व्यक्ती जशी स्वतःला मानते तशीच ती होत जाते. मान्यताच हळूहळू जीवन बनते. एखादा मनुष्य वाईट असला तरीही त्याला वाईट म्हणू नये; कारण जर सतत त्याला तू वाईट आहेस, तू वाईट आहेस असे म्हणत राहिले तर त्याच्यासाठी तोच मंत्र बनून जातो. जर सर्व लोक म्हणू लागले की, तू वाईट आहेस तर तो मनुष्यही मी वाईट आहे असे म्हणू लागतो; मग तो तसे नुसते म्हणतच नाही तर ही सर्वांची अपेक्षा सिद्ध करून दाखविण्याच्या मागे लागतो. हळूहळू ही वाईटाची त्याला सवय लागते. त्यामुळेच जुन्या लोकांनी जीवनाची परम सत्ता हाच मंत्र व्हावा म्हणून "**आत्मा चित्तम्।।१।।**"

अर्थात् "आत्मा म्हणजे श्रीशिवच चित्त म्हणजे जीवरूप कुंडलिनी शक्ती आहे," असे सांगितले आहे. जसजसे तुम्ही हा मंत्र जपत जाल तसतसे तुम्ही परमात्मा होण्याच्या मार्गाला लागाल. हा या सूत्राकडे पाहण्याचा विद्वांनाचा एक दृष्टिकोन आहे.

याच सूत्राविषयी आणखीही एक मत असे आहे की, आणवोपाय अथवा आणवयोग हा अणूशी संबंधित आहे. अणू म्हणजे एक बिंदू अथवा अनुभवावयाला येणारा "स्व" होय. त्यामुळेच पहिल्या सूत्रात अणूच्या स्वरूपाची व्याख्या करण्यात आली आहे.

चित् अथवा वैश्विक चैतन्य हे प्रकटीकरणाच्या प्रक्रियेत संकोच पावते आणि बुद्धी, मन व अहंकार यांनी युक्त असे चित्त बनते. हे चित्त त्याच्या ज्ञानेंद्रियांपासून आनंद मिळविण्याच्या इच्छेमुळे सापेक्ष बनते. बुद्धी ही प्राधान्याने सत्त्वगुणापासून, मन हे राजसगुणापासून आणि अहंकार हा तामसगुणापासून बनलेला आहे. हे चित्त किंवा अणू या संदर्भात आत्मा म्हणविले जाते. बुद्धी, मन आणि अहंकार यांच्या साहाय्याने हे चित्त एका अस्तित्वाच्या स्वरूपातून दुसऱ्या स्वरूपात हिंडत राहते. (अतति।) चित्त हे अणू अथवा आत्मा म्हणजेच वैयक्तिक "स्व" आहे. त्यामुळे आणवोपाय हा बुद्धी, मन आणि अहंकार यांच्याशी संबंधित आहे.

श्रीभास्कराचार्यांनी या सूत्राचे एक वेगळे स्पष्टीकरण दिले आहे. त्यांच्या मताप्रमाणे चित्त आणि मन हे समानार्थी आहेत. ज्यावेळेला मन बहिर्मुख होते त्यावेळेची मानसिक प्रक्रिया म्हणजे संकल्प होय. ज्यावेळी मन अंतर्मुख होते आणि "स्व"वर प्रतिबिंबित होते त्यावेळी त्याचे जे प्रतिबिंबन होते ते म्हणजेच मंत्र होय. ज्यावेळेला मन आतमध्ये वळते त्यावेळेलाच ते "स्व"च्या स्वरूपाचे नीट ग्रहण करू शकते; परंतु हे स्पष्टीकरण सूत्रातील शब्दांमधून निर्माण झालेले आहे असे वाटत नाही.।।१।।

## सूत्र क्रमांक २

**संबंध :-** चित्ताच्या बंधनाचे कारण पुढील सूत्रात सांगितले आहे.

**ज्ञानं बन्धः।।२।।**

**शब्दार्थ :- ज्ञानम्** - श्रीशिवरूप चेतनपदावरून खाली उतरून संकुचित व बहिर्मुख झालेल्या कुंडलिनी शक्तिरूप चित्तापासून उत्पन्न होणारे ज्ञान किंवा सत्त्व, रज व तमरूप विषयवासनेचे ज्ञान. **बन्धः** - भेदप्रथामय असल्यामुळे बंधनाचे किंवा संसाराचे कारण.

**अर्थ :-** मन, बुद्धी व अहंकार यांचा समुच्चय असलेल्या चित्तापासून म्हणजे बहिर्मुख व संसारोन्मुख कुंडलिनी शक्तीपासून कामोपभोगाकांक्षाविषयवासनातृष्णाइच्छासंकल्पनादींचे होणारे ज्ञान हे संसारबंधनाचे मूळ कारण आहे किंवा सत्त्व, रज व तमरूप विषयवासनेचे ज्ञान हे भेदप्रथामय असल्यामुळे बंधनकारक होते.।।२।।

**विशेष व्याख्या :-** सत्त्वगुण, रजोगुण आणि तमोगुणांच्या विषयवृत्तींनी युक्त जीव विषयवासनांमध्ये रंगलेला असतो. त्यामुळे त्या जीवात्म्याला भेदमयज्ञानामुळे सुख-दु:ख, राग-द्वेष आणि मोह आदि गोष्टींमध्ये निश्चय आणि विकल्पात अभिमान होतो. त्यामुळे भेदप्रथेचे ज्ञानच जीवाला बंधनात टाकून ते त्याला जन्ममरणाच्या चक्रातील यातनादेह धारण करविते.।।२।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

या चित्तस्वरूप संकुचित किंवा अणू अशा आत्म्याचे ज्ञान बंधाला कारणीभूत होते असे "**ज्ञानं बन्धः।।२।।**" अर्थात् "संकुचित ज्ञान म्हणजे अज्ञान हे बंधनाला कारण होते," असे या सूत्रात कथन केले आहे.

आनंद किंवा सुख, दु:ख आणि मोह यांनी युक्त बुद्धी, निश्चयविकल्पअभिमानादि गुणवृत्तिरूप भेददर्शक ज्ञानआणि अहंकारांचे प्रकार त्याचप्रमाणे वरील प्रकारांना समर्पक असणारा भेदाचा आभास यांनी अणुयुक्त आत्म्याचे ज्ञान रचले जाते. हेच संकुचित ज्ञान बंधनकारक ठरत असते. या बंधात अथवा पाशात बांधले गेल्यामुळेच हा पशू अथवा अणुयुक्त आत्मा संसारात फिरत राहतो.

यासंबंधी "**श्रीतंत्रसद्भाव**" या तंत्रग्रंथात असे म्हटले आहे की -

**सत्त्वस्थो राजसस्थश्च तमस्थो गुणवेदकः।**
**एवं पर्यटते देही स्थानात्स्थानान्तरं व्रजन्।।**

**अर्थ :-** सत्त्व, राजस आणि तामस या गुणांमध्ये राहणारा आणि इंद्रिये जी सूचना देतील तेवढेच जाणणारा हा देही म्हणजेच शरीर धारण करणारा जीव एका स्थानाहून दुसऱ्या स्थानी जात भटकत राहतो.

हीच कल्पना "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील खालील स्पंदकारिकांमध्ये परत एकदा सांगितली आहे.

**तन्मात्रोदयरूपेण मनोऽहम्बुद्धिवर्तिना।**
**पुर्यष्टकेन संरुद्धस्तदुत्थं प्रत्ययोद्भवम्।।४.४९।।**
**भुङ्क्ते परवशो भोगं तद्भावात्संसरत्यतः।**

**संसृतिप्रलयस्यास्य कारणं सम्प्रचक्ष्महे।।५०।।**

**अर्थ :-** पशुभावामध्ये अडकलेले श्रीशिव मन, अहंकार आणि बुद्धी यांच्याप्रमाणे असणाऱ्या आणि तन्मात्रांपासून उत्पन्न होणाऱ्या पुर्यष्टाकाने बांधले गेलेले आणि त्यांच्यापासून उत्पन्न होणाऱ्या प्रत्ययांच्या म्हणजेच अनुभवांच्या मधून उत्पन्न होणाऱ्या भोगांना परवश अर्थात् दुसऱ्याच्या ताब्यात असणारे होऊन भोगतात आणि त्यामुळे ते जन्ममरणचक्रात फिरत राहतात. त्यामुळे त्यांचे हे संसरण किंवा संसारचक्र कसे नष्ट होईल? याचे स्पष्टपणे वर्णन करीत आहे.

याचा अर्थच असा आहे की, पशुभावामध्ये अडकलेले श्रीशिव तन्मात्राच्या रूपाचे सूक्ष्म पुर्यष्टक, त्यांचे कार्यरूप स्थूल पुर्यष्टक तसेच मनस्, अहंकार आणि बुद्धी यांच्या द्वारा परामर्श केल्या जाणाऱ्या पुर्यष्टकाच्या बंधनात पडलेले आहेत. पुर्यष्टकापासून "**प्रत्ययोद्भवाचा**" अर्थात् सुखात्मक किंवा दुःखात्मक संवेदनांचा जन्म होत असतो.।।४९।।

तो जीव परवश किंवा परावलंबी बनून संसारामधील भोग भोगीत असतो. पुर्यष्टकामुळेच असा जीव पुनःपुन्हा जन्मतो व पुनःपुन्हा मरतो. यामुळे संसृतीच्या या गोंधळाला एकाच वेळी नाहीसे करणाऱ्या कारणाचे किंवा उपायाचे वर्णन पुढील सूत्रामध्ये करीत आहोत.।।५०।।

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात हे चक्र नष्ट होण्यासाठी उपाय सुचविला आहे.

**विवरण :- तन्मात्रोदयरूप :-** तन्मात्रा या स्थूलभूतांचे कारण असून त्या श्रीईश्वराच्या इच्छेनेच अवभासित होणाऱ्या सूक्ष्म शब्दादि होत. त्यांचा उदय म्हणजे स्थूलशरीरात परिणत पावणाऱ्या अवकाशादि म्हणजे पोकळी इत्यादि रूपांनी होणारी अभिव्यक्ती होय. त्याप्रमाणे देहातील शिरा, नाडी, इत्यादि जे पोकळीच्या स्वरूपाचे आहेत ते शब्दतन्मात्रा होय. जे जे क्रियायुक्त आहे ते ते प्राणादि वायू असून तो स्पर्शतन्मात्रेचा उदय होय. जे जे उष्ण, प्रकाशमान, अग्न्यादि आहे ते ते तेज असून तो रूपतन्मात्रेचा उदय होय. जे जे द्रवरूप रक्त आदि आहे ते ते आप अर्थात् जल असून तोच रसतन्मात्रेचा उदय आहे. जे जे कठीण मांस, हाडे, अवयवादि आहे ती ती पृथ्वी असून तोच गंधतन्मात्रेचा उदय आहे. अशा प्रकारे तन्मात्रोदय स्थूलाकार होतो. त्या तन्मात्रोदयाने मन, अहंकार व बुद्धी या अंतःकरणरूपाने अनुभव किंवा अनुभूयमान अर्थात् अनुभवाला येणाऱ्याला आत्मलाभ होतो आणि हा

अनुभव अंतःकरणनिविष्ट अर्थात् अंतःकरणात स्थिर होतो. मनात रजोगुणाचा उदय, अहंकारात तमोगुणाचा उदय व बुद्धीत सत्त्वगुणाचा उदय होऊन गुणानुरूप व्यवहार होतो. सूक्ष्मशरीरात पाच तन्मात्रा आणि तीन गुण आहेत. हेच अष्टक स्थूलशरीराचे कारण आहे. त्याच्या कार्यत्वामुळे स्थूल शरीर होते. या स्थूल शरीराने अडविलेला, तेवढ्यापुरताच शरीराला आत्मत्वाने मानणारा, आपले सर्वात्मकत्वादि स्वसामर्थ्य विसरणारा आणि त्यामुळे बद्ध झालेला जीव त्यामुळेच परवश अर्थात् परतंत्र होतो. तो आपले सर्वशक्तित्व विसरून आपली इष्टार्थसिद्धी अर्थात् हव्या त्या वस्तूची उपलब्धी इतर कारणांच्या म्हणजे पुर्यष्टकाच्या आधीन आहे असे समजून मायाभासित, आपल्या अनादिकर्माने बनलेले व वासनानुरूप सुखादिसंवेदनरूपाने परिणत झालेले भोग भोगतो. त्यामुळे या विषयांचा भोक्ता मी आहे असा तो अभिमान धरतो. त्यामुळे स्थूलसूक्ष्मात्मक पुर्यष्टक पूर्ण ज्ञात होत नसल्यामुळे पुर्यष्टकाचा निरास न होता जीवाला संसरण करावे लागते म्हणजेच जन्ममरणरूप फेऱ्यात पडावे लागते अर्थात् कर्माप्रमाणे भ्रमण करीत अनेक शरीरे घ्यावी लागतात. याच कारिकेत भोक्तृत्वाभिमान हा जीवाच्या संसृति अर्थात् जन्ममरणरूप संसाराचे कारण आहे, याचे निराकरण केले आहे.।।२।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१) पुर्यष्टक :-** आठ तत्त्वांचे नगर म्हणजेच पाच तन्मात्रा अर्थात् महाभूतांचे सूक्ष्म रूप, शब्दतन्मात्रा म्हणजे तेवढाच शब्द, स्पर्श तन्मात्रा म्हणजे तेवढाच स्पर्श, रूपतन्मात्रा म्हणजे तेवढ्यापुरतेच रूप, रसतन्मात्रा म्हणजे तेवढाच रस, गंधतन्मात्रा म्हणजे तेवढाच गंध आणि तीन मानस तत्त्वे मन, बुद्धी आणि अहंकार हे मिळून हे पुर्यष्टक होते. पुर्यष्टक हा शब्द सूक्ष्म शरीराचा समानार्थी आहे.

**२)** प्रत्यय म्हणजे कल्पना होय; परंतु हा शब्द येथे एका तांत्रिक दृष्टिकोनातून वापरला आहे. "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील स्पंदकारिकेच्या तिसऱ्या निष्यंदातील चौदाव्या कारिकेत प्रत्ययाची खालीलप्रमाणे व्याख्या केली आहे.

"**स च तन्मात्रगोचरः।।**" अर्थात् "तो प्रत्यय तन्मात्रगोचर म्हणजेच तन्मात्रांना जाणविणारा आहे." तन्मात्रगोचर याचे स्पष्टीकरण करताना असे म्हटले आहे की, "**शब्दादिविषयः।।**" अर्थात् "शब्दादि विषयांचा विषय होय." त्याचे आणखी स्पष्टीकरण देताना असे म्हटले आहे की, "**श्रोत्रादिद्वारेण**

**विषयदर्शने ज्ञानोत्पत्तिः।।"** अर्थात् "कान इत्यादि इंद्रियांकडून त्यांच्या त्यांच्या विषयांचे दर्शन झाले असता होणारे ज्ञान होय," म्हणजेच कानाने आई हा शब्द ऐकला असता त्या पदाला अनुसरून जी व्यक्ती अथवा अर्थ साकार होतो ते आई या शब्दाचे ज्ञान होय.

अनेक कल्पनांना एकत्र केल्यावर प्रत्यय या शब्दाची व्याख्या कदाचित् अशी करता येईल की, इंद्रियजन्य अर्थात् इंद्रियांकडून निर्माण होणाऱ्या आणि शब्दांनी ताब्यात ठेवलेल्या कल्पना होत आणि त्या मनुष्याला बाह्य जगतातील वस्तू उपभोगण्यासाठी प्रवृत्त करतात. प्रत्यय म्हणजे विकल्प असाही एक अर्थ होतो. विकल्प हा शब्द वि-क्लृप् संशय घेणे, प्रश्न करणे, तर्क करणे, विचार करणे, योजणे, ठरविणे, नेमणे, मानणे व कल्पिणे हे अनेक अर्थ असणाऱ्या धातूपासून बनला आहे.।।२।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

चित्ताची संकल्पसिद्धी कोणत्या कारणामुळे होत नाही हे **"ज्ञानं बन्धः।।२।।"** अर्थात् "संकुचित ज्ञान म्हणजे अज्ञान हे बंधनाला कारण होते," असे म्हणून ते कारण या सूत्रात श्रीशिवांनी सांगितलेले आहे.।।६.५।।

शब्दादि विषयांना चिकटून राहिल्यामुळे होणारी रागादींची जाणीव असे ज्ञानाचे लक्षण आहे. तीच जाणीव चित्ताच्या "स्व"रूपाला झाकून टाकणारा बंध आहे.।।७-७.५।।२।।

**विवरण :-** लोभादिकांनी विषयात आसक्त असणारे हे चित्त, रज व तम या गुणांनी युक्त झाल्यामुळे विक्षिप्त होते. त्यामुळे आत्मस्वरूपाकडे जाण्याचे बल त्याला प्राप्त होत नाही आणि आत्मस्वरूपावरचे आवरण तसेच राहते. या कारणांमुळे ते सामान्य संकल्पित वस्तू निर्माण करू शकत नाही. या गोष्टीवरून विषयासक्तीच निर्मितीला प्रतिबंधक आहे असा अर्थ निघतो.

ज्यावेळेला या चित्ताला आंतर आणि बाह्य विषयांबद्दल अनासक्ती निर्माण झाल्यामुळे आणि अभ्यासपटुत्वामुळे ज्ञातृत्व प्राप्त होईल त्यावेळेला तो द्रष्टा म्हणजेच त्या चित्ताचा मालक अर्थात् साधकभक्तयोगिशिष्य मुक्तच होईल.।।८-८.५।।२।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"ज्ञानं बन्धः।।२।।"** या सूत्रासंबंधी "**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सत्त्वस्थो राजसस्थश्च तमस्थो गुणवेदकः।**

**एवं पर्यटते देही स्थानात् स्थानान्तरं व्रजेत्।**

**अर्थ :-** सत्त्व, रज आणि तम या गुणांमध्ये राहणारा व गुणांचा ज्ञाता असणारा देही म्हणजेच जीव एका स्थानापासून दुसऱ्या स्थानापर्यंत संचार करीत असतो.।।२।।

(हे विवरण पहिल्या सूत्राशी निगडीत असावे किंवा गुणांचा ज्ञाता आत्मा असल्याने दुसऱ्याचेही असावे.)

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**ज्ञानं बन्धः।।२।।**" अर्थात् "या चित्तस्वरूपी देहादि आत्मरूप अणूचे ज्ञान हा बंध होय." चित्त हे अंतःकरणात सुखादि वेद्य पदार्थांविषयीच्या व्यवहारवृत्तीने युक्त असते.।।८।।

आणि बाह्यदृष्ट्या रूपरसादि देहेंद्रियांच्या विषयांकडे जाण्याला प्रवृत्त झालेले व भेदाच्या आभासाने युक्त असे या अणुरूपाचे ज्ञान हेच बंधनरूप होय.।।९।।

ते ज्ञान अर्थात् बहिर्मुखज्ञान म्हणजे अज्ञान जीवाला बांधत असल्यामुळे किंवा अडकवून ठेवीत असल्यामुळे हा अणू म्हणजे जीव जन्ममरणरूप संसारचक्रात दृढपणे फेकला जातो.।।९.५।।२।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

अणुरूप आत्म्याचे बंधन "**ज्ञानं बन्धः।।२।।**" या सूत्रात सांगितले आहे. सुख, दुःख, मोह म्हणजे अज्ञान, निश्चय, विकल्प म्हणजे विचार व अभिमान इत्यादि प्रवृत्ती त्याचप्रमाणे त्यांना योग्य असे भेदावभास अर्थात् भेदाचे आभासन करविणाऱ्या म्हणजेच "स्व" रूपाहून इतर पदार्थ भिन्न आहेत असे द्वैत दाखविणाऱ्या रूपाचे जे ज्ञान आहे तोच अणुरूप आत्म्याचा बंध होय. या अशा प्रकारच्या बंधनात बांधला गेलेला आणवात्मा अर्थात् संकुचित जीव विविध योनींमध्ये ये-जा करतो.

यासंबंधी "**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**स्वत्त्वस्थो राजसस्थश्च तमस्थो गुणवेदकः।**
**एवं पर्यटते देही स्थानात्स्थानान्तरं व्रजन्।।**

**अर्थ :-** सत्त्व, राजस आणि तमस् या गुणांमध्ये राहणारा व गुणवेदक अर्थात् देही अर्थात् देह धारण करणारा जीव अशा प्रकारे एका जागेहून दुसऱ्या जागी जात हिंडत असतो अर्थात् जन्ममरणचक्रपरंपरा भोगीत असतो.

त्याचप्रमाणे "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील पुढील कारिकांमध्ये असे

म्हटले आहे की -

**तन्मात्रोदयरूपेण मनोऽहंबुद्धिवर्तिना।**
**पुर्यष्टकेन संरुद्धस्तदुत्थं प्रत्ययोद्भवम्।।४.४९।।**
**भुङ्क्ते परवशो भोगं तद्भावात्संसरेत्।।४९.५।।**

**अर्थ :-** मन, अहंकार व बुद्धी यांच्याप्रमाणे वर्तणाऱ्या, तन्मात्रांच्या उत्पत्तिरूप पुर्यष्टकाने सिद्ध झालेल्या व त्यातून निर्माण होणाऱ्या अनुभवरूप भोगांना दुसऱ्याच्या ताब्यात असणारा जीव भोगीत असतो. त्या भावांपासून संसरण होते अर्थात् संसार प्राप्त होतो.।।४.४९,४९.५।।

याचा आशय असा आहे की, पुर्यष्टकाची दोन रूपे आहेत. एक स्थूल आणि दुसरे सूक्ष्म. त्यातील सूक्ष्म पुर्यष्टकाने जीव आवृत होतो अर्थात् वेढला जातो. त्यामुळेच तो परवश होऊन त्या पुर्यष्टकांपासून उत्पन्न होणाऱ्या प्रत्ययोद्भव अर्थात् अनुभवांतून निर्माण होणारे सुखदुःख यांचा जाणीवरूप भोग भोगतो. त्या पुर्यष्टकाच्या भावामुळे अर्थात् सामर्थ्यामुळे जीवाला संसारधर्म प्राप्त होतात.।।२।।

**विवरण :-** आत्मा कधीही चित्ताशी तादात्म्य पावत नाही; कारण "**नित्यशुद्धबुद्ध स्वभावोयं आत्मा।।**" अर्थात् "आत्मा हा नेहमी शुद्ध व ज्ञानाने युक्त असतो." त्यामुळेच चित्ताला आत्मा म्हणणे अज्ञान आहे आणि अज्ञानाचे कार्य बंधन हे आहे. हेच बंधनाचे स्वरूप या सूत्रात सांगितले आहे.

ज्ञानामध्ये ज्ञाता आणि ज्ञेय या दोन्हींचा समावेश असतो. ज्ञात्यात "अहम् भाव" आणि ज्ञेयामध्ये "इदम् भाव" असतो. ज्यावेळेला हे ज्ञान राग म्हणजे प्रेमयुक्त होते त्यावेळेला ते बंधनाचे कारण बनते. राग हे विद्या कलेचे सहावे तत्त्व आहे. या कलेची विद्या ही पाचव्या तत्त्वाच्या नावावर आहे. पहिले तत्त्व माया होय. त्यानंतर काल, कला, नियती ही तीन शुद्ध तत्त्वे आहेत. यांच्या ज्ञानाला विद्या असे म्हटले आहे. विद्या आणि राग ही अशुद्ध तत्त्वे आहेत. ही पाचही तत्त्वे मायेची पाच कंचुके म्हणजे आवरण आहेत. त्यांनी झाकला गेलेला आत्मा पुरुष किंवा जीव बनतो. पुरुष विद्या कलेचे सातवे तत्त्व आहे. "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथात कलेला "**परा प्रकृति**" असे म्हटले आहे आणि तिच्यामुळेच जीवमात्रांचे हे जगत् धारण केले जाते.

**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत्।।७.५।।**

रागालाच मोह असेही म्हटले जाते. आत्मा ज्ञानस्वरूपही आहे आणि आनंदस्वरूपही आहे. परंतु ज्यावेळेला हा आनंद त्या आत्म्याचे ज्ञेय बनतो

अर्थात् तो आनंद विषयांचे रूप धारण करतो म्हणजेच तो आनंद आत्म्याहून वेगळा होतो त्यावेळेला तो आनंदही "इदम् अर्थात् हे" या अवस्थेत अथवा पायरीवर येतो. या आधीही हे सांगितले आहेच की, ज्ञानाला श्रीशिव आणि आनंदाला शक्ती असे म्हटले जाते. ज्ञेयापासून म्हणजेच विषयांपासून प्राप्त झालेल्या आनंदाला सुख असे म्हणतात. श्रीपातंजलयोगदर्शनात सुखभोगा-नंतर पाठीमागे राहणाऱ्या संस्काराला राग असे म्हटले आहे. त्यामुळेच आनंदाच्या ज्ञानाला, जे बंधनाचे कारण आहे, ते भौतिक विषयांच्या स्तरावर विषयसुख समजले पाहिजे. त्या भौतिक स्तरापेक्षा सूक्ष्म स्तर असणाऱ्या मनोराज्याच्या पातळीवर तेच ज्ञान वैकल्पिक सुख असते आणि त्याच्याही पेक्षा सूक्ष्म संस्काररूपी मोहस्तरावर ते ज्ञान "रस" म्हणून समजावे.

भगवान् श्रीगोपालकृष्णनाथमहाराजांनी **"श्रीमद्भगवद्गीता"** या ग्रंथात असे सांगितले आहे की -

**रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते।।२.५९।।**

**अर्थ :-** इंद्रिय विषयांचे सेवन न करणाऱ्या पुरुषांचे केवळ विषयच दूर होत असतात; पण त्यांचा अनुराग नाहीसा होत नाही. परंतु या पुरुषांच्या मनातील अनुराग परमात्म्याच्या साक्षात्काराने निवृत्त होतो.

येथे रसाचा अर्थ विषयसुखोपभोगाचा संस्कार आहे. या संस्काराचे अधिष्ठान चित्त हे आहे. जोपर्यंत हा रस निवृत्त होत नाही तोपर्यंत त्याचे ज्ञान बंधनकारक असते. ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय या त्रिपुटीत दृश्य वस्तूंचे अस्तित्व असते. समाधिअवस्थेत त्रिपुटीच शिल्लक राहत नाही व ज्ञाता आणि ज्ञेय या दोन्हींचा अभाव असतो; परंतु **"रस"** शिल्लकच राहतो. ज्ञेयाच्या प्रधानता-युक्त समाधीत बंधनाचा बीजरूप संस्कार तसाच राहतो; परंतु **"अहम्"** या वृत्तीची प्रधानयुक्त समाधी आत्म्याचे ज्ञान होण्याला साहाय्यकारी बनते. यालाच वेदान्तात **"अहंग्रह उपासना"** असे म्हटले आहे.

**निर्विकारतया वृत्त्या ब्रह्माकारतया पुनः।**
**वृत्तिविस्मरणं सम्यक्समाधिरभिधीयते।।**

**अर्थ :-** कोणतेही विकार नसणाऱ्या ब्रह्माकार वृत्तीने परत वृत्तीचेच अर्थात् विचारांचे विस्मरण होणे हीच सम्यक् समाधी म्हणून ओळखली जाते.

आनंदरूप "इदम्" हा ज्ञेयरूपाने भौतिक विकल्प संस्काराच्या पातळीवर स्थूल, सूक्ष्म आणि सूक्ष्मतर असतो असे समजावे. त्यामुळेच बंधनातून मुक्ती मिळविण्यासाठी प्रथम भौतिक ज्ञानापासून वरती आले पाहिजे, नंतर विकल्प-

ज्ञानाहून वर आणि मग संस्काराच्या पातळीपेक्षा वरच्या पातळीवर आले पाहिजे. हाच साधनाचा सोपानक्रम आहे.

सांख्य तत्त्वज्ञान्यांच्या मते चित्ताला आत्मस्वरूप मानणे हीच अविद्या आहे. त्यांच्यामध्ये अहम् वृत्तीला मोह असे म्हटले जाते तर ज्ञेयाच्या रागयुक्त वृत्तीला महामोह असे म्हटले जाते.

हे सूत्र तीनही उपायांमध्ये समान रूपात लागू आहे; परंतु ते उत्तरोत्तर तीन मलांच्या तारतम्यतेनुसार क्षीण होत जाते.

याच सूत्राचे दुसऱ्या दृष्टिकोनानुसार स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे आहे.

शरीरधारक एकट्या एक जीवाचे खालच्या स्तराचे संकुचित अथवा मर्यादित ज्ञान त्याच्या बंधनाचे कारण ठरते.

हे खालच्या पातळीवरचे संकुचित ज्ञान अनेक प्रकारांनी जीवाच्या बंधनाला कारणीभूत होते.

प्रथमतः रोजच्या व्यावहारिक जीवनात आपल्याला काही विशिष्ट गोष्टींशी अथवा तत्त्वांशी संबंधित व्हावे लागते. त्यामुळे अनुभवजन्य जीव असा विचार करू लागतो की, ही विशिष्ट तत्त्वेच जीवनाचे यथार्थ सत्य आहेत. त्यामुळे तो जीव भेद आणि विविध वैशिष्ट्यांच्या मर्यादेत पडतो आणि ज्याची ही वैशिष्ट्ये म्हणजे केवळ मर्यादित प्रकटीकरणे आहेत त्या वैश्विकत्वाचे ग्रहण करण्याला असमर्थ ठरतो. तो झाडांसाठी लाकूड जमवीत असतो. "तो प्रत्येक अणूमध्ये लहरणारे जीवन, प्रत्येक जीवात चमकणारा प्रकाश व सर्वांना एकत्वात आणणारे प्रेम" या सर्व गोष्टी पाहू शकत नाही. तो त्याच्या "स्व" किंवा अहंमध्ये गुंततो, पिंजऱ्यात जणू कैद होतो आणि तेवढाच मर्यादित अथवा संकुचित होतो; कारण तो जीवनाच्या प्रवाहाबरोबर वाहू शकत नाही, तो क्षणभंगुर सुखातच बांधला किंवा गुंतला जातो.

दुसरी गोष्ट म्हणजे जीवाच्या सर्व कल्पना या इंद्रियविषयक ज्ञान, त्यांच्या प्रतिमा, त्यापासून निर्माण होणारे विचार, त्यांच्या कल्पना आणि मनाच्या कल्पना या सर्व त्याने त्याच्या आयुष्यात अनुभव आणि अभ्यासाने गोळा केलेल्या शब्दराशी यांच्यापासून निर्माण झालेल्या असतात. तो मातृकाचक्रांच्या हातचे खेळणे बनतो. या जगात एखादी सर्वश्रेष्ठ सत्य वस्तू अस्तित्वात आहे, या गोष्टीवर त्याचा विश्वासच बसू शकत नाही. त्यामुळे तो स्वतःच स्वतःभोवती एक पिंजरा अथवा तुरुंग बांधून घेतो आणि त्या तुरुंगातच जगणे हाच सर्वोच्च आनंद मानतो.

तिसरी गोष्ट म्हणजे तो त्याचे मन व शरीर आणि त्याचे मानसिक व भौतिक अथवा शारिरीक अवयव यांनाच आत्मा समजतो. त्याला हे समजण्याची अजिबात गरज अथवा आवश्यकता वाटत नाही की, हे शरीर म्हणजे भौतिक पातळीवर त्याच्या आत्म्याला जगण्यासाठी केवळ एक साधन आहे. त्यामुळे तो स्थूल भौतिक आनंदाचाच भोग घेत राहतो. त्याची त्या आनंदाबद्दलची इच्छा इतकी तीव्र होते की, तो शेवटी त्याचा बळी ठरतो. तो त्या आनंदाचा उपभोग घेत नाही तर तो आनंदच त्याला भोगतो.

याविषयी "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते।**
**आद्यन्तवन्तः कौन्तेय न तेषु रमते बुधः।।५.२२।।**

**अर्थ :-** स्पर्शापासून उत्पन्न होणारे भोग हे केवळ दुःखाचेच कारण बनत असतात. हे कौंतेय! त्यांना सुरुवात असते आणि शेवटही असतो अर्थात् ते नाशवंत असतात. विद्वान् मनुष्य त्यांना भोगण्याची इच्छा करीत नाही.

हा जीवरूप अज्ञानी मनुष्य ही गोष्ट समजू शकत नाही की, त्याच्या तीव्र इच्छा व उत्कट इच्छांचे मागे उरलेले अवशेष किंवा वासना या त्याच्या पुर्यष्टकात म्हणजेच सूक्ष्म शरीरात शिल्लक राहतात आणि इच्छांच्या बळाच्या नियमानुसार ते त्या जीवाला परत दुसऱ्या जन्मात अशा शरीरात खेचून नेतात की, ज्या शरीरात त्याच्या शिल्लक राहिलेल्या तीव्र व उत्कट वासना पूर्ण होतील. याविषयी श्रीक्षेमराजाचार्य "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील तिसऱ्या निष्यंदातील पहिल्या कारिकेवर भाष्य करताना असे सांगतात की -

**तस्य पुर्यष्टकस्य भावादेव पुनः पुनरुद्बोधितविचित्रवासनः**
**संसरेत् तत्तद्भोगोचितभोगायतनानि शरीराण्यर्जयित्वा गृह्णाति।**

**अर्थ :-** त्या पुर्यष्टकाच्या बलामुळेच परत परत ज्याच्या विविध वासना जागृत झाल्या आहेत असा तो मनुष्य अथवा जीव जन्म-मृत्यू-चक्रामध्ये फिरत राहतो आणि त्या त्या भोगांना योग्य अशी भोगस्थाने म्हणजेच शरीरे स्वीकारतो.

त्यामुळे जीवाचे खालच्या पातळीवरचे मर्यादित ज्ञान खूप प्रकारांनी त्याला बंधनात टाकण्याला कारणीभूत होते.

आपल्याला "मी" म्हणजे आपले शरीर व मन किंवा चित्त यांचा समुच्चय

वाटतो. या "मी"ला जे ज्ञान मिळते ते इंद्रियांमार्फत मिळते. ते ज्ञान डोळे, कान, इत्यादि बाह्य इंद्रियांद्वारा मिळते असे सकृद्दर्शनी वाटले तरी ते वस्तुतः शब्द, रूप, रस, गंध व स्पर्श यांचे ज्ञान देणाऱ्या ज्या इंद्रियशक्ती आहेत त्यांच्या मार्फत मिळते. या सूक्ष्मशक्तींना "तन्मात्रे" असे म्हणतात. ही पाच तन्मात्रे आणि मन, बुद्धी व अहंकार या आठांनी "सूक्ष्म शरीर" बनलेले आहे. या सूक्ष्म शरीरात आत्मा वसत असल्याने त्याला "पुरी" किंवा "आत्म्याचा रहिवास असणारे नगर" असे म्हणतात व तन्मात्रादि आठ घटकांचे ते बनले असल्यामुळे त्याला "**श्रीस्पंदशास्त्र।।३.४९।।**" या ग्रंथात व इतरत्र "पुर्यष्टक" म्हटले आहे. हे "पुर्यष्टक" किंवा "सूक्ष्म शरीर" व आत्मा भिन्न आहेत याचे भान आपल्याला नसते. त्यामुळे चैतन्यस्वरूप आत्मा पुर्यष्टकात बद्ध होऊन त्याच्या इंद्रियांमार्फत येणारे भोग भोगतो व पुनर्जन्म घेतो. "**तन्मात्रोदयरूपेण मनोऽहंबुद्धिवर्तिना। पुर्यष्टकेन संरुद्ध-स्तदुत्थं प्रत्ययोद्भवम।।४९।। भुङ्क्ते परवशो भोगं तद्भावात् संसरत्यतः ।।४९.५।। श्रीस्पंदशास्त्र।।**" हे इंद्रियगम्य ज्ञान इंद्रियांच्या मर्यादित कुवती-मुळे अपूर्ण आणि सत्त्व, रज व तमयुक्त असल्यामुळे बंधनकारक होते व या त्रिगुणयुक्त अपूर्ण ज्ञानावर अवलंबून राहणारा व्यक्तिगत आत्मा जीव मर्यादित शक्तीचा "अणुरूप" असतो.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीअनुभवामृत**" या ग्रंथात हे सूत्र पुढील प्रमाणे उद्धृत केले आहे.

**आणि ज्ञान बंधु ऐसें। शिवसूत्राचेनि मिसें।**
**म्हणितलें असे। सदाशिवें।।३.१६।।**

या ओवीची पार्श्वभूमी अशी आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या मते बंध व मोक्ष दोन्ही मिथ्या आहेत; कारण त्यांनी "**श्रीअनुभवामृत**" या ग्रंथातच "**म्हणोनि बंधचि तव वावो। मा मोक्षा के प्रसवो।।३.१५।।**" असे सांगितले आहे आणि ज्या तथाकथित ज्ञानाने मोक्ष साध्य होतो असे मानतात, ते ज्ञान बंधस्वरूप आहे, असे स्पष्ट केले आहे.

श्रीशिवकल्याणांनी हा मुद्दा स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या "**श्रीअनुभवामृत।।३.१६।।**" या ओवीचा प्रस्ताव पुढील प्रमाणे केला आहे.

**मग ज्ञानचि अज्ञान। म्हणोनि मोक्षचि बंध जाण।**
**की ज्ञानचि स्वतां बंधन। रूप होये।।३.६४।।**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या श्रीशिवसूत्राचा अर्थ स्पष्ट करणारे "**श्रीमद्भ-**

**गवद्गीता।।१४.६।।**" यामधील वचन "**ज्ञानपाशी सत्त्वगुणे। बांधिजे।। श्रीअमृतानुभव ३.१७।।**" या शब्दात दिले आहे. केवळ "**श्रीशिवसूत्रे**" किंवा "**श्रीमद्भगवद्गीता**" यांचे हे मत आहे म्हणून नव्हे; तर स्वतंत्र युक्तिवादाने हे ज्ञान बंधनकारक आहे हे सिद्ध करून, ते "**निमण्यातच**" मोक्ष असतो असा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी निर्णय देताना असे म्हटले आहे की -

**जें ज्ञान स्वयें बुडे। म्हणौनि भारि नावडे।**
**ज्ञानें मोक्षु घडे। ते निमालेनि।।३.२४।।**

**सूत्र क्रमांक ३**

**संबंध :-** येथे ही शंका उत्पन्न होते की, सर्व शब्दाने वाच्य ज्ञेयजात ज्ञानापासून वेगळे होऊ शकत नाही. त्यामुळे हे ज्ञान कसे काय बंधनकारक होऊ शकते? या प्रश्नाचे उत्तर देताना श्रीशिव असे म्हणतात की, ज्ञान हे बंधनकारक आहे ही गोष्ट सत्य आहे; परंतु ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्याला श्रीपरमेश्वराच्या प्रसादाने अशा प्रकारच्या प्रत्यभिज्ञानाचा विमर्श म्हणजे ज्ञान होते त्याचवेळेला वरील गोष्ट घडून येते.

परंतु ज्यावेळेला श्रीपरमेश्वराच्या मायाशक्तीत असा विमर्श होत नाही त्यावेळेला मायेच्या प्रभावाने अज्ञानाचे ज्ञान हे स्वरूपाचे ज्ञान होण्यासाठी बाधक किंवा अडचणीचे ठरते. त्यामुळे या सूत्रात तत्त्वांचा अविवेक म्हणजे माया आहे असे सांगितले आहे.

**कलादीनां तत्त्वानामविवेको माया।।३।।**

**शब्दार्थ :- कलादीनाम् -** कला इत्यादींचा कलातत्त्वापासून पृथ्वीपर्यंत. कला म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या अंतर्बाह्य पिंडब्रह्मांडाच्या उभारणी व संहारणीपर्यंत. **तत्त्वानाम् -** तत्त्वांचा किंवा तत्त्वांविषयी. **अविवेक -** फरक किंवा भेद जाणता न येणे किंवा अज्ञानच. **माया -** माया होय.

**अर्थ :-** कला वगैरे तत्त्वांमधील म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या द्वारा होणाऱ्या अंतर्बाह्य पिंडब्रह्मांडाच्या उभारणीसंहारणीमधील अस्तित्वात असणारा फरक जाणता न येणे हे मायेचे लक्षण आहे व मायेमुळे ज्ञानाचे स्वरूप मर्यादित होते किंवा कलातत्त्वापासून पृथ्वीतत्त्वापर्यंतच्या तत्त्वांच्या अज्ञानलाच माया असे म्हणतात.।।३।।

**विशेष व्याख्या :-** "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथानुसार अवरोह क्रमात श्रीपरमशिवांच्या स्वातंत्र्यशक्तीपासून पाच शक्ती प्रकाशित होतात. १) चित्, २) आनंद, ३) इच्छा, ४) ज्ञान व ५) क्रिया. या शक्तींची पाच ऐश्वर्ये

क्रमशः १) सर्वज्ञता, २) सर्वकर्तृता, ३) पूर्णता, ४) नित्यता आणि ५) सर्वव्यापकता ही आहेत. याच शक्ती मायाशक्तीच्या द्वारा क्रमशः १) विद्या, २) कला, ३) राग, ४) काल व ५) नियती यांच्यात परिवर्तित होतात. वरती सांगितलेली ऐश्वर्ये फलतः पाच गुणांमध्ये परिवर्तित होतात. हे गुण क्रमशः पुढीलप्रमाणे आहेत १) अल्पज्ञता, २) अल्पकर्तृता, ३) अपूर्णता, ४) अनित्यता आणि ५) नियती अर्थात् नियतरूपता किंवा नियमितता.

हे गुण मायाशक्तीच्या प्रभावाने अज्ञानाचा बोध करणारे आहेत. त्यांच्याबरोबरच तीन मलांचा म्हणजेच कोशत्रयांचा उद्भव होतो. हे तीन मल पुढील प्रमाणे आहेत.

**१) आणव मल :-** या मलामुळे स्वातंत्र्याचा अभाव अर्थात् अपूर्णतेचा अनुभव होऊ लागतो अर्थात् स्वरूपात साधकभक्तयोगिशिष्य मग्न राहू शकत नाही.

**२) मायीय मल :-** या मलामुळे भिन्नवेद्यप्रथा अर्थात् द्वैताचे भान होऊ लागते म्हणजेच "स्व" किंवा आत्म्यापासून जीव वेगळा असण्याची जाणीव होऊ लागते.

**३) कार्म मल :-** या मलामुळे कर्माश्रयाच्या कारणामुळे शुभ आणि अशुभ वासना प्रकट होतात आणि स्थूल शरीराचा आश्रय घेतला जातो. अशाच प्रकारे छत्तीस तत्त्वांचा विकास होतो.

श्रीपरमशिवांनी अवरोह क्रमाने छत्तीस तत्त्वे, सात अवस्था आणि चार वर्णांनी युक्त असे सात प्रमाते प्रकट केले आहेत. त्यांचा येथे तक्ता दिलेला आहे.

छत्तीस तत्त्वे पुढील प्रमाणे आहेत.

१) श्रीशिव, २) शक्ती, ३) श्रीसदाशिव, ४) श्रीईश्वर, ५) शुद्ध विद्या, **(या पाचांना शुद्धाध्वा असे म्हणतात.)** ६) माया, (माया किंवा महामाया) ७) कला, ८) विद्या, ९) राग, १०) काल, ११) नियती, **(या पाचांना पंच कंचुक असे म्हणतात.)** १२) पुरुष, १३) प्रकृती, १४) अहंकार, १५) बुद्धी १६) मन, १७) श्रोत्र, १८) त्वक्, १९) चक्षू, २०) जिह्वा, २१) घ्राण, **(क्र.१७ ते २१ यांना पंचज्ञानेंद्रिये असे म्हणतात.)** २२) वाक्, २३) पाणि, २४) पाद, २५) पायू, २६) उपस्थ, **(क्र.२२ ते २६ यांना पंचकर्मेंद्रिये असे म्हणतात.)** २७) शब्द, २८) स्पर्श, २९) रूप, ३०) रस, ३१) गंध, **(क्र.२७ ते ३१ यांना पंचतन्मात्रा असे म्हणतात.)** ३२) आकाश, ३३)

वायू, ३४) अग्री, ३५) जल व ३६) पृथ्वी. **(क्र.३२ ते ३६ यांना पंचमहाभूते असे म्हणतात.)**

| तत्त्वांतर्गत प्रमाता | अवस्था | परामर्श | वाणी |
|---|---|---|---|
| १) श्रीशिव प्रमाता (शक्तीच्या बरोबरचे अभिन्न तत्त्व) | अनाख्य | | परा |
| २) मंत्रमहेश्वर प्रमाता (श्रीसदाशिव तत्त्व) | तुर्यातीत | अहमिदम् | पश्यंती |
| ३) मंत्रेश्वर प्रमाता (श्रीईश्वर तत्त्व) | तुर्य | इदमहम् | पश्यंती |
| ४) मंत्रप्रमाता (शुद्धविद्या तत्त्व) | तुर्यारंभ | इदमिदमहमहम् | पश्यंती |
| येथपर्यंत शुद्धाद्वा म्हणजे शुद्ध मार्ग सांगून झाले. आता अशुद्धाध्वा म्हणजे अशुद्ध मार्ग सांगत आहेत. | | | |
| ५) विज्ञानाकल प्रमाता * (माया आणि महामाया) | सविद्यशून्य | आणवमल | मध्यमा |
| ६) प्रलयाकल प्रमाता (कला ते पुरुष तत्त्वापर्यंत) | सुषुप्ती | आणव मायीयमल (सुखमहम् अस्वाप्सम्) | मध्यमा |
| ७) सकल प्रमाता (प्रकृतीपासून पृथ्वीपर्यंत २४ तत्त्वे) | जाग्रत स्वप्न | आणव, मायीय व कार्म मल | वैखरी |

* येथे अनुसंधान केल्यावर अंतर्मुखता आणि अनुसंधान न केले तर बहिर्मुखता राहते.

अशा प्रकारे कलातत्त्वापासून पृथ्वीतत्त्वापर्यंत ही तीस तत्त्वे मायेची कार्ये असल्याने स्वरूपाचे ज्ञान होण्याला बाधक ठरतात. अज्ञानाच्या आवरणाने यथार्थ स्वरूप झाकून जाते. याच अज्ञान किंवा तत्त्वांच्या अविवेकाला माया असे म्हणतात.।।३।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

आता अशी शंका उत्पन्न होते की -

**ज्ञानं प्रकाशकं लोके आत्मा चैव प्रकाशकः ।**
**अनयोरपृथग्भावाज्ज्ञाने ज्ञानी प्रकाशते ।। श्रीनेत्रतंत्र १३७ ।।**

**अर्थ :-** लोकात ज्ञान हे प्रकाशक आणि आत्माही प्रकाशकच आहे. या

दोहोत भिन्नता नसल्याने ज्ञानात ज्ञानी म्हणजे ज्याला ज्ञान झाले आहे तो प्रकाशित होतो.

"**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात सांगितल्याप्रमाणे हे ज्ञानही प्रकाशमयच आहे; मग ते बंधन कसे काय ठरू शकते? ("**ज्ञानं बन्धः ।।३.२।।**" असे सूत्र आहे.) या प्रश्नाला उत्तर देताना टीकाकार असे म्हणतात की, हे तुमचे म्हणणे अत्यंत सत्य आहे; पण जर श्रीपरमेश्वराच्या प्रसादाने अशी ओळख पटली किंवा असे ज्ञान झाले तर ते ज्ञान बंधनकारक ठरणार नाही. परंतु जर श्रीपरमेश्वराच्या मायाशक्तीमुळे असा विचार उत्पन्न झाला नाही तर ज्ञान बंधनकारक ठरते. याकरिता माया म्हणजे काय याच्याबद्दल "**कलादीनां तत्त्वानामविवेको माया।।३।।**" अर्थात् "कुंडलिनी शक्तितत्त्वाचा अंतर्बाह्य अविवेक म्हणजे माया होय," असे या सूत्रात सांगितले आहे.

**विवरण :-** ज्यावेळेला नीलादि विषयांचे दर्शन होऊन अथवा त्यांचा अनुभव येऊन त्यांचा निश्चय करण्याची वेळ येते त्यावेळेला ज्ञानी सिद्धाला प्रकाशात्मरूप आत्माच प्रस्फुरित होतो; कारण ज्ञानी आणि ज्ञान यांचा स्वभाव एक असतो.

याविषयी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**प्रकाशमानं न पृथक् प्रकाशात् स च प्रकाशो न पृथग्विमर्शात्।**
**नान्यो विमर्शोहमितिस्वरूपाद् अहंस्वरूपोऽस्मि चिदेकरूपः।।**

**अर्थ :-** प्रकाश्यवस्तू अर्थात् प्रकाशणारा हा प्रकाशाशिवाय वेगळा नाही. तो प्रकाश विमर्शाशिवाय वेगळा नाही. हा विमर्श म्हणजे अहंस्वरूप असून अन्य काहीही नाही आणि अहंस्वरूप म्हणजे एकमात्र चैतन्यरूप असा मीच होय.

त्याचप्रमाणे –

**प्रकाशमाने परमार्थभानौ नश्यत्यविद्यातिमिरे समस्ते।**
**तदा बुधा निर्मलदृष्ट्योपि किञ्चिन्न पश्यन्ति भवप्रपञ्चम्।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला परमार्थरूप सूर्याचा उदय होतो त्यावेळेला अविद्यारूप समस्त अंधाराचा नाश होतो व ज्ञानी मनुष्य त्याच्या निर्मल झालेल्या दृष्टीने किंचित्‌ही संसार पाहत नाही.

त्याचप्रमाणे शास्त्रात असे म्हटले आहे की -

**ज्ञानं न भवतो भिन्नं ज्ञेयं ज्ञानात्पृथङ् नहि।**
**अतो न त्वितरत्किञ्चितस्माद्भेदो न वास्तवः।।**

**अर्थ :-** ज्ञान हे आपल्यापासून वेगळे नाही आणि ज्ञेय ज्ञानापासून वेगळे नाही. त्यामुळे इतर अथवा ज्ञानापासून वेगळे असे काहीच नसल्याने भेद हा वास्तवात नाहीच म्हणजेच ती कल्पना मिथ्या आहे.

किंचित्कर्तृत्वरूप कला ते पृथ्वीपर्यंतच्या तत्त्वांचा कंचुक अर्थात् आवरणपुर्यष्टक-स्थूलदेहत्वाने अवस्थित असणाऱ्या तत्त्वांचा जो अविवेक आहे म्हणजेच ती तत्त्वे वेगळी असूनही वेगळी नाहीत असे समजणे किंवा असे ज्ञान होणे हीच माया होय म्हणजेच तत्त्वाच्या अख्याती अर्थात् अज्ञानाने युक्त प्रपंच होय. अविवेक म्हणजे परमार्थस्वरूपाचा अस्पष्ट अथवा अजून पूर्णपणे उघड न झालेला स्वभाव होय.

यासंबंधी "**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**कलोद्वलितचैतन्यो विद्यादर्शितगोचरः।**
**रागेण रञ्जितात्मासौ बुद्ध्यादिकरणैर्युतः।।**
**एवं मायात्मको बन्धः प्रोक्तस्तस्यो (स्य द-) दरात्मकः।**
**तदाश्रयगुणो धर्मोधर्मश्चैव समासतः।।**
**तत्रासौ संस्थितः पाश्यः पाशितस्तैस्तु तिष्ठति।**

**अर्थ :-** अनुभवजन्य जीवाचे हे चैतन्य कलातत्त्वाच्या अर्थात् किंचित्कर्तृत्वाच्या अथवा थोडेसेच कार्य करण्याच्या शक्तीच्या द्वारा संकुचित सामर्थ्याप्रत आणले जाते. विद्या म्हणजेच संकुचित ज्ञानाच्या द्वारा जीवाला इंद्रियविषय आकर्षक प्रकाशात दाखविले जातात, त्याच्यावर रागतत्त्वाकडून भावनिक परिणाम घडविला जातो आणि त्याला बुद्ध्यादि कर्मेंद्रिये व ज्ञानेंद्रिये बहाल केली जातात. अशा प्रकारे मायेमुळे बंधाची निर्मिती होते. हा बंध जीवासाठी भय उत्पन्न करणारा असतो. थोडक्यात सत्त्वादि गुण मायेवर अवलंबून असतात आणि धर्म व अधर्महो तिच्याच आश्रयाखाली असतात. त्यांनी पूर्णपणे भरलेला हा जीव बंधांनी बांधला जाऊन "पाश्य" म्हणजे बांधण्याजोगा होऊन स्थित होतो.

**विवरण :-** किंचित्कर्तृत्वलक्षणाने युक्त अशा कलातत्त्वाने अपूर्णत्वाला प्राप्त झालेले चैतन्य म्हणजेच ज्याचे सर्वकर्तृत्व अर्थात् सर्व करण्याचे सामर्थ्य हे लक्षण आहे असे तत्त्व होय. अल्पज्ञतायुक्त म्हणजे अल्प जाणण्याच्या शक्तीने युक्त विद्यातत्त्वाने अत्यंत नाजुकपणाने प्रमेयभूमिकेप्रत नेलेले गोचर म्हणजे इंद्रियांचे अर्थ म्हणजे विषय होत. रागेण म्हणजेच रागतत्त्वाने रंजित अर्थात् विषयांमध्ये ज्याला अभिलाषा निर्माण झाली आहे असा ज्याचा आत्मा

आहे त्या पशूचा मित किंवा मर्यादित अहंतायुक्त मायीयमलाच्या स्वरूपाचा बंध असतो. "तदाश्रय" म्हणजे मायीय बंधाचा आश्रय होय म्हणजेच शुभ व अशुभ असा कर्मवासनायुक्त स्वभाव होय. त्याच उभयरूप मलात हा जीव बांधला जातो.

**"श्रीस्पंदशास्त्र"** या ग्रंथातील स्पंदकारिकेत हेच निराळ्या प्रकारे सूचित केले आहे.

**अप्रबुद्धधियस्त्वेते स्वस्थितिस्थगनोद्यताः।**
**पातयन्ति दुरुत्तारे घोरे संसारवर्त्मनि।।२.२०।।**

**अर्थ :-** स्वतःची स्थिती लपवून ठेवण्यात उद्युक्त असणारे हे स्पंद, जे अजून नीट जागे झालेले नाहीत, अशा अप्रबुद्ध जीवांना बाह्य जगताच्या कधीही पार न करता येणाऱ्या समुद्रात फेकून देतात.

याचाच अर्थ असा आहे की, गुणादि रूपाने प्रवाहमान असणारे हे विशेषस्पंद प्रतिक्षण चिद्रूप असणाऱ्या स्वतःच्या वास्तविक स्थितीवर आवरण घालण्यासाठी अर्थात् चिद्रूपावस्था झाकण्यासाठी उद्युक्त झालेले किंवा टपलेले असतात. हे विशेषस्पंद ज्यांना स्पंदतत्त्वाचे ज्ञान झालेले नाही अशा प्रबुद्ध बुद्धीच्या जीवांना दुस्तर अर्थात् तरून जाण्याला अवघड अशा भयंकर संसारमार्गात पाडतात.।।२.२०।।३।।

**विवरण :-** श्रीपरमेश्वराचा श्रेष्ठ अनुग्रह ज्यांच्यावर अजून झालेला नाही अशा अज्ञानरूपी निद्रेत ज्यांची बुद्धी गुंतली आहे असे अप्रबुद्धधी म्हणजे भोगाकांक्षादि वासनायुक्त संसारोन्मुख बुद्धीचे मानव होत. हे लोक सुस्थिर अशा निर्विकल्पज्ञानाला झाकण्याच्या प्रयत्नात असतात. त्यामुळे ते स्वतःला दारुण व दुर्लंघ्य अशा जन्मादि बंधात टाकतात. याविषयी बेसावध राजे-लोकांचा दृष्टान्त देतात. ज्या राजेलोकांना आपल्या चतुरंगसैन्याच्या खऱ्या सामर्थ्याची कल्पना नसते व आपल्या तीव्र तेजस्त्वाविषयी आत्मविश्वास नसतो अशांना त्यांचे छिद्रान्वेशी शत्रू आपले स्थान बळकट करण्याच्या कामी बद्धपरिकर राहून त्या राजांना ज्याप्रमाणे मोठ्या संकटात टाकतात त्याप्रमाणेच सर्व कर्तृत्वाचे आपले सामर्थ्य आहेच असे स्वमहत्त्व जो जाणत नाही व परतंत्र अशा देहादिकांनाच आत्मा म्हणून समजतो त्याला "मी सुखी, मी दुःखी," इत्यादि गुणमूलक अनुभव आत्मानुभव येईपर्यंत त्याचे आत्मस्वरूप झाकून संसारामध्येच खेचतात. यावरून जागृत साधकभक्तयोगिशिष्यच या-विषयाचे अधिकारी आहेत, अप्रबुद्ध नाहीत असे तात्पर्य आहे.।।३।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा नित्य म्हणजे स्वाभाविक व शाश्वतरूप द्रष्ट्यावर अर्थात् मंत्रावर, मांत्रिकावर म्हणजे चित्तावर किंवा योग्यावर कोणते आवरण असते? या प्रश्नाचे उत्तर देताना सूत्रकारांनी "**कलादीनां तत्त्वानामविवेको माया।।३।।**" अर्थात् "कला म्हणजे जगतातील वस्तुजात भिन्न भिन्न आहेत असे जाणण्याची क्रिया वगैरे तत्त्वांमधील अस्तित्वात असणारा फरक जाणता न येणे हे मायेचे लक्षण आहे व या मायेमुळे ज्ञानाचे स्वरूप मर्यादित होते," हे सूत्र सांगितले आहे.।।९।।

कलेपासून पृथ्वीपर्यंतच्या समूहाला तत्त्वग्राम असे म्हटले जाते. या तत्त्वात हे जग सामावलेले असून ही तत्त्वे म्हणजेच जग होय.।।१०।।

कला म्हणजे किंचित्कर्तृत्वसामर्थ्य होय. त्याचप्रमाणे तशा प्रकारच्या ज्ञानसामर्थ्याला विद्यातत्त्व असे म्हटले आहे.।।११।।

"हेच योग्य आहे," या प्रकारचा जो अनुभव असतो त्यालाच पाश असे म्हणतात. तो बंधनकारक असतो. या इदानींतनभावात अर्थात् या कलादिकांचे वर्तमानकालीन अस्तित्व किंवा कालही "आकलन" असे म्हणविला जातो. ।।१२।।

कर्मफलांचा नियम किंवा निश्चितता, जीवाची नियत्यात्मकता म्हणजेच धर्माधर्मरूपता आणि सुख व दुःख यांना सारखे मानणे हे अंतःकरणाचे प्रधानत्व होय.।।१३।।

मंतृता अर्थात् ज्ञानीपणा म्हणजे बुद्धीचे संरभत्व अर्थात् व्यग्रता, चित्तक्षोभ, क्रोध, उत्साह, आवेश, गर्व किंवा ताठा हे अहंकाराला कारणीभूत होतात; तर इंद्रियांशी प्रयुक्त होणे हा मनाचा गुण होईल आणि सुख व दुःखांचे विमोहित्व हेही मनाचे गुण होतील.।।१४।।

इंद्रियांनी विशेषित केलेले ज्ञत्व अर्थात् ज्ञान म्हणजे बुद्धींद्रियगण असे मानले आहे. त्या इंद्रियांनीच भिन्न केलेल्या कर्तृत्वाला कर्मेंद्रियगण असे म्हणतात.।।१५।।

केवळ शब्दादिकांचे अवभासन म्हणजेच हा तन्मात्रकगण होय. शब्दादि वेगवेगळ्या गुणांनी युक्त असणारा पांचभौतिक गण होय.।।१६।।

कलातत्त्वापासून पंचमहाभूतांपर्यंतच्या पदार्थांमधील भेदज्ञान न होणे किंवा तात्त्विकज्ञान न होणे हीच माया होय; कारण ती मोह उत्पन्न करणारी आहे. विवेक हा शुद्धविद्यादींचा आश्रय करणारा आहे.।।१७।।

शुद्ध विद्येशिवाय विवेक करता येत नाही म्हणून तत्त्ववेत्यांनी शुद्ध तत्त्वे सांगितली. स्वप्रकाशत्व हेच श्रीशिवतत्त्व असून ज्ञान म्हणजे दृक् आणि क्रिया या दोन शक्ती आहेत.।।१८।।

सर्व ज्ञान व क्रिया यांनी युक्त असणारे तत्त्व म्हणजे श्रीसदाशिव तत्त्व होय. प्रेरिले जाणारे तत्त्व हे श्रीईश्वर तत्त्व आहे; कारण त्याच्या द्वाराच इच्छा उत्पन्न होते अथवा प्रेरणा होते.।।१९।।

श्रीशिवशास्त्रादिकांचे ज्ञान हेच या शास्त्रात **"शुद्ध विद्या"** म्हणून सांगितली आहे. अशा प्रकारे या अवस्थांनी आपल्यात तत्त्वकल्पना अथवा तत्त्वविचार सांगितला आहे.।।२०।।

तत्त्वांची ती ती अवस्थायुक्तता मानली तर त्यात दोष नाही. त्यामुळे हा विमर्श सर्वात भरून असल्यामुळे श्रेष्ठ विमर्श म्हणजे शक्ती किंवा विचार अथवा ज्ञान आहे.।।२१।।३।।

**विवरण :-** मायेमुळेच कलादि तत्त्वसमूहांनी कवचरूप व पुर्यष्टकयुक्त भौतिक शरीरामध्ये परिमितप्रमातृभावाचा म्हणजेच मर्यादित अथवा संकुचित जीवभावयुक्त प्रमात्याचा किंवा ज्ञात्याचा अभिमान घेवविलेल्या मायेकडून अणूचे किंवा जीवाचे नित्य स्वप्रकाशद्रष्ट असे खरे स्वरूप झाकले जाते. विवेकाच्या अभ्यासाचा अवलंब करणारे सिद्धयोगी मात्र मायापदाच्या पलीकडे जाऊन पोहोचल्याने व त्यांनी शुद्ध विद्येचा आश्रय घेतल्याने त्यांना आवरणरहित स्व-आत्म्याचा साक्षात्कार होतो. त्यानंतर ते सर्व प्रकारच्या बंधांपासून निवृत्त होतात व त्यामुळे त्यांना याच्या आधी सांगितलेला मंत्रादींचा अधिकार मिळतो.।।३।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"कलादीनां तत्त्वानामविवेको माया।।३।।"** अर्थात् किंचित् कर्तृत्वाने युक्त असे स्वरूप असणाऱ्या कलेपासून पृथ्वीपर्यंतच्या कंचुक म्हणजे आवरण व पुर्यष्टक अर्थात् पाच ज्ञानेंद्रिये आणि मन, बुद्धी व अहंकार हे आठ मिळून बनलेले सूक्ष्म शरीर होय. यांनी म्हणजे कंचुक व पुर्यष्टक यांनी युक्त स्थूलदेहत्वाने अवस्थित किंवा स्थित असणाऱ्या या तत्त्वांचा अविवेक म्हणजेच भेदाभेद न समजणे अर्थात् वेगळेपणा असतानाही वेगळेपणाचा किंवा अभिन्नतेचा अनुभव येणे किंवा ज्ञान होणे हीच माया आहे. तत्त्वांचा अख्यातिमय म्हणजेच अज्ञानात्मक विस्तार म्हणजेच माया होय.।।३।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**कलादीनां तत्त्वानामविवेको माया।।३।।**" या सूत्राद्वारे ज्ञान हे बंधनकारक कसे? या पूर्वसूत्राचे स्पष्टीकरण केले आहे. या जगात ज्ञान हे जसे प्रकाशक आहे तसेच आत्माही प्रकाशकच आहे.।।१०।।

यांच्यात अर्थात् ज्ञान व आत्मा यांच्यात वेगळेपणाचा अभाव असल्याने म्हणजेच ते दोघेही समरस असल्याने ज्ञानी ज्ञानात प्रकाशित होतो. असे जर असेल तर आणि ज्ञान हे स्वस्वरूपाचे प्रकाशक असल्याने ते आत्म्यासारखेच आहे; मग त्याला बंधनकारक का बरे म्हणावयाचे?।।११-११.५।।

या शंकेला उत्तर देताना ग्रंथकार असे म्हणतात की, जर अशा तऱ्हेने प्रसन्न झालेल्या श्रीपरमेश्वराकडून त्याच्या कृपेमुळे ही जाणीव होत असेल तर आपले म्हणणे खरे मानता येईल म्हणजेच ज्ञान बंधनकारक होत नाही असे मानता येईल; पण त्या श्रीपरमेश्वराच्या मायाशक्तीमुळे जेव्हा असा विचार चित्तात उत्पन्न होत नाही तेव्हा ते ज्ञान बंधनकारक व्हावयाला काय हरकत आहे?।।१२-१३।।

आतल्या आत स्फुरण पावून थोडे कर्तृत्व प्रदान करणारी अर्थात् चित्तामध्ये वरचेवर उत्पन्न होऊन क्रियेमध्ये प्रवृत्त करणारी कला ही सूक्ष्म तत्त्वापासून क्षिती अर्थात् पृथ्वीपर्यंतच्या तत्त्वांनी युक्त असणारी, एखाद्या आवरणाप्रमाणे व कवचासारखी असणारी।।१४।।

आणि पुर्यष्टकांनी म्हणजे आठ आवरणांनी युक्त असल्यामुळे स्थूलदेहादि रूपात स्थित असणाऱ्या पदार्थांमध्ये आत्म्याचे अस्तित्व आहे असा अविवेक करावयाला लावणारी किंवा हाच आत्मा आहे असे समजून त्यांना जवळ करावयाला उद्युक्त करणारी हीच सर्वांना मोहित करणारी माया आहे. माया म्हणजेच ज्यात तत्त्वांचे ज्ञान होत नाही असे जगत् होय.।।१५।।३।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

प्रकाशक अर्थात् प्रकाश उत्पन्न करणारे ज्ञान आत्म्याशिवाय वेगळे नसते. सर्व प्रकाश्य अर्थात् वेद्य म्हणजेच जगतातील सर्व वस्तुजात किंवा पदार्थ हे ज्ञानप्रकाशक असतात.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**प्रकाशमानं न पृथक् प्रकाशात् स च प्रकाशो न पृथग्विमर्शात्।**
**नान्यो विमर्शोहमिति स्वरूपाद् अहं स्वरूपोस्मि चिदेकरूपः।।**

**अर्थ :-** प्रकाशमान अर्थात् ज्या प्रकाशित होतात त्या वस्तू प्रकाशापेक्षा

वेगळ्या असत नाहीत आणि हा प्रकाशही विमर्शापेक्षा म्हणजेच ज्ञानाशिवाय वेगळा असत नाही. विमर्श हा "**अहं**" स्वरूपाशिवाय दुसरा कोणीही नाही आणि मी एकमेवाद्वितीय चैतन्यरूप असा अहंस्वरूप आहे.

त्याचप्रमाणे -

**प्रकाशमाने परमार्थभानौ नश्यत्यविद्यातिमिरे समस्ते।**
**तदा बुधा निर्मलदृष्टयोपि किञ्चिन्न पश्यन्ति भवप्रपञ्चम्।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला परमार्थरूप सूर्य प्रकाशित होतो त्यावेळेला सर्व प्रकारचा अविद्यारूपी अंधार नष्ट होतो आणि ज्ञानी मनुष्य त्याच्या निर्मल झालेल्या दृष्टीने कोणताही संसार किंचितही पाहत नाही.

**ज्ञानं न भवतो भिन्नं ज्ञेयं ज्ञानात्पृथङ् नहि।**
**अतो न त्वितरत्किञ्चित्तस्माद्भेदो न वास्तवः।।**

**अर्थ :-** आपल्याहून ज्ञान भिन्न नाही आणि ज्ञानाहून आपण भिन्न नाही. त्यामुळे या ठिकाणी किंचितही वेगळेपणा नसल्याने भेद हा वास्तव अथवा यथार्थ असत नाही.

उपरोक्तादि वचनांप्रमाणे ज्ञान हे प्रकाशमयच असते, तर मग त्याला बंधन कसे काय म्हणता? अशी शंका उत्पन्न झाली असता ग्रंथकार असे म्हणतात की, तसे नाही; कारण श्रीपरमेश्वराच्या कृपेमुळे असे स्मरण घडविले जाते. जोपर्यंत श्रीपरमेश्वराच्या मायाशक्तीमुळे अशा प्रकारची प्रत्यभिज्ञा अर्थात् स्मरण होत नाही तोपर्यंत त्याचे बंधन शतक्रतू म्हणजे शंभर यज्ञसुद्धा रोखण्याला समर्थ असत नाही. त्यामुळेच शास्त्रात असे म्हटले आहे की, "**कलादीनां तत्त्वानामविवेको माया।।३.३।।**" अर्थात् "कलादि अविवेक म्हणजेच माया होय." कला म्हणजे किंचित् कर्तृत्वसामर्थ्य होय.

त्याचप्रमाणे शास्त्रात असे म्हटले आहे की -

**सर्वकर्तृताशक्तिः सङ्कुचिता कतिपयार्थमात्रपरा।**
**किञ्चित्कर्तारममुं कलयन्ती कीर्त्यते कला नाम।।**

**अर्थ :-** ही सर्वकर्तृत्वशक्ती कितीतरी पदार्थांनी युक्त होऊन संकुचित होते. किंचित्कर्तृता असणाऱ्या हिला कला या नावाने ओळखले जाते.

अशा प्रकारे कर्तृत्व प्रदान करणाऱ्या पृथ्वीतत्त्वापर्यंत पदार्थांचा अर्थात् कंचुक म्हणजे आवरण व पुर्यष्टकाच्या स्थूल शरीराने विद्यमान असणाऱ्या गोष्टींचा जो अविवेक म्हणजेच परमार्थतत्त्वस्वरूपाचा अप्रथन अर्थात् विस्तारित न होण्याचा स्वभाव किंवा विवेचनाच्या रूपाने स्पष्टीकरणाचा अभाव होय.

तोच वेगळ्या रूपाने अभिमत अर्थात् इष्ट, प्रिय, स्वीकारलेल्या व पसंत केलेल्या इच्छेची एकसंधपणाने प्रतिपत्ती अर्थात् ज्ञान म्हणजेच ही माया अर्थात् परमतत्त्वाचा अज्ञानरूप प्रपंच होय.

"**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**कलोद्वलितचैतन्यो विद्यादर्शितगोचरः।**
**रागेण रञ्जितात्मासौ बुद्ध्यादिकरणैर्युतः।।**

**अर्थ :-** कला म्हणजेच शरीराने वेढलेले चैतन्य, विद्येने दाखविलेले इंद्रिय, बुद्ध्यादि अंतःकरणांनी युक्त आणि अभिलाषेने रंगलेला हा आत्मा आहे.

त्याचप्रमाणे "**श्रीपरमार्थसार**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**मायापरिग्रहवशाद्बोधो मलिनः पुमान् पशुर्भवति।।**

**अर्थ :-** मायेने वेढल्यामुळे बोध किंवा ज्ञान हे मलिन होते आणि मनुष्य पशू होतो.

कारण या मायेमुळे परमतत्त्व वेष्टिले जाते अथवा झाकले जाते. त्यामुळेच पूर्वी सांगितलेले ज्ञान बंधाला कारणीभूत होते.

यासंबंधी "**श्रीतंत्रसद्भाव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**एवं मायात्मको बन्धः प्रोक्तस्तस्य दरात्मकः।**
**तदाश्रयगुणो धर्मोधर्मश्चैव समासतः।**
**तत्रासौ संस्थितः पाश्यः पाशितस्तैस्तु तिष्ठति।।**

**अर्थ :-** अशा प्रकारे त्याचा म्हणजे आत्म्याचा हा भीतियुक्त मायामय बंध सांगितला आहे. त्याच्या आश्रयाने एकत्र असणारे धर्म आणि अधर्म आहेत. तेथेच हा पाश्य अर्थात् ज्याला बंध लागला आहे असा जीव स्थित असतो व तो त्यांचा धर्माधर्माचा बंध स्वतःला घालून घेऊनच थांबतो.

**वरील श्लोकांचे विवरण :-**

किंचित्कर्तृत्व हे लक्षण असणाऱ्या कलातत्त्वाने अपूर्णतेला गेलेले चैतन्य म्हणजेच ज्याचे सर्वकर्तृत्व हेच लक्षण आहे असे तत्त्व होय. अल्पज्ञानयुक्त विद्यातत्त्वाने दाखविलेल्या कमनीय अर्थात् हळुवार अथवा नाजुकपणे प्रमेयभूमिकेप्रत नेलेले गोचर अर्थात् इंद्रियार्थ म्हणजे इंद्रिये हे त्यांचे अर्थ होत. प्रेमामुळे विषयांमध्ये अभिलाषा, आसक्ती इच्छा व कामना असणाऱ्या जीवात्म्याचा म्हणजेच पशूंचा परिमित किंवा संकुचित अहन्तायुक्त मायीय-मलस्वरूपी बंध असतो आणि मायीयबंधाचा आश्रय घेतलेला असा शुभ व

अशुभ कर्मांच्या वासनेचा स्वभाव असून तेथेच त्या दोन्हीही मलात हा पशुप्रमाता बांधला जातो.

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात यासंबंधी असे म्हटले आहे की -

**अप्रबुद्धधियस्त्वेते स्वस्थितिस्थगनोद्यताः ।**
**पातयन्ति दुरुत्तारे घोरे संसारवर्त्मनि।।२.२०।।**

**अर्थ :-** गुणादि रूपाने प्रवाहमान असणारे हे विशेषस्पंद प्रतिक्षण चिद्रूप असणाऱ्या स्वतःच्या वास्तविक स्थितीवर आवरण घालण्यासाठी अर्थात् चिद्रूपावस्था झाकण्यासाठी उद्युक्त झालेले किंवा टपलेले असतात. हे विशेषस्पंद ज्यांना स्पंदतत्त्वाचे ज्ञान झालेले नाही अशा प्रबुद्ध बुद्धीच्या जीवांना दुस्तर अर्थात् तरून जाण्याला अवघड अशा भयंकर संसारमार्गात पाडतात.।।२.२०।।

याचा भावार्थ असा आहे की, श्रीपरमेश्वराची श्रेष्ठ कृपा अजून ज्यांच्यावर झालेली नाही अशा अल्पज्ञांच्या स्वस्थितीवर अर्थात् त्यांच्या चिद्रूपावर आवरण घालून हे गुणादि स्पंदांचे प्रवाह त्यांना दारुण आणि ओलांडून जाण्याला कठीण अशा जन्ममरणादींच्या मार्गावर पाडतात. असे लोक त्या संसाराचे स्वरूपच आपल्यात पाहतात; मात्र सच्चिदानंदरूपतेने स्वतःला पाहत नाहीत.।।३।।

**विवरण :-** चित्तावरती आत्म्याच्या चैतन्यप्रकाशाशी असणाऱ्या तादात्म्यामुळे अहंकाराचा उदय होतो. त्यामुळेच मनुष्य आपल्या अहंकारालाच आपले "**स्वस्वरूप**" मानू लागतो. चित्ताचा संबंध इंद्रियांशी आहे. त्यामुळे त्या अहंरूप इंद्रियांच्या स्तरावर उतरून द्रष्टा, कर्ता, भोक्ता आदींची रूपे धारण करण्याने मनुष्य इंद्रियाभिमानी होतो. बाह्य दृश्य पदार्थांच्या ज्ञान, कर्म आणि भोगाचे साधन असणाऱ्या देहाशी इंद्रियांचा संबंध आहे. त्यामुळे शरीराच्या स्तरावर मनुष्य देहाभिमानी बनतो. कारण, सूक्ष्म आणि स्थूल अशा तीन रूपात देहाचे विभाग पाडले जातात; परंतु या तीन देहांचे पृथक्करण सामान्य मनुष्य समजू शकत नाही. तो हे समजू शकत नाही की, तीनही शरीरे ही पाच कलांच्या समूहाने बनलेली आहेत अर्थात् प्रत्येक प्राणी आपल्या आत्मतत्त्वाच्या पाचही कलांच्या समूहांशी तादात्म्य पावून त्यालाच तदाकार अर्थात् आत्माकार मानतो. कलांच्या तत्त्वांशी संबंधित असणाऱ्या अविवेकाला माया असे म्हणतात. त्यामुळेच आणवोपायाच्या साधकासाठी हे आवश्यक आहे की, त्याने उक्त कलांचे पृथक्करण काय आहे हे समजवून

घेतले पाहिजे आणि त्याचा अनुभव घेतला पाहिजे.

या तृतीय उन्मेषातील दुसऱ्या सूत्रात अज्ञान अथवा संकुचित ज्ञान हे बंधनाला कारणीभूत होते असे सांगितले आहे आणि तिसऱ्या सूत्रात याच सिद्धान्ताचा विस्तार केला आहे. हे संकुचित ज्ञान मायेमुळे उत्पन्न होत असते. या तत्त्वज्ञानात माया हा शब्द तीन अर्थांनी वापरला गेला आहे. १) मायाशक्ती, २) मायातत्त्व व ३) मायाग्रंथी. असे हे मायेचे तीन अर्थ होत. मायाशक्ती म्हणजे श्रीशिवांच्या स्वातंत्र्याची दुसरी बाजू आहे. ती त्यांची अनेक प्रकारांनी व्यक्त होणारी प्रकटीकरणाची शक्ती आहे. मायातत्त्व म्हणजे जे मर्यादित विषयज्ञानाला अथवा वस्तुज्ञानाला वाढविते ते रचनात्मक तत्त्व होय. ते प्रकृती आणि अचेतनत्व यांचे भौतिक कारण आहे.

मायाग्रंथी म्हणजे चेतनत्व व अचेनत्व यांची मायेने बनविलेली एक गाठ आहे. या ग्रंथीमुळे मनोभौतिक अवयवांच्या रचनात्मक घटकांना आत्मा समजले जाते. कला, विद्या, राग इत्यादि मायेचे कंचुक, पुर्यष्टक अर्थात् सूक्ष्म शरीर आणि मूर्त शरीर हे आत्म्याहून भिन्न अर्थात् पृथक् असताना आत्म्याशी एकात्म अथवा एकाकार किंवा अपृथक् समजले जातात. या सूत्रात आलेला माया हा शब्द मायाग्रंथी या अर्थाने आलेला आहे. मायाग्रंथी-मुळे झालेले ज्ञान हे बंधनाचे कारण आहे आणि मायाग्रंथी म्हणजे कला आदि अनात्म गोष्टी आत्मा आहेत असे समजणे होय.।।३।।

## सूत्र क्रमांक ४

**संबंध :-** त्यामुळे या मायेचे प्रशमन होण्यासाठी अर्थात् ही माया नष्ट होण्यासाठी पुढच्या सूत्रात उपाय सांगितला आहे. यामध्ये समाधीतच आत्म-लाभाचे म्हणजेच आत्मज्ञानाचे सुख प्राप्त होते, हे कथन केले आहे.

**शरीरे संहारः कलानाम्।।४।।**

**शब्दार्थ :- शरीरे** - स्थूल, सूक्ष्म व कारण शरीरांमध्ये. **संहार** - संहार, ग्रास (श्रीज्ञानदेव) किंवा आपल्या कारणात लयभावनेच्या द्वारा साधकभक्तयोगिशिष्यांनी ध्यान करावे. **कलानाम्** - पृथ्वीतत्त्वापासून श्रीशिवतत्त्वापर्यंत निरनिराळ्या भागांचा किंवा तत्त्वांचा.

**अर्थ :-** स्थूल, सूक्ष्म व कारण शरीरातील पृथ्वीपासून श्रीशिव तत्त्वां-पर्यंतच्या निरनिराळ्या भागांचा अर्थात् तत्त्वांचा संहार तशा भावना करून आपल्या कारणात करावा. ही भावना **"लय"** किंवा **"दाह"** स्वरूपाची असावी अर्थात् स्थूल, सूक्ष्म व कारण शरीरातील पृथ्वीपासून श्रीशिवतत्त्वां-

पर्यंतच्या सर्व तत्त्वभागांचे आपल्या कारणामध्ये लयभावनेच्या द्वारा साधक-भक्तयोगिशिष्याने ध्यान केले पाहिजे.।।४।।

**विशेष व्याख्या :-** महाभूते, पुर्यष्टक आणि समनापर्यंत जी स्थूल, सूक्ष्म आणि कारण शरीरे आहेत त्यात पृथ्वीपासून श्रीशिवतत्त्वापर्यंत सर्व कलाभागांचा प्रतिलोमवृत्तीने एकाचा दुसऱ्यात व दुसऱ्याचा तिसऱ्यात, अशा प्रकारच्या लय भावाने ध्यान केले पाहिजे. जोपर्यंत मन स्वकारणात लय पावत नाही तोपर्यंत अशा प्रकारे ध्यान केले पाहिजे. याला **"लय-चिंतनाभ्यास"** असे म्हणतात.

यासंबंधी **"श्रीविज्ञानभैरव"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**भुवनाध्वादिरूपेण चिन्तयेत्क्रमशोऽखिलम्**
**स्थूलसूक्ष्मपरस्थित्या यावदन्ते मनोलयः।।५५।।**

**अर्थ :-** भुवन, तत्त्व, कला, पद, मंत्र आणि वर्ण या सहा अध्वांचे वाच्य-वाचक व्यक्तिरूपात उलट्या क्रमाने चिंतन केले पाहिजे. अशा प्रकारे या चराचर जगताचे स्थूलातून सूक्ष्म आणि सूक्ष्मातून सूक्ष्मतरात जोपर्यंत मनाचा चित्स्वरूपात लय होत नाही तोपर्यंत लय-चिंतनाचा अभ्यास करीत राहिले पाहिजे.।।५५।।

अशाच प्रकारच्या अभ्यासाचे वर्णन वेदान्तातही केले आहे. **"श्रीयोगवासिष्ठ"** या ग्रंथात महर्षी श्रीवाल्मीकी व महर्षी श्रीभरद्वाज यांच्या संवादात हे वर्णन स्पष्टपणे दिसून येते.

**व्यस्तेन च समस्तेन व्यापिना ग्रथितं जगत्।**
**क्षितिं चाप्सु समावेश्य सलिलं चानले क्षिपेत्।।**
**अग्निं वायौ समावेश्य वायुं च नभसि क्षिपेत्।**
**नभश्च महदाकाशे समस्तोत्पत्तिकारणे।।**
**स्थित्वा तस्मिन् क्षणं योगो लिङ्गमात्रशरीरदृक्।**
............................................
**ततोऽर्धोऽण्डाद्बहिर्यातस्तत्राऽऽत्मास्मीति चिन्तयेत्।।**
**(निर्वाण प्र. पूर्वार्ध सर्ग २२८ श्लोक २६-२९)**

**अर्थ :-** पंचीकृत किंवा अपंचीकृत आकाशाने हे सर्व जग ग्रथित केले आहे. योग्याने प्रथम पृथ्वीचा जलात आणि जलाचा अग्नीत लय करावा. नंतर तेजाचा वायूत लय करून वायूचा आकाशात लय करावा. पुढे आकाशाचा सर्व स्थूल प्रपंचाच्या उत्पत्तीचे कारण असणाऱ्या हिरण्यगर्भाकाशात लय

केला पाहिजे. त्या हिरण्यगर्भाकाशात एकमात्र लिंगशरीर धारण करून साधक-भक्तयोगिशिष्याने क्षणभर स्थिर राहावे.

त्याच्यानंतर स्थूल उपाधीचा लय झाल्याने अर्धशरीराने संपन्न झाल्या-प्रमाणे त्या साधकभक्तयोगिशिष्याने ब्रह्मांडरूपाच्या अभिमानाचा त्याग करून त्यातून बाहेर येऊन सूक्ष्मभूतात्मक लिंगसमष्टीच्या देहात **"मीच आत्मरूप अधिष्ठाता हिरण्यगर्भ आहे,"** असे चिंतन करावे.

आगमांमधून **"दाहचिंतन"** या प्रकारच्या ध्यानाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे.

**कालाग्निना कालपदादुत्थितेन स्वकं पुरम्।**
**प्लुष्टं विचिन्तयेदन्ते शान्ताभासः प्रजायते।।**
**।। श्रीविज्ञानभैरव ५१।।**

**अर्थ :-** "रं"बीजयुक्त कालाग्निरुद्राची ज्वाला डाव्या पायाच्या अंगठ्या-पासून निर्माण होऊन आपल्या सर्व शरीराला जाळून टाकीत आहे असा विचार करावा. या ध्यानामुळे शेवटी शांत आभास प्रकट होतो.।।५१।।

आणवोपायाने ध्यान करण्याचा प्रकार **"श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र"** या ग्रंथात पुढीलप्रमाणे सांगितला आहे.

**उच्चारकरणध्यानवर्णस्थानप्रकल्पनैः।**
**यो भवेत्स समावेशः सम्यगाणव उच्यते।।**

**अर्थ :-** पंचप्राणादींच्या द्वारा उच्चाराने, खेचरी आदि मुद्रांनी आणि ध्वनींचा अभ्यास इत्यादींनी कर्दळी संपुटाकाराप्रमाणे हृदयादींमध्ये धारणा केल्याने जो पूर्ण समावेश होतो त्याला आणवोपायाने ध्यान करणे असे म्हणतात.

याचे पर्यवसान शाक्तोपायात होते. श्रीसद्गुरूंनी सांगितलेल्या अशा कोणत्याही युक्तीने लयभावनाद्वारा ध्यान केल्याने माया नष्ट होते.।।४।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

त्यामुळे या मायाबंधाच्या निवृत्तीसाठी **"शरीरे संहारः कलानाम्।।४।।"** या सूत्रन्यायाने "शरीरात तत्त्वांच्या विविध भागांचा संहार करावा."

महाभूतात्मक स्थूलशरीर, पुर्यष्टकरूप सूक्ष्मशरीर आणि समनान्त पर-शरीर म्हणजे कारण शरीर यांच्यामध्ये पृथ्वी ते श्रीशिवांपर्यंतच्या कलांचा म्हणजेच भागांचा संहार करावा. स्वकारणात लयभावनेने किंवा दाहादि-चिंतनयुक्तीने ध्यान करावे, असा याचा तात्पर्यार्थ आहे.।।४।।

**विवरण :- समनाशक्ती :-** ज्यावेळी श्रीशिवांची उन्मनाशक्ती शून्य तत्त्वापासून पृथ्वीतत्त्वापर्यंत विश्वाच्या स्वरूपात विचाररूपाने प्रकट होते त्यावेळी तिला समनाशक्ती असे म्हणतात. या समनाशक्तीची व्याख्या करताना उद्योतकारांनी असे म्हटले आहे की, "**अशेषमननमात्ररूपात् समना**" अर्थात् "समनाशक्ती ही अशेष मननाच्या रूपाची असते."

**भावना** :- एका विशेष दिशेने किंवा मार्गाने आपल्या विचारांचे प्रक्षेपण करणे आणि आपण विशेष पद्धतीचे किंवा अवस्थेचे आहोत अशी कल्पना करणे याला भावना असे म्हणतात.

मनाचा शेवट अथवा विसर्जन म्हणजे लयभावना होय. हे शाक्तप्रकाराने लय करण्याचे तंत्र आहे. लयभावना म्हणजेच ज्याप्रमाणे उपनिषदात "**तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः सम्भूत आकाशाद्वायुर्वायोरग्निरग्नेराप अद्भ्यः पृथिवी पृथिव्याः पुरुषः पुरुष एवेदं सर्वम्।**" अर्थात् "त्यामुळे या आत्म्यापासून आकाश निर्माण झाले. आकाशापासून वायू, वायूपासून पृथ्वी, पृथ्वीपासून पुरुष आणि पुरुषच हे सर्व झाला. ज्याप्रमाणे असे क्रमानुसार स्वकारणातून उत्पन्न केले जाते त्याप्रमाणे उत्पत्तिक्रमाच्या विरुद्ध दिशेने किंवा चढत्या भाजणीने लय करावा किंवा आपल्या डाव्या पायाच्या अंगठ्यापासून भावनेने प्रज्वलित केलेल्या कालाग्निरुद्राने शरीर भाजून निघत आहे असे ध्यान करावे. हे अध्याहृत समजावे.

यासंबंधी "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**भुवनाध्वादिरूपेण चिन्तयेत्क्रमशोऽखिलम्।**
**स्थलसूक्ष्मपरस्थित्या यावदन्ते मनोलयः।।५५।।**

**अर्थ :-** जोपर्यंत मनाचा लय होत नाही तोपर्यंत स्थूल, सूक्ष्म व पर स्थितीने व भुवनाध्वादिरूपाने क्रमशः सर्व विश्वाचे चिंतन करावे.।।५५।।

**विवरण :-** भेद, भेदाभेद व अभेदरूपाने अथवा भुवन, तत्त्व व कला या अध्वांच्या रूपाने अंतात म्हणजे भावनेच्या अवसानात निर्विकल्पपदात विश्रांती मिळते. हा ध्यान नावाचा आणवोपाय आहे.

त्याचप्रमाणे "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**कालाग्निना कालपदादुत्थितेन स्वकं पुरम्।**
**पुष्टं विचिन्तयेदन्ते शान्ताभासः प्रजायते।।५२।।**

**अर्थ :-** कालपद म्हणजे उजव्या पायाच्या अंगठ्यापासून उत्पन्न झालेल्या कालाग्नीने स्वतःचे पुर म्हणजेच शरीर भाजत आहे अशी भावना केल्यास

शांताभास उत्पन्न होतो किंवा सर्व आभास शांत होतो अर्थात् मर्यादित प्रमेयादि ज्ञान उत्पन्न होते.।।५१।।

हे सर्व आगमग्रंथातून सांगितले आहे. त्यामुळेच ध्यानादींचे आणवत्वाने "**श्रीपूर्वशास्त्र**" या ग्रंथात वर्णन करताना असे म्हटले आहे की -

**उच्चारकरणध्यानवर्णस्थानप्रकल्पनैः।**
**यो भवेत्स समावेशः सम्यगाणव उच्यते।।२.२१।।**

**अर्थ :-** उच्चार, करण, ध्यान, वर्ण व स्थान आदींच्या प्रकृष्ट कल्पनेने जो समावेश होतो त्याला आणव असे म्हणतात.

**विवरण :-** उच्चार म्हणजे स्थूल, सूक्ष्म व दोन्ही रूपांनी होणारा प्राणांचा व्यापार होय. करण म्हणजे देहाच्या विविध स्थितीत होणाऱ्या मुद्रादि क्रिया होत. ध्यान म्हणजे बुद्धिव्यापार होय. हे जे सर्व तत्त्वांच्या अंतर्भूत स्वप्रकाशरूप परतत्त्व आहे त्याचीच निजहृदयज्ञानात भावना करावी. वर्ण म्हणजे सूक्ष्मप्राणांच्या उच्चारात स्फुरण पावणारा आणि अव्यक्ताचे अनुकरण करणारा सृष्टिसंहार बीजरूप ध्वनी होय. स्थान म्हणजे त्रिकोणकंदहृदयादि होत. या सर्वांच्या अभ्यासाने पर अर्थात् श्रेष्ठसंविच्छक्तीचा लाभ होतो.

परंतु हे स्थूल स्वरूपाचे म्हणजेच सहज समजण्यासारखे असणारे आहे अशा विचाराने हे शाक्तोपाय सांगणाऱ्या "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात सांगितलेले नाही. परंतु येथे पर्यवसानपद्धतीने चित्ताला विश्रांती देणाऱ्या ज्या शाक्तादि भावना आहेत त्या आम्ही "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातून येथे संवादिल्या आहेत आणि पुढेही सांगणार आहोत.।।४।।

**विवरण :-** विकल्पसंस्काराने अत्यंत स्पष्टपणे विकल्प उन्मुख झालेले पाहणाऱ्या व चित्तसंबोध हेच लक्षण असणाऱ्या शाक्तोपायात चित्ताला विश्रांती देणाऱ्या आणवोपायाचे पर्यवसान करावे.

**कालाग्निरुद्र देवता :-** कालाग्निरुद्र ही तेजाने किंवा प्रज्वलित प्रकाशाने परिपूर्ण असलेली देवता आहे. मानवी शरीरात तिचे स्थान उजव्या पायाचा अंगठा आहे. ही कालाग्निदेवता त्या स्थानापासून वर चढत आपल्या सर्व शरीराला पोळत जाळत आहे असे ध्यान करावे; कारण ही एक या योगाची तांत्रिक सरावाची प्रक्रिया आहे. करण या शब्दाचा या संदर्भात इंद्रिय असा अर्थ होत नाही. हा शब्द येथे एका गूढ अर्थी वापरला आहे. "**कृतिः इति करणम् भावार्थे।।**" अर्थात् "करणे म्हणजे करण होय." करण म्हणजे येथे करणे किंवा क्रिया होय. हा शब्द येथे यौगिक किंवा गूढ क्रिया अथवा

प्रत्यक्ष कृती किंवा अभ्यास या अर्थी वापरला आहे. आणवोपायात ही एक तांत्रिक पद्धतीने केली जाणारी कृती असते. ध्यानाच्या अभ्यासासाठी वापरण्यात येणारे साधन म्हणजे हे शरीर होय. साधकभक्तयोगिशिष्य आपले शरीर म्हणजे सर्व जगताचा प्रतिनिधी आहे अशी कल्पना करतो. त्यानंतर या जगतातल्या देवाच्या तेजाचा आदर करतो आणि सर्वात शेवटी हे सर्व आपल्या दिव्य "स्व"भावात आहे अशी भावना करतो. शरीर म्हणजे स्थूल, सूक्ष्म व कारण असे तीनही प्रकारचे होय. आंतरिक अवस्थांचे निदर्शन करणाऱ्या शरीराचे काही विशिष्ट हावभाव म्हणजेच मुद्रा यांनाही करण-योगात उपयोगात आणले जाते.

**ध्यान :-** सर्व तत्त्वांमध्ये अंतर्भूत असणाऱ्या पायाभूत दिव्य अशा चैतन्याच्या प्रकाशाचे ध्यान करावे. श्रीपतंजलींनी व्याख्या केल्याप्रमाणेच हे ध्यान आहे. "**प्रत्ययैकतानता ध्यानम्।।३.२।।**" अर्थात् "मानसिक प्रत्ययांचा अखंड व निरंतर वाहणारा प्रवाह म्हणजे ध्यान होय."

**वर्ण :-** "वर्ण" या पदाचा शब्दशः अर्थ अक्षर अथवा अक्षराचा ध्वनी असा आहे. येथे वर्ण म्हणजे नाद या नावाने ओळखल्या जाणाऱ्या ध्वनीचे एकत्रिकरण होय. शरीराच्या अंतर्भूत असणाऱ्या सूक्ष्म प्राणात नेहमीच एक कधीही खंड न पडणारे कंपन अर्थात् अनाहतनाद चालू असतो आणि तोच सृष्टिसंहाराचे बीज आहे. अनाहतनादावर एकाग्र चित्त करणे हा आणव-योगाचा आणखी एक प्रकार आहे. हा योगाचा प्रकार इतर योगशास्त्रात "**अनाहतनादानुसंधान**" या नावाने ओळखला जातो.

याविषयी श्रीअभिनवगुप्तपादाचार्य असे म्हणतात की -

**एको नादात्मको वर्णः सर्ववर्णविभागवान्।**
**सोऽनस्तमितस्वरूपत्वाद् अनाहत इहोदितः।।**

**अर्थ :-** एक नादाच्या रूपाचा वर्ण हा सर्व वर्णांना व्यापत असतो. तो कधीही क्षय पावत नाही किंवा नष्ट होत नाही अर्थात् तो शाश्वत आहे. त्यालाच अनाहत म्हणजेच आघात न करता उत्पन्न होणारा आणि नैसर्गिक किंवा कारणरहित नाद असे म्हणतात. वर्ण प्रकल्पनेचे ध्येयच या अनाहत-नादावर लक्ष एक करणे हे आहे.

**स्थान कल्पना :-** स्थान म्हणजे ठिकाण. या संदर्भात एकाग्र करण्याची जागा होय. एकाग्रतेची तीन ठिकाणे आहेत. १) शरीर, २) प्राणवायू व ३) कोणतीही शरीराबाहेरची गोष्ट.

खालीलपैकी शरीरातल्या एखाद्या भागावर मन एकाग्र केले जाते.

१) त्रिकोण किंवा मूलाधार, २) नाभी, ३) हृदय, ४) कंठ व ५) भुवयांचा मध्यभाग. त्यालाच श्रीपतंजलींच्या योगात मर्यादित धारणा असे म्हटले आहे. "**देहबन्धश्चित्तस्य धारणा।।३.१।।**" अर्थात् "चित्ताला एका विशिष्ट जागी बांधून ठेवणे म्हणजे धारणा होय."

**प्राणवायुस्थान कल्पना :-** या कल्पनेने प्राणावर एकाग्रतेचा निर्देश केला आहे म्हणजेच केंद्रापासून ते शरीराबाहेरील जागेत बारा अंगुली इतक्या अंतरापर्यंत श्वासउच्छ्वासावर लक्ष ठेवणे होय असे निर्देशिले आहे. श्वास जेथून उत्पन्न होतो तो केंद्रिय बिंदू आणि जेथे संपतो तो शरीरापासून बारा आंगुळे लांब असणारा बिंदू यांच्यावर मन केंद्रित केले पाहिजे. त्याला द्वादशान्त असे म्हणतात. बाह्य अंतराला बाह्य द्वादशान्त आणि आंतरिक अंतराला आंतर द्वादशान्त असे म्हणतात. जेथे श्वासप्रच्छ्वास सेकंदाच्या काही भागांसाठी थांबतात त्या बिंदूवर लक्ष केंद्रित करावे.

बाह्य वस्तू म्हणजे एखाद्या देवतेची प्रतिमा इत्यादींवर साधकभक्तयोगिशिष्याने एकाग्रचित्त करावे.।।४।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे आत्म्याच्या तत्त्वात्मक कलारूपाचा विस्तार सांगून परत कलासंकोचाने ज्ञानाचा उदय कसा होतो ते "**शरीरे संहारः कलानाम्।।४।।**" अर्थात् "देहामध्ये कलांच्या लयाचा" उपाय या सूत्राने सांगतात.।।२२।।

तत्त्वांचे जे स्वतःचे सामर्थ्य आहे त्याला कला असे म्हटले आहे. त्यांचा समुदाय म्हणजे हे शरीर आहे. त्यामुळे शरीर हे सकल म्हणजे कलायुक्त आहे.।।२३।।

**विवरण :-** तत्त्वसमूहांनी युक्त शरीरात तत्त्वावयांचा प्रातिलोमाने म्हणजेच उलट्या प्रकाराने स्व-स्व कारणांमध्ये अनुप्रवेश व लय होतो. या भावनेने त्यातच अवसान पावून अर्थात् तेथेच थांबून सर्वांचे अधिष्ठान किंवा आधार असणाऱ्या स्वात्म्यात पोहोचणे हाच सर्वात श्रेष्ठ प्रकारच्या ज्ञानरूप देहाचा उदय होय.

आत्माधार अशा या शरीरात कलांचा स्वतःच्याच करणांमध्ये एकामागून एक असा प्रवेश होणे यालाच संहार अर्थात् लय असे म्हटले आहे.।।२४।।

**विवरण :-** किंवा हठयोगाने सर्ववृत्तींच्या उपसंहाररूप अतिक्रमणाने विकलहानिपूर्वक एकाग्रता मिळवून निर्विकल्पज्ञानाच्या ऐश्वर्याची प्राप्ती

साधकभक्तयोगिशिष्याला होते. अशा प्रकारे प्रमातृरूप कलाप्रसराच्या उपसंहाराने अर्थात् जो कलाप्रसर, स्वरूपाचे आवरण आणि नियमनशक्तीचा अभाव यांना कारणीभूत आहे त्याच्या उपसंहाराने पल्लवित झालेला सिद्धीचा अंकुर स्फुरित होतो अर्थात् ज्ञानाचा किंवा ज्ञानसिद्धाचा उदय होतो.

अशा प्रकारे ज्ञानरूप देहाची प्राप्ती म्हणजेच श्रेष्ठ प्रकारच्या ज्ञानाचा उदय होय.।।२४.५।।

किंवा उल्लंघनप्रक्रियेने अर्थात् सर्व ओलांडून किंवा उल्लंघून श्रीशिवतत्त्वाचा अवलंब करणे किंवा आश्रय घेणे हाच कलांचा संहार असून त्याच्यामुळेही श्रेष्ठज्ञानाचा उदय म्हणजेच लाभ होतो.।।२५,२५.५।।४।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"शरीरे संहारः कलानाम्।।४।।"** अर्थात् स्थूल, सूक्ष्म किंवा पर या तीन प्रकारच्या शरीरात कलांचा म्हणजेच पृथ्वीपासून ते श्रीशिवांपर्यंतच्या तत्त्वांचा स्वकारणामध्ये लयाच्या भावनेने संहार करावा किंवा तसे संहाराचे किंवा लयाचे ध्यान करावे.।।४।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

त्यामुळे चित्तात उत्पन्न होणाऱ्या मायेला नष्ट करण्यासाठी योग्याने **"शरीरे संहारः कलानाम्।।४।।"** या सूत्रन्यायाने शरीरामध्ये या कलांचा संहार करावा.।।१६।।

महाभूतांनी बनलेल्या स्थूलदेहात व पुर्यष्टकांनी युक्त सूक्ष्मदेहात तसेच मूळापासून मनासह असेलल्या योग्याच्या पर शरीरात।।१७।।

कला म्हणजे भागांचा अर्थात् अंशांचा म्हणजे कार्याचा स्वकारणात संहार करावा म्हणजेच त्या कला अथवा कार्य हे संविद्शी अर्थात् ज्ञानाशी एकरूप आहेत अशा लय भावनेने त्यांचे चिंतन करावे किंवा त्यांना नामशेष करून बाजूला सारावे।।१८।।

किंवा दाहादि ज्ञानाच्या विचारांनी त्यांचे ध्यान करावे हे सांगावयाला नको.।।१८.५।।४।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

त्याकरिता मायारूपी बंध नष्ट होण्यासाठी **"शरीरे संहारः कलानाम् ।।४।।"** अर्थात् "देहामध्ये कलांचा लय" कसा करावा याचा या सूत्रात उपाय सांगत आहेत.

महाभूतात्मक पुर्यष्टक व समनापर्यंत जे स्थूल, सूक्ष्म आणि पर देह

विद्यमान आहेत त्यांच्यामध्ये पृथ्वीपासून श्रीशिवांपर्यंत तत्त्वांच्या रूपातले जे अनेक विभाग असतात त्यांच्यातल्या कलात्मक भागांचा म्हणजेच कार्यांचा संहार करावा. हा संहार कसा करावा? याविषयी असे सांगतात की, एकमात्र अग्निसद्भाव चैतन्याचा निज किंवा स्वतःच्या कारणात लयाच्या भावनेद्वारा किंवा शरीरादींचे चिंतन आदि युक्तीने ध्यान करावे. उपनिषदात **"तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः सम्भूतः आकाशाद्वायुर्वायोरग्निरग्नेराप अद्भ्यः पृथिवी पृथिव्याः पुरुषः पुरुष एवेदं सर्वम्।"** अर्थात् "त्यापासून म्हणजे आत्म्यापासून आकाश उत्पन्न झाले. आकाशापासून वायू अर्थात् वारा, वायूपासून अग्नी, अग्नीपासून पाणी, पाण्यापासून पृथ्वी, पृथ्वीपासून पुरुष उत्पन्न झाला आणि पुरुषच हे सर्व आहे, असे कथन केले आहे. अशा प्रकारे हे सर्व ज्याप्रमाणे अनुक्रमाने स्वकारणापासून उत्पन्न केले जातात त्याप्रमाणेच भिन्न क्रमाने पृथ्वीपासून श्रीशिवापर्यंतच्या तत्त्वांची आरोहक्रमाने स्वकारणात विलयाची भावना केली जाते अर्थात् भुवन, तत्त्व, कला, मंत्र, पद व वर्णरूप जो जो वाच्य व वाचकरूप अध्वन् अथवा मार्ग आहे त्या मार्गाच्या शब्दांचे व त्यांच्या अर्थाने युक्त अशा मार्गाचे स्थूल, सूक्ष्म व पर स्थितीनुसार क्रमाने सर्व दिसणाऱ्या नामरूपात्मक विश्वाचे चिंतन करावे. जोपर्यंत त्यांच्या ठिकाणीच मनाचा लय होत नाही तोपर्यंत अशी भावना करावी आणि अशा प्रकारे उजव्या पायाच्या अंगठ्यापासून उत्थापित झालेल्या कालाग्निरूप रुद्राने स्वतःचे शरीर हाच धूप आहे असे समजून **"ॐ र क्ष र य ऊं तनुं दाहयामि नमः।"** या मंत्राचे उच्चारण करून देह जाळण्याच्या चिंतनाच्या योगयुक्तीने आत्मभावनेने दग्ध झाले अशी भावना करावी. त्यावेळी योगनिष्ठ पुरुषाला स्वस्वरूपाचा साक्षात्कार होतो. त्याच्यामध्ये चिन्मय अर्थात् चैतन्ययुक्त मूर्तिमान् अग्नीचे प्रकाशन होते.

याविषयी **"श्रीमहार्थमंजरी"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**शोषो मलस्य नाशो दाह एतस्य वासनोच्छेदः।**
**आप्लावनं तनूनां ज्ञानसुधासेकनिर्मिता शुद्धिः।।४.४४।।**

**अर्थ :-** शोष म्हणजे मलाचा नाश, दाह म्हणजे शरीराविषयीच्या वासनेचा उच्छेद अथवा नाश आणि आप्लावन म्हणजे शरीराची ज्ञानरूप अमृताने केलेली शुद्धी होय.।।४.४४।।

अशाच प्रकारे कालाग्निरुद्राने शरीरात असणारे आणि बाहेर असणारे समग्र विश्व विकल्पाने व्यापले आहे असे समजून समाधिमग्न साधकाला

विशाल किंवा पूर्ण प्रमातृश्रीशिवरूपत्वाचा साक्षात्कार होतो अर्थात् तो श्रीपरशिवांशी समरस होतो.।।४।।

**विवरण :-** या सूत्रामध्ये व्यष्टिशरीराच्या संबंधीच्या कलांचा संहार करावा असे सांगितले आहे. या कलांचे वर्णन पुढील सूत्रात दिले आहे. येथे शरीर म्हणजे भौतिक स्थूल शरीर होय आणि हे पुढील सूत्रावरून स्पष्ट होते. स्थूल देह हा अशुद्ध कलांपासून निर्माण झालेला आहे आणि देहाध्यास अर्थात् आत्म्यावर देहाचा आरोप इतका प्रबळ किंवा बलवान् असतो की, त्याच्यामुळे अभिनिवेशरूप अंधःकारातून बाहेर पडणे अशक्य आहे. त्यामुळे सर्वप्रथम त्यातून बाहेर पडण्यासाठी साधन सांगितले जात आहे.

तत्त्वांच्या शुद्धिद्वाराच त्यांच्या पृथकत्वाचे किंवा निराळेपणाचे ज्ञान आपण समजू शकतो. अहंकारापासून पृथ्वीपर्यंत सर्व तत्त्वे ही अव्यक्त शक्तीच्या महत्तत्त्वरूपी व्यक्तदशेचे परिणाम आहेत. त्यामुळेच सर्व तत्त्वे एकमेकांहून वेगळी अशी अनुभवावयाला येत असूनही विभिन्न पातळ्यांवर ही तत्त्वे एकाच शक्तीचे रूपांतर आहे. ज्याप्रमाणे एकाच सूत्रात अथवा धाग्यात गाठी बांधून माळ बनविली तर तेच सूत्र गाठही असते आणि त्या गाठींना एकत्रित ठेवण्याचेही काम करते. अशा प्रकारे एकच शक्ती स्पंदित होऊन भिन्नभिन्न तत्त्वांच्या रूपांमध्ये परिणाम पावते आणि त्या सर्व तत्त्वांचे तारतम्यही तीच राखत असते. उपनिषदांमध्ये याच सूत्राला प्राण असे म्हटले आहे. हा प्राण आत्म्याची सत्शक्ती आहे.

**यदिदं किं च जगत्सर्वं प्राण एजति निःसृतम्।।२.३.२।।**

**।। कठोपनिषद्।।**

**अर्थ :-** हे जे काही जगत् आहे ते प्राण अर्थात् ब्रह्मापासूनच निघाले असून ते तसे होऊन त्यामध्येच प्रचलित होते व कार्य करते.

स्थूल शरीर हे पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश यांनी पंचमहाभूतात्मक बनले आहे. सूक्ष्म शरीर हे पंचतन्मात्रे, मन, बुद्धी व अहंकार अशा आठ तत्त्वांचे बनलेले आहे. कारणशरीर हे प्राण व समनाशक्तीपर्यंतचे जे सूक्ष्म मन असते त्याने बनलेले आहे. ज्यावेळी श्रीशिवांची उन्मनाशक्ती शून्यतत्त्वापासून पृथ्वीतत्त्वापर्यंत विश्वाच्या स्वरूपात विचाररूपाने प्रकट होते त्यावेळी तिला "**समना**" असे म्हणतात. उद्योतकार तिची व्याख्या करताना "**अशेषमननमात्ररूपत्वात् समना**" असे म्हणतात.

सारांश, शरीरामधील पृथ्वीपासून श्रीशिवांपर्यंत जी तत्त्वे आहेत ती

पुढील प्रमाणे भावना करून विलीन करावीत. पृथ्वीचे कारण आप म्हणजे पाणी असून त्यात तिचा लय झाला आहे अशी भावना करून ती विलीन करावी. आप तेजामध्ये भावनासामर्थ्याने विलीन करावे. असे क्रमशः प्रत्येक तत्त्व त्याच्या त्याच्या कारणामध्ये विलीन होऊन भस्म होत आहे अशी भावना करावी. अशा तऱ्हेने स्थूल शरीराचा सूक्ष्म शरीरात व सूक्ष्म शरीराचा कारणशरीरात संहार अर्थात् लय करावा. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरी**" या ग्रंथात "**पिंडे पिंडाचा ग्रासु।।६.२९१।।**" करण्याची ही जी प्रक्रिया सांगितली आहे ती श्रीशिवसूत्रांच्या आधाराने सांगितलेली आहे हे "**तो हा नाथसंकेतींचा दंशु।।६.२९१।।**" म्हणजेच श्रीशैवपरंपरेचा दंश आहे हे या शब्दांवरून कळून येते. "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात मनोलयाचे हे शाक्तमार्गाचे किंवा श्रीशैवपरंपरेचे परमतत्त्व पुढीलप्रमाणे सांगितले आहे.

**भुवनाध्वादिरूपेण चिन्तयेत् क्रमशोऽखिलम्।**
**स्थूलसूक्ष्मपरस्थित्या यावदन्ते मनोलयः।।५५।।**

**अर्थ :-** भुवन, अध्वा इत्यादि रूपाने अनुक्रमाने स्थूलापासून सूक्ष्म व सूक्ष्मापासून कारण शरीरापर्यंत भावनांच्या द्वारा मनोलय होईपर्यंत लय करावा.

**सूत्र क्रमांक ५**

**संबंध :-** आणवोपायाच्या साहाय्याने ध्यानविधी सांगून आता योग म्हणजे अप्राप्त असणारी गोष्ट मिळविणे आणि क्षेम म्हणजे प्राप्त झालेल्या गोष्टींचे रक्षण करणाऱ्या प्राणायाम, धारणा, प्रत्याहार आणि समाधी या तत्त्वांचे स्पष्टीकरण याच्या पुढे केले जात आहे.

**नाडीसंहार-भूतजय-भूतकैवल्य-भूतपृथक्त्वानि।।५।।**

**शब्दार्थ :- नाडीसंहार** - इडा व पिंगला या नाड्यांतून वाहणाऱ्या प्राणाचे सुषुम्ना नाडीत विलिनीकरण. **भूतजय** - पृथ्वी आदि भूतांवर धारणा करून या द्वारा विजय मिळविणे व पंचमहाभूतांना ताब्यात आणणे. **भूतकैवल्य** - भूतांच्यापासून मन काढून घेणे म्हणजे पंचमहाभूतांपासून आत्म्याला निराळे करून अर्थात् चित्ताला म्हणजे श्रीशिवांशी अभिन्न असलेली कुंडलिनी शक्ती ही जी पिंडब्रह्मांडरूपाने पंचमहाभूतात्मक झालेली असते तिला त्या पंचमहाभूतांपासून दूर करून प्रत्याहार करणे. **(भूतेभ्यः कैवल्यम्, चित्तस्य प्रत्याहरणम्). भूतपृथक्त्वम्** - साधकभक्तयोगिशिष्याने भूतांपासून निराळे, दूर किंवा विभक्त करणे अर्थात् पंचमहाभूतांपासून निराळे होऊन निर्मळ व

स्वच्छंद चिदात्म्यात निवास करणे अगर समाधीत स्थिर राहणे.

**अर्थ :-** (योग्याने भावना सामर्थ्याने पुढील गोष्टी कराव्यात.)

१) इडा व पिंगला या नाड्यांमधून वाहणाऱ्या प्राणांचे अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेल्या अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनीकडून होणाऱ्या स्वतःसिद्ध अशा सिद्धयोगसाधनाने तिचे सुषुम्नेत चालन होऊ देऊन सहस्रारात श्रीशिवांशी विलिनीकरण करावे व अंतिमतः सहस्रारात कुंडलिनी शक्तीचे श्रीशिवांशी समरसीकरण होऊ देऊन श्रीशिव-शक्तिसामरस्य प्राप्त करावे.

२) धारणा द्वारा पृथ्वी आदि पंचमहाभूतांवर विजय मिळवावा अर्थात् त्यांना आपल्या ताब्यात आणावे.

३) पंचमहाभूतांपासून मनाला किंवा आत्म्याला बाजूला काढून घ्यावे अर्थात् चित्ताला म्हणजे कुंडलिनी शक्तीला पंचमहाभूतांपासून प्रत्याहारद्वारा दूर करावे.

४) पंचमहाभूतांपासून निराळेपणा अर्थात् पृथक्पणा साधावा आणि स्वच्छंदचिदात्म्यात समाधिद्वारा वास करावा.।।५।।

**विशेष व्याख्या :-** आत्मव्याप्ती आणखी दृढ होण्यासाठी अन्य साधनेही आहेत.

**१)** नाडीसंहाराच्या प्रकारात प्राण, अपान व समान आदींचा मध्यनाडीत म्हणजेच सुषुम्नेत लय करावा लागतो. त्याच्यासाठी सामान्य किंवा बाह्य दोन प्राणायाम आणि विशेष किंवा आभ्यंतर एक प्राणायाम शास्त्रात सांगितला आहे.

### (अ) सामान्य (बाह्य) प्राणायाम

उजवी नाकपुडी उजव्या हाताच्या अंगठ्याने बंद करून डाव्या नाकपुडीने वायू अर्थात् हवा हळूहळू आत घ्यावी. याला पूरक असे म्हणतात. त्यानंतर डावी नाकपुडी अनामिका व करांगुलीने बंद करून उजव्या नाकपुडीने श्वास हळूहळू बाहेर सोडावा. याला रेचक असे म्हणतात. हे तीन अथवा पाच वेळा सामान्य रूपात करावे. याचा म्हणजे समप्राणायामाचा निरंतर अभ्यास केल्याने नाडी शोधन होते म्हणजेच मोक्षमार्गाच्या मध्यधामाचा अर्थात् सुषुम्नेचा विकास होतो.

### (ब) सामान्य (बाह्य) प्राणायाम

या आधीच्या प्रकारात सांगितल्याप्रमाणे पूरक करूनच हवा अथवा श्वास

काही वेळ आत रोखून ठेवावा. याला प्राणरोधन किंवा कुंभक असे म्हणतात. याच्यानंतर रेचक करावयाला पाहिजे.

**(क) विशेष (आभ्यंतर) प्राणायाम**

मध्यपथाच्या द्वारा बहिर्द्वादशान्ताकडे प्राणवायूचा रेचक करून संधि-स्थानावर कुंभक करावयाला पाहिजे. त्यानंतर वायू हृदयाकडे म्हणजेच अंतर्द्वादशान्ताकडे घेऊन संधीवर परत कुंभक करावा. हा अभ्यास ज्यावेळेला कोणताही त्रास न होता सहज घडू लागेल त्यावेळेला त्याला आभ्यंतर प्राणायाम किंवा प्रशांतकुंभक असे म्हणतात. येथे कुंभकच संधी होतो. त्यामुळे त्याला निस्पंदकुंभक असे म्हणतात. श्रीसद्गुरूंच्या कटाक्षाने ब्रह्मद्वार विकसित होण्याचा हाच योग्य अनुग्रह-अवसर आहे. त्यावेळेला "हे सर्व व मी ब्रह्मच आहे," अशी भावना दृढ होते.

या प्राणायामांनी प्राणवायूचा संचार हलका किंवा मृदू होऊ लागतो आणि अशा प्रकारे वायुप्रशमन अर्थात् वायूचा निरोध होऊन ऊर्ध्व द्वादशान्तासाठी अर्थात् सहस्रारासाठी उदानवायुद्वारा सुषुम्नाद्वार उघडले जाते. हा सुप्रशांत अर्थात् चौथा प्राणायामच सर्वसिद्धिप्रद आहे. हा प्राणायाम केवळ योगिसाधकच करू शकतो, ही गोष्ट मात्र येथे लक्षात ठेवली पाहिजे.

**२)** भूतजयासाठी पृथ्वी आदि पाच महाभूतांच्या धारणा खालील प्रकारे कराव्यात.

विराट् भावनेमध्ये पंचमहाभूतांना वेगळे करून पृथ्वीला तिच्या दुप्पट पाण्यामध्ये, जलाला त्याच्या दुप्पट तेजामध्ये, तेजाला त्याच्या दुप्पट वायूमध्ये आणि वायूला त्याच्या दुप्पट आकाशामध्ये लीन करावे. या धारणेने साधक-भक्तयोगिशिष्य पंचमहाभूतांवर विजय मिळवू शकतो आणि त्याचबरोबर डोकेदुखी आदि शरीराच्या दुखण्यांवर विजय मिळवितो. शरीरात ही धारणा हृदयप्रदेशाच्या आधाराने अंगठा, बेंबी, घसा आदि जागांवर श्रीसद्गुरूंनी सांगितलेल्या रीतीने केली जाते आणि नंतर ब्रह्मरंध्रात असणाऱ्या आकाशग्रंथीचा भेद करून साधकाला सहस्रारात सर्व सिद्धी प्राप्त होतात.

**३)** भूतकैवल्यात चित्त भूतांपासून मागे घेतले जाते. पंचमहाभूते स्वरूपज्ञानापासून वेगळी केली जातात. चित्त मन आणि विषयांपासून वेगळे होऊन हृदयातच संचार करीत राहते. ही दशा चतुर्थ म्हणजेच सुप्रशांत प्राणायामाने अर्थात् वर सांगितलेल्या प्राणायामाने साधकाला प्राप्त होते.

**४)** भूतपृथक्त्व ही योग्याची समाधी अवस्था आहे. त्या अवस्थेच्या

अभ्यासाने भूतांच्या आवरणापासून निर्मळ झालेले चित्त चिदानंदभावाला प्राप्त होते. ही योग्याची निरुद्धावस्था आहे. ही अवस्था आणवोपायात प्रयत्नानेच साध्य होते. ज्या सिद्धयोग्याला शांभवोपायाने समावेश प्राप्त झाला आहे त्याच्यासाठी ही अवस्था अत्यंत स्वाभाविक आहे.

यासंबंधी प्रथम उन्मेषाच्या विसाव्या सूत्रात असे म्हटले आहे की -

**भूतसन्धानभूतपृथक्त्वविश्वसङ्घट्टाः ।।१.२०।।**

येथे आणवोपायात योग्याला या अवस्थांची भावना करणे आवश्यक आहे.।।५।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा प्रकारे ध्यान नावाचा आणवोपाय सांगितल्यानंतर त्याचा योगक्षेम म्हणजेच प्राणायाम, धारणा, प्रत्याहार व समाधी हे उपाय या "**नाडीसंहार-भूतजय-भूतकैवल्य-भूतपृथक्त्वानि।।५।।**" सूत्रात सांगत आहेत. योगक्षेम म्हणजे "**अप्राप्तस्य प्राप्तिर्नाम योगः।।,**" अर्थात् "जे प्राप्त झालेले नाही त्याची प्राप्ती म्हणजे योग" आणि "**प्राप्तस्य परिरक्षणं नाम क्षेमः।।**" अर्थात् "प्राप्त झालेल्याचे पूर्ण रक्षण करणे म्हणजे क्षेम होय." नाडीसंहार, भूतजय, भूतकैवल्य व भूतपृथक्त्व यांची योग्याने भावना करावी. नाड्यांचा म्हणजे प्राणापानादींना वाहून नेणाऱ्या पोकळ्यांचा संहार म्हणजे प्राणापानयुक्तीने उदानाग्निरूप मध्यनाडीत लय करणे होय.।।५।।

**विवरण :-** प्राणापानयुक्ती म्हणजे पूरकादींच्या सतत अभ्यासाने बाह्य आणि आंतर अशा पसरणाऱ्या रूपत्वाचा त्याग केलेले संमेलन होय.

कुंभकाचा सतत अभ्यास केल्याने सर्वनाड्यांत वाहणारा प्राणवायू उदानाग्नीत लीन किंवा शांत होतो. त्याच्या वाहणेपणामुळे त्याला नाडीसंहार हे औपचारिक नाव दिले आहे.

यासंबंधी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**अपसव्येन रेच्येत सव्येनैव तु पूरयेत्।**
**नाडीनां शोधनं ह्येतन्मोक्षमार्गपथस्य च।।७.२९१।।**

**अर्थ :-** डाव्या नाकपुडीने रेचन करावे व उजव्या नाकपुडीने पूरक करावा. यामुळे नाड्यांचे आणि मोक्षाच्या मार्गाचे अर्थात् सुषुम्नेचेही शोधन अर्थात् शुद्धीकरण होते.

**विवरण :-** सव्य म्हणजे उजव्या नाकपुडीने रेचक करावा. अपसव्य म्हणजे डाव्या नाकपुडीने पूरक करावा. अशा प्रकारे ही क्रिया अखंडितपणे

केल्यामुळे नाड्यांचे किंवा मोक्षमार्गपथाचे किंवा मध्यधामाचे अर्थात् सुषुम्नेचेही शोधन होते म्हणजेच वायू शांत होतो.

**रेचनात्पूरणाद्रोधात्प्राणायामास्त्रिधा स्मृताः।**
**सामान्य बहिरेते तु पुनश्चाभ्यन्तरे त्रयः।।**

**अर्थ :-** रेचन अर्थात् रेचक, पूरण अर्थात् पूरक आणि रोधन अर्थात् कुंभक अशा प्रकारे प्राणायाम तीन प्रकारचा आहे. सामान्यपणे हे बाह्य प्राणायाम असून आंतरिकही तीन प्राणायाम आहेत.

**विवरण :-** प्राणायाम म्हणजे यथास्थित वाहून नेणाऱ्या प्राणावर विजय मिळवून त्याच्यावर ताबा मिळविणे होय. हे तीन प्राणायाम सर्वसाधारणपणे नासिकामार्गात अर्थात् नाकपुडीत क्रमाने करण्यात येणारे बाह्य प्राणायाम आहेत.

**आभ्यन्तरेण रेच्येत पूर्येताभ्यन्तरेण तु।**
**निःस्पन्दं कुम्भकं कृत्वा कार्याश्चाभ्यन्तरास्त्रयः।।**

**अर्थ :-** आभ्यंतरातच रेचन अर्थात् रेचक आणि आभ्यंतरातच पूरण अर्थात् पूरक करून निःस्पंद म्हणजे कंपरहित कुंभक करून हे तीन आभ्यंतर प्राणायाम करावेत.

**विवरण :-** मध्यपथाने म्हणजे सुषुम्नेने सहस्रारात रेचन व हृदयात पूरक करावा. निःस्पंद कुंभक म्हणजेच निष्कंप किंवा कंपरहित अगर आयास किंवा प्रयत्न न करता होणारा प्रशांत अर्थात् अत्यंत शांत असा कुंभक होय. करावे म्हणजे त्यांचे निर्वर्तन करावे अर्थात् ते सिद्ध करावेत.

**आता भूतजय म्हणजे काय ते सांगतात.**

पृथ्व्यादि महाभूतांना त्या त्या धारणांनी आपल्या ताब्यात आणणे अथवा त्यांना वश करणे होय.

या दृष्टीने "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथातच असे म्हटले आहे की -

**वायवी धारणाङ्गुष्ठे आग्नेयी नाभिमध्यतः।**
**माहेयी कण्ठदेशे तु वारुणी घण्टिकाश्रिता।।**
**आकाशधारणा मूर्ध्नि सर्वसिद्धिकरी स्मृता।।**

**अर्थ :-** अंगठ्यात वायुविषयक धारणा करावी, नाभीमध्ये अग्निविषयक, कंठदेशात महिविषयक अर्थात् पृथ्विविषयक, पडजीभेत जलविषयक आणि मस्तकात आकाशाची धारणा केली असता या सर्व धारणा सिद्धी देणाऱ्या होतात.

**विवरण :-** पायात तिर्यग्गमन, नाभीत जठराग्नी, कंठस्थानी धरणी, कंठावरील घाटीत रस आणि ब्रह्मरंध्रात आकाश असते. त्यामुळे धारणाही तशीच सांगितली जाते. येथे वर्णमंडललांछनाक्षरात्मक धारणा ध्येय म्हणून ठेवावी. पहिल्यांदा कंठात पार्थिव धारणा करून हृदयापासून उद्घातपंचकाने अर्थात् पाच प्रहार करून पंचगुणात्मक म्हणजे गंध, रस, रूप, स्पर्श व शब्दात्मक पृथ्वितत्त्वाचा भेद करावा. नंतर याच क्रमाने हृदयापासूनच चार प्रहरांनी चतुर्गुणात्मक जलतत्त्वाचा भेद करावा. नंतर नाभीत त्रिगुणात्मक अग्नितत्त्वाचा, नंतर पादांगुष्ठात द्विगुण अर्थात् स्पर्श व शब्दात्मक वायूचा आणि नंतर अंगुष्ठांपासून संकोचयुक्तीने प्राणशक्तीला ऊर्ध्व पाठवून बाणाप्रमाणे एकगुणयुक्त अर्थात् शब्दगुणआकाशग्रंथींचा भेद ब्रह्मरंध्रात करावा. द्वादशार चक्रात सर्वसिद्धिलाभ होतो.

भूतकैवल्य म्हणजे पंचमहाभूतांपासून चित्ताला स्वतःकडे खेचणे होय. या दृष्टीने "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात या विषयी असे म्हटले आहे की -

**नाभ्यां हृदयसञ्चारान्मनश्चेन्द्रियगोचरात्।**
**प्राणायामश्चतुर्थस्तु सुप्रशान्त इति स्मृतः ।।७.२९४।।**

**अर्थ :-** प्राणाचे हृदयापासून बेंबीपर्यंतचे स्थित्यंतर आणि त्याचे तेथेच नियमन करणे, मनाचे इंद्रियविषयांपासून मागे येणे आणि त्यांचे प्रत्याहाराच्या साधनाने बेंबीपर्यंतचे स्थित्यंतर याला सुप्रशांत नावाचा चौथा प्राणायाम असे म्हणतात.

**विवरण :-** निष्कंपकुंभकानंतर हळू हळू हृदयापासून खाली संचार-युक्तीने प्राण नाभी म्हणजे बेंबीतच रोखून इंद्रियांपासून खेचून म्हणजे विषयां-पासून खेचून मनाला नाभीतच स्थिर करून योग्याला सुप्रशांत असा चौथ्या प्रकारचा प्राणायाम करता येतो. त्यानंतर डाव्या नाकपुडीने रोखून धरलेला वायू हळूहळू सोडावा म्हणजे वातप्रकोप होत नाही.

हृदयापासून नाभीत प्राणाच्या आणि विषयांपासून मनाच्या तेथील या संचरणामुळेच भूतांपासून वेगळेपणा होतो व निरुपाधिक स्वच्छस्वच्छंद-चिदात्मत्वही साधते.

यासंबंधी तेथेच असे म्हटले आहे की -

**भित्वा क्रमेण सर्वाणि उन्मनान्तानि यानि च।**
**पूर्वोक्तलक्षणैर्देवि त्यक्त्वा स्वच्छन्दतां व्रजेत्।।**

**अर्थ :-** हे देवी ! उन्मनापर्यंतच्या सर्व गाठी पूर्वी सांगितलेल्या लक्षणांनी

तोडून आणि त्या सर्वांचा त्याग करून साधकभक्तयोगिशिष्य स्वच्छंदता प्राप्त करतो.

**विवरण :-** सर्व म्हणजे हृदय, कंठ आदि स्थानांचे आणि त्याचप्रमाणे ज्यातून मन वर गेलेले आहे त्या उन्मना अवस्थेपर्यंतच्या स्थानाचे पूर्वी सांगितलेल्या पाच प्रणवाधिकार लक्षणांनी भेदन करून व त्या सर्वांचा त्याग करून योगींद्र स्वच्छंदतेप्रत जातो अर्थात् अत्यंत गाढ अशा उन्मनापदात विश्रांती प्राप्त झाल्यामुळे व तुर्यातीत दशेचा लाभ मिळाल्यामुळे चिदानंदघन श्रीपरभैरवात समावेश प्राप्त करतो.

पूर्वी सांगितलेल्या "**भूतसन्धानभूतपृथक्त्वविश्वसङ्घट्टाः ।।१.२०।।**" या सूत्रात जे वर्णिले आहे ते शांभवोपायसमाविष्ट अशा सिद्धयोग्याला सहज भावते. या सूत्रात सांगितलेली प्रक्रिया मात्र आणवोपायाच्या प्रयत्नाने साध्य होणारी आहे. असा या दोन सूत्रांमधील विशेष आहे.।।५।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१) नाडीसंहार :-** नाडीसंहार म्हणजे प्राण आणि अपान हे वायू सुषुम्नेत मिसळून टाकणे होय. ही प्रक्रिया प्राणायामाद्वारे अमलात आणली जाते.

**२) उदानाग्नी :-** उदान हाही एक वायूच आहे. त्याला "**अग्नी**" असे अलंकारिक भाषेत म्हटलेले आहे; कारण त्याच्यात प्राण आणि अपान हे वायू मिसळलेले असतात.

**३) सव्य व अपसव्य :-** बहुतांशी अपसव्य म्हणजे उजवा आणि सव्य म्हणजे डावा; पण ज्यावेळेला "**अपसव्य**" हे पद अव्यय म्हणून म्हणजे "**अपसव्यम्**" किंवा "**अपसव्येन**" अशा रूपात योजिलेले असेल तर त्याचा अर्थ डाव्या बाजूकडे अथवा बाजूला असा असतो. त्याचप्रमाणे "**सव्यम्**" अथवा "**सव्येन**" या पदाचा अर्थ उजव्या बाजूकडे किंवा बाजूला असा असतो. याच अर्थाने श्रीक्षेमराजाचार्य त्यांच्या "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथावरील टीकेत असे स्पष्टीकरण देतात की, "**सव्येन दक्षनासापथेन अपसव्येन वामेन।**" श्रीलक्ष्मणमहाराज जू यांनीही हाच अर्थ स्वीकारला आहे.

**४) प्राणायाम :-** प्राणायाम म्हणजे श्वासावर ताबा मिळविणे अथवा त्याच्यावर नियंत्रण ठेवणे होय. पूरक म्हणजे श्वास आत घेणे, रेचक म्हणजे श्वास सोडून देणे आणि कुंभक म्हणजे श्वास रोखून धरणे होय.

**५) धारणा :-** "**धारणा**" या शब्दाचा अर्थ महामुनी श्रीपतंजलींच्या

"**श्रीयोगसूत्रे**" या ग्रंथातील अर्थाप्रमाणेच आहे. अर्थात् "**देशबन्धश्चित्तस्य धारणा।।३.१।।**" म्हणजेच "एखाद्या विशिष्ट स्थानी चित्ताला बांधून ठेवणे म्हणजे एकाग्र करणे अर्थात् धारणा होय." भूतजय किंवा महाभूतांवर या धारणांनीच नियंत्रण मिळविले जाते.

**६) भूतकैवल्य :-** भूतकैवल्य हे प्रत्याहारद्वारा होत असून त्याचा अर्थ मन त्याच्या विषयांपासून आणि इंद्रिये त्यांच्या विषयांपासून मागे घेणे अशा दोन्हीही प्रकारचा आहे.

**७)** श्रीक्षेमराजांनी या श्लोकाचा अर्थ खालीलप्रमाणे स्पष्ट केला आहे.

**आभ्यन्तरेण मध्यपथेन रेचनं द्वादशान्ते, पूरणं हृदि,**
**निष्कम्पं कुम्भकमिति निरायासं प्रशान्तकुम्भकमित्यर्थः।।**

**अर्थ :-** आंतरिक म्हणजे मधल्या नाडीतून म्हणजेच सुषुम्नेतून द्वादशान्तापर्यंत अर्थात् सहस्रारापर्यंत बारा अंगुले एवढ्या अंतरापर्यंत रेचन म्हणजे श्वास सोडणे करावे. त्यानंतर हृदयापर्यंतच्या दिशेने पूरक अर्थात् श्वास आत घेणे करावे. निष्कंप कुंभक म्हणजे प्रयत्नरहित अत्यंत शांत व क्षोभरहित कुंभक होय. यालाच प्रत्याहार प्राणायाम असे म्हणतात.

याला आधीच्या प्राणायामाच्या अर्थात् ज्यात पूरक, रेचक व कुंभक असे तीन प्रकार आहेत त्यांच्या संबंधाच्या दृष्टिकोनातून चौथा प्राणायाम असे म्हटले आहे.

**८) उन्मना :- "अनुत्तरपरमशिवः अविचलप्रकाशात्मा यदा स्वेच्छया प्रसरति सा शक्तिः उन्मना शिवादभिन्नेव इत्युच्यते।।"** अर्थात् "ज्यावेळेला कधीही कोणताही बदल न घडणारे किंवा परिणामरहित प्रकाशस्वरूप असे सर्वश्रेष्ठ श्रीपरमशिव स्वतःच्या इच्छेने प्रसरण पावतात त्यावेळेला ती जी इच्छारूप शक्ती असते तिला श्रीशिवांहून अभिन्न असलेली उन्मना शक्ती असे म्हणतात." शब्दशः उन्मना याचा अर्थ मनाच्या पलीकडचे असा आहे. ती अतिमानसिक शक्ती आहे. ही अवस्था प्राप्त करण्यासाठी किती ग्रंथी पार कराव्या लागतात हे "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथाच्या प्रणवाधिकारात सांगितले आहे. ही उन्मना शक्ती प्राप्त झाल्यानंतर परकायाप्रवेशाची सिद्धी मिळते आणि तहान-भूकही साधकभक्तयोगिशिष्याला त्रास देत नाहीत. **(सङ्क्रा-मेत्परदेहेषु क्षुत्तृष्णाभ्यां न बाध्यते।।)**।।५।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे तत्त्वांचा प्रसर-संकोचस्वरूप वृत्तींच्या उल्लंघन करण्याने

आत्म्याच्या ठिकाणी स्व-स्वरूपाचा उदय म्हणजे आत्मज्ञान होते हे सांगून श्रीशिवरूप भूतसिद्धींचा उदय म्हणजे पंचमहाभूतांवरचा विजय कसा होतो हे **"नाडीसंहार-भूतजय-भूतकैवल्य-पृथक्त्वानि।।५।।"** अर्थात् "इडा व पिंगला या नाड्यांमधून वाहणाऱ्या प्राणांचे सुषुम्नानाडीत विलिनीकरण केल्याने, पृथ्वी आदि भूतांवर धारणा करून त्या द्वारा पंचमहाभूतांवर विजय प्राप्त केल्याने, पंचमहाभूतांपासून मन काढून घेतल्याने आणि पंचमहाभूतांपासून विभक्त झाल्याने आत्मस्वरूपाची प्राप्ती होते." असे या सूत्राने सांगतात. ।।२६,२७।।

ज्याप्रमाणे एखाद्या घरात राहणाऱ्या मनुष्याचे म्हणजे घरमालकाचे त्याच्या घरावर स्वामित्व असते त्याचप्रमाणे चैतन्याधार पंचमहाभूतांनी बनलेल्या या शरीरात आत्मा स्वतंत्रतेने स्थित असल्याने त्याची शरीरावर मालकी असते. ।।२८।।५।।

**विवरण :-** आत किंवा बाहेर बारा अंगुले अखेर प्राणापानाच्या उपसंहारामुळे इडा इत्यादि सर्व नाड्यांचा उपशम करून सिद्धीची इच्छा करणाऱ्या व तंत्रात सांगितलेल्या प्रक्रियेत वर्णन केलेल्या कंदादि अधिष्ठानात त्रिकोण-वर्तुलादिरूप स्वबीजाक्षरचिह्नित अशा पृथिव्यादि भूतांची धारणा करणाऱ्या योग्याला ठराविक कालांशाच्या अर्थात् तास, दोन तास, प्रहर, दोन प्रहर अशा प्रकारे अभ्याससातत्याने भूते वश होतात. त्यामुळे पांचभौतिक द्रव्यामध्ये गमन, आगमन व विहारादि क्रिया प्रतिबंध आणत नाहीत. या सिद्धी जरी त्याला अवगत झाल्या असल्या तरी यात तो अनासक्त राहिला तर भूतसंबंधरहित स्वच्छ-चिदानंदघन-स्वात्मरूप सिद्धीही त्याला अनायासे प्राप्त होते. तसेच तत्त्वांनी संघटित झालेली वस्तूही त्या सिद्धयोग्याच्या दृष्टीने वेगळी किंवा एकत्रित होते. अशा प्रकारे स्वात्मपरिवर्तनाने आत्मरूप पावलेल्या पदार्थांची अनेक प्रकारची उलट सुलट रूपे करावयाला तो सिद्धयोगी समर्थ होतो. ही त्याची प्रभुशक्ती होय. या प्रभुशक्तीचे स्वातंत्र्य अप्रतिहत असते. त्याला कोणीही अडवू शकत नाही.

तेथे म्हणजे चिदाकाशात आत्मलय झाला की, त्याला नाडीसंहार असे म्हणतात; कारण आत्मा अर्थात् चिदाकाश किंवा हृदयगत चित्त हे सर्वत्र सर्व नाड्यांचे मुख आहे असे म्हणतात.।।२९।।

प्राणापानादि सर्व वायूंच्या आधाराने नाड्या राहतात आणि वायूचा आधार व्यापक चैतन्य हे आहे. त्याच्या वृत्तींच्या लयामध्ये षड्गुण वृत्ती ही

उत्तम होय.।।३०।।

स्थिरत्व म्हणजे पृथ्वीचा धर्म, द्रवत्व म्हणजे जलधर्म, उष्णत्व म्हणजे तेजोधर्म, चलत्व म्हणजे वायुधर्म व सुषिरत्व म्हणजे पोकळी किंवा आकाशधर्म आहे. यांच्या उलटही पंचमहाभूतांचे गुण होऊ शकतात. चलत्व, घनत्व, शीतत्व, अचलत्व व सांद्रत्व हे या पंचमहाभूतांचे स्वरूप होय किंवा शरीरगत पार्थिवादि अवयवीय धर्मावरून भावना केली की, साधकभक्तयोगिशिष्य भूतांवर विजय मिळवू शकतो. या पंचमहाभूतांचा निरास केला असता या योग्याला निरुपाधिक कैवल्याचा लाभ होतो.।।३१-३२।।

तो आत्मबलाने स्वतःवर भासणाऱ्या पंचमहाभूतांच्या सामर्थ्याने युक्त असणाऱ्या प्रत्येक पंचमहाभूताला आभासाचा आभास करून छत्तीसतत्त्वांच्या सामर्थ्याने युक्त असणाऱ्या प्रत्येक पंचमहाभूताला वेगळे वेगळे करतो.।।३३।।

किंवा तो सिद्धयोगी त्या पंचमहाभूतांना समूहात किंवा संघातात ठेवतो, आत्म्यात म्हणजेच स्वतःत ठेवतो किंवा त्या पंचमहाभूतांमध्ये विकार उत्पन्न करू शकतो. हीच सर्वत्र अखंडित स्वरूपात राहणाऱ्या सिद्धयोग्याची व्यापक प्रभुशक्ती आहे.।।३४।।५।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**नाडीसंहार-भूतजय-भूतकैवल्य-भूतपृथक्त्वानि।।५।।**" अर्थात् "नाडीसंहार म्हणजे प्राणादींना वाहून नेणाऱ्या नाड्यांचा मध्यनाडी अर्थात् सुषुम्नानाडीत प्रवेश करविणे होय. पंचमहाभूतांचा जय म्हणजे पृथ्वी आदि पंचमहाभूतांचा लय करण्याचे सामर्थ्य प्राप्त होणे होय अर्थात् पंचमहाभूतांना केवळ एकटेच ठेवणे व त्यात न मिसळणे म्हणजे भूतजय होय. भूतकैवल्य म्हणजे चित्त त्या पंचमहाभूतांपासून परत घेणे अर्थात् चित्ताला विषयांपासून आत वळविणे होय. भूतपृथकत्व म्हणजे भूतसंबंध नसलेली स्वच्छ आणि स्वच्छंद अशी चैतन्यात्मकता होय." साधकभक्तयोगिशिष्याने भावना करावी असा याचा अर्थ आहे.।।५।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे ध्यान नावाचा हा जो संहाराचा उपाय सांगितला आहे।।१९।।

त्या उपायाला मुख्य मानून प्राणायाम ते समाधीपर्यंतचे अन्य उपाय "**नाडीसंहार-भूतजय-भूतकैवल्य-भूतपृथक्त्वानि।।५।।**" अर्थात् "साधकभक्तयोगिशिष्याने सुषुम्नालय, पंचमहाभूतांचा लय व चित्ताचा लय चैतन्यात करावा" म्हणून या सूत्रात सांगितले आहे.।।१९.५।।

जो साधकभक्तयोगिशिष्य साधनेशी जोडला गेलेला आहे त्याने वरील सूत्रात सांगितलेल्या उपायांची भावना अर्थात् विचार करावा असा याचा अर्थ आहे.।।२०-२०.५।।

प्राणादि धारण करणाऱ्या नाड्यांचा संहार केल्याने प्राणांचा संयम होतो.।।२१।।

रेचकादि क्रमाने प्राणायाम साधून प्राणादिवातवहनाड्यांचा उदानरूप मध्यनाडीमध्ये विलय करणे हा नाडीसंहार होय; कारण सर्व नाड्या वायू व अग्निमय आहेत.।।२१-२२।।

आता पृथ्वी इत्यादि पंचमहाभूतांचा जय म्हणजे काय ते सांगतात. अंगठ्यामध्ये वायुविषयक धारणा करावी. नाभिस्थानी अग्नीची धारणा,।।२३।।

गळ्याच्या स्थानी महीसंबंधी म्हणजे पृथ्वीसंबंधी धारणा, कंठघाटीत जलाची धारणा व मस्तकाच्या जागी आकाशाची धारणा करावी म्हणजे त्या सर्व सिद्धी देणाऱ्या होतात अर्थात् यामुळे सर्व प्रकारच्या सिद्धी मिळू शकतात.।।२४।।

यामुळेच "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथामध्ये या पंचमहाभूतांच्या धारणांमुळे ही महाभूते वश होतात असे म्हटले आहे. या पंचमहाभूतांपासून चित्ताचे आहरण अर्थात् स्वतः चित्ताला आपल्याकडे खेचून घेतल्यामुळे भूतकैवल्य प्राप्त होते.।।२५।।

चित्ताला स्वतःकडे खेचून भूतभौतिक पदार्थांपासून स्वच्छ अशा आत्मरूपात चित्त लावल्याने "**भूतपृथक्त्व**" (भूतांपासून वेगळे राहणे) ही सिद्धी प्राप्त होते. "**भूतसन्धान**" इत्यादि सूत्रात या आधी जे फळ सांगितले आहे।।२६।।

ते शांभवोपायांचा अवलंब करणाऱ्या साधकाला सहज लाभणारे आहे; पण आणवोपायाचा अवलंब करणाऱ्या साधकाला प्रयत्नानेच त्या सिद्धी मिळतात. हा या उपायाचा विशेष गुण आहे. येथे फलप्राप्ती सारखीच आहे; पण उपायदृष्ट्या सुलभता व कठिणता हा फरक आहे.।।२७।।५।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

ज्याप्रमाणे "**ध्यान**" नावाचा जो संहारोपाय मागच्या सूत्रात सांगितला त्याप्रमाणे "**नाडीसंहार-भूतजय-भूतकैवल्य-भूतपृथक्त्वानि।।५।।**" अर्थात् "साधकभक्तयोगिशिष्याने सुषुम्नालय, पंचमहाभूतांचा लय व चित्ताचा लय चैतन्यात करावा," म्हणून या सूत्रात प्राणायामापासून समाधीपर्यंत अन्य उपाय सांगितले जात आहेत.

नाडीसंहारादींचे साधकभक्तयोगिशिष्यांने नेहमी चिंतन करावे. प्राण व अपानादींना वाहून नेणाऱ्या नाड्यांचे म्हणजेच छिद्रांचे पूरकादींच्या अर्थात् पूरक, कुंभक व रेचक यांच्या अभ्यासाने बाह्य आणि आंतर भागात प्रसरण करून जे मिलन होते तोच त्यांचा संहार होय. या वचनानुसार एकाच उदानअग्निस्वरूप अशा सुषुम्ना नावाच्या मध्यनाडीत त्या सर्व नाड्यांना विलीन करावे. याचा भावार्थ असा आहे की, दीर्घकालापर्यंत कुंभकप्राणायामाचा अभ्यास केल्याने सर्व नाड्यांमध्ये पसरण्याचा स्वभाव असलेला प्राणवायूच उदानवायूत लीन केला जातो अर्थात् मिसळला जातो. त्याच्या वहनत्वामुळे त्यांना "**नाडीसंहार**" या नावाने ओळखिले जाते. त्याचप्रमाणे उजव्या नाकपुडीने रेचक करावा तर डाव्या नाकपुडीने वायुपूरण अर्थात् पूरक करावा. अशा प्रकारे सतत केल्या जाणाऱ्या या क्रमाने नाडी नावाच्या विमुक्तमार्गाचे अथवा मध्यधामाचे म्हणजे सुषुम्नेचे परिशोधन होते म्हणजेच कुंभकरूप वायूचे प्रशमन होते.

भूतजय म्हणजे पृथ्व्यादि पंचमहाभूतांना धारणा आदि करून ताब्यात घेणे होय.

याविषयी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**वायवी धारणाङ्गुष्ठे आग्नेयी नाभिमध्यतः।**
**माहेयी कण्ठदेशे तु वारुणी घण्टिकाश्रिता।।**
**आकाशधारा मूर्ध्नि सर्वसिद्धिकरी स्मृता।**
**भूतकैवल्यो नाम भूतेभ्यो चित्तस्य प्रत्याहरणम्।।**
**भित्वा क्रमेण सर्वाणि उन्मनान्तानि यानि च।**
**पूर्वोक्तलक्षणैर्देवि त्यक्त्वा स्वच्छन्दतां व्रजेत्।।**

**अर्थ :-** वायवी धारणा अंगठ्यात, नाभी म्हणजेच बेंबीच्या मध्ये आग्नेयी, गळ्याच्या भागात माहेयी अर्थात् पृथ्वीसंबंधी, मस्तकात आकाशाची व कंठस्थानी जलाची अशा धारणा करावयाच्या असून या सर्व धारणा सर्व सिद्धी देणाऱ्या आहेत. भूतकैवल्य म्हणजे भूतांपासून चित्ताला मागे फिरविणे होय. जी उन्मनापर्यंतची सर्व स्थाने आहेत ती पूर्वी सांगितलेल्या लक्षणांनी क्रमाने नष्ट करून हे देवी! स्वच्छंदत्व प्राप्त करावे अर्थात् पूर्ण स्वातंत्र्याचा लाभ घ्यावा.

भूतांपासून पृथक्त्व म्हणजेच भूतांमध्ये आसक्त झालेल्या अर्थात् चिकटलेल्या आत्म्याची स्वच्छ[illegible] मिळविणे होय. हेच आणखी स्पष्ट करताना असे म्हटले

आहे की, हृदय, कंठ इत्यादि जी सर्व स्थाने आहेत त्यांचे पूर्वी सांगितलेल्या लक्षणांनी भेदन करून व या सर्वांचा पूर्णपणे त्याग करून महायोगाचा आश्रय घेतलेल्या व त्यात पूर्णपणे स्थिर झालेल्या पुरुषाने अत्यंत घनदाट व प्रगाढ अशा उन्मना अवस्थेत प्रकर्षाने विश्रांती घेतल्यामुळे व तुर्यावस्थेची प्राप्ती हाच प्रसाद मिळविल्यामुळे त्याला सच्चिदानंदस्वरूप परम श्रीशिवावस्था अनुभवावयाला येते. "**भूतसंधान........**" इत्यादि सूत्राने प्रथम उन्मेषात जे सांगितले त्यात मात्र शांभवोपायाच्या पूर्णतेत प्रविष्ट झालेल्या योग्याला अत्यंत सहज व थोडक्या प्रयत्नातच हे सर्व मिळते व आणवोपायाने मात्र ते प्रयत्न करूनच साध्य होते असा हा भेद आहे.।।५।।

**विवरण :-** प्राणायाम, धारणा, प्रत्याहार आणि समाधी हे या श्रीशैव-तत्त्वज्ञानानुसार आणवोपायाच्या विभागात येतात. या आणवोपायाच्या प्रक्रिया योग्य तऱ्हेने वापरून काही सिद्धी कशा प्रकारे मिळविता येतात हे या सूत्रात सांगितले आहे.

शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध यांचे बाह्य ज्ञान नाड्यांच्या द्वारे होत असते. या नाड्यांनी सर्व शरीर व्यापलेले आहे आणि त्यांचा संबंध सुषुम्नानाडीशी आहे. नाड्यांमधून प्राणशक्तीचा प्रवाह जातो. प्राणच सूक्ष्म शरीराला स्थूल शरीराशी जोडतो आणि सूक्ष्म शरीर व पंचज्ञानेंद्रियांचे शब्द व स्पर्श आदि ज्ञान हे पाच तत्त्वांशी संबंधित आहे. पृथ्वीशी गंध, जलाशी रस, अग्नीशी रूप, वायूशी स्पर्श आणि आकाशाशी श्रवण अर्थात् ऐकणे असा तो संबंध आहे. पृथ्वीचा संबंध मूलाधाराशी, जलाचा स्वाधिष्ठानाशी, अग्नीचा मणिपूरचक्राशी, वायूचा अनाहत चक्राशी आणि आकाशाचा विशुद्धचक्राशी संबंध आहे. या चक्रांची जागा सुषुम्नानाडीमध्ये आहे. हठयोगाच्या क्रियांनी नाडीशुद्धी केली जाते आणि प्राणायामद्वारा प्राणांवरती संयम येतो. नाड्यांच्या शक्तींच्या लय-क्रमाला "**संहार**" असे म्हटले आहे आणि हे काम प्राणाची गती आपल्या इच्छेनुसार संचालित केल्यानेच होते. त्यामुळे नाडीशुद्धी हाच नाडीसंहार असे मानले पाहिजे.

कर्मेंद्रियांचे व्यापारही असेच समजून घेतले पाहिजेत. जी प्राणशक्ती नाड्यांमध्ये प्रवाहित होऊन बाह्य दृश्याशी संबंध करविते त्या प्राणशक्ति-द्वाराच हे सर्व व्यापार संचालित होत असतात. ही प्राणशक्ती अंतर्मुख झाली असता प्रतिप्रसव अर्थात् उलट क्रम निर्माण होतो. प्राण सुषुम्ना नाडीत विलीन झाले असता बाह्य ज्ञानाचा विच्छेद अथवा नाश होतो. या प्रक्रियेलाच येथे

नाडीसंहार असे म्हटले आहे. त्यानंतर प्राणशक्तीचा संयम करून पाच तत्त्वांवर विजय मिळविला जातो. हा भूतजयाचा विषय आहे. यामध्ये साधकभक्तयोगिशिष्य आपल्या देहामधल्या पाच तत्त्वांना कमी किंवा जास्त करण्याच्या अथवा स्थूल किंवा सूक्ष्म बनविण्याच्या सामर्थ्याने युक्त होतो म्हणजेच त्याला अणिमादि सिद्धी प्राप्त होतात; परंतु त्याचा देहाभिमान मात्र तसाच शिल्लक राहतो.

भूतकैवल्यामध्ये साधकभक्तयोगिशिष्य हा आपले सूक्ष्म शरीर स्थूल शरीराहून वेगळे काढतो; परंतु तो स्थूल शरीरातच असल्याने बाह्य दृश्याचे ज्ञान आणि संबंध स्थूल शरीराच्या आश्रयाने पूर्वीप्रमाणेच राहते. भूतपृथक्त्वामध्ये मात्र सूक्ष्म शरीराला आपल्या ज्ञानासाठी स्थूल शरीराची अपेक्षा राहत नाही. "**श्रीपातंजलयोगसूत्रे**" या ग्रंथाच्या विभूतिपादात यालाच "**बहिरकल्पिता वृत्तिर्महाविदेहा ततः प्रकाशावरणक्षयः ।।३.४३।।**" अर्थात् "शरीराच्या बाहेर असलेल्या व कल्पना न केलेल्या वृत्तीला महाविदेहा असे म्हणतात. तिच्यामुळे प्रकाशाच्या आवरणाचा नाश होतो," असे म्हटले आहे. अशा योग्याला परकायाप्रवेशाची सिद्धी प्राप्त होते.

वरील चारही अवस्थांचे वर्णन ज्याप्रमाणे येथे केले आहे ते योगदर्शनानुसार संयम सिद्ध केला असता सिद्ध होते; परंतु सुरुवातीला क्रमशः प्राणायाम, प्रत्याहार, धारणा आणि समाधी यांचा अभ्यास होणे आवश्यक आहे. या क्रमानेच स्थूल शरीराच्या अध्यासावर जय मिळविणे शक्य होते. सिद्धयोगसाधनात साधकाची कुंडलिनी शक्ती जागृत झालेली असल्यामुळे ती सर्व साधने स्वतःच करवून घेते; परंतु सामान्य साधकाला मात्र हे सर्व आपल्या स्वतःच्या परिश्रमांनी करावे लागते आणि ते अत्यंत कष्टसाध्य आहे.।।५।।

**सूत्र क्रमांक ६**

**संबंध :-** स्वकारणात पंचमहाभूतांची एक दुसऱ्यामध्ये लय भावना केल्याने तत्त्ववशीकरणरूपा सिद्धी प्राप्त होते. यालाच देहशोधन सिद्धी असे म्हणतात. ही सिद्धी मोहाच्या आवरणानेच होते, तत्त्वज्ञानाने नाही. ही गोष्ट पुढे श्रीशिवव्याप्तीच्या प्रकरणात स्पष्ट केली आहे. श्रीशिवव्याप्तिलाभ झाल्यानंतर सिद्धयोग्याला समाधी आणि व्युत्थान या दोन्ही अवस्थांमध्ये स्वस्वरूपाची जाणीव होत असते. त्यालाच जगदानंद असे म्हणतात.

**मोहावरणात्सिद्धिः ।।६।।**

**शब्दार्थ :- मोह** - माया किंवा अज्ञान अर्थात् बाह्यसंसारोन्मुखाने

कामोपभोगाकांक्षातृष्णावासनाआकांक्षासंकल्पनादींमध्ये अखंड रत असलेली कुंडलिनी शक्ती. **आवरणात्** - कुंडलिनी शक्तीत किंवा आत्मव्याप्तीत आवरण असल्यामुळे. **सिद्धिः** - सिद्धी अर्थात् संसारभोगांची सिद्धी होते; परंतु परतत्त्वाच्या प्रकाशापासून म्हणजे श्रीशिवशक्तिसामरस्यापासून साधक-भक्तयोगिशिष्य वंचित राहतो म्हणजे त्याची सिद्धी होत नाही.

**अर्थ :-** (मागील सूत्रातील) या सिद्धी मोहाने किंवा मायेने अर्थात् बाह्य-संसारोन्मुखाने कामोपभोगाकांक्षातृष्णावासनासंकल्पनादींमध्ये अखंड रत असलेल्या कुंडलिनी शक्तीने आवृत असतात. त्यामुळे परतत्त्वाचे ज्ञान होत नाही अर्थात् आत्मव्याप्तीत मोहावरण शिल्लक राहत असल्याने त्या तत्त्वाच्या भोगाची सिद्धी होते; मात्र परातत्त्वाच्या प्रकाशापासून म्हणजे श्रीशिवशक्ति-सामरस्यापासून साधकभक्तयोगिशिष्य वंचित राहतो.।।६।।

**विशेष व्याख्या :-** पाचव्या सूत्रात सांगितलेल्या प्राणायाम, धारणा, प्रत्याहार आणि समाधी यांची साधना करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याला परतत्त्वाचा प्रकाश अर्थात् ज्ञान प्राप्त होण्याआधी मित सिद्धी प्राप्त होतात. तो साधनकाळातच आत्मतत्त्वात व्याप्त होतो; परंतु मितसिद्धीत जर तो अडकून राहिला तर त्याला परतत्त्वाचा प्रकाश प्राप्त होण्याला अडचणी येतात. साधक-भक्तयोगिशिष्य आत्मव्याप्त राहूनही सिद्धींना मोहित झाल्याने त्याच्यावर मायेचे आवरण राहत असते. त्यामुळे असा साधकभक्तयोगिशिष्य विद्वान् नसून मूर्खच असतो.

"**श्रीपातंजलयोगदर्शन**" या ग्रंथात यासंबंधी असे म्हटले आहे की -

**ते समाधावुपसर्गा व्युत्थाने सिद्धयः।।३.३७।।**

**अर्थ :-** त्या सिद्धी परमतत्त्वाचे ज्ञान अर्थात् समाधी प्राप्त करण्यासाठी विघ्ने आहेत आणि जाग्रत अवस्थेत विविध ऐश्वर्य व अद्भुत गोष्टी मिळवून देणाऱ्या सिद्धी आहेत.

उपरोक्त सूत्रात समाधीला उपसर्ग करणाऱ्या ज्या सहा सिद्धींचा उल्लेख केला आहे त्या प्रातिभ, श्रावण, वेदना, आदर्श, आस्वाद व वार्ताज्ञान या असून त्यांचे वर्णन "**श्रीपातंजलयोगदर्शन**" या ग्रंथात "**प्रातिभश्रावण-वेदनादर्शास्वादवार्ता जायन्ते।।३.३६।।**" या सूत्रात केले आहे. त्या सिद्धी अशा आहेत.

**(१) प्रातिभ :-** मनाने सूक्ष्म अर्थात् अतींद्रिय, व्यवहित म्हणजे लपलेल्या, विप्रकृष्ट म्हणजे दूरस्थ, अतीत व अनागत वस्तूंना जाणण्याची योग्यता.

**(२) श्रावण** :- श्रोत्रेंद्रियांची दिव्य आणि दूरचा शब्द ऐकण्याची योग्यता.

**(३) वेदना** :- त्वचारूप इंद्रियाची दिव्यस्पर्श जाणण्याची योग्यता.

**(४) आदर्श** :- नेत्रेंद्रियांची दिव्यरूप पाहण्याची योग्यता.

**(५) आस्वाद** :- रसनेंद्रियाची दिव्यरस जाणण्याची योग्यता.

**(६) वार्ता** :- घ्राणेंद्रियाची दिव्यगंध घेण्याची योग्यता.

ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य आत्मव्याप्तीपर्यंत मोहावर विजय मिळतो त्यावेळेला त्याला समाधीत चिदानंदाचा लाभ होतो.।।६।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

माया हा शब्द या सूत्रात भ्रम अथवा फसवी किंवा मिथ्या अर्थात् बाह्यसंसारोन्मुखाने कामोपभोगाकांक्षातृष्णावासनासंकल्पनादींमध्ये अखंड रत असलेली कुंडलिनी शक्ती या अर्थाने वापरला आहे.

अशा रीतीने देहशुद्धी म्हणजे कारणात कार्यांचा लय किंवा कालाग्नीने देहदग्धभावना या दोन दृष्ट्या देहशोधन, भूतशुद्धी, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधी या सात प्रकारांनी त्या त्या तत्त्वाची जी सिद्धी होते ती मोहावरणामुळे होते, तत्त्वज्ञानामुळे नाही असे "**मोहावरणात्सिद्धिः।।६।।**" या सूत्रात सांगितले आहे.

मोह उत्पन्न करतो म्हणून मोह अर्थात् माया होय. तिने केलेल्या आवरणामुळे धारणा, ध्यान व समाधीच्या क्रमाने मिळविलेल्या त्या त्या तत्त्वभोगरूप सिद्धी प्राप्त होतात; परंतु तत्त्वाचा प्रकाश अर्थात् ज्ञान मात्र होत नाही.

यासंबंधी "**श्रीलक्ष्मीकौलार्णव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**स्वयम्भूर्भगवानन्देवो जन्मसंस्कारवर्जितः।**
**निर्विकल्पं परं धाम अनादिनिधनं शिवम्।।**
**प्रत्यक्षं सर्वजन्तूनां न च पश्यति मोहितः।।**

**अर्थ** :- स्वयंभू अर्थात् स्वतःसिद्ध, जन्मादि संस्कारांनी विरहित, विकल्प किंवा विचार यांनी रहित, सर्वश्रेष्ठ धाम असलेला, आदि व अंत नसणारा आणि सर्व जंतूंचे प्रत्यक्ष कारण असणारा भगवान् देव श्रीशंकर असून अशा श्रीशंकरांना मायेने मोहित झालेला जीव पाहू शकत नाही.

**विवरण** :- दुसऱ्याची गरज न ठेवता स्वतःच्या स्वातंत्र्यशक्तीने युक्त, विश्वाच्या सृष्टिसंहारादि क्रीडा करण्यात तत्पर, द्योतनादि म्हणजे चमकणे, स्वप्रकाश असणे आदि तत्त्वांसहित असणारे आणि चिद्धन श्रीपरमेश्वर

किंवा श्रीभगवान् अगर देवच स्वतः स्वेच्छेनेच, अन्य कोणत्याही प्रयोज-
नांची अपेक्षा न ठेवता, रुद्र व क्षेत्रज्ञ अर्थात् जीव इत्यादि अनेक प्रकारच्या
प्रमात्यांच्या रूपाने अस्तित्वात येऊन स्फुरण पावतात आणि मायिक ज्ञातृ-
त्वाचा आधार घेऊन स्वतःचा स्वतंत्र असा चिद्घन स्वभाव विसरतात. ते
पशू, पक्षी, नर व सरपटणारे प्राणी इत्यादींच्या जन्मातील संस्कार विसरून
त्या जन्मांच्या संस्काररूप वासनांनी रहित होतात व अस्वतंत्रतेला प्राप्त
झाल्यामुळेच मोहित होऊन वेगवेगळ्या प्रकारच्या वेद्य अभिव्यक्तींनी युक्त
असणाऱ्या मायीय पाशांनी मलिन होऊन सर्व प्राणिमात्रांना श्रीशिवप्रकाशा-
वाचून सत्ता किंवा अस्तित्व नाही हे विसरून चित्प्रकाशस्वभाव स्वात्म्याला
पाहत नाहीत अर्थात् त्यांचा विचार करीत नाहीत असा तात्पर्यार्थ आहे.

ज्याचा मोह गळालेला किंवा नष्ट झालेला आहे अशा सिद्धयोग्याचा मात्र
"**श्रीमृत्युजिद्भट्टारक**" अर्थात् "**श्रीनेत्रतंत्र**" या ग्रंथात सांगण्यात आलेल्या
धारणादि प्रकारांनीही परतत्त्वात समावेशच होतो; त्याला मितसिद्धी मिळत
नाहीत, हे खालील प्रकारे स्पष्ट केले आहे.

**मध्यमं प्राणमाश्रित्य प्राणापानपथान्तरम्।**
**आलम्ब्य ज्ञानशक्तिं च तत्स्थं चैवासनं लभेत्।।**

**अर्थ :-** साधकभक्तयोगिशिष्याने मध्यम म्हणजेच सुषुम्ना नाडीतील उदान
प्राणाचा आश्रय घ्यावा. हा मध्यमसुषुम्नामार्ग प्राण व अपान यांचा मधील मार्ग
आहे. त्याचप्रमाणे त्याने ज्ञानशक्तीचा आधार घेऊन व त्यात म्हणजे ज्ञानशक्तीतच
अर्थात् ज्ञानरूप कुंडलिनी शक्तीतच स्थिर होऊन आसन प्राप्त करावे.

**विवरण :-** मध्यमप्राण म्हणजे ज्ञानशक्तिरूप उदानवायू होय. उदान-
वायूचा प्राणीयभाव नष्ट होऊन चिद्व्याप्ती प्रकट झाल्यानंतर त्याला ज्ञान-
शक्तिरूपत्व असते. बुद्धी नसताना ज्ञान कसे होते? असे घोटाळ्यात पडू
नये; कारण ज्ञान हे अखंड अथवा निरंतर उदितच असते.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**अख्यात्युल्लसितेषु भिन्नेषु भावेषु बुद्धिरुच्यते अभेदे चिन्मये बोध।**

**अर्थ :-** उल्लसित होणाऱ्या भिन्न भावांमध्ये किंवा पदार्थांमध्ये असणारी
जी शक्ती तिला बुद्धी असे म्हणतात आणि अभेदरूप चिन्मयाला ज्ञान असे
म्हणतात.

श्रीसोमानंदपादाचार्यांनीही असे सांगितले आहे की -

**बुद्धिं विना कथं बोधः सा बुद्धिः प्रकृतेः प्रजा।**

**न च तस्य तया योग इति चेदपरस्थितौ।।**
**सा बुद्धिर्यत्पुनः सूक्ष्मं सर्वदिक्कं व्यवस्थितम्।**
**ज्ञानं बोधमयं तस्य शिवस्य सहजं सदा।।**

**अर्थ :-** बुद्धिशिवाय बोध अर्थात् ज्ञान कसे शक्य आहे? ती बुद्धी म्हणजेच प्रकृतीची प्रजा अर्थात् प्रकृतीपासून निर्माण झालेली प्रजा आहे. जर ज्ञानाचा आणि बुद्धीचा योग म्हणजेच संबंध नाही असे असेल तर अपरस्थितीमध्ये जी बुद्धी असते ती सूक्ष्म व सर्व दिशांमध्ये स्थित असणाऱ्या श्रीशिवांचे सहज व बोधमय असे ज्ञान आहे.

**विवरण :-** त्या ज्ञानशक्तीच्या उन्मिषित होणाऱ्या स्फुरत्तारूप संविच्छक्तीचा आधार घेऊन त्यात स्थिर होऊन साधकभक्तयोगिशिष्य आसनाची प्राप्ती करून घेतो. स्वतःच्या ज्ञानशक्तीत स्थिर झालेला तो चैतन्ययुक्त श्रीमहेश-स्वरूपच होतो.

**प्राणादिस्थूलभावं तु त्यक्त्वा सूक्ष्ममथान्तरम्।**
**सूक्ष्मातीतं तु परमं स्पन्दनं लभ्यते यतः।।**
**प्राणायामः स निर्दिष्टो यस्मान्न च्यवते पुनः।। श्रीनेत्रतंत्र।।**

**अर्थ :-** प्राणादि स्थूलभावांचा आणि सुषुम्नेत होणाऱ्या सूक्ष्म प्राणायामाचा त्याग करून सूक्ष्माच्याही पलीकडचे जे परम किंवा श्रेष्ठ स्पंदन मिळविले जाते त्यालाच प्राणायाम असे म्हणतात व त्यापासून च्युती होत नाही म्हणजेच परत पतन होत नाही.

**विवरण :-** प्राण, अपान आणि समान यांच्यामध्ये जो स्थूल रेचकपूरकादि स्वभाव आहे त्याचा त्याग करून आणि या स्थूल प्राणायामापेक्षाही आंतरिक सूक्ष्म प्राणायाम अर्थात् आंतर म्हणजेच मध्यपथाने अर्थात् सुषुम्नामार्गाने होणारा जो रेचन व आचमनादिरूप प्राणायाम असतो त्याचा त्याग करून त्यापासून सूक्ष्माच्याही पलीकडचे असलेले परम व अप्राणादि अचित्तात्मक स्पंदन मिळविले जाते. त्यापासून तेच श्रेष्ठ स्पंदन आणि त्या स्पंदनापासूनच स्थूल व सूक्ष्म अशा रीतीने भेदाला प्राप्त झालेल्या प्राणांचा आयाम कथन केला अर्थात् शांत झालेल्या मुख्य अवभासाने युक्त नियम निर्दिष्ट केला अर्थात् उत्कृष्ट तऱ्हेने निरूपिला. हा प्राणायाम प्राप्त करून पुन्हा च्युती होत नाही अर्थात् चित्प्रमातृमयता कधीही त्यागली जात नाही.

**शब्दादिगुणवृत्तिर्या चेतसा ह्यनुभूतये।**
**त्यक्त्वा तां परमं धाम प्रविशेत्तत्स्वचेतसा।।**

**प्रत्याहार इति प्रोक्तो भावपाशनिकृन्तनः।।**

**अर्थ :-** ज्या शब्दादि गुणांच्या वृत्ती चित्ताद्वारा अनुभविल्या जातात त्यांचा त्याग करून श्रेष्ठ स्थानी स्वचित्ताच्या साहाय्याने प्रवेश करावा. त्यालाच प्रत्याहार असे म्हणतात व तो संसाराचे पाश कुरतडून टाकणारा आहे.

**विवरण :-** शब्दस्पर्शादि गुणांच्या म्हणजे सत्त्वादींच्या ज्या कोणत्या अवस्था संवित्द्वारा अनुभविल्या जातात त्यांचा अनादरपूर्वक त्याग करून किंवा त्यांना बाजूला सारून स्वचित्त म्हणजेच विकल्परहित संवित्च्या विचारानेच परचिद्धामात प्रवेश करावा. हेच त्या भूमीपासून म्हणजे मूलाधारापासून पसरलेल्या चित्ताचे विरुद्ध गतीने चैतन्याकडे लक्ष लावणे होय. त्यामुळेच तो प्रत्याहार भवपाशांना तोडणारा असे म्हटले आहे.

**धीगुणान्समतिक्रम्य निर्ध्येयं परमं विभुम्।**
**ध्यात्वा ध्येयं स्वसंवेद्यं ध्यानं तच्च विदुर्बुधाः।।**

**अर्थ :-** बुद्धीच्या गुणांना ओलांडून जाणाऱ्या, श्रेष्ठ व व्यापक अशा, स्वसंवेद्य असलेल्या आणि कोणाच्याही ध्यानाचे ध्येय न होणाऱ्या अर्थात् ज्याचे ध्यान सहज करता येत नाही अशा ध्येयाचे अर्थात् श्रीपरमशिवांचे ध्यान करावे. त्यालाच ज्ञानी ध्यान असे म्हणतात.

**विवरण :-** बुद्धीच्या सत्त्वादिगुणांना समावेशाद्वारा शांत करून ठराविक आकृतिरूपादींच्या पलीकडील सर्वव्यापक, अव्यय, नित्य, स्वप्रकाश, ध्येय अर्थात् ध्यानाला योग्य अशा श्रीपरमेश्वराचे अर्थात् श्रीपरमशिवांचे अध्ययन, विचार व स्मरण करावे अर्थात् चिदानंदघन श्रीपरमेश्वराचे ध्यान व विचार करावा. तत्त्व जाणणारे अर्थात् ज्ञानीसाधकभक्तयोगिशिष्य श्रीपरमेश्वराचा विमर्श अथवा विचार हेच ध्यान अखंड व पारंपारिक रीतीने जाणतात. येथे "च" हे पद "एव" अर्थात् "च" या अर्थी आले आहे.

**धारणा परमात्मत्त्वं धार्यते येन सर्वदा।**
**धारणा सा विनिर्दिष्टा भवपाशनिवारिणी।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला परमतत्त्वाची साधकभक्तयोगिशिष्याकडून अखंड जाणिवेत धारणा केली जाते त्यावेळी त्याला धारणा असे म्हणतात. तीच भवपाश निवारण करणारी आहे.

**विवरण :-** ज्या साधकभक्तयोगिशिष्याकडून चैतन्य सतत किंवा अखंड समावेशाने अवलंबिले जाते त्याची जी चैतन्यविमर्शयुक्त वृत्ती असते तीच

संसाराची बंधने तोडण्याला कारण असते. येथे धारणा हा शब्द अन्य प्रकारच्या धारणांहून विलक्षण म्हणून निर्देशिलेला आहे. ही धारणा विरुद्ध लक्षणांची म्हणजेच श्रीपतंजलींनी सांगितलेल्या धारणांहून वेगळी आहे. ज्या धारणेमुळे चिद्धन आनंदपरमात्मप्रकाशांचा समूह वाढतो व पुष्ट होतो तीच खरी धारणा होय. प्राणिमात्रांच्या अधिकरणाविषयीचे त्रिकोण व चतुष्कोणादि स्वरूपाचे ज्ञान म्हणजे धारणा नव्हे.

**स्वपरस्थेषु भूतेषु जगत्यस्मिन्समानधीः।**
**शिवोहमद्वितीयोहं समाधिः सः परः स्मृतः।।**

**अर्थ :-** या जगात स्वतःमध्ये किंवा इतर भूतमात्रांमध्ये समानबुद्धीने मी श्रीशिव आहे व मी अद्वितीय आहे अशी जी भावना ठेवलेली असते तिलाच श्रेष्ठ समाधी असे म्हणतात.

ग्राह्य व ग्राहक या जोडीने स्थित असणाऱ्या पदार्थांमध्ये हे सर्व मी आहे अशा अहंता व इदंतात्मक समानाधिकरणात्मक शुद्धविद्येच्या उदयाच्या अध्यवसायाचे स्वरूप असणारी समाधी होय. शुद्धविद्येमुळे असा जो निश्चय होतो व तो स्थिर राहतो हीच समाधी होय.।।६।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१)** सुषुम्नानाडीतील प्राणाला उदान असे म्हणतात. उदान शक्ती ज्यावेळेला तिच्या शेवटच्या मर्यादेपर्यंत विकसित होते त्यावेळेला तिला ज्ञानशक्ती असे म्हणतात. तिलाच अचूक प्रज्ञा किंवा ज्ञान असेही म्हणतात. श्रीक्षेमराजाचार्यांनी या श्लोकावरच्या टीकेत असे म्हटले आहे की, **"मध्यनाड्यां भवं प्राणमित्यूर्ध्वगामिनमुदानमाश्रित्य, ततश्च प्राणीयव्याप्तीनिमज्जनेन चिद्व्याप्तिमुन्मज्जनात् ज्ञानशक्तिमुन्मिषत् स्फुरत्तारूपां संविदमालम्ब्य।"** अर्थात् "ज्यावेळेला प्राण आणि अपान सुषुम्नेत बुडून जातात त्यावेळेला तेथे उदानाचे कार्य सुरू होते. प्राणाचे कार्य संपताना आणि चित्‌चे कार्य सुरू होताना ज्ञानशक्तीचे कार्य सुरू होते. तिचे कार्य म्हणजे परमचैतन्याचे प्रकटीकरण होय. त्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्याने या ज्ञानशक्तीतच स्थिर व्हावयाला पाहिजे. त्यामुळे ज्ञानशक्ती हा शब्द येथे वापरला आहे.

**२)** सिद्धयोग्याचे पतन होत नाही म्हणजेच तो सिद्धयोगी आपण चित्प्रमाता असल्याचे कधीही विसरत नाही म्हणजेच तो चैतन्याचा ज्ञाता बनतो.

**३)** प्रत्याहार म्हणजे प्रति + आहार. प्रति म्हणजे प्रतीप म्हणजे विरुद्ध

बाजूला आणि आहार म्हणजे काढून घेणे अथवा मागे घेणे. तात्पर्य, प्रत्याहार म्हणजे जाणीव किंवा मन हे विरुद्ध दिशेकडे काढून घेणे अथवा मागे घेणे होय. या सध्याच्या संदर्भात फक्त एक मनच मागे घेणे असा प्रत्याहाराचा अर्थ होय. श्रीक्षेमराजाचार्य त्यांच्या टीकेत प्रत्याहाराचा अर्थ अगदी योग्य सांगतात. **"चिद्भूमेः प्रसृतस्य चित्तस्य तत्प्रतीपप्रापणात्मा प्रत्याहारः।।"** अर्थात् "चिद्भूमी म्हणजे चैतन्यापासून पसरलेल्या चित्ताला किंवा मनाला परत त्याच चैतन्याकडे आणणे किंवा मागे फिरविणे म्हणजे प्रत्याहार होय."

**४)** निर्ध्येय किंवा कोणाच्याही ध्यानाचा विषय न होणारे असे सर्वोच्च सत्याच्या बाबतीत म्हटले आहे; कारण एखाद्या गोष्टीवर ध्यान करावयाचे म्हणजे ती गोष्ट विषय होणार आणि सर्वश्रेष्ठ चैतन्य हे काही विषय होऊ शकत नाही. ते तर शाश्वत कर्ता आहे. ते प्रत्येकाच्या देहात तात्त्विक ज्ञात्याच्या स्वरूपात स्थित असते. त्याच्याहून मानसिक ज्ञाता वेगळा असतो. त्यामुळेच पुढच्या ओळीत **"ध्येयं स्वसंवेद्यम्"** अर्थात् "ज्याच्यावर ध्यान केंद्रित करावयाचे ते स्वतःच्या आत अनुभवावयाला यावयाला पाहिजे म्हणजेच त्याची केवळ आंतरिक अनुभूती यायला पाहिजे.

**५)** श्लोकात खरी समाधी म्हणजे समानधी अर्थात् सर्वांमध्ये समत्व पाहणे होय असे सांगितले आहे. समत्व पाहणे म्हणजेच सर्व प्राणिमात्रांमध्ये श्रीशिव अथवा मी स्वतः आहे असे समजणे होय. याचे यथायोग्य स्पष्टीकरण **"समानधीः"** याच्या भाषांतरात देणे अवघड आहे.।।६।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

तरी सुद्धा या जीवाच्या मोहाला जर पुष्कळ फाटे फुटले तर त्याला स्वरूपसिद्धी म्हणजेच स्वात्मज्ञान होईल की नाही? या शंकेला उत्तर देताना श्रीशंकर या सूत्रात असे म्हणतात की, **"मोहावरणात्सिद्धिः ।।६।।"** अर्थात् "मोहाच्या आवरणामुळे सामान्य सिद्धी प्राप्त होतात म्हणजे परतत्त्व-प्राप्तीची सिद्धी होत नाही."।।३५।।६।।

**विवरण :-** पारमार्थिकदृष्ट्या खालील पातळीवरील सिद्धींचा लाभ हा भेदज्ञानाला कारणीभूत होतो. त्यामुळे हा लाभ मायायुक्तच होय. हा लाभ साधकभक्तयोगिशिष्यांना स्वरूपाच्छादक ठरतो. त्यामुळे त्यांना म्हणजेच आत्मस्वरूपाच्या उपलब्धीसाठी किंवा प्राप्तीसाठी जर त्या अवस्थेत प्रहर्ष-कामादि वृत्तींना तिरोहित केले तर या प्रहर्षादि वृत्तींच्या आदिम किंवा अंतिम अवस्थांमध्ये चित्त एकाग्र केल्यावर सर्वज्ञत्वादि श्रेष्ठ अथवा पर सिद्धींचा

लाभ होतो.

काम, क्रोध, लोभ, हर्ष, भय, त्रास, मद व प्रहर्ष या सर्व भावनांमध्ये मोहाचेच साम्राज्य आहे.।।३६।।

तेच आवरण आहे; कारण ते स्वरूपाचे आच्छादक आहे. त्यामुळे त्याचा सर्व दृष्ट्या विचार केल्यास आत्म्याला सर्वज्ञता व सर्वकर्तृतारूपाची सिद्धी प्राप्त होते.।।३७-३७.५।।६।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**मोहावरणात्सिद्धिः ।।६।।**" अर्थात् पूर्वी सांगितलेले धारणादि क्रम संपादित करून प्राप्त झालेल्या मोहजन्य आवरणामुळे त्या त्या भोगतत्त्वाची सिद्धी होते; परंतु परतत्त्वाचा प्रकाश अर्थात् आत्मतत्त्वाचे ज्ञान होत नाही.।।६।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा रातीने देहशुद्धीपासून समाधीपर्यंत जी सिद्धी मिळते ती मोहादि आवरणामुळे मिळते; आत्मज्ञानामुळे नव्हे, असे "**मोहावरणत्सिद्धिः।।६।।**" अर्थात् "मोहावरणामुळे जरी सामान्य सिद्धींची प्राप्ती होत असली तरी परमतत्त्वसिद्धींची प्राप्ती होत नाही," या सूत्रात सांगितले आहे.।।२८।।

मोह म्हणजे मोहित करणारी माया होय. खरोखर त्या मायेने केलेल्या आवरणामुळे पूर्वी सांगितलेल्या व युक्तीने मिळविलेल्या धारणांमुळे सिद्धी संकुचित होतात.।।२९।।

त्या सिद्धी त्या त्या पृथ्व्यादि तत्त्वांच्या उपभोगस्वरूपाच्या असतात. तशा साधकभक्तयोगिशिष्याला परमचैतन्याचा प्रकाश किंवा ज्ञान लाभत नाही.।।२९.५।।६।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

स्वकारणात लयभावनारूपी शरीरशुद्धी, भूतशुद्धी, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधी इत्यादि उपायांमुळे ज्या ज्या सिद्धी निर्माण होतात त्या त्या सर्व मोहाचे आवरण असल्यामुळे अथवा मोहाचा सदसद्विवेकबुद्धीवर पडदा पडल्यामुळेच निर्माण होतात. सर्वश्रेष्ठ तत्त्वाचे ज्ञान झाल्यामुळे या सिद्धी मिळत नाहीत, असे "**मोहावरणात्सिद्धिः ।।६।।**" या सूत्रात सांगितले आहे.

मोह म्हणजेच माया होय. तिच्यापासून निर्माण झालेल्या आवरणामुळे धारणादि क्रमामुळे उपलब्ध झालेल्या त्या त्या तत्त्वभोगरूप सिद्धी निर्माण होतात; परंतु परतत्त्वाच्या ज्ञानाचा प्रकाश प्राप्त होत नाही.

या दृष्टीनेच "**श्रीलक्ष्मीकौलार्णव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**स्वयम्भूर्भगवान्देवो जन्मसंस्कारवर्जितः।**
**निर्विकल्पं परं धाम अनादिनिधनं शिवम्।**
**प्रत्यक्षं सर्वजन्तूनां न च पश्यति मोहितः।**

**अर्थ :-** स्वयंभू अर्थात् स्वतःसिद्ध, जन्मादि संस्कारांनी विरहित, विकल्प किंवा विचार यांनी रहित, सर्वश्रेष्ठ धाम असलेला, आदि व अंत नसणारा आणि सर्व जंतूंचे प्रत्यक्ष कारण असणारा भगवान् देव श्रीशंकर असून अशा श्रीशंकरांना मायेने मोहित झालेला जीव पाहू शकत नाही.

याचा भावार्थ किंवा तात्पर्यार्थ असा आहे की, अन्य कोणाचीही अस्तित्वा-साठी अपेक्षा नसणारा, आत्मस्वातंत्र्यशक्तिरूप, सहा प्रकारच्या ऐश्वर्यांनी युक्त श्रीभगवान्, विश्वाच्या सृष्टी, स्थिती व संहार करण्याच्या क्रीडेत मग्न असणारा, द्योतनादि तत्त्वांसहित असणारा देव आणि सच्चिदानंद असा परमात्मा स्वतःच स्वतःच्या स्वातंत्र्य व इच्छाशक्तींनी, अन्य कोणत्याही कारणाची अपेक्षा न करता त्या त्या रुद्रादींच्या रूपाने होणे किंवा असणे अशा स्वभावाचा स्फुरण पावून मायाप्रमातृत्व प्रकट करून परतत्त्वाचा प्रकाश विसरलेल्या अनेक प्रकारच्या पशू, पक्षी, मानव, सरपटणारे सर्पादि जे संस्कारयुक्त वासनेच्या प्रवाहाने रहित आहेत अशा जीवांना आपल्या आधीन करतो म्हणजेच पारतंत्र्यापर्यंत नेतो. त्यामुळेच सर्व श्रेष्ठ तत्त्वप्राप्ती ही भेदयुक्त वेद्य प्रथा किंवा जगताच्या पसाऱ्याच्या स्वरूपाच्या मायीयमलाने मोहित होते; परंतु परतत्त्वाचा प्रकाश म्हणजेच ज्ञान झाल्याशिवाय सर्व प्राण्यांना स्वतःच्या अस्तित्वाचे स्फुरण होत नाही. त्यामुळेच चक्षुरिंद्रियांच्या पलीकडे असणाऱ्या चिद्रूप स्वात्म्याचा हे प्राणी कधीही परामर्श करू शकत नाहीत अर्थात् ज्ञान प्राप्त करू शकत नाहीत.।।६।।

**विवरण :-** सिद्धी या जरी आत्म्याच्या सामर्थ्याची केवळ एक अभिव्यक्ती असल्या तरी साधकभक्तयोगिशिष्य चित्ताच्या अणुरूप अहंभावरूपी मोहामुळे त्यांना सिद्धी म्हणतो.

पाचव्या म्हणजेच मागच्या सूत्रात असे प्रतिपादन केले आहे की, प्राणायाम, धारणा, प्रत्याहार आणि समाधी हे सर्व आणवोपाय आहेत. हा क्रियायोग आहे अर्थात् या सर्व यथायोग्य आचरणात आणावयाच्या क्रिया आहेत. त्यांचे ग्रहण करून अणू अर्थात् अज्ञानी जीव काही सिद्धी प्राप्त करू शकतो.

परंतु प्रस्तुतचे सहावे सूत्र मात्र याबाबतीत साधकभक्तयोगिशिष्यांना सावधगिरीची सूचना देताना असे सांगते की, साधकभक्तयोगिशिष्याने या मर्यादित व निकृष्ट दर्जाच्या सिद्धी प्राप्त करणे हेच ध्येय ठेवू नये. त्याचे ध्येय म्हणजे शाश्वत सत्य अशा आत्म्याची जाणीव अर्थात् श्रीशिवसामरस्य हेच असावयाला पाहिजे. यानंतर हे सूत्र पुढील गोष्टींचा निर्देश करते की, आसन, प्राणायाम, धारणा, ध्यान आणि समाधी या योगाच्या नेहमीच्या क्रियांना सामान्य न समजता त्यांचा एका उच्च आध्यात्मिक रहस्य या दृष्टिकोनातून विचार व्हावयाला हवा. त्यांना केवळ यांत्रिक व शिस्तबद्ध अशा आणवोपायाच्या पातळीवर सरावाच्या क्रिया आहेत असे समजू नये. यांची उच्च पातळीवरची जाणीव साधकभक्तयोगिशिष्यांचा शाक्तोपायाशी संबंध जोडून देते आणि हे सूत्र अशी सूचना देते की, आणवोपाय हा शाक्तोपायाकडे नेणारा आहे.

श्रीभास्कराचार्यांनी त्यांच्या वार्तिकात याचे वेगळे स्पष्टीकरण दिले आहे. ते असे म्हणतात की, मोहादि सर्व गोष्टी आत्म्याच्या यथार्थ स्वरूपावर झाकण घालतात; मात्र केवळ त्या सर्वश्रेष्ठ आत्म्यावर मन एकाग्र करून सर्वव्यापकत्व आदि सिद्धी एखादा प्राप्त करू शकतो. या त्यांच्या प्रतिपादना-मध्ये मोहावरणात् आणि सिद्धिः या दोघांमध्ये कोणताच संबंध नसल्याचे दिसून येते. त्यांच्यापेक्षा श्रीक्षेमराजाचार्यांचे स्पष्टीकरण चांगले आहे.।।६।।

**सूत्र क्रमाङ्क ७**

**संबंध :-** परंतु सात्त्विक विद्या प्राप्त करण्यासाठी जगदानंदाचा लाभ करून घेणे अत्यंत आवश्यक आहे. अशा अवस्थेत योग्याला समाधी आणि व्युत्थान म्हणजे जाग्रत अशा दोन्ही अवस्थांमध्ये परमानंदाचा अनुभव येतो. यालाच श्रीशिवव्याप्ती असे म्हणतात. मोहाचे आवरण किंवा पडदा ज्यावेळेला नष्ट होतो त्यावेळेलाच धारणादि षडंग योगानेही परतत्त्वात समावेश होतो.

याचे निरूपण "**श्रीमृत्युजिद्भट्टारक**" अर्थात् "**श्रीनेत्रतंत्र**" या तंत्र-ग्रंथात खालीलप्रमाणे मिळते.

**मध्यमं प्राणमाश्रित्य प्राणापानपथान्तरम्।**
**आलम्ब्य ज्ञानशक्तिं च तत्स्थं चैवासनं लभेत्।।८.११।।**
**प्राणादिस्थूलभावं तु त्यक्त्वा सूक्ष्ममथान्तरम्।**
**सूक्ष्मातीतं तु परमं स्पन्दनं लभ्यते यतः।।१२।।**
**प्राणायामः स निर्दिष्टो यस्मान्न च्यवते पुनः।**

**शब्दादिगुणवृत्तिर्या चेतसा ह्यनुभूयते।।१३।।**
**त्यक्त्वा तां परमं धाम प्रविशेत्तत्स्वचेतसा।**
**प्रत्याहार इति प्रोक्तो भवपाशनिकृन्तकः।।१४।।**
**धीगुणान्समतिक्रम्य निर्ध्येयं परमं विभुम्।**
**ध्यात्वा ध्येयं स्वसंवेद्यं ध्यानं तच्चविदुर्बुधाः।।१५।।**
**धारणा परमात्मत्व धार्यते येन सर्वदा।**
**धारणा सा विनिर्दिष्टा भवपाशनिवारिणी।।१६।।**
**स्वपरस्थेषु भूतेषु जगत्यस्मिन्समानधीः।**
**शिवोहमद्वितीयोहं समाधिः सः परः स्मृतः।।१८।।**

**अर्थ** :- प्राण आणि अपान यांच्या गतीमध्ये मध्यम प्राण अर्थात् उदानाच्या संविद्रूप प्राणीय मध्यमभागात बुडून ज्ञानशक्ती चिद्व्याप्तीत निमज्जित होऊन म्हणजेच पूर्ण त्याच्या आत शिरून स्थिर राहणे याला आसन असे म्हणतात. चिद्रूपता सतत प्रकाशमान असल्याकारणाने येथे बुद्धीचा अभाव असतो; कारण अभेद अशा चिन्मय अवस्थेतच शुद्धबोध किंवा शुद्ध ज्ञान होत असते.।।८.११।।

स्थूल प्राणायाम हा रेचकपूरकादींनी युक्त असतो. हा सोडून आंतर मध्यमार्गात रेचनपूरणादि रूप प्राणायाम सूक्ष्म असतो. या सूक्ष्म प्राणायामाच्या पलीकडे स्पंदन निर्माण होते. याला परमस्पंद असे म्हणतात. येथे प्राणादि चित्स्फुरणाचा अभाव असतो. यालाच उत्कृष्ट प्राणायाम असे म्हटले आहे. याचे आसाधन अर्थात् तो स्थिर झाल्यानंतर योगी चित्प्रमातृमयत्व अर्थात् चैतन्याने युक्त असणे कधीही सोडत नाही. तो सदैव परप्रमातृभावात आनंदी राहतो. त्यामुळे तो संसारात कधीही परत येत नाही.।।१२-१३।।

शब्द, स्पर्श इत्यादींमध्ये सात्त्विक अथवा तामसिक अशी कोणतीही वृत्ती अस्पष्ट रूपात अनुभवावयाला येत असते. तिचा अनादर करून सिद्धयोगी प्रमाताचित्ताने विकल्प किंवा विचाररहित संवित्परामर्शाच्या अर्थात् चैतन्य-ज्ञानाच्या द्वारा परचित् धामात प्रवेश करतो. यालाच संसाराची बंधने तोडणारा प्रत्याहार असे म्हणतात.।।१४।।

अविकल्प अर्थात् विचाररहित संवित्परामर्शाच्या द्वारा बुद्धीच्या सत्त्वादि गुणांचे शमन करण्याने नियत आकारादि ध्येय वस्तूंचे त्याचप्रमाणे धारणा करणाच्या स्थानांचे उल्लंघन केले जाते. असे झाल्याने योग्याचे ध्येय स्वसंवेद्य अर्थात् स्वतःच स्वतःची जाणीव किंवा ज्ञान करून देणाऱ्या स्वप्रकाशताच

असते. ही स्वप्रकाशता व्यापक, अव्यय अर्थात् कधीही नाश न होणारी आणि नित्य आहे. याच अवस्थेला बुद्धिमान् लोक ध्यान असे म्हणतात.।।१५।।

जो साधकभक्तयोगिशिष्य सर्वदा आत्मसमावेशाद्वारा चैतन्यरूप परमात्मभावाचा आधार घेतो त्याच्या त्या चैतन्यविमर्शात्मावृत्तीला धारणा असे म्हणतात. ही धारणा भवपाश तोडून टाकते.।।१६।।

जगामध्ये ग्राह्य व ग्राहक भावाने स्थित असणाऱ्या पदार्थांमध्ये ज्यावेळेला हे सर्व काही मीच आहे हा निश्चय होतो आणि अहंता व इदंता यांच्या समानाधिकरणरूप शुद्ध विद्या टिकते त्यावेळी परसमाधी सिद्ध होते.।।१८।।

त्यामुळे श्रीशिवव्याप्ती होण्याने परतत्त्वातच समावेश होतो. आत्मव्याप्तीत मितसिद्धी शक्यच होत नाहीत. हेच या सूत्रात सांगितले आहे.

**मोहजयादनन्ताभोगात्सहजविद्याजयः।।७।।**

**शब्दार्थ :- मोहजयात्** - समाधीत आत्मव्याप्तीपर्यंत मोहमयी मायेवर विजय मिळविल्यामुळे अर्थात् मायारूप बाह्यसंसारोन्मुख व कामोपभोगाकांक्षावासनातृष्णासंकल्पनायुक्त कुंडलिनी शक्ती श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत होऊन स्वतःसिद्ध साधन करून सुषुम्नागामी होऊन सहस्रारात श्रीशिवांशी समरस झाल्यामुळे प्राप्त होणाऱ्या श्रीशिवशक्तिसामरस्यरूप विजयामुळे. **अनन्त** - ज्याला अंत नाही अशी मर्यादातीत अनंतता किंवा श्रीशिवव्याप्ती. **आभोग** - विस्तार. **अनन्ताभोगात्**- ज्याचा विस्तार व व्याप्ती अमर्याद किंवा अंत नाही अशी आहे त्यापासून. **सहजविद्या**- परा विद्या. **जयः** - जय, प्राप्ती, लाभ.

**अर्थ :-** मोहमयी मायेवर सर्वस्वी म्हणजे सर्व बाबतीत ज्याची व्याप्ती अमर्याद आहे अशा स्वरूपाचा विजय मिळविल्यामुळे अर्थात् मायारूप बाह्यसंसारोन्मुख व कामोपभोगाकांक्षावासनातृष्णासंकल्पनायुक्त कुंडलिनी शक्ती श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत होऊन स्वतःसिद्ध साधन करून व सुषुम्नागामी होऊन सहस्रारात श्रीशिवांशी समरस झाल्यामुळे प्राप्त होणाऱ्या श्रीशिवशक्तिसामरस्यरूप विजयामुळे जिचे स्फुरण आतून होते अशा सहज पराविद्येवर साधकभक्तयागिशिष्य विजय मिळवितो अर्थात् त्याला पराविद्या प्राप्त होते.।।७।।

**विशेष व्याख्या :-** अख्याती म्हणजे अज्ञानरूप बंधनाला मोह किंवा माया असे म्हणतात. या मोहाचा प्रभाव समना अवस्थेपर्यंत असतो. साधकभक्तयोगिशिष्यावर तुर्यावस्थेपर्यंत म्हणजेच शक्तिव्यापिनी समनापर्यंत मायेचा

रंग अथवा आवरण असते.

"**श्रीस्वच्छंदतंत्र**" या तंत्रग्रंथात श्रीशिव श्रीपार्वतींना असे म्हणतात की -

**समनान्तं वरारोहे पाशजालनमन्तकम्।**

**अर्थ :-** हे सुंदरी! समना अवस्थेपर्यंतही साधकभक्तयोगिशिष्याच्या पाशजालांचा अंत होत नाही.

या मायेवर विजय मिळविल्याने साधकभक्तयोगिशिष्याच्या सर्व संस्कारांचे शमन होते आणि हाच अनंतत्वाचा विस्तार आहे. याला उन्मना अवस्था किंवा श्रीशिवव्याप्ती असे म्हणतात. हीच अवस्था चैतन्यस्वरूपात स्थिरता प्राप्त होण्यासाठी कारण बनते; कारण आणवोपायामध्ये ध्यान इत्यादि साधनांचे पर्यवसान अथवा शेवट शुद्ध चिंतन आदींमध्ये होतो.

या विषयी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या तंत्रग्रंथात असे म्हटले आहे की -

**पाशावलोकनं त्यक्त्वा स्वरूपलोकनं हि यत्।**
**आत्मव्याप्तिर्भवत्येषा चैतन्ये हेतुरूपिणी।।**
**सार्वज्ञादिगुणा येऽर्था व्यापकान्भावयेद्यदा।**
**शिवव्याप्तिर्भवेदेषा चैतन्ये सेतुरूपिणी।।**

**अर्थ :-** माया पाश सोडून जे स्वरूपाचे अवलोकन, दर्शन अथवा विचार किंवा अनुभव समाधी अवस्थेत होतो त्याला आत्मव्याप्ती असे म्हणतात. श्रीशिवव्याप्ती यापेक्षा काही वेगळीच आहे. ज्यावेळेला साधकभक्त-योगिशिष्य सर्वज्ञता आदि गुणांच्या भावांना अहंव्यापकतेच्या भावनेत आणतो त्यावेळेला ती श्रीशिवव्याप्ती बनते. तीच साधकभक्तयोगिशिष्याला चैतन्य-स्वरूपात प्रेरित करते.

अशा प्रकारे आत्मव्याप्ती होईपर्यंत मोहावर विजय मिळविल्याने उन्मना अर्थात् श्रीशिवव्याप्तिरूप सात्त्विक विद्या साधकभक्तयोगिशिष्याला प्राप्त होते. ही सहजावस्था आहे व या अवस्थेत योग्याचे अनायासेच स्वाभाविक रूपात समाधी किंवा व्युत्थान दशेत संकोचरहित श्रीपरमशिवरूपतेचे ज्ञान स्थिर राहते. सहज विद्या प्राप्त होणारा हा श्रीशिवव्याप्तीचा पहिला किरण आहे. ही स्वानुभूती प्रकाशरूप असून यात अहंता पूर्णविमर्शरूप असते.।।७।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

मागील सूत्रातील आशयच परत या सूत्रात सांगताना श्रीशिवांनी असे म्हटले आहे की, "**मोहजयादनन्ताभोगात्सहजविद्याजयः।।७।।**" अर्थात्

"मोहमयी मायेवर अमर्याद विजय मिळविल्यामुळे साधकभक्तयोगिशिष्य आतून स्फुरण पावणाऱ्या सहज पराविद्येवर विजय मिळवितो."

मोहाच्या म्हणजे अख्यात्यात्मक अर्थात् अज्ञानात्मक समनान्तपाशरूपी मायेच्या पराभवाने तसेच संस्काराच्या शेवटापर्यंत ज्याचा विस्तार आहे अशा मोहाच्या पराभवाने "**वेदनानादिधर्मस्य.....।।**" इत्यादि कारिकेने वर्णिलेल्या सहज अर्थात् शुद्ध विद्येचा लाभ होतो; कारण आणवोपायाचेही शाक्तोपायात पर्यवसान होते असे शास्त्रात म्हटले आहे. ध्यानादि आणवोपाय शुद्ध-विकल्परूप शाक्तोपायात विश्रांती घेतात असा याचा अर्थ आहे.

त्याचप्रमाणे या दृष्टीने "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**समनान्तं वरारोहे पाशजालमनन्तकम्।**

**अर्थ :-** हे वरारोहे! समनेपर्यंत अनंत असे पाशजाल आहेत........ अशी सुरुवात करून -

**पाशावलोकनं त्यक्त्वा स्वरूपालोकनं हि यत्।**
**आत्मव्याप्तिर्भवत्येषा शिवव्याप्तिस्ततोऽन्यथा।।**
**सार्वज्ञादिगुणा येऽर्था व्यापकान्भावयेद्यदा।**
**शिवव्याप्तिर्भवत्येषा चैतन्या हेतुरूपिणी।।**

**अर्थ :-** पाशांचे अवलोकन त्यागून जे स्वरूपाला पाहणे आहे तीच आत्मव्याप्ती आहे. श्रीशिवव्याप्ती ही त्यापेक्षा वेगळी आहे. ज्यावेळेला सर्वज्ञता आदि जे गुण आहेत ते व्यापकत्वाने कल्पिले जातात त्यावेळेला त्याला श्रीशिवव्याप्ती असे म्हणतात. तीच स्वातंत्र्यरूप चैतन्याच्या विकासाचे उपयुक्त साधन बनते.

**विवरण :- अकरा प्रकारचा मांत्र अर्थात् मंत्रयुक्त ध्वनी आहे. उदाहरणार्थ :-** अकार, उकार, मकार, बिंदू, अर्धचंद्र, निरोधी, नाद, नादान्त, शक्ती, व्यापिनी, समना हे अकरा ध्वनी होत. या समनापर्यंतचे सकारणषट्काचे भेदज्ञान करून देणारे हे ध्वनी पाशांच्या जाळ्यांसारखे आहेत. त्यामुळे ते त्याज्य आहेत. त्यांच्या पलीकडे असणारे अभेदज्ञान घेण्याजोगे आहे. हे वरारोहे! या पदाचा अर्थ स्पष्ट करताना असे म्हटले आहे की, वर म्हणजे उत्कृष्ट आणि आरोह म्हणजे द्वादशान्तात अर्थात् सहस्रारात विश्रांती घेणारी ती संबुद्धी अर्थात् कुंडलिनी शक्ती होय.

पाश म्हणजे समनेपर्यंतची अवस्था होय. त्यांचे अवलोकन म्हणजे

त्यांना आत्मत्वाने पाहणे होय. स्वरूप म्हणजे त्या पाशांच्या पलीकडे असणारे चिन्मात्रत्व होय. येथपर्यंत आत्मव्याप्ती असते.

जे सर्वज्ञत्व व सर्वकर्तृत्वरूप गुण म्हणजेच धर्म आहेत ते परम उपादेय अर्थात् तीव्रपणे स्वीकारण्याला योग्य म्हणून प्रार्थिले जातात म्हणून त्यांना अर्थ असे म्हणतात. ज्यावेळेला त्या व्यापक व सर्व अंतरभेदांना आपलेसे करीत स्वतःची म्हणून भावना करण्यात येईल त्यावेळेला त्या भावनेची परिनिष्पत्ती म्हणजे आत्म्याची श्रीशिवव्याप्ती होय. ती भावना करणाऱ्या साधकाच्या चैतन्यात तीच श्रीशिवव्याप्ती प्रयोजिका म्हणून काम करते. या चैतन्यरूप श्रीशिवकृपेनेच शुद्धात्मा साधकभक्तयोगिशिष्याला अशी भावना होते.

एवढ्या विवेचनावरून आत्मव्याप्ती हाच शेवट असणाऱ्या मोहाच्या जयामुळे उन्मनारूप श्रीशिवव्याप्तीने युक्त सहजविद्येची प्राप्ती होते.

यासंबंधी **"श्रीस्वच्छंदतंत्र"** या ग्रंथातच असे म्हटले आहे की -

**आत्मतत्त्वं ततस्त्यक्त्वा विद्यातत्त्वे नियोजयेत्।**
**उन्मना सा तु विज्ञेया मनः सङ्कल्प उच्यते।।**
**सङ्कल्पात्क्रमतो ज्ञानमुन्मनं युगपत्स्थितम्।**
**तस्मात्सा च परा विद्या यस्मादन्या न विद्यते।।**

**अर्थ :-** नंतर आत्मतत्त्वाचा त्याग करून त्याची विद्यातत्त्वात योजना करावी. तिला उन्मना असे म्हणतात. मन म्हणजे संकल्प होय. संकल्पांच्या पलीकडे गेलेले व युगपत् स्थिर असलेले मन म्हणजे उन्मन ज्ञान होय. ज्यामुळे जिच्याशिवाय अन्य कोणीही अस्तित्वात नसते त्यामुळे ती पराविद्या होय.

**विवरण :-** आत्म्याची योजना करावी असे अध्याहृत समजावे. ती विद्या संकल्प म्हणजे इच्छा होय आणि ती ईशितव्य अर्थात् प्रभुत्वयुक्त विश्वाच्या क्रमाच्या आसूत्रणत्वाने युक्त असल्याकारणाने क्रमाने ज्ञान अशी म्हणविली जाते. उन्मन अर्थात् वर गेलेले आणि उत्कर्ष झालेले मन जेथे प्राप्त होते ते उन्मन होय. युगपत् म्हणजे विश्वाचे आसूत्रण, अवभासन व निर्माण आदि अनंत भिन्न प्रकार असूनही येथे नित्य उदित व आनंदाने परिपूर्ण अशा स्वातंत्र्यशक्तीच्या आभासाने युक्त अशा स्थितीत ते विश्व स्थित असते. त्यामुळे अशा प्रकारचे उन्मनज्ञान हीच उन्मनाशक्ती आहे.

**वेदनानादिधर्मस्य परमात्मत्वबोधना।**

**वर्जनापरमात्मत्वे तस्माद्विद्येति चोच्यते।**

**तत्रस्थो व्यञ्जयेत्तेजः परं परमकारणम्।। श्रीस्वच्छंदतंत्र।।**

**अर्थ :-** या उन्मना शक्तीमुळेच सर्व व नाना धर्म परमात्मरूप आहेत असे ज्ञान होते व अपरमात्म असे काहीच नाही असे समजते. त्यामुळेच तिला विद्या असे म्हणतात. येथे असणारा सिद्धयोगी परमकारण अशा परतेजाने युक्त होतो व असंकुचित श्रीपरमशिवरूप ओळखू शकतो.।।७।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१)** आत्मव्याप्ती किंवा "स्व" मध्ये व्यापून जाणे ही एक तांत्रिक परिभाषा आहे. ज्यावेळेला आत्मा म्हणजे "स्व" स्वतःमध्येच चैतन्यमात्र म्हणून स्थिर होतो त्यावेळेलाच आत्मा फक्त एक चैतन्यस्वरूप आहे अशी जी एकमेव जाणीव होते त्याला आत्मव्याप्ती असे म्हणतात. या शास्त्रामध्ये या अवस्थेला जाणिवेची दुय्यम अवस्था मानतात; कारण या जाणिवेत आत्मा हा अन्य सर्व गोष्टींपासून वेगळा झालेला असतो आणि आत्मा हा क्रियाशक्तिरहित चैतन्य आहे असे समजतात. ज्यावेळेला आत्मा श्रीशिवावस्थेत प्रवेश करतो त्यावेळेलाच त्याचा सर्वोच्च ज्ञान म्हणून विचार केला जातो; कारण त्या अवस्थेत भेदाची कसलीही जाणीव होत नसते. ज्या गोष्टींपासून आत्मा वेगळा झालेला असतो त्या गोष्टीही श्रीशिव म्हणून ओळखल्या जातात; कारण श्रीशिवांमध्ये स्वातंत्र्यशक्ती आहे.

**२)** श्रीशिवांमध्ये व्यापून जाणे किंवा श्रीशिवव्याप्ती ही आणखी एक तांत्रिक परिभाषा आहे. श्रीक्षेमराजाचार्यांनी त्यांच्या टीकेत याबद्दल असे म्हटले आहे की, **"अस्यैव आत्मन उन्मनापदारोहेण चिदानन्दघनपरतत्त्व-व्याप्तिरूपा शिवव्याप्तिः।।"** अर्थात् "ज्यावेळेला आत्मा उन्मनावस्थेत आरोहण करीत श्रीशिवांच्या सर्वश्रेष्ठ चैतन्यस्वरूप आनंदाप्रत जातो त्यावेळेला ती अवस्था म्हणजे श्रीशिवव्याप्ती होय."

**३)** या "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथातल्या श्लोकातील विद्या पदाचे विवरण करताना श्रीक्षेमराजाचार्य बजावून सांगतात की, "हे विद्यातत्त्व आणि विज्ञानकाला-पासून मंत्रमहेश्वरापर्यंतचे अनुभव घेणारे साधकभक्तयोगिशिष्य ज्यात सामावलेले आहेत असे विद्यातत्त्व यांचा अजिबात गोंधळ करू नये. हे विद्यातत्त्व भिन्न आहे. हे विद्यातत्त्व म्हणजेच श्रीशिवचैतन्य म्हणून ओळखली जाणारी उन्मना अवस्था होय."।।७।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

मोहावरण असतानाही सिद्धी मिळत असेल तर त्या मोहावर विजय मिळविल्याने कोणता लाभ होतो? याचे उत्तर देताना श्रीशिवांनी "**मोह-जयादनन्ताभोगात्सहजविद्याजयः ।।७।।**" अर्थात् "मोहमयी मायेवर अमर्याद विजय मिळविल्यामुळे साधकभक्तयोगिशिष्य आतून स्फुरण पावणाऱ्या सहजविद्येवर विजय मिळवितो," हे सूत्र सांगितले आहे.।।३८।।

**विवरण :-** अमर्याद अर्थात् निरुपाधिक व परिपूर्ण अशा बहुभेदप्रशमनरूप अर्थात् अनेक भेदांना शांत करणाऱ्या मोहजयामुळे सुप्रबुद्धाच्या ठिकाणी पूर्णाहंविमर्शरूप अर्थात् "अहं" चा पूर्ण विचार व खरे ज्ञान असणाऱ्या संवित् नावाच्या अकृत्रिम म्हणजेच नैसर्गिक अशा सहजविद्येचा उदय होतो किंवा मोहजयामुळे अनंतभट्टारक नावाच्या रुद्रप्रमात्याच्या ठिकाणी अधिष्ठित असणाऱ्या शुद्धविद्या पदाच्या लाभाने सहज प्रकाशरूप ऐश्वर्याची प्राप्ती होते. शुद्धविद्यारूढ योग्याला अनंत नावाचा रुद्रप्रमाता हे ऐश्वर्य भोगावयाला लावतो.

मोह अर्थात् अज्ञान किंवा माया ही कामलोभादि अनंत प्रकारची आहे. तिच्यावर जय मिळविणे म्हणजे योग्यज्ञानलाभ होय. नित्य स्वप्रकाशामुळे चैतन्याची व्यापकता अनुभवावयाला येते.।।३९।।

या अनंतभोगामुळे स्पष्ट स्वात्मज्ञानतेचा उदय अर्थात् लाभ होतो. अत्यंत पसरलेल्या मोहावर जय मिळविणे म्हणजे जयाचे अनंतत्व होय.।।४०।।

त्यालाच आभोग असे म्हटले आहे; कारण तो परिपूर्णस्वरूपाचा आहे म्हणजेच मोठा किंवा व्यापक आहे. स्वप्रकाशात्मक जी सहजविद्या पूर्वी सांगितली ती उत्पन्न होत असल्यामुळे आत्मरूप प्रकाशते म्हणजेच आत्मज्ञान होते.।।४१-४१.५।।७।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**मोहजयादनन्ताभोगात्सहजविद्याजयः ।।७।।**" अर्थात् "संस्कारांचा प्रशम म्हणजेच त्यांचा पूर्णपणे नाश होईपर्यंत ज्याचा विस्तार किंवा पसारा आहे अशा मोहावर म्हणजे मायेवर विजय मिळविल्याने सहजविद्येचा लाभ होतो," हे या सूत्राने कथन केले आहे.।।७।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**मोहजयादनन्ताभोगात्सहजविद्याजयः ।।७।।**" अर्थात् "मोहप्रभाव नष्ट झालेल्या साधकभक्तयोगिशिष्याला पुन्हा पहिल्यापासून समाधीत।।३०।।

प्राण व अपान यांमधील मध्यमवायूच्या आश्रयाने ज्ञानशक्तीच्या अवलंबनामुळे तेथीलच आसन मिळते."।।३१।।

प्राणादि स्थूल भावांचा आणि आंतरिक सूक्ष्म भावांचा त्याग करून सूक्ष्माच्या पलीकडले परम किंवा श्रेष्ठ असे स्पंदन ज्यामुळे प्राप्त होते।।३२।।

त्याला प्राणायाम असे म्हणतात. या स्थितीतून परत च्यवन म्हणजेच पतन किंवा घसरणे होत नाही.।।३२.५।।

जी शब्द आदि गुणवृत्ती मन अथवा अंतःकरणाने अनुभविली जाते।।३३।।

तिला टाकून द्यावे अथवा तिचा त्याग करून स्वचैतन्याने किंवा स्वांतःकरणाने परमधामात प्रवेश करावा. यालाच संसाराचे पाश तोडून टाकणारा प्रत्याहार असे म्हणतात.।।३४।।

बुद्धीच्या सत्त्व, रज व तामसादि गुणांना ओलांडून म्हणजेच त्याच्यावर मात करून अव्यय अर्थात् ज्याचा कधीही व्यय होत नाही, सर्वव्यापक, जे सहज ध्यानात सापडत नाही व जे स्वसंवेद्य आहे अशा तत्त्वाचे म्हणजेच श्रीपरमेश्वरांचे ध्यान करावे. यालाच ध्यान असे म्हणतात.।।३५।।

जिच्यामुळे परमात्मतत्त्व किंवा परमश्रेष्ठ असे आत्मतत्त्व किंवा आत्मभाव चित्तात नेहमी धारण केला जातो तिला भवबंध नष्ट करणारी धारणा असे म्हणतात. ही धारणा संसारबंधनाशक आहे.।।३६।।

आपल्यामध्ये व दुसऱ्यामध्ये असलेल्या भूतमात्रांमध्ये म्हणजेच प्राणिमात्रांमध्ये आणि या जगद्वस्तूंमध्ये समानबुद्धी ठेवणे आणि मी श्रीशिव आहे व मी अद्वितीय आहे असे समजणे व हे ज्ञान सतत जागृत ठेवणे याला श्रेष्ठ समाधी असे म्हणतात.।।३७।।

अशा रीतीने "**श्रीमृत्युजिद्भट्टारकतंत्र**" अर्थात् "**श्रीनेत्रतंत्र**" या ग्रंथात क्रमाने निरूपण केलेल्या प्राणायाम ते समाधीपर्यंतच्या साधनांनी।।३८।।

परतत्त्वाचा समावेश होतो असे म्हटले आहे. मोह व माया म्हणजेच स्वरूपाचे अज्ञान होय. त्यावर विजय मिळविल्यामुळे अर्थात् अज्ञानाचा पराभव झाल्यामुळे।।३९।।

उद्योगरूपी सूर्यापासून संस्कारप्रशमनापर्यंत जो अपरिमित विस्तार आहे त्याबद्दल वर सांगितल्याप्रमाणे दृष्टी ठेवणाऱ्या।।४०।।

साधकभक्तयोगिशिष्याला सहजविद्येचा लाभ होतो अर्थात् तो सहजविद्येने युक्त होतो.।।४१।।७।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

आता "**मोहजयादनन्ताभोगात्सहजविद्याजयः ।।७।।**" या सूत्रात सूत्रकार असे सांगत आहेत की, "मोहमयी मायेवर अमर्याद विजय मिळविल्याने सहज विद्याजय होतो."

उद्योगरूप सूर्यापासून उत्पन्न होणाऱ्या अनंत संस्कारांचा प्रशम होईपर्यंत अर्थात् ते शांत किंवा नष्ट होईपर्यंत पराचा विस्तार असतो. तशा प्रकारच्या मोहजयामुळे अज्ञानाने युक्त समस्त पाश अथवा बंधनांच्या जाळ्यांचे स्वरूप असणाऱ्या मायेच्या नष्ट होण्यामुळे साधकभक्तयोगिशिष्य सहजविद्याजयरूप लाभ मिळवितो.।।७।।

**विवरण :-** उपर्युक्त साधनाच्या द्वारा परकायाप्रवेशाचे सामर्थ्य प्राप्त होते आणि आलेल्या अनुभवामुळे स्थूल शरीराचा अध्यासरूपी मोह नष्ट होतो. आपल्या चित्ताच्या अणुत्वरूप मोहावर विजय प्राप्त केल्यावर ज्यावेळेला सिद्धयोगी अनंतात प्रवेश करतो त्यावेळेला विद्या कलेवर किंवा मायेवर आपोआपच जय मिळतो.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**न प्राणायामात् परमं तपः ततः क्षीयते प्रकाशावरणम्।।**

**अर्थ :-** प्राणायामाहून श्रेष्ठ असे अन्य कोणतेही तप नाही. त्यामुळेच प्रकाशावरील अर्थात् यथार्थ ज्ञानावरील किंवा प्रकाशस्वरूप आत्म्यावरील आवरण नष्ट होते.

सहज याचा अर्थ स्वाभाविक आहे. विद्येला मायेचे चौथे कंचुक असे म्हटले आहे अर्थात् विद्या म्हणजे बाह्य ज्ञान होय. त्यामुळेच विद्या म्हणजे माया, काल, कला व नियती यांचे ज्ञान असे समजले पाहिजे.

हे सूत्र असे सांगते की, मोहावर इतक्या पातळीपर्यंत विजय मिळविला पाहिजे की, त्या मोहाचा कोणताही संस्कार मागे उरता कामा नये. त्यानंतरच साधकभक्तयोगिशिष्याला यथार्थतेचे ज्ञान अर्थात् सहजविद्या प्राप्त होते. सहज-विद्या हे उन्मना अवस्थेचे दुसरे नाव आहे. अणू म्हणजे मर्यादित ज्ञानाचा जीव आणि श्रीशिव यांच्यामध्ये कितीतरी पातळ्या आहेत. समनापर्यंत मनस् अथवा मनाचा भाग असतो. समनापर्यंत मोह जिंकला असता एखाद्याला आत्मव्याप्ती म्हणजेच शुद्ध चैतन्याची अवस्था प्राप्त होऊ शकते; परंतु हे सांख्य आणि वेदान्त्यांचे ध्येय आहे. श्रीशैवतत्त्वज्ञानाप्रमाणे केवळ आत्मव्याप्ती प्राप्त करून समाधानी राहू नये. या सांप्रदायाचे अंतिम ध्येय केवळ आत्मव्याप्ती

नसून श्रीशिवव्याप्ती किंवा श्रीशिवत्वयोजना प्राप्त करणे हे आहे. जेव्हा साधकभक्तयोगिशिष्य समनेची सीमा ओलांडून पुढे जातो तेव्हाच हे शक्य होते. समना हे मनाचे सर्वश्रेष्ठ प्रकटीकरण आहे; परंतु समनेपर्यंत मनाचा प्रदेश असतो आणि तोपर्यंत संकल्प व विकल्प असतात. साधकभक्त-योगिशिष्याची जेथे मानसिक जाणीव संपते आणि शुद्ध दिव्य चैतन्याची सुरुवात होते त्या सहजविद्या अथवा उन्मना अवस्थेवर त्याला चढावेच लागते. या अवस्थेतच साधकभक्तयोगिशिष्याला चिदानंदघन अर्थात् चैतन्य व आनंदाने पूर्ण भरलेला अशा चैतन्याचा आणि स्वातंत्र्यशक्तीचा अनुभव येतो आणि हीच श्रीशिवव्याप्ती अथवा श्रीशिवांच्या अस्तित्वाची स्वाभाविक अवस्था आहे.

ही ज्ञानाची श्रेष्ठ अवस्था मिळणे आणवोपायाने शक्य नाही. अशी अवस्था प्राप्त करणे हे शाक्तोपायाद्वाराच शक्य आहे; पण आणवोपाय हा शाक्तोपायापर्यंत पोहोचण्याची पहिली पायरी आहे. त्याचा त्याच्यामध्येच शेवट नाही तर त्याचा शेवट हा शाक्तोपायामध्येच होतो.।।७।।

**सूत्र क्रमांक ८**

**संबंध :-** या सूत्रात कुंडलिनीच्या शक्तिरूपाचे वर्णन केले आहे.

**जाग्रद्द्वितीयकरः।।८।।**

**शब्दार्थ :- जाग्रत्** - जागरूक (श्रीक्षेमराजाचार्य). वेद्यवर्गाचे आभासन करणारी जागरूकता. **द्वितीय** - भासमान होणारे हे दुसरे जग. **कर** - श्रीशिवव्याप्तीचा प्रकाशकिरण अर्थात् कुंडलिनी शक्ती.

**अर्थ :-** ज्याला सहजविद्या अर्थात् ज्याची श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्ति-पातयोगदीक्षेने अनादिनिद्रिस्त आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनीची जागृती होऊन ही शक्ती स्वतःच करीत असलेल्या सिद्धयोगसाधनेच्या द्वारा सुषुम्नागामी होऊन व सहस्रारात श्रीशिवांशी समरस होऊन श्रीशिवशक्तिसामरस्यावस्था प्राप्त झालेली असते तो नेहमी जागरूक अर्थात् जाग्रतावस्थेत उन्मनारूप श्रीशिवांशी एकरूप असतो. त्याच्या ठिकाणी हे दुसरे म्हणजे भासमान होणारे जग अथवा विश्व हे त्याचा प्रकाशकिरण असल्यासारखे आहे अर्थात् श्रीशिवव्याप्तीचा दुसरा किरण म्हणजे वेद्यवर्गाचे अर्थात् कुंडलिनी शक्तीचे बाह्यतः आभासन करणारी जागरुकता आहे.।।८।।

**विशेष व्याख्या :-** तात्त्विक अर्थात् शुद्ध विद्या प्राप्त करून तिच्याबरोबर एकाग्रता किंवा सामरस्य होणे म्हणजे जागरूकता होय. पूर्ण विमर्शरूप

अर्थात् पूर्ण ज्ञानरूप अहंतेचा लाभ झाल्यानंतर इदंतेचाही त्याच भावनेने विमर्श म्हणजे विचार करणे आवश्यक आहे. तीच स्वरूपपरिपूर्णता आहे. त्यामुळे वेद्य अर्थात् ज्ञेयवर्गाच्या आभासनात किंवा प्रकटीकरणात येणारे जगत् हा कुंडलिनी शक्तीचा दुसरा किरण आहे.

यासंबंधी "**श्रीविज्ञानभैरव**" या तंत्रग्रंथात असे म्हटले आहे की -

**यत्र यत्राक्षमार्गेण चैतन्यं व्यज्यते विभोः।**
**तस्य तन्मात्रधर्मित्वाच्चिल्लयाद्भरितात्मता।।११७।।**

**अर्थ :-** जेथे जेथे श्रीपरभैरवरूप चित्प्रकाश चक्षू इत्यादि मार्गांनी नील सुख इत्यादि पदार्थांमध्ये स्फुरित अथवा प्रकट होते तेथे तेथे चैतन्याशिवाय आणखी काहीच नसल्याकारणाने ते नीलादि चित्तातच लीन होतात. हीच साधकभक्तयोगिशिष्याची श्रीपरभैरवरूपता आहे.।।११७।।

यासंबंधी "**श्रीसर्वमंगलातंत्र**" या तंत्रग्रंथात असे म्हटले आहे की -

**शक्तिश्च शक्तिमांश्चैव पदार्थद्वयमुच्यते।**
**शक्तयोस्य जगत्कृस्नं शक्तिमांस्तु महेश्वरः।।**

**अर्थ :-** चित्स्वरूपाच्या परिपूर्णतेमध्ये शक्ती आणि शक्तिमान् अर्थात् श्रीशिव हे केवळ दोन पदार्थ आहेत. हे सर्व जगत् म्हणजे त्यांच्या शक्ती आहेत आणि शक्तिमान् स्वतः श्रीमहेश्वर आहेत.।।८।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा रीतीने ही सहजविद्या प्राप्त झालेला सिद्धयोगी कसा असतो हे "**जाग्रद्द्वितीयकरः**" अर्थात् "श्रीशिवांशी एकरूप असलेल्या साधकभक्त-योगिशिष्याला अर्थात् सिद्धयोग्याला जागृत अवस्थेत जग हे प्रकाश किरणा-सारखे असते," असे या सूत्रात सांगितले आहे.

शुद्धविद्या मिळवूनही त्या विद्येतच एकाग्र झालेला जाग्रत असा सिद्ध-योगी पूर्ण ज्ञानाच्या म्हणजे स्व-अहंतेच्या अपेक्षेने दुसरे असे जे इदंतेने भासणारे स्वानुभूतिप्रकाशाच्या अपेक्षेने असणारे शक्तिरूप जगत् आहे ते वेद्य असे जगत् त्याच्या किरणांप्रमाणे किंवा करांप्रमाणे समजतो. याचा अर्थ असा आहे की, विश्व हे त्याला त्याच्या किरणांप्रमाणे भासते.

यासंबंधी "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यत्र यत्राक्षमार्गेण चैतन्यं व्यज्यते विभोः।**
**तस्य तन्मात्रधर्मित्वाच्चिल्लयाद्भरितात्मता।।११७।।**

**अर्थ :-** जेथे जेथे इंद्रियांच्या मार्गाने श्रीपरमेश्वराचे चैतन्य व्यक्त केले

जाते व त्या अभिव्यक्तीचा चैतन्य हेच एकमात्र आधार असते तेथे तेथे हे चैतन्य आहे असे जाणून चित् किंवा संवित्मध्ये बुडालेला जो साधकभक्त-योगिशिष्य असतो त्याच्यात श्रीभैरवभावाचा पूर्ण समावेश होतो.।।११७।।

**विवरण :-** जेथे जेथे म्हणजेच नीलसुखादि पदार्थांमध्ये डोळे इत्यादि पोकळ्यांच्या मार्गाने श्रेष्ठ श्रीभैरव आत्म्याचे चैतन्य किंवा चित्प्रकाश स्फुरण पावतो तेथे तेथे ते नीलादि पदार्थ चैतन्याच्या धर्माचेच असल्यामुळे आणि चैतन्याव्यतिरिक्त ते प्रकाशित होत नसल्यामुळे आरशात पडणाऱ्या विविध प्रकारच्या प्रतिबिंबाप्रमाणे चैतन्यस्वभावाचा विचार करून विश्वाच्या भिंती-मध्ये म्हणजे चैतन्यामध्येच जो साधकभक्तयोगिशिष्य लीन होतो त्याला श्रीपरभैरवता प्राप्त होते. ज्याप्रमाणे घनदाट प्रकाशातच सूर्यमंडळ उत्पन्न होते त्याप्रमाणे चित्त एकत्रित होऊन जगद्रूपाने भासते, असे आगमातून सांगितले आहे.

"**श्रीसर्वमंगलातंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**शक्तिश्च शक्तिमांश्चैव पदार्थद्वयमुच्यते।**
**शक्तयोस्य जगत्कृत्स्नं शक्तिमांस्तु महेश्वरः।।**

**अर्थ :-** शक्ती आणि शक्तिमान् असे दोन पदार्थ आहेत. हे जगत् म्हणजे शक्ती असून शक्तिमान् श्रीमहेश्वर होत.

**विवरणात्मक टीपा :-**

**१) जाग्रत् :-** जो जागा असतो तो सिद्धयोगी होय. हा शब्द अलंकारिक अर्थाने घातला आहे. याचा अर्थ असा आहे की, उन्मना अवस्था प्राप्त केलेला तो सिद्धयोगी सतत त्याच अवस्थेत राहतो अर्थात् तो त्याच अवस्थेत जगतो व तो दिव्य पुरुष बनतो.

**२)** त्या जाग्रत सिद्धयोग्याच्या बाबतीत फक्त आत्मचैतन्यच दिव्य असत नाही; तर जग हे त्या आत्मचैतन्याहून वेगळे असे असत नाही; कारण त्याच्या अंतरातील प्रकाशाचा तो एक किरण असतो. द्वैत त्याच्याबाबतीत तरी संपलेले असते.

**३)** उन्मना किंवा उन्मनी ही मनाच्या अतीत अशी श्रीपरमशिवांची शक्ती आहे. ती अमात्र म्हणजे मर्यादातीत व कलातीत असते.।।८।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

शुद्धविद्यारूप सिद्धी मिळविलेल्या साधकभक्तयोगिशिष्याने सदैव निरलस जाग्रत असावे.।।४२।।

सर्व विश्वाचा एका वस्तूवर आरोप व अध्यास आहे असे मानावे. याविषयी श्रीशिवांनी **"जाग्रद्द्वितीयकरः।।८।।"** अर्थात् "श्रीशिवांशी समरस झालेल्या साधकभक्तयोगिशिष्याला जागृत अवस्थेत जग हे प्रकाश किरणासारखे असते," असे या सूत्रात सांगितलेले आहे.।।४२-४२.५।।

ज्ञानाला जागृती असे म्हटले आहे. त्या ज्ञानाच्या साहाय्याने स्वतःला कळलेले किंवा आटोक्यात असलेले अवलोकन करून सर्वांचे ग्रहण करावे. त्यानंतर अविद्या अथवा मोह यांचे आवरण नष्ट होते. असा ज्ञानाने युक्त असणारा सिद्धयोगी भेदाच्या जाणिवेने रहित होऊन नेहमी सावध राहतो. ।।४३,४४।।

त्यामुळेच जागृती ही आदान व गौरव अर्थात् ज्ञानाच्या महानतेमुळे हातांप्रमाणे मानली आहे. त्यामुळे किंवा विचित्रतेच्या कारणास्तव ज्ञान किंवा जागृतीला द्वितीयत्व दिले आहे.।।४५।।८।।

**विवरण :- "ज्ञानं जाग्रत्।।१.८।।"** म्हणजे "ज्ञान ही जागृती होय," असे या पूर्वीच्या सूत्रात सांगितले. येथे मात्र जागृती हीच ज्ञानशक्ती आहे, असे सांगतात. आधी अनुवाद्यविधेयभावाने म्हणजेच त्याचे व्याख्यान करून आता त्याच सूत्राचे विधेयानुवाद्यत्वाने म्हणजेच विधेयानुसारवादाने व्याख्यान करतात; कारण ही सूत्रे विश्वतोमुखी आहेत. आदानक्रियेच्या समानतेमुळे ज्ञानशक्तिरूप हातामध्ये रूप, प्रकाश व मन यांच्या आकाराप्रमाणे भासणाऱ्या विश्वाच्या पर म्हणजेच श्रेष्ठ प्रकाशामुळे भेद आणि अभेद यांच्या कल्पनाच नष्ट होत असल्यामुळे विश्व हे आत्मरूपाशी अभिन्न आहे असे म्हणून ग्रहण केले जाते. यामुळे तो सिद्धयोगी प्रबुद्ध अथवा सावध म्हणविला जातो. तो एका संवेदनेत म्हणजे जाणिवेत बाह्य आणि आंतर असे आत्ममय विश्व विश्रांती घेत आहे असे जाणतो. त्यामुळे मोक्षलक्ष्मीचा उपभोग घेण्याला तो समर्थ होतो आणि जीवन्मुक्ताप्रमाणे प्रापंचिक व्यवहार करीत स्वात्म्यात विहार करतो.।।८।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"जाग्रद्द्वितीयकरः।।८।।"** अर्थात् "जाग्रत म्हणजेच शुद्धविद्येच्या प्राप्तीविषयी जागरूक किंवा सावध असणारा सिद्धयोगी होय. या सिद्ध-योग्याला हे म्हणजे वेद्याचा आभास असलेले व इदम् या शब्दाने ओळखले जाणारे जग किरणांप्रमाणे होते." मग सूर्य किंवा प्रकाशमान् पदार्थ कोणता? अशी शंका उत्पन्न झाली असता पूर्ण विचारस्वरूप अहंता ही होय. या

सिद्धयोग्याला हे विश्व स्वतःच्या किरणांप्रमाणे वाटते किंवा स्फुरते असा भावार्थ आहे.।।८।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**जाग्रद्द्वितीयकरः।।८।।**" अर्थात् "अशा रीतीने मोहावर मिळविलेल्या विजयामुळे साधकभक्तयोगिशिष्य शुद्ध विद्या इत्यादींनी जागृत होतो."।।४१।।

अशा प्रकारे सहजविद्या मिळवून त्या एकत्वाच्या अवलंबनात नेहमी जागरूक राहणारा सिद्धयोगी जागृत म्हणविला जातो.।।४२।।

संपूर्ण अहंविमर्शयुक्त स्वाहंतेच्या अपेक्षेने हे जगत् त्या स्वादीधितीचा अर्थात् स्वसूर्याचा दुसरा प्रकाशक किरणच असतो.।।४३।।

यामुळे सिद्धयोगी हा स्वर्गाला आपल्या मुठीत ठेवू शकतो.।।४३.५।।८।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

ज्या सिद्धयोग्याला सहजविद्या प्राप्त झालेली असते त्याचे स्वरूपच "**जाग्रद्द्वितीयकरः।।८।।**" अर्थात् "श्रीशिवांशी एकरसरूप झालेल्या सिद्धयोग्याला जागृत अवस्थेत जग हे प्रकाश किरणांसारखे होते," असे या सूत्रात सांगितले आहे.

ज्या योगाने सहजविद्या प्राप्त झालेली असते त्या विद्येमध्ये एकभावरूप, एकध्यानी आणि एकाग्र होऊन सिद्धयोगी जागरूक किंवा जागृत अथवा सावध बनतो. हा सिद्धयोगी परिपूर्ण ज्ञानात्मक स्वाहंतेपेक्षा दुसरे जे इदंतेने भासणारे विश्व असते त्याचा कर अर्थात् रश्मी म्हणजे किरण बनतो. अशा प्रकारच्या सिद्धयोग्याच्या दृष्टीमध्ये संपूर्ण विश्व हे स्वतःच्या दीधितिकल्प अर्थात् किरणांच्या समूहाप्रमाणे अभिव्यक्त केले जाते.

हे "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात पुढीलप्रमाणे स्पष्ट केले आहे.

**यत्र यत्राक्षमार्गेण चैतन्यं व्यज्यते विभोः।**
**तस्य तन्मात्रधर्मित्वाच्चिल्लयाद्भारितात्मता।।१७।।**

**अर्थ :-** जेथे जेथे डोळे आदि इंद्रियांच्या मार्गाने श्रीपरमेश्वराचे चैतन्य व्यक्त केले जाते तेथे तेथे त्यांच्या म्हणजे त्या इंद्रियांच्या तन्मात्रधर्मित्वामुळे व चित् अथवा चैतन्यात लय झाल्यामुळे सिद्धयोग्यात भरितात्मा किंवा पूर्णता असते.।।१७।।

याचे तात्पर्य असे आहे की, जेथे जेथे नीलसुखादि पदार्थांमध्ये अक्ष म्हणजे डोळे इत्यादि छिद्रांच्या मार्गाने सर्वव्यापक परमात्म्याचे चैतन्य अभिव्यक्त केले जाते तेथे तेथे त्या नीलसुखादींच्या केवळ तेवढ्याच धर्मित्व अथवा

स्वभावत्वामुळे म्हणजे चैतन्याशिवाय प्रकाशित होणे शक्य नसल्यामुळे आरशातील विलक्षण किंवा विरुद्ध धर्माच्या प्रतिबिंबाप्रमाणे केवळ चैतन्य हाच स्वभाव आहे अशाचा परामर्श करून अर्थात् त्याचे ज्ञान मिळवून विश्व हीच भिंत झालेल्या चित्तातच जो लीन होतो त्याला श्रीपरमभैरवता प्राप्त होते. ज्याप्रमाणे घनीभूत किंवा घट्ट असा प्रकाशच सूर्यमंडलाला निर्माण करतो त्याप्रमाणेच चैतन्यच घनीभूत होऊन जगताच्या रूपात भासते.।।८।।

**विवरण :-** जाग्रतावस्थेचे बाह्य दृश्य वरती सांगितलेल्या सिद्धयोग्यासाठी दुसऱ्या हाताप्रमाणे आहे अर्थात् गौण म्हणजेच दुय्यम आहे. कर याचा अर्थ प्रकाशक किंवा साहाय्यक असा घेतला पाहिजे. याचाच अर्थ असा आहे की, तो सिद्धयोगी बाह्य दृश्याच्या ज्ञानासाठी स्थूल देहाची अपेक्षा ठेवीत नाही. त्याच्या बाबतीत असे होऊ शकत नाही की, स्थूल देहाच्या मदतीशिवाय त्याला बाह्य ज्ञान होणारच नाही.।।८।।

**सूत्र क्रमांक ९**

**संबंध :-** अशा प्रकारे दोन्ही किरणांद्वारे स्वरूपविमर्शनाने आविष्ट अर्थात् आवेशयुक्त झालेल्या सिद्धयोग्याच्या आत्म्याविषयी सांगत आहेत.

**नर्तक आत्मा।।९।।**

**शब्दार्थ :- नर्तक** - विश्वमंचकावर नाचणारा किंवा नट. संस्कृत नाटकात 'नर्तक' हे नाचणारे पात्र व नटही असतो. **आत्मा** - आत्मा अर्थात् सिद्धयोगी.

**अर्थ :-** ज्याला **"स्व"** रूपाचा विमर्श प्राप्त झाला आहे अर्थात् ज्या सिद्धयोगसाधकभक्तयोगिशिष्याची विमर्शरूप कुंडलिनी शक्ती सिद्धयोगसाधनाने सहस्रारात श्रीशिवांशी समव्याप्त होऊन ज्याला श्रीशिवशक्तिसामरस्यसिद्धी प्राप्त झाली असते असा आत्मा अर्थात् सिद्धयोगी हा विश्वमंचावरील नर्तकच असतो.।।९।।

**विशेष व्याख्या :-** आपल्या अंतरात लपविलेल्या आपल्या शुद्ध स्वरूपाच्या पकडीनुसार नाना अवस्थांचा प्रपंच आपल्याच परिस्पंद अर्थात् स्वातंत्र्य शक्तीच्या क्रीडेने आपल्याच भिंतीवर जो प्रकट करतो तो स्वतःच नट असतो.

भगवान् श्रीउत्पलदेव यांच्या **"श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा"** या ग्रंथाच्या टीकेत असे म्हटले आहे की -

**संसारनाट्यप्रवर्तयिता सुप्ते जगतिजागरूक एक एव परमेश्वरः।।**

**अर्थ :-** संसाररूप नाटकाचे प्रवर्तन करणारा एक श्रीपरमेश्वरच या झोपलेल्या जगात सजग किंवा सावध आहे.।।९।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा प्रकारचा सर्वदा स्वस्वरूपात समाविष्ट झालेला सिद्धयोगी नृत्य करतो म्हणजे स्वहृदयरूप भिंतीवर लीलेने हालचाल करतो. त्यात जाग्रत्-स्वप्नसुषुप्तीच्या अनेक भूमिका व त्यांच्या विस्ताराचे चित्रण होते. त्याला आंतरिक गौप्यरूप अशा स्वस्वरूपाचे पाठबळ असते. त्यामुळेच "हा आत्मा नर्तक म्हणविला जातो," असे "**नर्तक आत्मा।।९।।**" या सूत्राद्वारा कथन केले आहे.

या विषयी "**श्रीनैश्वासदेवीमहेश्वरनर्तक**" या ग्रंथातील सातव्या पटलात श्रीदेवीकृत स्तवामध्ये असे म्हटले आहे की -

**त्वमेकांशेनान्तरात्मा नर्तकः कोशरक्षिता।।**

**अर्थ :-** तूच एका भागाने अंतरात्मा, नर्तक व कोशांचे रक्षण करणारा आहेस.

**विवरण :-** आत्माच पुर्यष्टकाच्या संबंधाने शुभ व अशुभ वासनारूपांनी बांधला जाऊन एका योनीतून दुसऱ्या योनीत हिंडत राहतो व तो आत्मबाह्या-त्म्याच्या आत स्थित असल्याकारणाने त्याला अंतरात्मा असे जाणावे. कोश-रक्षिता म्हणजे स्वस्वरूपपरमात्मत्वाचे रक्षण करणारा असा याचा अर्थ आहे.

भट्टश्रीनारायण यांनीही यासंबंधी असे म्हटले आहे की -

**विसृष्टाशेषसद्बीजगर्भं त्रैलोक्यनाटकम्।**
**प्रस्ताव्य हर संहर्तुं त्वत्तः कोन्यः कविः क्षमः।।**

**अर्थ :-** माया प्रकृत्यादि बीजांनी युक्त असे त्रैलोक्यनाटक रंगभूमीवर आणून पुन्हा त्याचा उपसंहार करणारा तूच आहेस. हे महादेवा! तुझ्यावाचून कोण दुसरा भूतभविष्यद्रष्टा हे काम करण्याला समर्थ आहे? कोणी नाही.

"**सर्वागमोपनिषद्**" अर्थात् "**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या तंत्रग्रंथात असे म्हटले आहे की -

**संसारनाट्यप्रवर्तयिता सुप्ते जगति जागरूक एक एव परमेश्वरः।।**

**अर्थ :-** संसाररूपी नाटकाचे प्रवर्तन करविणारा व जग झोपलेले असताना जागा राहणारा एकमेव श्रीपरमेश्वरच आहे.।।९।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१)** संस्कृत नाटकातील नर्तक हा एकाच वेळेला नाच करणारा आणि

अभिनय करणारा नट असा दोन्हीही असतो.

**२)** एका दृष्टिकोनातून पाहिल्यास उदाहरणार्थ ज्याप्रमाणे एखादी व्यक्ती अंतर्गत सूक्ष्म आणि कारण देहासह वावरते त्याप्रमाणे हे श्रीईश्वरा! तू या जगतात अनेक जन्म घेऊन विविध भूमिका करतोस म्हणजेच तू या जगतात सर्वव्यापी किंवा मूळापासून आहेस. दुसऱ्या बाजूने विचार केला असता तू तुझ्या मूलभूत स्वभावात दिव्य म्हणून वस्ती करतोस आणि ज्यावेळेला तू जीवरूपाने जगन्नाट्यात विविध भूमिका करीत असतोस त्यावेळेला मात्र त्याच्या रूपामुळे ओळखला जात नाहीस. तू जगन्नाट्य आणि त्याच्या पलीकडे दोन्हीतही आहेस.

**३)** हा श्लोक द्व्यर्थी आहे. त्याचा पूर्ण अर्थ या भाषांतरात आणणे शक्य नाही. बीज याचा नाट्यातला अर्थ नाटकाचा मूळ स्रोत असा आहे तर जगन्नाट्याच्या बाबतीत बीज म्हणजे माया होय. नाटकामध्ये कथानकाचे आरंभस्थान म्हणजे बीज होय. या बीजापासून नाटकातील सर्व घटना घडा-वयाला सुरुवात होते. जगन्नाट्याच्या बाबतीत हे बीज म्हणजे माया होय. या बीजापासून जगातील सर्व घटना घडतात. नाटकामध्ये प्रस्तावना किंवा ओळख करून देण्याचा एक भाग असतो; त्याला प्रस्ताव असे म्हणतात आणि शेवटचा भाग असतो त्याला संहार असे म्हणतात. कवी असे म्हणतात की, हे श्रीईश्वरा! तू हा नाटकाचा प्रस्ताव सादर केला आहेस. तुझ्याशिवाय त्याचा संहार किंवा शेवट कोण बरे करू शकेल? अर्थात् या जगन्नाट्यात भूमिका करणाऱ्यांना कोण बरे मुक्त करू शकेल? परत "**कः**" या पदावर श्लेष आहे. "**कः**" म्हणजे कोण आणि "**कः**" म्हणजे प्रजापती अर्थात् सर्व जीवमात्रांना उत्पन्न करणारा होय. कवी असे म्हणतात की, हे श्रीईश्वरा! तुझ्याशिवाय अन्य कोण प्रजापती आहे की, जो या कथानकाचा शेवट घडवून आणणारा आहे?।।९।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे मोक्षलक्ष्मी ही नेहमी सावध असणाऱ्या जीवन्मुक्त सिद्ध-योग्याचा चिरकाळ आश्रय घेते अर्थात् सिद्धयोग्याचा मोह कायमचा निघून जातो.।।४६।।

अशा रीतीने परानंदरसाने म्हणजे श्रेष्ठ अशा आनंदरूप रसाने उन्मत्त झालेला आत्मा नेहमी कसा वागतो? त्याचे व्यवहार कसे असतात? या प्रश्नाचे उत्तर देताना चंद्रशेखर श्रीशिव यांनी "**नर्तक आत्मा।।९।।**" अर्थात्

"आत्मरूप झालेला सिद्धयोगी या विश्वमंचावरील नर्तक असतो," हे सूत्र सांगितले आहे.।।४७।।

ज्याप्रमाणे रस, भाव व अभिनय यांची योग्य जाण असणारा आणि भाषण अंगविक्षेप सत्त्वादि गुणांनी युक्त असणारा प्रौढ नट स्वतःला न विसरता आपली भूमिका योग्य प्रकारे निभावतो।।४८।।

त्याचप्रमाणे आत्मा स्वरूपाने स्फुरण पावत अथवा व्यक्त होत सर्व ठिकाणी त्या त्या भावरसावेशामुळे आणि त्या त्या क्रियाविलासांनी युक्त होत व्यक्त होतो.।।४९।।

हा आत्मा सर्व अवस्थांचा आधार होत असल्यामुळे त्याला नर्तक अथवा नट असे म्हटले आहे.।।४९.५।।

**विवरण :-** अशा रीतीने विहार करीत हा सिद्धयोगी परानंदरसाने उन्मत्त होऊन प्रौढनटाप्रमाणे रसभावाभिनयाने परिमित ज्ञानवान् जीवाची भूमिका घेऊन नेत्रांग विक्षेपादि करतो; पण तो स्वतःला न विसरताच सर्वावस्थांचे अनुकरण करतो. तो इष्टप्राप्ती किंवा अनिष्टपरिहार वगैरे काहीही करीत नाही. ज्यावेळेला हा सिद्धयोगी इंद्रियादींद्वारा जगन्नाट्याचा अभिनय करतो आणि सर्व ठिकाणी आत्मत्वभान ठेवतो त्यावेळेला त्याची ज्ञानदृष्टी लुप्त होत नसल्याने तो संतुष्टचित्तच राहतो.।।९।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**नर्तक आत्मा।।९।।**" अर्थात् "आत्मा नट किंवा नृत्य करणारा आहे." तो नृत्य करतो म्हणजेच आत गूढरूपात असलेल्या स्वस्वरूपाला अधिष्ठान करून जाग्रत्यादि अवस्थातून नाना प्रकारच्या भूमिकांचा विस्तार आणि स्व-परिस्पंदांच्या म्हणजेच स्वतःच्या हालचालींनी स्वभिंतीवर म्हणजे आपल्याला भिंत कल्पून त्यावर स्वतःला प्रकट करतो. त्यामुळे आत्म्याला नर्तक असे म्हटले आहे.।।९।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

आत्मविचारात गुंतलेला म्हणजे आत्मज्ञानी असा सिद्धयोगी आत्मरूप होतो.।।४४।।

"**नर्तक आत्मा।।९।।**" अर्थात् "आत्मा नृत्य करणारा नाटकी आहे."

हा सिद्धयोगी अंतःपरिच्छिन्न अर्थात् आपल्या शरीरगत वृत्तींच्या स्वरूपाचे अवलंबन करणारा स्वेच्छेने स्वपरिस्पंदाची क्रीडा करून स्वात्मरूप चैतन्यभिंतीवर नाच करतो.।।४५।।

अशा प्रकारे तो सिद्धयोगी स्वात्मरूप भिंतीवर जागृत, स्वप्न व सुषुप्ती अशा त्या त्या भूमिकांचे अवभासन करतो त्यामुळे आत्म्याला नर्तक असे म्हटले आहे.।।४६।।९।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

अशा प्रकारचा हा सिद्धयोगी निरंतर, अखंड व सतत स्वात्मविमर्शाने समाविष्ट अर्थात् आत्मज्ञान झालेला असा असतो, असे "**नर्तक आत्मा ।।९।।**" अर्थात् "आत्मरूप झालेला सिद्धयोगी या विश्वमंचावरील नर्तक असतो," या सूत्रातून प्रतिपादित केले आहे. आत्मा हा नृत्यति म्हणजे आत गुप्त असणाऱ्या स्वात्मरूपाचे ग्रहण करण्याच्या शक्तीने अनेक प्रकारच्या जाग्रदादि अवस्थांनी युक्त प्रपंचाचे स्वतःच्या स्वातंत्र्यशक्तीने चिद्भूमीवरती उन्मीलन करतो अर्थात् प्रकट करतो अर्थात् आत्मा स्वतःच्या इच्छाशक्तीने आश्रय होणाऱ्या चितिशक्तीत स्वपरिस्पंदलीलेनेच जाग्रत्स्वप्नसुषुप्तिरूप भूमिकांमध्ये अभिनय करीत आभासित होणाऱ्या वस्तूंचे एखाद्या नर्तका-प्रमाणे निमित्त बनतो.

यासंबंधी श्रीउत्पलाचार्य असे म्हणतात की -

**संसारनाट्यप्रवर्तयिता सुप्ते जगति जागरूक एक एव परमेश्वरः।।**

**अर्थ :-** झोपलेल्या जगात संसाररूप नाटकाचे प्रवर्तन करणारा व जागरूक अर्थात् सावध असणारा एकमात्र श्रीपरमेश्वरच आहे.

त्याचप्रमाणे "**श्रीमहार्थमञ्जरी**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**य एष विश्वनाटकशैलुषः शुद्धसंविच्छम्भुः।**
**वर्णकपरिग्रहमयी तस्य दशा कापि पुरुषो भवति।।१९।।**

**अर्थ :-** परमस्वातंत्र्यज्ञानस्वरूप श्रीशंभू हेच या विश्वरूप नाटकाचे नट अर्थात् सूत्रधार असून विभिन्न नटांचे पोषाख धारण करणारी त्यांची अवस्था पुरुषाच्या स्वरूपात अभिव्यक्त होते.।।१९।।

कारण श्रीमहेश्वर "हे सर्व मीच आहे," अशा विश्वमय प्रथेचा अनुभव घेऊन त्याच्या चमत्काराने संकुचित भावाचा त्याग केलेल्या स्वातंत्र्यस्वभाव-विद्यायुक्त संवित्‌चा अनुभव घेत जगद्रूप नाटकाचा सूत्रधार असे म्हणविले जातात अर्थात् ते विश्वयुक्त अभिव्यक्तीच्या प्रकारांचे सूत्रधार असतात.।।९।।

**विवरण :-** सूत्र क्रमांक नऊ आणि दहा यांच्यामध्ये अंतरात्म्याहून आत्म्याचे वेगळेपण ठेवल्याने येथे "**चित्तम् आत्मा**" असेच समजले पाहिजे. नर्तक आणि रंगभूमीची उपमा, आत्मा व अंतरात्मा यांच्यातील भेद आणि

संबंध यांचे चांगल्या प्रकारे ज्ञान होण्याला साहाय्यकारी आहे.

चित्तावरती अंतरात्म्याचा प्रकाश अहंकाराच्या रूपात उदित होतो. तो चित्तवृत्तींबरोबर नृत्य करीत असल्यासारखा असतो. नर्तकाची उपमा देऊन असे म्हटले आहे की, उपर्युक्त साधकभक्तयोगिशिष्य एवढे परिश्रम करूनही आणवस्तराहून वरच्या स्तरावर येऊ शकत नाही.

या सूत्राचे स्पष्टीकरण वेगळ्या प्रकारेही देता येते. ज्याने सहजविद्या प्राप्त केली आहे आणि जो उन्मना अवस्थेपर्यंत पोहोचला आहे तो निवृत्त होऊन जंगलात अथवा गुहेत जाऊन बसत नाही. तो वैश्विक नाट्यातील स्वतःची भूमिका ओळखतो आणि जीवनातील कर्तव्ये निभावीत राहतो. ज्याप्रमाणे एखादा नट अथवा अभिनेता नाटकात एखाद्या विशिष्ट पात्राची भूमिका करतो; पण त्या विशिष्ट भूमिकेचा त्याच्यावर कधीच परिणाम होत नाही किंवा त्याच्यामुळे तो नट भ्रमित होत नाही त्याप्रमाणेच आत्म्यावरही वैश्विक नाट्यात त्याच्या आयुष्यात घडणाऱ्या घटनांचा परिणाम होत नाही. आतून तो कायमच यांच्यापासून अनासक्त असतो.।।९।।

**सूत्र क्रमांक १०**

**संबंध :-** आता या जगत्-नाटकात नर्तकाचे म्हणजेच सिद्धयोग्याचे नाट्यस्थान पुढील सूत्राने सांगत आहेत.

**रङ्गोन्तरात्मा।।१०।।**

**शब्दार्थ :- रङ्ग** - नाट्यमंच किंवा सिद्धयोग्याच्या प्रपंचाच्या नाना अवस्थांच्या खेळाचे स्थान. **अन्तरात्मा** - जड देहाच्या आत असलेला, प्राणप्रधान, पुर्यष्टकरूप व सूक्ष्मशरीररूप जीव. (श्रीक्षेमराजाचार्य यांच्या शब्दात **पुर्यष्टकरूपो देहापेक्षया अन्तरो जीवः।।**)

**अर्थ :-** पुर्यष्टक अर्थात् सूक्ष्म शरीर हा त्याचा म्हणजे सिद्धयोग्याचा नाट्यमंच असतो अर्थात् बाह्यसंसारोन्मुख कामोपभोगाकांक्षावासनातृष्णा-संकल्पनायुक्त कुंडलिनी शक्ती हीच सिद्धयोग्याच्या प्रपंचातील नाना अवस्थां-मधील खेळाचे स्थान म्हणजे प्राणप्रधान पुर्यष्टकाने नियंत्रित झालेला जीव असतो.।।१०।।

**विशेष व्याख्या :-** स्वरूपाच्या संकोचाचे अवभासन करणारे म्हणजेच तो संकोच जाणवून देणारे तत्त्व शून्य-प्रधान किंवा प्राण-प्रधान पुर्यष्टक आहे. हाच अंतर जीव आहे. याच्या द्वाराच सिद्धयोगी जगताचा भास निर्माण करणारी क्रीडा करीत असतो. सूक्ष्म शरीरात स्थित होऊनच तो आपल्या

इंद्रियांच्या स्पंदनक्रमाने जगताच्या नाटकाचे अवभासन करतो. श्रीशिवव्याप्ती प्राप्त झालेला सिद्धयोगी अहंता आणि इदंता व अंतर आणि बाह्य यांच्यात चिद्विमर्शाच्या सामरस्याचा अनुभव करून घेतो. साधारणरूपात पुर्यष्टक प्रमातृता स्वप्नावस्थेतच प्रकट होते.।।१०।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा जगन्नाट्य करणाऱ्या नर्तकाची भूमिका घेण्याचे स्थान कोणते ते **"रङ्गोऽन्तरात्मा।।१०।।"** अर्थात् "सिद्धयोग्याचे सूक्ष्म शरीर हाच त्याचा नाट्यमंच असतो," असे या सूत्रात सांगितले आहे.

जगद्रूपी नाट्यक्रीडा दाखविण्याच्या इच्छेने जेथे भूमिका रंगवितात त्याला रंग असे म्हणावे. जरूर त्या म्हणजे आवश्यक अशा भूमिका घेण्याची किंवा वेषभूषादि करण्याची जागा म्हणजे अंतरात्मा होय. संकोच व अवभासन पावणारा, शून्यप्रधान वा प्राणप्रधान किंवा पुर्यष्टक अर्थात् सूक्ष्मशरीररूपी देहाच्या अपेक्षेने आत राहणारा जीव होय. याला अंतरात्मा म्हणावे; कारण प्राण व पुर्यष्टक यांनी नियंत्रित केलेला जीव असतो. त्याचप्रमाणे जीवभावाचा पुर्यष्टकप्राणच मुख्य असतो. येथे म्हणजेच जीवात स्थिर झालेला साधकभक्त-योगिशिष्य स्वतःच्या इंद्रियांच्या हालचालींनी जगन्नाट्याचे आभासन करतो. त्याच्या इंद्रियांची हालचाल ही सहजस्वातंत्र्यशक्तीच्या विस्फुरणाने युक्त अशा आंतर-इंद्रियांची हालचाल होय.

यासंबंधी **"श्रीस्वच्छंदतंत्र"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**पुर्यष्टकसमावेशाद्विचरन्सर्वयोनिषु।**

**अन्तरात्मा स विज्ञेयः ............।।**

**अर्थ :-** पुर्यष्टकाच्या समावेशामुळे सर्व योनींतून संचार करणारा अंतरात्मा होय.

**विवरण :-** हा जो शरीराचे आवरण असणारा व प्रकृतीत लय पावलेला आत्मा असतो तोच आंतर-सूक्ष्मशरीराचा आरंभक, तन्मात्रपंचक आणि मन, बुद्धी व अहंकार यांनी युक्त पुर्यष्टकाच्या संबंधामुळे वासनामय होतो व विविध योनींमधून भटकणारा होतो.।।१०।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१)** करण या पदाचे या ठिकाणी दोन अर्थ आहेत. त्याचा एक अर्थ इंद्रिय असा असून दुसरा अर्थ नृत्याच्या मुद्रेमधली हाताच्या बोटांची एक विशिष्ट स्थिती असा आहे. जीवनाच्या संदर्भात करण म्हणजे इंद्रिये आणि

नृत्याच्या संदर्भात त्याचाच अर्थ नृत्याची मुद्रा असा होतो.

**२)** शुभाशुभ कर्मांच्या वासना या पुर्यष्टकात जातात आणि त्याच जीवाचा पुढचा जन्म कसा असेल याचा विचार करतात. त्यामुळेच जीव एका योनीतून दुसऱ्या योनीत संचार करणारा होतो.।।१०।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

नृत्य करणाऱ्या आत्म्याला नृत्यासाठी योग्य आधार कोणता? या प्रश्नाचे उत्तर देताना श्रीशिवांनी "**रङ्गोन्तरात्मा।।१०।।**" अर्थात् "सिद्धयोग्याचे सूक्ष्म शरीर हाच त्याचा नाट्यमंच असतो," हे सूत्र सांगितले आहे.।।५०।।

बाह्यज्ञानयुक्त असा जो आत्मा असतो त्याला नट असे म्हणतात. तोच आत्मा अंतर्मुख झाला असता त्याला अंतरात्मा असे म्हणतात.।।५१।।

तो अंतरात्मा पुर्यष्टकाने म्हणजेच पाच महाभूते, मन, बुद्धी आणि अहंकार यांनी युक्त झाला असता त्याला रंगभूमी असे म्हणतात. या रंगभूमीवर हा चिदात्मा प्रवृत्ती, स्थिती व संहार इत्यादि क्रियांनी जणू काही नृत्य करतो असे समजावे.।।५२।।

**विवरण :-** वेगवेगळ्या विस्तृत नाट्य सादर करण्याच्या आशयाने ज्या ठिकाणी हा आत्मा रंगतो म्हणजेच वेषभूषा करतो त्या भूमिकेनुरूप ते स्थान म्हणजे अंतःकरण होय. त्याच्या आश्रयानेच हा चिदात्मा मनुष्यपश्वादिदेह-रूप भूमिकांवर येऊन इंद्रियप्रवृत्तींनुसार सृष्ट्यादि पंचकृत्ये करीत नृत्य करतो.।।१०।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**रङ्गोऽन्तरात्मा।।१०।।**" अर्थात् रंग म्हणजे भूमिकेला योग्य अशी वेषभूषा किंवा नेपथ्यरचना होय. अंतरात्मा म्हणजे संकोचअवभासतत्त्वाने युक्त असा शून्यप्रधान किंवा प्राणप्रधान व पुर्यष्टकाने नियंत्रित केलेला जीव होय. त्या रंगगृहात पाय ठेवून म्हणजेच प्रवेश करून स्वतःच्या इंद्रियांच्या हालचालींच्या क्रमाने सिद्धयोगी जगताच्या नाट्याचा आभास करवितो.।।१०।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारच्या जगद्रूप नाट्य करणाऱ्या नर्तक सिद्धयोग्याला भूमिका घेण्याकरिता जी रंगभूमी जगद्गुरूंनी सांगितली आहे तीच "**रङ्गोऽन्तरात्मा ।।१०।।**" अर्थात् "सिद्धयोग्याचे सूक्ष्म शरीर हाच त्याचा नाट्यमंच असतो," या सूत्राने कथन केली आहे.।।४७।।

अंतरात्मा म्हणजे पुर्यष्टकांनी युक्त असा जीव होय. या जीवावस्थेत

जगाचे नाट्य खेळण्याचे कौतुक करण्यासाठी सिद्धयोगी रंगतो तोच रंग म्हणजेच नाट्यभूमी होय.।।४८।।

तेथे पाऊल ठेवलेला सिद्धयोगी स्वतःच्या इंद्रियस्पंदांच्या लीलेने श्रीसदाशिवांपासून पृथ्वीपर्यंतचे जगन्नाट्य प्रकाशित करतो.।।४९।।१०।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

आता या सूत्रात जेथे विश्वनाट्याचे प्रवर्तन होते त्याचे भूमिकाग्रहण-स्थान म्हणजेच रंगमंचाबद्दल "**रङ्गोऽन्तरात्मा।।१०।।**" अर्थात् "सिद्धयोग्याचे सूक्ष्म शरीर हाच त्याचा नाट्यमंच असतो," या सूत्राने सांगत आहेत.

अनेक प्रकारच्या कार्यकारणसंबंधांनी युक्त होऊन पसरलेल्या संसार-नाटकरूपी क्रीडेचे कौतुक जेथे रंगविले जाते तो रंग होय. त्या त्या विचित्र भूमिकांचे ग्रहण म्हणजे पदबंधस्थान अर्थात् पायबंद अर्थात् पैंजण घालण्याची जागा होय. अंतरात्मा म्हणजे प्राण व पुर्यष्टकांनी नियंत्रित केलेला जीव होय. हा संकोचाचे अवभासन करणाऱ्या तत्त्वासहित असणारा असा शून्य अथवा प्रधान होय. तेथेच हा सिद्धयोगी पाऊल ठेवून स्वतःच्या इंद्रियांच्या हालचाली-रूप लीला करून म्हणजेच सहजस्वातंत्र्यशक्तीच्या स्फुरणाने युक्त आंतरिंद्रियांच्या परिस्पंदांच्या क्रमाने नेहमी किंवा सतत श्रीशिवांपासून पृथ्वीपर्यंतच्या तत्त्वांनी युक्त विश्वाच्या नाट्याचे प्रकाशन करवीत असतो.

यासंबंधी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**पुर्यष्टकसमावेशाद्विचरन्सर्वयोनिषु।**
**अन्तरात्मा स विज्ञेयः ...........।।**

**अर्थ :-** पुर्यष्टकाचा समावेश झाल्याने सर्व योनींमध्ये संचार करणाऱ्याला अंतरात्मा असे जाणावे.

अर्थात् रागादि पाच आवरणांनी युक्त असणाऱ्या शरीरप्रकृतीत लीन झालेला आत्माच आंतरलिंगदेहाचा आरंभक अर्थात् आरंभ करणारा शब्दादि तन्मात्रपंचक व मन, बुद्धी आणि अहंकार या आठ तत्त्वांनी युक्त पुर्यष्टकाच्या संपर्कामुळे चांगल्या व वाईट विषयांच्या वासनांनी संबंधित होऊन एका योनीतून दुसऱ्या योनीत हिंडत राहतो. त्या "स्व"च्या आंत व बाहेर अशा दोन्हींमध्ये स्थित असणाऱ्या जीवाला अंतरात्मा असे जाणावे.

**विवरण :-** आत्म्याचा आधाररूप अतंरात्माच अचल आणि स्थिर असल्या-कारणाने तो अंतरात्माच आत्म्याच्या नृत्याची रंगभूमी असतो. उपनिषदांमध्ये अंतरात्म्यालाच श्रीईश्वर मानले आहे. याविषयी असे म्हटले आहे की -

**नित्योनित्यानां चेतनश्चेतनानामेको बहूनां यो विदधाति कामान्।**
**तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरास्तेषां शान्तिः शाश्वती नेतरेषाम्।।**
**।। गुह्यकाल्युपनिषद्।।**

**अर्थ :-** जो अनित्य पदार्थांमध्ये नित्य स्वरूपाने असतो, चेतनांमधला चेतन असतो आणि जो एकटाच अनेकांच्या कामना पूर्ण करतो, अशा आपल्या बुद्धीमध्ये स्थित असलेल्या अंतरात्म्याला जे विवेकी पुरुष पाहतात, त्यांनाच नित्य शांती प्राप्त होते, अन्य पुरुषांना नाही.

श्रीईश्वर एक आहे त्यामुळे सर्व प्राण्यांचा अंतरात्मा एकच आहे. त्याच्याच प्रकाशाने अनेक चित्ते प्रकाशित होऊन अनेक चित्ताभिमानी जीव म्हणविले जातात. त्यामुळेच येथे अंतरात्म्याला रंगभूमीची उपमा दिली आहे.।।१०।।

**सूत्र क्रमांक ११**

**संबंध :-** अशा प्रकारे पुर्यष्टकरूप आत्म्याच्या द्वारे रंगमंचावर नाचणाऱ्या सिद्धयोग्याला कोण कोण पाहते? हे पुढील सूत्रात सांगितले आहे.

**प्रेक्षकाणीन्द्रियाणि।।११।।**

**शब्दार्थ :- प्रेक्षकाणि** - प्रेक्षक, पाहणारी अर्थात् स्वस्वरूपाच्या अंतर्मुख भावाला पाहणारी किंवा प्रत्यक्ष अनुभव घेणारी. **इन्द्रियाणि** - इंद्रिये अर्थात् सिद्धयोग्याची चक्षुरादि इंद्रिये ही संसारनाटक प्रकट करणाच्या आनंदात.

**अर्थ :-** सिद्धयोग्याची इंद्रिये ही त्या अंतरात्म्याच्या नर्तनाचे प्रेक्षक असतात अर्थात् सिद्धयोग्याच्या स्वतःच्या अधीन असलेली चक्षुरादि इंद्रिये म्हणजे नानाविध शक्तींच्या द्वारा बाह्यसंसारोन्मुखतेने नटलेली कुंडलिनी शक्ती ही संसारनाटकाचे प्रकटन करण्याच्या आनंदातील प्रेक्षक अर्थात् स्व-स्वरूपाला अंतर्मुखभावाने पाहणारी असते.।।११।।

**विशेष व्याख्या :-** ज्याप्रमाणे रंगमंचावर नटाच्या नाटकाचा आस्वाद घेणारे रंगशाळेत बसलेले प्रेक्षक असतात त्याचप्रमाणे स्वस्वरूपात स्थित असणारा सिद्धयोगी रंगमंचावर अहंता आणि इदंता यांच्यामध्ये चिद्विमर्शाच्या सामरस्याने संसाररूपी नाटकाचे इंद्रियस्पंदनाच्या क्रमाने प्रदर्शन करणारा नट असतो. त्यामुळे डोळे इत्यादि इंद्रिये ही या नाटकाचे प्रेक्षक अतात. याचे तात्पर्य असे आहे की, या सिद्धयोग्याचे डोळे इत्यादि इंद्रिये संसार-नाटक प्रकट करणाच्या आनंदात मग्न होऊनच स्वस्वरूपाचा अंतर्मुख-भावाने साक्षात्कार करतात. अशा प्रकारे इंद्रिये चमत्काररसाचा संपूर्ण आनंद प्राप्त करून घेतात.

यासंबंधी श्रुतीत असे म्हटले आहे की -

**कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षद्**

**आवृत्तचक्षुरमृतत्त्वमिच्छन्।। कठोपनिषद्।।२.१.१।।**

**अर्थ :-** कोणी धैर्यवान् सिद्धयोगी चक्षू इत्यादि इंद्रियांना अंतर्मुख करून स्वस्वरूपाचा साक्षात्कार करून अमृतपद प्राप्त करतो.।।२.१.१।।

आणि त्याचप्रमाणे -

**यत्र यत्र मिलिता मरीचयः तत्र तत्र प्रभुरेव जृम्भति।।**

**अर्थ :-** जेथे जेथे चित्किरणांचा साक्षात्कार होतो तेथे तेथे प्रभूच प्रकट होतात.।।११।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा प्रकारे अंतरात्मरंगभूमीवर नृत्य करणाऱ्या नटाला पाहणारे नटाचे प्रेक्षक त्याची इंद्रियेच असतात हे **"प्रेक्षकाणीन्द्रियाणि।।११।।"** अर्थात् "सिद्धयोग्याची इंद्रिये ही त्याच्या अंतरात्म्याच्या नर्तनाचे प्रेक्षक होत," या सूत्राने कथन केले आहे.

या सिद्धयोग्याचे डोळे आदि इंद्रिये संसारनाट्याच्या प्रकटनाने प्रमुदित झालेल्या स्वस्वरूपाला अंतर्मुख होऊन डोळे भरून पाहतात. प्रयोगाच्या पद्धतीने विभागरहित अर्थात् एकत्वभावनेने व चमत्काराने पूर्णता मिळवितात म्हणजेच अहंतारसाच्या चमत्काराच्या दृढ अभ्यासामुळे मी हा चमत्कार करतो अशा प्रकारच्या विभागाने रहित स्वात्मा मी श्रीशिव आहे असा विचार करीत चमत्कार करतो.

यासंबंधी **"कठोपनिषद्"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षदावृत्तचक्षुरमृतत्वमश्नन्।।२.१.१।।**

**अर्थ :-** एखादा धीर ज्ञानी अर्थात् साधकभक्तयोगिशिष्य अंतर्मुख होतो व मोक्षाची म्हणजे श्रीशिवशक्तिसामरस्याची इच्छा करीत प्रत्यगात्म्याला पाहतो म्हणजेच जाणतो.।।२.१.१।।११।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

असे असताना इंद्रियसमूह त्या नर्तक आत्म्याला आच्छादक होऊ शकत नाही. याविषयी पत्नीचा अर्धदेह धारण करणारे श्रीशिव **"प्रेक्षकाणीन्द्रियाणि।।११।।"** अर्थात् "सिद्धयोग्याची इंद्रिये ही त्याच्या अंतरात्म्याच्या नर्तनाचे प्रेक्षक होत," हे सूत्र सांगतात.।।५३।।

कारण चिदात्मा स्वतंत्र आणि ज्ञानाने परिपूर्ण आहे. त्याच्या सामर्थ्यामुळे

इंद्रिये आपल्या आपल्या वृत्तींमध्ये व्यवहार अथवा क्रिया करतात.।।५४।।

चिदात्मा नृत्य करीत असताना इंद्रिये फक्त प्रेक्षकाचीच भूमिका करतात. त्याच्या स्वरूपावर आवरण घालावयाला ती समर्थ होत नाहीत.।।५५।।

**विवरण :-** स्वतंत्र चिदात्माच इंद्रियांचा अवभासक किंवा प्रकाशक असतो. त्याचा भासच सर्वांना प्रकाशित करणारा असल्याने त्याच्या प्रकाशाची मदत न घेतल्यास हे सर्व विश्व जड, अंध, मूक व बधिर होईल म्हणजेच इंद्रियव्यवहार चालणार नाहीत. त्यामुळे चिदात्म्याचे बल प्राप्त झालेली इंद्रिये त्रिभुवनरूप नाटकाचे प्रदर्शन करून आनंदाने ओतप्रोत भरलेल्या आणि अहंता व इदंता टाकलेल्या किंवा गळालेल्या आत्मस्वरूपाला डोळाभर पाहून सहृदय प्रेक्षकाप्रमाणे जीवात्मदर्शी सिद्धयोग्याला अमृतरसमय चमत्कार अर्पण करतात. त्यामुळे या सिद्धयोग्याचा इंद्रियसमुदाय सामान्यजीवांच्या इंद्रिय-समुदायाप्रमाणे दुःखमय विश्वाच्या फेऱ्यात पडत नाही. सामान्यलोकांना खेचर्यादि सिद्धींमुळे लोभ उत्पन्न होतो व अद्वैतज्ञानामृतरससेवनाला ते मुकतात. त्यामुळे नृत्य करणाऱ्या चिदात्म्याचे रूप त्याच्या इंद्रियांमुळे झाकले जात नाही.।।११।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**प्रेक्षकाणीन्द्रियाणि।।११।।**" या सूत्राच्या द्वारा असे कथन केले आहे की, "ही इंद्रिये सांसारिक नाट्याचे प्रकटन पाहून आनंदाने निर्भर असलेले स्वस्वरूप अंतर्मुख होऊन पाहतात म्हणजेच साक्षात् अनुभवितात म्हणून ती प्रेक्षक होत."।।११।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**प्रेक्षकाणीन्द्रियाणि।।११।।**" या सूत्रात "या देहातील रंगभूमीवर स्व-जीवरूपात नृत्य करणाऱ्या सिद्धयोग्याचे प्रेक्षक कोण म्हणाल तर ती इंद्रिये असून तीच संसारनाट्याचे प्रकाशन करतात," हे कथन केले आहे.।।५०।।

सिद्धयोग्याचे चक्षू अर्थात् डोळे आदि इंद्रिये ही चमत्कार करणारी असतात.।।५०.५।।११।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

अशा प्रकारे "देह हीच रंगभूमी असणाऱ्या या नर्तकाचे प्रेक्षक म्हणजे त्याची इंद्रियेच असतात," असे "**प्रेक्षकाणीन्द्रियाणि।।११।।**" या सूत्रात सांगितले आहे.

सुप्रबुद्ध अर्थात् परमतत्त्वाचे ज्ञान झालेला आत्माच इंद्रियांचे अवभासन करविणारा असतो; कारण त्या आत्मज्योतीच्या प्रकाशमान होण्यानेच हे सर्व नामरूपात्मक व दिसणारे विश्व प्रकट होत असते. त्या प्रकाशमानालाच अनुसरून सूर्यादि ज्योतींना प्रकाश प्राप्त होत असतो; नाहीतर हे विश्व जड, अंध व मुक्याप्रमाणे झाले असते. त्यामुळेच त्या ज्योतीने अनुप्रमाणित झालेली श्रोत्र, त्वक् अर्थात् त्वचा, डोळे, जीभ व नाक ही इंद्रिये त्रैलोक्याच्या नाटकाचे प्रदर्शन झाल्याच्या आनंदाने युक्त होऊन, अहंता व इदंता अर्थात् मी व हे हा भेद नष्ट झालेली अशी होऊन मी श्रीशिव आहे अशा प्रकारे स्वतःचे स्थान जाणून घेऊन सहृदय दर्शकाप्रमाणे आत्मदर्शन झालेल्या महायोगात स्थिर झालेल्या सिद्धयोग्याला परामृताने युक्त रसाच्या चमत्काराचे संपादन करवून देतात. त्यामुळे गरीब प्राण्याप्रमाणे खेचर्यादि शक्तींनी आवरण घातल्यामुळे भेद अभिव्यक्त करणारा सिद्धयोग्याचा इंद्रियसमूह अमृतरसाने युक्त झाल्यावर आध्यात्मिकादि त्रिविध दुःखांनी भरलेल्या संसारमार्गात भटकत नाही. अशा स्थितीत नृत्य करणाऱ्या चिदात्म्याचे स्वरूप झाकले जात नाही.

**विवरण :-** सर्वसामान्य मनुष्याची इंद्रिये ही बहिर्मुखी असतात आणि त्याला ती वारंवार बाह्यवस्तूंमधला आनंद अनुभविण्यासाठी बाहेर आकर्षित करीत असतात; परंतु ज्या साधकभक्तयोगिशिष्याने उन्मनावस्था प्राप्त केलेली आहे अशा सिद्धयोग्याची इंद्रिये त्याला बाहेर खेचत नाहीत. याउलट ती बाह्य दृश्यांची आसक्ती सोडून देऊन अंतर्मुख होतात, त्याचे नृत्य पाहतात आणि त्याच्या समोर वैश्विक नटाचे तेज, सौंदर्य आणि आनंद यांची अभिव्यक्ती करतात. योग्याची इंद्रिये आतल्या अभिनेत्याला उघड करतात व ते त्याला सर्वसामान्य मनुष्याप्रमाणे लपवून ठेवत नाहीत. त्या सिद्धयोग्याला स्थूल शरीराच्या साहाय्याशिवाय बाह्य दृश्याचे ज्ञान होते. त्यामुळेच इंद्रिये ही प्रेक्षकमात्र आहेत असे म्हटले आहे.।।११।।

## सूत्र क्रमांक १२

**संबंध :-** नाटकात सात्त्विक अभिनयाची सिद्धी बुद्धीच्या कौशल्यानेच मिळते. अशा प्रकारे सिद्धयोग्याला जगदानंदाची प्राप्ती विशेष सात्त्विक बुद्धीने होते.

**धीवशात्सत्त्वसिद्धिः ।।१२।।**

**शब्दार्थ :- धी** - उच्च पारमार्थिक शुद्ध, सत्त्वयुक्त व कुंडलिनी शक्तिरूप संवित् अर्थात् बुद्धी किंवा ऋतंभरा प्रज्ञा. **वशात्** - मुळे अर्थात् सामर्थ्याने.

**सत्त्वसिद्धिः** - सत्त्व म्हणजे आत्म्याचे स्फुरण, सूक्ष्म आंतर संवित् परिस्पंद सत्त्वाची सिद्धी अथवा अभिव्यक्ती, प्रकटीकरण.

**अर्थ :-** उच्च पारमार्थिक बुद्धी अर्थात् श्रीशिवरूप झालेली स्वसंवेद्य आत्मचैतन्ययुक्त कुंडलिनी शक्ती ही तात्त्विक स्वरूपाची जाणीव म्हणजेच विमर्श करण्यात विशारद किंवा निष्णात असते. या बुद्धीमुळे सत्त्व अथवा आत्म्याची स्फुरत्ता किंवा सूक्ष्म अंतःस्पंदन व्यक्त होते अर्थात् ऋतंभरा प्रज्ञायुक्त शुद्धतत्त्वबुद्धीमुळे आंतर संवित्स्पंदनाची अभिव्यक्ती होते.।।१२।।

**विशेष व्याख्या :-** तात्त्विक स्वरूपाचा विमर्श करण्यात चतुर असणाऱ्या बुद्धीला "**धी**" अर्थात् ऋतंभरा प्रज्ञा असे म्हणतात. ज्याप्रमाणे नाटकामध्ये अभिनयाची सफलता कुशल बुद्धीवर अवलंबून असते त्याप्रमाणेच शुद्ध सत्त्वात स्थिर असलेल्या युक्तिकुशल बुद्धीच्या द्वाराच सिद्धयोग्याला आंतर-चैतन्यशक्तीची अभिव्यक्ती सफलतापूर्वक होते.।।१२।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

"**धीवशात्सत्त्वसिद्धिः।।१२।।**" अर्थात् "या सिद्धयोग्याच्या ठिकाणी तात्त्विकस्वरूपाच्या विचारात निष्णात अशा बुद्धीच्या अनुकूलतेमुळे स्फुरद्रूप सत्त्वगुणाची सूक्ष्म चलनरूप सिद्धी प्रकट होते." नाटकात सात्त्विक अभिनयाची सिद्धी बुद्धिकौशल्यामुळेच प्राप्त होते. सात्त्विकरूप अभिनयाची सिद्धी असा याचा अन्वय आहे. सात्त्विक गुण म्हणजे स्तंभ अर्थात् स्थिर होणे, स्वेद अर्थात् घाम येणे, रोमांच अर्थात् अंगावर काटा येणे इत्यादि स्वरूपाचा असतो. अभिनय म्हणजे नटांनी नृत्याभिनयाद्वारा केलेले रामयुधिष्ठिरादि व्यक्तींच्या अवस्थांचे अनुकरण होय. सात्त्विक हे वाचिक, आंगिक, आहार्य आदि अभिनयाचे उपलक्षण होय.।।१२।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

असे असताना ज्या बुद्धिबळाच्या योगाने साधकभक्तयोगिशिष्य सर्वश्रेष्ठ होतो त्याविषयी भगवान् श्रीशिवांनी "**धीवशात्सत्त्वसिद्धिः।।१२।।**" अर्थात् "ऋतंभरा प्रज्ञेच्या सामर्थ्याने सत्त्वाची सिद्धी होते," हे सूत्र सांगितले आहे.।।५६।।

ज्यावेळेला शब्दादि विषयरूप वृत्ती चिद्रूपाचा अभिमान धारण करते त्यावेळेला तेथे बुद्धी अगोदरच चिद्रूपाचा निश्चय करते.।।५७।।

ही बुद्धी हा निश्चय आधीच करते. त्यामुळे तिला शुद्धबुद्धिशक्ती असे म्हणतात. इतर सर्व आशयांचा अथवा वृत्तींचा त्याग केल्यामुळे ही बुद्धी सत्त्वगुणाची पराकाष्ठा अथवा सत्त्वगुणाचे आश्रयस्थान असते.।।५८।।

या बुद्धीच्या सामर्थ्यामुळेच सत्त्वसिद्धी होत असल्यामुळे हे आवर्जून येथे सांगितले आहे.।।५८.५।।

**विवरण :-** इंद्रियांचा स्वभाव हा सतत प्रसरणशील असा असतो. असे असताना त्या इंद्रियांमध्ये व मनोवृत्तीत प्रतिबिंबित झालेल्या शब्दादि विषयांना शास्त्रकथित उपायांनी हे विषय चिन्मयस्वभावाहून वेगळे नाहीत, असा निश्चय करणारी बुद्धी अवांतर कारणे क्षीण झाल्यामुळे रजतमांनी मलिन न होता स्वतःचे स्वप्रकाशकत्व व विश्वामध्ये श्रेष्ठ अर्थात् पर प्रकाश पाहणारी होऊन सिद्धयोग्याला आत्मसत्त्वप्रकाशाला योग्य बनविते. बुद्धीमुळे सिद्धयोगी आत्मप्रकाश जाणण्यास अधिकारी होतो.।।१२।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**धीवशात्सत्त्वसिद्धिः।।१२।।**" अर्थात् "**धी**" म्हणजे तात्त्विकस्वरूपाच्या विचारामुळे निर्मळ झालेली बुद्धी होय. या बुद्धीमुळे स्फुरणाऱ्या सत्त्वरूप अशा आत्म्याच्या सूक्ष्म स्पंदनाची अभिव्यक्ती होते. नाट्यात सात्त्विक अभिनयाची सिद्धी ही बुद्धिकौशल्यामुळेच मिळते.।।१२।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे ज्याचा इंद्रिय समुदाय प्रेक्षक झाला आहे अशा सिद्धयोग्याला।।५१।।

"**धीवशात्सत्त्वसिद्धिः।।१२।।**" अर्थात् "**धी**" म्हणजे तात्त्विक रीतीने चिद्रूपाचा विचार करण्यात कुशल अशी मती वश झाल्यामुळेच स्पंदामध्ये परिणमित होणाऱ्या सत्त्वाची स्फुरत्तारूप सिद्धीची अभिव्यक्ती होऊन ते स्पष्ट होते अर्थात् सत्त्व स्पष्टपणे कळून येते."।।५२।।१२।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

"सुप्रबुद्ध योग्याला ऋतंभरा प्रज्ञेनेच स्वात्मरूपाची अभिव्यक्ती होते," असे "**धीवशात्सत्त्वसिद्धिः।।१२।।**" या सूत्रात सांगितले आहे.

"**धी**" ही तात्त्विक वस्तूच्या स्वरूप चिंतनाने निर्मळ होते. त्यामुळे सत्त्वाच्या म्हणजेच सहज स्वातंत्र्यशक्तीच्या विशेष स्फुरणाने युक्त अशा आंतर परिस्पंदमय चिद्रूपाची सिद्धी अर्थात् अभिव्यक्ती स्पष्ट होते. त्याप्रमाणेच नाट्यातही सात्त्विक अभिनयाची जाणीव बुद्धीच्या साहाय्यानेच होत असते.।।१२।।

**विवरण :-** या सूत्रावरील टीकेमध्ये "**सत्त्व**" आणि "**धी**" या शब्दांचे दोन अर्थ आले आहेत. या संदर्भातील "**सत्त्व**" हा शब्द प्रकृतीच्या घटकाचा

संदर्भ देत नसून तो पूर्ण आत्मचैतन्याचे हृदय आहे आणि "**धी**" या शब्दाचा अर्थ केवळ बुद्धी नसून त्याचा अर्थ ऋतंभरा प्रज्ञा असा आहे. ही प्रज्ञा म्हणजे सत्यासह असणारी आंतरिक जागृती होय. योग्याला "**धी**" द्वारा म्हणजेच आत्मिक अंतर्ज्ञानद्वारा सत्त्वाची जाणीव होते. ज्याप्रमाणे नट सत्त्वाचा अर्थात् मानसिक अवस्थेचा अभिनय त्याच्या बुद्धीनुसार करतो त्याप्रमाणेच हे आहे. ही "**धी**" अर्थात् बुद्धीच्या वृत्ती वश झाल्या म्हणजेच शांत झाल्या की, सत्त्व अर्थात् बुद्धीचे शुद्धीकरण होते. अशी शुद्धी झाल्यानंतरच योगाची स्थिती प्राप्त होते.

यासंबंधी "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।।१६.१।।**

**अर्थ :-** अभय अर्थात् भयाचा पूर्ण अभाव, उत्तमप्रकारे अंतःकरणाची स्वच्छता आणि तत्त्वज्ञानाकरिता ध्यानयोगात निरंतर दृढ स्थिती या गोष्टी सिद्धयोग्याला "**धी**" अर्थात् बुद्धीमुळे प्राप्त होतात.।।१६.१।।१२।।

### सूत्र क्रमांक १३

**संबंध :-** या सात्त्विक अभिनयात कौशल्य प्राप्त झाल्यावर या सिद्धयोग्याला स्वातंत्र्याची सिद्धी होते.

**सिद्धः स्वतन्त्रभावः ।।१३।।**

**शब्दार्थ :- सिद्धः** - सिद्ध होतो. **स्वतन्त्रभावः** - स्वतंत्रपणा अर्थात् जागृत व स्वप्न या अवस्थांमध्ये सिद्धयोग्याला सर्व विश्वाला वश करण्याचे स्वातंत्र्य प्राप्त होते.

**अर्थ :-** ज्या सिद्धयोग्याला आत्म्याची स्फुरत्ता व स्पंदन यांचा साक्षात्कार झालेला असतो अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने ज्या साधक-भक्तयोगिशिष्याची अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत होऊन तिने स्वतःसिद्ध असे सिद्धयोगाचे साधन करून व सुषुम्नामार्गाने सहस्रारात जाऊन श्रीशिवांशी समरसता प्राप्त केलेली असते त्याला श्रीशिवशक्तिसामरस्याची सिद्धी प्राप्त होऊन तो सिद्धयोगी स्वतंत्र होतो अर्थात् अशा सिद्धयोग्याला सहजज्ञता व सर्व विश्व वश करण्याचे सामर्थ्य प्राप्त होते.।।१३।।

**विशेष व्याख्या :-** युक्तिकुशल बुद्धी अर्थात् ऋतंभरा प्रज्ञेचा उदय झाल्यानंतर श्रीशिवव्याप्ती प्राप्त झालेला सिद्धयोगी स्वाभाविक ज्ञानरूपता अथवा सहजभावरूप स्वातंत्र्याने युक्त होतो. त्याला सर्वकर्तृता अर्थात् सर्व काही करण्याचे स्वातंत्र्य प्राप्त होते. सारे जग त्याच्या ताब्यात येते. याचा

तात्पर्यार्थ अशा प्रकारे आहे की -

**१)** हे स्वातंत्र्य प्राप्त झालेला सिद्धयोगी परदशेत जाग्रत अवस्था ते स्वप्नावस्थेपर्यंत जेव्हा पाहिजे तेव्हा समाधी लावू शकतो. स्वप्नातही स्व-रूपस्थित होऊन स्वेच्छेने जगतो.

**२)** परापर स्वातंत्र्यदशेत ज्या कोणत्याही अवस्थेत त्या सिद्धयोग्याने जी इच्छा केली असेल ती पूर्ण होते. जाग्रत अवस्थेत कोणालाही शाप किंवा वरदान दिले असता ते त्याच क्षणी सफल होते. स्वप्नावस्थेत मला अमुक स्वप्न पाहवयाचे आहे अशी इच्छा केली तर तीही तत्काळ पूर्ण होते. हेच त्या योग्याचे जाग्रत आणि स्वप्नावस्थेतील स्वातंत्र्य आहे. अशा योग्याला सुषुप्ती अवस्था नसते. ती तुर्यावस्थेत बदलली जाते.

यासंबंधी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या तंत्रग्रंथात असे म्हटले आहे की -

**सर्वतत्त्वानि भूतानि मन्त्रवर्णाश्च ये स्मृताः।**
**नित्यं तस्य वशास्ते वै शिवभावनया सदा।।७.२४२।।**

**अर्थ :-** सर्व जगत् हे श्रीशिवांशी अभिन्न आहे अशा स्वात्म्याच्या झालेल्या ऐक्यज्ञानाने जल, अग्नी इत्यादि तत्त्वे, हिंसा करणारे जीव आणि शरीरात स्थित असणाऱ्या शब्दराशी सिद्धयोग्याच्या ताब्यात असतात. ।।७.२४२।।१३।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

"या स्फुरणरूप सत्त्वप्राप्तीनेच या सिद्धयोग्याचा स्वतंत्रभाव सिद्ध होतो," असे "**सिद्धः स्वतन्त्रभावः।।१३।।**" या सूत्राने कथन केले आहे. स्फुरणरूप म्हणजेच स्वातंत्र्यशक्तीच्या विशेष स्फुरणाने युक्त अशा सत्त्वाच्या प्राप्तीने असा याचा भावार्थ आहे. स्वातंत्र्य म्हणजे सहजज्ञातृत्व व सर्वकर्तृत्वरूप सर्व विश्वाला ताब्यात ठेवणे होय.

यासंबंधी श्रीश्रीनाथपादांनी असे म्हटले आहे की -

**श्रयेत्स्वातन्त्र्यशक्तिं स्वां सा श्रीकाली परा कला।।**

**अर्थ :-** श्रेष्ठ कलारूप श्रीकाली स्व-स्वातंत्र्यशक्तीचा आश्रय घेते.

**विवरण :-** "**पुरुषे षोडशकले तामाहुरमृतां कलाम्।।**" अर्थात् "षोडशकल पुरुषात असणाऱ्या कलेला अमृता कला असे म्हणतात." अशा स्वरूपाची ही स्वातंत्र्यशक्ती आहे. "कलयति" म्हणजे ती जगताचा विविध बाजूंनी विचार करते, "क्षिपति" म्हणजे सृष्टी करते व संहारही करते आणि मोजमाप करते व जाणते म्हणून कला व कलेने युक्त ती काली होय. ती

विश्वाचे आतून बाहेरून पालन-पोषण करते म्हणून तिला परा असे अन्वर्थक विशेषण आहे.

या संबंधी **"श्रीस्वच्छंदतंत्र"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सर्वतत्त्वानि भूतानि मन्त्रवर्णाश्च ये स्मृताः।**
**नित्यं तस्य वशास्ते वै शिवभावनया सदा।।**

**अर्थ :-** सर्व तत्त्वे, भूतमात्रे, माहिती असणारे मंत्र व वर्ण हे सर्व श्रीशिवांशी अभिन्नस्वरूपात आहेत असे ज्याने जाणले आहे त्याच्या स्वतःच्या ताब्यात ते सर्व असतात.

**विवरण :-** सर्व वेद्य प्रसार हा श्रीशिवांहून अभिन्न अशा स्वात्म्याशी ऐक्य पावलेला असतो. अशा ज्ञानामुळे जल, अग्नी इत्यादि तत्त्वे, हिंस्र पशू, शब्दराशींनी युक्त वर्ण असे सर्व त्याच्या ताब्यात राहतात.।।१३।।

**विवरणात्मक टीप :-** प्राणिमात्र हे चौदा प्रकारचे असतात. आठ प्रकारच देव, पाच प्रकारचे प्राणी आणि एक प्रकारचा मानव असे हे चौदा प्रकार होत.।।१३।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

असे झाले की, म्हणजे "ऋतंभरा प्रज्ञा प्राप्त होऊन सत्त्वसिद्धी झाली की, आत्म्याला स्वतंत्रता प्राप्त होते." त्याविषयी श्रीशिवांनी **"सिद्धः स्वतन्त्र-भावः।।१३।।"** हे सूत्र सांगितले आहे.।।५९।।

पूर्वी सांगितलेल्या रीतीने या आत्म्याचे स्वातंत्र्य सिद्ध झाले.।।५९.५।।

**विवरण :-** ज्यामुळे श्रीशिवांपासून पृथ्वीपर्यंत सर्व विश्व पोषिले जाते, दिसते, भासते व आपल्या हुकुमात ठेविले जाते तो या आत्म्याचा स्वतंत्रभाव आहे. या स्वतंत्रभावात नैसर्गिक ज्ञातृत्व, कर्तृत्व आणि विश्ववशीकरणत्व आहे. जसे रासायनिक क्रियेने सिद्ध अशा औषधाने कोणत्याही धातू आदि द्रव्याला सुवर्णत्व येते तसेच श्रीशिवस्वरूपाच्या भावनेने भावित असे विश्व या आत्मज्ञयोग्याच्या ताब्यात राहते असे तात्पर्य आहे.।।१३।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"बुद्धीमुळेच स्वातंत्र्य सिद्ध होते," असे **"सिद्धः स्वतन्त्रभावः।।१३।।"** या सूत्रात सांगितले आहे. स्वातंत्र्य म्हणजे सहजज्ञातृत्व व कर्तृत्वरूप सर्व विश्वाला वश करण्याचे सामर्थ्य होय.।।१३।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे "निज स्व-स्फुरत्तायुक्त सत्त्व प्राप्तीच्या वैभवामुळे सिद्ध-

योग्याला स्वतंत्रता प्राप्त होते," असे "**सिद्धः स्वतन्त्रभावः ।।१३।।**" या सूत्रात सांगितले आहे.।।५३।।

परमयोग्याची ही सत्त्वसिद्धी म्हणजे सहजज्ञातेपण व कर्तेपण असलेले स्वातंत्र्यच होय. हे स्वातंत्र्य विश्वाला स्वतःच्या ताब्यात आणण्याला समर्थ असणारे असे असते.।।५४।।१३।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

अशा प्रकारे "निजस्फुरत्तेने युक्त सत्त्व प्राप्त होऊन मिळालेल्या सत्त्वरूप ऐश्वर्यामुळेच सिद्धाला स्वातंत्र्य सिद्धीची प्राप्ती होते," असे "**सिद्धः स्वतन्त्रभावः ।।१३।।**" या सूत्रात सांगितले आहे.

श्रीशिवांपासून पृथ्वीतत्त्वापर्यंत ज्यामुळे समग्र जग मरते, दिसते, प्रकट होते व स्वतःच्या ताब्यात येते त्यामुळेच त्याच्या सहजज्ञत्वकर्तृत्व, सहजज्ञान व सहजकर्तृत्व या शक्ती हेच ज्याचे लक्षण आहे असा तो सिद्धयोगी स्वतंत्रभाव स्ववशीकरण करण्याला समर्थ असतो. ज्याप्रमाणे रासायनिक औषधींमुळे सिद्ध झालेल्या वस्तू सुवर्णाच्या बनतात त्याप्रमाणेच परम श्रीशिवस्वरूप विशुद्ध भावनेने हे सर्व विश्व या सुप्रबुद्ध स्वतंत्रयोग्याला वशीभूत होते.

याविषयी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सर्वतत्त्वानि भूतानि मन्त्रवर्णाश्च ये स्मृताः ।**
**नित्यं तस्य वशास्ते वै शिवभावनया सदा।।७.२४२।।**

**अर्थ :-** जी सर्व तत्त्वे, प्राणिमात्र, मंत्र व वर्ण आहेत ते सर्व अखंड श्रीशिवभावनेने नित्यच सिद्धयोग्याच्या ताब्यात असतात.।।७.२४२।।

परम श्रीशिवांच्या समग्रविषयात्मक उल्लासाच्या अद्वयस्वरूपाशी प्राप्त झालेल्या सामरस्याने विमर्शाच्या बळावर जल, अग्नी इत्यादि तत्त्वे, भूत म्हणजेच वाघसिंहादि हिंसक प्राणी, देहामध्ये स्थिर असणारे शब्दराशींच्या रूपाने युक्त मंत्र आणि वर्ण हे स्वतंत्र व चिदात्मक सिद्धयोग्याला नित्य वशीभूत होतात अथवा त्याच्या ताब्यात असतात.

**विवरण :-** मागील सूत्रात वर्णन केलेल्या सिद्धयोग्याचा भाव स्वतंत्र असतो. त्याला स्वातंत्र्य प्राप्त होते. हे स्वातंत्र्य म्हणजेच ज्ञान आणि क्रिया यांचे पूर्ण स्वातंत्र्य होय. त्याचे जगतातील सर्व गोष्टींवर नियंत्रण असते.।।१३।।

## सूत्र क्रमांक १४

**संबंध :-** अशा सिद्धयोग्याचे स्वातंत्र्य खालील सूत्रात वर्णन केल्याप्रमाणे असते.

**यथा तत्र तथान्यत्र।।१४।।**

**शब्दार्थ :- यथा** - ज्याप्रमाणे. **तत्र** - त्या ठिकाणी सिद्धयोग्याला आपल्या शरीरामध्ये तुर्यावस्थेत सहज किंवा समाहित भाव प्राप्त होतो. **तथा** - त्याप्रमाणे. **अन्यत्र** - इतर ठिकाणी म्हणजे स्वस्वरूपबाह्य जागृत इत्यादि सर्व अवस्थांमध्ये सिद्धयोगी नेहमी समाहित व समचित्त राहतो.

**अर्थ :-** ज्याप्रमाणे हा सिद्धयोगी स्वतःच्या शरीरामध्ये (मागील सूत्रात सांगितलेले) स्वातंत्र्य व्यक्त करू शकतो त्याचप्रमाणे तो दुसरीकडे किंवा इतर ठिकाणीही हे स्वातंत्र्य आपल्या स्वातंत्र्यशक्ती कुंडलिनीच्या द्वारा व्यक्त करू शकतो किंवा सिद्धयोगी हा तुर्यावस्थेत ज्याप्रमाणे सहजभावाने, समाहित व समचित्त राहतो त्याप्रमाणेच तो सर्वस्वरूप बाह्य जाग्रदादि सर्व अवस्थांमध्ये राहतो.।।१४।।

**विशेष व्याख्या :-** श्रीशिवव्याप्तीने युक्त सिद्धयोग्याला ज्याप्रमाणे स्वरूपाची अभिव्यक्ती होते त्याचप्रमाणे त्याला जाग्रत आणि स्वप्न अवस्थांमध्येही स्वरूपाचे ज्ञान होत असते; कारण सदैव समाहित कसे राहावे यात तो तरबेज झालेला असतो. तो दुसऱ्याच्या शरीरातही जाऊ शकतो. याचे तात्पर्य असे आहे की, जरी सिद्धयोगी कोणत्याही अवस्थेत असला तरी तो स्वरूपात स्थित राहण्याचे स्वातंत्र्य प्राप्त करून घेतो.।।१४।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

"**यथा तत्र तथान्यत्र।।१४।।**" या सूत्रन्यायाने "सिद्धयोग्याला स्वदेहात व सर्व अवस्थेत अंतर्बाह्य स्वातंत्र्य प्राप्त होते." हा स्वतंत्रभाव या श्रीशिवभावक सिद्धयोग्याला सर्वत्रच असतो. सिद्धयोग्याला या देहाप्रमाणेच सर्वत्र सर्वदेहात संक्रमण व उत्क्रमण करता येते; कारण त्याच्या देहात स्वातंत्र्यशक्तीचा आविर्भाव झालेला असतो. परंतु या सिद्धयोग्याला सतत सावधान असावे लागते.

याकरिताच "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**स्वच्छन्दश्चैव स्वच्छन्दः स्वच्छन्दो विचरेत्सदा।।७.२५८।।**

**अर्थ :-** हा सिद्धयोगी स्वच्छंद होऊन सुरुवातीला, मधल्या अवस्थेत आणि अंतीही विचरण करतो अर्थात् सिद्धयोगाच्या सततच्या अभ्यासामुळे तो नित्य स्वच्छंदभैरवावस्था स्फुरणरूपाने उपभोगतो.

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातही यासंबंधी असे म्हटले आहे की -

**लभते तत्प्रयत्नेन परीक्ष्यं तत्त्वमादरात्।**
**यतः स्वतन्त्रता तस्य सर्वत्रेयमकृत्रिमा।।१.७।।**

**अर्थ :-** ते स्पंदतत्त्व अत्यंत आदराने व काळजीपूर्वक परीक्षिले पाहिजे. (त्याच्यामुळे हा इंद्रियसमूह त्यांच्या आंतरिक इंद्रियांसह संवेदनरहित असूनही चैतन्याप्रमाणे क्रिया करतो आणि एखाद्या वस्तुपर्यंत जाण्याची, त्याला जाणिवेत ठेवण्याची व ज्ञान झाल्यानंतर तेथून नष्ट करण्याची शक्ती मिळवितो.) हे स्पंदतत्त्वाचे स्वातंत्र्य सगळीकडे व्यापून राहणारे व अकृत्रिम अर्थात् नैसर्गिक आहे.।।७।।

**विवरण :-** याचा आशय पुढीलप्रमाणे आहे. प्राकृत किंवा जड असूनही हे बाह्य आणि आंतर इंद्रियांचे चक्र ज्याच्या स्पर्शाच्या सामर्थ्याने प्रकृत्यादि चेतनाचे व्यापार करण्याला समर्थ होते ते तत्त्व आत्मत्वाने स्फुट करीत इंद्रियांना चैतन्य मिळवून देणाऱ्या स्वातंत्र्याप्रमाणे सर्व विषयांचे स्वातंत्र्य मिळविण्याला समर्थ असतेच. त्यामुळेच त्याची परीक्षा करून अर्थात् त्या सर्वांचा विचार करता अभ्यास अवस्थेतच अभिव्यक्त होणारे स्वातंत्र्य असताना परशरीरात प्रवेश करणे आदि क्रिडा सिद्ध केल्या जातात.।।१४।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१)** सिद्धयोग्याला इच्छेचे स्वातंत्र्य भूतकाळातही असते आणि वर्तमान व भविष्यकाळातही राहते म्हणजेच त्याचे हे स्वातंत्र्य सतत अखंड असते.

**२)** स्पंदाच्या सामर्थ्याने जी अचेतन म्हणविली जातात ती इंद्रियेही चेतन पदार्थाप्रमाणे कार्य करतात. त्यामुळे जर एखाद्याने आपली स्वातंत्र्यशक्ती विकसित केली तर त्याला परकायाप्रवेशासह अनेक शक्ती प्राप्त होतात.।।१४।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

ज्याप्रमाणे सिद्धयोग्याला स्वदेहात सर्वज्ञता व सर्वकर्तृता असते त्याप्रमाणेच अन्य शरीरांमध्येही त्याला सर्वज्ञत्वादि शक्तींचा उपयोग करता येतो किंवा नाही यावर भगवान् श्रीचंद्रशेखर श्रीशिवांनी **"यथा तत्र तथान्यत्र ।।१४।।"** अर्थात् "सिद्धयोग्याला स्वदेहात व सर्व अवस्थेत अंतरबाह्य स्वातंत्र्य प्राप्त होते," हे सूत्र सांगितले आहे.।।६०।। ६०.५।।

ज्याप्रमाणे आपल्या देहात सर्वज्ञतादि शक्ती असतात त्याप्रमाणे स्वाधिष्ठानबलाने सर्व देहात त्या योग्याचे सर्वज्ञत्वादि स्फुरण होते.।।६१।।६१.५।।

**विवरण :-** या अधिकारी सिद्धयोग्याला ज्याप्रमाणे स्वदेहातील स्वात्मा श्रीशिव आहे असा विचार दृढ असल्यामुळे सर्वज्ञत्वादि सिद्धी प्राप्त असते

त्याप्रमाणे स्वात्म्याच्या बलाने परकीय देहामध्येही तो या सिद्धिबलाने ज्ञान व क्रिया स्वेच्छया करू शकतो.।।१४।।

### सूत्र क्रमांक १४ अ

श्रीभास्कराचार्यांनी त्यांच्या वार्तिकामध्ये खालील आणखी एक जास्त सूत्र घातले आहे.

परशरीरामध्ये प्रवेश करणाऱ्या स्वतंत्र अशा कर्त्या सिद्धयोग्याला त्या त्या शरीरी जीवांची उपाधी लागणारच; मग त्या देहात राहणे व कालाचे बंधन हे कसे काय जुळेल? कालपरिच्छेद व वस्तुपरिच्छेद त्याला आलेच. यावर कालशत्रू म्हणजे यम किंवा मृत्यूचे शत्रू यांचे भय निघून जाण्यासाठी श्रीशिवांनी खालील सूत्रात असे सांगितले आहे की -।।६२।६३।।

**विसर्गस्वाभाव्यादबहिःस्थितेस्तत्स्थितिः।।१४अ।।**

**शब्दार्थ :- विसर्ग-स्वाभाव्यात्** - सृष्टी निर्माण करण्याच्या त्याच्या म्हणजे श्रीशिवांच्या स्वभावामुळे. **बहिःस्थिते** - बाह्य पदार्थांचे श्रीशिवांच्यापेक्षा स्वतंत्र किंवा निराळे अस्तित्व नसल्यामुळे. **तत्स्थितिः** - ते बाह्य पदार्थ त्यांच्यामध्ये म्हणजे श्रीशिवांमध्ये असतात.

**अर्थ :-** श्रीशिवांच्या किंवा श्रीपरमेश्वराच्या सृष्टी निर्माण करण्याच्या स्वभावामुळे व बाह्य पदार्थांना श्रीशिवांशिवाय निराळे अस्तित्व नसल्यामुळे सर्व कुंडलिनी शक्तिस्वरूप पिंडब्रह्मांडादि गोष्टी श्रीशिवांमध्येच अर्थात् श्रीशिवस्वरूपच असतात अर्थात् श्रीशिवशक्ती हे बाह्यतः विभिन्न दिसले तरी ते अखंड समव्याप्त व समरसच असतात.।।१४अ।।

उत्पत्तिस्वभावाच्या चिद्रूपामुळे प्रवृत्तिदृष्ट्या झालेल्या कालरूप स्पंदाची चैतन्यात (कालस्पंद अनादि असल्यामुळे)।।६४।।

उत्पत्ती होत नाही. त्या संकल्पातून उत्पन्न होणाऱ्या विश्वाच्या संकलनामुळे प्रकाश्य अशा बाह्य वस्तूंना वेगळे अस्तित्व नसल्याने ।।६५।।

प्रकाशैक्य भावना करणाऱ्या योग्यांना योगाच्या निभालनामुळे अर्थात् अखंड ऐक्य स्थितीमुळे स्वस्थानापासून च्युत होण्याची भीती नाही.।।६६।।

कालोपाधिरहित स्थानाच्या आश्रयामुळे या सिद्धयोग्यांना उपाधियुक्त पदार्थांचा धर्म स्पर्शू शकत नाही.।।६६.५।।

**विवरण :-** सृष्टी उत्पन्न करणे हाच स्वभाव असणारा श्रीपरमेश्वर आपल्या आश्रयाने असलेल्या उत्पाद्य वस्तूंना स्वतःहून वेगळे पाहत नाही व त्यांना सर्व बाजूंनी धारण करतो. असे असूनही त्याला आत्मविस्मृती होत

नाही. ज्याअर्थी मायाभूमीमध्येही ज्ञेयवस्तू प्रकाशित होते; परंतु ती श्रीईश्वर-प्रकाशितच असते व आत स्थित होऊनच ती स्वातंत्र्यामुळे बाहेर प्रकाशित होते त्याअर्थी तात्त्विकस्वरूप कळलेल्या योग्याला धर्मी आणि धर्म या उपाधी कधीही लागत नाहीत.

सारांश, "बहिस्थितेः" म्हणजे बाह्य पदार्थांचे त्याच्यापेक्षा म्हणजे श्रीशिवांपेक्षा स्वतंत्र किंवा पृथक् अस्तित्व नसल्यामुळे व प्रकाश्य वस्तूंचे प्रकाशाशी ऐक्य असल्यामुळे त्या वस्तू किंवा पदार्थ त्यांच्यामध्येच असतात. नवीन उत्पत्ती करण्याची इच्छा असणारा श्रीपरमेश्वर, निर्माण केल्या जाणाऱ्या सर्व वस्तू आपल्या स्वतःच्या आधारावर निर्माण होत असताना व त्या आपल्यापेक्षा भिन्न नाहीत असे पाहताना आत्मविस्मृती होऊ देत नाही; कारण यौगिक दृष्टीमुळे म्हणजे ही वस्तूजात स्वतःमध्ये आहे या ज्ञानामुळे त्या वस्तूंची त्याच्या प्रकाशापासून विभक्तता **(प्रच्यवन)** नसते.।।१४अ।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"यथा तत्र तथान्यत्र।।१४।।"** अर्थात् "ज्याप्रमाणे सिद्धयोग्याला देहामध्ये स्वतःचे प्रकटन करणे साधते त्याप्रमाणेच अन्यत्र सर्वत्र म्हणजे सर्व शरीरामध्ये स्वप्राकट्य साधते." त्यासाठी मात्र तो सिद्धयोगी नेहमी समाहित किंवा सावध असावयाला पाहिजे.।।१४।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

**"यथा तत्र तथान्यत्र।।१४।।"** या सूत्राने श्रीशिवांनी हे स्पष्ट केले आहे की, "स्वानंदाने भरलेल्या सिद्धयोग्याचे स्वातंत्र्य जसे देहात असते तसे इतरत्रही असते."

ज्याप्रमाणे सिद्धयोग्याला स्वतःच्या देहात स्वातंत्र्य स्पष्ट असते तसेच दुसऱ्याच्या देहात पूर्ण अहंतास्वरूपाचे स्वातंत्र्य चालविता येते.।।५५ ते ५६.५।।१४।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

आता **"यथा तत्र तथान्यत्र।।१४।।"** या सूत्रातून सिद्धयोग्याचा स्वतंत्रभाव सांगत आहेत.

श्रीशिवाभिन्न अवस्था प्राप्त झालेल्या योगनिष्ठ व सुप्रबुद्ध सिद्धयोग्याला जेथे म्हणजेच स्वाभाविक देहात ज्याप्रमाणे स्वरूपाची अभिव्यक्ती करवून देणारी स्वतंत्रता स्पष्टपणे जाणवत असते त्याप्रमाणेच अन्यत्र देहातही लक्ष देणाऱ्या सिद्धयोग्याला ही पूर्णाहंतारूप अवस्था स्पष्टपणे कळत असते.

याविषयी "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**लभते तत्प्रयत्नेन परीक्ष्यं तत्त्वमादरात्।**
**यतः स्वतन्त्रता तस्य सर्वत्रेयमकृत्रिमा।।१.७।।**

**अर्थ :-** अर्थात् प्रवृत्तीनुसार प्राकृतिक किंवा नैसर्गिक व जड असा बाह्य व आभ्यंतर इंद्रियवर्ग केवळ स्पर्शानेच चेतनाप्रमाणे व्यापार करण्याला समर्थ होतो. ते आत्मतत्त्वाने युक्त असलेले व त्यानेच प्रकट केलेले तत्त्व इंद्रियचैतन्याने प्राप्त झालेल्या स्वातंत्र्याप्रमाणे समग्र वेद्य अर्थात् जगताविषयीची स्वातंत्र्यप्राप्ती करून घेण्यात यशस्वी होते. त्यामुळे परीक्षा करून, त्या अभ्यास-अवस्थेतच प्रकाशमान होणाऱ्या स्वतंत्रभावात परकायाप्रवेशादि क्रीडा सिद्ध होते. त्यामुळे ते तत्त्व खूप प्रयत्न करून अखंड उद्योगाने व अत्यंत श्रद्धेने परीक्षावे अर्थात् त्याची शहानिशा करावी.।।१.७।।

**विवरण :-** सिद्धयोग्याला स्वातंत्र्य मिळते; कारण तो ज्याप्रमाणे तेथे म्हणजेच आपल्या शरीरात व्यवहार करतो तसाच सर्वत्र व्यवहार करतो अर्थात् तो ज्याप्रमाणे त्याच्या स्वतःच्या शरीरात स्वातंत्र्य व्यक्त करू शकतो त्याचप्रमाणे इतरत्रही व्यक्त करण्याचे सामर्थ्य त्याला प्राप्त होते; परंतु या स्वातंत्र्यात एक भयही असते की, स्वच्छंद होऊन त्याच्या पूर्वसंस्कारामुळे त्याचे कदाचित् पतनही होऊ शकते. असे होऊ नये म्हणून पुढील सूत्रात त्याचा उपाय सांगितला आहे.।।१४।।

## सूत्र क्रमांक १५

**संबंध :-** परंतु अशा उत्कृष्ट सिद्धयोग्याने उदासीन भावाने न राहता पराशक्तीवर म्हणजे अंतर्मुखाने जागृत होणाऱ्या कुंडलिनी शक्तीवर अखंड लक्ष ठेवावे.

## बीजावधानम्।।१५।।

**शब्दार्थ :- बीज -** बीज म्हणजे विश्वाच्या उत्पत्तीचे कारण असलेली आत्म्याची स्फुरत्ता किंवा स्फुरण. पराशक्ती कुंडलिनी अर्थात् विश्वसंवित् होय. **अवधानम् -** सारखे लक्ष देणे किंवा वारंवार चित्त देणे म्हणजे सिद्धयोगसाधनरत राहणे.

**अर्थ :-** सर्व विश्वाचे कारण असलेली जी स्फुरत्तारूप विश्वसंहित् अथवा पराशक्ती कुंडलिनी आहे तिच्यावर सिद्धयोग्याने सारखे लक्ष ठेवावे किंवा अवधान द्यावे अर्थात् ही अनादिनिद्रिस्थ श्रीशिवरूप, स्वसंवेद्य आत्मचैतन्य व शक्तिरूप कुंडलिनी श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने जागृत

झाल्यावर ती स्वतःच करीत असलेल्या सिद्धयोगसाधनेच्या द्वारा तिचे सुषुम्नेत सतत चालन होऊन ती तेथील निरालंब अवस्थेत स्थिर राहावी म्हणून दीर्घकाल, अखंड, निरंतर व श्रद्धाभक्तिसत्कारपूर्वक साधनरत राहावे.।।१५।।

**विशेष व्याख्या :-** सिद्धयोग्याने विश्वाचे कारण असणाऱ्या स्फुरणस्वरूप पराशक्तीत अर्थात् आत्मचैतन्यरूप अंतर्मुखाने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीत परत परत चित्त वळविले पाहिजे.

यासंबंधी **"श्रीविज्ञानभैरव"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**ज्ञानप्रकाशकं सर्वं सर्वेणात्मा प्रकाशकः।**
**एकमेकस्वभावत्वात् ज्ञानं ज्ञेयं विभाज्यते।।१३७।।**

**अर्थ :-** सर्व शब्दवाच्य ज्ञेयज्ञानाहून भिन्न नाहीत आणि प्रकाशक ज्ञान आत्म्याहून भिन्न नाही, अशा प्रकारे ऐक्याची भावना केली पाहिजे.।।१३७।।

येथे सिद्धयोग्याला स्वरूपस्थितीत सदैव सावधान राहण्याचा संकेत आहे. याचे कारण म्हणजे त्याने मितसिद्धींमध्ये कधीही गुंतू नये हेच आहे. ।।१५।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

असे असले तरीही सिद्धयोग्याने उदासीन न राहता बीजाचे अवधान ठेवावे म्हणून **"बीजावधानम्।।१५।।"** म्हणजे "श्रीसद्गुरुकृपेने किंवा अन्य प्रक्रियेने अंतर्मुखाने जागृत झालेली कुंडलिनी शक्ती सतत सुषुम्नेत ऊर्ध्वगामी राहील असे अवधान ठेवावे," असे या सूत्राने कथन केले आहे.

बीज म्हणजे विश्वाला कारणीभूत होणारी स्फुरत्तायुक्त पराशक्ती होय. यासंबंधी **"श्रीमृत्युजिद्भट्टारक"** अर्थात् **"श्रीनेत्रतंत्र"** या तंत्रग्रंथात असे म्हटले आहे की -

**सा योनिः सर्वदेवानां शक्तीनां चाप्यनेकधा।**
**अग्नीषोमात्मिका योनिस्ततः सर्वं प्रवर्तते।।**

**अर्थ :-** ती अर्थात् पराशक्ती कुंडलिनी अनेक प्रकारांनी सर्व देवांची आणि शक्तींची मूळ स्रोत अथवा मूळ कारण आहे. तिचे स्वरूप अग्नी व चंद्राने युक्त असे आहे. तिच्यापासून सर्व गोष्टी प्रवर्तित होतात.

**विवरण :-** या शक्तीलाच संहारसृष्टी, प्रमाणप्रमेय, प्राणापान व सूर्यचंद्र आदि नावे आहेत.

या पराशक्तिरूप बीजात अवधान म्हणजेच परत परत चित्ताचे निवेशन करावे अर्थात् चित्त लावावे म्हणजे सिद्धयोगाचे साधन करावे.।।१५।।

**विवरणात्मक टीपा:-**

**१) "पराशक्ती कुंडलिनी"** आणि परावाक् या दोन्हीही सारख्याच आहेत.

**२) अग्नीषोमात्मिका :-** अग्नी आणि चंद्र यांनी युक्त अशा या चिह्नांची योजना प्रमाण-प्रमेय, प्रकाश-विमर्श व ज्ञान-क्रिया यांच्या बाबतीत केली जाते.

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

कालपरिच्छेदरहित अशा पदाची अर्थात् अधिकाराची प्राप्ती कशाने होते असे कोणी विचारले तर "**बीजावधानम्।।१५।।**" म्हणजे "बीजाचा विचार केल्याने असे होते," असे म्हणून श्रीशिव हे सूत्र सांगतात.।।६७।।

सर्व जगाचे परम बीज अर्थात् कारण चिदात्मा म्हणजे परमात्मा आहे असेच सर्वत्र सांगितले जाते. त्या चिदात्म्याचा सावधान मनाने किंवा चित्ताने विचार केला असता।।६८।।

मोहादि प्रतिरोधक अर्थात् अडथळा आणणाऱ्या वृत्तींचा पाडाव होतो आणि अकालपदाची प्राप्ती होते व कालोपाधीही राहत नाही.।।६८.५।।

**विवरण :-** सर्व जगताचे परम बीज अथवा परम कारण चिदात्माच आहे असा मर्यादित अहंभावाचा म्हणजेच जीवभावाचा त्याग करून विश्वकारण असणाऱ्या शाक्तपदात निरंतर किंवा सतत दृढाभ्यास केल्याने व चित्ताची सावधानता साधल्यामुळे कालाने अनाकलित अशा स्व-रूपाचा लाभ होतो असा या सूत्राचा भावार्थ आहे.।।१५।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**बीजावधानम्।।१५।।**" अर्थात् "बीजात म्हणजेच परशक्तियुक्त विश्वकारणात अवधान म्हणजेच वारंवार चित्ताला नेऊन ठेवावे," असा प्रयत्न साधकाने नेहमी करावा.।।१५।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

एवढे सामर्थ्य जरी प्राप्त झाले तरी सिद्धयोग्याने उदासीन होऊ नये म्हणजे स्वतःला कृतकृत्य समजू नये;।।५७।।

कारण त्याने "**बीजावधानम्।।१५।।**" या सूत्राप्रमाणे बीजाविषयी सावध असावे अर्थात् जागृत कुंडलिनी शक्ती अखंड साधनरत राहील असे पाहावे म्हणजे दीर्घकाल, निरंतर व श्रद्धाभक्तिसत्कारपूर्वक सिद्धयोगसाधन करीत असावे.

स्फुरत्तारूप पराशक्ती ही विश्वाचे कारण आहे. या शक्तीत सिद्धयोग्याने

आपल्या चित्ताला वरचेवर मोठ्या सावधगिरीने प्रविष्ट करावे व ती शक्तीही आपलीशी करावी.।।५८,५८.५।।१५।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

त्याचप्रमाणे सिद्धयोग्याने उदासीनभावाने न राहता उलट सावधच राहावे. "**बीजावधानम्।।१५।।**" या सूत्रन्यायाने "स्फुरत्तायुक्त पराशक्तिरूप बीज हे सर्व जगताचे निमित्त कारण आहे. या विश्वसंविच्छक्तियुक्त बीजात अवधान अर्थात् त्याचा विमर्श किंवा विचार करावा अर्थात् चित्ताला परत परत त्याच्यात बुडवावे." हे सर्व प्रबुद्धयोग्याने सावधान मनाने करावे.

**विवरण :-** सिद्धयोग्याने स्वातंत्र्य मिळाल्यानंतरही आपले पतन होऊ नये म्हणून अत्यंत सावध राहिले पाहिजे. संस्कारांच्या बीजरूपी असणाऱ्या पराशक्तीवर लक्ष्य ठेवून त्याने सावधान राहिले पाहिजे; कारण संस्कारच संसार आणि बंधनाचे कारण आहेत. ते पराशक्तीच्या आधारावर अंकुरित होतात. संस्कारांमध्ये भोगांचा रस असतो. तो भोगांच्या त्यागाने नष्ट होत नाही; तर "**परं दृष्ट्वा निवर्तते।।२.५९।। श्रीमद्भगवद्गीता।।**" या न्यायाने साधकभक्तयोगिशिष्यांच्या मनातील अनुरागदेखील परमार्थतत्त्वरूप ब्रह्माचे प्रत्यक्ष दर्शन झाल्यावरच नष्ट होतो. त्यामुळेच असे म्हटले आहे की, संस्कारांना अंकुरित करणाऱ्या पराशक्तिरूपी बीजावर लक्ष ठेवल्याने सिद्ध-योगी भोगासक्तीपासून वाचू शकतो.।।१५।।

## सूत्र क्रमांक १६

**संबंध :-** असे झाल्यानंतर योगी शाक्तबलाचा अनुभव घेऊन शांभव पदात विश्रांती घेऊ लागतो. त्यामुळे पुढील सूत्रात असे म्हटले आहे की -

**आसनस्थः सुखं ह्रदे निमज्जति।।१६।।**

**शब्दार्थ :- आसन** - कुंडलिनी शक्तीचे श्रेष्ठ सामर्थ्य. (**परं शाक्तं बलम्** - श्रीक्षेमराजाचार्य). **आसनस्थः** - कुंडलिनी शक्तीच्या श्रेष्ठ सामर्थ्यावर स्थिर झालेला किंवा सहस्रारात श्रीशिवशक्तिसामरस्य प्राप्त झालेला सिद्धयोगी. **सुखम्** - सहज किंवा अनायासे प्राप्त होणाऱ्या सुखात. **ह्रदे** - डोहात. परारूपी अमृताचा समुद्र आहे त्यात. (श्रीक्षेमराजाचार्य) किंवा चित्स्वरूपाच्या परमामृतसमुद्रात. **निमज्जति** - मग्न होतो अर्थात् देह वगैरे संकोचसंस्कार जाऊन मग्न होतो. (श्रीक्षेमराजाचार्य)

**अर्थ :-** कुंडलिनी शक्तीच्या श्रेष्ठ सामर्थ्यावर स्थिर झालेला अर्थात् कुंडलिनी शक्तीने सहस्रारात गेल्यावर आपले संकुचित जीवरूप सोडून देऊन

मूळचे श्रीशिवस्वरूप धारण केलेला म्हणजे श्रीशिवशक्तिसामरस्य प्राप्त केलेला तो सिद्धयोगी सहज किंवा अनायासाने परारूपी अमृताच्या डोहात मग्न होतो किंवा सिद्धयोगी हा शक्तिरूपाने सहस्रारात श्रीशिवांशी एकरूप होऊन स्व-स्वभावाने अर्थात् आयासरहित सुखाने चित्स्वरूपाच्या परमांमृत समुद्रात बुडून जातो.।।१६।।

**विशेष व्याख्या :-** ज्या दशेत सिद्धयोगी आत्म्याबरोबर नेहमी एकरूप होऊन स्थिर राहतो त्याला आसन असे म्हणतात.

यासंबंधी "**श्रीनेत्रतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**मध्यमं प्राणमाश्रित्य प्राणापानपथान्तरम्।**
**आलम्ब्य ज्ञानशक्तिं च तत्स्थं चैवासनं लभेत्।।**

**अर्थ :-** प्राण आणि अपान यांच्या मार्गात "**मध्यमं प्राण**" म्हणजे सुषुम्नानाडीत अर्थात् मध्यम मार्गात कुंभक भावाचा आश्रय घेऊन अर्थात् तेथे स्थिर राहण्याचा प्रयत्न करून ज्ञानशक्तीच्या साहाय्याने त्याच्यात स्थिर राहण्याचे आसन धारण करावे.

**न तु ऋजुत्वं शुष्कवृक्षवत् इति।।**

**अर्थ :-** कोरड्या वृक्षाप्रमाणे ऋजुत्व म्हणजे मृदुत्व नाही.

हेच त्या सिद्धयोग्याचे परमशाक्तबल अथवा चिद्बल आहे. या दशेत पर किंवा अपर अर्थात् निराकार अथवा साकार ध्यान, धारणा इत्यादि क्रियांच्या अभ्यासात प्रयास किंवा प्रयत्न करावे लागत नाहीत. तो नित्य अंतर्मुख भावात आत्म्याबरोबर एकतेच्या परामर्शातच आकर्षित राहतो. यालाच निरा-भास पद असे म्हणतात. या निराभासपदाचे वर्णन "**श्रीनेत्रतंत्र**" या ग्रंथात पाहणे योग्य आहे.

पूर्वावस्थेत दृढ राहिल्यामुळे आणि निरंतर अभ्यास करण्यामुळे सिद्ध-योग्याला आत्म्याबरोबरचे हे एकत्व स्वाभाविकपणे अनुभवाला येते. त्यामुळे या अवस्थेत त्याला ध्यानादींचे प्रयत्न करावे लागत नाहीत. अशा प्रकारे तो सुखस्वरूप होऊन विश्वाचा प्रवाह म्हणजे प्रसर अर्थात् निर्मळपणा आणि उत्पत्ती यांना कारण म्हणून परमामृतरूप समुद्रात देहादींमधील आत्माभिमानरूप संकोच आणि त्याच्या संबंधातील सर्व संस्कारांपासून निवृत्त होऊन तन्मय होऊन जातो.

या दृष्टीने "**श्रीअष्टावक्रगीता**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**निर्वासनं हरिं दृष्ट्वा तूष्णीं विषयदन्तिनः।**

**पलायन्ते न शक्तास्ते सेवन्ते कृतचाटवः।।**
**न मुक्तिकारिकां धत्ते निःशङ्को युक्तमानसः।**
**पश्यञ्श्रृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्नास्ते यथासुखम्।।**

**अर्थ :-** वासनारहित पुरुषसिंहाला पाहून विषयरूपी हत्ती असमर्थ होऊन मुकाटपणे पळून जातात आणि त्याच्याकडे आकर्षित होऊन स्वतः त्याच्या सेवेत राहतात. अशा प्रकारे संशयरहित आणि निश्चलमनाने युक्त ज्ञानी यमनियमादि योगक्रिया आग्रहाने करीत नाही; परंतु लोकदृष्टीने म्हणजेच सामान्यदृष्टीने पाहत, ऐकत, स्पर्श करीत, वास घेत आणि भोजन करीत असूनही आत्मसुखात मग्न राहतो.

"**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथातही सिद्धयोग्यासाठी असा संकेत आहे की-

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युद्ध च।।८.७।।**

**अर्थ :-** त्यामुळे विषय व इंद्रियसंयोगांच्या सर्व व्यवहारात माझे म्हणजेच परमात्म्याचे स्मरण कर आणि मलांपासून वर उठण्यासाठी सिद्धयोगसाधनाभ्यासरूपी युद्धही कर.।।१६।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

असे केल्याने हा सिद्धयोगी "**आसनस्थः सुखं ह्रदे निमज्जति।।१६।।**" या सूत्रन्यायाने "आसनात स्थिर होऊन सुखाने शाश्वततेच्या डोहात बुडून जातो."

सदैव ऐकात्म्यभावनेत असणे म्हणजेच आसनस्थ होणे होय. श्रेष्ठ शाक्तबल हे आसन होय. जो तेथे बसतो म्हणजे पर व अपर ध्यानधारणादि सर्व क्रियांचे प्रयत्न टाकून देऊन अर्थात् शाक्त व आणवोपायांमध्ये सांगितलेले स्पष्टतम विकल्प, संस्क्रिया, स्थान, करण, वर्ण व उच्चारादि सर्वांचा त्याग करून "मी श्रीशिव आहे" अशा अहंतेने विचार करीत ध्यानादि भानगडीत न पडता नित्य अंतर्मुख राहून शाक्तबलाचा विचार करतो तो सहज अनायासे परमामृतसागरात डुंबत राहतो. हा अमृतसागर विश्वप्रवाहाच्या प्रसाराला कारणीभूत आहे आणि विश्वाचे प्रतिबिंब घेण्याला समर्थ असल्याने स्वच्छ आहे. तसेच देशकालाकारी वस्तूंच्या उपादानसामग्रीवाचून त्या त्या वस्तूंच्या रूपाने अवभासन करणारा असल्यामुळे उसळणारा अमृतसिंधू आहे. अशा अमृतसागरातील सिद्धयोगी देहादिसंकोचसंस्कारांचा त्याग करून शाक्तबलाशी तन्मय होतो.

यासंबंधी "**श्रीमृत्युजिद्भट्टारक**" अर्थात् "**श्रीनेत्रतंत्र**" या तंत्रग्रंथात

असे म्हटले आहे की -

**नोर्ध्वे ध्यानं प्रयुञ्जीत नाधस्तान्न च मध्यतः।**
**नाग्रतः पृष्ठतः किञ्चिन्न पार्श्वे नोभयोरपि।।१।।**
**नान्तः शरीरसंस्थं तु न बाह्ये भावयेत्क्वचित्।**
**नाकाशे बन्धयेल्लक्ष्यं नाधो दृष्टिं निवेशयेत्।।२।।**
**न चक्षुर्मीलनं किञ्चिन्न किञ्चिद्दृष्टिबन्धनम्।**
**अवलम्बं निरालम्बं सालम्बं नैव भावयेत्।।३।।**
**नेन्द्रियाणि न भूतानि शब्दस्पर्शरसादयः।**
**एवं त्यक्त्वा समाधिस्थः केवलं तन्मयीभवेत्।।४।।**
**सावस्था परमा प्रोक्ता शिवस्य परमात्मनः।**
**निराभासं पदं तत्तु तत्प्राप्य विनिवर्तते।।५।।**

**अर्थ :-** उर्ध्वभागी, अधोभागी अथवा मध्यभागी, मागे, पुढे, आजूबाजूला आणि शरीराच्या आतबाहेर इत्यादि ठिकाणी ध्यान करू नये.।।१।।

**विवरण :-** ऊर्ध्व म्हणजे ऊर्ध्वभागी द्वादशान्तात, अधोभागी म्हणजे कंदादि स्थानात, हृदयादि अवयवांमध्ये आणि पुढे, मागे व उभयभागी ध्यान करू नये.।।१।।

**अर्थ :-** शरीराच्या आतल्या भागात अथवा बाहेरच्या भागात भावना करू नये. आकाशात लक्ष्य बांधून ठेवू नये आणि अधोभागी दृष्टी प्रविष्ट करू नये.।।२।।

**विवरण :-** यासंबंधी असे म्हटले आहे की -

**आ मूलात्किरणाभासां सूक्ष्मात्सूक्ष्मतरात्मिकाम् ।**
**चिन्तयेत्तां द्विषट्कान्ते श्याम्यन्तीं भैरवोदयः।।**

**अर्थ :-** मूलाधारापासून द्वादशान्तापर्यंत सूक्ष्माहून सूक्ष्मतर अशा किरणांप्रमाणे तेजस्वी वस्तूंचे ध्यान केल्यास श्रीभैरवोदय होतो.

बाह्य भागात नको असे म्हणताना शास्त्रात त्यासंबंधी असे म्हटले आहे की -

**वस्त्वन्तरे वेद्यमाने सर्ववेद्येषु शून्यता।**
**तामेव मनसा ध्यायन्विदितेपि प्रशाम्यति।।**

**अर्थ :-** वेद्यमान अर्थात् जाणविणारी अन्य वस्तू असताना सर्व वेद्य-वस्तूंमधल्या शून्यतेचे अर्थात् अभावाचे ध्यान केले असता श्रेष्ठ वस्तूचे ज्ञान होऊन ही अवस्था प्रशम पावते.

आकाशात नको नको असे म्हणताना शास्त्रात असे म्हटले आहे की -

**तेजसा सूर्यदीपादेराकाशे शबलीकृते।**
**दृष्टिं निवेश्य तत्रैव स्वात्मरूपं प्रकाशते।।**

**अर्थ :-** सूर्यदीप आदींच्या प्रकाशाने आकाशात तेज पसरलेले असता तेथेच दृष्टी ठेवल्याने आत्मरूप प्रकट अथवा प्रकाशित होते.

"**नाध:**" याबद्दल अधिक माहिती सांगताना ग्रंथकार खालील उदाहरण देतात.

**कूपादिके महागर्ते स्थित्वोपरि निरीक्षणात्।**
**अविकल्पमतेः सम्यक्सद्यश्चित्तलयः स्फुटम्।।**

**अर्थ :-** विहीर इत्यादींसारख्या खोल खड्ड्यात उभे राहून वरती पाहण्याने निर्विकल्पमती साधकाच्या चित्ताचा तत्काळ व योग्य प्रकारे लय होतो.।।२।।

**अर्थ :-** डोळे उघडूनही ध्यान करू नये अथवा दृष्टीचे बंधनही करू नये. त्याचप्रमाणे साधार, निराधार व सालंब अशा वस्तूंचीही भावना करू नये.।।३।।

**विवरण :-** चक्षुर्मीलन यासंबंधी अधिक माहिती देताना शास्त्रात असे म्हटले आहे की -

**एवमेव निमील्यादौ नेत्रे कृष्णाभमग्रतः।**
**प्रसार्य भैरवं रूपं भावयंस्तन्मयो भवेत्।।**

**अर्थ :-** अशा प्रकारेच आधी डोळे मिटून नंतर डोळ्यांसमोर कृष्णतेज अर्थात् अंधार पसरवून श्रीभैरवरूपाची भावना करीत करीत तन्मय व्हावे.

दृष्टिबंधन कसे असते? याविषयी शास्त्रात असे सांगितले आहे की -

**निर्वृक्षगिरिभित्त्यादौ देशे दृष्टिं विनिक्षिपेत्।**
**निलीने मानसे भावे वृत्तिक्षीणः प्रजायते।।**

**अर्थ :-** वृक्ष नसलेल्या पर्वताच्या ठिकाणी अथवा एखाद्या भिंतीवर वगैरे ठिकाणी दृष्टी टाकावी. तेथे मन पूर्णपणे लीन झाले असता सर्ववृत्ती क्षीण होतात.

ज्याचा आधार किंवा अवलंब केला जातो ती वस्तू अवलंब्य होय. ध्येय म्हणजे आकार होय.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**भावे त्यक्ते निरुद्धा चिन्नैव भावान्तरं व्रजेत्।**
**तदा तन्मध्यभावेन विकसत्यतिभावना।।**

**अर्थ :-** वस्तुत्यागामुळे रोधलेली चैतन्यशक्ती इतर वस्तूंकडे जात नाही. त्यावेळी चैतन्यशक्तीमध्ये अतिभावना विकसित होते.

निरालंब अवस्थेचे उदाहरण देताना असे म्हटले आहे की -

**उभयोर्भावयोर्ज्ञाने ज्ञात्वा मध्यं समाश्रयेत्।**
**युगपच्च द्वयं त्यक्त्वा मध्ये तत्त्वं प्रकाशते।।**

**अर्थ :-** अवलंब व निरालंब या दोन्ही ज्ञानांचा मध्य जाणून त्याचा आश्रय करावा आणि त्यानंतर त्यांचा एकदमच त्याग करावा. त्यामुळे दोन्हींच्या मधोमध तत्त्वप्रकाशन होते.

आलंब अथवा आधारासहित जे असते ते सालंब ज्ञान होय म्हणजेच साकार आकारयुक्त ज्ञान होय. त्याचे उदाहरण पुढीलप्रमाणे आहे.

**इच्छायामथ वा ज्ञाने जाते चित्तं निवेशयेत्।**
**तत्र बुद्ध्यनन्यचेतास्ततः स्यादात्मदर्शनम्।।**

**अर्थ :-** इच्छा अथवा ज्ञान झाले असता तेथे चित्त समाविष्ट करावे. तेथे अनन्यचित्त झाल्यास आत्मदर्शन होते.।।३।।

**अर्थ :-** इंद्रिये, पंचमहाभूते व शब्दस्पर्शरसादि तन्मात्रा यांचेही ध्यान करू नये. अशा प्रकारे सर्व गोष्टींचा त्याग करून समाधिस्थ व्हावे व केवळ तन्मय होऊन जावे.।।४।।

**विवरण :-** त्या त्या धारणांचा वरील रीतीने सांगितल्याप्रमाणे सर्व प्रकारे त्याग करून स्वस्वरूपाच्या विचारात तत्पर राहावे. तन्मय म्हणजे आनंदपदात संपूर्णपणे लीन व समरसज्ञानाने युक्त अर्थात् श्रीशिवांशी पूर्ण समरस होणे होय.।।४।।

**अर्थ :-** परमात्मा श्रीशिवांची ही परम किंवा अत्यंत श्रेष्ठ अवस्था असून तेच निराभास अर्थात् जगत्, तू, मी इत्यादि कोणत्याही आभासांनी रहित पद असून त्याची प्राप्ती झाली असता सिद्धयोगी परत जन्ममरणपरंपरेत येत नाही.।।५।।

**विवरण :-** ही अशा प्रकारची दशा म्हणजेच श्रीशैवी मुक्तावस्था आहे. पदार्थांच्या आत्यंतिक अनवभासाचे अर्थात् कोणताही भास नसणारे ते पद आहे. ते पद प्राप्त झाल्याने साधकभक्तयोगिशिष्य सांसारिक स्थितीचा पूर्णपणे त्याग करतो.।।५।।१६।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१)** आसन म्हणजे येथे भौतिक बसावयाचे स्थान नसून ते मानसिक

आहे. त्यामुळे आसनस्थ म्हणजे जो साधकभक्तयोगिशिष्य मनाने पराशक्तीमध्ये प्रस्थापित झालेला आहे व ज्याच्या मनात ती पराशक्ती कायम भरलेली असते असा अर्थ आहे.

**२)** अवलंब म्हणजे एक आधार होय. तो आधार एखादे प्रतिबिंब, मूर्ती अथवा चित्र अशा स्वरूपाचे असते. निरालंब म्हणजे आधाररहित स्थिती होय. अवलंब आणि सालंब यातील फरक स्पष्ट करावयाचा झाल्यास अवलंबामध्ये मन सुरुवातीला ज्याची पकड घेता येईल असा आधार मांडून ठेवते आणि तेच पुढे चालू राहते; तर सालंबामध्ये आधार निसटून जातो आणि मनाला तो आधार वारंवार घट्ट पकडावा लागतो.

**३)** या संदर्भातली समाधीची व्याख्या श्रीक्षेमराजाचार्यांनी त्यांच्या उद्योत या टीकेमध्ये अशा रीतीने केली आहे.

**अकिञ्चिच्चिन्तकत्वेन स्वस्वरूपविमर्शनप्रवणस्तन्मयः ।।**

**अर्थ :-** कोणत्याही गोष्टीचे चिंतन अथवा विचार न करता केवळ स्वस्वरूपाचे विमर्शन किंवा मनन करण्यात मग्न व त्याच्याशीच एकरूप झालेला अशी अवस्था म्हणजे समाधी होय.।।१६।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

सर्व पदार्थांच्या उत्पत्तीला बीजभूत किंवा कारणीभूत होणाऱ्या चिदात्म्याचा अंतःप्रवेश किंवा चित्तप्रवेश योगिपद्धतीने अर्थात् सिद्धयोगसाधनपद्धतीने कसा होईल? याचे उत्तर श्रीशिवांनी "**आसनस्थः सुखं ह्रदे निमज्जति।।१६।।**" अर्थात् "सिद्धयोगी हा सहस्राररूपी आसनात श्रीशिवशक्तिसामरस्यात स्थिर होऊन परमसुखाच्या शाश्वत डोहात बुडून जातो," असे म्हणून या सूत्रात दिले आहे.।।६९-६९.५।।

पवित्र करणारा, अत्यंत निर्मळ व अग्नीप्रमाणे दाहक अशा मध्यम प्राणाला म्हणजेच उदानवायूला आसन असे म्हटले आहे.।।७०।।

**विवरण :-** चिदात्म्यात प्रवेश होण्यासाठी योगोक्त प्रयत्नांची कास धरून विज्ञानवंत सिद्धयोग्यांचे जरी दृढ परिशीलन चालू असले तरी म्हणजे त्या सिद्धयोग्यांनी जरी रेचक व पूरक यांचे उच्छेदन करून कुंभक केला असला तरी सूर्य व चंद्र यांच्या एकीकरणातून उत्पन्न झालेल्या उदाननामक अग्नी वर फेकण्याच्या क्रियेने अर्थात् वायुदृष्ट्या रेचनक्रियेने मूलाधारादि खालील चक्रांचे उल्लंघन करून साधकभक्तयोगिशिष्य द्वादशार चक्रात विश्रांत होतो. त्यामुळेच उदानवायूला अग्नीची उपमा देऊन चंड असे म्हटले आहे;

कारण तो द्वैतरूप इंधनाला भाजून काढतो व परमशुद्धी करतो. त्यामुळे त्याला पवमान असे म्हटले आहे. त्याचा म्हणजेच उदानाचा आश्रय घेऊनच द्वादशान्तात असणाऱ्या आणि विश्ववैचित्र्याचे तरंग उठत असणाऱ्या श्रीशिव-चैतन्यरूप समुद्रात सिद्धयोग्याला यथेच्छ डुंबता येते. या अमृताच्या सतत आस्वादासाठी उद्युक्त झालेल्या सिद्धयोग्यांना कालोपाधिहीन व श्रेष्ठ अशा शाक्तपदाची प्राप्ती होते. त्याप्रमाणे अवधान व अनुप्रवेश या दोन उपायांनी अखंड स्वातंत्र्ययुक्त स्थिती प्राप्त होते. त्या अवस्थेत अंतर्बाह्य असा भेद राहत नाही.

ज्ञानी सिद्धयोग्यांना हा उदानवायू एखाद्या डोहाप्रमाणे आहे; कारण सद्रूप मासा ज्यात संचार करीत असतो त्या उदानरूप डोहामध्ये सिद्धयोगी सुखाने संचार करीत असतो.।।७१।।

सर्व पदार्थांचा उत्पादक असल्यामुळे श्रीशिवांना, श्रीपरमेश्वराला किंवा तत्स्वरूप प्रकाशाला ह्रद अर्थात् डोह असे म्हटले असून त्याच कारणामुळे चिद्रूपाला बीज म्हटले आहे. या चिद्रूपाचे अवधान व अनुप्रवेश हे दोन उपाय सांगितले आहेत. हे उपाय काल आणि काम यांच्यावर जय मिळविण्यासाठी आणि अजर व अमर पदाचा लाभ मिळविण्यासाठी साहाय्यभूत होतात. ।।७२,७३।।१६।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**आसनस्थः सुखं ह्रदे निमज्जति।।१६।।**" या सूत्राने श्रीशिवांनी असे सांगितले आहे की, ज्या ठिकाणी नित्य एकात्मभावनेने स्थिर राहता येते असे ठिकाण म्हणजे श्रेष्ठ शाक्त बल होय. जो तेथे राहतो अर्थात् पर व अपर ध्यानधारणादि आयास किंवा बाह्य प्रयत्न टाकून, नित्य व अंतर्मुख होऊन त्या शाक्त बलाचाच विचार करतो तो सुखाने व कोणतेही आयास न होता परामृत समुद्रात डुंबत राहतो अर्थात् देहादि संकोचांचा त्याग करून शाक्तमय होतो.।।१६।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

पराशक्तीविषयी सावध असणाऱ्या या सिद्धयोग्याला महायोगी असे म्हणतात आणि तो।।५९।।

"**आसनस्थः सुखं ह्रदे निमज्जति।।१६।।**" या सूत्रन्यायाने "स्व-स्थानीच आनंदाच्या डोहात डुंबत राहतो."।।१६।।

ज्या ठिकाणी एकात्मभावनेने राहता व बसता येते ते आसन होय. त्या

आसनात बसून शाक्तबल अर्थात् शक्तीच्या सामर्थ्याचा आत विचार करीत।।६०।।

ध्यानधारणा आदि अन्य सर्व अवघड उपायांचा त्याग केलेला हा सिद्धयोगी खेचर्यादि महासिद्धींच्या प्रसाराला कारणीभूत असलेल्या।।६१।।

व स्वच्छत्वादि गुणांनी युक्त अशा स्वानंदाने भरलेल्या डोहात इदं म्हणजे हे पदवाच्य एक बेट पूर्णपणे ज्यात बुडालेले आहे अशा संपूर्ण संविद्रूप समुद्रात।।६२।।

सर्व उपायांचा त्याग करून यथेच्छ व आनंदाने स्वदेहाला बुडवून आणि तन्मय होऊन स्वानंदाचा उपभोग घेत राहतो.।।६३।।१६।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

अशा प्रकारचा सिद्धयोगी शाक्तबलाची प्राप्ती करतो आणि शांभवपदात विश्रांती प्राप्त करतो असे **"आसनस्थः सुखं ह्रदे निमज्जति।।१६।।"** अर्थात् "सहस्रारात श्रीशिवशक्तिसामरस्यरूप व परमसुखरूप शाश्वत डोहात बुडून जातो," असे श्रीशिव या सूत्रातून सांगतात.

ज्यामध्ये ऐकात्म्यभावनेने बसले जाते ते आसन होय. तेच शाक्तबल होय. जो सिद्धयोगी तेथे स्थिर होतो म्हणजेच सर्व ध्यानधारणादि बाह्य क्रियांचे परिश्रम सोडून देऊन तेथेच अंतर्मुख होऊन विमर्शन अथवा विचार करतो तो अत्यंत सहजभावाने व सुखाने संविद्रूप समुद्रात बुडतो अर्थात् संकुचित देहादींचे संस्कार नष्ट करून तादात्म्यभाव म्हणजेच श्रीशिव-शक्तिसामरस्य प्राप्त करतो.।।१६।।

**विवरण :-** जर सिद्धयोग्याने अशा तऱ्हेने पराशक्ती कुंडलिनीचे अवधान ठेवले तर त्याच्या इकडच्या तिकडच्या सर्व बाह्य प्रयत्नांचा नाश होऊन तो आपल्या आसनावर स्थिर राहून सुखपूर्वक चिदाकाशरूप ह्रदामध्ये अर्थात् जलाशयामध्ये मग्न होतो. जर त्याने पराशक्ती कुंडलिनीचे अवधान पूर्णपणे प्रस्थापित केले तर त्याला इतर कोणत्याही औपचारिक ध्यान अथवा एकाग्रतेच्या प्रक्रियांमधून जावे लागत नाही. आत्म्याचे ज्ञान झालेला सिद्धयोगी शरीरादींची कल्पना सोडून देऊन अमृतानंदात बुडून जातो.।।१६।।

## सूत्र क्रमांक १७

**संबंध :-** आणवोपायाच्या क्रमाने नाडीसंहारादि (उन्मेष ३ सूत्र ५) द्वारा मोहावर विजय मिळवून शुद्धविद्यारूप (उन्मेष १ सूत्र २१) शाक्तबलाच्या प्रकर्षाने सिद्धयोगी शांभवपदरूप परमामृत समुद्रात तन्मय होऊन जातो. अशा स्वतंत्र पदावर अधिरूढ होऊन सिद्धयोगी वेद्य त्याचप्रमाणे वेदक यांचे

अवभासरूप जग आपल्या इच्छेने निर्माण करतो असे या सूत्रात सूत्रकारांनी सांगितले आहे.

**स्वमात्रानिर्माणमापादयति।।१७।।**

**शब्दार्थ :- स्वमात्रा** - ज्यावेळी आपली स्वतःची चैतन्य विषय अर्थात् कुंडलिनी शक्तिविषय आत्मसात् करण्याची जी मर्यादा किंवा इच्छा असते त्यावेळी सिद्धयोगी. **निर्माणम्** - निर्मिती अर्थात् जगताच्या जागृत व स्वप्नातील सर्व सिद्धींचे. **आपादयति** - संपादन करून दाखवतो.

**अर्थ :-** ज्या प्रमाणात त्या सिद्धयोग्याच्या ठिकाणी चैतन्याचा म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या जागृतीचा अर्थात् श्रीशिवस्वरूपाचा अंश असेल व तो त्यात स्थिर झाला असेल त्या मर्यादेपर्यंत तो आपल्या इच्छेनुसार जागृतीत व स्वप्नात सर्व सिद्धिसंपन्न होतो अर्थात् प्राणी व पदार्थ किंवा वेद्य व वेदक निर्माण करून दाखवितो.।।१७।।

**विशेष व्याख्या :-** क्रमपूर्वक शांभवोपायाद्वारा प्राप्त झालेल्या स्वतंत्र-पदावर स्थिर असणारा सिद्धयोगी आपल्या विश्वव्यापिनी इच्छेच्या द्वारा वेद्य-वेदकांच्या म्हणजे ज्ञेय व ज्ञाता यांच्या अवभासनरूप जगाची सृष्टीही करतो आणि विनाशही करतो. ही संपत्ती त्याला जाग्रदादि अवस्थांमध्ये सिद्ध होते.।।१७।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा रीतीने नाडीसंहारादि आणवोपायादिक्रमाने मोहजय प्राप्त होतो. त्याच्यापासून शुद्धविद्येने युक्त अशा शाक्तबलाची प्राप्ती होते. त्याच्या प्रकर्षामुळे परामृताच्या सागराने युक्त शांभव पद प्राप्त झालेला सिद्धयोगी "**स्वमात्रा-निर्माणमापादयति।।१७।।**" अर्थात् "स्वतःच्या चैतन्याशी संबंधित असणाऱ्या चिद्रसाने घट्ट झालेल्या अंशाच्या स्वरूपाची वेद्य म्हणजे ग्राह्य व वेदक म्हणजे ग्राहक अर्थात् जाणणारा किंवा ज्ञेय व ज्ञाता अशा प्रकारची अवभासात्मक सृष्टी निर्माण करू शकतो."

यासंबंधी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**तदेव भवति स्थूलं स्थूलोपाधिवशात्प्रिये।**
**स्थूलसूक्ष्मविभेदेन तदेकं संव्यवस्थितम्।।४.२९३।।**

**अर्थ :-** ते अर्थात् चित्तत्व म्हणजे कुंडलिनी शक्ती स्थूलाच्या उपाधीने स्थूलाप्रमाणे भासते. ते अर्थात् चित्तत्त्व म्हणजे कुंडलिनी शक्ती स्थूल व सूक्ष्म अशा भेदाने सुव्यवस्थित आहे.

**विवरण :-** महाप्रकाशरूप श्रीस्वतंत्रनाथ श्रीस्वच्छंदभैरव स्वस्वातंत्र्यामुळे स्थूल भासाच्या रूपात स्फुरण पावतात किंवा व्यक्त होतात. त्यामुळे तेच विविध ज्ञेय पदार्थांच्या स्फूर्तीच्या उपाधीने युक्त होतात. व्यापक प्रकाशच व्याप्य म्हणजे व्यापल्या जाणाऱ्या वस्तूच्या रूपात व्यक्त होतो. व्याप्य म्हणजे त्याच्याहून भिन्न नाही. त्यामुळे तो उपाधी चित्तत्त्वाहून अधिक नाही, असा याचा भावार्थ आहे.

"**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथातही याविषयी असे म्हटले आहे की -

**आत्मानमत एवायं ज्ञेयीकुर्यात्पृथक्स्थितिः।**
**ज्ञेयं न तु ...................................।।१.५.१५।।**

येथे तत् हे पद चैतन्य अथवा प्रकाशरूप श्रीशिवांचे द्योतक असून श्रीशिव हे पूर्ण स्वातंत्र्याने परिपूर्ण आहेत.

**अर्थ :-** त्यामुळेच सिद्धयोगी हा स्वतःला वेगळ्या स्थितीत ज्ञेय बनवितो. ज्ञेय वस्तू वेगळी नाही.

**विवरण :-** ज्यावेळी अशा प्रकारच्या शुद्धस्वातंत्र्याच्या बलामुळे हा सिद्धयोगी वेगळीच स्थिती लाभलेल्या वस्तूची प्राप्ती करीत नाही तर त्यावेळेला अज्ञेय अर्थात् ज्ञेयरहित अशा आत्म्याला अनियंत्रित प्रभावाने ज्ञेय बनवितो. जर ज्ञेय हे ज्ञानाहून भिन्न आहे असे मानले तर ज्ञानकर्तृता मलिन होईल व ज्ञातृत्व नष्ट होईल असे याचे तात्पर्य आहे.

आगमातही याविषयी असे म्हटले आहे की -

**जलं हिमं च यो वेद गुरुवक्त्रागमात्प्रिये।**
**नास्त्येव तस्य कर्तव्यं तस्यापश्चिमजन्मता।।**

**अर्थ :-** हे प्रिये! जो साधकभक्तयोगिशिष्य श्रीसद्गुरुमुख व आगम यांच्यापासून जल व हिम हे एकच आहेत असे जाणतो त्याला काहीही करावयाचे शिल्लक राहत नाही व पुढचे जन्मही राहत नाहीत.

**विवरण :-** ज्याप्रमाणे पाणी व बर्फ यांचा रस म्हणजेच त्यांचे एकत्रिकरण असते त्याप्रमाणेच श्रीशिव व त्यांच्या शक्तीने युक्त जगत् यांच्यात चिद्रसाचे एकत्रिकरण आहे अर्थात् ते एकच आहेत. अशा संवेदनेमुळे श्रेष्ठ शाक्तबलाच्या स्फुरणाने पवित्र झालेल्या हृदयाने युक्त अशा साधकभक्तयोगिशिष्याला दुसरा जन्म येत नाही. वर्तमान जन्मात तो जीवन्मुक्तच असतो; पण केवळ त्याच्या प्रारब्धकर्मांचा नाश होईपर्यंत त्याचा देह प्रारब्ध भोगीत राहतो.

हाच विचार खालील "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील स्पंदकारिकेत प्रकट केला आहे.

**इति वा यस्य संवित्तिः क्रीडात्वेनाखिलं जगत्।**
**स पश्यन्सततं युक्तो जीवन्मुक्तो न संशयः।।३.३०।।**

**अर्थ :-** अशा प्रकारचे ज्याला ज्ञान होते तो जगताला एक खेळ समजून त्याच्याकडे पाहतो व सतत योगयुक्त होऊन जीवन्मुक्त होतो यात काहीही संशय नाही.।।३.३०।।

याचा अर्थ असा आहे की, ज्या सिद्धयोग्याला हे सर्व जग संवित् आत्म-स्वरूप अर्थात् मन्मय किंवा चिन्मय आहे असा स्वानुभव येतो तो हे सर्व विश्व ही आपली लीला आहे असे जाणतो. अशा प्रकारे आपल्या आंतरिक श्रीईश्वरी सत्तेशी तो पुरुष नेहमी युक्त असल्यामुळे जीवन्मुक्त असतो यात काहीही संशय नाही.।।१७।।

**विवरणात्मक टीप :-** ज्ञेय पदार्थ हे चैतन्याकडून निश्चित केले जातात. चैतन्य ज्ञेय पदार्थाकडून निश्चित होत नाही. जर चैतन्य ज्ञेयाकडून निश्चित होऊ लागले तर श्रीपरमेश्वराचे पूर्ण स्वातंत्र्य अबाधित राहणार नाही. ज्ञेयांचा विचार करता श्रीपरमेश्वराच्या स्वातंत्र्याच्या पूर्णत्वात बाधा येईल.।।१७।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे "कर्तृपणाच्या अंशाचा विश्राम म्हणजेच त्या सिद्धयोग्याचे अखंड स्वातंत्र्य होय. त्यामुळे त्याला कर्तृत्व येते." यासंबंधी वृषभध्वज अर्थात् बैल हेच ज्यांचे वाहन आहे असे श्रीशिव "**स्वमात्रानिर्माणमापादयति ।।१७।।**" हे सूत्र सांगतात.।।७४।।

श्रीपरमेशाची स्वशक्ती ही ज्ञानरूप व कर्तृत्वरूप अशा स्वरूपाची आहे. तिचे वीर्य व बल संसारोत्पत्तीला कारण आहे.।।७५।।

यामुळे या शक्तीला जगन्माता म्हटले आहे आणि ही शक्तिमान् अथवा शक्तीने युक्त असणाऱ्या सिद्धयोग्याची श्रेष्ठ शक्ती व श्रेष्ठ माता आहे.।।७५.५।।

या शक्तीच्या साहाय्याने ज्याप्रमाणे श्रीपरमेश्वराला वस्तू उत्पन्न करण्याची रुची असेल त्याप्रमाणे श्रीपरमेश्वर त्यावस्तू निर्माण करू शकतो. हे असे वस्तू तत्काळ निर्माण करणे हे त्याच्या स्वातंत्र्यामुळे त्याला शक्य होते. ।।७६,७६.५।।

**विवरण :-** सिद्धयोगी पूर्वोक्त अवधान व अनुप्रवेश या उपायांच्या अनुशीलनाने इच्छेनुसार वेद्य अर्थात् ज्ञेय व वेदक अर्थात् ज्ञाता यांच्या अव-

भासनांनी युक्त अशा वस्तू आधी कधीही उल्लेख न केलेल्या अवभासस्व-भावाने युक्त व कर्तृत्वादि सहित असणाऱ्या स्वशक्तीच्या साहाय्याने निर्माण करण्याला समर्थ होतो. ही निर्मितीच स्वातंत्र्यस्थानाच्या विश्रांतीची सूचक आहे. त्या सिद्धयोग्याची ही विश्रांतीच आहे.।।१७।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"स्वमात्रानिर्माणमापादयति।।१७।।"** अर्थात् तो शाक्तबलसंपन्न सिद्ध-योगी स्वचैतन्यासंबंधी चिद्रसाने भिजलेल्या अंशरूपात वेद्य व वेदकावभासक-रूप अर्थात् जगद्रूप निर्माण करतो किंवा निर्माण केल्याप्रमाणे दाखवितो.।।१७।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे आणवोपायाची प्राप्ती करून मिळविलेल्या मोहावरील विजया-मुळे शुद्धविद्यारूप शाक्तावेशात भरपूर व मनसोक्त डुंबत आणि।।६४।।

"स्वात्मानंदाच्या डोहात यथेच्छ अवगाहन करीत, ऐश्वर्य लाभलेला हा साधकोत्तम।।६५।। स्वतःला हवी तशी निर्मिती करू शकतो," हे **"स्वमात्रा-निर्माणमापादयति।।१७।।"** या सूत्राने कथन केले आहे.

तो परमयोगी स्वचैतन्याशी संबंधित आत्म्याचा परिमित अंश असून त्याच्यात ग्राह्य ग्राहकता असते.।।६६।।

त्याचे निर्माण म्हणजे मिळविणे व निर्मितत्वाने दर्शन अर्थात् ज्ञान हे सर्व हा योगींद्र स्पष्टपणे स्वतःच्या इच्छेने मिळवितो.।।६७।।१७।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

त्यानंतर "योगनिष्ठ सिद्धयोगिपुरुष आणवोपायाच्या क्रमाने शाक्तबलाच्या सामर्थ्याने शांभवपद मिळवून स्वतःच्या स्वातंत्र्यशक्तीने त्याला पाहिजे ते निर्माण करू शकतो," असे **"स्वमात्रानिर्माणमापादयति।।१७।।"** या सूत्रात सांगितले आहे.

पूर्वी सांगितलेली स्वशी संबंधित असणारी मात्रा म्हणजेच चैतन्याची घनता ही ग्राह्यग्राहकरूपाची परिमित किंवा मर्यादित अथवा अंशात्मक असते. त्या चिद्रसांशाने युक्त सिद्धयोगी स्वेच्छेने यथेष्ट अर्थात् त्याची जी इच्छा असेल तसे ज्ञातृज्ञानप्रकाशरूप जग निर्माण करून संपादन करतो व तशी निर्मिती करून दर्शन करवितो.

यासंबंधी **"श्रीस्वच्छंदतंत्र"** या तंत्रग्रंथात असे म्हटले आहे की -

**तदेव भवति स्थूलं स्थूलोपाधिवशात्प्रिये।**
**स्थूलसूक्ष्मविभेदेन तदेकं सुव्यवस्थितम्।।४.२९३।।**

**अर्थ :-** ते चित्तत्त्वच स्थूलाच्या उपाधीमुळे स्थूल होते. ते एकमेव चित्तत्त्व स्थूल व सूक्ष्म अशा भेदाने सुव्यवस्थित असते;

कारण ज्ञानप्रकाशयुक्त श्रीपरमशिव अखंडपणे स्वस्वातंत्र्यशक्तीने असूक्ष्म अथवा स्थूल आभासरूपाने प्रस्फुरित होत असतात आणि अशाच प्रकारे तेच विविध वेद्यस्फूर्तीने म्हणजेच वेद्यवस्तुरूपाने उपाधित्वाला प्राप्त होत असतात. व्यापक अर्थात् व्यापणारी वस्तू व्याप्य अर्थात् व्यापण्याला योग्य रूपात प्रकाशित होत असते. त्यामुळे व्याप्यवस्तू व्यापकाशिवाय अस्तित्वात येऊच शकत नाही. त्यामुळेच ती उपाधी चिद्रूपच असते अर्थात्च ती तत्त्ववस्तू तत्त्वाशिवाय अतिरिक्त असत नाही.

याविषयी "**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**आत्मानमत एवायं ज्ञेयी कुर्यात् पृथक् स्थितिः।**
**ज्ञेयं न तु तदौन्मुख्यात् खण्ड्येतास्य स्वतन्त्रता।।१.५.१५।।**

**अर्थ :-** विमर्शशक्तीच्या कारणामुळेच तो म्हणजे श्रीईश्वर पायाभूत "**स्व**" अर्थात् स्वतःला ज्ञानाचा विषय अर्थात् ज्ञेय बनवितो. ज्ञेयाला किंवा वस्तूला स्वतःचे वेगळे अस्तित्व नसते. जर त्याला म्हणजे श्रीईश्वराला सृष्टीसाठी वस्तूवर म्हणजे स्वतःपेक्षा वेगळ्या गोष्टीवर अवलंबून राहावे लागले तर त्याचे पूर्ण स्वातंत्र्य नष्ट होण्याचा प्रसंग येईल.।।१.५.१५।।

हा स्वतः प्रकाशयुक्त सिद्धयोगी स्वतःला ज्ञातृस्वरूपाहून अज्ञेय असूनही ज्ञेयी करतो. वेगळेपणाने ज्ञेयाच्या सापेक्षतेत वेगळी व प्रकाशाहून बाहेर असणारी अशी स्थिती ज्ञेयवस्तूची कधीच नसते. वेगळ्या ज्ञानसापेक्षतेत ज्ञातृत्वच नष्ट होते. त्यामुळे वेगळ्या असणाऱ्या प्रकाशापेक्षा वेगळी स्थिती ज्ञेय वस्तूंची होणे हे योग्य नसते. अशाच प्रकारे पाणी व बर्फ यांच्याप्रमाणे म्हणजे पाणी व बर्फ हे ज्याप्रमाणे एकच आहेत त्याप्रमाणे श्रीशिव आणि त्यांच्या शक्तीचे रूप असणारे जगत् हे एकच असून त्यातल्या चिद्रूप व त्याची एकघनता यांच्या जाणिवेने परशाक्तबल प्राप्त झालेल्या सिद्धयोग्याला परत जन्म प्राप्त होत नाही अर्थात् तो मुक्त होतो. तो निरंतर जीवन्मुक्तावस्थेत विहार करीत राहतो.

यासंबंधी "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील कारिकांमध्ये असे म्हटले आहे की -

**इति वा यस्य संवित्तिः क्रीडात्वेनाखिलं जगत्।**
**स पश्यन् सततं युक्तो जीवन्मुक्तो न संशयः।।२.३०।।**

**अर्थ :-** अशा प्रकारे श्रीशिवांशिवाय या जगतात कोणतीही वस्तू नाही. जो सिद्धयोगी हे जाणतो व हे संपूर्ण जगत् ज्याला क्रीडेप्रमाणे वाटते तो सतत श्रीपरमशिवांशी युक्त होऊन राहतो आणि जिवंत असूनही मुक्त होतो यात कोणताही संशय नाही.।।२.३०।।

अशा तऱ्हेने याआधी सांगितलेल्या प्रकाराने ज्या सिद्धयोग्याला ज्ञान होते तो सर्व जगताला एखाद्या क्रीडेप्रमाणे भासवीत आणि नित्ययुक्त असल्या-मुळे बंधाला कारणीभूत होणाऱ्या अज्ञानाचा विनाश झाल्यामुळे जिवंत असतानाच मुक्त होतो यात काहीही संशय नाही.

**विवरण :-** असा सिद्धयोगी आपल्या इच्छाशक्तीने चित्त आणि दुसऱ्या देहांचेही निर्माण करू शकतो. ज्यावेळेला तो सिद्धयोगी शुद्धविद्येची शक्ती प्राप्त करतो त्यावेळेला तो क्रियाशील चैतन्यात प्रस्थापित होतो आणि त्या चैतन्याच्या परिणामाच्या संबंधाने तो प्राणिमात्र आणि वस्तू अर्थात् वेद्य आणि वेदक यांची निर्मिती करू शकतो.

येथे अशी एक शंका आहे की, जर वेद्य हा वेदकापेक्षा म्हणजे कर्म हे कर्त्यापेक्षा पूर्णपणे वेगळे असूनही सिद्धयोगी वेद्य किंवा वस्तू कशी काय निर्माण करतो हे कळत नाही; कारण परमचैतन्यच वेदक आणि वेद्याच्या रूपात भासत असते.

ज्यावेळेला सिद्धयोग्याने पराशक्तीचे सामर्थ्य प्राप्त केलेले असते त्यावेळेला त्याला वेदक अथवा वेद्य यांच्या स्वरूपात व्यक्त होणे काहीही अवघड नाही; कारण चैतन्य दोन्ही स्वरूपांचे असते.।।१७।।

यासंबंधी "**श्रीपातंजलयोगदर्शन**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**निर्माणचित्तानि अस्मितामात्रात्।।४.४।।**

**अर्थ :-** सिद्धयोगी ह्या अस्मितामात्राने चित्त निर्माण करणारा होतो.।।४.४।।

त्याच्यात सर्वकाही करण्याचे सामर्थ्य असूनही तो बंधनात सापडत नाही.

## सूत्र क्रमांक १८

**संबंध :-** या स्वातंत्र्यामुळे सिद्धयोग्याला पुनर्जन्म नसतो असे म्हटले आहे.

**विद्याऽविनाशे जन्मविनाशः।।१८।।**

**शब्दार्थ :- विद्या** - सहजविद्या किंवा सिद्धयोगसाधन. **अविनाशे** - विनाश होत नाही तोपर्यंत अर्थात् दीर्घकाल, अखंड व श्रद्धाभक्तिआदर-

सत्कारपूर्वक निरंतर होत राहिल्यानंतर. **जन्मविनाशः** - पुनर्जन्म येण्याच्या शक्यतेचा नाश होतो म्हणजे जन्माचे बंधन राहत नाही.

**अर्थ :-** जोपर्यंत सहजविद्येचा म्हणजे सिद्धयोगसाधनेचा विनाश होत नाही तोपर्यंत अर्थात् सिद्धयोगाचे साधन दीर्घकाल निरंतर व श्रद्धाभक्ति-आदरसत्कारपूर्वक होत राहिल्यानंतर सिद्धयोग्याच्या पुनर्जन्माचा अर्थात् पुनर्जन्म येण्याच्या शक्यतेचा नाश होतो अर्थात् सहजविद्येचे म्हणजे विद्यारूप कुंडलिनी शक्तीचे अखंड स्फुरण होत राहिले की, जन्माचा विनाश होतो म्हणजेच जन्ममरणचक्रपरंपरा संपून जाते.।।१८।।

**विशेष व्याख्या :-** शुद्धविद्येच्या बळाने शांभवपदावर स्थित असणाऱ्या सिद्धयोग्याला ज्यावेळेला आत्म्याशी एकत्वाचा सतत अनुभव येतो त्यावेळेला ती त्याची अवस्था स्वाभाविक असल्याकारणाने तिला सहजावस्था असे म्हणतात.

स्थूल व सूक्ष्म देह आणि इंद्रियसमूह नेहमी दुःखाने भरलेले असतात; कारण तेच कर्मबंधाला आणि अज्ञान म्हणजेच मायामोहाला कारणीभूत होत असतात. त्यामुळेच त्यांच्या द्वारा जन्म-मरण आदि बंधनात पडलेला जीव नेहमी यातनाग्रस्त राहतो. परंतु ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्याला सहजावस्था प्राप्त होते त्यावेळेला त्याच्या जन्मादि सर्व यातनांचा सर्वथा नाश होऊनच जातो.।।१८।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा प्रकारे स्वशक्तीने उत्पन्न केलेल्या भूतात्मक व भावात्मक शरीरधारी सिद्धयोग्याला जन्मादिरूपी कसलाही बंध राहत नाही असे "**विद्याऽविनाशे जन्मविनाशः।।१८।।**" अर्थात् "सहजविद्येचे म्हणजे विद्यारूप कुंडलिनी शक्तीचे स्फुरण झाले की, जन्माचा विनाश होतो म्हणजे जन्ममरणचक्रपरंपरा संपून जाते," असे या सूत्रात प्रतिपादित केले आहे.

**विवरण :-** शरीर हे भूतात्मक आणि भावात्मक असे दोन प्रकारचे आहे. मायाशक्तीच्या सामर्थ्यामुळे स्वतःचा तात्त्विक स्वभाव विसरलेल्या व वस्तूंचे संवेदन म्हणजे ज्ञान होण्याच्या वेळेला स्वरूपाचे ज्ञान नसल्यामुळे "अहं"चा अभिमान धरणाऱ्या जीवाचे जे शरीर असते ते शिर, हात व पाय इत्यादि अवयवांनी युक्त असे सृष्ट्यादिमय भूत शरीर होय. या व्यतिरिक्त शब्दादि विषयज्ञानाने युक्त सूक्ष्मशरीर ते भावात्मक शरीर आहे. वास्तविक विचार करता ही दोन्ही शरीरे एकमेकांहून भिन्न आहेत आणि या जीवात्म्याहूनही

भिन्न आहेत; कारण ही शरीरे ज्ञेय आहेत, ज्ञाते नाहीत.

आधी सांगितलेल्या सहजविद्येच्या सतत उन्मग्नत्वाने होणाऱ्या स्फुरणामुळे जन्माचा विनाश होतो. हा जन्म दुःखाने व्यापलेला आहे. त्याच्यात देहेंद्रियादि समुदायही आहे. तसेच देह हा अज्ञान म्हणजे आणव व मायीयमलाने युक्त आहे. या दोन मलांनी मी अपूर्ण आहे व श्रीशिवांहून भिन्न आहे असे भेदज्ञान निर्माण होते. त्यामुळे जन्म देणारी कर्मे घडतात. त्यामुळे जन्म हा अज्ञान-जन्यकर्ममूलक आहे. अशा जन्माचा विनाश हा सहजविद्येच्या स्फुरणाने होतो.

हेच "**श्रीकंठी**" या ग्रंथातही पुढील प्रमाणे सांगितले आहे.

**सप्रपञ्चं परित्यज्य हेयोपादेयलक्षणम्।**
**तृणादिकं तथा पर्णं पाषाणं सचराचरम्।।**
**शिवाद्यवनिपर्यन्तं भावाभावोपबृंहितम्।**
**सर्वं शिवमयं ध्यात्वा भूयो जन्म न प्राप्नुयात्।।**

**अर्थ :-** त्याज्य व स्वीकार्य अशा प्रपंचाचा त्याग करून अर्थात् तृण म्हणजे गवत, पान, दगड, चर, अचर आणि श्रीशिव ते पृथ्वीपर्यंतचे भाव व अभावांनी पसरलेले सर्व काही श्रीशिवमय आहे असे जो ध्यान करतो त्याला परत परत जन्म प्राप्त होत नाही.

**विवरण :-** विश्वमय व अनुत्तर अशा श्रीशिवांशी सामरस्य मिळविणे म्हणजेच प्रमेय अर्थात् पदार्थांच्या विकासाच्या उन्मुखतेचा अर्थात् उत्सुकतेचा पूर्ण त्याग होय; कारण सृष्टीच्या पूर्वी हे विश्व चिद्रसस्वभावाच्या एकात्मकतेने स्थित होते.

याविषयी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**स्वनिर्वाणं परं शुद्धं गुरुपारम्परागतम्।**
**तद्विदित्वा विमुच्येत गत्वा भूयो न जायते।।४.२३८।।**

**अर्थ :-** श्रीसद्गुरुपरंपरेतून आलेले श्रेष्ठ व शुद्ध असे स्वनिर्वाण जाणून साधकभक्तयोगिशिष्य मुक्त होतो व देहातून निघून गेल्यानंतर तो परत जन्म घेत नाही.

**विवरण :-** स्वनिर्वाण हे अद्वयश्रेष्ठ अर्थात् परम अद्वययुक्त असल्याने तोच मोक्षमार्ग आहे. त्यामुळेच तो परम शुद्ध म्हणजे शुद्धाशुद्ध अशा श्रीसदाशिवादि स्थानांहून श्रेष्ठ आहे. तो मोक्षमार्ग श्रीपरभैरव, तच्छक्ती, श्रीसदाशिव, श्रीईशान, श्रीअनंत व श्रीकंठ आदि परंपरेतून आलेला आहे.

त्याचा अनुभव घेऊन साधक जिवंत असूनही मुक्त होतो व देहाच्या पातानंतर त्यांच्याशी म्हणजे श्रीशिवांशी ऐक्य पावतो.

"**श्रीमृत्युजिद्भट्टारक**" अर्थात् "**श्रीनेत्रतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**तत्त्वत्रयविनिर्मुक्तं शाश्वतं त्वचलं ध्रुवम्।**
**दिव्येन योगमार्गेण दृष्ट्वा भूयो न जायते।।८.२६-२७।।**

**अर्थ :-** जो सिद्धयोगी नर, शक्ती व श्रीशिवनामक तत्त्वत्रयातून मुक्त, शाश्वत अर्थात् अविवर्त म्हणजेच विवर्तवादाप्रमाणे असत्यरूपाने ग्रहण न करणारा, अचल अर्थात् अपरिणामी आणि ध्रुव म्हणजेच नित्य अशा वस्तूला दिव्ययोगमार्गाने म्हणजे विकल्पाचा त्याग करून उमलणाऱ्या अविकल्प विमर्शाच्या सामर्थ्याने आत्म्याला किंवा श्रीशिवशक्तीला पाहतो अर्थात् त्या तत्त्वाचा साक्षात्कार करतो तो पुन्हा जन्माला येत नाही.।।१८।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१)** श्रीशिवांना ज्ञेय समजणे हेही अज्ञानच आहे. ही मानसिकताही आपण सोडून दिली पाहिजे. श्रीशिव हे शाश्वत ज्ञाते असून त्यांना कधीही ज्ञेय समजू नये.

**२)** तत्त्वत्रय म्हणजे तीन तत्त्वे होत. ही तीन तत्त्वे म्हणजेच नर, शक्ती आणि श्रीशिव ही होत. नरतत्त्व हे भेदप्रधान आहे अर्थात् भेदाशी अत्यंत ठळकपणाने जोडलेले आहे. ते ज्ञेयात्मक असते. शक्तितत्त्व हे भेदाभेदप्रधान आहे. ते भेदामध्ये अभेद आहे असे मानते. ते ज्ञानात्मक किंवा जाणीवयुक्त आहे. श्रीशिवतत्त्व हे अभेदप्रधान आहे. ते अत्यंत स्पष्टपणे अभेदाशी संबंधित आहे. ही तीनही तत्त्वे केवळ लौकिक जगताची अंगे आहेत. त्यांचा शाश्वततेशी कोणताही संबंध नाही.

**३)** दिव्ययोग म्हणजे अविकल्प विमर्श म्हणजेच विचारांशिवाय अथवा विकल्परहित ज्ञान किंवा जाणीव होय.

श्रीभास्कराचार्य या सूत्राचे वाचन "**विद्या अविनाशे**" असे करण्याऐवजी "**विद्या विनाशे**" असे करतात. त्यांच्या मते विद्या म्हणजे गौण, अशुद्ध व ज्ञेयाशी संबंधित असणारी विद्या आहे. ते पुढे असे म्हणतात की, या विद्येचा नाश झाला असता परत जन्म मिळत नाही.।।१८।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे त्या योग्याचे मलाने झाकलेले हे जे रूप आहे त्याचा बुद्धीने

म्हणजे ज्ञानाने नाश झाला असता पुनर्जन्म होत नाही अर्थात् त्या साधक-भक्तयोगिशिष्याची जन्ममरणचक्राच्या परंपरेतून सुटका होते.।।७७-७७.५।।

असे "**विद्याविनाशे जन्मविनाशः।।१८।।**" अर्थात् "अशुद्धविद्यानाशाने अर्थात् शुद्धविद्योत्पत्तीने जन्मविनाश होतो," या श्रीशिवसूत्राने कथन केले आहे.

पदार्थांना उत्पन्न करणारी जी विद्या आहे ती उपाधियुक्त असल्याने ती अशुद्धविद्या होय. ती पुनर्जन्माला कारणीभूत होते.।।७८-७८.५।।

सहजविद्येचा किंवा शुद्धविद्येचा उदय झाल्यानंतर त्या अशुद्धविद्येचा नाश होतो.।।७९।।

हे होत असतानाच आत्म्याचे परम स्वातंत्र्य अभिव्यक्त होते. अशा प्रकारे त्याने स्वबलाचा आश्रय घेतल्यामुळे त्याचा पुनर्जन्म होत नाही.।।८०।।

हीच अकालपद अर्थात् कालविरहित स्थान देणारी जीवन्मुक्तिरूप सिद्धी आहे.।।८०.५।।१८।।

**विवरण :-** असे हे वेद्यफलाची प्राप्ती करवून देणारे साधन वृत्तिज्ञान-रूप वस्तूच्या आकाराने युक्त असल्याने अशुद्धविद्या म्हणविते व तीच बंधन करणारी आहे. त्या विद्येच्या विरुद्ध असणारी अशी शुद्धविद्या असून तिच्या अनुसंधानाने सहजसंवित्‌चा लाभ होतो. त्याच्या सामर्थ्याने आणव व मायीय मलासह देहेंद्रियादि समुदायात्मक कर्मबंधन लुप्त होते अर्थात् नाहीसे होते.।।१८।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**विद्याऽविनाशे जन्मविनाशः।।१८।।**" अर्थात् "विद्येच्या अविनाशात म्हणजेच सतत उन्मग्रतेने होणाऱ्या स्फुरणात दुःखमय व अज्ञानाला सहकारी असणाऱ्या कर्मांनी युक्त अशा देहेंद्रियांच्या समुदायांचा नाश किंवा विध्वंस होतोच."।।१८।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा रीतीने "शाक्तशक्तीने विश्वरूप धारण केलेल्या सिद्धयोग्याला पुनर्जन्मादि कोणत्याही गोष्टी नसतात," असे "**विद्याऽविनाशे जन्मविनाशः।।१८।।**" अर्थात् "सहजविद्येच्या अर्थात् विद्यारूपी कुंडलिनी शक्तीच्या उदयाने जन्ममरणचक्रपरंपरेचा नाश होतो," असे या सूत्राने सांगितले आहे.।।६८।।

सहजविद्येचा अविनाश म्हणजे सतत उदय होत राहिला म्हणजे ही विद्या अथवा हे ज्ञान अखंड जागृत अथवा स्थिर राहिल्यास अज्ञानामुळे उत्पन्न

होणारे कर्म व त्या कर्माच्या अनुषंगाने।।६९।।

प्राप्त होणारा देहप्राणबुद्ध्यादि पसाऱ्याचा मूळापासून नाश होतो व त्याला अज्ञानमूलक जन्मादि राहत नाहीत.।।७०।।१८।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

पूर्वी सांगितलेल्या परशाक्तबलाने संपन्न व विश्वरूप झालेल्या सिद्ध-योग्याला कोणत्याही प्रकारचा जन्मादि बंध राहत नाही असे **"विद्याऽविनाशे जन्मविनाशः।।१८।।"** अर्थात् "विद्येच्या म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या अखंड उदयाने जन्ममरणचक्रपरंपरा नष्ट होते," असे या सूत्रात सांगितले आहे.

विद्या म्हणजे जागृत कुंडलिनीरूप सहजा विद्या होय. तिचा अविनाश म्हणजे सतत अथवा अखंड उदय झाला असता जन्माचा म्हणजेच जन्म-मरणरूप संसाराचा त्याचप्रमाणे अज्ञानाला साहाय्यभूत होणाऱ्या दुःखयुक्त देहेंद्रियादि समूहाचा विनाश म्हणजे विध्वंस होतो.

"**श्रीमृत्युजिद्भट्टारक**" अर्थात् "**श्रीनेत्रतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**तत्त्वत्रयं विनिर्मुक्तं शाश्वतं त्वचलं ध्रुवम्।**
**दिव्येन योगमार्गेण दृष्ट्वा भूयो न जायते।।**

**अर्थ :-** जो कोणी तीन तत्त्वांहून मुक्त असलेले, शाश्वत, अचल अर्थात् स्थिर व ध्रुव असणारे तत्त्व दिव्य अशा योगमार्गाने जाणतो त्याला परत जन्म येत नाही.

तीन तत्त्वे म्हणजे नर, शक्ती आणि श्रीशिव ही होत. जो सिद्धयोगी शाश्वत, ध्रुव म्हणजे नित्य व अचल म्हणजे कधीही न बदलणाऱ्या तत्त्व-विकल्पांचा त्याग करून अविकल्प म्हणजे विचाररहित व विमर्श अर्थात् ज्ञानाचा उदय करणाऱ्या उपायाचा दिव्यमार्गाने साक्षात्कार करून घेतो तो पुनर्जन्म कधीही प्राप्त करीत नाही.।।१८।।

**विवरण :-** सिद्धयोगी हा अनेक चित्त व अनेक देहांचे निर्माण करीत असला आणि तो अविद्येतच असला तरी तो मुक्तच असतो व त्याचा पुनर्जन्म होत नाही.।।१८।।

## सूत्र क्रमांक १९

**संबंध :-** असे असूनही कधी कधी सिद्धयोगी अपराध करून मोहामध्ये पडतो. ज्यावेळेला त्याचे शुद्धविद्यास्वरूप काही प्रमाणात आवृत होऊ लागते त्यावेळेला बाह्यशक्ती त्याच्यावर सत्ता चालवून त्याला खाली ढकलतात.

**कवर्गादिषु माहेश्वर्याद्याः पशुमातरः ।।१९।।**

**शब्दार्थ :- माहेश्वर्याद्याः** - ज्या मातृदेवतांच्या प्रारंभी माहेश्वरी, ब्राह्मी, कौमारी, चामुंडा इत्यादि देवता आहेत किंवा पीठेश्वरी अर्थात् कुंडलिनी शक्तीच्या बाह्यसंसारोन्मुख कामोपभोगवासनातृष्णाइच्छासंकल्पनादि घोरतर शक्ती अर्थात् मातृका. **कवर्गादिषु** - क, च, ट, त, प इत्यादि वर्गातील वर्णसमूहामधील किंवा "अ"पासून "क्ष"पर्यंतच्या मातृकाचक्रात अर्थात् बहिर्मुख किंवा संसारोन्मुख झालेली संवित् अर्थात् कुंडलिनी शक्ती. **पशुमातरः** - पशू अर्थात् मलत्रयांनी मर्यादित आत्मा अर्थात् जीव. यांच्या माता त्यांच्यावर सत्ता चालवणाऱ्या होतात किंवा पशुप्रमातारूप म्हणजे जीवरूप अधिष्ठातृशक्ती होऊन साधकभक्तयोगिशिष्याला द्वैतपरंपरेत खाली खाली खेचत राहतात अर्थात् संसारात मग्न करतात.

**अर्थ :-** क, च, ट, त, प इत्यादि वर्गातील वर्णसमूहावर अधिष्ठान असणाऱ्या आणि पशूंच्या म्हणजे मलत्रयांनी मर्यादित झालेल्या जीवांच्या माता असणाऱ्या माहेश्वरी आदि देवता या सहजविद्येचा अर्थात् सिद्ध-योगाचा अभ्यास मंद होऊन त्याचा प्रभाव कमी झालेल्या सिद्धयोग्यावर सत्ता गाजवितात अर्थात् पीठेश्वरी म्हणजे घोरतरी शक्ती "अ"पासून "क्ष"पर्यंतच्या मातृकाचक्रात अर्थात् बहिर्मुखाने कामोपभोगाकांक्षाइच्छातृष्णावासना-संकल्पनादींमध्ये आपल्या उपशक्तींच्या द्वारा रत झालेली कुंडलिनी शक्ती पशुप्रमातारूप आधिष्ठातृशक्ती होऊन सिद्धयोग्याला द्वैत परंपरेत खालीखाली ढकलत राहते.।।१९।।

**विशेष व्याख्या :-** जर कधी या सिद्धयोग्याच्या चिद्रूपतेच्या निरंतर अभ्यासात प्रमादवश न्यूनता येत असेल तर परावाक् ही आपल्या प्रसरात येणाऱ्या इच्छा, ज्ञान व क्रिया यांचा आश्रय घेते. अशा प्रकारे श्रीशिवशक्ती माहेश्वरी आदि वाचकरूपात प्रकट होऊन "अ" ते "क्ष" पर्यंतच्या मातृकांचा आश्रय घेतात आणि बहिर्मुखतेला प्राप्त होतात. त्यांनाच घोरतरी शक्ती असे म्हणतात. या शक्ती सिद्धयोग्याला द्वैतप्रथेकडे म्हणजेच द्वैतज्ञानाकडे खेचतात आणि स्मय, हर्ष, भय, राग, द्वेष इत्यादि विकाररूप प्रपंच पसरवितात आणि असंकुचित अर्थात् अमर्याद चिद्घनस्वरूपाला संकुचित परतंत्र देहादि भावांना प्राप्त करवितात. परप्रमाता अर्थात् परमात्मा भिन्न भिन्न प्रमात्यांमध्ये वाटला जातो. त्यामुळे अविकल्प अर्थात् सुषुप्ती आणि सविकल्प अर्थात् स्वप्न आणि जागृतीमध्ये संवित् अर्थात् चैतन्यशक्ती संकुचितरूप धारण करते.

याविषयी पहिल्या उन्मेषातल्या चौथ्या सूत्रात असे म्हटले आहे की -

**ज्ञानाधिष्ठानं मातृका।।१.४।।**

त्यात तीन मलांच्या रूपातला बंधकभाव सामान्यरूपात सांगितला आहे. द्वैतज्ञानाचा आधार आणव, कार्म व मायीय या तीन मलांमुळे बहिर्मुखतेला प्राप्त झालेली संवित् आहे. तिला अज्ञाता माता असे म्हणतात. परंतु येथे सिद्धयोग्याला सुद्धा प्रमादवश पीठेश्वरी शक्तीच्या म्हणजेच घोरतरी शक्तींच्या द्वारा पशुप्रमात्यांच्या अधिष्ठानातून शब्दानुवेधाच्या मोहात पाडले जाते. (पीठ म्हणजे शरीर होय. त्याच्या अधिष्ठात्री देवी म्हणजेच आधारशक्ती या बहिर्मुख बहिष्करण त्याचप्रमाणे अंतर्मुख अंतःकरण आहेत. त्यांना पीठेश्वरी असे म्हटले आहे.)।।१९।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

ज्यावेळेला सिद्धयोग्याचे शुद्धविद्यास्वरूप नाहीसे होते त्यावेळेला त्याला "**कवर्गादिषु माहेश्वर्याद्याः पशुमातरः।।१९।।**" अर्थात् "क"वर्गादि वर्णांमध्ये राहणाऱ्या माहेश्वर्यादि पशुमाता मोहित करतात" अर्थात् त्या परतत्त्वावर आरूढ होता होता चूक करणाऱ्या पशूंच्या म्हणजेच जीवांच्या परापरमय शब्दांना उत्पन्न करून अविश्रांत अशा परस्वरूपावर आवरण घालतात व आधिपत्याचा भोग घेणाऱ्या त्या अधिष्ठात्री देवता जीवांना मोहित करतात.

**या सा शक्तिर्जगद्धातुः कथिता समवायिनी।**
**इच्छात्वं तस्य सा देवि सिसृक्षोः प्रतिपद्यते।।१।।**
**सैकापि सत्यनेकत्वं यथा गच्छति तच्छृणु।।२।।**
**एवमेतदिति ज्ञेयं नान्यथेति सुनिश्चितम्।**
**ज्ञापयन्ती जगत्यत्र ज्ञानशक्तिर्निगद्यते।।३।।**
**एवं भूतमिदं वस्तु भवत्विति यदा पुनः।**
**जाता तदैव तत्तद्वत्कुर्वत्यत्र क्रियोच्यते।।४।।**
**एवं सैषा द्विरूपापि पुनर्भेदैरनन्तताम्।**
**अर्थोपाधिवशात्प्राप्ता चिन्तामणिरिवेश्वरी।।५।।**
**तत्र तावत्समापन्नमातृभावा विभिद्यते।**
**द्विधा च नवधा चैव पञ्चाशद्धा च मालिनी।।६।।**
**बीजयोन्यात्मकाद्भेदाद् द्विधा बीजं स्वरा मताः।**
**कादिभिश्च स्मृता योनिर्नवधा वर्गभेदतः।।७।।**
**बीजमत्र शिवः शक्तिर्योनिरित्यभिधीयते।**

**वर्गाष्टकविभेदेन माहेश्वर्यादि चाष्टकम्।।८।।**
**प्रतिवर्णविभेदेन शतार्धकिरणोज्ज्वला।**
**रुद्राणां वाचकत्वेन तत्संख्यानां निवेशिता।।९।।**
**।। श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र।।**

**अर्थ :-** श्रीपरमेश्वराची जी विमर्शात्मक अर्थात् ज्ञानात्मक कुंडलिनी शक्ती आहे ती त्याच्याशी समवायसंबंधित अर्थात् परप्रमात्याशी अभिन्नरूपात स्थित असल्याने त्याच्याशी तादात्म्य पावलेली असून तीच त्या सृष्टी निर्माण करण्याची इच्छा असणाऱ्या श्रीपरमेश्वराची इच्छाशक्ती बनते; कारण बाहेर उल्लसित होण्याचा तिचा स्वभाव असल्याने ती पहिली उसळी घेते व अशा प्रकारे इच्छात्वाला प्राप्त होते.।।१।।

ही कुंडलिनी शक्ती एक असूनही अनेकत्वाला कशी प्राप्त होते ते ऐक.।।२।।

हे अशा प्रकारे जगातील भाव म्हणजे पदार्थ असून ते वेगळ्या प्रकारचे नाहीत असे ही परमात्मशक्तीच जगाला ज्ञान देते तेव्हा तिला ज्ञानशक्ती असे म्हणतात.।।३।।

नंतर ज्यावेळेला ही कुंडलिनी शक्ती ही वस्तू अशा प्रकारचीच व्हावी असे ठरवून तशीच तयार करते त्यावेळेला त्या परमात्मशक्तीला क्रियाशक्ती असे म्हणतात अर्थात् झाकलेल्या स्वरूपाच्या सामर्थ्याच्या मुळाशी असणारी त्या त्या विविध प्रकारच्या भूमिकांचा प्रपंच पसरविणाऱ्या श्रीपरमेश्वराची ही पारमेश्वरी स्वातंत्र्यशक्ती त्या त्या प्रमातृ व प्रमेय इत्यादि ज्ञाता व ज्ञेयादि अनंत आभासांना उत्पन्न करणारी असल्यामुळे तिला क्रियाशक्ती असे म्हणतात.।।४।।

अशी ही परमेश्वरी कुंडलिनी शक्ती ज्ञान व क्रिया अशा दोन रूपांची असूनही वस्तूंच्या उपाधींनुसार अर्थात् वस्तूंच्या स्वभावधर्मानुसार चिंतामणी-प्रमाणे अनेक भेदांना प्राप्त होते.।।५।।

त्यामुळे वाच्य-वाचकयुक्त जगताला उत्पन्न करण्यामुळे हिला मातृभाव प्राप्त होतो व अशा प्रकारे मातृता प्राप्त झालेली ही मालिनी दोन, नऊ व पन्नास अशा प्रकारांनी वेगळी होते.।।६।।

ही कुंडलिनी शक्ती बीज आणि योनी अशा दोन प्रकारची आहे. बीज म्हणजे स्वर मानले आहेत. "क" आदि वर्ग हे नऊ प्रकारचे असून ते योनी मानले आहेत.।।७।।

येथे श्रीशिव म्हणजे बीज व कुंडलिनी श्रीशक्ती ही योनी आहे. आठ वर्गांच्या माहेश्वर्यादि आठ देवता आहेत.।।८।।

प्रत्येक वर्ण वेगळा मोजला असता ते पन्नास होतात. त्यामुळे पन्नास वर्णरूप किरणांनी तेजस्वी असणारी अशी ही कुंडलिनी शक्ती आहे. रुद्र हे संख्येने पन्नास असल्याकारणाने पन्नास वर्ण हे त्यांचे वाचक आहेत.।।९।।

"**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात वर्णन केल्याप्रमाणे श्रीपरमेश्वराची परा वाणी प्रसरण पावून, इच्छा, ज्ञान व क्रिया या शक्तींचा आश्रय घेऊन, बीज, योनी, वर्ग व वर्ग्यादि रूपांची होत श्रीशिव-शक्ति-माहेश्वर्यादींचे वाचक "अ" ते "क्ष"पर्यंतच्या मातृकारूपाचा आश्रय घेते आणि सर्व प्रमात्यांमध्ये अविकल्प व सविकल्प अशा ज्ञानावस्थेत अंतर्विचारदृष्ट्या स्थूल व सूक्ष्म शब्दांचा अनुवेध करणारी होते अर्थात् संबंध लावणारी होते. हीच वर्ग व वर्ग्यादि देवतांच्या द्वारा अभिमान, हर्ष, भय, राग व द्वेषादि सर्व मनोदोष वाढविते व असंकुचित म्हणजे अमर्यादित चिद्घन स्वस्वरूपावर आवरण घालते. त्यामुळे ही परतंत्र संकुचित अशा देहादि अभिमानाला प्राप्त होते.

यासंबंधी "**श्रीतिमिरोद्घाट**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**करन्ध्रचितिमध्यस्था ब्रह्मपाशावलम्बिका:।**
**पीठेश्वर्यो महाघोरा मोहयन्त्यो मुहुर्मुहु:।।**

**अर्थ :-** शिर:स्थ ब्रह्मरंध्रातील चिदाकाशात ब्रह्माच्या पाशांसहित असणाऱ्या पीठांच्या अधिपती शक्ती महाघोरा या नावाने ओळखल्या जातात व या शक्ती जीवांना अर्थात् पशूंना वारंवार मोहात पाडतात अर्थात् विषयात खोल खोल नेतात.

**विवरण :-** ब्रह्मरंध्रातल्या चिदाकाशात संवित्मध्ये अंतर्भूत माहेश्वर्यादि शक्ती भेदयुक्त ज्ञानाचे अवभासन करीत असल्यामुळे घोरतरी म्हणून ओळखल्या जाणाऱ्या पशुमाता असून त्या तोडून टाकण्याला अवघड अशा ब्रह्मग्रंथींचा आश्रय घेऊन पशुजीवांना खाली खालीच पाडतात.

याविषयी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**विषयेष्वेव संलीनानधोऽध: पातयन्त्यणून्।**
**रुद्राणून्या: समालिङ्ग्य घोरतर्योऽपरा: स्मृता:।।**

**अर्थ :-** विषयातच लीन झालेल्या किंवा पूर्ण बुडून गलेल्या जीवांना व रुद्राणूंना चिकटून खाली खालीच नेणाऱ्या शक्तींना घोरतरी असे म्हणतात.

त्याचप्रमाणे शास्त्रात असेही म्हटले आहे की -

**घोरेति पाशजालाख्यं पापयुक्तं भयानकम्।।**

**अर्थ :-** घोरा म्हणजे पापयुक्त व भयानक पाशांचे जाळेच होय.

हे सर्व पूर्वीही "**ज्ञानाधिष्ठानं मातृका।।१.४।।**" अर्थात् "शुभाशुभवासनात्मक ज्ञानाची अधिष्ठात्री देवता मातृका होय," असे या सूत्रात सामान्यपणे सांगितले होतेच. या सूत्रात तत्त्वाची प्राप्ती झालेला महाज्ञानीसुद्धा थोडा बेफिकीर राहिल्यास पशुजनांच्या अधिष्ठात्री माहेश्वर्यादि शक्तींकडून शब्दानुवेधद्वारा मोहित होतो या आशयाने हेच सांगितले आहे, हाच येथे विशेष आहे.

**विवरण :-** आठ वर्ण वर्गांच्या आठ माता खालीलप्रमाणे आहेत.

| | | |
|---|---|---|
| १) अ वर्ग | (स्वर वर्ग) | योगीश्वरी अथवा महालक्ष्मी |
| २) क वर्ग | (क ख ग घ ङ) | ब्राह्मी |
| ३) च वर्ग | (च छ ज झ ञ) | माहेश्वरी |
| ४) ट वर्ग | (ट ठ ड ढ ण) | कौमारी |
| ५) त वर्ग | (त थ द ध न) | वैष्णवी |
| ६) प वर्ग | (प फ ब भ म) | वाराही |
| ७) य वर्ग | (य र ल व) | ऐंद्री किंवा इंद्राणी |
| ८) श वर्ग | (ष श स ह क्ष) | चामुंडा |

**विवरणात्मक टीपा :-**

**१) मातृभावसमापन्ना :-** हिला माता हा भाव प्राप्त होतो अर्थात् हिला माता म्हणण्याचे कारण असे आहे की, हीच वाच्य व वाचकरूपी जगत् घडवून आणते.

**२) महाघोरा :-** एकूण तीन शक्ती आहेत. १) घोरा २) घोरतरी अथवा महाघोरा ३) अघोरा. घोरा अर्थात् भयंकर शक्ती या संख्येने अनेक अथवा असंख्य असून त्या मनुष्यांना या जगातील सुखे प्रदान करून त्यांच्या आध्यात्मिक प्रगतीत अडथळे आणीत असतात. घोरतरी अथवा महाघोरा या सुद्धा असंख्य शक्ती असून त्या जगतात मन गुंतलेल्या मनुष्यांना भ्रमित करतात आणि त्यांना जास्तीत जास्त जगताकडे प्रवृत्त करतात. अघोरा या शक्ती मात्र जीवांना मुक्ती मिळविण्याच्या मार्गाकडे जाण्याला प्रवृत्त करतात.

**३) पीठ :-** पीठ याचा अर्थ बसण्याची जागा असा आहे. महाघोरादि शक्ती या पीठांच्या अधिपती असून त्यांचे राहण्याचे स्थान म्हणजेच मनुष्यांची इंद्रिये होत.

**४)** "अ"कारापासून "क्ष"कारापर्यंत जो अक्षरसमूह किंवा शब्दराशी आहे त्यापासून निर्माण झालेल्या ब्राह्मी, माहेश्वरी इत्यादि देवता किंवा कला आहेत. जरी आत्मा हा वस्तुतः अनियंत्रित व मर्यादातीत स्वातंत्र्याचा प्रतिप्रमाता असला तरी कलांनी म्हणजे शक्तींनी त्याचे वैभव नाहीसे केलेले असते.या कलांच्या किंवा शक्तिसमूहांच्या ताब्यात गेलेला जीव हा जरी मूळचा श्रीईश्वरस्वरूप असला तरी त्याला पाशबद्ध पशू असे म्हणतात.

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात यासंबंधी असे म्हटले आहे की -

**शब्दराशिसमुत्थस्य शक्तिवर्गस्य भोग्यताम्।**
**कलाविलुप्तविभवो गतः सन् स पशुः स्मृतः।।४.४५।।**

**अर्थ :-** शब्दराशीपासून अर्थात् "अ"कारापासून "क्ष"कारापर्यंतच्या वर्णसमुदायापासून निर्माण होणाऱ्या श्रीब्राह्मी, श्रीमाहेश्वरी इत्यादि देवतासमूहाच्या वशीभूत असलेल्या स्वतंत्र पतिप्रमात्याला किंवा श्रीपरमेश्वराला किंवा श्रीशिवांनाच "पशुप्रमाता" अर्थात् जीव असे नाव दिलेले आहे. पशुप्रमाता या कलासमूहाला वश होण्यामागील कारण असे आहे की, कलासमूहाने श्रीपरमेश्वराच्या असीम वैभवाला किंवा स्वातंत्र्याला पूर्णपणे नष्टभ्रष्ट केलेले असते.।।४.४५।।

वर उल्लेखिलेल्या ब्राह्मी व माहेश्वरी इत्यादि शक्तिदेवता पुरुषाचे अर्थात् आत्म्याचे जे मूळ स्वरूप आहे त्यावर आवरण घालण्यासाठी नेहमीच उद्युक्त असतात. हे आवरण विकल्पज्ञानाचे म्हणजे प्रत्ययोद्भवाचे असते; मात्र स्थूल किंवा सूक्ष्म शब्दांनी अनुस्मृत असल्याशिवाय विकल्पज्ञानाचा प्रत्यय किंवा निर्मिती होऊ शकत नाही.

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात यासंबंधी असे म्हटले आहे की -

**स्वरूपावरणे चास्य शक्तयः सततोत्थिताः।**
**यतः शब्दानुवेधेन न विना प्रत्ययोद्भवः।।४.४७।।**

**अर्थ :-** ही गोष्ट निश्चित आहे की, पूर्वी वर्णिलेल्या शक्ती या पुरुषाच्या किंवा आत्म्याच्या स्वरूपाला झाकून टाकण्यासाठी नेहमी उद्युक्त किंवा प्रयत्नशील असतात; कारण स्थूल व सूक्ष्म शब्दांनी अनुस्यूत झाल्याशिवाय-प्रत्ययोद्भव अर्थात् विकल्पज्ञानाची निर्मिती होऊ शकत नाही.।।४.४७।।१९।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

ही जी बाह्य उपाधींनी युक्त अशी अशुद्धविद्या आहे ती कशामुळे प्रेरित होते? यावर स्पष्टीकरण देताना श्रीशंकर "**कवर्गादिषु माहेश्वर्याद्याः**

**पशुमातरः ।।१९।।**" हे सूत्र सांगताना असे म्हणतात की, "क" वर्गादींच्या ठिकाणी असलेल्या माहेश्वर्यादिक पशुमातरांच्यामुळे अशुद्धविद्या प्रेरित होते." ।।८१-८१.५।।

सर्वात्मक अशा शब्दराशीचे जे कलामय स्वरूप पूर्वी सांगितले व जे पशूला म्हणजेच जीवाला ज्ञान उत्पन्न करण्याला साहाय्यक होते ते दोन प्रकारचे आहे. ।।८२-८३।।

ते दोन प्रकार म्हणजे बीज आणि योनी होत. त्यांपैकी बीज म्हणजे स्वतः श्रीशिव होत आणि योनी म्हणजे "क"पासून "क्ष"पर्यंत आठ वर्गांनी युक्त अशी माया नावाची शक्ती आहे. ।।८४।।

माहेश्वर्यादि अष्टक हे पर म्हणजे श्रेष्ठ आणि अपर म्हणजे कनिष्ठ असे फल देणारे आहे. हे पशूंना अर्थात् जीवांना मध्यस्थ करून बाह्यविषयांचे ज्ञान करून देते. ।।८५।।

त्याचप्रमाणे हे अष्टक संमिश्र फलाची आसक्ती उत्पन्न करते आणि विषयासक्त जीवांना अवनतीला नेणारे असते. त्यामुळे माहेश्वरी अष्टकाला घोर असे म्हटले आहे. ।।८६।।

हे अष्टक घोर किंवा घोरतर आहे. जे अघोर आहे ते श्रीशिवपद देणारे आहे. अशा प्रकारे हे मात्राष्टक अर्थात् आठ मातृका आहेत. त्यांपैकी प्रत्येक वर्ग हा तीन भेदांनी अथवा प्रकारांनी युक्त आहे. ।।८७।।

पूर्ववर्गात शाश्वत अशी श्रीभैरवता स्थित आहेच. ।।८७.५।।

**विवरण :-** श्रीशिवांशी अभिन्न स्वरूपात असणारी परावाक् इच्छादि तीन शक्तींना उत्पन्न करून "क"वर्गादि मातृकांना प्रकाशित करते. ती पशूंना विकल्पयुक्त ज्ञानावस्थेत आंतरिक स्थूल व सूक्ष्म शब्दांचे ज्ञान करून देते. तसेच "क" वर्गादिकांच्या अधिष्ठात्री ज्या माहेश्यादि शक्ती आहेत त्यांच्या साहाय्याने राग, द्वेष, काम व लोभादिकांना पशुचित्तात अर्थात् साधकभक्त-योगिशिष्यात पसरविते आणि त्या पशूंच्या म्हणजे जीवांच्या चित्तात देह म्हणजेच मी अशी भावना उत्पन्न करते. त्यामुळे इंद्रियांच्या द्वारा पसरणाऱ्या वृत्तीत घोरादि नामक माहेशी वगैरे माता अर्थात् शक्ती जीवांना आत्मविमुख बनवून त्यांच्यात विषयासक्ती उत्पन्न करतात. त्यामुळे त्या जीवांचे अधःपतन करतात; परंतु पती अर्थात् श्रीशिवांचे यथार्थ ज्ञान झाल्याने ज्यांचे संकुचितत्व नष्ट झाले आहे अशा ज्ञानी जीवांना त्या माता अर्थात् शक्ती आत्मज्ञानाचा अमृतमय रस अर्पण करतात आणि त्यांच्यामध्ये भेदज्ञानाचा किंवा देह

म्हणजेच आत्मा होय या ज्ञानाचा उगम कधीही होऊ देत नाहीत.।।१९।।

**विवरणात्मक टीप :- वर्णांचे अष्टवर्ग :-** क, च, ट, त, प हे पाच वर्ग, य वर्ग, श, ष व स हा श वर्ग, क्ष व ज्ञ हा क्ष वर्ग मिळून आठ वर्ग होतात. त्यामुळे हिला कादिक्षान्त अष्टवर्गिणी माया असे म्हटले आहे.।।१९।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

माहेश्वर्यादि देवता या "क"वर्गादिकांच्या अधिष्ठात्री देवता आहेत असे अध्याहृत घ्यावे. "**ज्ञानाधिष्ठानं मातृका।।१.४।।**" अर्थात् "मातृका या ज्ञानाज्ञानाच्या अधिष्ठात्री देवता म्हणजे शक्ती आहेत," असे या आधी सामान्यपणे सांगितले. या ठिकाणी विशिष्टत्वाने असे सांगतात की, "**क-वर्गादिषु माहेश्वर्याद्याः पशुमातरः।।१९।।**" अर्थात् "तत्त्वज्ञान प्राप्त झालेला सिद्धयोगीही एखाद्यावेळेला चुकून पशुजनांच्या अधिष्ठात्री असणाऱ्या माहेश्यादि देवतांकडून शब्दानुवेधनाद्वारा अर्थात् शब्दादिनिमित्ताने म्हणजे शक्तीच्या बहिर्मुखतेमुळे मोहित केला जातो."।।१९।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

ज्यावेळेला त्या शुद्धविद्यासंपन्न सिद्धयोग्याच्या शुद्धविद्येला किंचित् मलिनता येते त्यावेळी त्या सिद्धयोग्याला मोहित करण्यासाठी शक्ती कंबर बांधून सिद्ध होतात असे "**कवर्गादिषु माहेश्वर्याद्याः पशुमातरः।।१९।।**" अर्थात्।।७१।।

"क" वर्ग आदि अक्षरांमध्ये राहणाऱ्या, त्यांच्या अधिष्ठात्री देवता झालेल्या व मस्तकरंध्राच्या मध्यात बसणाऱ्या माहेश्वर्यादि देवता या।।७२।।

पशुरूप प्रमात्यांमध्ये म्हणजेच अज्ञानी जीवांमध्ये प्रवेश करून त्या त्या ज्ञानाच्या भूमीवर त्या त्या शब्दाने वेध करून जीवांना मोहित करतात म्हणून त्यांना पशुमाता म्हणतात," असे या सूत्रात कथन केले आहे.।।७३।।

या पशुमाता अथवा देवता जीवांच्या चिदानंदघन निजरूपावर आवरण घालतात किंवा झाकून टाकतात आणि जड अशा त्याचा शरीरादींबद्दलचा अभिमान वाढवितात व देहादि नाशवान वस्तूंबद्दलचे प्रेम मनात ठसवितात आणि।।७४।।

या देवता पशुप्रमाणे उन्मत्त झालेल्या साधकभक्तयोगिशिष्याला सामान्य माणसाप्रमाणे उन्मत्त व मोहित करून फसवितात. त्यामुळे सिद्धयोग्याने नेहमीच किंवा अखंडपणे सावध राहिले पाहिजे.।।७५।।

सामान्यतः या मातृका ज्ञानाचे अधिष्ठान अर्थात् ज्ञानाचा आधार आहेत असे मानले जाते; परंतु ज्याला यथार्थ तत्त्वाचे ज्ञान झाले आहे अर्थात् जो

आत्मज्ञानापर्यंत पोहोचलेला सिद्ध आहे त्याला चुकवून म्हणजेच त्याच्याकडून प्रमाद घडवून पशूंचे अधिष्ठान असणाऱ्या या मातांकडून तो सिद्धयोगी फसविला जातो.।।७६।।१९।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

"ज्यावेळेला सिद्धयोगी शुद्धविद्यातत्त्वात निमग्न अथवा पूर्ण बुडालेला असतो त्यावेळेला त्याला मोहविण्यासाठी माहेश्वर्यादि शक्ती प्रवृत्त होतात," हे **"कवर्गादिषु माहेश्वर्याद्याः पशुमातरः।।१९।।"** या सूत्रात सांगितले आहे.

"क" वर्गादींमध्ये शक्ती विद्यमान असल्याकारणाने "क" वर्गादींचे स्थानदेवित्व प्राप्त झालेल्या माहेश्वरीप्रभृती सांगितलेल्या "क" रंध्रचितिमध्यात राहणाऱ्या मातृशक्ती त्या त्या प्रत्यय किंवा अनुभवांच्या स्थानी प्रमातृरूप पशूंमध्ये प्रवेश करून त्या त्या शब्दांच्या अनुवेधाने किंवा संबंधाने मोहून टाकल्यामुळे पशुमाता होतात. ज्या शक्ती चिदानंदघन अशा निज स्वरूपावर झाकण घालतात आणि जड अशा शरीर आदींमध्येही स्वतःचे माहात्म्य पसरवितात त्या या शक्ती पशूंप्रमाणे प्रमत्त किंवा बेसावध सिद्धयोग्याला वश करून घेतात. त्यामुळे पूर्वी सांगितलेल्या रूपात त्यांचे वहित म्हणजे सिद्धयोगसाधनाभ्यासरत सिद्धयोग्याने ध्यान करावे. त्यामुळे **"ज्ञानाधिष्ठानं मातृका।।१.४।।"** अर्थात् "मातृका शक्ती या ज्ञानाज्ञानाच्या अधिष्ठात्री देवतारूप शक्ती आहेत," असे या सूत्रात हे सामान्यपणे सांगितलेच आहे; परंतु वरील सूत्रात असा विशेष सांगितला आहे की, श्रीपरमशिवतत्त्वाची प्राप्ती होऊनही प्रमाद करणाऱ्या सिद्धयोग्याला माहेश्वर्यादि पशुजनांच्या अधिष्ठात्री मातृशक्तींकडून शब्दांच्या संबंधाच्या द्वारा मोहविले जाते.

**विवरण :-** या सूत्राचा मागील पंधराव्या सूत्राशी संबंध जोडून सिद्धयोग-साधकयोगिशिष्याला व सिद्धाला सावध राहण्याविषयी सूचना दिली आहे.

"क" वर्गादींशी संबंधित माहेश्वर्यादि प्रभृति ज्या शक्ती आहेत त्या पशुभाव निर्माण करणाऱ्या आहेत. अविद्येपासून सावध राहण्याकरिता या सूत्राची आवश्यकता आहे; कारण बाह्य व आभ्यंतर जगताची सृष्टी शब्दामुळे होते आणि शब्द वैखरी वाणीचा विषय आहे. या शब्दाचा आधार वर्णमाला अर्थात् मातृका आहे. वर्णमालेमध्ये आठ वर्ग मानले आहेत. अवर्ग, कवर्ग, चवर्ग, टवर्ग, तवर्ग, पवर्ग, यवर्ग आणि शवर्ग हे ते आठ वर्ग होत. त्यांच्या शक्ती पुढीलप्रमाणे आहेत. माहेश्वरी, ब्राह्मी, कौमारी, वैष्णवी, वाराही, माहेंद्री,

चामुंडा आणि महालक्ष्मी. पाठांतरामध्ये काही काही जागी वैष्णवीच्या ऐवजी नारायणी, चामुंडेच्या ऐवजी नारसिंही आणि महालक्ष्मीच्या ऐवजी अपराजिता असे येते.

"**भावनोपनिषद्**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**कामक्रोधलोभमोहमदमात्सर्यपुण्यपापमया: ब्राह्म्यादि अष्ट शक्तय: ।।**

**अर्थ :-** काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, पुण्य व पाप यांनी युक्त असणाऱ्या या ब्राह्मी आदि आठ शक्ती आहेत.

या मातृदेवता म्हणजे प्रकट झालेल्या योगिनी होत. त्यांना पशुमातर: अर्थात् पशुमाता असे म्हणण्याचे कारण म्हणजे त्यांच्यामुळे जीव अथवा मनुष्य पशूंप्रमाणे पाशात बांधले गेले आहेत. माहेश्वर्यादि शक्ती जाग्या झाल्या असता त्या साधकभक्तयोगिशिष्याला काहीही आदेश देऊन बहकवितात अर्थात् त्याच्या ध्येयापासून विचलित करतात. साधकभक्तयोगिशिष्याने अशा आदेशांना सत्य मानून पथभ्रष्ट होऊ नये आणि आपल्या विवेकबुद्धीने काम घ्यावे.

सहजविद्या अर्थात् सिद्धयोगविद्या प्राप्त झाली असता सिद्धयोग्याने कधीही बेसावध किंवा निष्काळजी राहू नये; कारण त्याचे साधन अव्याहतपणे चालू राहिले असता त्याला जन्ममरणचक्रात परत यावे लागत नाही; परंतु या अवस्थेतही त्याचे पतन होऊ शकते. त्यामुळे त्याने कायम सावध राहिले पाहिजे. जोपर्यंत त्याच्या जन्मजन्मांतरीचे सर्व संस्कार पूर्णपणे धुतले जात नाहीत तोपर्यंत तो ज्या उच्च स्थानापर्यंत वर चढला आहे तेथून खाली येण्याची कायमची शक्यता असते. सर्वसामान्य जीवनाच्या काळात शब्दाच्या रूपात दबा धरून बसलेली अनेक आकर्षणे असतात. जर हा साधकभक्त-सिद्धयोगिशिष्य त्यांच्या प्रभावाखाली आला तर तो आकर्षणांमुळे दूषित होण्याला बाध्य होतो. जगामध्ये निश्चितच काही काळ्या शक्ती आहेत. त्या शब्दांद्वारा त्यांच्या आकृत्या अमलात आणीत असतात आणि त्यांचा मानवांच्या मनावर प्रचंड प्रभाव असतो. त्यामुळे साधकभक्तसिद्धयोगिशिष्याने कायम सावधच राहिले पाहिजे आणि इंद्रियांच्या आनंदाच्या विनंतीला अजिबात बळी पडता कामा नये. ।१९।।

### सूत्र क्रमांक २०

**संबंध :-** त्यामुळे वरती सांगितलेल्या युक्तींनी शुद्ध तत्त्व प्राप्त करून घेऊनही सिद्धयोग्याने जाग्रदादि सर्व चारही अवस्थांमध्ये सावधच राहिले

पाहिजे. त्यामुळेच त्याची चित्स्वरूपता नेहमी अखंड राहील. त्यासाठी त्याने पुढील सूत्रातील आदेशाचे अवलंबन केले पाहिजे.

**त्रिषु चतुर्थं तैलवदासेच्यम्।।२०।।**

शब्दार्थ :- **त्रिषु** - जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्थांत. **चतुर्थम्**- शुद्धविद्याप्रकाशरूप आत्म्याची चौथी तुरीय अवस्था. **तैलवत्** - तेलाप्रमाणे अर्थात् ज्याप्रमाणे तेल अधिकाधिक पसरत जाऊन ज्या पदार्थाच्या पृष्ठभागावर ते घातले असेल तो सर्व पृष्ठभाग व्यापते त्याप्रमाणे व्यापावे म्हणून. **आसेच्यम्** - शिंपडावे किंवा घालावे.

अर्थ :- ज्याप्रमाणे तेलाचा आश्रय असलेला पदार्थ व्यापण्यासाठी तेलाचा अखंड पुरवठा करतात त्याप्रमाणे म्हणजे तेलाप्रमाणे जागृत, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन अवस्थांमध्ये तुरीयावस्था ओतावी अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीने स्वतःसिद्ध-योगाचे साधन करून व सुषुम्नागामी होऊन सहस्रारात श्रीशिवांशी समरस होऊन प्राप्त केलेल्या श्रीशिवशक्तिसामरस्यसिद्धीने या अवस्था तुरीयावस्थेने व्यापाव्यात.।।२०।।

**विशेष व्याख्या** :- जाग्रत् आदि तीन अवस्थांमध्ये चौथी अवस्था ही शुद्धतत्त्वाचा प्रकाश असणारी तुर्यानंदरूप तेज असून ती तेलाप्रमाणे अधिक पसरविली पाहिजे. तीनही अवस्थांचा उदय आणि त्याचप्रमाणे त्या दशा शांत किंवा नष्ट होण्याच्या वेळेलाही आदि आणि अंतकोटीची मध्यदशा ग्रहण करून चिद्घनतेला व्याप्त केले पाहिजे. त्यामुळे चिद्घनरूप परमामृत समुद्रात तन्मयीभाव प्राप्त होतो.

पहिल्या उन्मेषाच्या "**जाग्रत्स्वप्नसुषुप्तेषु तुर्याभोगसम्भवः।।१.७।।**" या सूत्राने असे सूचित केले आहे की, विश्व संवित्च्या व्याप्तीचा अनुभव करण्यामध्ये "**उद्यमो भैरवः।।२. ५।।**" अर्थात् उद्यम म्हणजे जागृत कुंडलिनी शक्ती हाच उपाय आहे. या उपायामुळे साधकभक्तयोगिशिष्याला शक्तिचक्राच्या अनुसंधानाने जाग्रदादि अवस्थांच्या अंतर्गत खाताना, जाताना व झोपताना इत्यादि सर्व व्यवहारांमध्ये आत्मस्फुरणाच्या अनुभवाचा चमत्कार प्राप्त होतो. हीच तुर्यावस्था आहे.

नंतर "**त्रितयभोक्ता वीरेशः।।१.११।।**" या सूत्रातून शांभवोपायाला उपयुक्त असणाऱ्या हठपाकाच्या युक्तीने जाग्रदादींचा संहार दाखविला गेला आहे. अशा प्रकारच्या अनुभवाने युक्त असणारा सिद्धयोगी केवळ चिन्मात्रच

राहतो. तोच आपल्या संवित्साम्राज्यरूप वैभवात भेदजगताचा ग्रास करणाऱ्या वीरांमध्ये उत्तम वीर आहे; कारण तो प्रवणशील अंतःकरण त्याचप्रमाणे बहिष्करण यांचा अधीश्वर असतो.

परंतु तृतीय उन्मेषाच्या या सूत्रात आणवोपायाला उपयुक्त धारणेच्या युक्तीने जाग्रदादि तीन अवस्थांना तुर्यरूप रसाने शिंपडण्याच्या अभ्यासाकडेच संकेत केला आहे.।।२०।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

ज्याअर्थी असे आहे म्हणजेच पतन होण्याचे भय आहे त्याअर्थी पूर्वी सांगितलेल्या युक्तींनी प्राप्त झालेली शुद्ध विद्या नष्ट होऊ नये म्हणून सर्वही अवस्थांमध्ये साधकभक्तसिद्धयोगिशिष्याने सावध राहिले पाहिजे असे "**त्रिषु चतुर्थं तैलवदासेच्यम्।।२०।।**" अर्थात् "जागृत, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्थांमध्ये चौथी तुरीयावस्था तेलाप्रमाणे ओतावी," म्हणून या सूत्रात प्रतिपादिले आहे.

जागृत्यादि तीन अवस्थांमध्ये चौथे शुद्धविद्याप्रकाशरूप तुर्यानंदरसाने युक्त असे तेज तेलाप्रमाणे म्हणजेच ज्याप्रमाणे तेल हळूहळू अधिकाधिक पसरत जाऊन आपल्या आश्रयाला म्हणजे भांड्याला व्यापून टाकते त्याप्रमाणे या चौथ्या अवस्थेला मिसळवून टाकावे. तीन अवस्थांचा उन्मेष म्हणजे सुरुवात व उपशांती म्हणजे शेवट अशा प्रसंगी परिस्फुरण पावणाऱ्या तुर्यरसाने मध्यदशाही स्तंभनयुक्तीने भरावी. त्यामुळे तन्मयीभावाची प्राप्ती होते.

**विवरण :-** सर्व सृष्टीच्या आविर्भावाने युक्त असलेल्या उन्मेषाच्या जागरादि दशांचा आरंभ व शेवट यांचा प्रशम किंवा शेवट होत असल्याकारणाने उरलेल्या व सर्वांना व्यापणाऱ्या तुर्य प्रकाशाचा रस आस्वादिला जातो. त्यामुळे सृष्टिरूप उन्मेषही तुर्यरसाच्या दृढ अवधानाच्या अभ्यासाने तुर्यरसमय करावा असा याचा भावार्थ आहे.

"**जाग्रत्स्वप्नसुषुप्तिषु तुर्याभोगसम्भवः।।१.७।।**" या सूत्राने उद्यमशक्तिचक्रयुक्त तुर्यावस्थेची सत्ता सांगितली व "**त्रितयभोक्ता वीरेशः।।१, ११।।**" या सूत्राने शांभवोपायाला अनुरूप हठपाकयुक्तीने जागरादि उपसंहार सांगितला.

**विवरण :-** हठपाकक्रमः याचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे. हठेन म्हणजे क्रमातिक्रमरूपाने तत्काळ होणाऱ्या उपदेशादींनी युक्त अशा बलात्काराने जो पाक म्हणजे चिदग्नीचा साक्षात्कार होतो त्याच्या क्रमाने सृष्ट्यादि उपाधींचे

विलगन किंवा नाश होतो. ही युक्ती तीव्रतरशक्तिपाताचा अधिकारी असल्याने शांभवोपायाला विशेष अनुसरणारी आहे.

या सूत्राने मात्र आणवोपायाला योग्य असणाऱ्या स्तंभनयुक्तीने तलवारीच्या आच्छादक; पण तलवारीहून भिन्न भासणाऱ्या म्यानाप्रमाणे जागरादि तीन अवस्थांना तुर्यरसाने भिजवावे अर्थात् सर्व व्यावहारिक अवस्थांतूनही शुद्ध-विद्येचा अनुभव घ्यावा असा विशेष सांगितला आहे।।२०।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१)** ज्याप्रमाणे म्यान ही तलवारीहून वेगळी असते; पण ती तलवारीला तिच्यामध्ये पूर्णपणे धारण करू शकते त्याप्रमाणे जागरादि तीनही अवस्था चौथ्या तुर्य अवस्थेहून भिन्न असतात; परंतु तिच्या म्हणजे तुर्यावस्थेच्या दिव्य रसाने त्या पूर्णपणे भरलेल्या असतात व संतृप्त झालेल्या असतात.

**२) हठपाक :-** हठपाक म्हणजे साधकाच्या चैतन्याच्या आलेल्या अनुभवाचे एकमेव, दुराग्रही व सामर्थ्यवान् आकलनशक्तीने केलेले एकत्रि-करण होय.।।२०।।

**श्रीभट्टभास्काराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे ही शब्दराशी घोर, घोरतर व अघोर अशा तीन स्वरूपाच्या आठ वर्गांपासून उत्पन्न झालेली आहे.।।८८।।

या वर्णसमूहात उच्चारदृष्ट्या आदि, मध्य व अंत असे भेद आहेत. या भेदांमध्ये श्रीशिवता अभेदाने कशा प्रकारे असते हे सांगताना **"त्रिषु चतुर्थं तैलवदासेच्यम्।।२०।।"** अर्थात् "जागृत, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्थां-मध्ये चौथी तुर्यावस्था तेलाप्रमाणे व्यापून टाकावी," असे या सूत्रात कथन केले आहे.।।८९।।

या वर्णात्मक तीन भेदाने घोर, घोरतर व अघोर अशा मातृकाभेदाने जे शिल्लक राहतात ते चौथे पर श्रीशिव होत.।।९०।।

त्या श्रीशिवांचे अनुसंधान करावे. पाण्यामध्ये तेल मिळवावे त्याप्रमाणे ते श्रीशिवच सर्वांमध्ये निरंतरत्वामुळे शाश्वतसिद्धी प्राप्त करून देतात.।।९१।।

**विवरण :-** मागील सूत्रात वर्णन केलेल्या घोरादि नावांनी असलेल्या पशुप्रमातृकांकडून अधिष्ठित असणाऱ्या शक्तींना स्थूल व सूक्ष्म वर्णात्मक विकल्पांच्या आदि आणि अंती अधिष्ठानत्वाने असणाऱ्या चिद्रसाने परिसिंचन करावे अर्थात् चिद्रस शिंपडावा. या चिद्रसाच्या मिश्रणातील विशिष्टतेमुळे भेदज्ञान गळून जाते व ज्याप्रमाणे पाण्यावर तेलाचा थेंब पसरून सर्व व्यापून

टाकतो त्याप्रमाणे सर्व वर्णमातृका चिद्रसमय आहेत असे अनुसंधान राहते किंवा ठेवावे. त्यामुळे वर्णांचा बंधनरूप व्यापार नाहीसा होतो.।।२०।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**त्रिषु चतुर्थं तैलवदासेच्यम्।।२०।।**" या सूत्राने असे सांगितले आहे की, "ज्याप्रमाणे तेल पाण्यावर हळूहळू व क्रमाक्रमाने अधिकाधिक पसरत जात शेवटी पाण्याला व्यापून टाकते त्याप्रमाणे तीनही जाग्रत, स्वप्न व सुषुप्त्यादि अवस्थांमध्ये चौथी शुद्धविद्याप्रकाशरूप तुर्यानंदरसात्मक अवस्था किंवा तेज मिसळावे." जाग्रदादि तीनही पदांमध्ये उन्मेषउपशांत्यात्मक आद्यावस्था व अंत्यावस्था यांमध्ये परिस्फुरणाऱ्या तुर्यरसाने मध्यदशेतही अवष्टंभयुक्तीने साधकभक्तयोगिशिष्याने व्यापून जावे. त्यामुळे तन्मयीभाव म्हणजेच तुरीयत्व प्राप्त होते.।।२०।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

त्यामुळेच म्हणजे मागील सूत्रात सांगितलेल्या अध:पतनाच्या कारणामुळे जरी शुद्धविद्या प्राप्त झाली तरीही आपल्या चुकांमुळे ती परत नष्ट होऊ नये म्हणून बऱ्याच युक्तिप्रयुक्तींनी सदासर्वकाळ जागृत राहून त्या विद्येने म्हणजे सिद्धयोगसाधनेने युक्त असावे.।।७७-७८।।

ज्याप्रमाणे पूर्वी सांगितलेल्या जागरादि तीन अवस्थांमध्ये या आधीच्या सूत्रात सांगितलेला शुद्धविद्येचा प्रसार कायम ठेवला जातो त्याप्रमाणे "**त्रिषु चतुर्थं तैलवदासेच्यम्।।२०।।**" अर्थात् "जागृत, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्था तेलाप्रमाणे चौथ्या तुर्यावस्थेने व्यापून टाकाव्यात," या श्रीशिवांनी सांगितलेल्या सूत्रन्यायाने शुद्धविद्येचा प्रसार।।७९।।

तुर्यनामक चौथ्या अवस्थेतही ठेवावा. त्यामुळे या तीन, चार इत्यादि सर्व अवस्था शुद्धविद्यामय होतील म्हणजे या सर्व अवस्थांमधून शुद्धविद्या व्यापून राहील. ज्याप्रमाणे तेल स्वत:च्या आश्रयाला म्हणजे स्वाश्रयरूप भांड्याला हळूहळू काठोकाठ व्यापून टाकते त्याप्रमाणे।।८०।।

जाग्रदादि तीन अवस्थांच्या आदि व अंती स्पष्टता, स्फुरता व तुर्यानंदरसाने आर्द्रता येईल. मध्यदशा अर्थात् स्वप्नावस्थेतही ही शुद्धविद्या व्यापून राहील.।।८१।।

मागच्या जाग्रदादि सूत्रात सांगितल्याप्रमाणे सावधगिरीने उद्योगरत राहून शक्तिचक्राचे अनुसंधान ठेवणाऱ्या सिद्धयोग्याला।।८२।।

जाग्रदादि सर्व अवस्थांतून तुर्यानुभव येईल व शुद्धविद्या सर्वकाळी

जागृत राहील हे मागे सांगितलेच आहे.।।८३।।

"**त्रितयभोक्ता वीरेशः।।१.११।।**" अर्थात् "जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तीनही अवस्थांमध्ये अत्यंत श्रेष्ठ आत्मिक आनंदाचा उपभोग घेणारा इंद्रियांचा स्वामी होतो," इत्यादि सूत्राने शांभवोपाय प्राप्त केल्यामुळे हठयोगाचा परिणाम म्हणून जाग्रत, स्वप्न, सौषुप्त्यादि अवस्थांचा उपसंहार अर्थात् नाश होतो असे संबोधिले आहे.।।८४।।

या चालू सूत्रात आणवोपायाच्या युक्तीने पाकळ्यांप्रमाणे असणाऱ्या जाग्रदादि अवस्थांना तुर्यरसाने अर्थात् शुद्धविद्येने सिंचन करावे असा विशेष उपाय सांगितला आहे.।।८५।।२०।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

त्यामुळेच पूर्वी सांगितलेल्या युक्तींनी शुद्धविद्यारूप तत्त्व प्राप्त झालेल्या सिद्धयोग्यानेही तत्त्वाचा कोणत्याही प्रकारे नाश होऊ नये म्हणून सर्व अवस्थांमध्ये सावधानच राहिले पाहिजे असे "**त्रिषु चतुर्थं तैलवदासेच्यम् ।।२०।।**" अर्थात् "जागृत, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्था तेलाप्रमाणे चौथ्या तुर्यावस्थेने व्यापून टाकाव्यात," म्हणून या सूत्रात सांगितले आहे.

तीन म्हणजेच जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्थांमध्ये चतुर्थ म्हणजेच शुद्धविद्येच्या अभिव्यक्तिरूप तुर्यचमत्काराने युक्त धाम सिद्धयोग्याने अखंडपणे ओतले पाहिजे. ज्याप्रमाणे तेल क्रमाने पसरत पसरत स्वतःच्या आश्रयाला व्यापून टाकते त्याप्रमाणे जागृतादि अवस्थांमध्ये उन्मेषाला शांत करणाऱ्या व परिस्फुरण करणाऱ्या तुर्यानंदचिद्रसाने मध्यदशेलाही आर्द्र अर्थात् ओलसर करावे. त्यामुळे श्रेष्ठअमृतरूप संवित्समुद्रात तादात्म्यता प्राप्त होते अर्थात् विश्व किंवा सर्व सृष्टीच्या आविर्भावाने युक्त उन्मेषाची जाग्रतादि अवस्थांच्या आदि व अंताच्या वेळेला उपशांती होऊन उरलेल्या तुर्यप्रकाशाचाच रस आस्वादिला जातो. त्यामुळे सृष्टिरूप उन्मेषही त्या तुर्यरसाचा अवधानरूप दृढ अभ्यास केल्यामुळे तुर्यरसाने युक्त असे कार्य आहे. "**जागत्स्वप्नसुषुप्तेषु तुर्याभोगसम्भवः।।१.७।।**" अर्थात् "जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तीनही भिन्न अवस्थांमध्ये तुर्यावस्थेतील श्रीशिवानंद हा नित्य व अबाधित असतो." अशा प्रकारे पूर्वीच्या सांगितलेल्या विश्वोत्तीर्णतेचा अनुभव घेण्यासाठी उद्यम अथवा दृढ व निरंतर केला जाणारा साधनाभ्यास हाच एकमेव उपाय आहे. त्याचे प्रतिपादन "**उद्यमो भैरवः।।१.५।।**" अर्थात् "उद्यमरूप कुंडलिनी शक्तीच सिद्धयोगसाधनाने श्रीभैरव किंवा श्रीशिवरूप

होते," आदि सूत्रांमधून केलेले आहेच. या स्थितीत सिद्धयोगी उद्यमशक्ति-चक्राचे अनुसंधान करीत जागृतादि दशांमध्ये लौकिक सर्व व्यवहार करूनही चिद्घनाचा चमत्कार अनुभवीत असतो. हीच त्या सिद्धयोग्याची तुर्यावस्था आहे.

अशाच प्रकारे **"त्रितयभोक्ता वीरेशः।।१.११।।"** अर्थात् "जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तीनही अवस्थांमध्ये अत्यंत श्रेष्ठ आत्मिक आनंदाचा उपभोग घेणारा इंद्रियांचा स्वामी होतो," म्हणून या सूत्रात सांगितलेल्या शांभवोपायाच्या अनुरूप हठपाकाच्या युक्तीनुसार जागरादि अवस्थांचा शेवटही पुढे तुर्यावस्था प्राप्तीत होईल हे सूत्रकार श्रीशिव स्पष्टपणे प्रकट करतील.

त्यामुळेच प्रस्तुत सूत्रात आणवोपायाच्या क्रमानुसार तलवारीच्या कोशा-प्रमाणे जाग्रदादि तीन अवस्था तुर्यरसानंदाने ओतून टाकाव्या असा विशेष सांगितला आहे.

**विवरण :-** जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ती या तीनही अवस्थांना चौथ्या म्हणजे तुर्यावस्थेने तेलाप्रमाणे सिंचन केले पाहिजे. हे सूत्र आणि पुढची सूत्रे योग्य रीतीने समजण्यासाठी प्राणाचे स्वरूप समजणे आवश्यक आहे.

उपनिषदांचे वाचन केल्यानंतर असे स्पष्ट होते की, ब्रह्माच्या संकल्पाने सर्वप्रथम प्राण उत्पन्न होतो (यासाठी जिज्ञासू साधकांनी प्रश्नोपनिषद्, तिसरा प्रश्न तिसरी श्रुती, सहाव्या प्रश्नाची चौथी श्रुती, कठोपनिषदाच्या दुसऱ्या अध्यायातील तिसरी वल्ली आणि मंडुकोपनिषदाच्या पहिल्या खंडातली तिसरी श्रुती पाहावी.) आणि प्राणापासूनच सर्व विश्वाची निर्मिती होते हे लक्षात घ्यावे. अशा प्रकारे प्राणाचे विभू आणि अणू असे दोन प्रकार होतात. **"अणुश्च।। २.४.१३।।"** या ब्रह्मसूत्रावर भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्य असे म्हणतात की, "आधिदैविक हिरण्यगर्भरूपाने समष्टिप्राण विभू अर्थात् व्यापक आणि आध्यात्मिक रूपाने व्यष्टिप्राण अणू आहेत. उपरोक्त सांगितलेल्या श्रुतींमध्ये ब्रह्मापासून सर्वप्रथम उदय होणारा प्राण विभुप्राण आहे. तो विश्वाच्या सर्व तत्त्वांमध्ये परिणित होतो."

वर उदाहरणादाखल आलेल्या श्रुतींमध्ये मनाचे नाव येते; परंतु बुद्धीचे नाव येत नाही. यावरून असे प्रतीत होते की, हैरण्यगर्भ विभुप्राण समष्टि-बुद्धी आहे. त्यांना सांख्यतत्त्वज्ञानात महत्तत्त्व आणि कठोपनिषदात महानात्मा असे म्हटले आहे.

या दृष्टीने "श्री**ब्रह्मसूत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की, **"आनुमानिक-**

**मप्येकेषामिति चेन्न शरीररूपकविन्यस्तगृहीतेर्दर्शयति च।।१.४.१।।"** अर्थात् "जरी अनुमानकल्पित जडप्रकृतीही एका शाखेच्या मतात वेदप्रतिपादित आहे असे म्हटले असले तरी हे म्हणणे बरोबर नाही; कारण की, शरीरच येथे रथाच्या रूपात गृहीत धरून अव्यक्त शब्दाने व्यक्त केले आहे." ही गोष्ट श्रुतीने दाखविली आहे. या सूत्रावर भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्य यांनी असे म्हटले आहे की, "श्रुतींमध्ये जी सर्वप्रथम उत्पन्न होणारी हैरण्यगर्भ बुद्धी सांगितली आहे ती सर्व प्राण्यांच्या बुद्धीची पराप्रतिष्ठा आहे अर्थात् सर्वश्रेष्ठ स्थान किंवा आधारभूमी आहे." तिलाच येथे **"कठोपनिषद्"** या ग्रंथात महानात्मा असे म्हटले आहे.

**इन्द्रियेभ्यः परा ह्यर्था अर्थेभ्यश्च परं मनः।**
**मनसस्तु परा बुद्धिर्बुद्धेरात्मा महान्परः।।१.३.१०।।**
**महतः परमव्यक्तमव्यक्तात्पुरुषः परः।**
**पुरुषान्न परं किञ्चित्सा काष्ठा सा परा गतिः।।११।।**

**अर्थ :-** स्थूल इंद्रियाहून विषय श्रेष्ठ आहेत. ते सूक्ष्म व नित्यस्वरूप आहेत. विषयांपेक्षा मन श्रेष्ठ आहे. मनापेक्षा आत्मा हा श्रेष्ठ व महान् आहे. महत्पेक्षा अव्यक्त श्रेष्ठ आहे. अव्यक्ताहून पुरुष श्रेष्ठ होय. पुरुषापेक्षा अन्य काहीही श्रेष्ठ नाही आणि तोच श्रेष्ठत्वाची पराकाष्ठा आहे.।।१.३.१०-११।।

या श्रुतींवरून हे स्पष्ट होते की समष्टिप्राण आणि बुद्धी ही दोन्हीही महत्तत्त्वच आहेत. ते अध्यात्मस्तरावर अणुरूपाने वेगळेवेगळे प्रतीत होतात. त्यामुळेच प्राण आणि चित्त या दोन्हींचा पारस्पारिक घनिष्ट संबंध आहे. प्राणाच्या निरोधाने अर्थात् प्राणावरील संयमाने चित्ताचा निरोध आणि चित्ताच्या निरोधाने प्राणाचा निरोध होतो; कारण वरच्या पातळीवर दोन्ही एकच आहेत. जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ती या तीनही अवस्थांमध्ये चित्त आणि प्राण हे वेगवेगळे आहेत असे अनुभवावयाला येते; परंतु तुरीयावस्थेत म्हणजेच समाधी अवस्थेत ती दोन्ही एकच होतात. या सूत्रात तीनही अवस्थांना चौथ्या अवस्थेने सिंचन करावे याचा अभिप्राय अणुरूप चित्त आणि प्राण या दोघांच्या पृष्ठभूमीत विभू प्राणात्मा किंवा महानात्मा यांचा अनुभव करणे असा आहे.

हे सूत्र असे सांगते की, चौथी जी अवस्था आत्मिक चैतन्याची नैसर्गिक अवस्था आहे ती बाकीच्या तीनही अवस्थांमध्ये स्थिर ठेवावी. ही चौथी अवस्था सर्वसाधारणपणे जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ती यांच्या प्राथमिक आणि

अंतिम अवस्थांच्या मध्येच अनुभवावयाला येते; परंतु मधल्या स्थितीत ती सुटून जाते. हाच आणवाच्या द्वारा तुरीयावस्था प्राप्त करण्याचा अर्थ आहे. त्यामुळे हे सूत्र असे सांगते की, सिद्धयोग्याने सर्वदा सावधान राहावे आणि तुरीयावस्थेवरचे त्याचे नियंत्रण अजिबात सोडू नये म्हणजे तीनही अवस्थांच्या आदि, मध्य व अंत अशा तीनही अवस्थांमध्ये ती तुरीयावस्था झिरपत राहील.।।२०।।

**सूत्र क्रमांक २१**

**संबंध** :- आता या तीन अवस्थांमध्ये तुर्यरसाच्या सेचनाचा उपाय सांगत आहेत.

**मग्नः स्वचित्तेन प्रविशेत्।।२१।।**

**शब्दार्थ** :- **मग्नः** - निमग्न किंवा शरीर व प्राण इत्यादींमधील अहंरूपतेचे शमन करीत अविकल्प रूपात. **स्वचित्तेन** - अंतरात्म्याच्या विकल्परहित मनाने किंवा असंकुचित चितिशक्ती कुंडलिनीच्या द्वारा अर्थात् जागृत कुंडलिनी शक्तीच्या सुषुम्ना प्रवेशाने व तिच्या श्रीशिवरूपातील विकासाने. **प्रविशेत्** - प्रवेश करावा. अंतर्मुख झाले पाहिजे.

**अर्थ** :- साधकभक्तयोगिशिष्याने अंतरात्म्याच्या अंतरंगात विकल्प-रहित मनाने जाणीवपूर्वक प्रवेश करावा अर्थात् चित्त म्हणजे श्रीशिवपदा-वरून खाली उतरून संकुचित झालेली जीवरूप कुंडलिनी शक्ती श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेने जागृत करून घेऊन व तिचा सिद्धयोगसाधनाने सुषुम्नेत प्रवेश होऊ देऊन शेवटी सहस्रारात श्रीशिवसामरस्य प्राप्त करून घेऊन तेथेच मग्न व्हावे अर्थात् असंकुचित चितिद्वारा म्हणजे श्रीशिवरूपाशी सहस्रारात तादात्म्यता प्राप्त केलेल्या ज्ञानाने शरीर व प्राण इत्यादींमध्ये अहंरूपतेचे शमन करीत अविकल्परूपात अंतर्मुख झाले पाहिजे.।।२१।।

**विशेष व्याख्या** :- तुर्य दशेमध्ये प्रवेश करण्याचा प्रकार "**श्रीमृत्युञ्जय-भट्टारक**" अर्थात् "**श्रीनेत्रतंत्र**" या तंत्रग्रंथात पुढीलप्रमाणे सांगितला आहे.

**प्राणादिस्थूलभावं तु त्यक्त्वा सूक्ष्ममथान्तरम्।**
**सूक्ष्मातीतं तु परमं स्पन्दनं लभ्यते यतः।।८.१२।।**

**अर्थ** :- अभ्यासकाळाच्या आरंभी प्राणादि स्थूल भावांचा म्हणजे प्राणा-याम, ध्यान व धारणादींचा परिपाक झाल्यानंतर सिद्धयोगी त्या टाकून देतो. त्यानंतर सूक्ष्म भावात प्रवेश करून मध्यपथाने म्हणजे सुषुम्नामार्गाने तो सूक्ष्मातीत दशेचा अनुभव करतो. ही अवस्था प्राणाच्या आलंबनाच्याही

अर्थात् आधाराच्याही पलीकडची अर्थात् श्रेष्ठ असते; कारण या दशेमध्ये चित्स्फाररूप अर्थात् चैतन्याच्या स्फुरणरूप रसाचा परस्पंदच शिल्लक असतो.

याला मत्स्योदरी दशा असे म्हणतात. या दशेमध्ये सिद्धयोग्याच्या संपूर्ण शरीरात स्पंदतत्त्वाचा उदय होतो अर्थात् किंचित् स्फुरण होते. प्राणाचे चालन होत नाही.

पुढे असे म्हटले आहे की -

"**प्रविशेत्तत्स्वचेतसा।।**" अर्थात् त्या दशेत सिद्धयोगी तादात्म्यभावानेच शुद्धात्म्यात स्थिती प्राप्त करून बोधमात्र अर्थात् ज्ञानस्वरूप श्रीशिवांशी संयोग करून घेतो. हीच गोष्ट या सूत्रात सांगताना असे म्हटले आहे की, सिद्धयोगी हा ज्यावेळेला प्रमेयादि सर्व गोष्टींचा त्याग करून प्रमातृचित्ताने आपल्या स्वरूपात मग्न होतो त्यावेळेलाच या सिद्धयोग्यात तुर्यदशेचा प्रादुर्भाव होतो. रेचक, पूरक व कुंभक यांनी युक्त असे प्राणायाम, धारणा, ध्यान आदि स्थूल उपाय आहेत. या अवस्थेत सिद्धयोगी हा हे सर्व स्थूल उपाय ओलांडून पुढे गेलेला असतो. शुद्ध अंतःकरणात तो अत्यंत सूक्ष्म अशा मध्यपथाच्या द्वारा परप्रमात्याच्या अंतर्विमर्शाचे आस्वादन करतो. या अविकल्प अवस्थेत शरीर, प्राण आदि प्रमातृता अर्थात् अहंरूपता किंवा अभिमानरूपता किंवा मी देह आहे अशी जाणीव गळून जाते.

"**श्रीविज्ञानभैरव**" या तंत्रग्रंथात श्रीमहादेव भगवती श्रीपार्वतीला या तुर्यदशेच्या प्राप्तीच्या विषयासंबंधी असे सांगतात की -

**मानसं चेतना शक्तिरात्मा चेति चतुष्टयम्**
**यदा प्रिये परिक्षीणं तदा तद्भैरवं वपुः।।१३८।।**

**अर्थ :-** हे प्रिय पार्वती! ज्या अवस्थेत सिद्धयोग्याच्या मन, बुद्धी, प्राणापान शक्ती आणि जीवात्मभाव अर्थात् परिमित किंवा संकुचित प्रमाता नष्ट होतो अर्थात् त्याला चित्ताच्या चमत्कार दशा प्राप्त होतात. त्याच दशेत सिद्धयोगी श्रीभैरवस्वरूप किंवा श्रीशिवसायुज्य होतो.

श्रुतींमध्येही असे म्हटले आहे की -

**यदा पञ्चावतिष्ठन्ते ज्ञानानि मनसा सह।**
**बुद्धिश्च न विचेष्टति तमाहुः परमां गतिम्।।**
**।। कठोपनिषद् २.३.१०।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला सिद्धयोग्याची ज्ञानेंद्रिये व मन आत्म्यात विश्रांत होतात आणि बुद्धी कोणत्याही प्रकारे विचलित होत नाही, त्या तुर्य अवस्थेला

परमगती असे म्हणतात.।।२.३.१०।।

या तुर्यावस्थेचे "**श्रीज्ञानगर्भस्तोत्रात**" खूप सुंदर वर्णन केले आहे.

**विहाय सकलाः क्रिया जननि! मानसीः सर्वतो**
**विमुक्तकरणक्रियानुसृतिपारतन्त्र्योज्वलम्।**
**स्थितैस्त्वदनुभावतः सपदि वेद्यते सा परा।**
**दशा नृभिरतन्द्रितासमसुखामृतस्यन्दिनी।।**

**अर्थ :-** हे माता संविद्देवी कुंडलिनी! विकल्प, स्मृती आदि सर्व प्रकारच्या क्रियांचा सर्व प्रकारांनी त्याग करून आणि परतंत्र साधनांच्या अर्थात् ऊर्ध्वरेचक आणि मुद्राबंधनांच्याद्वारा विकासातून मुक्त होऊन सिद्ध-योगिजन शांभवोपायाच्या समावेशाने सदा सावधान अर्थात् अतंद्रित राहून अनुपम सुखरूप व अमृतप्रवाहयुक्त अशा त्या अनुत्तर परादशेचा आपल्याच अनुग्रहरूप इच्छेने तत्क्षणी अनुभव येतात.।।२१।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

आता जागृत्यादि दशांमध्ये तेलाप्रमाणे आसेचन कसे करावे? या-संबंधीचा उपाय "**मग्नः स्वचित्तेन प्रविशेत्।।२१।।**" अर्थात् "स्वतःच्या जागृत कुंडलिनी शक्तिद्वारा सिद्धयोगसाधनाने सुषुम्नागामी होऊन सहस्रारात श्रीशिवांशी सामरस्य प्राप्त करून मग्न व्हावे," असे म्हणून या सूत्रात प्रति-पादिला आहे.

**प्राणादिस्थूलभावं तु त्यक्त्वा सूक्ष्ममथान्तरम्।**
**सूक्ष्मातीतं तु परमं स्पन्दनं लभ्यते यतः।।श्रीनेत्रतंत्र८.१२।।**

**अर्थ :-** प्राणायामादि रेचक, पूरक व कुंभक इत्यादि स्वभावाच्या स्थूल क्रिया टाकून सूक्ष्म म्हणजे स्थूलानंतर असणाऱ्या आंतरिक अर्थात् सुषुम्ना नाडीतून होणाऱ्या रेचन व आचमनादि रूपाच्या क्रियांनी सूक्ष्मातीत अर्थात् प्राणाशिवाय आधीच्या चित्स्फुरणयुक्त परमश्रेष्ठ अशा स्पंदनांचा लाभ होतो.

असा आरंभ करून

**...................प्रविशेत्तत्स्वचेतसा।**

**अर्थ :-** स्वचित्ताने प्रवेश करावा.

असा "**श्रीमृत्युजिद्भट्टारक**" अर्थात् "**श्रीनेत्रतंत्र**" या ग्रंथात शेवट केला आहे. त्याप्रमाणे प्राणायाम, ध्यान व धारणा इत्यादि स्थूल अथवा बाह्य उपायांचा त्याग करून स्वचित्ताने म्हणजे विकल्प, विचाररहित, अंतर्मुख व आंतरज्ञानचमत्कारयुक्त संवेदनाने समावेश करावा.

**विवरण** :- प्रकाशणे या धर्माच्या संकुचित पावण्याच्या उत्सुकतेचा त्याग करून असंकुचित अर्थात् अमर्यादित किंवा पूर्ण अशा चितिरूपाने प्रवेश करावा. "**तत्संवेदनरूपेण तादात्म्यप्रतिपत्तितः ।।३.२८।।**" अर्थात् "त्या संवेदनरूपाने तादात्म्याचा अनुभव घ्यावा," असे "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात संगितल्याप्रमाणे पहिल्यांदा शिष्यात्म्याला स्वात्म्यात समरस करून, समनापर्यंतच्या अवस्थांना ओलांडून, शुद्धात्म्यात स्थिती बांधून व बोधरूप किंवा ज्ञानरूप अविकल्पसंवित्स्पर्शानेच उन्मनाशक्तीच्या प्रवेशापाठोपाठ असणाऱ्या प्रमुख शक्तींना श्रीशिवांमध्ये योजावे.

असा समावेश होताना शिष्याची स्थिती कशी असावी? हे सांगताना असे म्हटले आहे की, शिष्याने मग्न होऊन म्हणजेच शरीरप्राणादि प्रमातृतेला अर्थात् मीच शरीरप्राणादि आहे अशा अहंतारूप ज्ञानाला चित्चमत्काररसात बुडवून शांत करून मगच श्रीशिवांमध्ये प्रवेश करावा.

याविषयी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**व्यापारं मानसं त्यक्त्वा बोधरूपेण योजयेत्।**
**तदा शिवत्वमभ्येति पशुर्मुक्तो भवार्णवात्।।**

**अर्थ** :- मनाविषयीचे सर्व व्यापार टाकून त्या मनाला ज्ञानाशी निगडीत करावे. असे केले म्हणजे श्रीशिवत्व प्राप्त करून घेऊन जीव भवसागरातून मुक्त होतो.

"**श्रीविज्ञानभट्टारक**" या ग्रंथातही याविषयी असे म्हटले आहे की -

**मानसं चेतना शक्तिरात्मा चेति चतुष्टयम्।**
**यदा प्रिये परिक्षीणं तदा तद्भैरवं वपुः।।**

**अर्थ** :- मानस म्हणजे संकल्प, चेतना म्हणजे बुद्धी, शक्ती म्हणजे प्राण व आत्मा या सर्वांनी युक्त परिमितप्रमात्याच्या म्हणजे संकुचित जीवात्म्याच्या या चार गोष्टी ज्यावेळेला क्षीण होतात म्हणजे चिच्चमत्कारत्वाला प्राप्त होतात त्यावेळेला त्याचे शरीरच श्रीभैरवरूप बनते.

हेच सांगताना "**श्रीज्ञानगर्भस्तोत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**विहाय सकलाः क्रिया जननी मानसीः सर्वतो।**
**विमुक्तकरणक्रियानुसृतिपारतन्त्र्योज्ज्वलम्।**
**स्थितैस्त्वदनुभावतः सपदि वेद्यते सा परा।**
**दशा नृभिरतन्द्रितासमसुखामृतस्यन्दिनी।।**

**अर्थ** :- हे जननी! विचार व स्मरण आदि प्रकारच्या सर्व मानसी क्रिया

तसेच करण म्हणजे दिव्यकरण नावाच्या ऊर्ध्वरेचकादि मुद्रादि खटपटींना टाकून, तुझ्या प्रभावाने प्रभावित होऊन राहिलेल्या सिद्धयोग्यांकडून सदैव अनुपमेय सुखामृताचा वर्षाव करणारी अवस्था निरसलपणे उपभोगिली जाते. अशा प्रकारे शांभवोपायाच्या समावेश झालेल्या सिद्धयोग्याकडून अनुत्तर आनंददशा अनुभविली जाते.

असे आमच्या श्रीपरमगुरूंनी आवर्जून सांगितले आहे.।।२१।।

(हे श्रीपरमगुरू म्हणजे श्रीभट्टकल्लटाचार्यांचे श्रीसद्गुरू श्रीमन्महामाहेश्वराचार्यवर्य श्रीअभिनवगुप्तपादाचार्य होत.)

**विवरणात्मक टीप :- बोधरूपेण :-** फक्त बोधाच्या रूपानेच. श्रीक्षेमराजाचार्य "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथातील या श्लोकावरील त्यांच्या टीकेत असे म्हणतात की, "याचे पुढीलप्रमाणे स्पष्टीकरण देता येईल."

"**अविकल्पसंवित्स्पर्शनेनैव।।**" अर्थात् "विकल्प अथवा विचाररहित अशा संवित् अथवा चैतन्याच्या स्पर्शानेच जेथे जेथे विकल्प अथवा विचार असतात तेथे तेथे मनाची क्रिया असतेच. ज्यावेळेला विचारच नसतात त्यावेळेला मन मौनाच्या पातळीवर येते. अशा मनानेच एखाद्याला श्रीशिवांशी सामरस्य प्राप्त करता येते."।।२१।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

या वर्णांमध्ये प्रवेश करण्याचा उपाय कोणता? यासंबंधी "**मग्नः स्वचित्तेन प्रविशेत्।।२१।।**" अर्थात् "स्वतःच्या जागृत कुंडलिनी शक्तिद्वारा सिद्धयोगसाधनाने सुषुम्नागामी होऊन सहस्रारात श्रीशिवांशी सामरस्य प्राप्त करून मग्न व्हावे," असे या सूत्राने सांगितले आहे.।।९१.५।।

पूर्ववृत्तींच्या उदयानुरूप प्रवृत्त होण्याऱ्या सर्वव्यापक परमेश्वराची जी बाह्यविषयाकार वृत्ती असते तिचा प्रत्याहार अर्थात् त्या वृत्तींना अंतर्मुख करून त्या प्रवृत्ती शांत झाल्यानंतर आत्म्यात निमग्न व्हावे.।।९२,९३।।

अशा प्रकारे प्रवृत्ती शांत झाल्यानंतर एका क्षणामध्ये स्वचैतन्याने श्रीशिवता येते. ज्याप्रमाणे कोळशात अग्नी शिरतो त्याप्रमाणे श्रीशिवरूप प्राप्त झालेल्या सिद्धयोग्याने वर्णांमध्ये बाहेरून आत प्रवेश करावा.।।९४।।

परत श्रीभैरवमुद्रेनेच मंत्रांना अनुप्रमाणित करावे. या योगाने केवळ मंत्रानुप्राणन होते असे नसून परशरीरामध्ये अनुप्रवेशही साधतो.।।९५।।

अशा प्रकारे मंत्रांना श्रीशिवता व श्रीभैरवता आहे हे स्पष्ट आहे व ती श्रीशिवभैरवता स्फुरणही पावते; कारण वर्णरूप मंत्र हा श्रीईश्वरच आहे.

।।९६।।

**विवरण :-** बाह्य इदंतेचे औन्मुख्य किंवा प्रवृत्तींची इच्छा करणारा चिन्नाथ हा व्यक्त होण्याला उद्युक्त झालेल्या दृक्क्रियाशक्तीने युक्त असल्यामुळे ही जी अर्थापासून छुरित अर्थात् भ्रमण करणारी वृत्ती आहे तिचे प्रत्याहरण करून साधकभक्तयोगिशिष्याने अंगारवह्निन्यायाने अविकल्पसंवित्तीने अर्थात् विकल्परहित परिपूर्ण जागृत कुंडलिनी शक्तीच्याद्वारा वर्णानुप्रवेश करावा. वर्णानुप्रवेशात संसिद्ध असणाऱ्या श्रीभैरवमुद्रेने मंत्रादींचे अनुप्रमाणनही सिद्ध होईल असा याचा भावार्थ आहे.।।२१।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**मग्नः स्वचित्तेन प्रविशेत्।।२१।।**" या सूत्राद्वारा श्रीशिवांनी असे कथन केले आहे की, "योग्याने शरीरादिकांची प्रमातृता घालवून अविकल्प-चित्ताने म्हणजेच चित्तात कोणत्याही प्रकारचे विकल्प किंवा विचार न आणता समावेश करावा."।।२१।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

तुर्यावस्थेत अमृताचे सिंचन होण्यासाठी आणखी एक उपाय "**मग्नः स्वचित्तेन प्रविशेत्।।२१।।**" अर्थात् "स्वतःच्या जागृत कुंडलिनी शक्तिद्वारा साधकभक्तयोगिशिष्याने सिद्धयोगसाधनाने सुषुम्नागामी होऊन सहस्रारात श्रीशिवांशी सामरस्य प्राप्त करून मग्न व्हावे," असे म्हणून सांगतात.।।८६।।

विविध कल्पनांनी म्हणजे रेचक व पूरकादींनी युक्त स्थूल प्रकारच्या प्राणायामादि उपायांचा त्याग करून कोणताही विकल्प किंवा विचार नस-णाऱ्या चित्ताने व स्वबुद्धीने।।८७।।

ज्यात अंतर्मुखरूप चमत्कार भरलेला आहे अशा तुर्यानुभवाच्या रसात बुडून जावे व स्वदेहइंद्रियादिकांविषयीची प्रमातृता अर्थात् हा आपला देह आहे अशा प्रकारचा जीवभाव।।८८।।

या रसात शमवून साधकभक्तयोगिशिष्याने तुर्यावस्थेचा अनुभव घ्यावा म्हणजे त्यात स्वतःचा समावेश करावा.।।८८.५।।२१।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

आता "**मग्नः स्वचित्तेन प्रविशेत्।।२१।।**" अर्थात् "स्वतःच्या जागृत कुंडलिनी शक्तिद्वारा साधकभक्तयोगिशिष्याने सिद्धयोगसाधनाने सुषुम्नागामी होऊन सहस्रारात श्रीशिवांशी सामरस्य प्राप्त करून मग्न व्हावे," असे म्हणून या सूत्रात जागरादि अवस्थांमध्ये तुर्यामृतरस कसा ओतावा याचा उपाय

सांगत आहेत.

रेचक, पूरक व कुंभक यांनी युक्त प्राणायामादि विकल्परूप स्थूल किंवा बाह्य उपायांचा त्याग करून योगनिष्ठ पुरुषाने स्वतःच्या चित्ताच्या साहाय्याने म्हणजेच अविकल्प म्हणजेच कोणत्याही कल्पनांनी विरहित अंतर्मुखपरामर्शाच्या चमत्काररूप चिदानंदघन अशा स्वात्मरसाने स्वचैतन्यशक्तीत प्रवेश करावा. **"तत्संवेदनरूपेण तादात्म्यप्रतिपत्तितः।।३.२८।।"** अर्थात् "त्या संवेदनरूपाने तादात्म्याचा अनुभव घेऊन"..... असे श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी **"श्रीस्पंदशास्त्र"** या ग्रंथात सांगितलेल्या नीतीनुसार प्रथम स्वतःच्या अंतरात निवास करणाऱ्या आत्म्याला समरस करून, समना अवस्थेला पार करून, संवित् शक्तीमध्ये स्थिती दृढ करून, संवित्-ज्ञानयुक्त होऊन व अविकल्प ज्ञानाच्या स्पर्शानेच अनुप्रवेशप्रमुख अर्थात् प्रवेश करण्याला अत्यंत उत्सुक असणारी अनुत्तर किंवा सर्वश्रेष्ठ अशी उन्मनीशक्ती श्रीपरमशिवस्वरूपात योजावी किंवा स्थिर करावी.

मग्न म्हणजेच स्वदेहप्राणादि म्हणजे हा माझा देह, प्राण आदि प्रमातृभाव शांत करून चिदानंदरसरूप समुद्रात अविकल्प किंवा विकल्परहित भावनेने प्रवेश करावा.

त्याचप्रमाणे **"श्रीस्वच्छंदतंत्र"** या ग्रंथात असे प्रतिपादिले आहे की -

**व्यापारं मानसं त्यक्त्वा बोधरूपेण योजयेत्।**
**तदा शिवत्वमभ्येति पशुर्मुक्तो भवार्णवात्।।**

**अर्थ** :- सर्व मानस व्यापार टाकून देऊन बोधरूपाने अर्थात् ज्ञानरूपाने चित्ताला स्वस्वरूपात योजावे असे केले म्हणजे त्यावेळेला सिद्धयोग्याला श्रीशिवावस्थेची प्राप्ती होते व तो पशू अथवा जीव संसाररूपी सागरातून मुक्त होतो.

**विवरण** :- विसावे सूत्र चौथी तुरीय अवस्था किंवा आत्मचैतन्याची जाणीव स्थिर ठेवण्यासाठी ध्यान व धारणा या साधनांनी युक्त असणारा आणवोपाय सांगते.

एकविसावे सूत्र शाक्तोपायाबद्दल सांगते. या शाक्तोपायाच्या मदतीने एखादा सिद्धयोगी आपले मन शांत करून, आत्मचैतन्याच्या केवळ जाणिवेने आपले शरीर, प्राण आदींपासून स्वतःला अलग करून एकदम चौथ्या अवस्थेत उडी मारू शकतो. ज्याप्रमाणे एखादे बाळ आपल्या मातेच्या कुशीत शांतपणे झोपलेले असते त्याप्रमाणेच हा सिद्धयोगी त्या अलौकिक चैतन्याच्या गूढ

स्थानी तीव्र वेगाने प्रवेश करतो.।।२१।।

### सूत्र क्रमांक २२

**संबंध :-** अशा प्रकारे परमपदात प्रवेश केलेल्या सिद्धयोग्याच्या विविध अवस्थांमधल्या अभ्यासाचे वर्णन केले. हा त्याच्या विश्वोत्तीर्ण म्हणजेच विश्वाच्या पलीकडच्या अवस्थेचा अनुभव आहे. आता सूत्रकार सिद्धयोग्याला येणाऱ्या विश्वमय अवस्थेचा अनुभव सांगण्यासाठी व्युत्थान दशेतील त्याच्या या अवस्थांचा निर्णय करीत आहेत अर्थात् प्रवेशदशेचे वर्णन करून आता प्रसरदशेचे वर्णन करीत आहेत. या दोनही दशांमध्ये तो सिद्धयोगी स्वरूप-लाभनिष्ठ अर्थात् स्वरूपाचा लाभ मिळवून स्थिरच राहतो.

**प्राणसमाचारे समदर्शनम्।।२२।।**

**शब्दार्थ :- प्राण** - प्राणाचा अर्थात् प्राणरूप कुंडलिनी शक्तीचा. **समाचारे** - ज्यावेळी सावकाश पण योग्य मार्गाने व समरूपाने हळूहळू प्रसार होतो त्यावेळी. **सम** - चिदानंदघनात्मक अशा दृष्टीने एकरूप. **दर्शनम्** - संवेदन किंवा अनुभव होतो.

**अर्थ :-** ज्यावेळी सिद्धयोग्याचा प्राणवायू अर्थात् कुंडलिनी शक्ती सावकाश व योग्य मार्गाने हळूहळू प्रसरण पावते म्हणजे तुर्यावस्थेत सुषुम्ना नाडीतून वाहणारी प्राणवायुरूप कुंडलिनी शक्ती त्या तुर्यावस्थेतून व्युत्थान झाल्यावर नेहमीप्रमाणे इडापिंगला नाड्यातून वाहू लागते त्यावेळी सर्व जाग्रतादि दशां-मध्ये तुर्यावस्थेतील आपण व विश्व चिदानंदघन व एकरूप आहोत या जगदानंदाची जाणीव राहते. तो जगदानंद नाहीसा होत नाही.।।२२।।

**विशेष व्याख्या :-** तुर्यरसामुळे सिद्धयोग्याचा प्राण श्रीपरमेश्वराच्या शक्तिस्फाराच्या सुगंधाने युक्त होतो. त्याच्या सर्व वासनाग्रंथींचे भेदन झालेले असते अर्थात् त्याच्या सर्व वासना नष्ट झालेल्या असतात. ज्यावेळेला या कुंभकभावाने प्राण हळूहळू आणि समान प्रमाणात बहि:प्रसर करू लागतो त्यावेळेलाही सिद्धयोगी त्या सुगंधाने युक्त आनंदाचा अनुभव करीत असतो. अशा प्रकारे तो रोजचे व्यवहार करीत असूनही सर्व अवस्थांमध्ये चिदानंदघनरूप असतो. व्यवहारातही त्याला अभेददृष्टीचा आनंद मिळत असतो. यालाच निर्व्युत्थान समाधीचा साक्षात्कार असे म्हणतात; कारण तुर्य दशेतून बाहेर येऊन त्या सिद्धयोग्याचे निमेष अर्थात् लयाच्या प्रसंगी प्राणरोध अर्थात् समाधी आणि उन्मेषात प्राणप्रवाह म्हणजे व्युत्थान राहत असते. यालाच तुर्यातीतपद असे म्हणतात.।।२२।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा रीतीने परमपदात प्रविष्ट झालेल्या सिद्धयोग्याच्या वस्तूच्या माहात्म्यामुळे म्हणजेच विसर्गधाम अशा चित्सूर्याच्या बाहेर चित्रविचित्रसृष्टी उत्पन्न करून आपल्या किरणसमूहांना पसरविण्याची उत्सुकता असण्याच्या स्वभावामुळे मनाचे प्रसरण होते. त्यावेळेला त्या सिद्धयोग्याचे समदर्शन बिघडत नाही हे "**प्राणसमाचारे समदर्शनम्।।२२।।**" या सूत्राद्वारा श्रीशिवांनी कथन केले आहे.

परमस्फुरणरूप शाक्तपरिमलाने अर्थात् सुगंधाने सुसंस्कृत अशा प्राणाने विकसित झालेल्या सर्व ग्रंथींच्या आंतरआधारबलामुळे अर्थात् जेथे विश्वात पाशयुक्त ग्रंथी आत्मसात् केल्या जातात, तशा प्रकारच्या आंतरस्वरूपाच्या आलंबन किंवा आधारबलामुळे किंचित् बाह्यस्थितीत मंद मंद असे प्रसरण होत असताना चिदानंदघनतेने एकरूप असे संवेदन होते अर्थात् सर्व अवस्थांमध्ये सिद्धाला चिदानंदाचा अनुभव येतो.

**विवरण :-** ही जी जीवनरूप चैतन्यस्थिती आहे तीच सामान्यस्पंदरूप होऊन अचेतन प्राणाला चेतनत्व देणारी आहे. "मी" या विकल्पज्ञानाने युक्त प्राणादींच्या विशिष्ट रूपाने ती पाच प्रकारची होते. त्यामुळे प्राणादि प्रसरणाची उपजीव्य अर्थात् आश्रयदात्री वर्तमान स्थितीत असणारी जागरादिकातील तुर्यातीत दशा असते. अन्यथा तुर्य व त्यापलीकडल्या अवस्थांच्या व्युत्थानाची सिद्धी होत नाही. प्राणवृत्ती असल्यामुळेच सिद्धयोग्यांकडून व्युत्थान केले जाते. त्यामुळे हेय अर्थात् त्याज्य अशा प्राथमिक तीन अवस्थांमध्ये ती चौथी तुर्य अवस्था चिदात्मभावाने संवेदिली जाते अर्थात् जाणली जाते.

यासंबंधी "**श्रीमदानंदभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**उत्सृज्य लौकिकाचारमद्वैतं मुक्तिदं श्रयेत्।**
**स समं सर्व देवानां तथा वर्णाश्रमादिके।।**
**द्रव्याणां समतादर्शी स मुक्तः सर्वबन्धनैः।।**

**अर्थ :-** समस्त लौकिक व्यवहारांचा त्याग करून जो मुक्तिप्रद अद्वैताचा आश्रय करतो तो सर्व देवांना म्हणजेच श्रीसदाशिव, श्रीईश्वर, श्रीअनंत व श्रीरुद्रादि देवतांना, ब्राह्मणादि वर्ण, ब्रह्मचर्यादि आश्रम, दूधमद्यादि द्रव्ये व चांडालादि या सर्वांना सारखेच पाहतो व सर्वबंधनातून मुक्त होतो.

त्यामुळेच "**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**बुद्धिप्राणप्रसरेऽपि बाह्यदेशाद्युपादानाना-**

हितसङ्कोचानां विश्वात्मस्वरूपलाभ एव।।

**अर्थ :-** बुद्धी व प्राण यांच्या प्रसरातही बाह्यदेशादि उपादानाविषयी नि:संकोच अशा सिद्धयोग्यांना अर्थात् ज्यांच्या चित्तावर आवरण आलेले नाही अशा सिद्धयोग्यांना विश्वात्मस्वरूपलाभ होतोच.।।२२।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१)** ज्यावेळेला सिद्धयोगी चौथ्या अवस्थेत पूर्णपणे बुडालेला असतो त्यावेळेला त्याचे महत्त्वाचे श्वासोच्छ्वास म्हणजेच प्राण आणि अपान अर्थात्च श्वास आणि उच्छ्वास हे मध्यनाडीत म्हणजेच सुषुम्नेत मिसळलेले किंवा विरघळलेले असतात. ज्यावेळेला तो जागृत होऊन त्याच्या नेहमीच्या व सामान्य जाणीवेत परत येतो त्यावेळेला त्याचे प्राण आणि अपान हे त्यांचे नेहमीचे उच्छ्वास बाहेर टाकण्याचे आणि श्वास आत घेण्याचे कार्य करू लागतात. यालाच प्राणसमाचार असे म्हणतात.

**२)** आनंदाचा अनुभव आणि तुरीयावस्थेचे एकत्रित चैतन्य हे सिद्धयोगी जागा होऊन सामान्य जाणिवेत आला तरीही संपत नाही किंवा नाहीसा होत नाही. तो रोजच्या जागृतावस्थेतही तसाच राहतो. त्याचप्रमाणे सिद्धयोग्याला अखंड असा अनुभव येत राहतो की, तो आणि जगातील इतर सर्व गोष्टी या त्या वैश्विक चैतन्यापासूनच प्रकट झालेल्या आहेत.।।२२।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

असे असताना वर्णांच्या त्रिस्वरूपात साम्य कसे होते? हे पार्वतीप्रिय श्रीशंकर "**प्राणसमाचारे समदर्शनम्।।२२।।**" अर्थात् "प्राणावेशात म्हणजे उत्थानदशेतही सिद्धयोग्याला जगदानंदाची जाणीव राहते," असे या सूत्रात पुढीलप्रमाणे सांगतात।।१००,१००.५।।

सर्वज्ञानरूप व सर्वक्रियारूप असे जे उत्तम आत्मबल आहे त्याला प्राण असे म्हणतात. त्याला परनाद असे दुसरे नाव असून तो सर्वांना म्हणजे वर्णशब्दादिकांना जीवन देण्याला समर्थ असतो. त्या प्राणाचे वर्ण, शब्द आणि अणू यांच्यामध्ये स्फुरणे म्हणजेच समाचार किंवा आवेश होय.।।१०१,१०२।।

या आवेशाशी अभिन्न असणारा अनुभव म्हणजेच समदर्शन होय. अशा प्रकारे त्याच्या बलाच्या साहाय्याने सर्व वर्णमंत्रादि हे सर्व ज्ञानाच्या बलाने युक्त होतात यात काहीही आश्चर्य नाही।।१०३,१०३.५।।२२।।

**विवरणात्मक टीप :-** सर्व प्रकाशांना प्राणभूत अशा परनादाख्य स्वतंत्र प्रकाशाच्या प्राप्तीने वैखरीपर्यंत पसरलेल्या पदमंत्रादिकांचा अभेदानुभव येतो

व याचा अभ्यास सतत चालू राहिल्यास श्रेष्ठवीर्याचा अर्थात् सामर्थ्याचा लाभ होतो.।।२२।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**प्राणसमाचारे समदर्शनम्।।२२।।**" या सूत्रानुसार "प्राणांचे हळूहळू बाह्यभागात प्रसरण झाले की, चिदानंदघनात्मतेने एकरूप ज्ञान होते" अर्थात् सर्व ठिकाणी एकच चिदानंद भरून राहिला आहे असे ज्ञान सर्व दशांमध्ये होते असा याचा भावार्थ आहे.।।२२।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**प्राणसमाचारे समदर्शनम्।।२२।।**" या सूत्रानुसार "अशा प्रकारे वस्तुस्वभावाला धरून सिद्धयोग्याची बुद्धी।।८९।।

ज्यावेळेला परमपदामध्ये अर्थात् तुर्यास्थानात प्रविष्ट होते त्यावेळेला सिद्धयोग्याचे चित्त पुन्हा प्रसरण पावते म्हणजेच व्यापक होते." ज्यावेळी स्फुरणाच्या सुगंधाने संस्कारित झालेल्या प्राणाची।।९०।।

गती योग्य प्रकारे विकसित झालेल्या सर्व ग्रंथींच्या अवलंबनाच्या बुद्धीच्या सामर्थ्यामुळे किंचित् मंद मंद अशी चालू असताना प्रसरण पावते।।९१।।

त्यावेळी चिदानंदाने भरलेल्या आत्म्याची जाणीव होते म्हणजेच आत्मज्ञान होते व सर्व अवस्थांमध्ये योग्याला अभेददृष्टी किंवा समदृष्टी प्राप्त होते.।।९२।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

या प्रकाराने शांभवपदात प्रवेश केलेल्या या सिद्धयोग्याचे वस्तुस्वभावानुसार ज्यावेळेला परत प्रसरण अर्थात् पसरणे होते त्यावेळेला त्याला "**प्राणसमाचारे समदर्शनम्।।२२।।**" या सूत्रन्यायाने सर्वांमध्ये एकत्वाची जाणीव होते.

ज्यावेळेला सिद्धयोग्याचे प्राण चिदानंदरूप तुर्यात्मक संविद्रसाने श्रीपरमेश्वराच्या स्फुरणाच्या शाक्तसुगंधाने युक्त होतात त्यावेळेला पूर्ण विकसित झालेल्या ग्रंथ्यात्मक आंतरस्वरूपाचा अवष्टंभ अथवा आधार घेतल्याने तो सुगंध बाह्य प्रदेशात हळूहळू पसरून स्वात्मानंदाचा अनुभव घेतला जातो. अशा प्रकारे योगनिष्ठपुरुष सर्व लौकिक व्यवहार करीत असूनही चिदानंद-स्वरूपातच स्थिर झालेला होतो.

हे "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथात सांगताना श्रीगोपालकृष्णनाथमहाराजांनी असे म्हटले आहे की -

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम्।।।।१३.२७.५।।**

**अर्थ :-** जो साधकभक्तयोगिशिष्य सर्व नाशवंत अशा चराचर भूतमात्रांच्या

ठिकाणी अविनाशी श्रीपरमेश्वराला समभावाने सर्वत्र स्थित असलेला पाहतो तोच खरे पाहतो.।।१३.२७.५।।

अशा या सिद्धयोग्याला सर्व जाग्रत्स्वप्नसुषुप्तावस्थेत चिदानंदघनस्वरूपाच्या एकात्मभावनेने दर्शन अर्थात् संवेदन म्हणजेच जाणीव होते.

**विवरण :-** जर प्राण आणि चित्त या दोघांचा एकदमच लय झाला तर ते दोघेही त्यांचे कारण असणाऱ्या विभुप्राणात लीन होऊन चेतनसमाधीचा अनुभव करून देतील. त्यामुळे बुद्धिमान् मनुष्याने

**यच्छेद्वाङ्मनसी प्राज्ञस्तद्यच्छेज्ज्ञान आत्मनि।**
**ज्ञानमात्मनि महति नियच्छेत्तद्यच्छान्त आत्मनि।।**
**।। कठोपनिषद् १.३.१३।।**

**अर्थ :-** अर्थात् विद्वानाने वाणीला अर्थात् सर्व इंद्रियांना मनात लीन करावे, मनाला ज्ञानात्म्यात म्हणजे बुद्धीत घेऊन जावे म्हणजे लीन करावे, ज्ञानात्मारूपी बुद्धीला महानात्म्यात अर्थात् समष्टिरूप बुद्धीत घेऊन जावे म्हणजे लीन करावे आणि महानात्म्याला शांतात्म्यात म्हणजेच अंतरात्मारूपी ब्रह्मात लीन करावे.।।१.३.१३।।

व्युत्थानदशेत महानात्म्यापासून अणुबुद्धी आणि अणुप्राण यांचे वेगळेवेगळे व्युत्थान होते. या सूत्रात सिद्धयोग्याने समाधीतून खाली उतरून प्राण आणि बुद्धी या दोघांच्या विभुत्वरूपी तेलाच्या सिंचनाने प्रभावित होऊन समतेच्या प्राप्तिद्वारा विश्वामध्ये समदर्शिता प्राप्त करण्याविषयी सांगितले आहे.

आणखी अन्य स्पष्टीकरण असे आहे की, मागच्या सूत्रात जागृतावस्थेपासून समाधीपर्यंतच्या लयक्रमाचे आणि या सूत्रात व्युत्थान दशेचे वर्णन आले आहे. मागच्या सूत्रात असे प्रतिपादिले आहे की, सिद्धयोगाच्या साधनाद्वारा साधक आणवोपायात प्रगत झाला म्हणजे त्याला शाक्तोपायापर्यंत नेले जाते आणि मग तो अलौकिक अशा चैतन्यात प्रवेश करतो. ज्यावेळेला मनबुद्धीसहित पाचही ज्ञानेंद्रिये आत्म्यात स्थिर होतात त्यावेळेला त्या अवस्थेला परमगती असे म्हणतात. त्याचप्रमाणे याच स्थिर इंद्रियधारणेला योग असे म्हणतात. (याविषयी कठोपनिषद् २.३.१० आणि ११ हे मंत्र पाहावेत.) अशा अवस्थेच्या अर्थात् समाधीच्या प्राप्तीसाठी मागच्या सूत्रात ध्यानमग्न होऊन चित्तासह समाधीत प्रवेश करावा असे सांगितले आहे. प्राणांचा लय झाल्यानंतर समाधी लागते असे सर्वांना माहीत आहेच. प्राणांच्या लयाबरोबरच चित्ताचाही

लय होतो. हे तर प्रथमच सांगितले आहे की, प्राणशक्ती ही क्रियारूपा आहे आणि चित्त ज्ञानरूप आहे. येथे या गोष्टीकडे संकेत केला आहे की, प्राणनिरोधात चित्तालाही बरोबर ठेवले पाहिजे; नाही तर केवळ प्राणांच्या साधनेने जडसमाधीचा लाभ होइल. या दृष्टीने असे म्हणता येईल की, सिद्ध-योगी चतुर्थावस्थेत पूर्णपणे मग्न झालेला असताना तो शांभवावस्थेपर्यंत वर जातो. त्याला समाधीअवस्थेत आलेला तुरीयावस्थेचा अथवा पूर्ण चैतन्याचा अनुभव हा सर्वसाधारण व्यवहारात रोजच्या जीवनातही स्थिर राहतो. तो वैश्विक चैतन्याची प्राप्ती करतो. हे सर्व जगत् त्याला स्वर्गीय, दिव्य व श्रेष्ठ अशा प्रकाशाने सजलेले दिसते. हा प्रकाश म्हणजे दिव्य चैतन्याच्या आनंदाचे दृश्य चिह्नच आहे.।।२२।।

## सूत्र क्रमांक २३

**संबंध :-** परंतु ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य ढिला पडल्याने किंवा त्याची शक्ती कमी पडल्याने या तुर्यातीत पदामध्ये प्रवेश करू शकत नाही त्यावेळेला तो त्या तुर्यावस्थेच्या चमत्काराने जाग्रत अवस्थेत आणि परत जाग्रत अवस्थेने तुर्य चमत्काराच्या अनुभवात संतुष्ट राहतो हेच या सूत्रात सांगितले आहे.

**मध्येऽवरप्रसवः।।२३।।**

**शब्दार्थ :- मध्ये** - जाग्रतादि अवस्थांचा प्रारंभ व शेवट यांच्या मधल्या अवस्थेत. **अवर** - खालच्या दर्जाचा. **प्रसव** - उत्पत्ती किंवा निर्मिती अर्थात् प्रसररूप प्रवेश किंवा स्वरूपलाभ होतो.

**अर्थ :-** मधल्या अवस्थेत मनाची अर्थात् कुंडलिनी शक्तीची खालच्या दर्जाची म्हणजे बाह्यसंसारोन्मुखतेमुळे कामोपभोगवासनाकांक्षाइच्छातृष्णा-संकल्पनादींमध्ये रत होण्याची स्थिती असते अर्थात् जागृत, स्वप्न व सुषुप्ती यांच्या मध्यावस्थेत कुत्सित म्हणजे अश्रेष्ठ व भेदप्रथामय प्रसररूपाचा प्रवेश होतो अर्थात् निम्नदर्जाच्या स्वरूपाचा लाभ होतो.।।२३।।

**विशेष व्याख्या :-** मंदशक्ती असलेला साधकभक्तयोगिशिष्य हा केवळ अंतर्मुखभावातच तुर्यावस्थेचा अनुभव घेऊ शकतो आणि तुर्य अवस्थेतून बाहेर येऊन निमेषाच्या प्राणरोधात आणि उन्मेषाच्या प्राण प्रवाहात चिदानंदाशी एकरूपतेचा अनुभव करू शकत नाही. तो जाग्रत्, स्वप्न किंवा सुषुप्तीच्या मध्य अवस्थेत भेदप्रथायुक्त म्हणजेच मी देह आहे या जाणिवेने युक्त अशा प्रवेशाचा अनुभव घेत असतो अर्थात् अशा साधकभक्तयोगिशिष्याला जाग्रत्

आणि सुषुप्ती, जाग्रत् आणि स्वप्न त्याचप्रमाणे स्वप्न आणि सुषुप्तीच्या संधींमध्ये म्हणजेच सुरुवात व शेवट यांच्या मधल्या अवस्थेमध्ये स्वरूपलाभ होतो. केवळ जाग्रत् अवस्था, केवळ स्वप्नावस्था किंवा केवळ सुषुप्त्यवस्थेत त्याला स्वस्वरूपलाभाचा अनुभव येत नाही. त्याला अनित्य दिव्य भोगांचे प्रलोभन अडचणींमध्ये टाकू शकते; परंतु तो नेहमीच मोहात राहतो असे नाही. त्याला येणाऱ्या तुर्यावस्थेच्या अनुभवामध्ये कोणतीही अडचण येत नाही अर्थात् हा साधकभक्तयोगिशिष्य तुर्यचमत्काराने युक्त असल्याने कायमच मोहात अडकून पडत नाही.

यासंबंधी "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की-

**वासनामात्रलाभेऽपि योऽप्रमत्तो न जायते।**
**तमनित्येषु भोगेषु योजयन्ति विनायकाः।।**
**तस्मान्न तेषु संसक्तिं कुर्वीत्तोत्तमवाञ्छया।**

**अर्थ :-** तुर्य चमत्काराचा सुगंध मिळूनही सिद्धयोगी मोहात पडतो. त्याला विघ्न करणारे विनायक अर्थात् सिद्ध अनित्य भोगांचे प्रलोभन दाखवितात. त्यामुळे सर्वोत्तम पद म्हणजेच तुर्यातीत पद प्राप्त करण्याची इच्छा असणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यांनी त्यांच्यामध्ये आसक्ती ठेवता कामा नये.।।२३।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

ज्यावेळेला हा साधकभक्तयोगिशिष्य अंतर्मुख तुर्यावस्थेच्या स्थैर्यबळाने तुर्यातीत अवस्थेमध्ये प्रविष्ट होत नाही; तर केवळ जाग्रदादि अवस्थांतील तुर्यचमत्कारातच समाधान मानतो त्यावेळेला "**मध्येऽवरप्रसवः।।२३।।**" या सूत्रानुसार त्याच्या मध्यदशेत कुत्सित सृष्टी निर्माण होते म्हणजे जाग्रदादि अवस्थांतील आदि-अंतीच्या तुर्यानंदाचा उपभोग घेणाऱ्याच्या मध्यदशेमध्ये भेदज्ञानयुक्त निकृष्ट सर्ग होतो अर्थात् त्याला मधून मधून भेददृष्टी भेडसावते किंवा त्रास देते. परंतु हे फक्त मध्यदशेतच होते, सर्वत्र होत नाही. "**विद्यासंहारे तदुत्थस्वप्नदर्शनम्।।२.१०।।**" अर्थात् "शुद्ध विद्येचा ऱ्हास किंवा लोप झाला असता तदनुषंगिक भेददर्शक प्रपंचरूप संकल्प उचंबळून येतात," या सूत्रात सांगितल्याप्रमाणे तो नेहमीच मोहित होत नाही.

यासंबंधी "**श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की-

**वासनामात्रलाभेऽपि योऽप्रमत्तो न जायते।**
**तमनित्येषु भोगेषु योजयन्ति विनायकाः।।**
**तस्मान्न तेषु संसक्तिं कुर्वीतोत्तमवाञ्छया।।**

**अर्थ :-** जो साधकभक्तयोगिशिष्य चिदानंदरसाचा थोडासा लाभ होऊनही सावध होत नाही व चूक करीत राहतो त्याला माहेश्वर्यादि पशुमाता व विघ्नकर्ते सिद्ध स्वर्गादि लोकातील अनित्य अशा दिव्य विषयोपभोगांकडे आकर्षित करतात. त्यामुळे उत्तमपदाची इच्छा करणाऱ्यांनी त्यांच्यामध्ये आसक्ती ठेवू नये.

हे पूर्वीही द्वितीय उन्मेषाच्या दहाव्या सूत्रामध्ये सांगितलेच आहे.।।२३।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे वर्णाच्या पूर्व व शेवटच्या भागाचा निरास केल्याने काय फल आहे? असा जर प्रश्न विचारला तर त्याचे उत्तर देताना श्रीशिव **"मध्ये-ऽवर प्रसवः।।२३।।"** या सूत्रात असे सांगतात की,।।९७।।

उच्चारल्या जाणाऱ्या वर्णांचे तीन भाग असतात. ते तीन भाग म्हणजे पूर्व, मध्य आणि अंत हे होत. त्यांपैकी आदि आणि अंती श्रीशिवरूपता आहे.।।९८।।

पशूच्या म्हणजेच अज्ञानी जीवाच्या वर्णमातृकात संस्थित असलेली श्रीशिवरूपता उत्पन्नेच्छा आणि विश्राम या स्वरूपाची असते. मध्यभागाला भ्रंश असे म्हटले जाते.।।९९।।

पतीचे म्हणजेच श्रीशिवत्वाचे ज्ञान झालेल्या साधकभक्तयोगिशिष्याच्या मध्योच्चारात शाक्तरूपता स्फुरते अथवा अभिव्यक्त होते.।।९९.५।।

**विवरण :-** उच्चारणाच्या इच्छेत आणि उच्चार संपल्यानंतर आदि आणि अंत या लक्षणांमध्ये मध्यमावाणीला विषय असलेले स्थूल व सूक्ष्म वर्ण हे पश्यंतीपरादि वाणीत लीन होत असल्याने त्यांच्यामध्ये कोणत्याही प्रयत्नां-शिवाय सिद्ध होणारी श्रीशिवरूपता असते. वर्णांच्या मध्यावस्थेत मात्र विचित्ररूपाच्या अक्षरसंनिवेशाचे म्हणजेच क्षरण न होणारे चैतन्य स्फुरत असल्यामुळे अविकल्पसंवित्पासून म्हणजेच विचाररहित संवित्पासून भ्रंश होतो.।।२३।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"मध्येऽवरप्रसवः।।२३।।"** या सूत्राने असे कथन केले आहे की, पूर्व व अपर कोटींमध्ये तुर्यरसास्वाद घेणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याला मध्य-दशेत भेदज्ञानाने युक्त निकृष्ट दर्जाच्या सृष्टीचा अनुभव येतो; परंतु तो त्यावेळी मोहित होत नाही. त्या अवस्थेतही त्याचे ज्ञान थोड्या प्रमाणात जागृत असतेच.।।२३।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

तुर्यावस्थेच्या स्थैर्यामुळे प्रकट अशी तुर्यातीत अर्थात् तुर्येपलीकडील अवस्था मिळू शकते. जीवात्मा व परमात्मा यांच्या अग्रभागीच केवळ तुर्यावस्थेत साधकभक्तयोगिशिष्य राहतो.।।९३।।

जर साधकभक्तयोगिशिष्य एवढ्यावरच संतुष्ट राहिला तर पूर्व व अपर कोटीत तुर्यानुभवी साधकभक्तयोगिशिष्याने।।९४।।

सावधपणात थोडी जरी ढिलाई केली तरी त्या साधकभक्तयोगिशिष्याच्या **"मध्येऽवरप्रसवः।।२३।।"** या सूत्रन्यायाने "मध्यावस्थेत कमी प्रतीचा सर्ग येऊन आढळेल अर्थात् तुर्यावस्थेतून व्युत्थान दशा प्राप्त होईल व समदर्शिता जाऊन भेददर्शन होईल."।।९५।।

अशी व्युत्थान दशा प्राप्त होऊन भेददर्शन होऊ नये म्हणून साधकभक्तयोगिशिष्याने नेहमी सावध किंवा जागरूक राहिले पाहिजे.।।९५.५।।२३।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

ज्यावेळेला सिद्धयोगी आंतरिक तुर्यावस्थेचा आधार घेत परमशांती देणाऱ्या तुर्यातीत पदात चित्त एकाग्र न करता; उलट पूर्व व अपर अशा दोन बाजूंनी जाणिवेत येणाऱ्या तुर्यचमत्कारानेच संतुष्ट होतो त्यावेळेला **"मध्येऽवरप्रसवः।।२३।।"** या सूत्रन्यायाने त्याच्या मध्य दशेत अवर अर्थात् अश्रेष्ठ किंवा कुत्सित सृष्टी निर्माण होते.

पूर्व म्हणजे आधीच्या आणि नंतरच्या पायऱ्यांमध्ये तुर्यचमत्कार प्राप्त झालेल्या साधकभक्तयोगिशिष्याच्या मध्यदशेतच अश्रेष्ठ, विरुद्ध किंवा स्वतंत्र आचरणाने युक्त व कुत्सित म्हणजे हलक्या दर्जाचा सर्ग किंवा सृष्टी निर्माण होते. हा भेद निर्माण करणारा अवर प्रसव फक्त मध्यदशेतच म्हणजे जागृती व निद्रा यांच्यामधला संधिकाल म्हणजेच जागेपणाचा शेवट व झोप येण्याची सुरुवात यावेळीच होतो; इतर अवस्थांमध्ये नाही. ज्यावेळेला परमतत्त्वज्ञानयुक्त विद्येचे समुत्थान किंवा जागृती अथवा उदय होत नाही त्यावेळेला द्वैतभावनेने कल्पिलेल्या किंवा चिंतिलेल्या प्रपंचाचे दर्शन होते. त्यामुळे सिद्धयोगी संविद्रूपी विद्यातत्त्वात निरंतर व अखंडपणे एकाग्र होतो. या प्रकाराने तो कधीही मोहित होत नाही.

यासंबंधी **"श्रीमालिनीविजयोत्तरतंत्र"** या ग्रंथात असे म्हटले आहे की-

**वासनामात्रलाभेऽपि योऽप्रमत्तो न जायते।**
**तमनित्येषु भोगेषु योजयन्ति विनायकाः।।**

**तस्मान्न तेषु संसक्तिं कुर्वीतोत्तमवाञ्छया।**

**अर्थ :-** चिदानंदरसाचा थोडासा लाभ झाला असताही जो सावध होत नाही त्याला विनायकादि शक्ती स्वर्गादि अनित्य विषयभोगांकडे आकर्षित करतात. त्यामुळे उत्तमपदाची इच्छा करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याने त्या विषयांमध्ये आसक्ती ठेवू नये.

अर्थात् सच्चिदानंदाने परिपूर्ण असणाऱ्या चमत्कारपूर्ण रसामृततेचा स्वाद घेत असताना समाधानसंस्काराच्या प्राप्तीत प्रमाद करणाऱ्याला किंवा मोहात पडणाऱ्याला माहेश्यादि म्हणजेच विघ्ने आणणाऱ्या सिद्धांकडून क्षणभंगुर म्हणजेच नष्ट होणाऱ्या भोग्य पदार्थांमध्ये प्रलोभन निर्माण होणाची शक्यता असल्यामुळे तुर्यातीत पदात समारूढ होण्याची इच्छा असलेल्या साधकभक्तयोगिशिष्याने त्या कोणत्याही अवस्थेत आसक्त होऊ नये. याकरिता स्वस्वरूप स्पष्ट होण्यासाठी निरंतर प्रयत्न करावा.

हेच विचार **"श्रीस्पंदशास्त्र"** या ग्रंथातील खालील स्पंदकारिकेत मांडले आहेत.

**अतः सततमुद्युक्तः स्पन्दतत्त्वविविक्तये।।२.२१।।**

**अर्थ :-** स्पंदतत्त्वाचे प्रकटीकरण होण्यासाठी नेहमी उद्योगरत असावे अर्थात् दृढ साधनाभ्यास करावा.।।२.२१।।

**विवरण :-** या सूत्रात मधल्या अवस्थेचे म्हणजे ज्यावेळेला केवळ प्राणांचा अर्थात्च चित्तविरहित प्राणांचा लय होतो त्यावेळेला जशी स्थिती प्राप्त होते त्याचे वर्णन केले आहे.

**"प्रश्नोपनिषद्"** या ग्रंथाच्या तिसऱ्या प्रश्नाच्या तिसऱ्या श्रुतीत असे म्हटले आहे की, **"मनोकृतेनायात्यस्मिञ्छरीरे।।"** अर्थात् "शरीरात प्राण हे आध्यात्मिक रूपाने मनाच्या आधीन होऊन येतात." त्यामुळेच मन ज्यावेळी ज्या विषयाचे चिंतन करीत असते त्यावेळी प्राणांची गतीही त्याच विषयाकडे जात असते. जर ध्यानावस्थेत चित्त संसारातील विषयांचे चिंतन करीत करीत रोखले गेले तर ते प्राणाची गती थांबवून धरते आणि समष्टिप्राणापर्यंत पोहोचण्याला अडथळा आणते अर्थात् चित्त आणि प्राण हे दोघेही मध्येच अडकून राहतात.

त्यामुळेच **"श्रीमद्भगवद्गीता"** या ग्रंथात श्रीगोपालकृष्णनाथमहाराज असा उपदेश करतात की -

**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किञ्चिदपि चिन्तयेत्।।६.२५।।**

**अर्थ :-** मनाला आत्म्यात स्थिर करून अन्य कोणत्याही वस्तूंचे चिंतन करू नये. याचे कारण असे आहे की, समाधी अवस्थेत पोहोचण्याच्या आधीच मधल्या अवस्थेतच साधकभक्तयोगिशिष्य खालीच राहील; कारण त्याचा प्रसव अर्थात् प्रभव किंवा व्युत्थान होईल. अशा साधकभक्तयोगि-शिष्यालाच योगभ्रष्ट योगी असे म्हणतात.।।६.२५।।२३।।

**सूत्र क्रमांक २४**

**संबंध :-** याच विषयाला अनुसरून श्रीशिव पुढे असे सांगतात की, जर साधकभक्तयोगिशिष्य तुर्यरसाच्या आश्रयाने व्युत्थान अवस्थेतही मध्यपदाचे सिंचन करू शकेल तर तुर्यावस्थेचे पुन्हा उत्थान होते.

**मात्रास्वप्रत्ययसन्धाने नष्टस्य पुनरुत्थानम्।।२४।।**

**शब्दार्थ :- मात्रा** - विषय, पदार्थ किंवा घटपटादि पदार्थरूप प्रमेय संसारात. **स्वप्रत्ययसन्धाने** ज्यावेळी "मी"त्वाची जाणीव त्यांच्याशी योजली जाते त्यावेळी अर्थात् स्वचित्तभाव किंवा स्वात्मानुसंधानाचा अभ्यास केल्यावर म्हणजे जागृत कुंडलिनी शक्तिद्वारा होणाऱ्या स्वतःसिद्ध सिद्धयोगाला वाव दिल्यावर. **नष्टस्य** - सिद्धयोग्याचा अवरप्रसर नाहीसा झाल्यामुळे. **पुनरुत्थानम्** - स्वस्वरूपाचे पुन्हा उत्थान होते किंवा पुन्हा निर्माण होते.

**अर्थ :-** ज्यावेळेला हे विश्व मी आहे अशी चिद्घन स्वरूपाची अर्थात् खऱ्या "मी"त्वाची जाणीव म्हणजे सर्व इंद्रिये विषयांच्या ठिकाणी योजली अर्थात् जोडली जातात त्यावेळेला नष्ट झालेल्या तुर्यावस्थेचे पुन्हा उत्थान होते अर्थात् ज्यावेळेला म्हणजे जागृत कुंडलिनी शक्तिद्वारा होणाऱ्या स्वतःसिद्ध सिद्धयोगसाधनाने ही शक्ती सुषुम्नागामी झाली की, सर्व पदार्थ आत्मस्वरूप आहेत असे अनुसंधान केले जाते व त्यावेळेला नष्ट झालेल्या तुर्यावस्थेचे पुन्हा उत्थान होते अर्थात् ज्यावेळेला घटपटादि पदार्थरूप प्रमेयसंसारातील दिसणारे सर्व पदार्थ आत्मस्वरूप आहेत असे अनुसंधान केले जाते त्यावेळेला अवरप्रसर दूर झाल्याने नष्ट झालेल्या तुर्यावस्थेचे पुन्हा उत्थान होते.।।२४।।

**विशेष व्याख्या :-** ज्यावेळेला विश्वातील पदार्थ पाच प्रकारच्या विषयां-मध्ये मर्यादित होतात त्यावेळेला त्यांना मात्रा असे म्हणतात. हे रूपादि विषय होत. उदाहरणार्थ घटपटादि पदार्थ हा सर्व प्रमेयसंसार आहे.

तेविसाव्या सूत्रात ज्या सिद्धयोग्याच्या विषयी वर्णन आलेले आहे असा सिद्धयोगी ज्यावेळेला जाग्रत्, स्वप्न अथवा सुषुप्तीच्या मध्य अवस्थेच्या अवर म्हणजे कमी प्रतीच्या प्रसर अर्थात् भेदज्ञानाने युक्त प्रवेशातून बाहेर येऊन

आत्मानुसंधानात अखंडपणे राहतो त्यावेळेला त्याला प्रलोभनांचा त्रास होत नाही. सतत साधन करीत राहिल्याने त्याचा पहिला अवरप्रसर अर्थात् भेदज्ञान नष्ट होऊ लागते. त्याची तुर्यावस्था सतत राहते. त्यामुळे तो या स्थूल कुत्सित संसारात सुखाने राहू शकत नाही. तो विश्वपदार्थांमध्ये **"इदमहम्"** अर्थात् "हे विश्व म्हणजे मी आहे," असा अनुभव घेऊ लागतो. त्याची भावना किंवा वरील अनुभव हा **"सर्वमिदमहं च ब्रह्मैव।।"** अर्थात् "हे सर्व विश्व म्हणजे मी आहे व मी म्हणजेच ब्रह्म होय," अशा श्रुतीत सांगितलेल्या वचनानुसार दृढ किंवा पक्का होत जातो. अशा प्रकारे त्याच्यामध्ये पुन्हा स्वरूपाचा उदय होतो आणि तो आत्म्याच्या चिद्घनरूपाचे अनुसंधान करीत राहतो. या विषयी प्रातःस्मरणीय प. पू. श्रीलक्ष्मणमहाराजांनी भगवान् श्रीउत्पलदेवांविषयी एक कथा सांगितली होती ती पुढीलप्रमाणे आहे.

भगवान् श्रीउत्पलदेव आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धात स्वचित्तभावाच्या अभ्यासात अखंडपणे राहत असत. ते बहुधा सर्व काळ चित्स्वरूपाच्या अनुभवात बुडालेले असत. एकदा ते अशाच आत्मानंदाच्या स्थितीत एका ठिकाणी बसले होते. त्या ठिकाणी बदामाची फुले फुलली होती आणि त्या फुलांच्या पाकळ्या इकडे तिकडे विखुरलेल्या अवस्थेत जमिनीवर पडल्या होत्या. काही कारणाने भगवान् श्रीउत्पलदेवांची समाधी काही काळापुरती भंगली आणि ते जागे झाले. त्या व्युत्थान दशेत ज्यावेळेला त्यांचे डोळे उघडले त्यावेळेला त्यांना त्या बदामाच्या पाकळ्या इकडे तिकडे पडलेल्या दिसल्या. त्या पाहताच ते झटकन् असे म्हणाले की, "अरे! सर्वांनी परमेश्वराला फुले अर्पण केलेली दिसत आहेत, केवळ मीच मागे राहिलो आहे," असे म्हणून भावविभोर होऊन ते परत समाधीत लीन झाले. अशा प्रकारे भगवान् श्रीउत्पलदेव या प्रसंगात चिद्घनरूपतेच्या अनुसंधानात मग्न झालेले दिसून येतात. हीच **"इदमहम्"** "हे मी आहे," अशी स्थिती असून ती भगवान् श्रीउत्पलदेवांना प्राप्त झालेली होती. अशा अवस्थेत अवरप्रसर किंवा भेद-ज्ञान होणे शक्य नाही. त्याचप्रमाणे अशा अवस्थेतला सिद्धयोगी मितसिद्धीं-कडे झुकू शकत नाही. अशा अवस्थेत प्रमेय संसारात मन प्रवेश करताच सिद्धयोग्याच्या ठिकाणी त्याच्याबरोबरच स्वरूपाचाही उदय होत असतो. त्याचे मन चमत्काराच्या सुगंधाने सुवासित होऊन सदैव स्वरूपातच लीन होत असते. सिद्धयोगी नेहमी योगनिष्ठ राहत असल्याकारणाने तो कधीही मोहात पडत नाही.

यासंबंधी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यस्य ज्ञेयमयो भावः स्थिरः पूर्णः समन्ततः।**
**मनो न चलते तस्य सर्वावस्थागतस्य तु।।**

**अर्थ :-** ज्या सिद्धयोग्याला परतत्त्वभावात सर्व प्रकारांनी आणि पूर्ण-रूपाने स्थैर्य प्राप्त होते त्याचे मन कोणत्याही अवस्थांमध्ये म्हणजे समाधी-अवस्थेत आणि व्युत्थानामध्ये ढळत नाही.

यासाठी याच ग्रंथात एक युक्तीही सांगितली आहे की -

**यत्र यत्र मनो याति ज्ञेयं तत्रैव चिन्तयेत्।**
**चलित्वा यास्यते कुत्र सर्वं शिवमयं यतः।।**

**अर्थ :-** अशा सिद्धमहायोग्याचे मन अखंड परतत्त्वाच्या ऐक्यभावनेत मग्न असते. त्यामुळे त्याचे मन जिकडे जाते तिकडे तो आपल्या ज्ञेय अर्थात् तुर्यातीत पदाचेच सर्व प्रकारांनी चिंतन करीत राहतो; कारण हे सर्व श्रीशिवमय आहे असा त्याचा निश्चय दृढ झालेला असतो.

साधकभक्तयोगिशिष्याच्या या युक्तीचेच अधिक स्पष्टीकरण करताना याच ग्रंथात असे म्हटले आहे की -

**विषयेषु च सर्वेषु इन्द्रियार्थेषु च स्थितः।**
**यत्र तत्र निरूप्येत नाशिवं विद्यते क्वचित्।।४.३११।।**

**अर्थ :-** सर्वसाधारण विषयांमध्येही जेथे पदार्थ इंद्रियांना आपल्याकडे आकर्षित करतात तेथे तुर्यावस्थेचा अनुभव आलेला स्थिर व उत्तम सिद्धयोगी ज्यावेळी त्या अवस्थेत त्यांच्यासंबंधी शोध अर्थात् विचार करतो त्यावेळेला कोणत्याही परिस्थितीत त्याचे अकल्याण होत नाही. तो परप्रकाशाच्या आनंदघनतेमध्ये श्रीशिवांबरोबर एकत्वाला प्राप्त होतो.।।२४।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

असाच मध्यप्रसव अर्थात् अवरप्रसव प्रवृत्त होत असतानाही जर मध्य-पदाचे अर्थात् त्याही अवस्थांचे सिद्धयोग्याने तुर्यरसाच्या बलाने सिंचन केले असता अर्थात् तेथे तुर्यानंद भोगल्यास काय होते ते "**मात्रास्वप्रत्ययसन्धाने नष्टस्य पुनरुत्थानम्।।२४।।**" अर्थात् "मात्रा म्हणजे रूपादि विषयांमध्ये किंवा दृष्ट घटपटादि पदार्थरूप प्रमेय संसारामध्ये स्वचित्तभाव अर्थात् स्वात्मा-नुसंधानाचा अभ्यास केल्यावर सिद्धयोग्याचा अवरप्रसर नष्ट झाल्यामुळे त्याच्या ठिकाणी पुन्हा स्वरूपाचा उदय होतो," हे या सूत्रात सांगितले आहे.

**चक्षुषा यच्च सन्धानं वाचा वा यश्च गोचरः।**

**मनश्चिन्तयते यानि बुद्धिश्चैवाध्यवस्यति।।**
**अहङ्कृतानि यान्येव यच्च वेद्यतया स्थितम्।**
**यच्च नास्ति स तत्रैव त्वन्वेष्टव्यः प्रयत्नतः।। श्रीस्वच्छंदतंत्र।।**

**अर्थ :-** चक्षूने रूप, पश्यंत्यादि वाणींनी वैषयिक वर्णन, मनाने चिंतन, बुद्धीने निश्चय आणि अहंकाराने ज्ञेय वस्तूंवरचे ममत्व, या सर्व विषयसमूहात जे नाहीसे भासतात तेच चित्प्रकाशरूप श्रीपरमशिव शोधून परमप्रयत्नाने ओळखावेत.

**विवरण :-** कल्पित प्रमात्याच्या अपेक्षेने भिन्न अवभासप्रणित इदंतेचे पद अवलंबून ग्राह्यत्वाने स्थिर राहणारे ते चित्प्रकाश श्रीपरमशिव भाव व अभाव यांनी युक्त अशा अखिल जगतात चित्प्रकाशाशी एकरूप व प्रकाशयुक्त स्थितीत जाणून घ्यावेत. चिदात्माप्रकाश श्रीमहेश्वर यांच्या प्रकाशाच्या अभेदाने हे विश्व व्यक्त होते; कारण प्रकाशबाह्य किंवा प्रकाशापेक्षा वेगळ्या अशा कोणत्याही वस्तूचे प्रकाशन म्हणजेच व्यक्त होणे शक्य नाही. जो विश्व-प्रकाशयुक्त स्वप्रकाशरूप प्रकाश प्रकट करतो तोच मी श्रीशिव आहे असे तात्पर्य होय.

अशा प्रकारे "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात निरूपित केल्याप्रमाणे हे विश्व मीच आहे अशा चिद्घनयुक्त रूपाचे सर्वत्र अनुसंधान ठेवल्यास म्हणजेच परत परत आवेशसद्भाव करून तत्परतेने विचार केल्यास पूर्वी सांगितलेल्या निकृष्ट सृष्टीमुळे नष्ट झालेल्या, ज्याच्यापासून तुर्यैकघनाचा चमत्कार हिरावून घेतला आहे अशा स्वभावाचे, पुनरुत्थान अर्थात् उन्मज्ञन व तुर्येचे ऐक्यसंपूर्णत्व सिद्धयोग्याला प्राप्त होते.

**विवरण :-** जग हे कुटील अथवा वाकडेपणेच चालते, भोगांच्या अभिलाषेने व्युत्थानाकडेच धावते व ते अभीष्टपदाला कधीच पोहोचू शकत नाही.

यासंबंधी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**प्रसह्य चञ्चलीत्येव योगिनामपि यन्मनः।।**

**अर्थ :-** साधकभक्तयोगिशिष्याने चंचल असे मन बलात्काराने अथवा बळजबरीने पूर्ण ज्ञेय वस्तूकडे लावावे.

अशी सुरुवात करून त्याच्याच पुढे असे म्हटले आहे की -

**यस्य ज्ञेयमयो भावः स्थिरः पूर्णः समन्ततः।**
**मनो न चलितं तस्य सर्वावस्थागतस्य तु।।**

**यत्र यत्र मनो याति ज्ञेयं तत्रैव चिन्तयेत्।**
**चलित्वा यास्यते कुत्र सर्वं शिवमयं यतः।।**

**अर्थ :-** ज्याचे मन स्थिर अर्थात् निश्चल, सर्वच बाबतीत पूर्ण अथवा सर्व इच्छांनी रहित आणि ज्ञेयाने म्हणजे परतत्त्वाच्या आशयाने युक्त आहे अर्थात् विचारणीय अशा तुर्यातीतपदाने युक्त आहे त्याचे मन चंचल असत नाही तो कोणत्याही परिस्थितीतून जरी गेला तरीही त्याचे मन कधीही ढळत नाही.

त्याचे मन जेथे कोठे जाते तेथे तेथे त्याने श्रीशिवांचा विचार किंवा चिंतन करावे. जाऊन जाऊन ते कोठे जाईल?; कारण त्याच्यासाठी सर्वच श्रीशिवमय आहे.

**विवरण :-** यासारख्या सिद्धमहायोग्याचे मनच परतत्त्वाच्या ऐक्याने अवभासित अशा ज्ञेय म्हणजे जाणण्याला योग्य अशा तुर्यातीत पदाचेच सर्वत्र चिंतन करते.

यासंबंधी महागुरूंनी "**श्रीशिवदृष्टी**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**शिवभावनयौषध्या बद्धे मनसि संसृतेः।**
**काष्ठकुड्यादिषु क्षिप्ते रसवच्छिवहेमता।।**

**अर्थ :-** श्रीशिवभावनेच्या औषधीने मनोरूप पारा बद्ध झाला की, संसारातील कोणत्याही काष्ठपाषाणाला श्रीशिवरूप सुवर्णता येते.

त्याचप्रमाणे "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असेही म्हटले आहे की -

**विषयेषु च सर्वेषु इन्द्रियार्थेषु च स्थितम्।**
**यत्र यत्र निरूप्येत नाशिवं विद्यते क्वचित्।।**

**अर्थ :-** सर्व विषयांमध्ये आणि इंद्रियांमध्ये स्थित राहून सिद्धयोगी जेथे जेथे विचार करील तेथे तेथे सर्व श्रीशिवच असतील.

**विवरणात्मक टीप :-** इंद्रिये आणि अर्थ अर्थात् त्यांचा विषय आणि इंद्रियविषयक प्रयोजन म्हणजेच विषयोपभोग, त्यांच्यामध्ये स्थिर असणारा श्रेष्ठ सिद्धयोगी ज्याचा विचार करील त्याला कोठेही अशिव वस्तू नसेल. तो सर्वत्र प्रकाशघन श्रीशिवांशी एकात्मता प्राप्त झाल्याने प्रकाशमान असतोच.।।२४।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे वर्णानुप्राणन सांगून प्रासंगिक म्हणून भावशरीरादिकांचे अनुप्राणन कसे करावे ते श्रीशिव "**मात्रास्वप्रत्ययसन्धाने नष्टस्य पुनरुत्थानम्।।२४।।**" अर्थात् "ज्यावेळेला सर्व पदार्थ आत्मस्वरूप आहेत

असे अनुसंधान केले जाते त्यावेळेला नष्ट झालेल्या तुर्यावस्थेचे पुन्हा उत्थान होते," असे या सूत्रात सांगत आहेत.।।१०४,१०४.५।।

मायेपासून पृथ्वीपर्यंत जो तत्त्वसमुदाय आहे त्यांना मात्रा असे म्हटले आहे.।।१०५।।

**विवरण :-** मायातत्त्व ते पृथ्वीतत्त्वापर्यंत ज्या तत्त्वकला आहेत त्या प्राणिशरीरांमध्ये उपादान कारण आहेत. त्यांना स्वात्म्याहून अभिन्न ज्ञानाच्या अनुसंधानाने चिद्रसयुक्त करावे म्हणजे ते चिन्मय समजावेत. त्यामुळे शब्द-स्पर्शादि विषयांना आधारभूत असे हे भावशरीरही चिदानंदमय आहे असे वाटू लागते. असे पूर्वी न अनुभविलेले या साधनाने अनुभविल्यावर तो सिद्धयोगी सर्वकर्तृतेच्या भूमिकेवर आरूढ होतो अर्थात् त्याला सर्व करण्याचे सामर्थ्य येते व सर्व बाबतीत परिपूर्ण ज्ञातृत्वकर्तृत्वादिरूप परमैश्वर्य त्याला प्राप्त होते.

त्या मात्रा प्रत्येक तत्त्वदृष्ट्या व्यक्त अथवा स्पष्ट आहेत. स्वगोचर अशा त्यांच्यामध्ये स्वप्रत्ययाने युक्त असे ज्ञान म्हणजेच स्वात्मज्ञान भरून टाकणे म्हणजेच त्या मात्रा स्वात्ममय आहे असे समजणे होय.।।१०६।।

याला अनुसंधान असे म्हणतात. हे कर्त्यावर तसेच त्याच्या भूमिकेवर अवलंबून असते. हे अनुसंधान साधले की, नष्ट झालेल्या भावशरीराचा उदय होतो.।।१०७।।

अशा प्रकारे कर्त्याच्या भूमिंकावेशाच्या बळावर अर्थात् कर्तृयोग्यते-नुसार जेथे जेथे मात्राप्रत्ययसंधान अर्थात् मायेपासून पृथ्वीपर्यंतच्या सर्व गोष्टीत श्रीशिवसंधान करण्यात येईल तेथे तेथे कर्तेपणा अथवा कर्तृस्वातंत्र्य, सर्वज्ञता व सर्वकर्तृता यांच्या बलावेशामुळे ते प्रत्ययसंधान दृढ राहील.।।१०८.५।।२४।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**मात्रास्वप्रत्ययसन्धाने नष्टस्य पुनरुत्थानम्।।२४।।**" या सूत्राद्वारा श्रीशिव असे कथन करतात की, "ज्यावेळेला मात्रा म्हणजेच पदार्थांमध्ये साधकभक्तयोगिशिष्य हे विश्व मी आहे अशा प्रकारचे चिद्घनात्मक स्वरूपाचे अनुसंधान ठेवतो त्यावेळेला पूर्वीच्या सूत्रात सांगितल्याप्रमाणे कनिष्ठ सृष्टी निर्माण झाल्यामुळे नष्ट झालेल्या तुर्यचमत्काराने युक्त स्वभावाचे परत उन्मज्जन होते अर्थात् नष्ट झालेला तुर्यानुभव योग्याला परत प्राप्त होतो."।।२४।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा रीतीने जरी मध्यावस्थेत अवरप्रसव अर्थात् व्युत्थान होऊन भेददृष्टी

प्राप्त झाली तरी पुन्हा।।९६।।

तुर्यावस्थेतील आनंदाची गोडी आठवून तुर्यातीत होण्याचा प्रयत्न **"मात्रा-स्वप्रत्ययसन्धाने नष्टस्य पुनरुत्थानम्।।२४।।"** या सूत्रन्यायाने करावा. मात्रा म्हणजे रूपरसादि पदार्थ किंवा विषय होत. त्यांच्यामध्ये या चक्षू आदि।।९७।।

इंद्रियांच्या द्वारा स्वप्रत्यय म्हणजे त्या त्या विषयांचे ग्रहण करण्याचे ज्ञान होय. संधान म्हणजे ते सर्व मी आहे असे ज्ञान अथवा अनुसंधान होय.।।९८।।

असे अनुसंधान प्राप्त झाले असता इंद्रियांनी हरण केल्याने नष्ट झालेल्या तुर्यावस्थेचे पुनरुत्थान होते म्हणजेच ती अवस्था साधकयोगिशिष्याला परत प्राप्त होते.।।९९।।

हेच त्या श्रेष्ठ योग्याचे ऐक्यसंपूर्णत्व होय अर्थात् त्याला झालेले ऐक्याचे ज्ञान म्हणजे आत्मज्ञान होय.।।२४।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्याला तुर्यातीतरसाचा आश्रय घेतल्याने हलक्या दर्जाची सृष्टी होऊनही मध्यपदाचा लाभ होतो त्यावेळेला **"मात्रा-स्वप्रत्ययसन्धाने नष्टस्य पुनरुत्थानम्।।२४।।"** या सूत्रन्यायाने त्याचे पुन्हा उत्थान होते.

मात्रा म्हणजेच रूपादि विषय होत. त्यांच्यामध्ये महायोगनिष्ठ पुरुष हे सर्व विश्व मीच आहे अशा अनुभवाचे अनुसंधान म्हणजेच आवेशसद्भावा-मुळे पुनःपुन्हा स्थिर राहून विमर्शन अथवा विचार करतो. त्यावेळेला पूर्वी सांगितलेल्या भेदाची अभिव्यक्ती करणाऱ्या सृष्टीपासून नष्ट पावलेल्या चिदा-नंदतुर्यचमत्काररसमय स्वभावाचे परत परत ऐक्याच्या ऐश्वर्याने परिपूर्ण अशा रूपाने उन्मज्जन म्हणजेच आविर्भाव होतो.

यासंबंधी **"श्रीस्वच्छंदतंत्र"** या तंत्रग्रंथात असे म्हटले आहे की -

**यस्य ज्ञेयमयो भावः स्थिरः पूर्णः समन्ततः।**
**मनो न चलते तस्य सर्वावस्थागतस्य तु।।४.३०९।।**
**यत्र यत्र मनो याति ज्ञेयं तत्रैव चिन्तयेत्।**
**चलित्वा यास्यते कुत्र सर्वं शिवमयं यतः।।**

**अर्थ :-** अशा सिद्धमहायोग्याचे मन अखंड परतत्त्वाच्या ऐक्यभावनेत मग्न असते. त्यामुळे त्याचे मन जिकडे जाते तिकडे तो आपल्या ज्ञेय अर्थात् तुर्यातीत श्रीशिवपदाचेच सर्व प्रकारांनी चिंतन करीत राहतो; कारण त्याचा

हा निश्चय दृढ झालेला असतो की, हे सर्व श्रीशिवमय आहे.

सर्वसाधारण विषयांमधूनही जेथे जेथे पदार्थ इंद्रियांना आपल्याकडे आकर्षित करतात तेथे तेथे तुर्यावस्थेचा अनुभव आलेला स्थिर व उत्तम साधकभक्त-योगिशिष्य ज्यावेळी त्या अवस्थेत त्यांच्यासंबंधी शोध अर्थात् विचार करतो त्यावेळेला कोणत्याही परिस्थितीत त्याचे अकल्याण होत नाही. तो पर-प्रकाशाच्या आनंदघनतेमध्ये श्रीशिवांबरोबर एकत्वाला प्राप्त होतो.

अशा प्रकारच्या सिद्धमहायोगात स्थिर असणाऱ्या सिद्धपुरुषाचे मनच परतत्त्वैक्याच्या भावेनने कल्पिलेले, चिंतिलेले अथवा ध्यायिलेले तुर्यातीत पद किंवा ज्ञेय अर्थात् जाणण्याला योग्य अशा सर्व जागृतादि अवस्थांमध्ये परा-मर्शन करीत असतेच.

त्याचप्रमाणे "**श्रीशिवदृष्टी**" या ग्रंथात श्रीसोमानंदपादाचार्य असे म्हणतात की -

**शिवभावनयौषध्या बद्धे मनसि संसृतेः।**
**काष्ठकुड्यादिषु क्षिप्ते रसवच्छिवहेमता।।**

**अर्थ :-** श्रीशिवभावनेच्या औषधीने मनोरूप पारा बद्ध झाला की, संसारातील कोणत्याही काष्ठपाषाणाला श्रीशिवरूप सुवर्णता येते.

त्याचप्रमाणे -

**विषयेषु च सर्वेषु इन्द्रियार्थेषु च स्थितम्।**
**यत्र यत्र निरूप्येत नाशिवं विद्यते क्वचित्।।**

**अर्थ :-** सर्व विषयांमध्ये आणि इंद्रियांमध्ये स्थित राहून साधकभक्त-योगिशिष्य जेथे जेथे विचार करील तेथे तेथे सर्व श्रीशिवच असतात.

अशा रीतीने श्रीस्वच्छंदशास्त्राचे अनुसरण करून सर्व भोग्यवस्तूंमध्ये स्थित असूनही जो साधकभक्तयोगिशिष्य विचरण करील त्याच्यासाठी कोणतीही जागा अशिव अर्थात् श्रीशिवरहित असणार नाही. या उलट तो सर्वांना संवित्प्रकाशाने परिपूर्ण श्रीशिवैकात्म्याच्या दृष्टीनेच पाहतो.

**विवरण :-** मागील सूत्रात सांगितलेल्या योगभ्रष्ट साधकभक्तयोगि-शिष्याला येथे नष्ट असे म्हटले असून त्याचे पुनरुत्थान होण्यासाठी साधनही सांगितले आहे. त्या योगभ्रष्ट योग्याने शब्दस्पर्शादि मात्रांमध्ये त्यांच्या ज्ञानाशी सतत संबंध ठेवून अनुसंधान केले पाहिजे अर्थात् इंद्रियांना त्यांच्या विषयां-पासून मागे आणून अर्थात् त्यांचा प्रत्याहार करून चित्त नेहमी शुद्ध ठेवले पाहिजे व अशा प्रकारे शुद्ध चित्त होऊनच आत्मचिंतन केले पाहिजे.।।२४।।

**सूत्र क्रमाङ्क २५**

**संबंध :-** तुर्यचमत्काराच्या सुगंधाने योग्य प्रकाराने युक्त असलेल्या सिद्धयोग्याच्या अवस्थेचे वर्णन या सूत्रात केले आहे.

**शिवतुल्यो जायते।।२५।।**

**शब्दार्थ :- शिवतुल्य** - श्रीशिवांसारखा अर्थात् प्रत्यक्ष श्रीशिव नव्हे. **जायते** - होतो.

**अर्थ :-** असा सिद्धयोगी श्रीशिवांप्रमाणे किंवा श्रीशिवांसारखा होतो अर्थात् तो कुंडलिनी शक्तिरूप जीव सिद्धयोगसाधनेच्या द्वारा सहस्रारात श्रीशिवांबरोबर सामरस्य प्राप्त करतो.।।२५।।

**विशेष व्याख्या :-** ज्यावेळेला अभ्यास दृढ झाल्याने तुर्यचमत्काराचा सुगंध अधिकाधिक येऊ लागतो त्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य तुर्यातीत पदात स्थिर होऊ लागतो. तो सिद्धयोगसाधनाने परिपूर्ण झाल्यावर सिद्धयोगी होऊन स्वच्छस्वच्छंद चिदानंदघन भगवान् श्रीशिवांसमान होतो. जोपर्यंत त्याची देहकला अर्थात् देहाचा अंश थोडासा जरी राहतो तोपर्यंत तो श्रीशिवांसमान असतो. यालाच सारूप्य मुक्ती असे म्हणतात.

हीच गोष्ट **"श्रीकालिकाक्रम"** या ग्रंथात स्पष्ट करताना असे म्हटले आहे की -

**तस्मान्नित्यमसन्दिग्धं बुद्ध्वा योगं गुरोर्मुखात्।**
**अविकल्पेन भावेन भावयेत्तन्मयत्वतः।।**
**यावत्तत्समतां याति भगवान्भैरवोऽब्रवीत्।।**

**अर्थ :-** याकरिताच श्रीसद्गुरुमुखाने या अलौकिक सिद्धयोगाचे श्रवण करून त्याचे मनन आणि निदिध्यासन करण्याने शंकारहित होऊन साधकभक्त-योगिशिष्याने अविकल्प अर्थात् विचाररहित विमर्शाचा आश्रय घेऊन जोपर्यंत श्रीशिवांशी साम्य प्राप्त होत नाही तोपर्यंत श्रीशिवमय भावनेने तुर्यातीत पदाचा अभ्यास केला पाहिजे. ही गोष्ट स्वतः श्रीभगवान् श्रीभैरवांनी सांगितली आहे अर्थात् हा अटल निश्चय आहे.।।२५।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

याप्रमाणे तुर्यानुभवी सिद्धयोगी हा **"शिवतुल्यो जायत।।२५।।"** या सूत्रानुसार "तुर्यावस्थेच्या परिशीलनामुळे म्हणजे सिद्धयोगसाधनेच्या सतत अभ्यासामुळे तुर्यपलीकडील महत्पदावर आरूढ झालेला सिद्धयोगी परिपूर्ण स्वच्छ, स्वच्छंद, चिदानंदघन श्रीभगवान् श्रीशिवांच्या बरोबरीचा होतो."

शरीर गलित न झाल्यामुळे तो श्रीशिवतुल्य होतो. त्याच्या शरीराचा पात झाल्यानंतर तो साक्षात् श्रीशिवच होतो. ज्याप्रमाणे "**मुखचंद्र**" या उपमेत साम्य हे पद किंचित् न्यूनता व भिन्नता दाखविते त्याप्रमाणेच "**श्रीशिवतुल्य**" ही उपमा समजावी. यालाच सारूप्य मुक्ती असे म्हणतात.

ही गोष्ट "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात अधिक स्पष्टपणे सांगितली आहे.

**तस्मान्नित्यमसन्दिग्धं बुद्ध्वा योगं गुरोर्मुखात्।**
**अविकल्पेन भावेन भावयेत्तन्मयत्वतः।।**
**यावत्तत्समतां याति भगवान्भैरवोऽब्रवीत्।।**

**अर्थ :-** याकरिताच श्रीसद्गुरुमुखाने या अलौकिक सिद्धयोगाचे श्रवण करून त्याचे मनन आणि निदिध्यासन करण्याने शंकारहित होऊन साधक-भक्तयोगिशिष्याने अविकल्प अर्थात् विचाररहित विमर्शाचा आश्रय घेऊन जोपर्यंत श्रीशिवांशी साम्य प्राप्त होत नाही तोपर्यंत श्रीशिवमय भावनेने तुर्यातीत पदाचा अभ्यास केला पाहिजे. ही गोष्ट स्वतः श्रीभगवान् श्रीभैरवांनी सांगितली आहे अर्थात् हा अटल निश्चय आहे.

**विवरण :-** जोपर्यंत तो जीव असतो तोपर्यंत त्याच्यामध्ये प्राण आणि अपान यांचा प्रवाह चालूच राहणारा असतो.

याप्रमाणे तुर्यानुभवी सिद्धयोगी श्रीशिवांसमान होतो.।।२५।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

जो अशा प्रकारे नित्ययुक्त अर्थात् सतत सावध व अभ्यासयुक्त असतो तो कशा प्रकारचा व कोणत्या योग्यतेचा होतो हे श्रीशिवांनी "**शिवतुल्यो जायते।।२५।।**" या सूत्रात सांगितले आहे.।।१०९।।

या सिद्धयोग्याची सर्व कारणकुलामध्ये शिरःस्थानी वसती असल्याने तो श्रीशिवच असतो. शिवाय तो उपाधिरहित तेजोरूप व चैतन्ययुक्त असल्याने।।११०।।

आणि तो नित्ययुक्त म्हणजेच सतत ध्यानाभ्यासात मग्न असल्याने श्रीशिवांप्रमाणेच असतो. त्याने कोणतीही क्रिया केली तरीही पूर्वी सांगितलेल्या ज्ञानशक्तीमुळे तो सिद्धयोगी जीवनमुक्तच ठरतो अथवा त्याला कोणतेही बंधन न राहिल्यामुळे तो जीवनमुक्तच आहे असे समजावे.।।१११।।

**विवरण :-** अशा प्रकारे नित्ययुक्त साधकभक्तयोगिशिष्याला श्रीशिवांच्या स्वरूपाचे सतत परिशीलन अथवा अभ्यास केल्यामुळे श्रीशिवपदाची प्राप्ती

होते. तो देहकलेने युक्त असूनही जीवनमुक्तीच्या सुखाचा अनुभव घेतो. त्यामुळे त्याला श्रीशिवपदाची उपमा दिलेली आहे. प्रारब्धाने जवळ आणलेल्या भोगांना ओलांडून गेल्यानंतर म्हणजेच सर्व प्रारब्ध संपल्यानंतर तो सिद्धयोगी विदेहमुक्त होतो आणि श्रीशिवांशी तादात्म्य प्राप्त करतो.।।२५।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**शिवतुल्यो जायते।।२५।।**" या सूत्रन्यायाने "तुर्यावस्थेच्या अत्यधिक परिशीलनाने म्हणजेच अत्यधिक अभ्यासाने साधकभक्तयोगिशिष्याला तुर्यातीत पद प्राप्त होते." त्यामुळे तो सिद्धयोगी स्वच्छ अर्थात् निर्मळ आणि स्वच्छंद म्हणजे स्वतंत्र अशा चिदानंदाने परिपूर्ण भगवान् श्रीशिवांप्रमाणे होतो. हे समत्वही देहकलेच्या अगलन अर्थात् त्या सिद्धयोग्याचा आपल्या देहाशी जोपर्यंत संबंध असतो म्हणजे जोपर्यंत देह गळून पडत नाही तोपर्यंत त्याप्रकारचे असते. त्याचा देहाशी संबंध तुटला की, तो सिद्धयोगी साक्षात् श्रीशिवच होतो असा याचा भावार्थ आहे.।।२५।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा रीतीने तुरीयावस्थेत प्रविष्ट झालेला साधकभक्तयोगिशिष्य-श्रेष्ठ।।१००।।

खूप, सतत, अखंड व चिरकाळ तुर्याभ्यास केल्याने तुर्यावस्थेच्याही पलीकडे व श्रेष्ठ असे पद प्राप्त करून प्रत्यक्ष सर्व लोकांचा अंतरात्मा,।।१०१।।

चिन्मय, स्वच्छ व स्वतंत्र अशा आनंदात रमणारे जे श्रीशिव, त्यांच्या समान होतो, असे "**शिवतुल्यो जायते।।२५।।**" या सूत्राद्वारा कथन केले आहे. देहाचा संबंध असेपर्यंत तो सिद्धयोगी श्रीशिवांसमान असतो व देह नष्ट झाल्यानंतर तो सिद्धयोगी म्हणजे साक्षात् श्रीशिवरूप होतो.।।१०२।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

अशा प्रकारे "चिद्रूपस्वात्मविमर्शात आवेश प्राप्त झालेला साधकभक्त-योगिशिष्य परम श्रीशिवांशी अभिन्नरूपत्व प्राप्त करतो," असे "**शिवतुल्यो जायते।।२५।।**" या सूत्रात सांगितले आहे. याप्रमाणे तुर्यानुभवी सिद्धयोगी श्रीशिवांसमान होतो.

चिदानंदरूप तुर्यरसाने परिपूर्ण व चमत्कारपूर्ण स्वभावाचा, पुनःपुन्हा तुर्यपदाच्या सतत अभ्यासामुळे म्हणजेच परत परत केलेल्या तुर्यपदाच्या परामर्शनाच्या किंवा विचाराच्या दृढत्वामुळे मध्यभागात म्हणजे सुषुम्नेत उसळत असणाऱ्या अहंतेच्या चमत्कारात आरूढ झालेला व त्यामुळे तुर्यातीतपद

प्राप्त केलेला सिद्धयोगी परिपूर्ण, स्वच्छ, स्वच्छंद, चिदानंदघन भगवान् श्रीशिवांच्या बरोबरीचा होतो. शरीर नष्ट न झाल्यामुळे तो श्रीशिवांसमान होतो. शरीरपात झाल्यानंतर तो साक्षात् श्रीशिवच होतो. मुखचंद्र या उपमेत साम्य हे पद किंचित् न्यूनता व भिन्नता दाखविते तसेच श्रीशिवतुल्य ही उपमा समजावी.

त्याचप्रमाणे "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**तस्मान्नित्यमसन्दिग्धं बुद्ध्वा योगं गुरोर्मुखात्।**
**अविकल्पेन भावेन भावयेत्तन्मयत्वतः।।**
**यावत्तत्समतां याति भगवान्भैरवोऽब्रवीत्।**

**अर्थ :-** नित्य व असंदिग्ध अर्थात् संशयरहित साधकभक्तयोगिशिष्याने श्रीसद्गुरूंच्या मुखातून ह्या अलौकिक सिद्धयोग जाणून घेऊन निर्विकल्प मनाने तन्मयतत्त्वाची भावना तत्समता म्हणजेच श्रीशिवांशी समता येईपर्यंत करावी असे भगवान् श्रीभैरव सांगतात. विकल्पांचा त्याग करून उन्मिषित अथवा उत्पन्न होणाऱ्या निर्विकल्प ज्ञानाच्या सामर्थ्यरूप श्रीशिवमय भावनेने तुर्यातीत पदाची भावना करावी; कारण श्रीशिवमयभावना ही श्रीभैरवरूप साम्याची मर्यादा आहे.

**विवरण :-** सुरुवातीला श्रीशिवांशी होणारे सामरस्य हे मनाच्या पातळीवर असते. नंतर अंतिमतः ते वास्तविक किंवा यथार्थ सामरस्य होते.

मागील सूत्रांमधून वर्णन केलेला सिद्धयोगी श्रीशिवतुल्य होतो अर्थात् तो श्रीशिवांसमान होतो.

## सूत्र क्रमांक २६

**संबंध :-** परंतु या सिद्धयोग्याची देहात स्थिती तर असतेच. मात्र हे शरीर त्यागणे योग्य असत नाही; कारण ज्या कर्मांनी हे जाती, आयुष्य आणि भोगरूप शरीर बनले आहे त्या कर्मांना भोगून पूर्ण करण्यानेच प्रारब्धाची शुद्धी होते.

यासंबंधी श्रुतीत असे म्हटले आहे की -

**प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः।।**

**अर्थ :-** शरीर तर प्रारब्धकर्मांनी बनलेले असते. त्यामुळे शरीराने प्रारब्धकर्म भोगूनच या कर्मांचा क्षय किंवा समाप्ती होत असते.

त्यामुळे देहनिर्वाहापर्यंत म्हणजेच जोपर्यंत जाती, आयुष्य आणि भोगरूप प्रारब्धकर्मांची संपूर्णतः समाप्ती होत नाही तोपर्यंत या संसिद्ध सिद्धयोग्याची

देहात स्थिती कशी असते हे या सूत्रातून सांगितले आहे.

**शरीरवृत्तिर्व्रतम्।।२६।।**

**शब्दार्थ :- शरीरवृत्तिः :-** शरीरामध्ये राहणे किंवा शरीराचे परिपालन करणे अगर "शिवोऽहं" अर्थात "मी श्रीशिव आहे," या भावनेने निमग्न झालेल्या सिद्धयोग्याच्या शरीराची स्थिती. **व्रतम्** - व्रत किंवा शरीराची स्थिती जीवनाच्या सर्वसाधारण नियमानुसार होते.

**अर्थ :-** अशा सिद्धयोग्याने शरीरामध्ये राहणे किंवा शरीराचे परिपालन करणे हेच त्याचे व्रत किंवा कर्तव्य असते अथवा श्रीशिवतुल्य झालेल्या किंवा "मी श्रीशिव आहे" या भावनेत अखंड स्थिर राहणाऱ्या सिद्धयोग्याच्या शरीराची स्थिती ही जीवनाच्या सर्वसाधारण नियमानुसार होते.।।२६।।

**विशेष व्याख्या :-** आता या सिद्धयोग्याचा आत्मसंयम म्हणजे प्रारब्धाच्या अनुसार साधारण जीवनाच्या प्रवाहाव्यतिरिक्त आणखी काहीही नसते. **"शिवोऽहं"** भावनेमध्ये अर्थात् "मी श्रीशिव आहे," या विचाराने खूप अभ्यास केल्याने स्थिर झाल्याने सिद्धयोग्याचा देहवासनेशी संबंध सुटलेला असतो. केवळ प्रारब्ध पूर्णपणे संपेपर्यंत त्याला त्या देहात राहावयाचे असते. देह, प्राण इत्यादि असूनही त्याच्यात श्रीशिवसमावेश स्थिरच असतो.

याचे प्रमाण **"श्रीस्वच्छंदतंत्र"** या ग्रंथात पुढीलप्रमाणे मिळते.

**सुप्रदीप्ते यथा वह्नौ शिखा दृश्यत चाम्बरे।**
**देहप्राणस्थितोऽप्यात्मा तद्वल्लीयेत तत्पदे।।४.३९४।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे लाकडाच्या समूहाला लागलेली अग्नीची ज्वाळा आकाशात लीन होताना दिसते त्याप्रमाणेच देहप्राणादींमध्ये स्थिर असणारा संसिद्ध योग्याचा आत्मा तत्पद अर्थात् श्रीशिवस्वरूपात लीन होतो.

ज्याप्रमाणे अरणिमंथन करून म्हणजेच घुसळून प्रज्वलित झालेला अग्नी जळण्यायोग्य वस्तूला जाळून आकाशात जाताना दिसतो आणि तेथेच लीन होऊन तादात्म्यभावाला प्राप्त होतो त्याप्रमाणेच दिव्यकरण आणि मंत्ररूप अरणीच्या अर्थात् रवीच्या उत्तेजित होण्याने साधकभक्तयोगिशिष्याच्या देहात प्राण प्रदीप्त होऊन तो मध्यनाडीत अर्थात् सुषुम्नेत ऊर्ध्ववाही म्हणजे वरच्या दिशेने जाणारा होऊन उदान-अग्नीत प्रज्वलित होतो.

या सिद्धयोग्याचा देहात स्थित असणारा आत्मा केवळ शुद्धविज्ञानरूप अग्निसमान समनावस्थेच्या शेवटापर्यंत देहरूप लाकडाला जाळून तुर्यातीत पदात लीन होतो अर्थात् उपाधिरहित श्रीपरमशिवांबरोबर समरस होतो.

त्यामुळे सिद्धयोग्याच्या देहाची स्थिती प्रारब्धकर्मानुसारच राहते. त्याच्यासाठी साधारण कर्म करण्याशिवाय आणखी कोणतेही व्रत असत नाही. तो केवळ अविकारी असून विकारी असल्यासारखा वाटतो किंवा भासतो.

या दृष्टीने "**श्रीविवेकचूडामणि**" या ग्रंथात भगवान् आद्य श्रीशंकराचार्य असे म्हणतात की -

**उपाधिसम्बन्धवशात्परात्मा ह्युपाधिधर्माननुभाति तद्गुणः।**
**अयोविकारानविकारी वह्निवत्सदैकरूपोपि परः स्वभावात्।।१९३।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे लोखंडाच्या विकारांनी म्हणजे स्वाभाविक गुणधर्मांनी युक्त होऊन अविकारी असणारा अग्नी विकारी असल्याप्रमाणे भासतो त्याप्रमाणे तो परमात्मा स्वरूपाने नेहमी एकरूपच असला तरीही उपाधींचा संबंध आल्याने त्याच्या गुणांनी युक्त होऊन तो त्या उपाधींच्या धर्मांनाच प्रकाशित करतो.

हीच गोष्ट "**श्रीत्रिकसार**" या ग्रंथात पुढीलप्रमाणे वर्णिली आहे.

**देहोत्थिताभिर्मुद्राभिर्यः सदा मुद्रितो बुधः।**
**स तु मुद्राधरः प्रोक्तः शेषा वै अस्थिधारकाः।।**

**अर्थ :-** तो बुद्धिकौशल्ययुक्त सिद्धयोगी शरीरकलेच्या साधारण क्रियांमध्ये नेहमी "**अन्तर्लक्ष्यबहिर्दृष्टिः।।**" अशा प्रकारच्या शांभवी मुद्रेने मुद्रित होतो. त्यालाच मुद्राधर अर्थात् श्रीशिव असे म्हटले आहे. बाकी सर्व प्राणिमात्र हाडेच धारण करणारे असतात.

या संसिद्धयोग्याच्या आत्मज्ञानाचे फळ आचार्य भगवान् आद्य श्रीशंकराचार्य "**श्रीविवेकचूडामणि**" या ग्रंथात पुढीलप्रमाणे सांगतात.

**संसिद्धस्य फलं त्वेतज्जीवनमुक्तस्य योगिनः।**
**बहिरन्तः सदानन्दरसास्वादनमात्मनि।।४१९।।**

**अर्थ :-** आत्मज्ञानामध्ये सम्यक् सिद्धी प्राप्त केलेल्या जीवनमुक्त सिद्धयोग्याला आपल्या आत्म्याच्या नित्यानंदरसाचे आतून बाहेरून निरंतर आस्वादन करीत राहणे हेच फळ मिळते.।।४१९।।

अशा प्रकारे आत-बाहेर नित्यानंदरसाचे निरंतर आस्वादन करणे हीच पराभक्ती आहे अर्थात् श्रीशिवभक्तीच्या अमृताने परिपूर्ण शरीरात सिद्धयोग्याची जी स्थिती असते तेच त्याचे व्रत आहे.

या स्थितीची पुष्टी करण्यासाठी भगवान् श्रीउत्पलदेवाचार्य "**श्रीशिव-स्तोत्रावली**" या ग्रंथामध्ये भगवान् श्रीशिवांची पुढीलप्रमाणे अलौकिक प्रार्थना

करतात.

**अन्तरुल्लसदच्छाच्छभक्तिपीयूषपोषितम्।**
**भवत्पूजोपयोगाय शरीरमिदमस्तु मे।।१७.२६।।**

**अर्थ :-** हे श्रीशंकरा! अंतःकरणात संवित्पदात मग्न झालेल्या अत्यंत निर्मल भक्तिपीयूष अर्थात् सामरस्यरूप अमृताने पोसलेले माझे शरीर आपल्या पूजेच्या उपयोगी यावे अर्थात् आपल्या चिदानंदघनस्वरूपातच विलीन होऊन जाऊ दे.।।१७.२६।।

स्वरूपविमर्श अर्थात् स्वरूपज्ञान आणि पराभक्ती हे दोन्ही शब्द सारख्याच अर्थाचे आहेत; कारण ते एकमेकांवर अलंबून आहेत.

पराभक्तिस्वरूप भगवान् श्रीउत्पलदेवाचार्य अलौकिक भक्तिरसपूर्ण अशा **"श्रीशिवस्तोत्रावली"** या ग्रंथात असे म्हणतात की -

**यद्यथास्थितपदार्थदर्शनं युष्मदर्चनमहोत्सवश्च यः।**
**युग्ममेतदितरेतराश्रयं भक्तिशालिषु सदा विजृम्भते।।१३.७।।**

**अर्थ :-** ज्ञानकाळी सर्व सांसारिक वस्तूंना आपणाहून अभिन्न पाहणे आणि ध्यान, दर्शन आणि स्पर्शनभक्तिकाली आपल्या पूजेचा उत्सव करणे या दोन्ही गोष्टी एकमेकांवर अवलंबून असतात. आपल्या एकनिष्ठ भक्तांमध्ये या दोन्ही गोष्टींचा क्रममुद्रेने अखंड विकास होत असतो.।।१३.७।।

याच भावाने सिद्धयोग्याच्या शरीरातली स्थिती साधारण नियमांनुसारच असते.।।२६।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

असे असूनही **"येनेदं तद्धि भोगतः।।"** अर्थात् **"शरीर हे भोगांचे स्थान आहे,"** या वचनानुसार प्राप्त झालेले भोग भोगण्यासाठीच केवळ हा देह आहे याचे अतिक्रमण होत नाही व करू नये. जरी संचित व क्रियमाण ही कर्मे ज्ञानाग्नीने भस्म झाली तरी प्रारब्धकर्म भोगाशिवाय नष्ट करणे अशक्य असल्याने जीवन्मुक्तही देहात राहून बरे व वाईट भोग भोगतो. कुलालचक्र म्हणजे कुंभाराचे चाक व बाण वेग असेपर्यंत भ्रमण व गमनादि करीत असतात. देहपातानंतर विदेहमुक्ती मिळते यात पुनरावृत्ती नाही. हे **"शरीरवृत्तिर्व्रतम्।।२६।।"** या सूत्रात सांगितले आहे.

श्रीशिवतुल्य सिद्धयोग्याचे अर्थात् "मी श्रीशिव आहे," अशा भावाने अस्तित्वात असणाऱ्या सिद्धयोग्याचे शरीरात राहणे हेच व्रत आहे. हे व्रत त्याने स्वस्वरूप-विचार करीत करीत श्रीशिवपूजापरायण होऊन नियमाने

चालवावे.

यासंबंधी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सुप्रदीप्ते यथा वह्नौ शिखा दृश्येत चाम्बरे।**
**देहप्राणस्थितोप्यात्मा तद्वल्लीयेत तत्पदे।।४.३९४।।**

**अर्थ** :- ज्याप्रमाणे चांगल्या प्रकारे प्रज्वलित झालेल्या अग्नीची ज्वाळा आकाशात दिसते त्याप्रमाणे देह आणि प्राण यांच्यात स्थित असूनही सिद्ध-योग्याचा आत्मा श्रीशिवपदात लीन झालेला असतो.

**विवरण** :- देह, मंत्र, प्राण, आत्मा आणि श्रीशिव या पाच तत्त्वांसाठी त्यांना योग्य असे काठी, रवी किंवा अरणी, अग्नी, त्याची ऊर्ध्वज्वाला व आकाश यांचे दृष्टान्त घेतले आहेत. अरणिमंथनाच्या पद्धतीने अग्नी प्रदीप्त झाला असता तो दाह्यवस्तूचे भस्म करून शिखारूपाने गगनात दिसतो व तेथे लय पावतो. तसेच दिव्यकरण अर्थात् इंद्रियरूप अर्थात् मंत्ररूप अरणीने प्रज्वलित केलेला प्राण हा उदानाग्नीच्या स्वरूपाचा होतो. देहात स्थित असणारा केवळ शुद्ध विज्ञानरूप आत्मा त्या अग्निशिखेप्रमाणे असून मनासह देहरूपी लाकडे जाळून तुर्यातीत पदात लय पावतो म्हणजेच निरुपाधिक अशा श्रीशिवांशी एकात्मता पावतो व जीवन्मुक्तावस्था भोगतो.

असे म्हणून देहप्राणादि बाह्य स्वरूपात असणाऱ्या सिद्धयोग्याचा श्रीशिवांमध्ये समावेश सांगितला. त्याला देहस्थितिव्यतिरिक्त कोणतेही व्रत उपयोगी नाही.

यासंबंधी "**श्रीत्रिकसार**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**देहोत्थिताभिर्मुद्राभिर्यः सदा मुद्रितो बुधः।**
**स तु मुद्राधरः प्रोक्तः शेषा वै अस्थिधारकाः।।**

**अर्थ** :- देहात असतानाच जो ज्ञानी "**अंतर्लक्ष्यबहिर्दृष्टिः।।**" या शांभवीय मुद्रेने मुद्रित असतो तोच खरा मुद्राधर अर्थात् मुद्रा धारण करणारा होय. इतर मात्र केवळ हाडे धारण करणारे शारीरिक कसरतपटू समजावेत.

**विवरण** :- निगूढमुद्राधारी सिद्धाकडे सर्व शक्तिदेवता आकर्षित होतात. स्थूल स्वरूपात व्यक्त झालेल्या मुद्राधाऱ्यांकडे त्या फिरकतही नाहीत.

"**श्रीकुलपंचाशिका**" या ग्रंथात वरील संदर्भाला अनुसरून असे म्हटले आहे की -

**अव्यक्तलिङ्गिनं दृष्ट्वा सम्भाषन्ते मरीचयः।**
**लिङ्गिनं नोपसर्पन्ति अतिगुप्ततरा यतः।।**

**अर्थ :-** ज्यांनी कोणतेही धार्मिक चिह्न धारण करण्याचा बहाणा केलेला नाही अशांशीच सर्वश्रेष्ठ शक्ती (उदा. प्रकाशकिरणे आदि) संभाषण करतात. या शक्ती खोटी धार्मिक चिह्ने धारण करणाऱ्यांच्या जवळही येत नाहीत; कारण या अत्यंत गुप्त असतात.

**विवरण :-** ज्यावेळेला सत्याची जाणीव अथवा ज्ञान होते त्यावेळेला शक्तिचक्र म्हणजेच शक्तींचे यजमान हे श्रीशैवागमाप्रमाणे सिद्धयोग्यापुढे व्यक्त होतात. या कारिकेत असे म्हटले आहे की, जो केवळ धार्मिकतेच्या बाह्य खुणांवर विश्वास ठेवतो आणि अध्यात्मिकतेच्या बाबतीत नादार असतो अशा मनुष्याला त्या शक्ती कधीच प्राप्त होत नाहीत. त्या शक्ती ज्याला आत्मज्ञान झाले आहे, जो गंध, भगवे कपडे आदि बाह्य कर्मांना भुलत नाही आणि त्यांना फारशी किंमत देत नाही, अशांनाच व्यक्त होतात.।।२६।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा अभ्यास करणाऱ्या सिद्धयोग्याला येणारी नित्ययुक्तता कशी असते? हे स्पष्ट करण्यासाठी भगवान् श्रीशिवांनी व्रतनिरूपिक असे **"शरीरवृत्तिर्व्रतम्।।२६।।"** हे सूत्र सांगितले आहे.।।११२।।

या साधकभक्तयोगिशिष्याचे शरीर हेच रुंडमाला होत. हात हेच कपाल म्हणजे भिक्षापात्र होय. पाठीचा कणा हाच दंड असून हात, पाय व गळा या गात्रांमधील असणाऱ्या।।११३।।

पाच अस्थींचे खंड याच पाच मुद्रा होत. त्याचे तेज हेच त्याचे भस्म होय. त्रिगुण हेच त्या नित्ययुक्त सिद्धयोग्याचे जानवे आणि ध्वज हाच महामार्ग होय.।।११४।।

इंद्रिये हीच त्या सिद्धयोग्याची आभूषणे होत. विषयांचे सेवन अथवा उपभोग हाच विहार होय. हृदयरूप स्मशानावर त्याची नेहमी आसक्ती असते. तसेच काया अर्थात् शरीर, वाचा आणि मन यांनी स्फुरणारा ।।११५।।

जो व्यवहार अथवा हालचाल हाच वीरेशाचा म्हणजेच इंद्रियजय झालेल्या सिद्धयोग्याचा उत्सवसमारंभ होय. हे कोणत्याही प्रतिबंधांनी रहित अशा निजस्थितीचे किंवा आत्मस्थितीचे महाव्रत होय.।।११६।।

**विवरण :-** पूर्वी सांगितल्याप्रमाणे अभ्यासू साधकभक्तयोगिशिष्याचे पाशुपत नावाचे महाव्रत सिद्ध होते. त्या व्रतात कंकाल, कपाल, दंड, पंचमुद्रा, भस्म, यज्ञोपवीत, ध्वज, भूषण, वसती व विहारादि सर्वसामग्री अप्रकट असे शारीरिक द्रव्य कल्पिले आहे. त्याने जर वरील गोष्टींऐवजी

बाह्य गोष्टी वापरल्या तर ती दांभिकता वाटते आणि त्यामुळे कदाचित् मलिनता येण्याचाही संभव असतो.।।२६।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**शरीरवृत्तिर्व्रतम्।।२६।।**" या सूत्रन्यायाने सांगितलेल्या दृष्टीने श्रीशिवतुल्य म्हणजेच "मी श्रीशिव आहे," या भावनेने राहणाऱ्या सिद्ध-योग्याच्या शरीरात ज्या वृत्ती अथवा जे वर्तन आहे तेच त्याचे व्रत म्हणजेच नियमाने अनुष्ठान करण्याचे कर्म आहे. त्याला देहस्थितिव्यतिरिक्त दुसरे व्रत असत नाही.।।२६।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

शक्तिपातयोगदीक्षेने पूर्वी केलेले कर्म नाहीसे होते म्हणजेच त्याचे फळ भोगावे लागत नाही. यमादिसाधनांनी पुढे होणारे क्रियमाण कर्म नष्ट होते; तर प्रारब्ध कर्म हे भोगून संपते.।।१०३।।

अग्नीने जळालेले बी जसे अंकुरोत्पत्तीला निरुपयोगी असते तसेच संचित आणि क्रियमाण कर्म दीक्षा व यमादि साधनांनी अडविले जाते व ज्यामुळे हे शरीर झाले ते कर्म भोगून संपवावे लागते.।।१०४।।

या उक्तीप्रमाणे प्रारब्धाने प्राप्त झालेल्या भोगांचा उपभोग घेणाऱ्या सिद्ध-योग्याला "**शरीरवृत्तिर्व्रतम्।।२६।।**" या सूत्रन्यायाने या शरीराची स्थिती चालू ठेवावी असा उपदेश केला जातो.।।१०५।।

अशा प्रकारे पूर्वी सांगितलेल्या नियमाप्रमाणे सतत श्रीशिवात्मक आत्म्याच्या पूजोपासनेत तत्पर असा श्रीशिवतुल्य सिद्धयोगी श्रीशिवांची अशी प्रार्थना करतो की,।।१०६।।

हे आत्मरूप श्रीशिवप्रभो! चित्तात उल्लसित झालेल्या भक्तिरूप अमृताने पुष्ट झालेले हे शरीर तुमच्या पूजेच्या उपयोगासाठी राहावे.।।१०७।।

अशा प्रकारे लोकोत्तर व श्रेष्ठ पुरुष असलेल्या श्रीमदुत्पलाचार्य यांनी सांगितलेल्या या उपदेशानुरूप श्रीशिवभक्तिरूप अमृताने परिपूर्ण असणाऱ्या शरीरात जी वृत्ती असते।।१०८।।

ती अनुष्ठेय व्रतच आहे. अशा सिद्धयोग्याचे शरीरधारण हे तुच्छ समजू नये.।।१०९।।२६।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

अशा प्रकारे पूर्वजन्मांमधून प्राप्त झालेल्या शुभ व अशुभ किंवा चांगल्या व वाईट कर्मांचा भोगामुळेच नाश होतो. ती कर्मे नष्ट होईपर्यंत या सिद्धयोग्याचा

देह अस्तित्वात असतो असे "**शरीरवृत्तिर्व्रतम्।।२६।।**" या सूत्रात सांगितले आहे.

"मी साक्षात् श्रीशिव आहे," अशा भावनेने अथवा विचाराने स्थित असणाऱ्या श्रीशिवांचा साक्षात्कार झालेल्या सुप्रबुद्धाचे जे वर्तन किंवा आचरण असते तेच या सिद्धयोग्याचे व्रत होय; कारण शाश्वत असणाऱ्या संवित्प्रकाशरूप श्रीशिवात्मक स्वस्वरूपाचे अनुसंधान करण्यात तत्पर असणाऱ्या सिद्धयोग्याने नियमाने अनुष्ठान करावे. इतर कोणत्याही गोष्टीचा उपयोग होत नाही.

"**श्रीशिवस्तोत्रावली**" या ग्रंथात आचार्य श्रीउत्पलदेव असे म्हणतात की -

**अन्तरुल्लसदच्छाच्छभक्तिपीयूषपोषितम्।**
**भवत्पूजोपयोगाय शरीरमिदमस्तु मे।।१७.२६।।**

**अर्थ :-** हे श्रीशंकरा! अंतःकरणात संवित्पदात मग्न झालेल्या अत्यंत निर्मल भक्तिपीयूष अर्थात् सामरस्यरूप अमृताने पोसलेले माझे शरीर आपल्या पूजेच्या उपयोगी यावे.।।१७.२६।।

**यद्यथास्थितपदार्थदर्शनं युष्मदर्चनमहोत्सवश्च यः।।**
**युग्ममेतदितरेतराश्रयं भक्तिशालिषु सदा विजृम्भते।।१३.७।।**

**अर्थ :-** ज्ञानकाळी सर्व सांसारिक वस्तूंना आपल्याहून अभिन्न पाहणे आणि ध्यान, दर्शन आणि स्पर्शनभक्तिकाली आपल्या पूजेचा उत्सव करणे या दोन्ही गोष्टी एकमेकांवर अवलंबून असतात. आपल्या एकनिष्ठ भक्तांमध्ये या दोन्ही गोष्टींचा क्रममुद्रेने अखंड विकास होत असतो.।।१३.७।।

त्यामुळेच "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सुप्रदीप्ते यथा वह्नौ शिखा दृश्येत चाम्बरे।**
**देहप्राणस्थितोप्यात्मा तद्वल्लीयेत तत्पदे।।४.३९८।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे लाकडाच्या समूहाला लागलेली अग्नीची ज्वाळा आकाशात लीन होताना दिसते त्याप्रमाणेच देहप्राणादींमध्ये स्थिर असणारा संसिद्ध योग्याचा आत्मा तत्पद अर्थात् श्रीशिवस्वरूपात लीन होतो.

ज्याप्रमाणे अरणीत असलेला अग्नी चांगला प्रदीप्त होऊन ज्वालेच्या रूपाने आकाशात लीन होतो त्याचप्रमाणे दिव्य अशा करणमंत्राच्या रूपातल्या अरणीला उत्तेजन दिल्यामुळे देहामध्ये जो प्राण असतो त्याचे प्रज्वलन झाल्यामुळे मध्य, उर्ध्व व बाह्य उदानवायू अग्नितत्त्वाला प्राप्त होतो. देहात स्थिर असणारा ज्ञानप्रकाशरूप आत्मा अग्नीच्या ज्वाळेसमान समनेपर्यंत सर्व

देहारणिरूप जाळण्याला योग्य अशा सर्वांना जाळून त्या परधामात विलीन होतो.

या परमयोग्याच्या प्रारब्धकर्माचा क्षय होईपर्यंतच देहाची स्थिती असते. देहप्राणादींमध्ये स्थित असूनही हा सिद्धयोगी श्रीपरमशिवस्वरूपात स्थित असतोच. त्यामुळे त्याला देहाची स्थिती कायम ठेवण्याव्यतिरिक्त आणखी कोणतेही व्रत उपयोगी नसते. मात्र तो स्वभावतःच एकमात्र चिद्रूपस्वरूप असूनही उपाधींचा संबंध आल्याने त्याच गुणांनी युक्त होऊन त्या त्या गुणांच्या धर्मांचे प्रकाशन करतो.

त्यामुळेच श्रीमदाद्यशंकराचार्य यांनी **"श्रीविवेकचूडामणि"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**उपाधिसम्बन्धवशात्परात्मा ह्युपाधिधर्माननुभाति तद्गुणः।**
**अयोविकारामविकारि वह्नीवत्सदैकरूपोपि परः स्वभावात्।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे अविकारी अग्नी लोखंडाच्या गोळ्यामुळे विकारी वाटतो त्याप्रमाणेच एकरूप असूनही परमात्मा आपल्या स्वभावाहून वेगळा भासतो व उपाधींच्या संबंधांमुळे परमात्म्यावर त्या उपाधिधर्मांचाच व त्यांच्या गुणांचा आभास होतो;

कारण तो स्वतंत्रयोगी **"अंतर्लक्ष्यबहिर्दृष्टिः।।"** अशा प्रकाराने श्रीभैरवीमुद्रेच्या मुद्रणानेच मुद्रा धारण करणारा होत असल्याने शरीराच्या अवयवांवर काहीतरी विशिष्ट मुद्रा धारण केल्याने तो मुद्राधर होत नाही.

**"श्रीत्रिकसार"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**देहोत्थिताभिर्मुद्राभिर्यः सदा मुद्रितो बुधः।**
**स तु मुद्राधरः प्रोक्तः शेषा वै अस्थिधारकाः।।**

**अर्थ :-** देहातून उत्पन्न झालेल्या मुद्रांनी जो विद्वान् मुद्रित झालेला असतो तोच खरा मुद्राधर असून बाकीचे केवळ अस्थी धारण करणारे असतात.

शांभवीयमुद्रेने मुद्रित झालेल्या सिद्धयोग्याच्या सर्व शक्ती प्रकट होतात. स्थूलमुद्रातरुपरिगमन अर्थात् स्थूलमुद्रा धारण करून हे घडणे असंभव आहे.

**विवरण :-** अशा सिद्धयोग्याच्या सर्व शारीरिक वृत्ती किंवा क्रिया या व्रतरूप असतात.।।२६।।

**सूत्र क्रमांक २७**

**संबंध :-** आता अशा संसिद्ध योग्याच्या बोलणे इत्यादींविषयी सूत्र

सांगत आहेत.

**कथा जपः ।।२७।।**

**शब्दार्थ :- कथा** - बोलणे अर्थात् मी श्रीशिव आहे या वृत्तीवर अखंड आरूढ झालेल्या सिद्धयोग्याचे लौकिक व्यवहारानुसार होणारे बोलणे. **जपः** - जप अर्थात् ते बोलणे स्वात्मदेवतेच्या भावनेच्या तात्पर्याने जपरूपच असते.

**अर्थ :-** अशा सिद्धयोग्याचे बोलणे हा जप असतो अर्थात् अहं विमर्शावर आरूढ झालेल्या सिद्धयोग्याचा जो काही लौकिक व्यवहार होतो व त्यानुसार जे काही बोलणे होते ते सर्व स्वात्मदेवतेच्या भावनेच्या तात्पर्याने त्याचा जपच असतो.।।२७।।

**विशेष व्याख्या :-** पराहंभावनेत आरूढ झालेल्या सिद्धयोग्याच्या भावनेचा उल्लेख "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या तंत्रग्रंथात पुढीलप्रमाणे आहे.

**अहमेव परो हंसः शिवः परमकारण्।।४.३९५।।**

**अर्थ :-** मीच ते परहंसरूप श्रीशिव आहे. ते श्रीशिव अर्थात् मी सर्वांचे कारण असून सर्वत्र व्याप्त आहे.।।२७।।

हान म्हणजे त्याग आणि समाधान या धर्मांनी युक्त असल्याने श्रीशिवांना "**हंसः**" असे म्हटले आहे. अनुत्तरज्ञानाने युक्त असल्याकारणाने सिद्धयोग्याचे लौकिक व्यवहारानुसार जे काही बालणे होत असते तो त्याचा जपच असतो; कारण तो महामंत्ररूप स्वाभाविक विमर्शावर आरूढ झालेला असतो. तीच परप्रमातृ अशी अवस्था आहे.

यासंबंधी "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**भूयोभूयः परे भावे भावना भाव्यते हि या।**
**जपः सोऽत्र स्वयं नादो मन्त्रात्मा जप्य ईदृशः।।१४५।।**

**अर्थ :-** ज्या भावनेचे श्रीपरमेश्वरामध्ये अखंड अनुसंधान केले जाते तेथे पूर्णाहंतेचा परामर्श म्हणजेच जप होय. स्वतः नाद अर्थात् विमर्श हाच जप आहे.।।१४२।।

याविषयी "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात श्रीमहादेव श्रीपार्वतींना असे म्हणतात की -

**सकारेण बहिर्याति हकारेण विशेत्पुनः।**
**हंस हंसेति मन्त्रोयं जीवो जपति नित्यशः।।१५३।।**

**अर्थ :-** हे पार्वती! "**स**"काराने प्राणाचा प्रवाह बाहेर जातो आणि

"**ह**"काराने परत आत येतो. अशा प्रकारे "**हंस हंस**" या मंत्राचा जप जीव सतत करीत असतो.।।१५३।।

परंतु साधकभक्तयागिशिष्य मात्र सुषुम्नामार्गात हाच मंत्र उलट करून म्हणजेच "**सोऽहं सोऽहं**" असा मंत्रजप नित्य करीत असतो. यालाच वास्तविक मंत्रयोग असे म्हणतात. या जपाची संख्या श्रीमहादेवांनी "**श्रीविज्ञान-भैरव**" या ग्रंथात पुढीलप्रमाणे सांगितली आहे.

**षट्शतानि दिवारात्रौ सहस्त्राण्येकविंशतिः।**
**जपो देव्यः विनिर्दिष्टः सुलभो दुर्लभो जडैः।।१५६।।**

**अर्थ :-** पराशक्तीचे निर्देशन करणारा हा जप दिवसरात्र एकवीस हजार सहाशे वेळेला साधकभक्तयोगिशिष्याला सुलभपणे करता येतो; पण अज्ञानी मनुष्यासाठी असे होणे दुर्लभ आहे.।।१५४।।

त्यामुळेच स्वात्मदेवतेच्या विमर्शनात असणाऱ्या सिद्धयोग्याचे सर्वसाधारण बोलणेसुद्धा त्याचा जपच असतो.।।२७।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

"**कथा जपः।।२७।।**" या सूत्रन्यायानुसार "अशा प्रकारच्या सिद्धयोग्याचे सहज बोलणे म्हणजेही जपच असतो;" कारण तो नित्यच पराहंभावनेने युक्त असतो.

यासंबंधी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**अहमेव परो हंसः शिवः परमकारणम्।।४.३९५।।**

**अर्थ :-** मीच परम आत्मा आहे आणि मीच परमकारण श्रीशिव आहे.

यासंबंधी "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**तस्य देवातिदेवस्य परबोधस्वरूपिणः।**
**विमर्शः परमा शक्तिः सर्वज्ञा ज्ञानशालिनी।।**

**अर्थ :-** परबोधस्वरूप अर्थात् श्रेष्ठज्ञानस्वरूप अशा सर्वश्रेष्ठदेवांची सर्वज्ञ व ज्ञानशाली परमशक्ती कुंडलिनी म्हणजेच त्या सिद्धयोग्याचा सतत होणारा विमर्श होय.

**विवरण :-** अशा महामंत्रात्मक सत्यविमर्शावर आरूढ सिद्धयोग्याचे कोणतेही बोलणे हे स्वात्मदेवतेचा जपच होय. अनुत्तरज्ञानस्वभावामुळे सिद्ध-योग्याचा जो आलापादि म्हणजेच लौकिक व्यवहार होतो तोच त्याचा जप होय; कारण अहंपरामर्शसार अशा स्वात्मदेवतेच्या भावनेच्या तात्पर्यामुळेच हे होते. याचा भावार्थ असा आहे की, प्रकाशयुक्त परप्रमात्याशिवाय काहीही

अभिव्यक्त होणार किंवा होत नाही.

यासंबंधी "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**भूयो भूयः परे भावे भावना भाव्यते हि या।**
**जपः सोऽत्र स्वयं नादो मन्त्रात्मा जप्य ईदृशः।।१४५।।**

**अर्थ :-** परम अहं जाणिवेत परत परत केले जाणारे चिंतन म्हणजेच जप होय. हा आतला, स्वयंस्फूर्त व मंत्राच्या स्वरूपाचा नाद सतत चिंतिला पाहिजे अर्थात् या अनाहतनादाचे सतत अनुसंधान केले पाहिजे. हा सूक्ष्म जपाचा श्रेष्ठ प्रकार साधकभक्तयोगिशिष्याने अवश्य केला अर्थात् अनुसरला पाहिजे.

**विवरण :-** विश्वाचे पूरण म्हणजे पोषण करते म्हणून पर किंवा श्रेष्ठ अशा भावात म्हणजे स्वस्वभावात जी भावना, विमर्शना अथवा मीच परमात्मा व परमकारण श्रीशिव आहे, अशा प्रकारचा विचार संपादिला जातो तो जप होय. नाद म्हणजे अकृत्रिम अहंविचारयुक्त व जपण्याला योग्य असा स्वात्मदेवच होय.

यासंबंधी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**नास्योच्चारयिता कश्चित्प्रतिहन्ता न विद्यते।**
**स्वयमुच्चरते देवि प्राणिनामुरसि स्थितः।।**

**अर्थ :-** या जपाचा अर्थात् अनाहतनादाचा कोणीही उच्चार करविणारा नाही अथवा त्याला नष्ट करणारा नाही. हाच म्हणजे स्वात्मदेवच प्राण्यांच्या अर्थात् जीवमात्राच्या हृदयात स्थिर होऊन स्वतःच उच्चारित होत असतो.

**सकारेण बहिर्याति हकारेण विशेत्पुनः।**
**हंस-हंसेत्यमुं मन्त्रं जीवो जपति नित्यशः।।**
**षट्शतानि दिवारात्रौ सहस्राण्येकविंशतिः।**
**जपो देव्या विनिर्दिष्टः सुलभो दुर्लभो जडैः।। विज्ञानभैरव।।**

**अर्थ :-** "**स**" असा आवाज करून श्वास बाहेर जातो आणि "**ह**" असा आवाज करीत आत परत येतो. त्यामुळे हंस-हंस असा मंत्र जीव सतत जपत असतो.

दिवस-रात्र या कालावधीत तो या मंत्राचा एकवीस हजार सहाशे वेळा जप करतो. असा हा श्रीदेवीचा म्हणजे योगी लोकांच्या श्रीगायत्रीचा जप सांगितला असून तो ज्ञानाला सुलभ आहे; मात्र हा जप जडबुद्धी मनुष्याला करण्याला अवघड आहे.।।२७।।

**विवरणात्मक टीपा :-**

१) **जप :-** आत्म्याची जाणीव ही देहात नादरूपाने आपोआप व

कोणीही उच्चार न करता ऐकू येणाऱ्या अनाहतनादरूपाने होत असते. हाच गुप्त अनाहतनादरूपी जप होय. सिद्धयोगी त्याची आत्मज्ञानावरची पकड कधीही सोडत नाही. अगदी तो इतरांशी बोलत असेल तरीही तो आतून आत्मज्ञानात मग्नच असतो. त्यामुळे हा त्याचा जपच असतो. जप या शब्दाची व्युत्पत्ती अशी दिली जाते की "ज" म्हणजे जनि अर्थात् जन्म किंवा उत्पत्ती आणि "प" म्हणजे पालन म्हणजे रक्षण होय. त्यामुळे जप याचा अर्थ असा होतो की, जो निर्मित प्राण्यांचे रक्षण करतो तो जप होय.

२) **हंसमंत्र** :- प्रत्येक श्वास-प्रश्वासाच्या वेळेला जीवाकडून "**हंस**" हा मंत्र आपोआप जपला जात असतो. यालाच "**हंसमंत्र**" असे म्हणतात. यालाच अजपाजप म्हणजे आपोआप होणारा जप असेही म्हणतात. या मंत्रातला "**ह**" म्हणजे शक्ती, "**स**" म्हणजे श्रीशिव आणि "**अम्**" हा जीवाचे प्रतिनिधित्व करणारा आहे. अपान अथवा आत येणारा श्वास म्हणजे शक्ती होय. प्राण किंवा बाहेर जाणारा श्वास अर्थात् उच्छ्वास हा श्रीशिवांचे प्रतिनिधित्व करतो. यालाच त्रिकमंत्र असेही म्हणतात; कारण याच्यात श्रीशिव, शक्ती व नर अर्थात् जीव ही तीन तत्त्वे आहेत. साधकाने "**अम्**"वर लक्ष केंद्रित करावे; कारण तो "**ह**" आणि "**स**" यांच्यामधला अथवा त्यांना जोडणारा बिंदू आहे.

३) **हंसजपसंख्या** :- एका श्वास-प्रश्वासाच्या फेरीला चार सेकंद लागतात. त्याप्रमाणे हंस मंत्राचा एका मिनिटात पंधरा वेळा आपोआप जप होतो. एका तासात पंधरा गुणिले साठ याप्रमाणे नऊ शे वेळा हा जप होतो. त्याप्रमाणे एक पूर्ण दिवस व रात्र या काळात नऊ शे गुणिले चोवीस याप्रमाणे एकवीस हजार सहा शे वेळा जीवाकडून हा जप जपला जातो.।।२७।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक** :-

अशा प्रकारे व्रत धारण करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याचा जप कशा प्रकारचा असतो? हे भगवान् श्रीशिवांनी "**कथा जपः ।।२७।।**" या सूत्रात सांगितले आहे.।।११६.५।।

कर्तृभूमिकेवर आरूढ असा प्रबुद्ध योगी जे जे बोलतो तो तो त्याचा जप होतो. व्रती योग्याच्या या जपामुळे तो पुरुषोत्तम होतो. सामर्थ्याचे अवलंबन, उच्चार व संचारादि कथा हाच जप होय.।।११७,११८।।

हा जप चार प्रकारचा आहे. शाक्त, हंस, पौद्गल आणि निष्कल हे ते चार प्रकार होत. शाक्त म्हणजे चिद्रूपाचा अहंकार होय.।।११९।।

निष्कलजप हा प्रणवाच्या अकारादि अंगाचा जप होय. हंसजप हा नादकलात्मक होय. जीवजप हा पौद्गलजप वायुरूप असून तो अजपाजप म्हणजे स्वतःच आपोआप होणारा (२१६००) आणि आयुष्य भर सतत चालू राहणारा असतो.।।१२०-१२०.५।।

**विवरण :-** अशा महाव्रतधारी इंद्रियजयी योग्याचा म्हणजे वीरेशाचा श्रेष्ठ वीर्यानुप्राणनामुळे निष्कल, हंस, पौद्गल व शाक्तरूप चार प्रकारच्या मंत्रांचा जप सतत चालू असतो. त्यात खंड पडत नाही; कारण या जपाचे स्वरूप स्वात्मदेवतेच्या विचारार्थाने युक्त असते व त्याचे सतत परिशीलन अर्थात् अभ्यास चालू असतो.।।२७।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"कथा जपः।।२७।।"** या सूत्रन्यायानुसार **"अहमेव परो हंसः शिवः परमकारणम्।।"** अर्थात् "मीच परमहंस श्रीशिव आहे व सर्वांचे परमकारण आहे," या नियमानुसार सर्वदा पर किंवा श्रेष्ठ अहंभावाने युक्त असल्यामुळे महामंत्रात्मक व अकृत्रिम अशा अहंविचारावर आरूढ झालेल्या सिद्धयोग्याचे जे जे काही बोलणे असते ते ते स्वात्मदेवतायुक्त विचाररूप जपच असतो असे समजावे.।।२७।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारच्या "सिद्धयोग्याचे जे जे सहज बोलणे असते ते ते बोलणे जपच समजावे," असे **"कथा जपः।।२७।।"** या सूत्राने कथन केले आहे.।।१०९।।

"तुझ्या अर्थात् श्रीसद्गुरूंच्या महामंत्रमय, स्वच्छ, शांत, अपूर्व सुगंधाने भरलेल्या व परमामृतरसाने ऊज्ज्वल अशा रूपाला मी स्तवितो."।।११०।।

अशा श्रीप्रत्यभिज्ञाकर्ते श्रीसद्गुरुश्रेष्ठांनी उद्धृत केलेल्या मार्गदर्शनानुरूप स्वाभाविकरीत्या आत्मतत्त्वाचाच विचार करणाऱ्या।।१११।।

साधकश्रेष्ठाच्या स्वैरालापाप्रमाणे असणाऱ्या यथार्थ प्रतिपादन करणाऱ्याच्या कथा म्हणजे वारंवार परतत्त्वाच्या ठिकाणी जी भावना केली जाते तो जपच समजावा. स्वतः सिद्धयोगी हा नादरूप आहे व जप्य वस्तू ही मंत्ररूप आहे असे समजावे.।।११२,११२.५।।

दिवसरात्र मिळून एकवीस हजार सहाशे जप देवतेचा वर्णिला आहे. हा ज्ञात्यांना सुलभ व जडांना दुर्लभ आहे. या उक्तीनुसार सर्वत्र आत्मविषयक संपत्तीने युक्त अशा सिद्धयोग्याचे संभाषण म्हणजे जपच होय.।।११३-११४।।

जनन व पालन अशा धर्मांनी युक्त असल्यामुळे त्याला जप असे म्हटले जाते. आता अशा प्रकारच्या अधिकारी सिद्धयोगींद्रांनी सामान्यलोकांविषयी केलेले योग्य संभाषण देखील किंवा इतर सुद्धा ज्या गोष्टी सामान्य लोक करतात।।११५।।

त्या गोष्टीही जपाप्रमाणेच समजाव्यात; कारण त्यातून लोकांचे जनन आणि पालन होतच असते.।।२७।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

"या सिद्धयोग्याचे स्वतःचे बोलणेही जपकार्य होते," असे "**कथा जपः ।।२७।।**" या सूत्रात सांगितले आहे.

परिपूर्णाहंतेच्या भावनेने शुद्ध झालेल्या सिद्धयोग्याचा जो काही स्वाला-पादि व्यवहार असतो तोच त्याचा जप असतो.

याबद्दल "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**अहमेव परो हंसः शिवः परमकारणम्।।४.३९९।।**

**अर्थ :-** मीच सर्वश्रेष्ठ हंस, श्रीशिव व सर्वांचे आदिकारण आहे.।।४.३९९।।

त्यामुळेच स्वस्वभावात म्हणजेच श्रीपरमशिवांमध्ये परत परत जी भावना अथवा विमर्शना कल्पिली जाते किंवा तिचे ध्यान केले जाते तोच जप होय. स्वतः नाद हा मंत्रयुक्त अकृतक किंवा सत्य व अहंविमर्शात्मा जप्य म्हणजेच जपण्यास योग्य आहे. तोच स्वात्मदेव आहे.

यासंबंधी "**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**नास्योच्चारिता कश्चित्प्रतिहन्ता न विद्यते।**
**स्वयमुच्चरते देवि! प्राणिनामुरसि स्थितः।।**

**अर्थ :-** या जपाचे उच्चारण करणारा कोणीही नाही आणि तो बंद करणाराही कोणी नाही. हे देवी! हा जप प्राण्यांच्या हृदयात स्थिर होऊन स्वतःच उच्चारण करीत असतो.

त्याचप्रमाणे "**श्रीयोगिनीहृदयदीपिका**" या ग्रंथात असे म्हटले आहे की-

**संयम्येन्द्रियसञ्चारं प्रोच्चरन्नादमान्तरम्।**
**एष एव जपः प्रोक्तो न तु बाह्यजपो जपः।।**

**अर्थ :-** इंद्रियांचा त्यांच्या विषयांकडे असणारा संचार नियमित करून आंतरिक नादाचा उच्चार किंवा प्रकटीकरण होणे हाच जप आहे. बाह्यजप हा खरा जप नाही.

इंद्रियांची बाह्य प्रवृत्ती नष्ट करून आंतर म्हणजे अनाहतनादाचे अनुसंधान

हा जप म्हणविला जातो. विकल्परूप विविध वर्णांच्या समूहाने बनलेल्या मंत्रांचे बाह्य उच्चारण म्हणजे जप नव्हे.

"**श्रीतंत्रालोक**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**तत्स्वरूपं जपः प्रोक्तो भावाभावपदच्युतः।।१.९०।।**

**अर्थ** :- त्या भाव व अभाव पदविरहित स्वरूपाचा जप करावा असे म्हटले जाते.।।१.३०।।

त्याचप्रमाणे "**श्रीपातंजलयोगसूत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**तज्जपस्तदर्थभावनम्।।१.२८।।**

**अर्थ** :- त्या प्रणवाचा जप अर्थात् सिद्धयोगसाधनामुळे म्हणजे श्रीसद्गुरु-कृपेने अर्थात् त्यांनी शक्तिपातयोगदीक्षा दिल्यानंतर जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीमुळे आतून आपोआप होणारा ॐकाराचा जप व त्याच्या अर्थाचे चिंतन करणे हे श्रीईश्वरप्रणिधान होय. त्या सिद्धयोग्याचे साधे बोलणेसुद्धा जप असतो.।।१.२८।।

**सूत्र क्रमांक २८**

**संबंध** :- सिद्धयोग्याविषयी सांगताना त्याचे व्रत आणि जप यांविषयी माहिती सांगितल्यावर आता या सूत्रात त्याची चर्या सांगितली आहे.

**दानमात्मज्ञानम्।।२८।।**

**शब्दार्थ :- दानम्** - हे सिद्धयोग्याचे दान. **आत्मज्ञानम्**- शक्तिपात-योगदीक्षाद्वारा आत्मज्ञान देणे अर्थात् कुंडलिनी शक्ती जागृत करणे.

**अर्थ** :- शिष्यांना अर्थात् साधकभक्तयोगिशिष्यांना शक्तिपातयोगदीक्षा देऊन त्यांची ज्ञानरूप कुंडलिनी शक्ती जागृत करणे हेच या सिद्धयोग्याचे आत्मज्ञानदान होय.।।२८।।

**विशेष व्याख्या** :- संसिद्ध योग्याचे चैतन्यरूप आत्म्याचे ज्ञान किंवा त्याला झालेला आत्म्याचा साक्षात्कार हेच त्याचे दान आहे.

दानाचे येथे बरेचसे अर्थ सांगितले आहेत. त्यातील काही अर्थ पुढील-प्रमाणे आहेत.

**१) दीयते परिपूर्णं स्वरूपम्** :- सिद्धयोगी परिपूर्ण स्वरूप अर्थात् पूर्णाहंतेला प्राप्त करवून देतो.

**२) दीयते खण्ड्यते विश्वभेदः** :- सिद्धयोगी पृथ्वीतत्त्वापासून श्रीशिवतत्त्वापर्यंत छत्तीस तत्त्वांच्या लक्षणांनी युक्त भेदाचे खंडन करतो.

**३) दीयते शोध्यते मायास्वरूपम्** :- सिद्धयोगी मायेच्या स्वरूपाचे

शोधन करतो.

**४) दीयते रक्ष्यते लब्धः शिवात्मा स्वभावश्च अनेन :-** सिद्धयोगी प्राप्त केलेल्या श्रीशिवस्वरूपाच्या स्वभावाचे निरंतर साधन करून रक्षण करतो.

**५) दीयते इति ज्ञानम् :-** शिष्यांना आत्मज्ञान देतो.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**दर्शनात्स्पर्शनाद्वापि वितताद्भवसागरात्।**
**तारयिष्यन्ति योगीन्द्राः कुलाचारप्रतिष्ठिताः।।**

**अर्थ :-** श्रीशैव सिद्धान्तात प्रतिष्ठित असणारे श्रेष्ठ सिद्धयोगी मोक्षाची इच्छा करणाऱ्या लोकांना या विस्तृत भवसागरातून आपल्या दर्शनाने किंवा चरणस्पर्शाच्या प्रभावाने पार करतात.

हेच त्यांचे उत्तम दान आहे.।।२८।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा प्रकारच्या जपव्रताचे अनुष्ठान करणाऱ्या सिद्धयोग्याचा दिनक्रम "**दानमात्मज्ञानम्।।२८।।**" या सूत्राद्वारा श्रीशिवांनी सांगितला आहे.

**विवरण :-** दिनक्रम म्हणजे स्वरूपाच्या साक्षात्काराच्या उपायाचे दान करणे हे सिद्धयोग्याचे कर्तव्य होय. दान या पदात संस्कृत "दा" असा धातू आहे. त्याचे एकूण चार अर्थ आहेत.

**१) देणे :-** परिपूर्ण स्वरूप दिले जाते.

**२) खंडन करणे :-** विश्वरूप पृथ्वीपासून श्रीसदाशिवापर्यंत छत्तीस तत्त्वांमधील भेदांचे खंडन केले जाते.

**३) शोधणे :-** मायास्वरूपाचे शोधन केले जाते.

**४) रक्षण करणे :-** प्राप्त झालेल्या श्रीशिवस्वभावाचे रक्षण केले जाते. (डुदाञ् दाने, दो अवखण्डने, दीङ् रक्षणे, दैप् शोधणे असे येथे धातू आहेत.)

त्यांपैकी आत्मज्ञान शिष्यांना देणे हाच अर्थ येथे अभिप्रेत आहे.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**दर्शनात्स्पर्शनाद्वापि वितताद्भवसागरात्।**
**तारयिष्यन्ति योगीन्द्राः कुलाचारप्रतिष्ठिताः।।**

**अर्थ :-** कुलाचारात प्रतिष्ठित झालेले श्रेष्ठ सिद्धयोगी दर्शन व स्पर्शन आदि प्रकारांनी साधकभक्तयोगिशिष्यांना या विस्तृत पसरलेल्या संसाररूप

सागरातून पार करतात.

**विवरण :-** योगिनीसिद्ध अशा श्रेष्ठ सिद्धयोग्यांनी दर्शन, स्पर्शन, चरुभोजन, कथन म्हणजे बोलणे व शास्त्रांचे आदान-प्रदान इत्यादि उपायांनी तीव्रशक्तिपाताने अनुग्रह करण्याला योग्य अशा साधकभक्तयोगिशिष्यांवर उपकार करावा असा याचा भावार्थ आहे. कुलाचार म्हणजे देहेंद्रियभुवनादींचा आचार म्हणजे सृष्टिसंहार होय.

कुलाचाराचा आणखी एक अर्थ त्रिकाचार म्हणजेच नर अर्थात् जीव, श्रीशिव आणि शक्ती यांचे एकीकरण असाही होतो.।।२८।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

जो अशा प्रकारे ज्ञानी, सिद्ध, जप व व्रतपरायण आहे त्याने कोणत्या प्रकारचे दान द्यावे? हे भगवान् श्रीशिवांनी "**दानमात्मज्ञानम्।।२८।।**" अर्थात् "आत्मज्ञान द्यावे," असे या सूत्रात सांगितले आहे.।।१२१-१२१.५।।

आत्मस्वरूपविषयक बुद्धी अथवा आत्मस्वरूपाची जाणीव होणे हे परम श्रेष्ठ ज्ञान असून त्यानेच कर्मबंधनांचे क्षपण होते अर्थात् त्यांचा नाश होतो. दीक्षा हा शब्द येथे दान आणि नाश या अर्थाने सर्वत्र वापरला आहे.।।१२२।।

**विवरण :-** जे तीव्र शक्तिपाताने युक्त आहेत आणि या आधी सांगितल्या-प्रमाणे जपव्रतपरायण आहेत त्यांनी सांगितलेल्या आणि पुढे सांगण्यात येणाऱ्या प्रक्रियेने येथे वर्णन केलेल्या आत्मज्ञानाचेच पशूंमध्ये म्हणजे जीवांमध्ये प्रकाशन करावे हेच दान किंवा सर्वात श्रेष्ठ ज्ञान होय.

जे पूर्वी सांगितले आहे आणि पुढेही सांगण्यात येणार आहे त्या ज्ञानाचे शक्तिपातयोगदीक्षेने प्रबुद्ध झालेल्या सिद्धयोग्यांनी योग्य प्रकारे प्रकाशन करणे हेच त्यांचे उत्तम प्रकारचे दान होय.।।१२३।।

या दानामुळे पशूंच्या म्हणजेच संकुचित असणाऱ्या जीवांच्या पाशांचे छेदन करावे अर्थात् त्यांना शक्तिपातयोगदीक्षा देऊन त्यांची अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्ययुक्त व श्रीशिवस्वरूपयुक्त अशी कुंडलिनी शक्ती जागृत करावी आणि त्यांना त्याद्वारे आत्मज्ञानाचा लाभ करवून द्यावा. हेच त्यांचे दान होय; कारण स्वरूपाचे ज्ञान करवून देणाऱ्या या सिद्धयोगिलोकांना अनुग्राह्यजीवांना दान-क्षपणरूप दीक्षा देण्याचा अधिकार प्राप्त होतो व या दीक्षेमुळे आणव-मायीयादि मलांचा म्हणजेच बंधांचा नाश होतो.।।१२४।।२८।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**दानमात्मज्ञानम्।।२८।।**" या सूत्रन्यायाप्रमाणे जे दिले जाते ते दान

होय. आत्मज्ञान हे या सिद्धयोग्याकडून आपल्या शिष्यांना दिले जाते.।।२८।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

आता यानंतर "**दानमात्मज्ञानम्।।२८।।**" या सूत्रानुसार या सिद्धयोग्याची मर्यादेला धरून असलेली चर्या म्हणजे आचरण सांगतो.।।११६।।

श्रीसद्गुरूंनी सांगितलेल्या चैतन्यरूप आत्म्याचा साक्षात्कार होऊन झालेले जे ज्ञान ते या सिद्धयोग्याचे दान होय. हे अत्यंत प्रयत्नाने दिले जाते.।।११७।।

हे ज्ञान परिपूर्ण रूपात दिले जाते. या ज्ञानाने भेदाचे खंडन केले जाते, आत्मरूपाचे शोधन केले जाते व ते परत इतरांना दिले जाते.।।११८।।

आत्मरूपाची ओळख सांगून जीवात्म्याची श्रीशिवरूपता रक्षिली जाते. तात्पर्य, श्रीसद्गुरूंकडून आपल्या शिष्यांना श्रेष्ठ असे आत्मज्ञान त्यांच्या कृपेने मिळते.।।११९।।२८।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

"अशा प्रकारच्या जपव्रताचे अनुष्ठान करणाऱ्या सिद्धयोग्याला स्व-स्वरूपाचा साक्षात्कार सतत होत असतो," असे "**दानमात्मज्ञानम्।।२८।।**" या सूत्रात सांगितले आहे.

पूर्वी सांगितलेल्या चैतन्यस्वरूपाचा अखंड साक्षात्कार करीत असणाऱ्या योग्याला जे आत्मज्ञान असते तेच त्याचे दान होय. परिपूर्ण पराहंतायुक्त स्वरूपाचे दान दिले जाते. या दानाने पृथ्वीपासून श्रीशिवांपर्यंत छत्तीस तत्त्वांचा भेद नष्ट केला जातो किंवा मायास्वरूप आत्मीय रूपाचे शोधन केले जाते किंवा स्मरण झालेल्या श्रीशिवात्म्याचे म्हणजेच स्वस्वरूपाचे रक्षण केले जाते. त्याचप्रमाणे स्वात्मज्ञानरूप अनुत्तरतत्त्वच अनुग्रहपूर्वक शिष्यांना सिद्धयोग्यांच्याकडून दिले जाते म्हणून ते दान होय, असे दान या शब्दाचे विविध अर्थ होतात.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**दर्शनात्स्पर्शनाद्वापि वितताद्भवसागरात्।**
**तारयिष्यन्ति योगीन्द्राः कुलाचारप्रतिष्ठिताः।।**

**अर्थ** :- कुलाचारात प्रतिष्ठित झालेले श्रेष्ठ सिद्धयोगी दर्शन व स्पर्शन इत्यादि शक्तिपातयोगदीक्षेच्या प्रकारांनी या विराट संसाररूपी सागरातून मानवांना तारतील अर्थात् तारतात.

परमाद्वैतभावनेत आरूढ झालेले सिद्धयोगी तत्त्वाची जिज्ञासा असलेल्या प्राण्यांची रागद्वेषादि विकारांनी युक्त व अपरिमित दुःख असणाऱ्या संसार-

सागरातून स्वात्मज्ञान प्रदान करून तत्काळ सुटका करतात.

**विवरण :-** आत्मज्ञान हेच सिद्धयोग्याचे दान आहे; कारण आत्मस्थित होण्यामुळे तो आत्मप्रचारासाठी प्रकाशस्तंभ होतो. त्याच्यापासून आत्मज्ञान प्रस्फुरित होते.

एखाद्या पवित्र दिवशी उपवास करणे आदि व्रत, एखाद्या मंत्राचा जप, एखाद्या वस्तूचे दान या सर्व क्रिया आणवोपाय किंवा क्रियायोगात येतात. परंतु सूत्र २६,२७ व २८ यांच्यामध्ये असे सांगितले आहे की, ज्यावेळेला अणू अथवा संकुचित जीव योगात प्रगती करतो आणि "स्व"ला जाणून घेतो त्यावेळेला व्रत, जप आणि दान हे शाक्तोपायात परिणमित होतात. त्यानंतर वर सांगितलेल्या गोष्टी या सामान्य व्यवहारातले विधी न राहता त्यांना गूढ क्रियांचे उच्च स्थान अथवा प्रतिष्ठा प्राप्त होते. मग त्या गोष्टी म्हणजे केवळ बाह्य विधी न राहता ज्ञान अथवा आत्म्याच्या जाणिवेचे व्यक्तीकरण होतात.।।२८।।

## सूत्र क्रमांक २९

**संबंध :-** श्रीशिवांबरोबर नित्य तुलना करावी असा हा सिद्धयोगी अशा प्रकारची व्रते, जप आणि दिनचर्यादींचे आचरण करीत असल्याने आपल्या इंद्रियांच्या वृत्तींवर आरूढ होतो अर्थात् त्यांच्यावर ताबा मिळवितो. तोच तत्त्वाचा उपदेश इच्छिणाऱ्या शिष्यांना स्वस्वरूपाच्या ओळखीचे ज्ञान देऊ शकतो. श्रुतींच्या अनुसार "तत्त्वमसि" या महावाक्याच्या द्वारा आत्मज्ञानाची उपलब्धी करून देतो. याविषयी पुढील सूत्र आहे.

**योऽविपस्थो ज्ञाहेतुश्च।।२९।।**

**शब्दार्थ :-**

**यः** - जो अर्थात् सिद्धयोगी. **अविपस्थः (अविः** - पशू. **प** - पालन करणाऱ्या व सत्ता गाजविणाऱ्या माहेश्वरी आदि क-च-ट-तपादि वर्णांवर स्थित असणाऱ्या मातृका अर्थात् देवता. श्रीशिवसूत्र ३.१९ पाहा.) त्या देवतांवर किंवा परमेश्वराच्या शक्तिचक्राच्या घोरतर शक्तिरूपी इंद्रियवृत्तींवर. **स्थः** - आरूढ झालेला प्रभू प्रभुत्व प्राप्त करतो किंवा ताब्यात ठेवतो. **ज्ञाहेतुः** - आध्यात्मिक ज्ञानाचे कारण अर्थात् प्रसारक किंवा ज्ञानशक्तीच्या हेतूने अर्थात् शिष्यांना शक्तिपातयोगदीक्षेने शक्तिसंक्रमणद्वारा अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृतिद्वारा परमार्थज्ञान प्रदान करून त्यांनी आपले श्रीशिवरूप ओळखावे म्हणून समर्थ करणारे व यासाठी ते स्वतः

समर्थ असतात. **च** - निश्चितपणे.

**अर्थ :-** जे सिद्धयोगी श्रीपरमेश्वराच्या शक्तिचक्राच्या घोरतर शक्तींवर अर्थात् सर्व इंद्रियवृत्तींवर प्रभुत्व प्रस्थापित करतात अर्थात् त्यांना आपल्या ताब्यात ठेवतात ते निश्चयपूर्वक ज्ञानशक्तीच्या हेतूने अर्थात् ज्ञानरूप कुंडलिनी शक्ती जागृत करून साधकभक्तयोगिशिष्यांना परमार्थज्ञान प्रदान करण्याला व आपले श्रीशिवस्वरूप ओळखावयाला समर्थ करतात व यासाठी ते स्वतःही समर्थ असतात अर्थात् पशूंचे म्हणजे बद्ध जीवांचे पालन करणाऱ्या व त्यांच्यावर प्रभुत्व गाजविणाऱ्या ज्या कचटतपादि वर्णांवर स्थित असणाऱ्या मातृदेवता नामक शक्ती आहेत त्यांच्यावर अधिष्ठित असलेले अर्थात् त्या शक्तींचे प्रभू असलेले ते सिद्धयोगी आत्मज्ञानाचा हेतू म्हणजे प्रसारक असतात. ।।२९।।

**विशेष व्याख्या :-** बहिर्मुख इंद्रियांच्या प्रवृत्तींना "अविप" असे म्हणतात. ("अवीन् पशून् पति इति अविप" अर्थात् अवि म्हणजे पशूंचे रक्षण करतो म्हणून तो अविप होय.) ज्या शक्ती पशू म्हणजेच इंद्रियांच्या प्रवृत्तींचे पालन करतात व इंद्रिये बहिर्मुख राहावीत म्हणून त्यांना मदत करतात त्या श्रीमहेश्वरांच्या घोरतर शक्तींना अविप असे म्हणतात. या शक्ती साधकभक्तयोगिशिष्याच्या शुद्धविद्यास्वरूपाला किंचित् झाकून टाकतात. ही गोष्ट याच उन्मेषातल्या एकोणीसाव्या सूत्रात सांगितली आहेच. "**कवर्गादिषु माहेश्वर्याद्याः पशुमातरः ।।३.१९।।**" अर्थात् "माहेश्वरी आदि घोरतरी शक्ती बहिर्मुखत्वाला प्राप्त होऊन संवित् मातृकाचक्रात पशुप्रमातारूप अधिष्ठात्या शक्ती म्हणजे इंद्रिय-वृत्ती बनून साधकभक्तयोगिशिष्याला खाली आणि आणखी खाली आणतात." या शक्ती पशू म्हणजेच जीवांना परमार्थ प्राप्त होऊ देण्यापासून अडवितात. त्यामुळे साधकभक्तयोगिशिष्य या घोरतरीशक्तींवर "हे सर्व माझेच ऐश्वर्य आहे," अशा प्रकारे स्वात्म ऐश्वर्य ओळखून प्रभुत्व मिळवितो. ज्यावेळेला हा साधकभक्तयोगिशिष्य इंद्रियप्रवृत्तींवर प्रभुत्व मिळवून आरूढ होतो त्यावेळेला तो सिद्ध होऊन निश्चितपणे शिष्यांना स्वात्म्याचे ज्ञान करून देण्याला समर्थ बनतो. अन्य जे स्वतःच शक्तिचक्राच्या ताब्यात राहून पशुभाव नष्ट करू शकत नाहीत; मग ते शिष्यांना काय ज्ञान देणार? परंतु जो सिद्धयोगी अविपस्थ म्हणजेच इंद्रियप्रवृत्तींना ताब्यात ठेवणारा असतो तो नक्कीच "**स्वयं तीर्त्वा परान् तारयति।।**" अर्थात् "स्वतः हा संसाररूप सागर ओलांडून इतरांनाही तारून नेण्याचे प्रतीक बनतो." तो दुसऱ्यांनाही आत्म-

ज्ञानाचा प्रबोध करविण्याचा हेतू बनतो. त्यामुळेच या आधीच्या सूत्रात असे म्हटले आहे की, "**दानमात्मज्ञानम्।।३.२८।।**" अर्थात् "सिद्धयोग्याचे आत्मज्ञाननिष्ठ राहणेच त्याचे उत्तम दान आहे."।।२९।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

पूर्वी सांगितलेल्या श्रीशिवसमत्वामुळे सिद्धयोगी नेहमीच व्रत व जपादि आचारात व्यग्र असतो. त्यामुळे निजशक्तिचक्रावर आरूढ झालेला म्हणजे स्वशक्तिविकासयुक्त विश्वात अध्यासीन अर्थात् पूर्णपणे अभ्यस्त होऊन त्या श्रेष्ठ आसनावर आरूढ झालेला तो सिद्धयोगीच तत्त्वतः उपदेश करण्याला योग्य अशा शिष्यांना स्वस्वरूपाचे निश्चित ज्ञान देऊ शकतो अथवा त्यांना जागृत करू शकतो, हेच "**योऽविपस्थो ज्ञाहेतुश्च।।२९।।**" या सूत्रात सांगितले आहे.

अविप म्हणजे अवींचे अर्थात् पशू म्हणजे शेळ्यामेंढ्यांप्रमाणे अज्ञानी जीवांचे जो रक्षण करतो तो होय म्हणजेच "**कवर्गादिषु" माहेश्वर्याद्याः पशुमातरः।।३.१९।।**" यात सांगितलेले माहेश्वर्यादि शक्तिचक्र होय. तेथे तो स्थिर राहतो म्हणजेच स्वमाहात्म्याचे ज्ञान झाल्यामुळे त्याच्या सामर्थ्यावर जो तप करतो तो ज्ञाहेतू होय. "ज्ञा" म्हणजे जाणणे म्हणजेच ज्ञानशक्ती होय. त्या ज्ञानशक्तीचा हेतू अर्थात् उपदेश्य शिष्यांना ज्ञानशक्तीने म्हणजे कुंडलिनी शक्तिद्वारा जागृत करण्यासाठी अर्थात् स्वात्म्याला जाणून देण्यासाठी समर्थ असणारा होय. बाकीचे मात्र शक्तिचक्रांमुळे परतंत्र झालेले व त्यामुळेच स्वात्म्यात असमर्थ असलेले अन्य शिष्यांना कसे काय बरे ज्ञान देऊ शकतील? माहेश्वर्यादि शक्तींकडून पारतंत्र्यात सापडल्यामुळे पशुभावाला प्राप्त झालेला असा मनुष्य मात्र इतरांना असे स्वात्मज्ञान देऊच शकणार नाही. सूत्रात यच्छब्द असल्याने तच्छब्द अध्याहृत समजावा. "च" शब्दाचा "म्हणून" असा अर्थ आहे. हा जो अविपस्थ आहे तो ज्ञानदानाला कारण होतो. त्यामुळे हे योग्यच सांगितले आहे की, "**दानमात्मज्ञानम्।।३.२८।।**" अर्थात् "शक्तिपातयोगदीक्षाद्वारा अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत करणे हेच आत्मज्ञानाचे दान होय."

काही विद्वान् अक्षरसारूप्याप्रमाणे अर्थ लावावा, या निरुक्तवचनानुसार थोडा निराळा प्रकार अवलंबितात. प्रत्येक अक्षर इष्टार्थ प्रकाशित करण्याचे सामर्थ्य ठेवणारे असते. त्यामुळे अक्षर हे वेदांगांना व्यापणारे आहे. त्यामुळे ते असे म्हणतात की, या सूत्रातील प्रत्येक अक्षर एका विशिष्ट अर्थाचे घ्यावे.

"यो" म्हणजे योगींद्र, "वि" म्हणजे विज्ञान, "प" म्हणजे पद किंवा स्थान, "स्थ" म्हणजे पदस्थ, "ज्ञ" म्हणजे ज्ञाता, "हे" म्हणजे हेय अर्थात् त्याज्य, "तु" म्हणजे तुच्छता, "विसर्ग" म्हणजे ऊर्ध्व व अध:सृष्टिरूप विसर्गशक्ती आणि "च"कार म्हणजे अनुक्तसमुच्चय या दृष्टीने कर्ता अशा प्रकारे अर्थ घ्यावा. अशा प्रकारे जो जो श्रेष्ठ सिद्धयोगी विचारशक्तीने आत्मज्ञानपदारूढ झाला आहे तो तो ज्ञाता व कर्ता आहे असे समजावे. त्याला हे विश्व ग्राह्य न वाटता हेय, तुच्छ व नीरस वाटते असा काही विद्वान् या सूत्राचा अर्थ करतात. परंतु तो आम्हाला म्हणजे विमर्शिनीकार श्रीक्षेमराजाचार्यांना सुसंबद्ध वाटत नाही; कारण ही पदार्थसंगती इतकी मनोहर नाही. असे प्रत्येक अक्षरातून एक अर्थ काढावयाचा असे म्हटले तर प्रत्येक सूत्रातून हजारो अर्थ काढले जाऊ शकतील.।।२९।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा रीतीने उत्पत्ती, स्थिती, संहार, रक्षण व अनुग्रह या पाच गोष्टी करणारा सिद्धयोगी श्रीशिवरूप असल्यामुळे आत्माच होय. त्याचे स्वरूप सांगण्यासाठी चंद्रशेखर भगवान् श्रीशिवांनी संक्षिप्त व विस्तृत असे **"योऽविपस्थो ज्ञाहेतुश्च।।२९।।"** हे सूत्र सांगितले आहे.।।१२५-१२५.५।।

विश्वाचे कारण असल्यामुळे हा सिद्धयोगी श्रेष्ठ असा प्रभू आहे;।।१२६।।

कारण हेय म्हणजे त्याज्य अशा पदार्थाला या ज्ञान्यासमोर काही किंमत नाही. त्यामुळे ज्ञानवान् विश्वरूपपदावर स्थित असणारा सिद्धयोगी।।१२७।।

भोग आणि मोक्ष यांचे श्रेष्ठ कारण म्हणून सांगितला आहे. जो अशा प्रकारे सिद्धयोगिश्रेष्ठ आहे तो कर्त्याच्या अंशत: अभिनिवेशाने स्थिर किंवा स्थित असेल तो विपस्थ म्हणजेच विश्वपदी स्थित असणारा आहे असे समजावे.।।१२८।।

त्या ज्ञानासाठी उत्तम हेतू पुढीलप्रमाणे आहे. येथे जे पशू आहेत त्यांचा स्वामी अथवा पती किंवा मालक मातृगण आहे.।।१२९।।

त्यांच्या ठिकाणी असणारा आत्मा ज्यावेळेला स्फुरण पावतो त्यावेळेला त्याला चक्रेश्वर असे म्हणतात. अशा प्रकारे चिद्वैरवाच्या या वृत्ती म्हणजे चक्रेश्वराचे किरण होत.।।१३०।।

या चिद्वृत्ती शब्दादि विषयांचा भोग देऊन त्या चक्रेश्वराची पूजा करतात. हेच मातृगणांचे ज्ञान होय. याला स्वचिदात्मा कारणीभूत आहे.।।१३१।।

**विवरण :-** विश्वाचे कारण असे श्रीपरमशिवच ज्ञानक्रियारूप आहेत.

तेच त्याज्य वस्तूंना तुच्छ समजावे असे सांगणारे आहेत. याचाच अर्थ असा आहे की, श्रीपरमशिवांच्या ज्ञानाने विश्वगत वस्तू तुच्छ वाटतात. त्यांच्या प्रसादाने म्हणजे कृपेने विश्वाच्या पसाऱ्यात असणारा सिद्धयोगीच पूर्ण-ज्ञातृत्वादींच्या असण्यामुळे भोग आणि मोक्ष यांचा उपभोग घेणारा होतो किंवा कर्त्याच्या भूमिकेवर स्थित असल्यामुळे स्थिती प्राप्त झालेला योगिराज स्वतःच्या ज्ञानशक्तीने उपदेश्य म्हणजेच उपदेश करण्याला योग्य अशा शिष्यांना जागृत करण्याला समर्थ होतो अथवा पशुप्रमात्यांचे अधिष्ठान असणाऱ्या माहेश्वर्यादि मातृकागणांमध्ये त्यांचा चक्रेश्वर आत्माच स्फुरण पावतो. सिद्धयोगी त्या चक्रेश्वररूप आत्म्याचीच आपल्या किरणरूप मातृकांच्या ठिकाणी असणाऱ्या चिद्वृत्ती व शब्दादि विषयांचा भोग देऊन नेहमी पूजन करतात. त्यामुळे त्यांच्या आश्रयाने असणाऱ्या या मातृका त्या आत्म्याव्यतिरिक्त स्वसत्ता मिळवू शकत नसल्याने अर्थात् अस्तित्त्वात राहू शकत नसल्याने स्वतःच्या प्रकाशनासाठी म्हणजे व्यक्ततेसाठी त्यांच्यावर अवलंबून राहतात. त्यामुळे हा चिदात्मा शाक्तोल्लासमयच समजावा.।।२९।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**योऽविपस्थो ज्ञाहेतुश्च।।२९।।**" या सूत्राद्वारा श्रीशिव असे सूचित करतात की, माहेश्वर्यादि पशुमातांच्या चक्रांचा अथवा समुदायाचा हा सिद्ध-योगी स्वामी अथवा अधिपती होतो. तोच ज्ञानशक्ती प्रदान करण्याला कारणी-भूत होतो. तोच उपदेश घेणाऱ्या शिष्यांना जागृत अथवा सावध करण्याला समर्थ असतो. "च" शब्द हा पूर्वसूत्राशी संबंधित असून त्याचा अर्थ येथे "म्हणून" असा आहे.।।२९।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**योऽविपस्थो ज्ञाहेतुश्च।।२९।।**" या सूत्राद्वारा श्रीशिव असे सूचित करतात की, अशा प्रकारे उत्तम अशा जपरूपी व्रताचे अनुष्ठान व आचार यांचे योग्यरीतीने पालन करणारा।।१२०।।

आणि स्वात्मशिवांच्या आराधनेत तत्पर असा सिद्धयोगी श्रीशिवांसमान समजावा. हाच महायोगी श्रेष्ठ मंत्रांना धारण करणारा।।१२१।।

आणि आपल्या निकट राहणाऱ्या शिष्याला तात्त्विक ज्ञान देणारा आहे असे समजावे, असेच नित्य अनुग्रह करणाऱ्या श्रीशिवांनी सांगितले आहे.।।१२२।।

अवि म्हणजे पशुजन म्हणजेच शेळ्या, मेंढ्या आदींसारखे अज्ञानी

लोक होत. त्यांचे रक्षण व पालन करते म्हणून अविप म्हणजे शक्तिमंडल होय. "क" वर्ग व "च" वर्गादि वर्णांच्या अधिदेवता असेलेले माहेश्वर्यादि हेच शक्तिमंडल समजावे.।।१२३।।

जो त्यांचा स्वैर आश्रय करतो त्याला अविपस्थ असे म्हणतात. जी सर्व जाणते तिला "ज्ञा" म्हणजेच ज्ञानशक्ती असे म्हणतात.।।१२४।।

त्या ज्ञानशक्तीला हेतुभूत अथवा कारणीभूत म्हणजे शिष्यांना ज्ञान देण्याला समर्थ असणारा सिद्धयोगी होय. अन्य म्हणजे अवि अथवा पशुजन हे शक्तिचक्रामुळे परतंत्र केले गेले आहेत.।।१२५।।

जो स्वत:विषयीच काही जाणत नाही तो दुसऱ्याला कसा बरे ज्ञान देऊ शकेल? सूत्रामध्ये यत् शब्द आहे म्हणून तत् पदाचे ग्रहण आपोआपच होते.।।१२६।।

"च" शब्दही येथे अर्थवान् आहे. त्याचा अर्थ ज्ञान देणारा सिद्धयोगी होय. दान म्हणजेच आत्मज्ञान होय.।।१२७।।२९।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

"पूर्वी सांगितलेले जप, व्रत व आचरण यांचे योग्य प्रकाराने पालन करणारा व श्रीपरमशिवांच्या आराधनेत तत्पर असणारा सिद्धयोगीच शिष्याला त्याच्या यथार्थ स्वरूपाचे ज्ञान करून देणारा ठरतो," असे **"योऽविपस्थो ज्ञाहेतुश्च।।२९।।"** या सूत्रात सांगितले आहे.

अवि म्हणजे पशुजन अर्थात् अज्ञानी जीव होत. त्यांचे रक्षण करतो म्हणून अविप होय. माहेश्वर्यादि शक्तींचा समूह अर्थात् सर्व शक्ती या "क" वर्गादींच्या अधिष्ठात्री किरणरूप देवता असतात. त्यांच्या प्रभुत्वाने जो हे सर्व माझे तेज आहे अशा प्रकारच्या स्मरण होणाऱ्या स्वस्वरूपाचे वैभव प्राप्त करतो तो ज्ञानाचा हेतू बनतो. ज्ञानशक्ती ही सर्व जाणणारी असून परमस्वतंत्रता प्राप्त करून देणे हाच तिचा हेतू असतो. ही परमस्वतंत्रता प्राप्त झालेला सिद्धयोगी स्वत:च्या ज्ञानशक्तीने उपदेश देण्याला योग्य अशा मुमुक्षू पुरुषांना स्वात्म्याची प्रत्यभिज्ञा अर्थात् स्मरण करून देण्याला निश्चितच समर्थ बनतो किंवा पशुप्रमातारूप अधिष्ठानांमध्ये माहेश्वर्यादि मातृकाशक्ति-चक्रांमध्ये तो चक्रेश्वर आत्मरूपानेच स्फुरण पावतो. परंतु आत्मज्ञान देण्याला असमर्थ असणारा साधक शक्तिमंडलाने परतंत्र केला जाऊन स्वात्मसामर्थ्यात असमर्थ असल्यामुळे दुसऱ्यांना कशा प्रकारे प्रत्यभिज्ञा करून देऊ शकेल? त्यामुळेच जो अविपस्थ होतो तोच आत्मज्ञानप्रदानाचा हेतू होतो. तेच

**"दानमात्मज्ञानम्।।२८।।"** या पूर्वसूत्रात योग्यच सांगितले आहे.

**विवरण :-** "अविपस्थ" हा शब्द "विप" या धातूपासून बनलेला आहे. त्या धातूचा अर्थ विक्षेप असा आहे. त्यामुळे अविपस्थ अर्थात् विक्षेपरहित स्थिर अवस्थेमधील स्थिती स्वतः आनंदरूप तर असतेच त्याचबरोबर ती ज्ञानाचेही कारण असते; कारण चंचल मनामध्ये ज्ञान हे विखुरलेल्या अथवा विस्कळीत अवस्थेत असते आणि समाहित अवस्थेत घनाकार किंवा एकवटलेले असते.।।२९।।

## सूत्र क्रमांक ३०

**संबंध :-** ज्या अर्थी सिद्धयोगी श्रीशिवतुल्य आहे असे म्हटले आहे व ज्या अर्थी हे विश्व ही श्रीशिवांची शक्ती आहे असे म्हटले जाते त्या अर्थी मागील सूत्रात वर्णन केलेल्या सिद्धयोग्याच्या बाबतीत काय आढळते हे सांगताना श्रीशिवांनी पुढील सूत्र कथन केले आहे.

**स्वशक्तिप्रचयोऽस्य विश्वम्।।३०।।**

**शब्दार्थ :- स्व -** स्वतःच्या, आपल्या. **शक्ति -** कुंडलिनी शक्तीचे सामर्थ्य. **प्रचय** सिद्धयोग्याच्या शक्तिचक्राचे अर्थात् क्रियाशक्तीचे स्फुरणरूप असलेला विकास. **विश्वम् -** हे सर्व विश्व.

**अर्थ :-** सर्व विश्व हे अशा या सिद्ध श्रीशिवयोग्याच्या शक्तिचक्राचे स्फुरणरूप असलेल्या क्रियाशक्तीचा म्हणजे श्रीशिवांशी समवायसंबंधाने, अविनाभावाने, संघट्टपणे, यामलभावाने, अद्वयरूपाने आणि अनवच्छेद्यपणे एकरसरूप, समव्याप्त व समरस असलेल्या कुंडलिनी शक्तीचा विकास आहे. ।।३०।।

**विशेष व्याख्या :-** हे सर्व जगत् म्हणजे श्रीशिवयोग्याच्या आपल्या शक्तिचक्राचा समूह आहे; कारण श्रीशिवांचे हे विश्व स्वशक्तिमय आहे.

यासंबंधी "**श्रीसर्वमंगल**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**शक्तयोऽस्य जगत्कृत्स्नं शक्तिमांस्तु महेश्वरः।।**

**अर्थ :-** हे सर्व जगत् त्याच्या शक्तींचा समूह आहे; कारण श्रीमहेश्वरच सर्वशक्तिमान् आहेत.

या सिद्धयोग्यासाठी जगत् वृत्तिरूप असत नाही. या पदावर स्थिर असताना इंद्रियांच्या प्रवृत्ती या सिद्धयोग्याच्या शक्ती बनतात; कारण या प्रवृत्ती अंतर्मुखपदावरच स्थिर असतात. या प्रवृत्ती सृष्टिअवस्थेत उन्मीलनाचा अर्थात् उघडण्याचा म्हणजेच निर्मितीचा किंवा उभारणीचा विकास आहेत

आणि हाच सिद्धयोग्याच्या उन्मीलनसमाधीचा विकास म्हणविला जातो किंवा असे म्हटले तरी चालेल की, सिद्धयोग्यासाठी हे विश्व क्रियाशक्तीचा स्फुरण-रूप विकास आहे. स्वात्मसाक्षात्काराच्या बळाने सिद्धयोग्यासमोर ज्ञान आणि ज्ञेय पदार्थ भिन्नपणे अस्तित्वात राहत नाहीत; कारण त्याला दोन्हीही पदार्थां-मध्ये एकत्वच अनुभवावयाला येते. याला अक्रमवेदन अर्थात् अक्रम म्हणजे क्रमरहित व वेदन म्हणजे संवेदन किंवा जाणीव असे म्हणतात. हेच शिखरस्थ ज्ञान अर्थात् ज्ञानाची पराकाष्ठा म्हणजेच सर्वोच्च ज्ञान आहे. असे म्हणण्याचे कारण असे आहे की, या अवस्थेत आंतर आणि बाह्य या दोन्हींमध्ये एकाच वेळेला सिद्धयोग्याच्या स्वशक्तीचा विकास होतच असतो. याचेच शास्त्रात "**शिखरस्थज्ञानं युगपद्वेदनमिति।।**" असे वर्णन केले आहे. यालाच जीवन्मुक्त असे म्हणतात.

या दृष्टीने "**श्रीयोगवासिष्ठ**" या ग्रंथात या अवस्थेचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे.

**यो जागर्ति सुषुप्तस्थो यस्य जाग्रन्न विद्यते।**
**यस्य निर्वासनो बोधः स जीवन्मुक्त उच्यते।।३.९.७।।**

**अर्थ :-** वृत्ती लीन राहात असूनही जो जागत असतो; परंतु वास्तवात जो जागृतावस्थेच्या धर्मांनी रहित असतो आणि ज्याचे ज्ञान सर्वथा वासनांनी रहित असते तो पुरुष जीवन्मुक्त म्हणविला जातो.।।३.९.७।।

वृत्ती शांत असतानाही जो जगत असतो या वाक्याचा आशय असा आहे की, जरी त्या सिद्धयोग्याचे चित्त संपूर्ण दृश्य पदार्थांचा बाध करून निरंतर ब्रह्मात लीन राहिले तरीही तो झोपलेल्या पुरुषाप्रमाणे जाणिवरहित होत नाही; कारण तो सर्व व्यवहार सामान्यपणे करीतच राहतो. परंतु सर्व व्यवहार करीत असताना त्यांना तो स्वप्नाप्रमाणे समजत असल्याकारणाने त्याला अन्य पुरुषांप्रमाणे दृश्य पदार्थांची आसक्ती असत नाही. त्यामुळेच तो वास्तवात जाग्रतावस्थेच्या धर्मांनी रहित असतो.

या दृष्टीने "**श्रीयोगवासिष्ठ**" याच ग्रंथात पुढे असे म्हटले आहे की -

**शान्तसंसारकलनः कलावानपि निष्फलः।**
**यः सच्चित्तोऽपि निश्चितः स जीवन्मुक्त उच्यते।।३.९.१२।।**

**अर्थ :-** ज्याची संसार वासना शांत झालेली आहे, जो कलांनी युक्त असूनही कलारहित आहे अर्थात् व्यवहारात तो वरवर विकारी दिसत असला तरी निरंतर आपल्या निर्विकार स्वरूपातच स्थिर राहतो आणि ज्याचे चित्त

निश्चित आहे तो पुरुष जीवन्मुक्त म्हणविला जातो.।।३.१.१२।।३०।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

या सिद्धयोग्याच्या दृष्टीने "**स्वशक्तिप्रचयोऽस्य विश्वम्।।३०।।**" अर्थात् "हे सर्व विश्व म्हणजे त्याचा शक्तिप्रचय होय;" कारण हा सिद्धयोगी श्रीशिवांसमान असतो असे सांगितले आहे. त्याच्या शक्ती म्हणजे हे सर्व विश्व होय. यासंबंधी "**शक्तयोऽस्य जगत्कृत्स्नं शक्तिमांस्तु महेश्वरः।।**" अर्थात् "श्रीमहेश्वर हे सर्व शक्तिमान् असून हे सर्व जगत् म्हणजे त्यांच्या शक्तींचा समूहच आहे," असे आगमात म्हटले आहे. श्रीशिवांच्या शक्तीने हे विश्व व्याप्त आहे. त्यानंतर हा सिद्धयोगी श्रीशिव स्वसंविद्रूपशक्तीमुळे म्हणजेच विश्वनिर्मितिरूप क्रियाशक्तीच्या स्फुरणामुळे विश्वविकास करतो.

यासंबंधी "**श्रीमृत्युजित्भट्टारक**" अर्थात् "**श्रीनेत्रतंत्र**" या ग्रंथामध्ये असे म्हटले आहे की -

**यतो ज्ञानमयो देवो ज्ञानं च बहुधा स्थितम्।**
**नियन्त्रितानां बद्धानां त्राणं तन्नेत्रमुच्यते।।९.१०।।**

**अर्थ :-** देव अर्थात् श्रीपरमेश्वर हा ज्ञानयुक्त आहे. ज्ञान हे विविध प्रकारांनी स्थित आहे. त्याचप्रमाणे तो नियंत्रित आणि बंधनात बांधलेल्यांचे रक्षण करतो म्हणून त्याला नेत्र असे म्हणतात.

**विवरण :-** श्रीपरमेश्वर हा ज्ञानमय आहे म्हणजेच तो "**चिन्मात्र परमार्थः।।**" आहे अर्थात् "परमतत्त्वरूप केवळ चैतन्यशक्ती आहे." ते ज्ञान खूप प्रकारात म्हणजेच स्वातंत्र्यामुळे संकोचाचा आभास करवून नानात्वाचा आश्रय करून स्थिर असते. त्यामुळे संकोचाच्या आभासातून निर्माण होणारे गूढ स्वरूपाने नियंत्रित अथवा नियमित केलेले किंवा भासित होणारे व तेथेच श्रीपरमेश्वराकडून बांधलेले जीव हे नाना प्रकारच्या दर्शन व उपासनांनी स्वस्वरूपाच्या अभिव्यक्तीने श्रीदेवाकडून रक्षिले जातात. त्यामुळे निरुक्ताच्या नियमाप्रमाणे श्रीदेवाला नेत्र असे म्हटले आहे. नेत्र याचा अर्थ बघणारा एक अवयव असा घ्यावयाचा नाही.

या संबंधी "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथातही असे म्हटले आहे की -

**तत्तद्रूपतया ज्ञानं बहिरन्तः प्रकाशते।**
**ज्ञानादृते नार्थसत्ता ज्ञानरूपं ततो जगत्।।१।।**
**न हि ज्ञानादृते भावाः केनचिद्विषयीकृताः।**
**ज्ञानं तदात्मतां यातमेतस्मादवसीयते।।२।।**

**अस्तिनास्तिविभागेन निषेधविधियोगतः।**
**ज्ञानात्मता ज्ञेयनिष्ठा भावानां भावनाबलात्।।३।।**
**युगपद्वेदनाज्ज्ञानज्ञेययोरेकरूपता।।४।।**

**अर्थ :-** ज्ञान हे नीलसुखादिरूपाने बाहेर व आत प्रकाशित अथवा व्यक्त होत असते. ज्ञानाशिवाय पदार्थांना कोणतेही अस्तित्वच असत नाही आणि हे पदार्थ प्रकाशाचे सार असल्यामुळे प्रकाश असल्यास पदार्थ असतात व प्रकाशाचा अभाव असल्यास पदार्थांचाही अभाव असतो. अशी परिस्थिती असल्याने म्हणजेच पदार्थांची अन्वयव्यतिरेकाने सिद्धी होत असल्याने पदार्थांना वेगळी सत्ता नाही. याकरिता जगत् हे ज्ञानरूप आहे, असा याचा तात्पर्यार्थ आहे.।।१।।

**अर्थ :-** ज्ञानाशिवाय कोणतेही पदार्थ विषय होत नाहीत अर्थात् कळत नाहीत. यावरून ज्ञान हे पदार्थरूप होते हे ठरले.।।२।।

**विवरण :-** जो ज्यावर अवलंबून न राहता उपलब्ध होत नाही तो त्यामुळे अव्यतिरेकी असतो म्हणजेच मातीशिवाय घडा असत नाही. त्यामुळे ज्ञानाची ज्ञेयभावानेच परिनिष्ठा आहे असा निश्चय होतो.

**अर्थ :-** विधिनिषेधरूपाने ज्ञान हे ज्ञेयनिष्ठ होते. त्यामुळे पदार्थांच्या भावनासामर्थ्यामुळे व एकदमच संवेदन होत असल्यामुळे ज्ञान व ज्ञेयांना एकरूपत्व येते. यांमध्ये समानाधिकरण्य आहे. हे ज्ञान व ज्ञेय एकमेकांना सोडून राहू शकत नाही. त्यामुळे ही सृष्टी तच्छक्तिविकास होय. सृष्टीहून श्रीशिव वेगळे राहत नाहीत.।।३,४।।

**विवरण :-** नीलसुखादि पदार्थांच्या स्वात्मसाक्षात्काराच्या सामर्थ्यामुळे उभय ज्ञान व ज्ञेय यांच्या सांनिध्याच्या विरहात अथवा अभावात नीलसुखादींची सत्ता असणे शक्यच नसल्याने एकरूपतेची निश्चिती होते.।।३०।।

**विवरणात्मक टीप :-** आहे व नाही या विभागानुरूप नेत्र या शब्दाचा नैरुक्तिक किंवा व्युत्पत्तिजन्य अर्थ पुढीलप्रमाणे आहे. **"नियन्त्रितानां त्राणम्।।"** अर्थात् निर्बंधात असलेल्या किंवा संकुचित अशा जीवांचे रक्षण करणे म्हणजे नेत्र होय. नेत्र मधले "न" हे अक्षर "नियन्त्रितानां"चा निर्देश करते आणि "त्र" हे अक्षर "त्राणम्"चा निर्देश करते. श्रीशिवांना नेत्र म्हटले जाते याचे कारण ते लौकिक किंवा भौतिक नेत्र आहेत म्हणून नव्हे; तर ते त्यांच्याकडे उन्मुख किंवा प्रवृत्त झालेल्या जीवांना त्यांच्या तेजाद्वारा त्यांचे गुप्त रूप प्रकट करतात म्हणून त्यांना नेत्र म्हटले आहे. ते एकमेव श्रीशिव

आहेत. ते स्वतःला लपवितात आणि परत प्रकटही करतात.।।३०।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा रीतीने शक्तिमान् असणाऱ्या सिद्धयोग्याचे विश्वाकारत्व म्हणजे विश्वरूपत्व "**स्वशक्तिप्रचयोऽस्य विश्वम्।।३०।।**" या सूत्रात श्रीशिवांनी सांगितले आहे।।१३१.५।।

अशा प्रकारे शक्तींनी युक्त असणाऱ्या सिद्धयोग्याच्या स्वतःच्या ज्या चिच्छक्त्यादि शक्ती आहेत।।१३२।।

त्यांचे नवनवीन उल्लासरूप स्पंदने असणारे प्रचय म्हणजे समूह मानलेले आहेत. तेच विश्व अर्थात् जगद्रूप सृष्टी म्हणून जाणावे; कारण शक्तीने युक्त असा सिद्धयोगी जगद्रूपाने सर्वदा स्फुरतच असतो.।।१३३,१३३.५।।

**विवरण :-** ज्याप्रमाणे श्रीशिवांचे विश्व हे त्यांच्या अचिंत्यशक्तीने युक्त असते त्याप्रमाणेच सिद्धयोगी हा श्रीशिवतुल्य असल्यामुळे त्याच्या संविच्छक्ती-पासून म्हणजेच ज्ञानशक्ती कुंडलिनीपासून चित्रविचित्र स्पंदमयक्रियाशक्ति-स्फुरणाचे विश्व विकसित किंवा प्रकट होते. ते ते नीलसुखादि भावरूप द्रव्य अर्थात् वस्तू ही अंतर्बाह्य ज्ञात होते व चित्प्रकाशाच्या आश्रयाने स्थिर होते. नाही तर स्वसिद्धीच सिद्ध होणार नाही. त्यामुळे सिद्धयोग्याची स्वसंवित्च तशा तशा विश्ववैचित्र्याने सर्वत्र स्वतःच स्वैर मनोरथाप्रमाणे प्रस्फुरित किंवा व्यक्त होते. शक्ती आणि ती धारण करणाऱ्या शक्तिमानामध्ये कोणताही भेद नसल्याने श्रीशिवच विश्वरूपात भासतात, असा याचा सारांश आहे.।।३०।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**स्वशक्तिप्रचयोऽस्य विश्वम्।।३०।।**" या सूत्राद्वारा श्रीशिवांनी असे कथन केले आहे की, ज्या अर्थी या सिद्धयोग्याला श्रीशिवतुल्य असे म्हटले जाते त्या अर्थी "**शिवस्य विश्वं शक्तिमयं शक्तयोस्य जगत्कृत्स्नं।।**" अर्थात् "याच्या शक्ती म्हणजे हे सर्व विश्वच आहे," या आम्नायातल्या वचनानुसार "श्रीशिवांचे हे विश्व शक्तिमयच आहे." त्याचप्रमाणे या श्रीशिवतुल्य सिद्धयोग्याचे हे विश्व त्याच्या संविद्रूपशक्तीचा प्रचय अर्थात् क्रियाशक्तीच्या स्फुरणरूपाचा विकासच आहे असे समजावे.।।३०।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**स्वशक्तिप्रचयोऽस्य विश्वम्।।३०।।**" या सूत्राद्वारा श्रीशिवांनी असे कथन केले आहे की, असा अविपस्थ आणि ज्ञानशक्तीला हेतुभूत होणाऱ्या सिद्धयोग्याच्या "**शक्तयोस्य जगत्कृत्स्नं शक्तिमांस्तु महेश्वरः।।**" अर्थात्

"सर्व जग हे श्रीशिवांच्या शक्तीच आहेत आणि अशा शक्तीने युक्त असे ते श्रीमहेश्वर आहेत."।।१२८।।

अशा प्रकारे आगमात उपदेशिलेले विश्व हे जसे त्या श्रीमहेश्वरांच्या शक्तीचा विकास आहे तसेच श्रीशिवतुल्य या परमयोग्याच्या।।१२९।।

स्वतःच्या ताब्यात असलेल्या संवेदनाचा म्हणजे ज्ञानशक्तीचा स्फुरणरूप विकास म्हणजेच विश्व होय.।।१३०।।

अर्थात् विश्वोत्पत्तीची शक्ती या सिद्धयोग्यातच असते.।।३०।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

आता "ज्ञानशक्तीचा हेतू असणारा हा सिद्धयोगी विश्वाकार असतो," असे "**स्वशक्तिप्रचयोऽस्य विश्वम्**"।।**३०**।। या सूत्रात सांगितले आहे.

यासंबंधी "**सर्वमंगलातंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**शक्तिश्च शक्तिमांश्चैव पदार्थद्वयमुच्यते।**
**शक्तयोस्य जगत्कृत्स्नं शक्तिमांस्तु महेश्वरः।।**

**अर्थ :-** शक्ती आणि शक्तिमान् असे दोन प्रकारचे पदार्थ आहेत. शक्तिमानाच्या अर्थात् श्रीशिवांच्या शक्ती म्हणजे हे सर्व जग असून शक्तींनी युक्त अर्थात् शक्तिमान् म्हणजे श्रीमहेश्वर होत.

या निर्णयानुसार ज्याप्रमाणे अनुत्तरधाम भगवान् श्रीपरमशिवांचे हे जगत् स्वशक्तिप्रचय अर्थात् स्वशक्तींचा समूह आहे असे प्रतिपादन केले आहे त्याप्रमाणेच ज्ञाननिष्ठ सिद्धयोग्याच्या स्वसंवेदनात्मक शक्तीचे जगताला निर्माण करण्याचे सामर्थ्य असून त्यामुळेच क्रियाशक्तीचा स्फुरणरूप विकास असणारे असे हे विश्व होत असते.

या विश्वात या दिसणाऱ्या वेद्यवस्तूंना जाणणाऱ्यांच्या उल्लेखनरूप क्रियाशक्तीचे स्वातंत्र्यानेच प्रकटीकरण होत असते.

यासंबंधी "**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**वर्तमानावभासानां भावानामवभासनम्।**
**अन्तःस्थितवतामेव घटते बहिरात्मना।**
**चिदात्मैव हि देवोन्तःस्थितमिच्छावशाद्बहिः।**
**योगीव निरुपादानमर्थजातं प्रकाशयेत्।।**

**अर्थ :-** सध्या अस्तित्वात असणाऱ्या व भासणाऱ्या पदार्थांचे मिथ्याज्ञान हे बाह्यतः होणारे असूनही ते आत स्थिर असल्याप्रमाणेच संयोग पावते. चिदात्मा श्रीदेवंच आत स्थित असूनही इच्छेच्या बळावर एखाद्या सिद्धयोग्या-

प्रमाणे उपादान कारणाशिवाय वस्तुसमूहाचे बाहेर प्रकटीकरण करतो.

त्यामुळे चिदात्माच त्या त्या आकारप्रकारांनी बाहेर व आत प्रकाशित होतो.

यासंबंधी "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**तत्तद्रूपतया ज्ञानं बहिरन्तः प्रकाशते।**
**ज्ञानादृते नार्थसत्ता ज्ञानरूपं ततो जगत्।।१।।**
**न हि ज्ञानादृते भावाः केनचिद्विषयीकृताः।**
**ज्ञानं तदात्मतां यातमेतस्मादवसीयते।।२।।**

**अर्थ :-** त्या त्या पदार्थांच्या रूपाने ज्ञान आत व बाहेर प्रकाशित होत असते. ज्ञानाशिवाय पदार्थांना अस्तित्व नाही. यामुळे जगत् ज्ञानरूपच आहे. ज्ञानाशिवाय कोणीही पदार्थांचे विषयीकरण केलेले नाही. ज्ञानच त्या पदार्थांशी ऐक्य पावते व त्यामुळे नष्ट होऊन जाते.

अर्थात् नीलसुखादिरूपाने आत आणि बाहेर अवभासित होणाऱ्या पदार्थांच्या अवभाससारत्वामुळे तदन्वयव्यतिरेक अर्थात् पदार्थांशिवाय ज्ञान नाही आणि ज्ञानाशिवाय पदार्थांना सत्ता नाही अशा प्रकारच्या एकमेकांवर असणाऱ्या आश्रयामुळे पदार्थांना भिन्न अस्तित्व असत नाही.

**विवरण :-** सिद्धयोगी श्रीशिवांसारखा बनतो. त्यामुळे त्याचे चैतन्य हे श्रीशिवचैतन्यच असते. हे जगत् म्हणजे श्रीशिवांच्या चैतन्याचे एक घट्ट झालेले अथवा गोठलेले स्वरूप आहे आणि सिद्धयोग्याचे चैतन्य हे श्रीशिव-चैतन्यासम असते. त्यामुळे त्याच्याबद्दलचे असणारे जग हे सुद्धा त्याच्या चैतन्याचे व्यक्तीकरण होय.

येथे "स्व" हा शब्द चेतनरूपा ज्ञानशक्ती आणि शक्ती हा शब्द प्राण-शक्ती असा अर्थ सूचित करतो. व्यष्टिरूपाने जरी ज्ञानशक्ती आणि प्राणशक्ती दोन्ही वेगवेगळ्या आहेत तरीही त्या समष्टिमहत्‌मध्ये भेदरहित व एकात्म होऊन जातात. श्रीशिवतुल्य सिद्धयोग्याचे चित्त महत्‌मध्ये स्थिर होते आणि तो चित्ताकाशातून महत् अशा चिदाकाशात जातो; परंतु त्याचा मायीय मल अजून शिल्लकच असतो. त्यामुळे त्याला श्रीशिवरूप असे न म्हणता श्रीशिव-तुल्य असे म्हटले आहे. श्रीशिव हे या विश्वात राहूनही निरुपाधिक अर्थात् कोणत्याही विशिष्ट गुणांनी रहित असतात; परंतु हा सिद्धयोगी मात्र आपल्या शक्तीच्या प्रचय किंवा स्फुरणरूप विश्वाच्या उपाधींनी युक्त असतो अर्थात्‌च त्या सिद्धयोग्याला हे सर्व विश्व त्याच्या स्वतःच्या "**अहम्**" व "**इदम्**"च्या स्फुरणाचे स्वरूप आहे.।।३०।।

## सूत्र क्रमांक ३१

**संबंध :-** विश्वाची उत्पत्ती होणे हाच केवळ सिद्धयोग्याच्या क्रिया-शक्तीचा स्फुरणरूप विकास नसून विश्वाच्या उत्पत्तीनंतरच्या स्थिती व लय या अवस्थासुद्धा त्या सिद्धयोग्याचा शक्तिप्रचय आहे असे सूत्रकार सांगतात.

**स्थितिलयौ।।३१।।**

**शब्दार्थ :- स्थिति** - उत्पत्तीनंतर काही काळ अस्तित्वात राहणे किंवा बहिर्मुखतेचा आभास होणे. **लय** - मूळ अवस्थेत परत जाणे किंवा बहिर्मुखतेचा लयही सिद्धयोग्याच्या कुंडलिनी शक्तिचक्राचा विकास आहे.

**अर्थ :-** विश्वोत्पत्तीनंतर काही काळ अस्तित्वात राहणे व पुन्हा मूळ अवस्थेप्रत परत येणे या क्रियासुद्धा सिद्धयोग्याच्या कुंडलिनी शक्तीचे प्रकटीकरण असतात अर्थात् श्रीशिवांच्या वृत्तीचा उल्लास हे ज्याचे स्वरूप आहे अशा शक्तिप्रचयाने तो चिदात्मा स्वतःच्या इच्छेप्रमाणे विश्वाची स्थिती व लय करतो अर्थात् बहिर्मुखतेचा आभास व बहिर्मुखतेचा लय या दोन्ही गोष्टी सिद्ध-योग्याच्या स्वतःच्या शक्तिचक्राचा अर्थात् कुंडलिनी शक्तीचा विकास आहेत.।।३१।।

**विशेष व्याख्या :-** पूर्वसूत्रातले "**स्वशक्तिप्रचयः**" अर्थात् "आपल्या स्वतःच्या शक्तिचक्राचा विकास आहे," हे पद या सूत्राशी जोडले की, या सूत्राचा अर्थ पूर्ण होतो. क्रियाशक्तीच्या द्वारा आभासात आलेल्या विश्वाच्या वेगवेगळ्या प्रमात्यांच्या अपेक्षेने काही वेळापर्यंत बहिर्मुखतेची अवभासनरूप स्थिती आणि चित्स्वरूप परप्रमात्यात विश्रांतिरूप लय या दोन्हीही गोष्टी सिद्धयोग्याच्या आपल्या शक्तिचक्राचा विकास आहेत. प्रत्येक वेद्य पदार्थांची सृष्टी आणि लय सिद्धयोग्याचे स्वतःचे संविच्छक्तिरूप आहे. संविच्छक्तीच्या बरोबर एकत्वाचा अभाव न राहिल्यानेच सिद्धयोग्याला दोन्हींमध्ये म्हणजेच स्थिती आणि लय या दोन्हींमध्ये स्वरूपाच्या अस्तित्वाचा अनुभव येत असतो.

या दृष्टीने "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सर्वं शुद्धं निरालम्बं ज्ञानं स्वप्रत्ययात्मकम्।**
**यः पश्यति स मुक्तात्मा जीवन्नेव न संशयः।।**

**अर्थ :-** जो सिद्धयोगी निर्विकल्प अर्थात् विचाररहित अशा नाम-रूपरहित विश्वाचा आणि स्वाहंतारूप ज्ञानाचा अनुभव घेतो तो शरीरधारी असूनही मुक्तात्मा आहे, या विषयी कोणतीही शंका घेऊच नये.।।३१।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

"या सिद्धयोग्याचा शक्तिविकास हा केवळ सृष्ट्युत्पत्तीच्या बाबतीतच नसून स्थिती व प्रलयही त्याचा शक्तिप्रचय होय," हे "**स्थितिलयौ।।३१।।**" या सूत्रात सांगितले आहे.

क्रियाशक्तीने आभासित होणाऱ्या विश्वाचा त्या त्या प्रमात्याच्या अपेक्षेने काही काळ बहिर्मुखाने होणारा आभास ही स्थिती व चिन्मय परप्रमात्यात विश्रांती घेणे हा लय होय. या दोन्ही गोष्टी त्या सिद्धयोग्याचा शक्तिप्रचयच आहेत. त्या त्या वेद्य वस्तूंचे विलीन होणे व भासणे योग्याच्या संविच्छक्तिरूपच समजावे. नाही तर स्थितिलय या सिद्धयोगिवर्गाला समजत नाहीत असे उणेपण राहण्याची शक्यता असते.

यासंबंधी "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**अस्तिनास्तिविभागेन..................।।**

**अर्थ :-** या पदांनी अर्थात् अस्ति म्हणजे आहे व नास्ति म्हणजे नाही अशा विभागाने स्थिती व लय सांगितला आहे.

त्याचप्रमाणे या ग्रंथातच असेही म्हटले आहे की -

**सर्वं शुद्धं निरालम्बं ज्ञानं स्वप्रत्ययात्मकम्।**
**यः पश्यति स मुक्तात्मा जीवन्नेव न संशयः।।**

**अर्थ :-** सर्व अथवा पूर्ण असलेले, आधाररहित किंवा सर्व वेद्यविषयांच्या पलीकडे गेलेले आणि स्वप्रत्ययात्मक म्हणजेच स्वाहंतात्मक असलेले असे ज्ञान जो पाहतो तो जिवंत असतानाच मुक्त होतो यात काहीही संशय नाही. ।।३१।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे "हा सिद्धयोगी ज्याप्रमाणे सृष्टिकर्ता असतो त्याप्रमाणे स्थितिकर्ता आणि लयकर्ताही होतो," हे सांगण्यासाठी त्रिपुरासुराचा नाश करणारे श्रीशंकर "**स्थितिलयौ।।३१।।**" हे सूत्र सांगतात.।।१३४,१३४.५।।

वृत्ती आणि उल्लासस्वरूपी त्याच पूर्वोक्त शक्तिप्रचयांनी चिदात्माच आपल्या इच्छेप्रमाणे विश्वाची स्थिती व स्थैर्य किंवा धारणा व लय किंवा संहार करतो.।।१३५,१३५.५।।

**विवरण :-** अशा प्रकारे चिदात्माच स्वतःच्या इच्छाशक्तीने क्रियाशक्तीपासून निर्माण झालेल्या विश्वाची स्थिती आणि प्रलय करतो. स्थिती म्हणजे बहिर्मुख अशा स्वनियम्य विश्वाचे अवभासन होय. विश्वगतपदाध्यक्ष

यांच्या आयुर्मर्यादेप्रमाणे परार्धकालावधी विश्वाचे अस्तित्व भासणे ही स्थिती होय. लय म्हणजे चित्प्रमात्यामध्ये त्या विश्वाचे विलीन होणे होय. जर एका निमिषात अथवा एका क्षणात स्वतःचाही लय हा सिद्धयोगी करू शकतो तर मग स्वनियम्य अर्थात् ताब्यात असलेल्या विश्वाचा विलय करणे काही कठीण नाही. अशा रीतीने भासमान स्थितिलय म्हणजे स्वशक्तिप्रचय अर्थात् चमत्कारच होय; कारण सर्व वेद्यवस्तुविषयक उन्मीलन व निमीलन प्रकाशन-विरहित नसल्याने संविच्छक्तिमयच समजावे.।।३१।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

(या सूत्रात शक्तिप्रचय हे पद पूर्वसूत्रातून घ्यावे.) "**स्थितिलयौ।।३१।।**" या सूत्रन्यायाने शक्तीच्या प्रचयापासून विश्वाचे स्थितिलयही होतात. बहिर्मुख-त्वाने असणे ही स्थिती आणि चिन्मय प्रमात्यात विश्रांती म्हणजे लय होय. हा सिद्धयोगी स्वशक्तीने विश्वोत्पत्तीप्रमाणे स्थितिलयही करू शकतो.।।३१।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**स्थितिलयौ।।३१।।**" या सूत्रानुसार या परयोग्याचा शक्तिविकास हा केवळ विश्वोत्पत्तीच्या वेळेलाच आहे असे समजू नये; तर स्थिती आणि लय हे सुद्धा या योगशक्तीचाच विकास आहेत. तात्पर्य "हा सिद्धयोगी स्वशक्तीने सृष्टिस्थितिलय करू शकतो."।।१३१।।

स्वशक्तीचा विकास हा स्थिती व लय या दोघांनाही म्हणतात, असे या ठिकाणी अनुवर्तित होते. विकसित झालेल्या विश्वाच्या क्रियायुक्त स्व-संवित्मुळे।।१३२।।

त्या त्या प्रमात्याच्या अपेक्षेनुसार इदंरूपतेने हे असे अशा प्रकाराने ज्ञान होणे म्हणजे स्थिती होय आणि चिन्मयरूप अहंतेमध्ये विश्रांती म्हणजे लय होय.।।१३३।।

हे सर्व विश्व संकोच पावणारे व विकसित पावणारे आहे अशी संविद्रूप भावना म्हणजेच लय व स्थिती होय.।।१३४।।

नाही तर ज्ञानाची उपपत्ती म्हणजेच विश्वाची स्थिती इत्यादिकांच्या ज्ञानाची संगती लागत नाही.।।१३४.५।।३१।। (विश्व हे प्रत्यक्ष काही नष्ट होत नाही.)

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

अशा प्रकारे सृष्टिदशेतच केवळ हे विश्व म्हणजे निजशक्तींचा समूह असत नाही; परंतु कितीतरी काळांमध्ये आभासनरूप स्थिती व स्वात्मविश्रांति-

युक्त लयही तेथे असतोच असे "**स्थितिलयौ।।३१।।**" या सूत्रात सांगितले आहे. या प्रसंगी "**स्वशक्तिप्रचयोऽस्य विश्वम्।।३०।।**" या सूत्राचाही अध्याहार करावा. क्रियाशक्तियुक्त स्वसंवित्ने आभासित होणाऱ्या विश्वाच्या अपेक्षेने वेगवेगळे प्रमाते अथवा जीवांच्या अपेक्षेने असणारी काही काळापुरती वैचित्र्ययुक्त बाह्य रूपातील जी विकसनयुक्त स्थिती आणि चिन्मय प्रमात्यात होणारा विश्रांतियुक्त विलय या दोघांनी सुप्रबुद्ध योग्याचा निजशक्तिविकासच होत असतो; कारण विकासणारे आणि संकुचित होणारे समस्त संवेद्यविषय हे स्वसंविच्छक्तिरूपच असतात. नाहीतर या वेद्यविषयांच्या संवेदनांची सिद्धीच होणार नाही. कल्पित शून्य किंवा मायीय प्रमात्याच्या अपेक्षेने विश्वाची बाहेर प्रकाशित होणारी स्थिती असते. प्रकल्पित प्रमातृरूपत्वाच्या अभावी त्याच्या दृष्टीने अपेक्षित बाह्य विश्वाचे ज्ञान न होण्यामुळे चिन्मयात उपशांती होणे म्हणजे विलय होय. त्याचप्रमाणे दोन्ही स्थिती आणि विलय यांची स्वसंविद्रूपताच सिद्ध होते. संवित्च्या अभावी स्थिती आणि लय यांची उपलब्धीच होणार नाही. त्यामुळे "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात "**अस्तिनास्तिविभागेन.........**" इत्यादि वचनांनी स्थितिप्रलय हे परत्वाने प्रतिपादिले आहेत. अशा प्रकारे स्वाहंतायुक्त सर्व निरालंब अर्थात् कोणतेही आधारविरहित शुद्ध ज्ञान जो सिद्धयोगी स्वतःच्या अंतःकरणात पाहील तो नेहमी प्राणांना धारण करूनही विमुक्त होईल यात कोणताही संशय नाही.

**विवरण :-** व्युत्थानदशेमध्ये त्या सिद्धयोग्याची अवस्था स्थितप्रज्ञाची असते आणि समाधिदशेमध्ये लयाची अवस्था असते.

यासंबंधी "**कठोपनिषद्**" या ग्रंथामध्ये असे म्हटले आहे की -

**अप्रमत्तस्तदा भवति योगो हि प्रभवाप्ययौ।।२.३.११।।**

**अर्थ :-** त्या स्थिर इंद्रियधारणेलाच योग असे म्हणतात. असे झाले म्हणजे सिद्धयोगी अप्रमत्त अर्थात् प्रमादरहित होतो; कारण सिद्धयोगच उत्पत्ती व नाशरूप आहे.।।२.३.११।।

त्याचप्रमाणे "**श्रीमद्भगवद्गीता**" या ग्रंथातही असे म्हटले आहे की -

**एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ।।२.७२।।**

**अर्थ :-** हे पार्था! अर्जुना!! ही ब्राह्मी स्थिती होय.।।२.७२।।

हा याच स्थितीकडे केलेला संकेत आहे.

या सूत्राद्वारा आधीच्या म्हणजेच "**स्वशक्तिप्रचयोऽस्य विश्वम्।।३०।।**" या सूत्राचे स्पष्टीकरण दिले गेले आहे अर्थात् व्युत्थानदशेमध्ये उपर्युक्त

सिद्धयोगी स्थितिरूपी आपल्या शक्तीच्या प्रचयाने श्रीशिवांचे दर्शन आणि समाधी अवस्थेत त्यांचा लय करीत असतो.।।३१।।

**सूत्र क्रमांक ३२**

**संबंध :-** आता असा प्रश्न निर्माण होतो की, आपापसात भेदाचा आभास निर्माण करणाऱ्या सृष्टी, स्थिती आणि लय या तिन्हींच्या अवस्थे-मध्ये या परमयोग्याला स्वतःच्या स्वरूपात भेदाचा अनुभव तर येत नाही का? किंवा उत्पत्ती, स्थिती व लय या अवस्था भिन्न आहेत? सिद्धयोगी ज्ञानरूपाने त्यांच्याशी संबद्ध असल्यामुळे त्याच्या तुरीयावस्थेतील आनंद-मय अवस्थेत फरक पडणार नाही का? या शंकेचे समाधान करताना या सूत्रात असे म्हटले आहे की -

**तत्प्रवृत्तावप्यनिरासः संवेत्तृभावात्।।३२।।**

**शब्दार्थ :-**

**तत्प्रवृत्तौ** - ते अर्थात् उत्पत्ती, स्थिती व लय निर्माण झाले असतील. **अपि** - तरी सुद्धा. **अनिरासः** - निरास म्हणजे तुर्यावस्थेपासून चळणे, भ्रष्ट होणे. **अ-निरासः** - "निरास" अवस्थेचा अभाव अर्थात् फरक न पडणे किंवा न चळणे. **संवेतृभावात्** - सिद्धयोग्याच्या ज्ञानी असण्याच्या अवस्थेमुळे किंवा परप्रमातृस्वरूप तुर्यचमत्कार विमर्शमय असल्यामुळे.

**अर्थ :-** जरी उत्पत्ती, स्थिती व लय या भिन्नभिन्न अवस्था निर्माण झाल्या तरी तो सिद्धयोगी त्या अवस्थांचा केवळ ज्ञानी असल्यामुळे त्याच्या अखंड ज्ञानावस्थेमुळे त्याच्या तुर्यावस्थेच्या आनंदात खंड पडत नाही अर्थात् जरी परप्रमातृस्वरूप तुर्यचमत्कार विमर्शमय झाला तरी सिद्धयोगी चलायमान होत नाही म्हणजे श्रीशिवांशी समवायसंबंधाने, अविनाभावाने, संघट्टपणे, यामलभावाने, अद्वयरूपाने आणि अनवच्छेद्यपणे एकरसरूप, समव्याप्त व समरस असलेल्या कुंडलिनी शक्तीच्या द्वारा जरी उत्पत्ती, स्थिती व लय या भिन्नभिन्न अवस्था निर्माण झाल्या तरी सिद्धयोगी हा श्रीशिवरूप झालेला असल्यामुळे तो निरंतर अचल व अखंड आनंदात राहतो.।।३२।।

**विशेष व्याख्या :-** सृष्टी, स्थिती आणि लय या तिन्हींमधला भेद स्पष्ट होऊनही सिद्धयोगी तुर्यचमत्काराच्या विमर्शाने युक्त असल्याकारणाने या अवस्थांमध्ये निष्कंप अर्थात् कंपरहित अर्थात् स्थिरच राहतो.

यासंबंधी "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**नाशेऽविद्याप्रपञ्चस्य स्वभावो न विनश्यति।**

**उत्पत्तिध्वंसविरहात्तस्मान्नाशो न वास्तवः।।**

**अर्थ :-** बाहेरून धन, बायको व मुले इत्यादींचा मोह आणि आतून शरीराचा मोह हाच अविद्येचा प्रपंच किंवा संसार म्हणजेच पसारा आहे. तो नष्ट झाला असता सिद्धयोग्याच्या आत्मस्वरूपाची कोणतीही हानी किंवा नुकसान होत नाही. त्यामुळे तो उत्पत्ती आणि नाश यांनी विरहित असल्या-कारणाने त्याच्या स्वरूपाचे कोणतेही नुकसान होत नाही.

हीच गोष्ट "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात अशी सांगितली आहे की -

**अवस्थायुगलं चात्र कार्यकर्तृत्वशब्दितम्।**
**कार्यता क्षयिणी तत्र कर्तृत्वं पुनरक्षयम्।।१.१४।।**

**अर्थ :-** या जगामध्ये कार्य आणि कर्तृत्व अशा दोन प्रकारचे भोग्य आणि भोक्ता अर्थात् भोगण्याची वस्तू आणि भोग घेणारा आहेत. त्यातला जो भोग्यरूप भेद आहे तो उत्पन्नही होत असतो आणि नष्टही होत असतो; परंतु भोक्तारूप भेद हा चिद्रूप म्हणजेच चैतन्ययुक्त असल्याने कधी नष्टही होत नाही आणि उत्पन्नही होत नाही. त्यामुळेच तो नित्य आहे.।।१.१४।।

यासंबंधी आणखीही असे म्हटले आहे की -

**भोक्तैव भोग्यरूपेण सदा सर्वत्र संस्थितः।।**

**अर्थ :-** भोक्ताच भोग्यरूपाने सर्वत्र आणि नित्य व्यापलेला आहे.

**तत्सृष्ट्वा तस्मिन्नेव प्राविशत्।।**

**अर्थ :-** जगामध्ये नाना प्रकारच्या पदार्थांची निर्मिती करून तो परमात्मा स्वतःच त्यात प्रविष्ट झाला.

पुढे "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात कार्यत्वाविषयी असे म्हटले आहे की-

**कार्योन्मुखः प्रयत्नो यः केवलं सोऽत्र लुप्यते।**
**तस्मिंल्लुप्ते विलुप्तोऽस्मीत्यबुधः प्रतिपद्यते।।१.१५।।**
**न तु योऽन्तर्मुखोभावः सर्वज्ञत्वगुणास्पदम्।**
**तस्य लोपः कदाचित्स्यादन्यस्यानुपलम्भनात्।।१६।।**

**अर्थ :-** वेद्य वर्गात कार्य संपादन करण्याचे सामर्थ्य जे बाह्य इंद्रियांच्या व्यापारांनीच मिळत असते; त्याचा समाधी अवस्थेमध्ये लोप होतो. परंतु अज्ञानी मनुष्याला अशा प्रकारे इंद्रियांचा व्यापार नष्ट झाल्याने असे वाटते की, "मीच नष्ट झालो आहे." त्याला हे माहीत नसते की, हा अभावपरामर्शच साक्षी असल्याकारणाने स्वात्म्याची स्थिरता सूचित करीत असतो. परंतु सर्वज्ञत्व गुणाचे स्थान असणाऱ्या परप्रमातृपदाचा कधीही लोप होत नाही;

कारण तेथे भिन्न वेद्यवर्गाचे ज्ञान असत नाही.।।१.१५-१६।।

**विवरण :-** याचाच अर्थ असा की, या समाधिकाळामध्ये केवळ एवढेच होते की, कार्योन्मुख प्रयत्न अर्थात् कार्य संपादन करण्याला प्रवण असलेला शब्द, स्पर्श इत्यादि बाह्य विषय ग्रहण करण्याचा बाह्य इंद्रियांचा व्यापार लुप्त होत असतो. इंद्रियांचा व्यापार लुप्त झाला की, "मी लोप पावलेलो आहे अर्थात् मी अभावामध्ये लय पावलेलो आहे," असे अबुध किंवा अज्ञानी योग्याला वाटू लागते.।।१५।।

**विवरण :-** परंतु ती अंतर्मुख अर्थात् शाश्वत अहंरूपामध्ये स्पंदायमान होणारी स्पंदरूप चेतनसत्ता अथवा स्पंदायमान होणारा आत्मा सर्वज्ञत्व, सर्वकर्तृत्व इत्यादि गुणांचे आश्रयस्थान आहे. या चेतनसत्तेचा किंवा आत्म्याचा केव्हाही लोप होत नाही; कारण समाधी अवस्थेमध्ये आत्मस्वरूपाव्यतिरिक्त दुसरी सत्ता अथवा दुसऱ्याचे अस्तित्व आढळत नाही किंवा अनुभवावयाला येत नाही.।।१६।।३२।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

यामध्ये अशी शंका उत्पन्न होऊ शकते की, जर सृष्टी, स्थिती व लय हे भेदांनी अवभासित होतात असे मानले तर सिद्धयोग्याचे ज्ञानही अवभासरूप अर्थात् अन्यथा म्हणजे सृष्ट्यादिरूपाप्रमाणे अस्थिर होईल. या शंकेला किंवा आक्षेपाला उत्तर देताना **"तत्प्रवृत्तावप्यनिरासः संवेतृभावात्।।३२।।"** या सूत्राने खालीलप्रमाणे प्रतिपादन केले आहे.

त्या सृष्ट्यादींचे उन्मज्ञन किंवा प्रवृत्ती म्हणजेच निर्मिती झाली असता-नाही सिद्धयोग्याच्या ज्ञानीपणामुळे म्हणजेच तुर्यचमत्कारयुक्त विचारांमुळे त्याची आत्ममयता लुप्त होत नाही; कारण जर ज्ञान नष्ट झाले तर काहीच प्रकाशित अथवा व्यक्त होणार नाही.

यासंबंधी तेथेच **"श्रीकालिकाक्रम"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**नाशोऽविद्याप्रपञ्चस्य स्वभावो न विनश्यति।**
**उत्पत्तिध्वंसविरहात्तस्मान्नाशो न वास्तवः।।**
**यतोऽविद्या समुत्पत्तिध्वंसाभ्यामुपचर्यते।**
**यत्स्वभावेन नष्टं न तन्नष्टं कथमुच्यते।।**

**अर्थ :-** जरी अविद्यारूप प्रपंचाचा अर्थात् मायोद्भासित जगताचा नाश झाला तरी सिद्धयोग्याचा स्वभाव नष्ट होत नाही. त्याच्या ज्ञानाच्या किंवा स्वभावाच्या बाबतीत उत्पत्ती, ध्वंस इत्यादींचा अभाव असल्यामुळे नाशही

वास्तव अथवा यथार्थ नाही.

**विवरण :-** मायेने अभिव्यक्त होणाऱ्या देह, इंद्रिय, तत्त्व व भुवनादींचा नाश झाला असतानाही सतत स्फुरण होण्याचा स्वभाव असणाऱ्या संवित्-स्वभावाला उदय व अस्त हे कधीच नसल्यामुळे तो अविनाशी आहे. व्यव-हारावस्थेतही ध्वंस व उत्पत्ती अभिव्यक्त किंवा प्रकाशमान होत असल्याकारणाने त्याच्याशी अभिन्न असणाऱ्यांच्या आत विश्रांती घेत असणाऱ्यांच्या प्रकाशनामुळे उपचर्यमाणत्व अर्थात् बाह्य देखावा दृष्टीस पडतो असा याचा भावार्थ आहे.

ज्याअर्थी अविद्या ही उत्पन्न होते, नष्ट होते इत्यादि वाक्यांनी जर व्यवहार होतो तर जे स्वभावाने नष्ट झालेले नाही अर्थात् जे जातिवंत शाश्वत आहे त्याला नष्ट असे कसे बरे म्हणता येईल?

हेच **"श्रीस्पंदशास्त्र"** या ग्रंथामध्ये खालील कारिकांमधून सांगितले आहे.

**अवस्थायुगलं चात्र कार्यकर्तृत्वशब्दितम्।**
**कार्यता क्षयिणी तत्र कर्तृत्वं पुनरक्षयम्।।१.१४।।**

**अर्थ :-** या ठिकाणी एकंदर दोन अवस्था आहेत. एक कार्य-अवस्था आणि दुसरी कर्तृत्व-अवस्था. यांपैकी कार्यावस्था ही नष्ट होणारी असते आणि कर्तृत्वावस्था मात्र अक्षय अर्थात् कधीही नष्ट न होणारी असते.।।१.१४।।

**विवरण :-** ग्राह्य व ग्राहक अशा भिन्न भावांनी युक्त अशी भोग्य व भोक्तृता यांमध्ये भोग्याने युक्त असणारा मायाप्रपंच हा भेदावर आधारीत असून तोच नष्ट होतो व उत्पन्न होतो. परंतु भोक्ता हा चिन्मय असल्याकारणाने कालाचा त्याच्यावर कोणताही परिणाम होत नाही व त्यामुळेच त्याचा लयही होत नाही व उत्पत्तीही होत नाही.।।१.१४।।

**कार्योन्मुखः प्रयत्नो यः केवलं सोत्र लुप्यते।**
**तस्मिंल्लुप्ते विलुप्तोऽस्मीत्यबुधः प्रतिपद्यते।।१.१५।।**

**अर्थ :-** येथे जो कार्योन्मुख प्रयत्न आहे तोच नष्ट पावतो. त्याचा लोप झाला असता अज्ञान्याला आपणच नष्ट झालो आहोत असे वाटते.

याचाच अर्थ असा आहे की, या समाधिकाळामध्ये केवळ एवढेच होते की, कार्योन्मुख प्रयत्न अर्थात् कार्य संपादन करण्याला प्रवण असलेला शब्द, स्पर्श इत्यादि बाह्य विषय ग्रहण करण्याचा बाह्य इंद्रियांचा व्यापार लुप्त होत असतो. इंद्रियांचा व्यापार लुप्त झाला की, "मी लोप पावलेलो आहे अर्थात् मी अभावामध्ये लय पावलेलो आहे," असे अबुध किंवा अज्ञानी

योग्याला वाटू लागते.।।१.१५।।

**विवरण :-** ज्याप्रमाणे घरातील देवदत्ताला कोणी "अरे देवदत्त!" अशी हाक मारली आणि त्याने स्वतःला लपविण्याच्या इच्छेने "मी घरात नाही" असे उत्तर दिले असता मी म्हणजे देवदत्त घरात आहे असेच सिद्ध होते. हाच प्रकार अप्रबुद्ध अथवा अज्ञानी मनुष्याच्या बाबतीत आहे. त्यामुळे अभाव-समाधी अवस्थेत कार्याचा अभाव असल्याकारणाने इंद्रियव्यापारही थांबलेले असतात; पण त्यामुळे आत्म्याचा अभाव आहे असे समजणे हा भ्रमच होय.

**न तु योन्तऽर्मुखो भावः सर्वज्ञत्वगुणास्पदम्।**
**तस्य लोपः कदाचित्स्यादन्यस्यानुपलम्भनात्।।१.१६।।**

**अर्थ :-** सर्वज्ञत्व गुणांचे स्थान असणारा जो अंतर्मुख भाव आहे तो कधीही लोप पावत नाही; कारण त्याच्या व्यतिरिक्त अन्य वस्तूची उपलब्धीच होत नाही. अंतर्मुखस्वरूपाचा विनाश झाला असता सर्व विश्व हे मुके होईल.

याचाच अर्थ असा आहे की, परंतु ती अंतर्मुख अर्थात् शाश्वत अहंरूपामध्ये स्पंदायमान होणारी स्पंदरूप चेतनसत्ता अथवा स्पंदायमान होणारा आत्मा सर्वज्ञत्व, सर्वकर्तृत्व इत्यादि गुणांचे आश्रयस्थान आहे. या चेतनसत्तेचा किंवा आत्म्याचा केव्हाही लोप होत नाही; कारण समाधी अवस्थेमध्ये आत्मस्वरूपाव्यतिरिक्त दुसरी सत्ता अथवा दुसऱ्याचे अस्तित्व आढळत नाही किंवा अनुभवावयाला येत नाही.।।१.१६।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१)** जगतातल्या काही रूपांतराबरोबर चैतन्य किंवा संवित्मध्ये कोणतेही रूपांतर होत नाही किंवा त्या चैतन्याचा अनुभव घेणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यातही रूपांतर होत नाही; कारण रूपांतररहित किंवा परिणामरहित तत्त्वाशिवाय रूपांतर, परिणाम किंवा बदल यांचा सुद्धा अनुभव येणार नाही.

**२)** केवळ अविद्या अथवा अज्ञानाचेच प्रकट अथवा नष्ट होणे होत असते. जे सृष्टी आणि संहाराच्या ज्ञानाला अत्यावश्यक आहे असे चैतन्य कधीही प्रकटही होत नाही आणि नष्टही पावत नाही. वस्तूंचे अथवा जगताचे प्रकट होणे अथवा नष्ट होणे होत असले म्हणून काही चैतन्याच्या स्वभावात फरक पडत नाही; कारण ते शाश्वत आणि परिणामरहित आहे.

**३)** विषय अथवा कार्याकडे प्रवृत्त झालेले प्रयत्नच थांबत असतात; परंतु जो प्रयत्न करीत असतो त्या कर्त्याचा कधीच अंत अथवा शेवट होत नाही.

प्रयत्न थांबणे याचा अर्थ सुद्धा त्या प्रयत्नांची कर्त्यात विश्रांती होणे होय.।।३२।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे सृष्टी, स्थिती आणि ध्वंसकालीही आत्मा निजस्थिती म्हणजेच स्वतःची स्थिती कशा प्रकारे ठेवतो? हे शास्त्रज्ञानाचे सागर असणाऱ्या श्रीशिवांनी पुढील सूत्रात सांगताना असे म्हटले आहे की,।।१३६-१३६.५।।

**"तत्प्रवृत्तावप्यनिरासः संवेतृभावात्।।३२।।"** अर्थात् "विश्वाच्या सृष्ट्यादि क्रिया चालू असल्या तरीही चिदात्मा।।१३७।।

आपली स्वस्थिती सोडत नाही;" कारण तो नेहमी संवेतृभावात म्हणजेच ज्ञानभावात स्थिर असतो. त्याच्या संवित्तीचा निरास म्हणजे स्वशक्तीचा लोप होत नाही.।।१३८।।

उत्पत्त्यादि अवस्था लीन होतात. त्या अवस्थांचा आधार म्हणजेच अवस्थाता कधीही लोप पावत नाही; कारण तो सर्वत्र सर्वकालात अनुस्यूत म्हणजे गुंफलेला असतो.।।१३९।।

**विवरण :-** सृष्ट्यादि प्रकटनातही म्हणजे सृष्टी, स्थिती आणि संहार होत असतानाही चित्स्वभावस्थिती बदलत नाही; कारण चित् हे तुर्यचमत्काराच्या ज्ञानाने युक्त आणि संवेत्तृभावमय म्हणजेच अमर्याद ज्ञानमय असते. तत्प्रवृत्तौ या सूत्रातील "तत्" हे पद पंचकृत्यांचे अर्थात् सृष्टी, स्थिती, लय, भासा व अनुग्रह या कृत्यांचे उपलक्षण आहे. पंचकृत्यकर्ता चिदात्मा हा त्या त्या कृत्याने स्वात्मैश्वर्य प्रकट करीत करीत विनाशशील अशा या सृष्टीतील पदार्थांच्या पूर्व म्हणजे पहिल्या आणि अपर म्हणजे नंतरच्या या अवस्थांविषयी सदैव तत्पर राहून स्वसाक्षित्व जाणवून देतो. अशा प्रकारे कधीही नाश न होणाऱ्या चिदात्म्याच्या म्हणजेच अवस्थांचा आधार असणाऱ्या अवस्थात्याच्या विविध अवस्थाच नष्ट होतात आणि उत्पन्न होतात. असा त्या अवस्थांमध्ये वारंवार बदल होत असतो; पण त्यांचा पूर्णपणे नाश कधीही होत नाही. जर नाश होतो असे मानले तर त्यांची विलयादि असाक्षिकत्वामुळे म्हणजेच कोणीही पाहणारा नसल्यामुळे असंभाव्य म्हणून प्रतीती होईल.।।३२।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"तत्प्रवृत्तावप्यनिरासः संवेतृभावात्।।३२।।"** या सूत्रानुसार जरी सृष्ट्यादि भेदप्रकारात हा सिद्धयोगी गुंतला असला तरी तो तुर्यज्ञानापासून चलित होत नाही; कारण तो प्रमाता असतो. हे प्रमातृत्व कोणत्याच घडामोडीत आवृत होत नाही.।।३२।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

सृष्टी, स्थिती आणि लय हे परस्परविरुद्ध असल्याने स्वस्वरूप झालेल्या सिद्धयोग्याला ते विरुद्धच आहे. या शंकेला उत्तर देताना श्रीमहेश्वरांनी "**तत्प्रवृत्तावप्यनिरासः संवेतृभावात्।।३२।।**" हे सूत्र उद्धृत केले आहे. ।।१३५,१३६।।

त्या सृष्ट्यादि अवस्था प्रवृत्त होत असतानाही त्यातून निष्कंपयोगी सतत वर येतो. तो त्यात बुडत नाही किंवा तन्मय होत नाही.।।१३७।।

"**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की, कार्यता आणि कर्तृता अशा दोन अवस्था सिद्धयोग्याच्या ठिकाणी असतात. त्यांपैकी कार्यावस्था ही नष्ट होणारी आहे आणि कर्तृत्व मात्र अविनाशी आहे.।।१३८।।

जो कार्योन्मुख प्रयत्न असतो तोच केवळ नष्ट होतो. तो नष्ट झाला की, अज्ञान्याला आपलाच लोप झाला आहे असे वाटू लागते.।।१३९।।

परंतु जो सर्वज्ञत्वगुणयुक्त अंतर्मुख भाव आहे त्याचा मात्र कधीही लोप होत नाही; कारण दोन भावांहून तिसरी अवस्था उपलब्ध नाही.।।१४०।।

त्यामुळे सिद्धयोगी स्वतःच्या स्वसंवेतृतेपासून कधीच ढळत नाही. त्या सिद्धयोग्याची निजरूपापासून कधीच च्युती होत नाही.।।१४१।।

त्या सिद्धयोग्यात तुर्यचमत्कार असतो. तो उपलब्धा म्हणजेच ज्ञाता असतो. त्यामुळे त्याचे ज्ञान सृष्टिनिरासानंतरही राहते.।।१४२।।३२।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

खरोखर सृष्टिस्थितिप्रलय यांच्यातील परस्परभेदांमुळे सिद्धयोग्याच्या स्वात्मस्वरूपात काही वेगळेपणा येतो का? ही शंका निवारण करण्यासाठी या सूत्रात असे सांगितले आहे की, "**तत्प्रवृत्तावप्यनिरासः संवेतृभावात् ।।३२।।**" अर्थात् "सृष्टीच्या स्थिती, लय इत्यादि अवस्था होत असूनही योग्याच्या जाणिवेत कोणताही भेद येत नाही; कारण तोच या सर्वांना जाणणारा असतो."

सृष्टी, स्थिती आणि लय यांच्यामध्ये परस्पर वेगळेपणा उत्पन्न होत असूनही योगात स्थिर असणारा सिद्धयोगी संवेतृभावामुळे अर्थात् ज्ञातेपणामुळे तुर्यचमत्कारापासून उपलब्ध झालेल्या स्वभावापासून कधीही ढळत नाही आणि अविद्यात्मक संसाराचा नाश होऊनही त्याचा आत्मस्वभाव नष्ट होत नाही. त्यामुळे उत्पत्ती व विनाश यांचा अभाव असल्यामुळे स्वरूपगत पार-मार्थिकाचा नाश होत नाही.

या चिद्रूपाच्या अविनाशी स्वभावाबद्दल शास्त्रात असे म्हटले आहे की -

**विज्ञप्तेर्न विनाशोऽस्ति विनष्टेऽपि शरीरके।**
**अभावे सूर्यकान्तस्य नैवास्ति सवितुः क्षतिः।।**

**अर्थ :-** शरीरक अर्थात् शरीर धारण करणाऱ्याचा नाश होऊनही विज्ञप्ती अर्थात् ज्ञानाचा नाश होत नाही. ज्याप्रमाणे सूर्यकांत मणी नसला म्हणून सूर्याच्या स्वरूपात कोणताही कमीपणा येत नाही अथवा तो सूर्य नष्ट होत नाही त्याप्रमाणेच उपरोक्त सिद्धान्त आहे असे समजावे.

हे कशामुळे होते? ते "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील पुढील कारिकेत सांगितले आहे.

**न तु योऽन्तर्मुखो भावः सर्वज्ञत्वगुणास्पदम्।**
**तस्य लोपः कदाचित्स्यादन्यस्यानुपलम्भनात्।।१.१६।।**

**अर्थ :-** परंतु ती अंतर्मुख अर्थात् शाश्वत अहंरूपामध्ये स्पंदायमान होणारी स्पंदरूप चेतनसत्ता अथवा स्पंदायमान होणारा आत्मा सर्वज्ञत्व व सर्वकर्तृत्व इत्यादि गुणांचे आश्रयस्थान आहे. या चेतनसत्तेचा किंवा आत्म्याचा केव्हाही लोप होत नाही; कारण समाधी अवस्थेमध्ये आत्मस्वरूपाव्यतिरिक्त दुसरी सत्ता अथवा दुसऱ्याचे अस्तित्व आढळत नाही किंवा अनुभवावयाला येत नाही.।।१.१६।।

देशकालादींनी विशिष्ट अशा कार्याचाच लोप होत असतो; परंतु जो अंतर्मुख भाव सर्वज्ञत्वादि गुणांचा आश्रय असतो त्याचा लोप कधीही सिद्ध होत नाही. असे का होत नाही?; तर चिद्रूपाव्यतिरिक्त अन्य कशाचीही सिद्धीच होत नाही. त्याचीच सर्व ठिकाणी उपलब्धी होत असते.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**देशकालक्रियाकारैरवच्छिन्नेषु वस्तुषु।**
**अनवच्छिन्नरूपस्त्वं भासि तस्य बहिः स्थितेः।।**

**अर्थ :-** देश, काल, क्रिया व आकार इत्यादींनी मर्यादित झालेल्या वस्तूंमध्ये अमर्यादित रूपाचा तू त्याच्या बाह्य स्थितीत भासत असतोस.

त्याचप्रमाणे -

**भेदसर्वज्ञतादीनां ज्ञानादीनां च नास्त्यमी।**
**ज्ञानस्यैव धर्मतया चिद्रूपस्य स्थितिर्यतः।।**

**अर्थ :-** सर्वज्ञतादि ज्ञानादींमध्ये कोणताही भेद नसतो; कारण ज्ञानाच्या धर्मामुळेच चिद्रूपाची स्थिती असते.

त्याचप्रमाणे -

**स्वतन्त्रः सर्वकृत्येषु न नियोज्यो न विघ्नवान्।**
**प्रवृतोऽस्य प्रवृत्तो वा यस्तेन त्वमीश्वरम्।**
**वीर्यं सदाऽविलुप्तशक्तिः नाशाभावश्च तद्वतः।**

**अर्थ :-** हे परमेश्वरा! तू सर्व कृत्यांमध्ये स्वतंत्र आहेस. तुला कोणीही कोणत्याही कार्यामध्ये नियुक्त करू शकत नाही आणि कोणीही तुझ्या कोणत्याही कार्यामध्ये विघ्न उपस्थित करू शकत नाही. तुझे जरी कोणीही प्रकर्षत्वाने वरण केले अर्थात् तुझा कोणीही स्वीकार केला अथवा केला नाही तरी त्यामुळे तुझ्या श्रीईश्वरतत्त्वात कोणताही फरक पडत नाही. तुझे सामर्थ्य अखंड व लोप न पावणारे आहे; कारण तू आपल्या कधीही लोप न पावणाऱ्या शक्तीने युक्त असून तुझ्या ठिकाणी नाशाचा अभाव आहे.

**विवरण :-** "तत्" या पदाने येथे तिसाव्या सूत्रात आलेली "अस्य विश्वम्" ही पदे घ्यावीत. योगी त्या विश्वात प्रवृत्त होऊनही तो निरस्त अर्थात् नष्ट होत नाही; कारण त्याच्यामध्ये संवेदनाचा भाव असतो अर्थात् त्याचा मायीयमल निरस्त म्हणजे नष्ट होत नाही.

"**अहं ब्रह्मास्मि।।**" या महावाक्यामध्ये जीव आणि ब्रह्म यांचे एकत्व सांगितलेले आहे. अहम् या पदात अहंता किंवा अस्मिता यांची उपाधी सांगितली गेली आहे अर्थात् "अहम्"च्या उपाधीने युक्त होण्यामुळे ब्रह्म हे जीव होते. "अहम्"ची उपाधी नष्ट झाल्यावर जीव हा ब्रह्मच आहे. स्थूल-देहाच्या स्तरावर देहाभिमानी "अहम्" कर्मेंद्रियांच्या क्रियांचा अभिमान अथवा अहंकार बाळगतो आणि कर्ता मलाने युक्त होतो. ज्ञानेंद्रिये आणि मनाशी संबंधित सुखदुःखांच्या भोगांचा अभिमानी "अहम्" हा भोक्तृत्वमलाने युक्त होतो. त्यांच्यावरचा चित्ताचा अभिमानी असणारा "अहम्" आणवमलाने युक्त होतो. चित्त महत्मध्ये लीन झाल्यानंतर चित्ताच्या अहंतेचा म्हणजेच अणुत्वाचा त्याग केला जातो; परंतु त्याच्यामध्ये भेदबुद्धीचा नाश होत नाही.

शक्तिपातयोगदीक्षेद्वारा ज्या साधकांची कुंडलिनीशक्ती जागृत होऊन क्रिया करू लागलेली असते त्या साधकांमध्ये आणवमलाने युक्त असणारा अहम् स्वतःमध्ये दुसऱ्या चेतनाशक्तीचा अनुभव घेऊ लागतो. त्यात साधकाला ज्ञानाबरोबर द्वितीय "अहम्"चा अनुभव येतो. त्याच्यावर लक्ष्य एकाग्र केल्याने त्या साधकाचे कर्तेपण क्षीण अर्थात् कमी कमी होऊ लागते. अशाच प्रकारे हळूहळू भोक्तेपणाही क्षीण होऊ लागतो. शांभवोपायात सांगितलेल्या

"**चैतन्यमात्मा।।१.१।।**" या सूत्रानुसार त्याचा "अहम्" चित्तापासून चिदाकाशात वरती जातो; परंतु आणवोपायात त्याच्यासाठी नाडीशुद्धी, भूतजय इत्यादि क्रमाने समाधिद्वारा जाग्रत अवस्थेला तेलाप्रमाणे शिंपडत शिंपडत शब्दस्पर्शरूपी मात्रांच्या आसक्तीहून मुक्त झाल्यावर श्रीशिवतुल्य अवस्थेची प्राप्ती होते. ही अवस्था शांभवोपायात शक्तिपाताद्वारा तत्काळ अथवा विनाविलंब प्राप्त होते.।।३२।।

## सूत्र क्रमांक ३३

**संबंध :-** विश्वाच्या सृष्टी, स्थिती व लयामध्ये निष्कंप सिद्धयोग्याला सुखदुःख होते का? याचे उत्तर देताना श्रीशिव हे सूत्र सांगताना असे म्हणतात की -

**सुखदुःखयोर्बहिर्मननम्।।३३।।**

**(पाठभेद-सुखासुखयोर्बहिर्मननम्।।३३।।)**

**शब्दार्थ :- सुखदुःखयोः** - वेद्य पदार्थांच्या स्पर्शाने होणारे सुख व दुःख यांचे अर्थात् या विषयीचे. **बहिर्मनम्** - बाह्य आहेत असे मानणे किंवा विश्व हे आभासरूप असल्यामुळे ते बहिर्भावयुक्तच असते.

**अर्थ :-** असा सिद्धयोगी सुख व दुःख हे आपल्या बाहेर म्हणजे आपल्याशी संबंधित नाहीत असे मानतो अर्थात् वेद्य पदार्थांच्या स्पर्शाने होणारे सुख आणि दुःख जाणण्याची क्रिया ही निळेपिवळे इत्यादींप्रमाणे इदंतेच्या आभासरूपाने होत असल्याने बहिर्भावानेच होते.।।३३।।

**विशेष व्याख्या :-** देहप्रमातृता, प्राणप्रमातृता आणि पुर्यष्टकप्रमातृता यांच्यामधून पलीकडे गेलेल्या या सिद्धयोगिराजाला वेद्यवर्गाच्या स्पर्शावर जय प्राप्त होतो. तो वेद्यपदार्थांच्या स्पर्शाने होणाऱ्या सुख आणि दुःखांना इदंतेचे आभासरूप म्हणूनच जाणतो. ज्याप्रमाणे निळा, पिवळा आदि बाह्यभावातच या स्पर्शादि गोष्टी असतात त्याप्रमाणेच हे असते. साधारण लोकांची अहंता वेद्य पदार्थांमध्येच असते. त्यामुळे त्यांचा स्पर्श झाला असता त्याला मी सुखी आहे किंवा मी दुःखी आहे अशा प्रकारची जाणीव होते; परंतु यांच्या व्यतिरिक्त सिद्धयोग्याला विश्व हे स्वशक्तिचक्राचा विकासच असते. "**स्वशक्तिप्रचयोऽस्य विश्वम्।।३.३०।।**" त्याने देहादि अहंकाराच्या महामोहांना ओलांडलेले असते. त्यामुळे त्याला अन्य लोकांप्रमाणे सुख व दुःख स्पर्श करू शकत नाहीत.

याविषयी "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**न दुःखं न सुखं यत्र न ग्राह्यो ग्राहको न च।**
**न चास्ति मूढभावोऽपि तदस्ति परमार्थतः।।१.५।।**

**अर्थ :-** अशा सिद्धयोग्याला सुख, दुःख व मूढत्व आदि स्पर्श करूच शकत नाहीत असा त्याचा स्वभावच असतो; कारण त्याचा परप्रमातृभाव अखंड जागृत असतो.।।१.५।।

सुख आणि दुःख हे संकल्पाने निर्माण होतात आणि ते क्षणभंगुर असतात. त्यामुळेच ते शब्दादि विषयांप्रमाणे आत्मस्वरूपाच्या बाहेरचे असतात. येथे असा प्रश्न केला जाऊ शकतो की, जर या सिद्धयोग्याला सुख आणि दुःख स्पर्श करीत नाहीत असे असेल तर तो दगडाप्रमाणे जाणीवरहित आहे असे समजावे का?

या प्रश्नाचे उत्तर श्रीअष्टावक्रांनी श्रीजनकांना "**श्रीअष्टावक्रगीता**" या ग्रंथात पुढीलप्रमाणे दिले आहे.

**निर्वासनो निरालम्बः स्वच्छो वै मुक्तबन्धनः।**
**क्षिप्तः संस्कारवातेन चेष्टते शुष्कपर्णवत्।।१२.२९।।**

**अर्थ :-** ज्ञानी वासनारहित असतो. त्याला कोणाचाही आधार घ्यावा लागत नाही. त्यामुळेच तो परप्रमातृभावात स्वाधीन असतो. ज्ञानी मनुष्यामध्ये सुखदुःखाचे मूळ असणारे राग व द्वेषादि असत नाहीत. परंतु प्रारब्धानुसार जे प्राप्त होते त्यांचा तो स्वीकार करतो. ज्याप्रमाणे पृथ्वीवर असणाऱ्या शुष्क पानांना कोठेही जाण्याची किंवा स्थित होण्याची वासना अथवा सामर्थ्य असत नाही; परंतु ज्या दिशेला वारा वाहतो त्याच दिशेला ती पाने उडत असतात अगदी त्याचप्रमाणे हा सिद्धयोगिराज प्रारब्धानुसार भोग भोगीत असतो.।।१२.२९।।

या सिद्धयोग्याच्या शरीरातील इंद्रियांचे समूह त्याला विषयांकडे घेऊन जात नाहीत. या उलट करणेश्वरी बनून त्याची सेवा करतात. श्रीअष्टावक्रांनी ही गोष्ट श्रीजनकराजांना "**श्रीअष्टावक्रगीता**" या ग्रंथात दृष्टान्त देऊन पुढीलप्रमाणे सांगितली आहे.

**निर्वासनं हरिं दृष्ट्वा तूष्णीं विषयदन्तिनः।**
**पलायन्ते न शक्तास्ते सेवन्ते कृतचाटवः।।१८.४६।।**

**अर्थ :-** वासनारहित पुरुषरूपी सिंहाला पाहून विषयरूपी हत्ती असमर्थ होऊन मुकाट्याने पळून जातात किंबहुना ते त्या वासनारहित पुरुषरूपी सिंहाकडे आकर्षित होऊन त्याची स्वतः सेवा करीत असतात.।।१८.४६।।३३।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

या सिद्धयोग्याला **"सुखदुःखयोर्बहिर्मननम्।।३३।।"** या सूत्रन्यायाने "वेद्यवस्तूंच्या स्पर्शाप्रमाणे सुखदुःखाचे ज्ञान बाह्यदृष्ट्याच नीलादिकांप्रमाणे इदंतेने अर्थात् "हे असे आहे," अशा प्रकारे होते. त्याला लौकिक ज्ञाना-प्रमाणे अहंतेचा स्पर्श होत नाही. व्यवहारात मी सुखी व मी दुःखी असा अहंसंबंध असतो. या सिद्धयोग्याला **"स्वशक्तिप्रचयोऽस्य विश्वम् ।।३.३०।।"** या सूत्रात सांगितल्याप्रमाणे सर्व विश्व अहंतेने आच्छादित होऊन स्फुरते. केवळ सुखदुःखादि पदार्थ स्फुरत नाहीत. ज्या सिद्धयोग्याचा पुर्यष्टकादि ज्ञातृत्वभाव शांत झाला आहे त्याला सुखदुःखादींचा स्पर्श कसा होईल?

यासंबंधी **"श्रीईश्वरप्रत्यभिज्ञासूत्रविमर्शिनी"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**ग्राहकभूमिकोत्तीर्णानां वास्तवप्रमातृदशाप्रपन्नानां**
**तत्तस्वहेतूपस्थापितसुखदुःखसाक्षात्कारेऽपि न तेषां**
**सुखदुःखादि, नोत्पद्यत एव वा सुखादि हेतुवैकल्यात्**
**सहजानन्दाविर्भावस्तु तदा स्यात्।।**

**अर्थ :-** ग्राहकभूमिका ओलांडून पलीकडे गेलेल्या वास्तवप्रमातृदशा अर्थात् ज्ञानी अवस्था प्राप्त झालेल्या सिद्धयोग्यांना स्रक्चंदनवनितादि सुखहेतू व शत्रू-व्याधीदि दुःखहेतू यांचा जरी अनुभव आला तरी सुखदुःख होत नाही. एखाद्या वेळी जरी सुखादि अनुभव त्याला होत असेल असे वाटले तरी ते सुखादि चित्प्रकाशमयच असल्याने सुखादि नसतातच.

त्यामुळे **"श्रीस्पंदशास्त्र"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**न दुःखं न सुखं यत्र न ग्राह्यं ग्राहको न च।**
**न चास्ति मूढभावोऽपि तदस्ति परमार्थतः।।१.५।।**

**अर्थ :-** जेथे सुखही नाही, दुःखही नाही, ग्राह्यही नाही, ग्राहकही नाही आणि मूढभावही नाही तीच परमतत्त्वाची अवस्था होय.।।१.५।।

**विवरण :-** सुखदुःखादि दोन अवस्थांनी नष्ट न होणाऱ्या स्वभावाने आणि अस्पृष्ट अशा संवित्तत्त्वाचा कोणताही परिणाम न होण्यामुळे सौषुप्तपदाचेही ज्ञान होत असल्याने तेथे संवेदकसत्तेचा स्वीकार करावा लागतो. असे केले नाहीतर त्यानंतर पुढील काळात त्याची स्मृती होणार नाही.।।३३।।

**विवरणात्मक टीपा :-**

१) सुख आणि दु:ख हे अंत:करणाचे अनुभव आहेत. जो या अंत:करणाशी जोडलेला आहे त्याला सुखदु:खादींचे अनुभव घेणे बंधनकारकच असते. परंतु सिद्धयोगी या अंत:करणापासूनच नव्हे; तर पुर्यष्टकाच्या सूक्ष्म यंत्रणेपासूनच तुटलेला असतो व चैतन्यानुभव घेण्याच्या अवस्थेपर्यंत पोहोचलेला असतो. त्या अवस्थेत त्याच्यावर सुखदु:खादि कशाचाच परिणाम होत नाही. त्याने ही मानस अवस्था ओलांडलेली असते.

२) ग्राहक अथवा मर्यादित ज्ञाता म्हणजेच मायाप्रमाता होय. हा मायाप्रमाता मायेच्या प्रभावाखाली असतो.

३) वास्तवप्रमाता म्हणजेच श्रीशिवप्रमाता होय अर्थात् सिद्धयोग्याने श्रीशिवचैतन्यप्राप्त केलेले असते.

४) सुख हे राग अथवा आसक्तीमुळे होत असते अर्थात् एखाद्या गोष्टीत स्वत:चा रस असेल आणि ती मिळाली तर सुख होते व दु:ख हे द्वेष किंवा एखाद्या गोष्टीबद्दल तिटकारा असल्याने होत असते. सिद्धयोगी रागद्वेषादींच्याही पलीकडे जाऊन पोहोचलेला असतो. त्यामुळे सुखदु:खादींची कारणे त्याच्यामध्ये विद्यमान नसतात.

५) सुखदु:खादि अनुभव हे अनुभवाचे अंतर्गत विषय होत.

६) येथे ग्राह्य विषय म्हणजे अनुभवाचे बाह्य घटक रंग, आवाज, घट इत्यादि होत.।।३३।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

त्यानंतर सुखदु:खांबद्दल निरूपण करताना भगवान् श्रीशिव हे "**सुखासुखयोर्बहिर्मननम्।।३३।।**" अर्थात् "आंतरिक सुखदु:खेही तो संवेत्ता म्हणजे चिदात्मा अर्थात् सिद्धयोगी बाह्य सुखदु:खाप्रमाणेच विनाशी आहेत असे समजतो," असे या सूत्रात कथन करून ते पुढे असे म्हणतात की,।।१३९.५।।

लौकिक विषयांचा उपभोग घेतल्यामुळे इष्टप्राप्त्यादींचे प्रत्यगात्म्यामध्ये अनुभवाला येणारे अंत:सुख जीव हा बाह्यसुखच समजतो.।।१४०,१४१.५।।

**विवरण :-** उपलब्धृपदावर स्थित असणाऱ्या म्हणजेच ज्ञात्याजीवाला अतिप्रिय लौकिक विषयप्राप्तीमुळे उत्पन्न होणारी आनंदवृत्ती म्हणजे सुख होय. तो विषय प्राप्त होत नसेल किंवा त्याच्या विरुद्ध विषय अनुभवावयाला येत असेल तर उत्पन्न होणारी अनानंदवृत्ती म्हणजे दु:ख होय. ते दु:ख

आध्यात्मिकादि प्रकारांनी अनेक प्रकारचे होते. अशा प्रकारे जरी हे सुखदुःख आविर्भूत अथवा प्रकट झाले तरी विचारदृढतेमुळे अहंममतेच्या अभावी बाह्यविषयांप्रमाणे त्या सुखदुःखांची जाणीव झाल्यामुळे ते स्वरूपावर आवरण घालणारे ठरू शकत नाही. ज्याप्रमाणे पशूला सुखादिकात अहंममता वाटते त्याप्रमाणे ज्ञान्याला वाटत नाही, असा याचा भावार्थ आहे.

दुःख हे तीन आणि पाच प्रकारचे असून त्यातील पोटभेदाने ते अनंत प्रकारचे आहे.।।१४१।।

आध्यात्मिकादि दुःख हे आधिभौतिक, आध्यात्मिक व आधिदैविक अशा भेदाने तीन प्रकारचे असून तम, मोह, महामोह, तामिस्र व अंधतामिस्र असे त्याचे इतर पाच भेद मिळून एकूण आठ भेद होतात.।।१४२,१४२.५।।

तम म्हणजे आत्माभिमान, मोह म्हणजे देहाला आत्मा समजणे, महामोह म्हणजे बाह्य पुत्रादि संबंधींना किंवा नातेवाईकांना आत्मा मानणे, तामिस्र म्हणजे कुटुंबादि पीडाकर वस्तूंबद्दल सहनशक्ती नसणे किंवा कुटुंबियांना त्रास देणाऱ्यांबद्दल क्रोध येणे आणि अंधतामिस्र म्हणजे मरणाची भीती किंवा मृत्यूचा उद्वेग होय. हेच अष्टविध प्रकारचे दुःख असून ते थोड्याथोड्या फरकाने अनंत प्रकारचे होते.।।१४२ ते १४५।।

या सुखदुःखादि अवस्थांचे जे ज्ञान अथवा जो अनुभव येतो तो कोणत्याही स्वरूपाने चिदात्म्याच्या अर्थात् सिद्धयोग्याच्या ज्ञानाला आवरण घालू शकत नाही आणि तो या सुखदुःखांशी कोणत्याही प्रकारच्या आवेशाने व दृढतर-पणे तद्रूप होऊ शकत नाही किंवा तादात्म्य पावू शकत नाही.।।१४६, १४६.५।।३३।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**सुखदुःखयोर्बहिर्मननम्।।३३।।**" या सूत्राद्वारा श्रीशिव असे कथन करतात की, या सिद्धयोग्याला वेद्यविषयाचे बाह्य नीलादींप्रमाणे इदंतारूपाने ज्ञान असते; मात्र त्याला लौकिक जगाप्रमाणे अहंतेचे ज्ञान नसते. ज्याचा पुर्यष्टक-प्रमातृभाव शांत झालेला आहे असा सिद्धयोगी सुखदुःखाला कसा बरे स्पर्श करील?।।३३।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**सुखासुखयोर्बहिर्मननम्।।३३।।**" या सूत्राद्वारा सुखदुःखाबद्दल सांगताना श्रीशिव असे म्हणतात की, "आंतरिक सुखदुःखेही तो संवेत्ता अर्थात् चिदात्मा म्हणजे सिद्धयोगी बाह्याप्रमाणेच समजतो."

विश्वाच्या सृष्टी, स्थिती आणि संहारामध्ये स्थिर असणारा सिद्धयोगी सुखदुःखादिकांपासून फार लांब राहतो.।।१४२.५।।

देहप्राणादिकांना प्रमातृत्व अर्थात् ज्ञातृत्व नाही असे दृढ ज्ञान झालेल्या सिद्धयोग्याला वेद्य आणि स्पर्श यांपासून होणाऱ्या सुखदुःखांविषयी हे नील-पीतादि द्रव्यांसारखे बहिर्मुखभावी अर्थात् बाह्य आहेत असे वाटत असते. तात्पर्य सिद्धयोगी सुखादि विचार करीत नाही.।।१४३,१४४।।

मी सुखी आहे, मी दुःखी आहे अशी सामान्यलोकांप्रमाणे सिद्धयोग्याची दृष्टी नसते. अहंपणामुळे त्याची सुखादींबद्दल आसक्ती नसते. विश्व हे त्याच्या शक्तीचा विस्तार आहे या सूत्रोक्त नीतीप्रमाणे।।१४५।।

अहंतेने आच्छादित असल्याने सिद्धयोग्याला हे विश्व प्रकाशित होते. लोकांप्रमाणेच सिद्धयोगी सुखी किंवा दुःखी भासतो; पण त्याचा सुखदुःखादि संबंध खरा नसतो.।।१४६।।

महामोहाने युक्त असा जो देहादिकांविषयीचा अहंकार या सिद्धयोग्याने ओलांडलेला असतो; मग अशा अधिकारी योग्याला इतरांप्रमाणे सुखदुःखांचा स्पर्श कसा होईल? होणार नाही.।।१४७।।३३।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

"विश्वाच्या सृष्टिस्थितिलयांमध्ये निष्कंप किंवा स्थिर अशा सिद्धयोग्याला लोकांप्रमाणे सुख किंवा दुःखांचेही संवेदन अथवा जाणीव होत नाही," हेच "**सुखासुखयोर्बहिर्मननम्।।३३।।**" या सूत्रात प्रतिपादिले आहे. या महायोग-निष्ठ पुरुषाला लौकिक मनुष्यांप्रमाणे सुखदुःखांचे संवेदन होत नाही. तो तर इदंताभासरूपाने नीलादींप्रमाणे बाहेरच संवेदन करीत असतो; कारण "**स्वशक्तिप्रचयोऽस्य विश्वम्।।३.३०।।**" या सूत्रार्थानुसार अहंतेने आच्छादलेले याचे सर्व स्वस्वरूपच प्रकाशित होत असते. त्यामुळेच देहप्राणपुर्यष्टक आदि भावांच्या पलीकडे गेलेला सिद्धयोगी सुखदुःखादि धर्मांकडून कधीही स्पर्शिला जात नाही.

त्याचप्रमाणे श्रीवसुगुप्तपादाचार्यांनी "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**न दुःखं न सुखं यत्र न ग्राह्यं ग्राहको न च।**
**न चास्ति मूढभावोऽपि तदस्ति परमार्थतः।।१.५।।**

**अर्थ :-** ते स्पंदतत्त्व अर्थात् शक्तितत्त्व हे तत्त्वतः अर्थात् वास्तविक स्वरूपात सत् व नित्य आहे. या स्पंदतत्त्वाच्या ठिकाणी दुःख नाही, सुख

नाही, ग्राह्यता अर्थात् ग्रहण होण्याचा धर्म नाही, ग्राहकता नाही आणि मूढ-भावही अर्थात् अचेतनत्वही नाही. (हे तत्त्वच सिद्धयोगी स्वतः होतो.)

वास्तविक पाहता सिद्धयोग्याचे अनुत्तरत्व नित्यच असते. या अनुत्तर नित्य स्वरूपात आध्यात्मिकादि कोणतीही दुःखे नाहीत, विषयांशी संबंधित असणारे सुख नाही, घटपटादिरूप ग्राह्य पदार्थ नाहीत, ग्राहक अर्थात् पदार्थांचे ग्रहण करणारा नाही आणि मी हे ग्रहण करणारा आहे अशा प्रकारचे विकल्पांचे अहंकाररूपत्वही असत नाही; कारण अहंकाराचे स्वरूप अविद्येने युक्त असते. परंतु याने अधिष्ठातृभावरूप ग्राहकाचा अभाव सांगितलेला नाही; कारण ग्राहक दोन्ही स्वरूपांचा आहे.।।१.५।।

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**परमार्थेन न ग्राह्यं ग्राहकं वा न किञ्चन।**
**यस्मादृते तत्स्वाभासमस्वाभासमिवेक्ष्यते।।**

**अर्थ :-** परमार्थाने अर्थात् खरे पाहता ग्राह्यही नाही आणि ग्राहकही नाही. त्याच्याशिवाय म्हणजे श्रीपरमेश्वरांशिवाय त्याचा स्वाभास अस्वाभासा-प्रमाणे दिसतो.

जर असे असेल तर दगडाप्रमाणे मूढत्व येईल का?; कारण चिद्रूपत्वा-मुळे मूढपणाचा अभाव येथे नाही.

त्यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**यथा शीतोष्णयोर्मध्ये काले नोष्णो न शीतलः।**
**एवं ही सुखदुःखाभ्यां हीनमस्ति पदं विभोः।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे शीत म्हणजेच थंड आणि उष्ण म्हणजेच गरम यांच्या मधल्या काळात काहीही थंड नाही आणि गरमही नाही. अशाच प्रकारे विभू व सर्वव्यापक श्रीपरमेश्वराचे पद किंवा स्थान हे सुखदुःखांपासून रहित असते.

**विवरण :-** अशा सिद्धयोग्याला सुखदुःखरूपी मलांच्या संस्कारांमधून मुक्तता करून घेण्यासाठी सुख व दुःख या दोघांनाही आपल्या स्वरूपाहून वेगळे समजले पाहिजे. मनासहित असणाऱ्या सामान्य मनुष्याची जाणीव ही सापेक्ष असते म्हणजेच त्याच्या ठिकाणी नेहमीच ग्राहक, वेदक अथवा अनुभव घेणाऱ्याचा ग्राह्य आणि वेद्य अथवा ज्याचा अनुभव येतो अशा वस्तूशी संबंध असतो. यालाच ग्राहक व ग्राह्य भूमी किंवा ज्ञाता व विषय यांचे द्वैत असे म्हणतात. परंतु अलौकिक चैतन्य मात्र या सापेक्षतेपासून अथवा

ज्ञाता व त्याचा विषय यांच्या द्वैतापासून मुक्त असते. ज्या सिद्धयोग्याला हे आत्मचैतन्य प्राप्त झाले आहे त्याच्यावर या सापेक्ष अशा जाणीव अथवा चैतन्याच्या मानसिक पातळ्यांचा परिणाम होत नाही म्हणजेच त्याच्यावर कोणत्याही सुखदु:खादि द्वंद्वांचा परिणाम होत नाही.

श्रवण, मनन आणि निदिध्यासन ही वेदान्तसाधनप्रणालीची मुख्य साधने आहेत. श्रवणाची गती श्रवणेंद्रियापासून मनापर्यंत असते, मननाची गती मनापासून बुद्धीपर्यंत असते आणि बुद्धी स्थिर झाल्यानंतर ती मनन निदिध्यासनाचे स्वरूप प्राप्त करते. हेच एकतीसाव्या **"स्थितिलयौ।।"** या सूत्रातील स्थिती या पदाने सांगितले आहे. अशा प्रकारे सुखदु:खांना विजातीय मानून मननाची परिपक्व अवस्था म्हणजेच निदिध्यासनात आत्मस्थिती ठेवण्यासाठी होणारी प्रवृत्ती होय.।।३३।।

## सूत्र क्रमांक ३४

**संबंध :-** कारण की, जीवभावाच्या पलीकडे गेल्यामुळे, विश्व हे स्वशक्तिप्रचय असल्याची अनुभूती आल्यामुळे व मीच सर्व विश्वरूपाने नटलो आहे अशा ज्ञानामुळे या सिद्धयोग्याच्या अंत:करणाला सुख व दु:ख स्पर्श करू शकत नाहीत किंवा त्याची बाधा त्याला होत नाही हेच या सूत्रात सांगितले आहे.

## तद्विमुक्तस्तु केवली।।३४।।

**शब्दार्थ :-**

**तत् (= ताभ्याम्)** सुख व दु:ख या दोहोंपासून किंवा जोपर्यंत संस्कार शिल्लक राहतात तोपर्यंत. **विमुक्त** - संपूर्ण, विशेषेकरून विमुक्त, स्वतंत्र व संबंध नसलेला किंवा सुखदु:खांपासून मुक्त होऊन. **तु** - परंतु किंवा विशेष करून (पुढील सूत्रापेक्षा याचे विशेषत्व दाखवणारे अव्यय.) **केवली** - ज्याचे केवळ अद्वैतनिष्ठ व चिन्मात्र स्वरूप आहे असे अनुभव घेणारा प्रमाता.

**अर्थ :-** सुख आणि दु:ख यांच्यापासून म्हणजे यांच्या संस्कारांपासून संपूर्णपणे मुक्त झालेला तो म्हणजे सिद्धयोगी केवली होतो अर्थात् ज्याचे केवळ चिन्मात्र स्वरूप आहे अशी अवस्था अनुभवणारा होतो म्हणजे केवळ अद्वयनिष्ठ किंवा श्रीशिवशक्तिसमरसमय होतो.।।३४।।

**विशेष व्याख्या :-** स्वरूपनिष्ठ म्हणजेच स्वरूप किंवा आत्मभावात स्थित असणाऱ्या सिद्धयोग्याला संस्कारमात्रातही सुख व दु:ख स्पर्श करू शकत नाहीत. तो विशेषरूपाने यातून मुक्त होतो. तो अखंड चिन्मात्रस्वरूप

अद्वैतनिष्ठच राहतो.

याचे "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे.

**सुखदुःखादिविज्ञानविकल्पानल्पकल्पितम्।**
**भित्त्वा द्वैतमहामोहं योगी योगफलं लभेत्।।**

**अर्थ :-** सुख, दुःख आणि मोहज्ञानाच्या विकल्पांनी घनीभूत अर्थात् घट्ट झालेल्या द्वैताच्या महामोहाला फोडून अर्थात् नाश करून साधकभक्तयोगिशिष्य योगफळ मिळवितो अर्थात् त्याला सतत स्वरूपाचा लाभ होत राहतो.

येथे "तु" अर्थात् परंतु या पदाने पुढे सांगितल्या जाणाऱ्या अज्ञानीच्या अपेक्षेने ज्ञानी माणसातले विशेष सांगितले आहेत.।।३४।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

ज्याअर्थी पुर्यष्टकप्रमातृभावाच्या म्हणजेच देहादि ज्ञातृत्वाच्या पलीकडे गेलेल्या सिद्धयोग्याला अंतर्मनात सुखदुःखांचा स्पर्श होत नाही त्याअर्थी तो सिद्धयोगी सुखदुःखांपासून विशेषत्वाने मुक्त होऊन व संस्कारमात्रही आतमध्ये स्पर्श न होणारा असा होऊन केवळ चिन्मात्रप्रमातृरूप अर्थात् चिन्मय असा ज्ञाता होतो, असे "**तद्विमुक्तस्तु केवली।।३४।।**" या सूत्राने कथन केले आहे.

यासंबंधी "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात असे म्हटले आह की -

**सुखदुःखादिविज्ञानविकल्पानकल्पितम्।**
**भित्त्वा द्वैतमहामोहं योगी योगफलं लभेत्।।**

**अर्थ :-** सुख-दुःखादि ज्ञानकल्पनांनी भरलेला हा द्वैतरूपी महामोह अर्थात् पिंडब्रह्मांडादि संसार पसरला आहे. त्याचा भेद केल्याने सिद्धयोग्याला योगफळ मिळते.

या सूत्रातील "तु" हा शब्द पुढे सांगितल्या जाणाऱ्या सूत्राच्या अपेक्षेने विशेषार्थ दाखविणारा आहे; तर पुढील सूत्रातील "तु" शब्द या सूत्रातील अर्थाच्या अपेक्षेने सांगितला आहे.।।३४।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

त्यामुळे हे सुखादिज्ञान ज्यावेळेला त्या सिद्धयोग्याला आतून बाहेरून स्पर्श करीत नाही त्यावेळेला मुक्त आत्म्याची स्थिती कशी असते ते भगवान् श्रीशिवांनी "**तद्विमुक्तस्तु केवली।।३४।।**" या सूत्रात सांगितले आहे.।।१४७।।

सुख, दुःख व अज्ञान यांपासून दूर असणारा सिद्धयोगी केवळ मुक्तीमुळे स्वस्थ असतो; कारण सर्वत्र त्याची मुक्तावस्था अनुस्यूत असते.।।१४८।।

**विवरण :-** ज्यावेळेला सुखादिज्ञान अंतःकरणात शिरू शकत नाही त्यावेळेला सुखादिकांनी व त्याच्या मोहाने अस्पृष्ट असा सिद्धयोगी आत्मवैभवसंपन्न व केवलचिन्मात्र परिज्ञाता होऊन परमज्ञानात विश्रांती घेतो व पूर्ण प्रकाराने योगफळ मिळवितो.।।३४।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**तद्विमुक्तस्तु केवली।।३४।।**" या सूत्राद्वारा श्रीशिवांनी हे स्पष्ट केले आहे की, त्या सुखदुःखांपासून विशेषत्वाने मुक्त असणारा हा सिद्धयोगी संस्कारमात्रानेही त्यांच्यापासून लांब असतो. सिद्धयोगी केवली अर्थात् चिन्मात्रस्वरूप असतो; कारण सुखदुःखाचा वाराही त्याच्या चित्ताला स्पर्श करीत नाही.।।३४।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

"**तद्विमुक्तस्तु केवली।।३४।।**" या सूत्रातून श्रीशिवांनी असे कथन केले आहे की, चित्प्रमातृत्व बाणल्यावाचून व पुर्यष्टकाचा अभिमान टाकल्यावाचून सुखादिकांचा शेवट होत नाही म्हणून या अवस्थेत असणाऱ्याला साधक समजावे; कारण तो सिद्ध होऊ शकत नाही. त्यातून मुक्त झाला की, तो योगींद्र म्हणवितो.।।१४८,१४८.५।।

त्या दोन्हींतून म्हणजे प्रमातृत्व व पुर्यष्टकत्व यांमधून मुक्त झालेला साधक योगींद्र पदवीला पावतो; कारण सुखदुःखांच्या संस्कारांचाही स्पर्श त्याला होत नाही. त्यामुळे तो केवळ चैतन्यमय म्हणवितो.।।१४९।।

या सूत्रातील "तु" हा शब्द पुढील सूत्रविषयदृष्टीने भेद सांगतो आणि पुढील सूत्रातील "तु" हा शब्द मागील सूत्राहून भेद किंवा वेगळेपणा सांगतो.।।१५०।।३४।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

ज्यावेळी प्रशांतदेहप्राणादि प्रमातृभावाच्या आत सुखदुःखांचे स्पर्श होत नाहीत त्यावेळी सिद्धयोगी "**तद्विमुक्तिस्तु केवली।।३४।।**" अर्थात् "सुख व दुःख यांच्यापासून मुक्त होऊन केवली म्हणजे चिन्मात्रस्वरूप होतो."

पूर्वीच्या सूत्रातून सांगितलेल्या सुखदुःखादि अंतःकरणाच्या धर्मांपासून विमुक्त झालेला व त्यांच्या संस्कारांनीही आंतर असंस्पृष्ट असणारा योगिराज केवली म्हणजेच चिन्मय म्हणविला जातो. त्याचप्रमाणे साधकभक्तयोगिशिष्य सुखदुःखादि विशिष्ट ज्ञानांच्या विकल्पाने अनेक प्रकारांनी अकल्पित असणारे द्वैतज्ञान नष्ट करून योगफळ प्राप्त करतो. "तु" हा सूत्रातला शब्द पुढच्या

सूत्राच्या अपेक्षेने विशेषत्वाचे द्योतन करणारा आहे. त्याचप्रमाणे पुढच्या सूत्रातला "तु" हा शब्द पूर्वसूत्राच्या अपेक्षेने विशेषत्वाने प्रकाशन करणारा आहे.

**विवरण :-** भोक्तृत्व भावापासून विमुक्त झाल्यावर अणुत्वही समाप्त होऊन जाते आणि आत्मा आपल्या शुद्ध स्वरूपात केवलीभावाला प्राप्त होतो.।।३४।।

## सूत्र क्रमांक ३५

**संबंध :-** त्यामुळेच याच्या उलट अवस्थेतल्या जीवदशेत असलेला पुरुष अर्थात् जीवात्मा शुभ तसेच अशुभ कर्मांच्या कलंकांनी कर्मात्मा कसा म्हणविला जातो, याचे वर्णन या सूत्रात केले आहे.

**मोहप्रतिसंहतस्तु कर्मात्मा।।३५।।**

**शब्दार्थ :- मोह** (= मोहेन) - मोहाने किंवा अज्ञानाने म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या बाह्यसंसारोन्मुख गतीने अर्थात् कामोपभोगाकांक्षातृष्णा-वासनाइच्छासंकल्पनांनी. **प्रतिसंहतः** - व्याप्त. घनीभूत मोहाने व्याप्त होऊन सुखांचा व दुःखांचा आश्रय घेतलेला व आगर झालेला. **तु** - परंतु किंवा याच्या उलट. **कर्मात्मा** - शुभाशुभ कर्मांनी म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या बाह्यसंसारोन्मुख गतीने लिप्त असा साधारण जीव.

**अर्थ :-** पण याच्या उलट जो साधकभक्तयोगिशिष्य मोहाने किंवा अज्ञानाने व्याप्त होतो तो कुंडलिनी शक्तीच्या बाह्यसंसारोन्मुख गतीने अर्थात् कामोपभोगाकांक्षातृष्णावासनाइच्छासंकल्पनांनी व्याप्त होतो म्हणजे तो सुख-दुःखांचा आश्रय घेऊन किंवा त्यांचे आगर होऊन शुभ व अशुभ कर्मांनी लिप्त किंवा कलंकित होतो अर्थात् कर्मात गुरफटला जातो.।।३५।।

**विशेष व्याख्या :-** परंतु अज्ञानाच्या आवरणाने पुरुष जीवच असतो, योगी असत नाही. तो सुखदुःखांचाच आश्रित असतो आणि अखंड कर्मातच गुंतलेला असल्यामुळे तो शुभ आणि अशुभ कर्मांनी कलंकित होत राहतो. तो अविद्येच्या प्रभावाने विकल्पांच्या अनुसारच चालतो आणि स्वरूपात सुखदुःखांचा साक्षात्कार करू शकत नाही.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**अज्ञानैकघनो नित्यं शुभाशुभकलङ्कितः।।**

**अर्थ :-** केवल अज्ञानाने घनीभूत होऊन साधारण जीव नेहमी शुभ आणि अशुभ वासनांनी अर्थात् मायीयमलांनी कलंकित होतो.।।३५।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

मागील विषयच थोडा अधिक स्पष्ट करण्याकरिता "**मोहप्रतिसंहतस्तु कर्मात्मा।।३५।।**" हे सूत्र सांगितले आहे.

या सूत्राद्वारा असे कथन केले आहे की, मोह म्हणजे अज्ञान होय. त्या अज्ञानाशी एकरूप होऊन त्याने पूर्णपणे भरलेला असा जीव सुखदुःखांचा आश्रय होतो व तो कर्मात्मा म्हणजेच नित्य चांगल्या व वाईट कर्मांनी डागाळलेला अर्थात् त्यांनी युक्त होतो.

"**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात याविषयी असे म्हटले आहे की -

**यदविद्याविवृततया विकल्पविधियोगतः।**
**शिवादीन्नेव झटिति समुद्भावयतेऽखिलान्।।**
**ततः शुभाशुभा भावा लक्ष्यन्ते तद्वशत्वतः।**
**अशुभेभ्यश्च भावेभ्यः परं दुःखं प्रजायते।।**

**अर्थ :-** घटपटादि कल्पनेच्या जाळ्यात गुरफटलेल्या अज्ञानी माणसाला श्रीशिवादि तत्त्वांचा विचार न केल्यामुळे मायीयमालिन्य येते आणि बऱ्या व वाईट कर्मफलांचा अनुभव घ्यावा लागतो. त्या अशुभभावांपासून परम दुःख निर्माण होते. तज्ज्ञाला मात्र या विश्वात हे आत्मविलसित अर्थात् आत्म्याची सृष्टी आहे असा आत्मविचार जागृत असल्याने सहजसुखाचा आविर्भाव होतो.।।३५।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

मूढस्थिती ही आच्छादक होते अथवा नाही हे "**मोहप्रतिसंहतस्तु कर्मात्मा।।३५।।**" या सूत्रात भगवान् श्रीशिवांनी सांगितले आहे.।।१४८.५।।

मोह, मौर्ख्य अर्थात् मूर्खपणा, अनुद्योग, अविद्या, जाड्य, आवरण, अविवेक व मूर्च्छा आदि मोहाचे प्रतिशब्द आहेत.।।१४९,१४९.५।।

**विवरण :-** ज्यावेळेला अविद्यापर्यायी अशा मोहाने शरीरादि वस्तूंविषयी आत्मत्व वाटू लागते त्यावेळेला जीव देहइंद्रियादिकांनी शुभाशुभ व मिश्र कर्मे करतो व चिद्रूप आत्मस्वरूपाला विसरून विचित्र व विविध कर्मांच्या फलांविषयी लोलुप होतो आणि जीवात्मा मनुष्यपश्वादि अनेक योनींमधून फिरत राहतो.

शरीरादींचा अहंभाव हा अहंभाव असल्यामुळे फोफावतो.।।१५०।।

त्या अहंभावाने व्याप्त असा आत्मा संसारी पशू किंवा कर्मात्मा म्हणवितो.।।१५१।।

त्यावेळेला भेदाचा आभास होतो व तो अभेदज्ञानाच्या लक्षणासारखा वाटतो.।।१५१.५।।३५।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**मोहप्रतिसंहतस्तु कर्मात्मा।।३५।।**" या सूत्राद्वारा श्रीशिवांनी असे कथन केले आहे की, "मोहाने म्हणजेच अज्ञानाने भरलेला किंवा अज्ञानरूप झालेला पशू कर्मे करीत राहतो."

यासंबंधी शास्त्रात असे म्हटलेच आहे की -

**अज्ञानैकघनो नित्यं शुभाशुभकलङ्कितः।।**

**अर्थ :-** अज्ञानाने भरलेला जीव हा नेहमीच शुभाशुभकर्मांनी किंवा पाप व पुण्याने कलंकित होतो अथवा मुक्त होतो.।।३५।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

तोच "तु" या पदाने सांगितलेला फरक श्रीशिव "**मोहप्रतिसंहस्तु कर्मात्मा।।३५।।**" अर्थात् "मोहव्याप्त असेल तर तो कर्मात्मा समजावा," असे या सूत्रात सांगत आहेत.।।१५०.५।।

मोह म्हणजे स्वतःचे अज्ञान होय. स्वस्वरूपाविषयी कोणतेही ज्ञान नसणे म्हणजेच मोह होय. त्या मोहाशी जीव प्रतिसंहत अर्थात् एकरूप झालेला असतो।।१५१।।

अर्थात् त्या मोहाशी समरस झालेला असतो. तो त्यानंतर दुःखादींचा आश्रय होतो अर्थात् त्यांच्यात गुंगून जातो. तोच बऱ्या-वाईट कर्मांनी कलंकित होणारा कर्मात्मा असे समजावे.।।१५२।।३५।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

जे "तु" शब्दाने अंतर सांगितले आहे तेच "**मोहप्रतिसंहतस्तु कर्मात्मा।।३५।।**" या सूत्राने श्रीशंकर सांगतात. मोह म्हणजे स्वस्वरूपाचे अज्ञान होय. त्याने प्रतिसंहत म्हणजे तादात्म्यभाव प्राप्त झालेला होय. त्यामुळेच तो सुखदुःखादि भावांचा आश्रय होतो. कर्मात्मा संसारी जीव हा नित्य पापपुण्यांनी प्रदूषित होत असतो.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**अज्ञानैकघनो नित्यं शुभाशुभकलङ्कितः।।**

**अर्थ :-** अज्ञानाने परिपूर्ण असा जीव नित्य चांगल्या व वाईट कर्मांनी कलंकित होतो.

अज्ञानाच्या आवरणामुळे येणाऱ्या अनेक प्रकारच्या संबंधांमुळे साधक-

भक्तयोगिशिष्य पृथ्वीपासून श्रीशिवांपर्यंतच्या सर्व छत्तीस तत्त्वांना तत्काळ जाणू शकत नाही. त्यामुळे त्या तत्त्वांनी वश झालेल्या त्या साधकभक्तयोगिशिष्यात शुभ व अशुभ भाव दिसून येतात. त्या अशुभ भावांपासून अत्यंत दुःख निर्माण होते; कारण मूढप्राण्यांना घटपटादि वेद्य अर्थात् जाणण्याला योग्य अशा वस्तूंच्या विकल्पांच्या जाळ्यांच्या कल्पनांमध्ये स्थित असणाऱ्या श्रीशिवादितत्त्वाच्या अनुत्तर चिद्रूपस्वभावामुळे, त्याच्या अविमर्शामुळे व मायीय मलयुक्ततेमुळे मलिनत्व प्राप्त होऊन शुभ व अशुभ कार्यांच्या मलातून उत्पन्न होणारा सुखदुःखांचा अनुभव येतो. परंतु तत्त्वज्ञानी विश्वाच्या भावपटलावर "**स्वात्मविलसितमिदं सर्वमस्ति।।**" अर्थात् "हे सर्व स्वात्म्याने शोभणारे आहे," अशा प्रकारच्या स्वानुभवाने त्याच्या ठिकाणी सहजचिद्रूपाचा आविर्भाव होतो.।।३५।।

**विवरण :-** "अहम्" रूपी मोहाने मुक्त असणारा देहाभिमानी कर्मात्मा असतो.

सांख्य दर्शनात "अहम्"लाच मोह म्हटले आहे. अहंभावाचे स्थूल व सूक्ष्म स्तर या आधी सांगितलेले आहेत. त्यावेळेला उपाधीसह असणाऱ्या अहंतेचा त्याग करून केवली अवस्थेत प्रज्ञानात्मारूपी "अहम्" शिल्लक राहतो.।।३५।।

## सूत्र क्रमांक ३६

**संबंध :-** परंतु अशा प्रकारच्या कर्मरूप जीवाला ज्यावेळेला श्रीमहेश्वरांचा अनर्गल अर्थात् कोणतीही आडकाठी नसणाऱ्या अनुग्रहाची किंवा कृपेची अर्थात् शक्तिपाताची प्राप्ती होते त्यावेळेला त्याला सहजच ज्ञानक्रियेचा लाभ होतो आणि त्याच्यात स्वातंत्र्ययोगाचा उदय होतो. त्यावेळेला त्याचे द्वैत नाहीसे होऊन विश्वाच्या उभारणीचे व संहारणीचे सामर्थ्य त्याला प्राप्त होते.

**भेदतिरस्कारे सर्गान्तरकर्मत्वम्।।३६।।**

**शब्दार्थ :- भेद** - फरक किंवा संसारदशेच्या भेदाचा. **तिरस्कार** - लपणे, दूर होणे, लोपणे किंवा नाहीसे होणे. **सर्ग** - स्वतंत्र जगाची निर्मिती व संहार करण्याची क्षमता. **कर्मत्वम्** - करण्याचे सामर्थ्य.

**अर्थ :-** सिद्धयोग्याच्या भेदांचा अर्थात् विज्ञानाकल, प्रलयाकल व सकल जीवांच्या अनुभूतिक्षेत्रातील फरकांचा किंवा संसार दशारूप भेदाचा म्हणजे कुंडलिनी शक्तीने धारण केलेल्या पिंडब्रह्मांडादि उभारणीचा लोप होतो व त्याच्या ठिकाणी स्वतःच्या इच्छेप्रमाणे सृष्टिनिर्मितीचे किंवा संहार

करण्याचे म्हणजे उभारणी व संहारणी करण्याचे स्वातंत्र्य व सामर्थ्य येते.।।३६।।

**विशेष व्याख्या :-** अशा सिद्धयोगिवराच्या देह, प्राण आणि पुर्यष्टकामध्ये असलेला अभिमानरूप भेद हा चिद्धनात डुबकी मारण्यामुळे नष्ट होतो. तो मायेच्या कला, विद्या, राग, काल आणि नियती या पाच कंचुक अर्थात् आवरणांनी झाकल्या गेलेल्या सकल, प्रलयाकल आणि विज्ञानाकल प्रमात्यांना स्वरूपाच्या उन्मेषाने हटवून मंत्र अर्थात् शुद्धविद्या, मंत्रेश्वर अर्थात् श्रीईश्वर आणि मंत्रमहेश्वर अर्थात् श्रीसदाशिवरूप असलेल्या आपल्या माहात्म्याला अथवा सामर्थ्याला क्रमाने प्राप्त करून घेतो. अशा प्रकारे तो आपल्या इच्छेने प्रमाता अर्थात् संकुचित जीवभाव आणि प्रमेय यांच्यापेक्षा वरती जातो. त्यामुळे त्याला कोणत्यातरी अन्य वस्तूची म्हणजेच श्रीशिवरूपत्वाची क्षमता किंवा सामर्थ्य प्राप्त होते.

**श्रीशिवांचा शक्तिपात कोणावरही कोणत्याही वेळेला होतो. असा शक्तिपात होण्यासाठी अधिकारी किंवा अनधिकारी असा कोणताही विचार नसतो. हा शक्तिपात होण्यासाठी व्यक्ती, वेळ आणि स्थान आदींविषयी काहीही वैशिष्ट्यपूर्णता नसते; कारण श्रीशिव कर्मनिरपेक्ष असतात. त्यांच्यामध्ये कर्माचा कोणताही विचार नसतो. त्यामुळे शक्तिपात निरर्गल अर्थात् कोणताही अडथळा नसलेला असा आहे. ज्या कोणत्याही जीवावर श्रीशिव शक्तिपात करीत असतात त्याला संसारावस्थेचा स्वयमेव तिरस्कार वाटतो. त्याच्यात विश्वाची निर्मिती आणि लय अर्थात् नाश करण्याचे सामर्थ्य येते.**

**कुंडलिनी शक्ती हीच संसार आहे आणि ती कर्मसापेक्ष अर्थात् कर्माला अनुसरून आहे. जीव हा कर्म करण्याने मिळणाऱ्या फळांचा उपभोग घेणारा आहे. त्यामुळे संसार किंवा प्रपंचात कर्म केले असता त्यांची फळे मिळणे क्रमप्राप्तच असते; परंतु शक्तिपात झालेल्या साधकभक्तयोगिशिष्याला कर्मे करण्याची आवश्यकता असत नाही. जरी देहातला व्यवहार साधण्यासाठी त्याला कर्मे करावी लागत असली तरीही तो त्या कर्मांनी लिप्त होत नाही. तो साधारण जीवभाव आणि ज्ञेयभावाच्या पलीकडे जाऊन श्रीशिवरूपत्व प्राप्त करून घेतो.**

यासंबंधी **"श्रीस्वच्छंदतंत्र"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**त्रिगुणेन तु जप्तेन स्वच्छन्दसदृशो भवेत्।।६.५४।।**

**अर्थ :-** त्रैगुण्य या पदाने येथे अनेक गुणता हे चिह्न सांगितले आहे.

त्यामुळे महामंत्रस्वरूप परिपूर्ण अहंताभावाने आपल्या स्वभावपरामर्शात अर्थात् स्वभावविचारात राहण्याने साधकभक्तयोगिशिष्य स्वच्छंदनाथ श्रीशिवांप्रमाणेच होतो.

त्यामुळे कर्मात्मा जीवही कधीतरी अनर्गल अर्थात् अविरोध शक्तिपाताने स्वच्छंदसादृश्य प्राप्त करवून घेतो.।।३६।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

"ज्यावेळेला अशा प्रकारच्या कर्मात्म्यावरही स्वातंत्र्ययुक्त श्रीमहेश्वरांचा शक्तिपात होऊन त्यापासून निर्माण होणारा सहजस्वातंत्र्ययोग उत्पन्न होतो त्यावेळेला त्याचा भेदभाव नष्ट होऊन त्याच्या ठिकाणी वेगळी सृष्टी करण्याचे सामर्थ्य येते," हे "**भेदतिरस्कारे सर्गान्तरकर्मत्वम्।।३६।।**" या सूत्राद्वारा श्रीशंकरांनी कथन केले आहे.

शरीरप्राणादींच्या ठिकाणी अहंताभिमानी व सर्वप्रलय सकलादींच्या-विषयी प्रमातृता असणाऱ्या भेदाचा तिरस्कार झाला की म्हणजेच चिद्घन-स्वभावोद्रेक झाला की, त्या साधकभक्तयोगिशिष्याला क्रमशः मंत्र, मंत्रेश्वर व मंत्रमहेश्वराचा अधिकार प्राप्त होतो. त्याचप्रमाणे यथेच्छ वस्तू निर्माण करण्याचे सामर्थ्य येते.

यासंबंधी "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथात असे म्हटले आहे की-

**त्रिगुणेन तु जप्तेन स्वच्छन्दसदृशो भवेत्।।६.५४।।**

**अर्थ :-** त्रिगुण जपाने अर्थात् तीन प्रकारच्या जपाने साधकभक्तयोगि-शिष्याला स्वच्छंदत्व प्राप्त होते.

**विवरण :-** त्रिगुण म्हणजे अनेक गुणत्वांचे उपलक्षण आहे. महामंत्रा-त्मक परिपूर्ण अहंभावासह स्वस्वभावविचारात थांबण्यामुळे स्वच्छंदाशी सारखे-पणा प्राप्त होतो.

असे स्वच्छंदसमानत्व तसेच भेदतिरस्कार अर्थात् भेद नष्ट होणे सांगून त्याचा अधिकार सांगितला आहे.

**ब्रह्मविष्णिवन्द्रदेवानां सिद्धदैत्योरगेशिनाम्।**
**भयदाता च हर्ता च शापानुग्रहकृद्भवेत्।**
**दर्पं हरति कालस्य पातयेद्भूधरानपि।। स्वच्छंदतंत्र।।**

**अर्थ :-** श्रीब्रह्मा, श्रीविष्णू, इंद्रादि देवता, सिद्ध, दैत्य, शेषादि सर्पकुल यांना भय देणारा व भय दूर करणारा आणि शाप व अनुग्रह देणारा असा तो सिद्धयोगी होईल अर्थात् होतो. तो स्वतःच्या सामर्थ्याने काळाचाही दर्प

हरण करतो आणि मोठमोठ्या पर्वतांनाही खाली पाडतो.।।३६।।

**विवरणात्मक टीपा :-**

**अ)** वरती निर्देशिलेले प्रमाते आणि त्यांच्या अनुभवाचे क्षेत्र हे खाली दिले आहे.

| प्रमाता | तत्त्व | अनुभवाचे क्षेत्र |
|---|---|---|
| १) विज्ञानाकल | महामायातत्त्व | चैतन्यमात्र आणि सर्व प्रलयाकल व सकलादींचा अनुभव. |
| २) प्रलयाकल अथवा प्रलयकेवली किंवा शून्यप्रमाता | मायातत्त्व | केवळ शून्य अथवा पोकळी. |
| ३) सकल (देवांपासून वनस्पती, कीटकांपर्यंत) | उरलेली सर्वतत्त्वे | तीन मलांनी पूर्ण भरलेले, कार्यकारण संबंधांनी बांधलेले आणि प्रत्येक गोष्टीचा भिन्नत्वाने अनुभव घेणारे. |

याचाच अर्थ असा आहे की, जीवांचे वर्गीकरण, विज्ञानाकल, प्रलयाकल व सकल या तीन प्रकारांनी पुढीलप्रमाणे केले आहे.

**१) विज्ञानाकल :-** सामान्य जीव हे आणव, कार्म व मायीय मलांनी व्याप्त असतात. विज्ञानाकल जीव हे कार्म व मायीय मलांपासून मुक्त असतात; पण आणव मलांनी लिप्त असतात. हे शुद्धविद्येच्या खाली; पण मायातत्त्वाच्या वरच्या अवस्थेत असतात. यांना नुसते ज्ञान असते; पण क्रियाशक्ती नसते.

**२) प्रलयाकल किंवा प्रलयकेवली :-** हे जीव मायातत्त्वावर आधारित, ज्ञानशून्य व क्रियाशक्तिशून्य असतात.

**३) सकल :-** हे जीव आब्रह्मस्तंबापर्यंत आणव, कार्म व मायीय मलांनी व्याप्त असतात.

**आ)** १) मंत्र म्हणजे ज्याने शुद्धविद्यातत्त्व जाणले आहे असा प्रमाता होय अर्थात् शुद्ध विद्यातत्त्वाचा साक्षात्कारी असा सिद्धयोगी होय.

२) मंत्रेश्वर म्हणजे ज्याने श्रीईश्वरतत्त्व जाणले आहे असा प्रमाता होय अर्थात् श्रीईश्वरतत्त्वाचा साक्षात्कारी.

३) मंत्रमहेश्वर म्हणजे ज्याने श्रीसदाशिवतत्त्व प्राप्त केले आहे असा

प्रमाता होय अर्थात् सत्‌शिवतत्त्वाचा साक्षात्कारी असा सिद्धयोगी होय.

**इ**) त्रिगुण जप ही एक शास्त्रीय परिभाषा आहे. त्याचा अर्थ तीन वेळा जप असा नसून तीन प्रकारचा जप असा आहे. ते प्रकार खालीलप्रमाणे आहेत.

**१) शांभवजप :-** या प्रकारामध्ये साधकभक्तयोगिशिष्याला प्रकाश आणि विमर्श यांना जोडणाऱ्या बिंदूवर लक्ष्य एकाग्र करावे लागते. यात प्रकाश, विमर्श आणि त्यांना जोडणारा बिंदू अशी तीन तत्त्वे समाविष्ट आहेत.

**२) शाक्तजप :-** या प्रकारामध्ये साधकभक्तयोगिशिष्याला प्रमाण आणि प्रमेय यांना जोडणाऱ्या बिंदूवर लक्ष केंद्रित करावे लागते. यात १) प्रमाण २) प्रमेय आणि ३) ज्या बिंदूपासून प्रमाण व प्रमेय निघतात तो जोडणारा बिंदू अशी तीन तत्त्वे सामावलेली आहेत.

**३) आणवजप :-** या प्रकारामध्ये प्राण आणि अपान यांच्या जोडणीच्या बिंदूवर लक्ष केंद्रित करावे लागते. येथे तीन तत्त्वे आहेत. ती म्हणजे १) प्राण २) अपान आणि ३) त्यांना जोडणारा स्पर्श बिंदू होत. हा आणवोपाय आहे. (हा त्रिगुणजप श्रीसद्गुरुगम्य आहे.)।।३६।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

मोह असताना आत्म्याला अहंता-इदंतेचा संबंध असतो.।।१५२।।

कर्तृभूमीचा आश्रय घेऊन तो जीवात्मा एकदा जागृत झाला की, तो श्रीशिवरूपात सर्वदा राहतो म्हणजेच भेद नाहीसा होतो.।।१५३।।

भेदाच्या अभावी तो काय करू शकतो हे श्रीशंकरांनी **"भेदतिरस्कारे सर्गान्तरकर्मत्वम्।।३६।।"** या सूत्रात सांगितले आहे.।।१५३.५।।

आत्माच हे सर्व काही आहे, अशी जाणीव झाल्यानंतर भेदाचा प्रकारच राहत नाही.।।१५४।।

**विवरण :-** श्रीशिवांनी म्हणजेच श्रीसद्गुरूंनी केलेल्या शक्तिपाताने ज्याचे हृदय भरलेले आहे तो भेददृष्टी झुगारून देतो; कारण कर्मबंधाला दूर करणाऱ्या श्रीशिवयोगाच्या आश्रयाने तो ज्ञानी म्हणजेच जागृत होतो. त्याच्या श्रीपरमशिवस्वरूप स्वभावामुळे त्याला इतर काही दिसत नाही. त्यानंतर देहादि अहंतेने युक्त सकलप्रलयाकलादि प्रमात्यांचे स्थान असणारी भेदप्रथा नष्ट होते. अशा प्रकारे हा सिद्धयोगी स्वरूपज्ञानामुळे निश्चल व शाक्तबल-संपन्न होतो व मंत्रमंत्रेश्वरांना योग्य अशा ऐश्वर्याची त्याला प्राप्ती होते. त्यामुळे तो स्वतःच्या इच्छेनुसार नवीन नवीन उल्लेखसंनिवेशादि चित्रविचित्र

अशी अपूर्व सृष्टी निर्माण करण्याला समर्थ होतो.

हे विश्व मातृकांकडून स्वसूत्रातून निरूपिलेले आहेच. विषयांची निवृत्ती व प्रवृत्ती या दोन्ही प्रसंगी विषयस्वरूप होणाऱ्या ज्ञानीसिद्धांची स्थितीही स्थिर होते.।।१५५,१५५.५।।

अशा प्रकारे भेद नष्ट झाला असता आत्म्याची एकाकारता होते.।।१५६।।

त्यामुळे तो सिद्धयोगी पूर्वी कोणीही निर्माण केलेली नाही अशी सृष्टी निर्माण करू शकतो. ती सृष्टी हे त्याचे कर्म आणि तो त्याचा कर्ता होतो. त्या चिदात्म्याची जशी आवड असते तशी सृष्टी तो निर्माण करतो. ।।१५७।।३६।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"भेदतिरस्कारे सर्गान्तरकर्मत्वम्।।३६।।"** या सूत्राद्वारा श्रीशंकरांनी असे कथन केले आहे की, "शरीर प्राणादींविषयी अहंत्व उत्पन्न करणारा भेद तिरस्कृत झाला अर्थात् चिद्घनरूपात बुडून नाहीसा झाला अथवा चिद्घन-स्वभावी झाला की, सिद्धयोगाच्या ठिकाणी स्वतःच्या इच्छेप्रमाणे दुसरी सृष्टी निर्माण करण्याचे सामर्थ्य निर्माण होते."।।३६।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

ज्यावेळेला अशा कर्मात्म्यावरही परमस्वतंत्र श्रीमहेशांचा शक्तिपात होऊन अनादिनिद्रिस्थ आत्मचैतन्यशक्ती कुंडलिनी जागृत होऊन त्यामुळे फुललेला ।।१५३।।

स्वातंत्र्ययोग अवतरित होतो त्यावेळेला त्याचे सर्व भेद लुप्त झाल्यामुळे तो सिद्धयोगी होऊन त्याला सृष्टिकर्तृत्वाधिकार येतो.।।१५३.५।।

हेच **"भेदतिरस्कारे सर्गान्तरकर्मत्वम्।।३६।।"** या सूत्राद्वारा सांगताना श्रीशिव असे म्हणतात की, देहप्राणादिकांच्या संकुचित अहंकारापासून उत्पन्न झालेल्या कलादिकांनी युक्त अशा भेदाचा लोप झाला म्हणजे तो भेद असूनही शक्तिपाताच्या उन्मेषाने त्याचे मिथ्यात्व साधकयोग्याला पटले म्हणजे ।।१५५।।

त्याच्या ठिकाणी मंत्र व मंत्रदेवता यांच्या तादात्म्याने स्वमाहात्म्याचे प्रकटीकरण होते. त्यामुळे अशा या परयोग्याला अन्य सृष्टी निर्माण करण्याचे सामर्थ्य येते.।।१५६।।

अन्य सृष्टी म्हणजेच त्याची इच्छा होईल त्या वस्तू निर्माण करण्याचे सामर्थ्य स्पष्ट होते.।।१५७।।३६।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

"अशा कर्मात्मक• साधकभक्तयोगिशिष्यात पूर्ण स्वतंत्र श्रीमहेशांच्या शक्तिपातामुळेच सहजस्वातंत्र्य नावाच्या ज्ञानयोगाचा प्रादुर्भाव होतो," असे "**भेदतिरस्कारे सर्गान्तरकर्मत्वम्।।३६।।**" या सूत्रात निर्देशिले आहे.

जरी देहप्राणादींशी मिथ्यातादात्म्याने प्रकल्पित केलेल्या आरोपामुळे जे अहंतारूप भेद साधकभक्तयोगिशिष्यात निर्माण होतात त्या भेदांची निवृत्ती चिदानंदस्वात्मस्वरूपाच्या उन्मेषामुळे होते आणि अशा प्रकारे तो प्रबुद्ध-योगी मंत्र, मंत्रेश्वर व मंत्रमहेश्वरत्व अर्थात् शुद्धविद्या, श्रीईश्वर व श्रीसदाशिव-रूपत्व क्रमशः प्राप्त करतो. याच स्वतःच्या सामर्थ्याच्या ज्ञानप्रकाशामुळे या परयोग्यात सर्गांतरकर्मत्व म्हणजेच त्याला पाहिजे त्या वस्तूची निर्मिती करण्याचे सामर्थ्य येते. **हाच कोणताही अडथळा नसणारा श्रीमहेशांचा शक्तिपातरूप सहजस्वातंत्र्ययोग आहे.**

**विवरण :-** भेदाचा तिरस्कार अर्थात् नाश झाल्यानंतर पूर्वीच्या सूत्रात सांगितलेल्या कर्त्याभिमानात काय फरक पडतो? हे या सूत्रात सांगितले आहे. भेद हा आभ्यंतर आणि बाह्य या दोन प्रकारचा आहे. जीव आणि श्रीईश्वर यांच्यामधला भेद हा आभ्यंतर आणि दृश्यामध्ये नानात्व पाहणे हा बाह्य भेद आहे. जोपर्यंत मनुष्याला श्रीईश्वरी सत्तेचा अनुभव येत नाही तोपर्यंत हा भेद शिल्लक राहतो आणि श्रीईश्वरवाद्यांचा जो श्रीईश्वर तो परंपरागत संस्कारांच्या आधारावर केवळ कल्पना म्हणून आणि श्रद्धा व विश्वासाचा एक विषय म्हणूनच राहतो. ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्याला श्रीईश्वराच्या सत्तेचा अनुभव येतो त्यावेळेला भेदाच्या पृष्ठभूमीवर सर्वव्यापी परमात्म्याच्या सत्तेच्या आधारावर त्याला भेदात अभेदाचा अनुभव येतो आणि जो जो जीवाचा अणुभाव कमी कमी होत जातो तो तो त्याची भेददृष्टीही कमी कमी होत जाते.

जीवभाव संपूर्णपणे कमी अथवा क्षीण झाल्यानंतर भेदबुद्धी नष्ट होते आणि अभेदबुद्धीचा उदय होतो. त्यामुळेच बुद्धीचे भेदबुद्धी, भेदाभेदबुद्धी आणि अभेदबुद्धी असे तीन स्तर मानले जातात. जोपर्यंत भेदबुद्धी प्राधान्याने आणि अभेदबुद्धी गौणत्वाने असते तोपर्यंत मोहातून उत्पन्न होणारा कर्तृत्वा-भिमान विद्यमान असतो; परंतु ज्यावेळेला अभेदबुद्धीची प्रधानता उदयाला येते आणि भेदबुद्धी गौणरूपात येते त्यावेळेला जीवाचा कर्तृत्वाभिमानही क्षीण होत जातो आणि श्रीईश्वरशरणागतीचे वास्तविक स्वरूप अनुभवास

येते. यालाच "**श्रीपातंजलयोगदर्शन**" या ग्रंथात श्रीईश्वरप्रणिधान असे म्हटले आहे.

या सूत्रात तिरस्कार हा शब्द असे सुचवितो की, श्रीईश्वरभाव प्रकट होत असताना साधकभक्तयोगिशिष्याची भेदबुद्धी गौणरूपाने तिरस्कृत अर्थात् अदृश्य म्हणजेच नष्ट तर होऊ लागते; परंतु तिचा पूर्ण अभाव अजून झालेला नसतो. अशा साधकभक्तयोगिशिष्याच्या अर्थात् सिद्धयोग्याच्या कर्मांमध्ये असाधारण दिव्यत्व येते. "सर्गांतर" याचा अर्थ नैसर्गिक असा समजला पाहिजे. देहाच्या मदतीशिवाय आपल्या दिव्य इंद्रियांच्याद्वारा त्याला त्याच्या इच्छेनुसार कर्म करण्याची शक्ती येते.।।३६।।

## सूत्र क्रमांक ३७

**संबंध :-** प्रमेय व प्रमाण या संबंधांच्या पलीकडे जाणे हे या सिद्धयोग्याला अशक्य असत नाही; कारण त्याला विश्वाच्या उभारणीची व संहारणीची शक्ती आपल्या ठिकाणी आहे हे स्वतःच्या अनुभवामुळे लक्षात येते.

**करणशक्तिः स्वतोऽनुभवात्।।३७।।**

**शब्दार्थ :- करणशक्तिः** - विश्व निर्माण व लय करण्याची शक्ती. **स्वतः** - आपल्या स्वतःच्या. **अनुभवात्** - अनुभवाच्या अंतर्गत असते.

**अर्थ :-** सिद्धयोग्याला स्वतःची निर्माण करण्याची शक्ती अर्थात् सर्जनसामर्थ्य स्वानुभवावरून प्रतीत होते. हा अनुभव संकल्प, स्वप्न इत्यादींमध्ये असाधारण व अभूतपूर्व वस्तू निर्माण करण्याच्या सामर्थ्यात आलेला असतो अर्थात् विश्वाची स्थिती आणि लय किंवा उभारणी व संहारणी करण्याची शक्ती सिद्धयोग्याच्या आपल्या स्वतःच्या अनुभवाच्या अंतर्गत निहित असते.।।३७।।

**विशेष व्याख्या :-** ज्याप्रमाणे सर्वसाधारण लोकांना संकल्प आणि स्वप्न आदींमध्ये सृष्टी आणि लय करण्याची शक्ती आपल्याच अनुभवाने सिद्ध होत असते त्याचप्रमाणे सिद्धयोगाने संपन्न आत्म्याला विश्वातले वैविध्य प्राप्त करण्यासाठीची शक्ती आपल्याच ज्ञानशक्ती आणि क्रियाशक्तींच्या अनुभवाने सिद्ध होत असते. या श्रीशिवयोग्याला असाधारण अथवा असामान्य पदार्थ निर्माण करण्याची शक्ती आपल्याच संपादनसामर्थ्याने मिळते. ही शक्ती साधारण मानवाप्रमाणे इंद्रियसामर्थ्यांमुळे मिळत नाही.

तसे पाहावयाला गेले तर श्रीब्रह्मदेवांपासून लहानातल्या लहान किड्या-पर्यंत कोणत्याही प्राण्याची उल्लेखरूप अर्थात् निर्देशरूप क्रियाशक्ती आणि

अवभासनरूप ज्ञानशक्ती या स्वाभाविकच असतात.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**यैव चित् गगनाभोगे भूषणे भाति भास्करे।**
**धराविवरकोशस्थे सैव चित् कीटकोदरे।।**

**अर्थ :-** जी चितिशक्ती आकाशाचा दागिना असणाऱ्या भगवान् श्रीसूर्यात भासते तीच चितिशक्ती पृथ्वीच्या बिळात असणाऱ्या एखाद्या किड्यातही अस्तित्वात असते.

असे शक्य झाल्यानंतर कोणत्याही विषयावर पूर्ण एकाग्रतेने विमर्श अथवा विचार केला तर सर्वसाधारण इच्छित पदार्थ उत्पन्नही होऊ शकतो. या विषयी श्रीविश्वामित्र आदि ऋषींच्या नूतन सृष्टीविषयीच्या गोष्टी प्रसिद्धच आहेत. त्रिशंकूसाठी स्वर्गलोक आणि पृथ्वीलोक यांच्या मध्ये श्रीविश्वामित्रांनी नवीन सृष्टी आपल्या योगबलाने रचली होती, ही गोष्ट पुराणप्रसिद्ध आहे.

"**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथात अशाच प्रकारच्या स्पष्ट अर्थाची कारिका आहे.

**अत एव यथाभीष्टसमुल्लेखावभासनात्।**
**ज्ञानक्रिये स्फुटे एव सिद्धे सर्वस्य जीवतः।।**

**अर्थ :-** त्यामुळेच योगसिद्ध अशा या असाधारण आत्म्याला विश्वामध्ये विचित्रता अर्थात् सृष्टी आणि संहार संपादन करण्याची शक्ती स्वानुभवसिद्धच असते. हे संपादन सामर्थ्य म्हणजेच श्रीशिवयोग्याची तुर्यरूप स्वातंत्र्यशक्तीच आहे आणि तिचे अस्तित्व त्याला त्याच्या स्वतःच्याच अनुभवांतर्गत जाणवते.।।३७।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

हे सर्व काही सिद्धयोग्याला अशक्य नाही; कारण "**करणशक्तिः स्वतोऽनुभवात्।।३७।।**" या सूत्रन्यायाने "तो स्वतःच्या अनुभवाने आपली करणशक्ती जाणून घेतो.

स्वतःच्याच अनुभवाने स्वप्रसंकल्पादींमध्ये करणशक्ती म्हणजे विविध प्रकारचे विश्व निर्माण करण्याचे सामर्थ्य म्हणजेच ते ते असाधारण पदार्थ निर्माण करण्याचे आत्म्याचे सामर्थ्य सिद्धच आहे.

याच आशयाने "**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथात असे म्हटले आहे की-

**अत एव यथाभीष्टसमुल्लेखावभासनात्।**

**ज्ञानक्रिये स्फुटे एव सिद्धे सर्वस्य जीवतः।।**

**अर्थ** :- यामुळेच एखाद्याच्या इच्छेप्रमाणे समुल्लेख अर्थात् ज्ञानशक्ती आणि अवभासन अर्थात् इच्छाशक्ती यांच्यापासून सर्व जीवांच्या ज्ञान व क्रियाशक्ती या स्पष्टपणे सिद्ध होतात.

**विवरण :-** ज्याप्रमाणे ज्ञान व क्रियाशक्ती या इच्छित वस्तूंच्या बाहेर नसण्यामुळे अनुभवाला न येणाऱ्या वस्तूंच्या योग्य उल्लेखन आणि प्रकाशन यांच्यामुळे ब्रह्मापासून किड्यापर्यंत प्राण्यांची उल्लेखनयुक्त क्रियाशक्ती आणि अवभासयुक्त ज्ञानशक्ती स्वाभाविक असते असे सिद्ध होते. त्यामुळे कल्पितप्रमात्याच्या भूमिकेतही श्रीईश्वराव्यतिरिक्त उपक्लृप्त अर्थात् निर्मित प्राच्यसृष्टीला अनुपजीव्य अर्थात् निर्माण न करून हवी तशी उल्लेखनादि व्यापारांच्या संभवाने अभावाच्या ज्ञान व क्रिया ही लक्षणे असणाऱ्या ऐश्वर्याचीच स्पष्टपणे प्रत्यभिज्ञा अर्थात् स्मरण होणे आवश्यक ठरते.

असे असताना जर तो सिद्धयोगी याचा अधिक अभिनिवेशाने विचार करील त्यावेळेला सर्वसाधारण अभीष्ट पदार्थ निर्माण करण्याची शक्तीही येते. श्रीविश्वामित्रांनी निर्माण केलेल्या नवीन सृष्टीच्या कथेप्रमाणे अतिशय विमर्शाच्या सामर्थ्यामुळे सिद्धयोग्याने निर्माण केलेली ही सृष्टी इतर माणसे पाहू शकतात.

यासंबंधी "**श्रीतत्त्वगर्भ**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यदा तु तेऽपि सुव्यक्तस्वसामर्थ्यगुणोज्ज्वलाः।**
**भवेद्दृढतरादूरदारिता दार्ढ्यदीनता।**
**तदा न तेषां सङ्कल्पः कल्पपादपतां व्रजेत्।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला तो सिद्धयोगी स्वतःच्या अत्यंत योग्य रीतीने व्यक्त झालेल्या सामर्थ्यगुणांनी उज्ज्वल होतो म्हणजेच स्वतःच्या ज्ञान व क्रिया या शक्तींनी युक्त होतो व समर्थपणे सृष्टी करतो त्यावेळेला त्याने उत्पन्न केलेली सृष्टी दृढ, अस्थिर, टिकाऊ व क्षणभंगूर अशी वाटेल तशी असू शकते; कारण त्याचा संकल्प कल्पतरूप्रमाणे असतो म्हणून तो चिंतिलेले फल ताबडतोब देतो.।।३७।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

या दुसऱ्या सृष्टीला कोणते कारण असते? या प्रश्नाला उत्तर देताना भगवान् श्रीशिव "**करणशक्तिः स्वतोऽनुभवात्।।३७।।**" या सूत्रात असे सांगतात की -।।१५७.५।।

अपर अर्थात् अन्य सृष्टी उत्पन्न करण्यात जे इंद्रियांचे सामर्थ्य आहे।।१५८।। ते स्वानुभवसिद्ध आहे. हे इंद्रियांचे नैसर्गिक बल आहे. हे करणसामर्थ्य आत्म्याच्या प्रवेशाच्या बलाने येते।।१५९।।

त्यामुळे सत्यभूमिकेवर आरूढ असणारा सिद्धयोगी ज्याप्रमाणे कार्याची इच्छा करतो त्याप्रमाणेच तो सत्यसंकल्प श्रीपरमेश्वरच असतो।।१६०।।

हे सर्व जरी या आधी सांगितलेले आहे तरीसुद्धा हे जास्त स्पष्ट होण्यासाठी दुसऱ्या प्रकाराने सांगितले आहे; कारण सिद्धी या विचित्र तऱ्हेच्या असतात।।१६१।।

**विवरण :-** ज्याप्रमाणे कीटादिकांना वारुळ-घरटी इत्यादि साधारण गोष्टी इच्छेनुरूप करता येतात त्याप्रमाणे विश्ववैचित्र्यनिर्माणाच्या एखाद्या शक्तीने स्वप्नातल्या स्वैर विकल्पादींमध्ये उद्यान, अरण्य, डोंगर, नदी, सरोवर व नगरादि विशिष्ट वस्तूंचे निर्माण होणे हे स्वानुभवाने ज्ञात होणारेच आहे. अशा प्रकारे दृढ अभिनिवेशामुळे व अकृत्रिम सामर्थ्याने त्या भूमिकेवर गेलेल्या सिद्धयोग्याला स्वतःच्या संकल्पानुरूप असलेले कार्य इंद्रियशक्तीं-मुळे करता येते. हे विश्ववैचित्र्य उत्पन्न करण्याच्या सामर्थ्याचे उपाय आधी सांगितलेले असूनही सिद्धींच्या बऱ्याच प्रकारांचे ज्ञान होण्यासाठी ते येथे परत सांगितले आहेत।।३७।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**करणशक्तिः स्वतोऽनुभवात्।।३७।।**" या सूत्राद्वारा श्रीशिव असे सांगतात की, या सिद्धयोग्याचे निर्मेयत्व अर्थात् निर्माण न करण्याचे आणि निर्मातृत्व अर्थात् निर्माण करण्याचे सामर्थ्य शक्य होत नाही असे नाही; कारण स्वतःच्या अनुभवांमुळे हे शक्य आहे. संकल्प म्हणजेच मनोरथ आणि स्वप्न यांमध्ये आपले त्या त्या असाधारण गोष्टी निर्माण करण्याचे सामर्थ्य सिद्धच आहे।।३७।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

सिद्धयोग्याला वाटेल ते निर्माण करणे असंभवनीय अथवा अशक्य आहे असे समजू नये; कारण।।१५७।।

"**करणशक्तिः स्वतोऽनुभवात्।।३७।।**" या सूत्रानुसार "त्याला स्वानुभवामुळे निर्माणसिद्धी प्राप्त होते."।।१५७.५।।

स्वतःच्या अनुभवामुळे स्वप्नसंकल्प इत्यादि बाबतीत करण अर्थात् स्वतःला ज्ञेय म्हणजे माहीत असणाऱ्या ग्रहणयोग्य व ग्राहक अर्थात् पदार्थ

यांची निर्मिती करणे होय.।।१५८।।

शक्ती म्हणजे कर्तेपणाची तीव्र इच्छा होय. या गोष्टी त्या सिद्धयोग्याला स्वसंवित्तीने म्हणजे स्वतःच्या ज्ञानशक्तीनेच साध्य होतात. जर तो दृढपणे शक्य अशा वस्तूंच्या निर्मितीबद्दल भावना करील।।१५९।।

तर तो सिद्धयोगी सर्वसामान्य अशा बहुतेक पदार्थांची निर्मिती करू शकेल.।।१५९.५।।३७।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

आता या सूत्रातून सिद्धयोग्यासाठी निर्मेय अर्थात् निर्माण न करणे व निर्मातृत्वही अर्थात् निर्माण करणे अशक्य नाही असे "**करणशक्तिः स्वतोऽनुभवात्।।३७।।**" या सूत्रात सांगितले आहे. स्वतः म्हणजे स्वतःपासून अर्थात् सहज अनुभवप्रकाश सामर्थ्यापासून स्वप्रसंकल्पना आदींमध्ये विश्व-वैचित्र्य निर्माण करण्याच्या सामर्थ्याने युक्त अशी करणशक्ती म्हणजे त्यांची कर्तृता अर्थात् उन्मेष स्वसंवित्मध्येच सिद्ध होतो.

यासंबंधी "**श्रीईश्वरप्रत्यभिज्ञा**" या ग्रंथात श्रीमदुत्पलाचार्य असे म्हणतात की -

**अत एव यथाभीष्टसमुल्लेखावभासनात्।**
**ज्ञानक्रिये स्फुटे एव सिद्धे सर्वस्व जीवतः।।१.६.११।।**

**अर्थ :-** अंतःस्थित आभासच बाहेर निघून सर्वत्र पसरत असतो. यामुळे सर्व जीवांमध्ये ज्ञान आणि क्रिया स्पष्टपणे सिद्ध होतात.

ज्याप्रमाणे अभिमत असणाऱ्याच्या बहिरसत्वामुळे अनुभव न घेतलेल्या पदार्थाचेही सम्यक् उल्लेखन आणि अवभासन विकल्पांच्या प्रसंगामुळेच निर्दिष्ट झालेले असते त्याप्रमाणेच ब्रह्मापासून कीटकापर्यंत जीवनक्रियेत समाविष्ट असणाऱ्या प्राण्यांची अवभासनरूप ज्ञानशक्ती आणि उल्लेखनरूप क्रियाशक्ती स्वाभाविक अथवा नैसर्गिक असते. त्यामुळेच त्या प्रकल्पितप्रमातृभूमिकेतही श्रीईश्वराने रचलेल्या भिन्न प्राच्यसृष्टीमध्ये उपजीवनसंभावनाही नसते. या प्रकाराने सिद्धयोगी स्वतःच ज्ञानक्रियारूप ऐश्वर्याचा स्पष्ट प्रत्यभिज्ञेय अर्थात् स्मरण करण्याला योग्यविषय जाणतो आणि करतो.

याबद्दल "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील निम्नोक्त स्पंदकारिकेत असे म्हटले आहे की -

**तदास्याकृत्रिमो धर्मो ज्ञत्वकर्तृत्वलक्षणः**
**यतस्तदेप्सितं सर्वं जानति च करोति च।।१.१०।।**

**अर्थ :-** संसारी मनुष्याच्या किंवा जीवाच्या क्षुब्धवृत्ती विलीन झाल्यावर त्या जीवाच्या किंवा पुरुषाच्या अंगी नैसर्गिक, अंगभूत असलेल्या स्वभावसिद्ध व ज्ञत्व अर्थात् सर्वज्ञताकर्तृत्व म्हणजे काहीही करण्याचे सामर्थ्य ही ज्याची लक्षणे आहेत असा धर्म निरावृत अर्थात् आवरणरहित रूपामध्ये प्रकट होत असतो. हा धर्म प्रकट होताच तो पुरुष सर्व इच्छित गोष्टी जाणूनही घेतो आणि करीतही असतो.।।१.१०।।

पूर्वोक्त प्रकाराने हे शक्य होते. ज्यावेळेला सिद्धयोगी प्रगाढ किंवा प्रकर्षाने अनिभिवेश धरून परामर्शन करतो त्यावेळेला त्याला पाहिजे त्या वस्तूचे निर्माण करण्याला तो सिद्धयोगी समर्थ होतो. वास्तविक पाहता परामर्शाच्या आधिक्याने सर्वजनही अशी निर्मिती करू शकतात. पुराणग्रंथातून श्रीविश्वामित्रऋषींनी अशा प्रकारची नवीन स्वर्गसृष्टी केली होती असा उल्लेख आहे.

या दृष्टीने "**श्रीतत्त्वगर्भ**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यदा तु तेऽपि सुव्यक्तस्वसामर्थ्यगुणोज्ज्वलाः।।**
**भवेद् दृढतरादूरदारिता दार्ढ्यदीनता।**
**तदा च तेषां सङ्कल्पः कल्पपादपतां व्रजेत्।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला सिद्धयोगीही चांगल्या प्रकारांनी व्यक्त झालेल्या स्वसामर्थ्याच्या गुणांनी उज्ज्वल होतात व त्यांची दार्ढ्यदीनता अर्थात् सामर्थ्य दृढतर होते त्यावेळेला त्यांच्या संकल्पाला कल्पवृक्षत्व प्राप्त होते.

या नीतीनुसार ज्यावेळेला ते स्वज्ञानक्रियांनी युक्त असे सिद्धयोगी सुस्पष्ट होतात त्यावेळेला त्यांना पसंत असलेल्या वस्तुनिर्मितीतली अस्थिरता तत्काळ खंडित होते. त्यांचा संकल्प कल्पवृक्षाप्रमाणे तत्काळच फलप्रदायक अर्थात् फल देणारा ठरतो.

**विवरण :-** देहाच्या आश्रयाने कार्य करण्यामुळे सामान्य मनुष्याला इंद्रियांच्या स्वतंत्र शक्तीचा अनुभव येत नाही; परंतु सिद्धयोग्याला इंद्रियांच्या देहापासून असणाऱ्या स्वतंत्र शक्तीचा स्वतः अनुभव येऊ लागतो.

इंद्रियांची शक्ती त्रिपदी म्हणविली जाऊ शकते. १) शरीराच्या गोलकांच्या आधारावर असणारी सामान्य शक्ती, २) शरीराचा आश्रय घेऊन राहणारी स्वतंत्र दिव्य शक्ती आणि ३) शरीराचा आश्रय त्यागून असणारी प्रतिभादि दिव्य शक्ती. "**श्रीपातंजलयोगदर्शन**" या ग्रंथाच्या विभूतिपादाच्या "**प्रातिभाद्वा सर्वम्।।३.३३।।**" या सूत्रावर श्रीव्यासऋषी आपल्या भाष्यात असे म्हणतात

की, "प्रातिभज्ञान हे सूर्योदयाच्या आधी येणाऱ्या उषेच्या प्रभेप्रमाणे विवेकज ज्ञानाचे पूर्व रूप आहे आणि त्याच्यामुळेच सिद्धयोगी सर्व काही जाणून घेतो. याच्या आधीच्या सूत्रात सांगितलेले स्वतंत्रज्ञान म्हणजे प्रातिभज्ञानच होय. "**श्रीपातंजलयोगदर्शन**" या ग्रंथानुसार "**ततः प्रातिभश्रावणवेदना-दर्शास्वादवार्ता जायन्ते।।३.३६।।**" या विभूतिपादातील सूत्रानुसार प्रातिभ ज्ञानांतर्गत श्रवण म्हणजे दिव्य श्रवणशक्ती, वेदन अर्थात् दिव्य स्पर्शशक्ती, आदर्श अर्थात् दिव्य दर्शनशक्ती होय. आस्वादन अर्थात् दिव्य रसशक्ती आणि वार्ता अर्थात् दिव्य वाक्शक्ती इतक्या शक्ती आहेत. या शक्ती म्हणजे समाधीतील विघ्ने आहेत आणि व्युत्थानदशेत सिद्धी आहेत."

वर सांगितलेल्या प्रातिभसंज्ञक करण शक्तींना इंद्रियांची स्वतंत्रशक्ती अर्थात् दिव्यशक्ती असे म्हटले आहे. "**श्रीपातंजलयोगदर्शन**" या ग्रंथाच्या "**बहिरकल्पिता वृत्तिर्महावेदाहा ततः प्रकाशावरणक्षयः।।३.४३।।**" या विभूतिपादातील सूत्राच्या भाष्यात श्रीव्यासऋषींनी असे म्हटले आहे की, "जर मन शरीरामध्ये स्थिर राहून उक्त प्रातिभशक्तींपासून लांब असणाऱ्या विषयांचे ज्ञान प्राप्त करीत असेल तर याला मनाची कल्पितावृत्ती असे म्हणतात आणि जर शरीराची अपेक्षा सोडून दूर असणाऱ्या विषयांचे ज्ञान प्राप्त करीत असेल तर मनाच्या या बहिर्मुख वृत्तीला अकल्पिता वृत्ती असे म्हणतात.।।३७।।

### सूत्र क्रमांक ३८

**संबंध :-** कारण ही तुर्यरूप स्वातंत्र्यशक्ती या बोधरूप प्रमात्याच्या म्हणजेच ज्ञानरूप जीवाच्या अर्थात् श्रीशिवयोग्याच्या अथवा योगसिद्ध पुरुषाच्या स्वरूपस्थितीचे सार आहे. त्यामुळे जाग्रदादि अवस्थांमध्ये हे पद मायाशक्तीने आच्छादित असूनही याच तुर्याने स्वरूपाला उत्तेजित करण्याची आवश्यकता साधकाला अभीष्ट किंवा योग्य आहे. याविषयी पुढील दोन सूत्रात स्पष्टीकरण दिलेले आहे.

मागील सूत्रातील "करणशक्ती" हा शब्द "तुर्यारूप" स्वतंत्र शक्तीचा बोध करतो. मायाशक्तीने "**अपहस्तित**" म्हणजे दबल्या गेलेल्या तुर्याशक्तीचे सामर्थ्य वाढवण्यासाठी करावयाचा उपाय पुढील सूत्रात दिला आहे.

**त्रिपदाद्यनुप्राणनम्।।३८।।**

**शब्दार्थ :- त्रिपद** - उत्पत्ती, स्थिती व लयरूप अशा या तीन जागृत, स्वप्न व सुषुप्तीमधील अवस्थांपैकी. **आदि** - प्रथम अथवा मुख्य अथवा प्रधान

अशी जी चौथी तुर्य अवस्था आहे तिने. **अनुप्राणनम्** - स्वतःमध्ये जो आनंद आहे त्याच्या जाणिवेने स्वतःमध्ये अधिक आनंद वाढवून घेणे अथवा त्या आनंदाचे पुनरुज्जीवन करणे किंवा आत्मस्वरूपाची सावधानता ठेवणे.

**अर्थ :-** उत्पत्ती, स्थिती व लय या तीन अवस्थांहून तुर्य नावाच्या मुख्य अवस्थेने अंतर्मुख होऊन या सर्व अवस्था तुर्यरूप आहेत अशा भावनेने त्या आनंदाचे पुनरुज्जीवन करावे अर्थात् सृष्टी, स्थिती आणि संहाररूप अशा जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन अवस्था तुर्यानंदाने पुनरुज्जीवित कराव्यात म्हणजे प्रधान अशा चौथ्या तुर्यावस्थेने आत्मस्वरूपाची अखंड सावधानता ठेवावी.।।३८।।

**विशेष व्याख्या :-** सृष्टी, स्थिती आणि संहार या शब्दांनी साधकाच्या जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ती भावांनी युक्त अवस्थांचा निर्देश केला जातो. जाग्रत् अवस्थेतून झोपेत जाण्याच्या वेळेला अतीत जाग्रत् म्हणजे जागे राहण्याच्या अवस्थेच्या पलीकडे गलेली आणि अनागत निद्रा म्हणजे अजून झोप न आलेली अशी एक प्रकारची अवस्था येत असते. यालाच मध्यदशा असे म्हणतात. साधकभक्तयोगिशिष्य या मध्यदशेमध्ये आनंदाने परिपूर्ण भरलेल्या तुर्यरसाचा आस्वाद घेत असतो. अशाच प्रकारे तिसऱ्या अवस्थेच्या म्हणजेच स्वप्नावस्थेच्या उदयाच्या वेळेला म्हणजेच एका अवस्थेच्या प्रारंभी व दुसऱ्या अवस्थेच्या अंती अशा संधिकालातल्या मध्यदशेला ग्रहण करून तो चिद्घनाचा अनुभव घेत असतो. साधक अवस्थेपासून या चिद्घनतारूप तुर्यावस्थेला दृढपणाने वर्तमान जाग्रत् आदि अवस्थांमध्ये व्यापून टाकण्याचा अभ्यास केला पाहिजे.

याविषयी "**श्रीवासिष्ठ दर्शन**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**निद्रादौ जागरस्यान्ते यो भाव उपजायते।**
**तं भावं भावयन्साक्षादक्षयानन्दमश्नुते।।**

**अर्थ :-** निद्रेच्या अवस्थेत जाण्याच्या आधी आणि जाग्रत् अवस्थेच्या शेवटी अर्थात् मध्यदशेमध्ये ज्या निर्विकल्प म्हणजेच निर्विचारभावाचा अनुभव येतो त्याच भावात म्हणजेच तुर्यदशेमध्ये सावधान राहण्याने अक्षय सुख प्राप्त होते अर्थात् चिद्घनतेची व्याप्ती सर्व ठिकाणी होते.

याविषयी आद्य श्रीशंकराचार्यांनी रचलेल्या "**श्रीप्रबोधसुधाकर**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यद्भावानुभवः स्यान्निद्रादौ जागरस्यान्ते।**
**अन्तः स चेत्स्थिरः स्याल्लभते हि तदद्वयानन्दः।।१६०।।**

**अर्थ :-** निद्रेच्या आरंभी आणि जागेपणाच्या शेवटी ज्या शुद्ध आणि निर्विषय भावाचा अनुभव येतो तो जर अंतःकरणात स्थिर होईल तर त्यामुळे अद्वयानंदाचीच प्राप्ती होईल.।।१६०।।

या सूत्रात साधकभक्तयोगिशिष्याने याच शांभवी भूमिकेत स्थिरता प्राप्त करण्याकडे संकेत केला आहे. जोपर्यंत साधकभक्तयोगिशिष्याला तुर्यानंदाचा रस तेलाप्रमाणे अधिकाधिक पसरविण्यामध्ये "।। **त्रिषु चतुर्थं तैलवदासेच्यम्।।३.२०।।**" या न्यायाने सामर्थ्य प्राप्त होत नाही तोपर्यंत उद्योगरत राहणे क्रमप्राप्त आहे. हा आणवोपायाचा प्रकार आहे.

मध्यदशेच्या तुर्यानंदातून वर्तमानातील जाग्रदादि अवस्थांमध्ये आल्यावर विषयांच्या उपभोगाची वेळ येते. त्यावेळी साधकभक्तयोगिशिष्याला तुर्याचे अवभासन अथवा प्रकटीकरण विजेप्रमाणे होते. "**तुर्यरसं क्षणमात्रसम्भवम्।।**" या क्षणापुरत्या प्राप्त झालेल्या तुर्यरसाने त्या मायाशक्तीने आच्छादित असणाऱ्या वेळांना अनुप्राणित केले पाहिजे. याचा आशय असा आहे की, साधकभक्त-योगिशिष्याचा जो सावधपणा मध्यदशेच्या क्षणभराच्या तुर्यचमत्कारात असतो तोच सावधपणा त्याने विषयोपभोगांच्या अवसरांच्या वेळेला अभ्यासात स्थिर ठेवला पाहिजे. हा अभ्यास त्याने अंतर्मुख होऊन स्वरूपविमर्शाच्या स्थितीच्या तारतम्याने वाढविला पाहिजे. हा अभ्यास शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध आदि भिन्नभिन्न विषयांच्या उपभोगाच्या वेळेला केला जातो.

यांची काही उदाहरणे "**श्रीरुद्रयामलतंत्र**" या ग्रंथांतर्गत "**श्रीविज्ञानभैरव**" या भागातून सुगम ज्ञान होण्यासाठी येथे दिली आहेत.

**१) शब्दाचा अर्थात् श्रवण किंवा ऐकण्याचा अभ्यास :-**

**गीतादिविषयास्वादासमसौख्यैकतात्मनः।**
**योगिनस्तन्मयत्वेन मनोरूढेस्तदात्मता।। विज्ञानभैरव ७३।।**

**अर्थ :-** बासरी व वीणा आदि गायन विषय श्रवणेंद्रियाच्या द्वारा म्हणजेच कानांनी ऐकून वगैरे चमत्कारपूर्ण आस्वादन करण्याने अनुपम सुखाचा अनुभव येत असतो. जो साधकभक्तयोगिशिष्य या असाधारण सुखा-बरोबर स्वतःला तद्रूप किंवा तन्मय करतो त्याचे मन याच शब्दचमत्कार-सुखावर आरूढ झाल्याने तन्मय होऊन जाते.।।७३।।

या प्रक्रियेला शाक्तस्पर्शावेश असे म्हणतात. साधकभक्तयोगिशिष्याला या

समावेशाने ब्रह्मभावाची प्राप्ती होते. हा शब्दब्रह्मरूपतेचा अनुभव आहे. आदि या शब्दाने शब्द, स्पर्श, रूप, रसादींचे भाव अशाच तऱ्हेने ग्रहण केले पाहिजेत असे सांगितले आहे.

**२) स्पर्शविषयाचा साक्षात् अभ्यास :-**

**शक्तिसङ्गमसंक्षुब्धशक्त्यावेशावसानिकम्।**
**यत्सुखं ब्रह्मतत्त्वस्य तत्सुखं स्वाक्यमुच्यते।।६९।।**

**अर्थ :-** स्त्रीसंभोगाच्या वेळेला अर्थात् ज्यावेळेला इंद्रियांमध्ये पानांच्या सळसळाटाप्रमाणे स्खलन होते त्यावेळेला आनंदशक्तीचा समावेश होतो. त्या अवसानानंतर घंटेच्या अनुरणनध्वनीप्रमाणे अर्थात् घुमणाऱ्या ध्वनीनुसार जे ब्रह्मतत्त्वाचे सुख असते ते आपलेच अर्थात् आत्म्यासंबंधी असते. ते दुसऱ्यापासून अर्थात् स्त्रीपासून होत नसते. स्त्रीसंभोग हे तर केवळ त्या सुखाच्या अभिव्यक्तीचे अर्थात् व्यक्ततेचे एक कारण आहे; कारण त्यामुळे होणारा आनंद हा तर आपला म्हणजे स्वतःचाच असतो. त्यामुळे स्त्रीसंगाचा अंतर्बाह्यशून्य असा जो आनंद अनुभवावयाला येतो त्याच्या चमत्कारपूर्ण ध्यानाने योगी परब्रह्मानंदमय होतो. मूर्ख माणसाप्रमाणे तो योगी संभोगालाच विधी मानत नाही.।।६९।।

**३) स्पर्शविषयाचा स्मरणाने अभ्यास :-**

**लेहनामन्थनाकोटैः स्त्रीसुखस्य भरात्स्मृतेः।**
**शक्त्यभावेऽपि देवेशि भवेदानन्दसम्प्लवः।।७०।।**

**अर्थ :-** (भगवान् श्रीशिव या विषयी श्रीपार्वतींना असे म्हणतात की,) हे देवी! स्त्री समोर नसतानाही चुंबनादि उद्दीपन विभावांनी उत्तेजित होऊन उत्पन्न झालेल्या आनंदाच्या अतिशय स्मरणाने अथवा आठवणीने आपल्याच उल्लसित झालेल्या आनंदमयतेची भावना केली पाहिजे.।।७०।।

**४) रूपविषयाचा अभ्यास :-**

**आनन्दे महति प्राप्ते दृष्टे वा बान्धवे चिरात्।**
**आनन्दमुद्गतं ध्यात्वा तन्मयस्तल्लयी भवेत्।।७१।।**

**अर्थ :-** स्त्री आदि शक्ती समोर आल्यावर, एखाद्या दरिद्री मनुष्याला अकस्मात् खूप मोठा धनाचा साठा मिळाल्यावर आणि खूप दिवसांच्या प्रवासानंतर आलेल्या बंधू, पुत्र, मित्र इत्यादींना भेटल्यावर जो आनंदाचा उदय होतो त्या आनंदाच्या उदयस्थानाचे ग्रहण करून त्याचे अंतर्मुख होऊन ध्यान केल्याने साधकभक्तयोगिशिष्याला आनंदातच विश्रांती मिळेल.।।७१।।

**५) रसनाविषयाचा अभ्यास :-**

**जग्धिपानकृतोल्लासरसानन्दविजृम्भणात्।**
**भावयेद्भरितावस्था महानन्दस्ततो भवेत्।।७२।।**

**अर्थ :-** भूक लागली असताना खाण्याला योग्य व अभक्ष्य नसलेला भक्ष्य पदार्थ खाल्यावर आणि तहान लागल्यावर लिंबू पाणी अथवा दूध साखर आदि, दारू वगैरे नाही, इत्यादि पेय प्यायल्यावर प्रत्येक घासाने आणि थेंबाने जो संतोष, पोषण आणि भूक व तहान भागल्याचा आनंद मिळतो त्या आनंददशेचे विमर्शन करण्याने साधकभक्तयोगिशिष्याला स्वरूपसमावेशयुक्त अर्थात् सामरस्याचा आनंद मिळतो.।।७२।।

शब्द, स्पर्श आदि विषयांच्या उपभोगात वेद्यपदार्थांचा नाश होऊन क्षणभरच उत्पन्न होणाऱ्या तुर्यपदाचा उदय झाल्यावरही सामान्य मनुष्य असावधान असल्याकारणाने प्रत्यक्ष शब्द, स्पर्श आदि विषयांमध्येच सुख मानत असतो. परंतु सिद्धयोगिजन मात्र मायाशक्तीने आच्छादित झालेले असूनही त्या विषयभोगांच्या उपभोगांच्या वेळेला सावधान राहून वीजेप्रमाणे क्षणभर चमकणाऱ्या तुर्यरसाने स्वरूपविमर्शावर अभिषेक करतात. त्यामुळे त्यांना त्यानंतर ब्रह्मानंद भावाचा अनुभव सतत येत राहतो.

श्रीमदाद्यशंकराचार्य या विषयी "**श्रीशतश्लोकी**" या ग्रंथात असे म्हणतात की -

**आदौ ब्रह्माहमस्मीत्यनुभव उदिते खल्विदं ब्रह्म पश्चात्।।३।।**

**अर्थ :-** प्रथम मी ब्रह्म आहे हा अनुभव साधकभक्तयोगिशिष्याच्या ठिकाणी उदित होतो व त्यानंतर हे जगही ब्रह्म आहे हा बोध अथवा हे ज्ञान त्याला स्वतः होऊनच होते.।।३।।

त्यामुळे सिद्धयोगी प्रधान तुर्यामृत रसाने जाग्रत आदि तीनही अवस्थांचे सिंचन करतो आणि पूर्णाहंतेच्या स्वानुभवाने आनंदित होतो. ही अकिंचित् चिंतनमयी दशा विश्वअभेद चमत्कारयुक्त असते आणि येथे अणुमात्रही आणवमल असत नाही.

या विषयी श्रीभैरव श्रीदेवींना "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हणतात की -

**अन्तः स्वानुभवानन्दा विकल्पोन्मुक्तगोचरा।**
**यावस्था भरिताकारा भैरवी भैरवात्मनः।।१५।।**
**तद्वपुस्तत्त्वतो ज्ञेयं विमलं विश्वपूरणम्।।१५.५।।**

**अर्थ :-** जी विकल्प वासनेने रहित पूर्णाहंतेची स्वप्रकाशरूप आनंद म्हणजेच श्रीभैरवरूप श्रीशिवांची श्रीभैरवांसंबंधी परिपूर्ण स्वरूप अवस्था आहे त्या निर्मल विश्वपूरण स्वरूपात सावधान होऊन तिला हृदयंगम केले पाहिजे. त्या अवस्थेमध्ये संपूर्ण जग स्वभिंतीवर अर्थात् आत्मरूप आधारावर निरावरण म्हणजेच कोणत्याही आवरणांशिवाय भासत असते.।।१५,१५.५।।

अशा प्रकारे तीनही अवस्थांना चौथ्या तुर्यरूप मध्यदशेने अनुप्राणन करून साधकभक्तयोगिशिष्य निरंतर अभ्यासाने पूर्णाहंतेची सावधानता दृढ करतो. ही अवस्था साधकभक्तयोगिशिष्याला भगवान् श्रीशिवांच्या शक्तिपाताने प्राप्त होते. तत्त्वांच्या अंतर्गत असणाऱ्या विज्ञानाकल प्रमात्याच्या पलीकडे जाऊनच ही अवस्था प्राप्त होते. त्यावेळेला विश्वाहून अभिन्न असणाऱ्या ब्रह्मभावाच्या अनुभवामध्ये साधकभक्तयोगिशिष्याचे मन लीन होते. ज्या श्रीउत्पलदेवांनी जीवभावाच्या आधी स्थूलतर मायीयमल आणि स्थूल कार्ममल हटविले होते त्यांनी आंतरिक आणवमल पूर्णरूपाने नष्ट व्हावा म्हणून अर्थात् विज्ञानाकल प्रमात्यातून म्हणजे जेथे अनुसंधान केल्याने अनुसंधान आणि न केल्याने बहिर्मुखता प्राप्त होते तेथून बाहेर पडण्यासाठी भगवान् श्रीशिवांना "**श्रीशिवस्तोत्रावली**" या ग्रंथात खालील प्रमाणे प्रार्थना केली आहे.

**अन्तरप्यतितरामणीयसी या त्वदप्रथनकालिकास्ति मे।**
**तामपीश परिमृज्य सर्वतः स्वं स्वरूपममलं प्रकाशय।।१३.२।।**

**अर्थ :-** हे प्रभू! आपल्या चित्स्वरूपाला लपवून अथवा झाकून ठेवणारी मलिनता ही थोड्या जरी प्रमाणात असली तरीही ती माझ्या चित्तात आपल्या स्वरूपसाक्षात्काराच्या वेळेला होत असते. आपण तिलाही पूर्णरूपाने दूर करून आपल्या चिदानंदमय निर्मल स्वरूपाला जेथे व्युत्थान आणि समाधी असा कोणताही भेद नाही तेथे प्रकट करा.

श्रीईश्वरस्वरूप स्वामी श्रीलक्ष्मण जू अशाच प्रकाराने सतत सावधान राहण्यासाठी आपल्या शिष्यगणांना पुढील उपदेश देत असत-

**१) भोजन करताना प्रत्येक घासाचा स्वाद घेत घेत असे अनुसंधान केले पाहिजे की, खाण्याचा आस्वाद कोण घेत आहे? अशाच प्रकारे दूध, पाणी आदि पितानाही पिणाऱ्याने असे लक्ष ठेवले पाहिजे.**

**२) चालत असताना एक पाऊल उचलल्यानंतर दुसरे पाऊल टाकण्याआधी मध्यदशेत अनुसंधान ठेवले पाहिजे.**

**३) शिंकताना शिंक येण्याच्या आधी आणि शिंकल्यानंतर सावधान राहिले पाहिजे.**

**४) आपल्या दूर असलेल्या एखाद्या प्रियव्यक्तीची आठवण येण्याच्या वेळेला पूर्वापर ज्ञानरहित जी आनंदावस्था आहे त्याच्यात स्थिर राहिले पाहिजे.**

**५) झोपताना झोप लागण्याच्या आधी आणि जाग्रतावस्थेच्या अंती मध्यावस्थेत स्थिर राहण्याचा प्रयत्न केला पाहिजे.**

श्रीस्वामीजींनी या विषयातला अनुभव खालीलप्रमाणे शब्दबद्धही केला आहे.

There is a point be-twixt sleep and waking, where thou shalt be alert without shaking;

Enter into the new world where forms so hidepus pass, They are passing, endure, do not be taken by the dross.

Then the pulls and pushes about the tolerate.
Close all ingress and egress;
Yawnings there may be;
shed tears-crave-implore,
But thou wilt not prostrate,
A 'THRILL' passes, and that goes down to the bottom,
It riseth, may it bloorn forth, that is BLISS,
Blessed Being, Blessed Being
O! greetings be to THEE.

**By Swami Laxman Joo.** ।।३८।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

करणशक्ती या शब्दाने तुर्यरूप स्वातंत्र्यशक्तीच बोधरूप अथवा ज्ञानरूप प्रमात्याचे म्हणजे ज्ञात्याचे सार आहे असे सांगितले.

**विवरण :-** अन्यथा स्वातंत्र्यरूप नदीच्या विरहात किंवा अभावात निर्विमर्श संवित्प्रकाशाला त्या त्या भावापासून उत्पन्न होणारे प्रतिफलितत्व असूनही स्फटिकादींप्रमाणे जडत्व येण्याची आपत्ती येईल व त्यामुळे विश्वव्यवहाराचा विप्रकोप अर्थात् विशेष प्रकोप होईल असा याचा अर्थ आहे.

याकरिता मायाशक्तीने लपविलेल्या जगत्स्वरूपाच्या उत्तेजनाविषयी **"त्रिपदाद्यनुप्राणनम्।।३८।।"** अर्थात् "सर्व प्रकारच्या तिन्ही अवस्थांमध्ये श्रीशिवशक्तिस्वरूपानंद पाहावा," असे या सूत्रात सांगितले आहे.

त्रिपदांचे अनुजीवन म्हणजेच उत्तेजन करावे. वस्तूंची उन्मुखता म्हणजे

सृष्टी, संबंध म्हणजे स्थिती व अंतर्मुखता म्हणजे लय या अवस्थांमध्ये असणारे प्रधानपद आनंदघन तुर्यनामक स्थान असून ते मायाशक्तीने आच्छादित असूनही त्या त्या विषयांच्या उपभोगकाली विजेप्रमाणे किंचित् भासणारे असते. त्यामुळे त्या त्या वेळेला क्षणभर उदित होऊनही त्या तुर्यपदाचा अंतर्मुख होऊन विचार करून आपल्या जीवनात त्या अवस्थेला स्थान द्यावे.

**विवरण :-** साधकभक्तयोगिशिष्यांना असे करणे सहज सोपे आहे; मात्र स्त्री इत्यादि विषयांच्या उपभोगामध्ये रत असलेल्या लोकांची वेद्य विषयांची संवेदना नष्ट झालेले तुर्यपद उद्योगरत असूनही त्या पशुजनांकडून प्रत्यक्ष स्त्री आदि विषयांपासून होणारे सुख वेगळेपणाने संवेदिले जाते किंवा जाणले जाते. मात्र त्याचे अवहित अर्थात् उदात्तीकरण केल्याने निरावरण होते. यामुळे जीवितयुक्त तुर्यपदाने जिवंत स्वरूप आत्म्यामध्ये अवहितीकरण अर्थात् उत्तेजन करावे.

यासंबंधी "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**अन्तः स्वानुभवानन्दा विकल्पोन्मुक्तगोचरा।**
**यावस्था भरिताकारा भैरवी भैरवात्मनः।।१५।।**
**तद्वपुस्तत्त्वतो ज्ञेयं विमलं विश्वपूरणम्।।१५.५।।**

**अर्थ :-** आंतरिक अहंतेमधील जो स्वप्रकाशरूप आनंद आहे त्यात कशाचेही चिंतन किंवा विचार नाही; कारण ती अवस्था म्हणजे श्रीभैरवयुक्त श्रीभैरवीविशिष्ट अवस्था आहे म्हणजेच श्रीभैरवरूप अशा माझीच अव्यतिरिक्त शक्ती आहे. ती भरिताकार अर्थात् सर्व विश्वाच्या अभेदचमत्कारयुक्त आकाराची आहे. तेच तत्त्वतः म्हणजेच परमार्थतः विमल अथवा निर्मल म्हणजेच स्वरूप भिंतीवर भासविणाऱ्या जगताने न आच्छादलेले विश्वपूरण अर्थात् सर्वांना व्यक्त करणारे स्वरूप जाणून घ्यावे.।।१५,१५.५।।

अशा प्रकारे सुरुवात करून -

**शक्तिसङ्गमसंक्षुब्धशक्त्यावेशावसानिकम्।**
**यत्सुखं ब्रह्मतत्त्वस्य तत्सुखं स्वाक्यमुच्यते।।६९।।**

**अर्थ :-** स्त्रीसंभोगाच्या वेळेला तिच्यातच पूर्णपणे समाविष्ट होऊन जे सुख मिळते तेच ब्रह्मतत्त्वाच्या सुखाचे सूचक आहे.।।६९।।

**विवरण :-** प्रत्यक्ष स्त्रीसंगमाशिवाय त्या संगमातून उत्पन्न होणाऱ्या आनंदवृत्तींच्या स्मरणानेच जो आनंदाचा उद्गम होतो तो स्वीय ब्रह्मानंद अनुभवावा.

यासंबंधी शास्त्रात असे सांगितले आहे की -

**जायया संपरिष्वक्तो न बाह्यं वेद नान्तरम्।**
**निदर्शनं श्रुतिः प्राह मूर्खस्तं मन्यते निधिम्।।**

**अर्थ :-** स्त्रीने आलिंगन दिलेला मनुष्य अंतर्बाह्य काहीही जाणत नसतो असे श्रुतीने दृष्टान्त देऊन सांगितले आहे; परंतु मूर्ख किंवा अज्ञानी मनुष्य त्याला विधी मानतो.

**न सृष्टिर्जायते लिङ्गान्न भगान्नापिरेतसः।**
**आनन्दोच्छलिता शक्तिः सृजत्यात्मानमात्मना।।**

**अर्थ :-** सृष्टी ही लिंग, भग अथवा वीर्य अर्थात् रेतस् या कशामुळेही होत नाही. आनंदाने उसळणारी शक्ती स्वतःनेच स्वतःला निर्माण करीत असते.

**विवरण :-** अशा वचनांनुसार स्त्रीच्या समागमापासून होणाऱ्या आनंदाच्या वेळेला आनंदशक्तीत समावेश करून शेवटी स्त्रीसंपर्क न करताही स्वात्म्यातच असणाऱ्या ब्रह्माची भावना करावी अथवा विचार करावा. विश्वाचे स्फुरण होत असताना शक्तीच्या संगमाने संक्षुब्ध झालेल्या चिच्छक्तीत जो आवेश होतो त्यावेळेला होणारे सुख स्वरूपाचेच असते.

**लेहनामन्थनाकोटैः स्त्रीसुखस्य भरात्स्मृतेः।**
**शक्त्यभावेऽपि देवेशि भवेदानन्दसम्प्लवः।। विज्ञानभैरव ७०।।**

**अर्थ :-** लेहन म्हणजे चुंबन, आमंथन म्हणजे आलिंगन देणे व आकोट म्हणजे नखक्षतादि कामक्रीडा या कामोद्दीपक विभागांनी उद्दीपित झालेल्या स्त्रीसुखाच्या आनंदाच्या अत्यधिक स्मरणामुळे स्त्रीशक्तीचा अभाव असतानाही आनंद मिळतो. याकरिता त्या स्मरणाने उल्लास व आनंद यांनी युक्त स्वात्म्याचे ध्यान करावे.।।७०।।

**आनन्दे महति प्राप्ते दृष्टे वा बान्धवे चिरात्।**
**आनन्दमुद्गतं ध्यात्वा तन्मयस्तल्लयीभवेत्।। विज्ञानभैरव ७१।।**

**अर्थ :-** आपल्या जवळच्या माणसाला, नातलगाला व प्रिय व्यक्तीला बऱ्याच काळानंतर पाहिले असता जो महान् आनंद प्राप्त होतो त्यामुळे उत्पन्न झालेल्या आनंदाचे ध्यान करून तन्मय व तल्लीन व्हावे.।।७१।।

**जग्धिपानकृतोल्लासरसानन्दविजृम्भणात्।**
**भावयेद्भरवं भावं महानन्दमयो भवेत्।। विज्ञानभैरव ७२।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य खाणे-पिणे यांच्यामधून उत्पन्न

होणाऱ्या उल्लास, रस आणि आनंद यांच्या विस्ताराची अनुभूती घेतो त्यावेळेला त्या साधकभक्तयोगिशिष्याने श्रीभैरवभावाचे ध्यान करावे म्हणजे तो महान् आनंदाने युक्त होईल.।।७२।।

**विवरणात्मक टीप :-** गोड जेवण करणे, दूध आदि पिणे यांच्या रसाच्या आस्वादनापासून उत्पन्न होणाऱ्या आनंदोत्कर्षाच्या आनंदाने भरलेल्या अवस्थेची भावना करीत अन्य कोणत्याही प्रवृत्तीकडे लक्ष न देण्याने अनुत्तर-सुखाची प्राप्ती होते.

**गीतादिविषयास्वादासमसौख्यैकतात्मनः।**
**योगिनस्तन्मयत्वेन मनोरूढेस्तदात्मता।।७३।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य मनाने गीत-संगीतादींच्या अतुलनीय आनंदाशी एकरूप होतो त्यावेळेला त्या साधकभक्तयोगिशिष्याची त्या आनंदाशी एकाग्रता झालेली असते; कारण तो त्याच्याशी एकरूपच असतो.।।७३।।

**विवरण :-** गीतादि तसेच बासरी, वीणा आदि वाद्यरूप विषयांच्या चमत्काराने निर्माण झालेल्या अनुपमसुखात एकाग्रचित्त झालेल्या साधक-भक्तयोगिशिष्याला शाक्तस्पर्शाच्या आवेशाने अथवा सामर्थ्याने ब्रह्मसुखाची प्राप्ती होते.

इत्यादि विविध उपायांचे प्रदर्शन करून "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात याविषयाचा विस्तार केला आहे.

त्याचप्रमाणे "**श्रीस्पंदशास्त्र**" या ग्रंथातील कारिकेत हाच विषय पुढील-प्रमाणे मांडला आहे.

**अतिक्रुद्धः प्रहृष्टो वा किं करोमीति वा मृशन्।**
**धावन्वा यत्पदं गच्छेत्तत्र स्पन्दः प्रतिष्ठितः।।२.२२।।**

**अर्थ :-** अत्यंत रागावलेल्या किंवा खूप आनंदित झालेल्या अथवा काय करावे? असा विचार करीत असणाऱ्या किंवा धावत असणाऱ्या अशा मनुष्याच्या अवस्थेत स्पंदाची स्थापना झालेली असते.।।२.२२।।

**विवरण :-** दुःख, सुख, मोह या तीन प्रकारच्या विषयांच्या ग्रहणरूप अंतःकरणाच्या व्यापाराने अत्यंत रागावलेला अणि कर्मेंद्रियांच्या व्यापाराने धावणारा अशा प्रकारची जाग्रतावस्थेतली अन्यही उदाहरणे लक्षात घ्यावीत. अशा प्रकारच्या विचित्र अवस्थांमध्ये निरालंब अर्थात् कोणताही आधार नसणारी चित्तवृत्ती ज्या भूमिकेत अधिष्ठित होईल त्या पदात अर्थात् अवस्थेत

अथवा स्थितीत स्वभाव हाच आधार असणाऱ्या सर्व विशेष शक्तींनी युक्त चक्रे नष्ट झालेल्या परमात्मधर्म असणाऱ्या व प्रतिष्ठित झालेल्या स्पंदाची प्राप्ती होते.

**............प्रबुद्धः स्यादनावृतः।।**

**अर्थ :-** जो जागृत होतो तो आवरणरहित होतो.

हा मूळ श्लोक व त्याचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे.

**तदा तस्मिन्महाव्योम्नि प्रलीनशशिभास्करे।**
**सौषुप्तपदवन्मूढः प्रबुद्धः स्यादनावृतः।।२.२५।।**

**अर्थ :-** जेथे पोहोचल्यावर चंद्र आणि सूर्य हे दोन्ही लीन होतात त्या महान् आकाशामध्ये अर्थात् तुर्यारूप शाक्तभूमिकेच्या अनंत आकाशामध्ये प्रबुद्ध योग्याच्या चिन्मात्ररूप अनुभूतीवर कोणतेही आवरण राहिलेले नसते. याउलट मूढ अर्थात् सम्यक् अनुभूतीने हीन असा साधकभक्तयोगिशिष्य त्या अवस्थेमध्येही सुषुप्तिपदासारख्या प्रगाढ अंधकाराच्या अवस्थेमध्ये पडलेला असतो.।।२.२५।।

हे मीच निराकांक्ष म्हणजेच असंदेह निर्णयामुळे अर्थात् प्रबुद्धविषय-जिज्ञासेच्या अशक्यत्वामुळे "**श्रीस्पंदनिर्णय**" या टीकाग्रंथात सांगितले आहे.

"**त्रिषु चतुर्थं तैलवदासेच्यम्।।३.२०।।**" या सूत्रात जागरादि अवस्थां-मधून तुर्यावस्थेचे अनुप्राणन कसे करावे? हे सांगितले आहे. या सूत्रात सर्व अवस्थांच्या आदि, मध्य व शेवटी सृष्टी, स्थिती व संहार यांच्या निरूपणाच्या विशिष्ट प्रकाराने हेच सांगितले हाच विशेष होय.

**विवरण :-** पूर्वीच्या व या सूत्राच्या अर्थामध्ये एकत्व स्वीकारले तरीही सामान्य व विशिष्ट अर्थ अशा रचनेमुळे पुनरुक्ती येते. या शंकेचा परिहार करण्यासाठी वरील विवरण केले आहे.।।३८।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१)** जर अशा प्रकारे संभोगसुख हे केवळ स्मरणाने स्त्रीच्या अनुपस्थितीतही होत असेल तर याचा अर्थ असा आहे की, हा आनंद आतच भरलेला आहे. स्त्रीशिवाय असणाऱ्या याच आनंदाचे एखाद्याने विश्वोत्तीर्ण असणाऱ्या चैतन्याचा आनंद कसा असतो ते समजण्यासाठी ध्यान करावे.

**२)** अशा प्रकारे मनुष्य इंद्रियांना सुखकर असणारा आनंद सिद्धयोगाच्या साधनेमध्ये बदलू शकतो. "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात दिलेल्या कारिकांमधून सर्व प्रकारच्या इंद्रियसुखकर आनंदाची उदाहरणे दिलेली आहेत. संभोगसुखाचे

उदाहरण हे स्पर्शाचे उदाहरण आहे. मित्र अथवा प्रिय व्यक्तीच्या दर्शनामुळे होणारे सुख हे रूपाचे उदाहरण आहे. चवदार जेवण जेवल्याने होणारा आनंद हे रसाचे उदाहरण आहे आणि गीतादि ऐकल्याने होणारा आनंद हे शब्दाचे उदाहरण आहे.।।३८।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे ज्यावेळेला तुर्यपदरूप स्वानुभव पूर्णतया स्फुरण पावतो त्यावेळेला कोठेही स्वर्गादि कार्यात त्या साधकभक्तयोगिशिष्याला अधिकार प्राप्त होतो किंवा आत्मदृष्टी येते. त्यावेळेला असणारी स्थिती जगत्पती श्रीपरमेश्वर श्रीशिव "**त्रिपदाद्यनुप्राणनम्।।३८।।**" या सूत्रात सांगत आहेत. ।।१६२,१६२.५।।

तुर्य ही जाग्रदादि तीनही अवस्थांचे आदिकारण आहे.।।१६३।।

त्यामुळे तुर्यावस्थेला पूर्ण असे नाव आहे. त्यामुळे तुर्यावस्था ही सर्व वस्तूंना स्वबल देते. हेच अनुप्रमाण होय.।।१६४।।

**विवरण :-** सांगितलेल्या उपायांच्या समूहाच्या आचरणाने जाग्रदादि तीनही अवस्थांचे अनुप्राणक म्हणजेच जागरादि तीनही अवस्थांना सामर्थ्य देणारे तुरीय व चिदानंदाने परिपूर्ण श्रीशिवतत्त्वच परिपूर्ण रीतीने सर्व वस्तूंचे नियामक आहे. ज्यावेळेला असे ज्ञात होते त्यावेळेला व्यवहारकालात त्या त्या प्रिय किंवा अपेक्षित अशा संगीतादि विषयांच्या आस्वादनकाली अंतर्मुखज्ञानाने बोद्धृतत्त्व म्हणजेच प्रमातृत्व हे आवरणरहित विजेप्रमाणे स्फुरण पावते, असा याचा भावार्थ आहे. ।।३८।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**त्रिपदाद्यनुप्राणनम्।।३८।।**" या सूत्राने सृष्टी, स्थिती आणि लय अशा तीन शब्दांनी भावोन्मुखता अर्थात् त्या भावांचा संबंध व त्या भावांमध्ये असणारी भावनामयता सांगितली आहे. या तीन अवस्थांमध्ये श्रेष्ठ असणारे व आनंदघन असे तुर्य नावाचे पद मायाशक्तीने आच्छादित असूनही त्या त्या विषयांचा उपभोग होत असताना विजेप्रमाणे भासत असते. तिने अर्थात् तुर्येने अनुप्राणन अर्थात् आत्म्याचे उत्तेजन करावे.।।३८।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

सर्वसामान्य अशा बहुतेक पदार्थांची उत्पत्ती सिद्धयोगी करू शकतो. हे त्याच्या निर्माणशक्तीने होऊ शकते. स्वातंत्र्यरूप शक्ती ।।१६०।।

म्हणजे ज्ञात्याच्या ज्ञानाचे सारसर्वस्वच होय. त्यामुळे स्वमायेमुळे नजरे-

आड झालेल्या स्वातंत्र्यशक्तीला उत्तेजन देण्यासाठी किंवा कार्यप्रवण करण्यासाठी।।१६१।।

"**त्रिपदाद्यनुप्राणनम्।।३८।।**" अर्थात् "त्रिपदाचे तुर्येने अनुसंजीवन करावे," असे श्रीशिवांनी या सूत्रात कथन केले आहे.।।१६१.५।।

त्रिपद म्हणजे जागर, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन अवस्था होत. त्यांच्यापैकी प्रत्येकाच्या आदि, मध्य व अंत या अवस्था वेगळ्या प्रकाराने सांगितल्या.।।१६२।।

भावोन्मुखता अर्थात् भावांकडे प्रवृत्ती होणे, त्यांची आसक्ती आणि त्यांचे एकत्रिकरण म्हणजेच सृष्टी, स्थिती व लयाकार तुर्य आदींनी युक्त अशा।।१६३।।

या तीनही अवस्थांमध्ये चमत्काररूप रसाच्या आनंदाने भरलेल्या, मायेने आच्छादलेल्या व तिरोधानस्वरूप असणाऱ्या।।१६४।।

त्या त्या विषयरूप भोगात विजेप्रमाणे क्षणभर स्फुरणाऱ्या तुर्यादींनी सावधचित्त राहून साधकभक्तयोगिशिष्याने त्या अवस्थांना उज्ञीवित करावे.।।१६५।।

या तुर्यादींच्या जिवंतपणानेच जीवित निजात्म्याचे योग्य उत्तेजन करावे. त्यामुळे साधकभक्तयोगिशिष्य तन्मय होईल.।।१६६।।

जाग्रत् आदि अवस्थांमध्ये तुर्येचे अनुप्राणन पूर्वी "**त्रिषु चतुर्थं तैलवदासेच्यम्।।३.२०।।** या सूत्रात वर्णिले आहे आणि "**त्रिपदाद्यनुप्राणनम्।।३.३८।।**" याच सूत्राने त्या जागरादि अवस्थांमधील अतिसूक्ष्म अशा तुर्येचे अनुप्राणन सांगितले हे या सूत्राचे वैशिष्ट्य समजावे.।।१६७, १६७.५।।३८।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

ज्यामुळे करणशक्तिपदाच्या प्रकथनाने चिदानंदतुर्यात्मा बोधयुक्त प्रमात्याचे सार आहे असे सांगितले त्यामुळे स्वतःच्या मायाशक्तीने नष्ट झालेल्या त्या स्वरूपाच्या उत्तेजनासाठी "**त्रिपदाद्यनुप्राणनम्।।३८।।**" हे सूत्र सांगितले आहे.

हा साधकभक्तयोगिशिष्य दृढभावनेच्या सामर्थ्याने स्वप्नसंकल्पाने तुल्य असे सृजनात्मककार्याचे संपादन करीत असतो. तो स्वतंत्र इंद्रियांच्या सामर्थ्याने जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ती नावाच्या तीन अवस्थांचे धारण करून अनुप्राणन करीत असतो. जरी चमत्काररसचिदानंदाने परिपूर्ण तुर्य नावाचे पद मायाशक्तीने आच्छादित झालेले असले तरीही त्या त्या विषयांच्या उपभोगांच्या वेळेला ते

तुर्यपद वीजेप्रमाणे प्रकाशमान होते. त्याने अनुप्राणन म्हणजे स्वात्म्याचे योग्य प्रकाराने उत्तेजन करावे.।।३८।।

**विवरणात्मक टीप :-** मागे सांगितलेल्या कल्पिता आणि अकल्पिता इंद्रियशक्तींनुसार त्या साधकभक्तयोगिशिष्याच्या कर्मेंद्रियांच्या म्हणजे प्राणेंद्रियांच्या क्रियेला येथे "अनुप्राणनम्" असे म्हटले आहे. याचा अर्थ असा आहे की, त्या साधकभक्तयोगिशिष्याच्या शारीरिक आणि कर्मेंद्रियांच्या क्रिया पाचही ज्ञानेंद्रियांच्या वरती सांगितलेल्या त्रिपदादि ज्ञानानुसार प्रभावित होतात. श्रीक्षेमराजांनी त्रिपाद याचा अर्थ सृष्टी, स्थिती आणि संहार असा घेतला आहे.।।३८।।

## सूत्र क्रमांक ३९

**संबंध :-** त्यामुळे साधकभक्तयोगिशिष्याने अशा प्रकारे तीनही अवस्थांमध्ये अंतर्मुख भावाने मध्यदशेचे अनुप्राणन करण्याची स्थिरता प्राप्त करूनच संतुष्ट राहू नये. याउलट त्याने बाह्यरूपातही हा अभ्यास अधिक दृढ ठेवला पाहिजे, याविषयी हे सूत्र आहे.

**चित्तस्थितिवच्छरीरकरणबाह्येषु।।३९।।**

**शब्दार्थ :- चित्तस्थितिवत्** - ज्याप्रमाणे चित्ताची अंतर्मुख निरुद्ध अवस्था झाली त्याप्रमाणे. **शरीर** - देह जगत्‌रूप सुषुप्ती अवस्थेतही तुर्यरसांचे अनुप्राणन केले पाहिजे. **करण** - इंद्रिय किंवा व्यक्तिगत शरीरातील स्वप्न अवस्था. **बाह्येषु** - बाहेरील किंवा व्यक्तिगत शरीरातील जागृत अवस्था.

**अर्थ :-** ज्याप्रमाणे चित्ताच्या म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या अंतर्मुखाने जागृत झालेल्या सर्व अवस्थांमध्ये तुर्यानंद मुरवावा आणि त्याचे अनुप्राणन करावे असे सांगितले आहे त्याप्रमाणे शरीर, इंद्रिये व बाह्यवस्तू यांच्या ठिकाणी सुद्धा तुर्यानंदाचे अनुप्राणन करावे अर्थात् ज्याप्रमाणे चित्ताची अंतर्मुख निरुद्ध अवस्था स्वाभाविक असते त्याप्रमाणे साधकयोग्याने आपल्या शरीरातील जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ती या अवस्थाही तुर्यावस्थेने भरून टाकाव्याते.।।३९।।

**विशेष व्याख्या :-** जोपर्यंत चित्ताच्या गुणांहून वेगळ्या सत्तेचे किंवा शक्तीचे अस्तित्व असते तोपर्यंत ते चित्त म्हणजे कुंडलिनी शक्ती आपल्या कारणात अर्थात् श्रीशिवांमध्ये विलीन होऊ शकत नाही; कारण त्याच्यात परिणाम होणे अनिवार्य असते. निरोधकाळी चित्त व्युत्थान आणि निरोध अशा दोन्हीही प्रकारच्या संस्कारांमध्ये व्याप्त असते. संस्कारात बुडालेल्या

चित्ताच्या व्युत्थानधर्मातून निरोध धर्मात बदलण्याला किंवा परिणाम पावण्याला महर्षी श्रीपतंजलींनी निरोधपरिणाम किंवा समाधी व परिणाम असे नाव दिले आहे. ही अवस्था व्युत्थानसंस्कारांच्या अंतर्गतच मानली गेली आहे. ज्यावेळेला चित्त अत्यंत योग्य प्रकाराने अंतर्मुखरूपात समाहित होते त्यावेळेला चित्तावर जो परिणाम होतो त्याला एकाग्रतासमाधी असे म्हणतात. त्या अवस्थेत शांत होणारी वृत्ती एकसमानच राहत असते. साधकभक्तयोगिशिष्याने त्याच्याचविषयी प्रयत्नशील राहण्याचा संकेत श्रीपतंजलीमुनींच्या खालील सूत्रात आहे.

**ततः पुनः शान्तोदितौ तुल्यप्रत्ययौ चित्तस्यैकाग्रतापरिणामः।।**
**।। श्रीयोगसूत्रे ३.१२।।**

**अर्थ :-** निघून गेलेली म्हणजे पूर्वीची आणि सध्या चालू असलेली अशा दोन्ही वृत्ती ज्यावेळेला एकाच विषयाशी समरस होतात त्यावेळेला एकाग्रता परिणाम होतो अर्थात् एकाग्रता प्राप्त होते.

त्यामुळे अंतर्मुखभावात ज्यावेळेला चित्त विद्युत्प्रकाशाप्रमाणे क्षणभराच्या तुर्यचमत्काराने अनुप्राणित होते त्यावेळेला आनंदाने पूर्ण असल्याकारणाने साधकभक्तयोगिशिष्याला संतोष होतो. नंतर त्याला अशा प्रकारे जाग्रत् आणि स्वप्राहून बाह्य आभासरूप बाह्यमुखातही अंतःविमर्शाच्या अर्थात् अंतर्ज्ञानाच्या बलद्वारा क्रमपूर्वक तुर्यरसाने अनुप्राणित केले पाहिजे. **"त्रिषु चतुर्थं तैल-वदास्येचम्।।३.२०।।"** त्यामुळे साधकभक्तयोगिशिष्य विश्वअभेद-चमत्कारमय अवस्थेतील स्थिती प्राप्त करतो. हा विमर्शानंदाचा विकास आहे.

या विषयी "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सर्वं जगत्स्वदेहं वा स्वानन्दभरितं स्मरेत्।**
**युगपत्स्वामृतेनैव परानन्दमयो भवेत्।।६५।।**

**अर्थ :-** बाह्याच्या अभिमत किंवा इच्छित वस्तुजातामध्ये सर्वत्र चिदानंदघनरसाने परिपूर्ण श्रीशिवत्वाची आपल्या दिव्यदेहात विभावना अर्थात् चिंतन केल्याने साधकभक्तयोगिशिष्याला अनुत्तर आनंदमय स्वरूपसमावेश होतो.।।६५।।

हाच भाव "**श्रीवाजसनेय**" श्रुतीत सांगितला आहे.

**पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते।**
**पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते।।**

**अर्थ :-** ते परब्रह्म पूर्ण आहे आणि हे कार्यब्रह्मही पूर्ण आहे; कारण

की, पूर्णातून पूर्णाची उत्पत्ती होत असते. त्याचप्रमाणे प्रलयकालामध्ये पूर्ण कार्यब्रह्माचे पूर्णत्व घेऊन व ते आपल्यामध्ये लीन करून पूर्ण परब्रह्मच शिल्लक राहते.

अशा प्रकारे आनंदरूपतेची स्वातंत्र्यशक्ती सर्व अवस्थांमध्ये स्पष्ट असते व तिच्यामुळेच साधकभक्तयोगिशिष्याला त्याच्या अंतर्गत असलेली संपादन-सामर्थ्याची अर्थात् विश्वाची स्थिती आणि लय करण्याची शक्ती अनुभवाला येते. त्यामुळे अंतर्मुखवृत्तीला तुर्यरसाने आप्लवित अर्थात् व्यापून बहिर्मुख जगद्रूप सुषुप्तीलाही तुर्यरसाने व्याप्त करण्याचा दृढ अभ्यास करणे साधकभक्त-योगिशिष्यासाठी अत्यंत आवश्यक असते. त्यामुळे उदय आणि अस्त एक-समान होतात. अशा सिद्धयोग्याला अंतर्मुखता आणि बहिर्मुखता यांच्यामध्ये कोणताही भेद किंवा फरक राहत नाही. त्याच्यात विमर्शानंदाचा विकास सतत राहत असतो.।।३९।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

हे त्रिपदांचे अनुप्राणन म्हणजेच अंतर्मुखत्व किंवा चित्तस्थिरत्व यांचा लाभ झाल्यावर तेवढ्यावरच संतुष्ट होऊ नये; तर "**चित्तस्थितिवच्छरीरकरण बाह्येषु।।३९।।**" या सूत्रानुसार "या चित्तस्थितीप्रमाणेच बाह्य शरीर व इंद्रिये यांमध्येही तुर्येचे अनुप्राणन करावे."

ज्याप्रमाणे अंतर्मुखस्वरूप चित्ताच्या स्थितीत तुर्यावस्थेने अनुप्राणन करावे त्याचप्रमाणे शरीर व इंद्रियादि बहिर्मुख अवस्थांमधूनही आंतरविमर्शाच्या सामर्थ्याने क्रमाक्रमाने तारतम्य ठेवून अनुप्राणन करावे.

याविषयी "**श्रीविज्ञानभैरव**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सर्वं जगत्स्वदेहं वा स्वानन्दभरितं स्मरेत्।**
**युगपत्स्वामृतेनैव परानन्दमयो भवेत्।।६५।।**

**अर्थ :-** साधकभक्तयोगिशिष्याने सर्व जगत् अथवा स्वतःचे शरीर हे स्वानंदाने भरलेले आहे असे स्मरण म्हणजेच चिंतन करावे. त्यामुळे तो एकदमच स्व-अमृतानेच पर किंवा श्रेष्ठ आनंदाने भरून जाईल.।।६३।।

**विवरण :-** सर्वत्र बाह्यावस्थेत इच्छित वस्तू निर्माण झाल्या असता चिदानंदाने परिपूर्ण अशा कणांनी परिपूर्ण श्रीशिवत्वाचे ध्यान करीत असताना साधकभक्तयोगिशिष्यामध्ये अनुत्तर आनंदमय स्वरूपाचा समावेश होतो.

अशा प्रकारे आनंदस्वरूप स्वातंत्र्यशक्ती सर्व अवस्थांमध्ये स्फुट किंवा व्यक्त होऊन जे पाहिजे ते निर्माण करण्याचे सामर्थ्य सिद्धयोग्यामध्ये आणणारी

होते अर्थात् अशा स्वातंत्र्यशक्तीमुळे सिद्धयोग्यात सामर्थ्य निर्माण होते.।।३९।।

**विवरणात्मक टीप :-** स्वरूपविश्रांतियुक्त दशेत विजेच्या प्रकाशाप्रमाणे क्षणभर थांबणाऱ्या तुर्यचमत्काराला प्राप्त करून आनंदाने भरून गेल्यामुळे ज्याप्रमाणे संतोष होतो त्याप्रमाणेच बाहेर म्हणजेच उन्मुखततेही अखंड आनंदयुक्त परमार्थ अमृतरसाच्या सिंचनाने त्या विमर्शाच्या आनंदाचा विकास होतो असा याचा तात्पर्यार्थ आहे.।।३९।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

हे तुरीयतत्त्व कसे अनुप्राणन करावे हे सांगण्यासाठी हृदयातील अज्ञान-रूप अंधार दूर करणारे भगवान् श्रीशिव "**चित्तस्थितिवच्छरीरकरणबाह्येषु ।।३९।।**" या सूत्रात असे सांगतात की,।।१६४.५।।

ज्याचे स्वरूप सांगितले आहे अशा चित्ताची जी स्थिती ती निश्चलता होय.।।१६५।।

**विवरण :-** ज्ञेयासाठी प्रवृत्त झालेल्या संकुचित चित्तत्वाची उपायादिकांनी चिदानंदस्वरूपता तसेच कल्पित देहेंद्रियांची तात्त्विक स्वभावापासून अप्रच्युती किंवा स्थिरता म्हणजे प्राणन होय. पूर्वावस्थेत सर्व वस्तुजात चिद्रसांसारखे मृदू असते व बहिर्मुखतेत कठिणत्व पावल्यासारखे स्वप्नमनोरथाप्रमाणे दिसते. वास्तविक पाहता स्वरूपज्ञानच अंतर्बाह्य रीतीने त्या त्या रूपात बदलून भासते व पुन्हा विलीन होऊन चिन्मय बनते.

स्वस्वरूपापासून न ढळणे म्हणजे निश्चलता होय. तसेच शरीर व इंद्रिय-समुदाय हे आंतर्बाह्य स्वरूपानुसार असणे ही स्थिती होय. यालाच प्राणन असे म्हणतात. त्याचप्रमाणे ज्या बाह्यपदार्थांविषयी सिद्धयोगी जशी कल्पना करतो त्यात तसेच स्थित्यंतर घडते. हेच प्राणन होय.।।१६६ ते १६७.५।।३९।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**चित्तस्थितिवच्छशरीरकरणबाह्येषु।।३९।।**" या सूत्राद्वारा श्रीशिवांनी असे कथन केले आहे की, "अंतर्मुख चित्तस्थितीत केल्या जाणाऱ्या अनुप्राणना-प्रमाणेच शरीर व इंद्रिये या बाह्य आभासयुक्त बहिर्मुखतेमध्येही याच तुर्या-वस्थेने त्यांचे अनुप्राणन अर्थात् संजीवन करावे."।।३९।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अंतर्मुख अवस्थेतच त्रिपदादि अनुप्राणन करावे असे नसून "**चित्तस्थिति-वच्छरीरकरणबाह्येषु।।३९।।**" या सूत्रानुसार चित्ताच्या अंतर्मुख अवस्थेप्रमाणे देह, इंद्रिये व बाह्यविषय यांमध्येही आनंदरूप तुर्येचे अनुप्राणन करावे असे

अध्याहृत समजावे.।।१६८,१६९।।

ज्याप्रमाणे अंतर्मुखस्वरूप चित्ताच्या स्थितीमध्ये अनुप्राणन केले जाते त्याप्रमाणे आनंदरूप तुर्येने।।१७०।।

बहिर्मुख अशा देहेंद्रियांच्या विषयातही अनुप्राणन करावे. त्यावेळेला सर्व चराचर तन्मय अर्थात् योगिमय म्हणजेच आत्ममय होते.।।१७१।।

अशा रीतीने या सिद्धयोग्याची स्वातंत्र्ययुक्त स्वानंदरूपाची शक्ती वाटेल ते उत्पन्न करू शकते.।।१७२।।३९।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

त्यामुळेच महायोगात स्थित असणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याने त्रिपदांच्या उत्तेजनाने अंतर्मुखत्व अवरोध दशेतच केवळ संतुष्ट होऊ नये; परंतु चित्त-स्थितीप्रमाणेच शरीरकरण म्हणजेच बहिर्मुखतेतही सावध असावे असे **"चित्तस्थितिवच्छरीरकरणबाह्येषु।।३९।।"** या सूत्रात सांगितले आहे. "ज्याप्रमाणे ही स्वातंत्र्यशक्ती अंतर्मुखस्वरूप चित्तस्थितीत तुर्यचमत्कारानंद-रूपाने अनुप्राणन करते त्याचप्रमाणे शरीर व इंद्रिये विषययुक्त व बहिर्मुख असतानाही आंतरपरामर्शाच्या सामर्थ्याने स्थावरजंगम असे हे विश्वही तन्मय करते."

यासंबंधी **"श्रीविज्ञानभैरव"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**सर्वं जगत् स्वदेहो वा स्वानन्दभरितं भवेत्।**
**युगपत्स्वामृतेनैव परानन्दमयो भवेत्।।६५।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला सर्व जगत् किंवा स्वदेह हा स्वानंदाने भरलेला होईल त्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य तत्काळच स्वामृतानेच परानंदाने युक्त होईल.।।६५।।

सर्व नामरूपात्मक विश्व किंवा स्वशरीर स्वतःच्या चिदानंदरसाने परि-पूर्ण भरलेले होत असते, असे सतत चिंतन करावे. याच भावनेने भावक अर्थात् भावना करणारा तत्काळच सच्चिदानंदचमत्काररसाने परमानंदस्वरूप होतो.

त्यामुळेच सर्व बहिर्दशेत अभीष्ट वस्तू निर्माण होत असताना चिदा-नंदघन तुर्यचमत्काररसरूप अमृतकणांचा लेप लावलेल्या पूर्णाहंतायुक्त परमेश्वररूपत्वाच्या भावनेने कल्पित अथवा चिंतन केलेल्या साधकभक्त-योगिशिष्याची अनुत्तर श्रीपरमशिवांच्या धामात स्थिती होते. त्यामुळेच स्वात्मा-नंदरूप परमस्वातंत्र्यशक्ती जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ती नावाच्या अवस्थांमध्ये या

सिद्धयोग्याची त्याला पाहिजे त्या वस्तू निर्माण करण्याची शक्ती स्पष्ट होते.

**विवरण :-** अडतिसाव्या सूत्रात निमीलन समाधी अथवा निमीलन क्रमाचे स्पष्टीकरण दिले आहे. निमीलन क्रम म्हणजेच अंतर्मुख असणारे मनन अथवा चिंतन होय. त्यामुळे चित्त अथवा मानसिक अवस्था अलौकिक अशा चैतन्याच्या आनंदामध्ये बुडून जातात आणि अशा रीतीने त्या पवित्र होतात. या प्रस्तुतच्या सूत्रात उन्मीलन समाधी अथवा उन्मीलन क्रमाचे स्पष्टीकरण दिलेले आहे. उन्मीलन क्रम म्हणजेच बहिर्मुखत्वाने मनन अथवा चिंतन होय. हे सर्व जगत् आणि ज्यात मनुष्याचे शरीर व इंद्रियेही सामावलेली आहेत या सर्व गोष्टी त्या अलौकिक चैतन्यानंदाने भरून जातात.

साधकभक्तयोगिशिष्य त्या आनंदाने आपण भरून गेलो आहोत असा अनुभव घेतो. त्याचबरोबर हे सर्व जगत्‌ही आनंदाने पूर्ण भरलेले आहे असा त्याला अनुभव येत असतो.

दुसरी गोष्ट म्हणजे ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य अत्युच्च आनंदाच्या अवस्थेत जातो त्यावेळेला त्याला स्वातंत्र्यशक्तीचा अनुभव येतो. आनंदाचा स्वभाव क्रियाशील आहे. त्यामुळेच सिद्धयोग्याला त्याच्या इच्छेप्रमाणे वस्तू बनविण्याचे सामर्थ्य प्राप्त होते.।।३९।।

## सूत्र क्रमांक ४०

**संबंध :-** परंतु ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य या अनुत्तर आनंदमय अवस्थेचा जर सर्वात्मभावाने अशा प्रकारे विमर्श न करता राहिला तर त्या-वेळेला त्याचा देह, प्राण, पुर्यष्टक किंवा जाग्रत्, सुषुप्ती आणि स्वप्न यांच्या प्रमातृताभावातच राहिल्याने त्याची अपूर्णतारूप आणवमलामुळे संसाराच्या सीमित विषयांकडे गती होत राहते हे सांगण्याविषयीच हे सूत्र आहे.

**अभिलाषाद्बहिर्गतिः संवाह्यस्य।।४०।।**

**शब्दार्थ :- अभिलाषात्** - वैगुण्य अथवा अपूर्णता वाटणे हे ज्याचे स्वरूप आहे अशा अविद्यारूपी आणवमलामुळे हव्यास किंवा इच्छा वाटण्यामुळे. **बहिर्गतिः** - विषयांकडे होणारी बाह्य गती. **संवाह्यस्य** - एका जन्मातून दुसऱ्या जन्माकडे नेला जाणाऱ्यांचे. सर्वात्मभावाने विमर्श न केल्यामुळे कर्मांचे म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या बाह्यसंसारोन्मुखतेने कामोपभोगाकांक्षाइच्छा-वासनातृष्णासंकल्पनादींचे ओझे वाहणाऱ्या जीवाचा व्यक्तिगत अभिलाषेमुळे विषयांकडे प्रसार होतो.

**अर्थ :-** हव्यास किंवा इच्छा अगर अभिलाषा वाटल्यामुळे एका जन्मातून

दुसऱ्या जन्मात नेला जाणारा पशू अथवा जीव बहिर्मुख गतीने युक्त होतो अर्थात् सर्वात्मभावाचा विमर्श न केल्यामुळे कर्माचे म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या बाह्यसंसारोन्मुखतेने कामोपभोगाकांक्षाइच्छावासनातृष्णासंकल्पनादींचे ओझे वाहणाऱ्या पशुजीवाचा व्यक्तिगत अभिलाषेमुळे विषयांकडे प्रसार होतो व तो जीव वारंवार जन्ममरणचक्रपरंपरा भोगतो.।।४०।।

**विशेष व्याख्या :-** स्वस्वरूपाचे अनुसंधान अर्थात् सतत स्मरण न ठेवल्याने ती व्यक्ती म्हणजे साधकभक्तयोगिशिष्य देह, प्राण आणि पुर्यष्टक यांच्या प्रमातृत्वातच गुंतून राहतो. त्याचा व्यवहार जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्तीतच राहतो. तो शक्तिचक्राला आधार असणाऱ्या मायेसहित कला, विद्या आदि सहा कंचुकांच्या पुढे शुद्धविद्येत प्रवेश करू शकत नाही. त्याला लौकिक अभिलाषा व इच्छा सतत त्रास देत राहतात. आपण अपूर्ण आहोत अशा विचारामुळे आणवमल त्याच्यापासून सुटत नाही. हा सूक्ष्म मल मग स्थूल बनू लागतो. भिन्न वेद्य प्रथांनी मग मायीयमल वाढतो आणि त्याचे मन विक्षेपांनी युक्त होऊन विषयांकडेच जाते. त्याचे फळ म्हणून शुभ आणि अशुभ वासनांनी स्थूल कार्ममल वाढतो व त्यामुळे तो संचित व आगामी आदि कर्मांचे ओझे वाहत अंतःकरण, बहिष्करण, शब्दादि तन्मात्र आणि पृथ्वीपर्यंत भूतसमूहांमध्ये फसून नाना योनींच्या चक्रात पडतो. अंतर्मुख-स्वरूपाकडे तो परत कधीही जात नाही.

याविषयी **"श्रीकालिकाक्रम"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**अतथ्यां कल्पनां कृत्वा पच्यन्ते नरकादिषु।**
**स्वोत्थैर्दोषैश्च दह्यन्ते वेणवो वह्निना यथा।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे जंगलात बांबू वायुवेगाने एकमेकांवर घासल्यामुळे अग्नीने भस्मसात् होऊन जातात त्याप्रमाणे असत्य वस्तू या सत्य आहेत अशी भावना करून मूढ व्यक्ती आपल्याच दोषांनी नरकात दुःखांनी पीडित होत राहते.

त्याचप्रमाणे उपरोक्त ग्रंथातच पुढे असे म्हटले आहे की -

**मायामयैः सदा भावैरविद्यां परिभुञ्जते।**
**मायामयीं तनुं यान्ति ते जनाः क्लेशभाजनम्।।**

**अर्थ :-** परमार्थ अभ्यास आदि क्रमांना त्यागून असे मूढ लोक अविद्येतच राहतात. अशा प्रकारे आपल्यातच उत्पन्न झालेल्या कामादि दोषांच्या कारणा-मुळे एका योनीतून दुसऱ्या योनीत जाऊन ते नरक क्लेशांचे भागीदार बनतात.

अनुत्तर श्रीशिवदशा तर त्यांच्यापासून मैल मैल लांब असते.।।४०।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

ज्यावेळेला हा साधकभक्तयोगिशिष्य आंतरिक तुर्यदशा म्हणजेच अनुत्तर किंवा सर्वश्रेष्ठ आनंदमयी अवस्थेचा नीट विचार करीत नाही त्यावेळेला देहादि प्रमातृतेचा अर्थात् ज्ञानाचा अभाव असल्याकारणाने स्वतःला अपूर्ण अथवा अज्ञानी मानण्याच्या स्वरूपाच्या आणवमलरूपी अभिलाषेमुळे "**अभिलाषाद्बहिर्गतिः संवाह्यस्य।।४०।।**" या सूत्रानुसार "एका रूपातून दुसऱ्या रूपात अर्थात् एका जन्मातून दुसऱ्या जन्मात नेल्या जाणाऱ्या जीवाची बाह्यगती होते."

शक्तिचक्रात स्थित असणाऱ्या कंचुक म्हणजेच मायेसहित कलाविद्या-दींनी, देह, चित्त, ज्ञानकर्मेंद्रिय, अंतःकरण, बाह्य इंद्रिये व तन्मात्रा यांसह हा साधकभक्तयोगिशिष्य एका योनीतून दुसऱ्या योनीत नेला जातो. त्यामुळे त्याला संवाह्य म्हणजेच कर्मात्मरूप पशू असे म्हणतात.

त्या पशूची अर्थात् जीवाची "**.....अभिलाषो मलोऽत्र तु।।**" अर्थात् "अभिलाषा म्हणजे मल होय," या "**श्रीस्वच्छंदतंत्र**" या ग्रंथातील वचनानुसार स्वतःला अपूर्ण मानण्याच्या स्वरूपाच्या अविद्या नावाच्या आणवमलरूप अभिलाषेमुळे बाहेर गती होते.

**विवरण :-** अभिलाषा म्हणजे आपल्याला अपूर्ण मानणे होय. ते लौलिकारूप म्हणजेच लोलुपत्व आहे. काहीतरी मला हवे अशा प्रकारचे रागतत्त्वाचे स्वरूप आहे. या भित्तिभूत किंवा आधारभूत आणवमलात इतर दोन मल म्हणजे कार्म व मायीय आधेयभूत आहेत. ते विषयांकडेच प्रवृत्त होतात. मात्र ते अंतर्मुखरूप झाकू शकत नाहीत.

याविषयी "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यदविद्यावृततया विकल्पविधियोगतः।**
**शिवादीन्नैव झटिति समुद्भावयतेखिलान्।।**

**अर्थ :-** अविद्येने घेरलेला किंवा झाकला गेलेला पशू म्हणजे जीव विकल्पांच्या उपभोगामुळे अखिल श्रीशिवादि तत्त्वे तत्काळच पूर्णपणे जाणू शकत नाही.

**ततः शुभाशुभा भावा लक्ष्यन्ते तद्वशत्वतः।**
**अशुभेभ्यश्च भावेभ्यः परं दुःखं प्रजायते।। कालिकाक्रम।।**

**अर्थ :-** त्यामुळे शुभ आणि अशुभ मनाच्या अवस्था निर्माण होतात

आणि अविद्येच्या प्रभावाखाली असल्याने त्या अशुभ भावांपासून अत्यंत दुःख निर्माण होते.

**विवरण :-** अविद्येने आवरण घातलेल्या पशूच्या सतत पसरणाऱ्या विकल्पांच्या क्षुब्धतेने चित्तत्त्वाचा विचार होत नाही व त्यामुळे पुण्यापुण्य कलंकांचा त्याला स्पर्श होऊन त्यापासून निकृष्ट व दुष्ट फळांचा परिणाम भोगावा लागतो.

**अतथ्यां कल्पनां कृत्वा पच्यन्ते नरकादिषु।**
**स्वोत्थैर्दोषैश्च दह्यन्ते वेणवो वह्निना यथा।। कालिकाक्रम।।**

**अर्थ :-** खोट्या अथवा मिथ्या कल्पना करून हा जीव नरकादींमध्ये पडतो. ज्याप्रमाणे वेळूच्या वनात वेळूंच्या स्वतःच्या घर्षणांनी अग्नी उत्पन्न होतो व त्याच वनाला भस्मसात करतो त्याप्रमाणे पशूजीवाच्या स्वतःपासून उत्पन्न झालेल्या दोषांनी अर्थात् मायामयभावांनी अविद्योपभोगयुक्त मायिक-देह धारण करून जीव श्रीशिवज्ञान होईपर्यंत दुःख भोगतो.

**विवरण :-** अग्नीने जाळलेल्या बांबूप्रमाणे खोट्या कल्पनांच्या रचनायुक्त स्वसंघट्टापासून उत्पन्न होणाऱ्या कामादि दोषांनी नरकातील दुःख भोगल्यानंतर असत्य भोगसमूहांचा संभोग घेण्यासाठी पशुतुल्य जीव भोगाच्या आश्रयाचे ग्रहण करतो. परत परत तेच घडल्याने एका दुःखातून दुसरे दुःख असे सतत घडत राहते. हे सर्व सर्वश्रेष्ठ अशा श्रीशिवज्ञानाची प्राप्ती होईपर्यंत असेच राहते, असा याचा आशय आहे.

**मायामयैः सदा भावैरविद्यां परिभुञ्जते।**
**मायामयीं तनुं यान्ति ते जनाः क्लेशभाजनम्।।**

**अर्थ :-** मायायुक्त कल्पनांमुळे अशी ही माणसे अविद्येची फळे भोगतात. त्यांना मायेने युक्त असणारे शरीर प्राप्त होते आणि ते त्यांच्या त्यांच्या कृतीनुसार दुःखे भोगतात.।।४०।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

अशा प्रकारे आत असणाऱ्या भावपदार्थांचेच बाहेर प्रसरण होते.।।१६८।।

ते कशामुळे होते ते श्रीगिरिजापती श्रीशिवांनी "**अभिलाषाद्बहिर्गतिः संवाह्यस्य।।४०।।**" या सूत्रात कथन केले आहे.।।१६८.५।।

आत्म्याची स्वतःच्या बलाच्या उद्रेकाने क्रिया पूर्ण करण्याची।।१६९।।

जी इच्छा तीच अभिलाषा होय. या अभिलाषेमुळे चक्षुःश्रोत्रादि इंद्रियांची अर्थात् दुसरीकडे नेली जात असणाऱ्या संवाह्याची म्हणजेच इंद्रियांची बाहेरील

विषयांकडे गती होते.।।१७०।।

म्हणजेच ही इंद्रिये आपापली कामे करण्याला प्रवृत्त होतात. आत्म म्हणजेच स्वबलाने प्रेर्य अशा इंद्रियांची जी अभिलाषा आहे त्या अभिलाषेलाही संवाह्य असे म्हटले आहे.।।१७१।।

काकाक्षिन्यायाप्रमाणे म्हणजे कावळ्याचे एक बुबुळ दोन गोलकांमध्ये फिरते त्याप्रमाणेच इंद्रिये आणि विषय ही दोन्हीही संवाह्य होत. या पशुरूप जीवाची ही सर्व विषयातली सृष्टी करण्याची अभिलाषा आहे.।।१७२।।

या अभिलाषेमुळे कर्मयुक्त इंद्रियांची बाह्यगती होते. स्वस्वरूपाचा पूर्णपणे त्याग किंवा विषयांमध्ये गती होणे म्हणजे बहिर्गती अर्थात् स्वरूपपरित्याग किंवा प्रसरण होय.।।१७३।।

त्यामुळे म्हणजे अभिलाषेमुळे येथे संवाह्यांची म्हणजेच इंद्रियांची गती बहिर्मुख होऊन तिचे प्रसरण होते. ज्यावेळेला हा पशू अर्थात् जीव विषयादींकडून खेचला जातो।।१७४।।

त्यावेळेला दुरभिलाषा नावाचा मोह उफाळून येतो.।।१७४.५।।

**विवरण :-** स्वात्मवीर्याचे अतिक्रमण केल्यामुळे अधरावस्थेतही दर्शनश्रवणादि क्रिया करण्याची इच्छा करणाऱ्या आत्म्याची ज्ञान व कर्मेंद्रियां-मध्ये चिद्बल ठेवण्याची जी इच्छा असते तिलाच अभिलाषा असे म्हणतात. ती अभिलाषा संवाह्य या नावाने ओळखल्या जाणाऱ्या इंद्रियसमूहांना प्रेरणा देण्यात येत असल्याने त्या इंद्रियांची शब्दस्पर्शादि विषयांमध्ये प्रवृत्ती होते.।।४०।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**अभिलाषाद्बहिर्गतिः संवाह्यस्य।।४०।।**" या सूत्रानुसार "संवाह्य म्हणजे अविद्येत राहणारा व एका योनीतून दुसऱ्या योनीत नेला जाणारा कर्मात्मरूप पशू होय." त्याच्या ठिकाणी मी अपूर्ण आहे अशी अविद्यामूलक अभिलाषा किंवा वृत्ती निर्माण झाली असता त्याला मलाच्या कारणामुळे बहिर्गतीने विषयोन्मुखता येते. अंतर्मुख होणे अथवा स्वस्वरूपात लीन होणे हे त्याच्याबाबतीत कधीच होत नाही.।।४०।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य ही तुर्ययुक्त अवस्था आतमध्ये नीट ज्ञात करून घेत नाही अर्थात् चित्तात त्याचा सूक्ष्म विचार करीत नाही त्या-वेळेला देहाचा अहंकार धारण करणाऱ्या व।।१७३।।

आणवमलाने युक्त अशा अपूर्ण मानण्याच्या अभिलाषेमुळे "**अभिलाषा-**

**द्बहिर्गतिः संवाह्यस्य।।४०।।"** या सूत्रानुसार जीवाला बाह्यगती मिळते. ।।१७३.५।।

कलेपासून धरणीपर्यंत शक्तींच्या समूहाने ताब्यात घेतलेल्या तत्त्वांनी ।।१७४।।

एका योनीतून दुसऱ्या योनीत नेला जाणारा अर्थात् एका जन्मातून दुसऱ्या जन्मात नेला जाणारा संवाह्य पशू अर्थात् जीव म्हणून ओळखावा. त्या त्या स्वकर्मानुसार जीवाच्या आणवमलाकारामुळे व।।१७५।।

मी अपूर्ण आहे अशा प्रकारच्या अभिलाषेमुळे अशा जीवाला विषयांचीच ओढ अथवा प्रेम वाटू लागते. त्याला तत्त्वाची जवळीक साधत नाही. ।।१७६।।४०।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

ज्यावेळेला योगनिष्ठ महापुरुष आंतरिक अनुत्तररूपतुर्यात्मक श्रीशिवदशेची आत्मस्वरूपाने भावना करीत नाही त्यावेळेला तो देहादिप्रमातृत्वभावाने न्यूनता मानणाऱ्या आणवमलामुळे बाहेर जातो असे **"अभिलाषाद्बहिर्गतिः संवाहस्य।।४०।।"** या सूत्रात सांगितले आहे. पृथ्वीपर्यंतच्या कलेने युक्त शक्तिचक्रांनी आक्रांत केलेल्या तत्त्वांनी एका योनीतून दुसरी योनी प्राप्त करणाऱ्याला संवाह्य म्हणजेच कर्मात्मरूप पशू अर्थात् जीव असे म्हणतात. त्या जीवपशूच्या त्या त्या कर्माला अनुसरून असणाऱ्या अभिलाषेमुळे व स्वतःला अपूर्ण मानण्यामुळे अर्थात् बाध्य करणाऱ्या आणवमलामुळे त्याची बहिर्गती होते. याचे कारण वृत्ती विषयांकडे सतत वळते हे असून आंतरिक तत्त्व गोळा करणे किंवा एकत्र आणणे हे त्या साधकभक्तयोगिशिष्याकडून होत किंवा घडत नाही. याचा आशय असा आहे की, जर साधकभक्तयोगिशिष्य चमत्काररूप तुर्यात्मिका दशेपासून शरीर व इंद्रिये आदि क्षणभंगुर वस्तूंमध्ये पतित होत असेल आणि त्याच्यामध्ये तादात्म्याच्या खोट्या आरोपाने मीच त्या वस्तू आहे असा अहंकारयुक्त अभिमान धरीत असेल तर स्वतःला अपूर्ण मानण्याच्या या अभिलाषेने जन्मोजन्मी भ्रमण करण्याचा स्वभाव असणाऱ्या या कर्मात्मक जीवपशूची केवळ बाहेरच गती होते.

यासंबंधी **"श्रीपंचदशी"** या ग्रंथात श्रीविद्यारण्यपादाचार्यांनी असे म्हटले आहे की -

**कुर्वते कर्मभोगाय कर्म कर्तुं च भुञ्जते।**<br>**नद्या कीटा इवावर्तादावर्तान्तरमाशु ते।।**

**व्रजन्तो जन्मनो जन्म लक्षते नैव निवृत्तिम्।।३०।।**

**अर्थ :-** हे अज्ञानी जीव कर्म भोगण्यासाठी कर्म करतात आणि कर्म करून ते भोगतात. अशा प्रकारे नदी अथवा कीटकांप्रमाणे एका आवर्तनातून दुसऱ्या आवर्तनात ते लवकर लवकर फिरतच राहतात. अशा रीतीने एका जन्मातून दुसऱ्या जन्मात फिरत राहिल्यामुळे त्यांना कधीही मोक्ष मिळत नाही.।।३०।।

परंतु अशा प्रकारच्या जन्ममरणचक्रपरंपरेतून सुटकेचा उपाय पुढे सांगितला आहे.

**सत्कर्मपरिपाकात्ते करुणानिधिनोद्धृताः।**
**प्राप्य तीरतरुच्छायां विश्राम्यति यथासुखम्।।३१।।**

**अर्थ :-** परंतु जीवांनी केलेल्या सत्कर्माचा परिणाम म्हणून करुणापूर्ण श्रीपरमेश्वर त्यांचा म्हणजे साधकभक्तयोगिशिष्यांचा उद्धार करतो आणि अशा प्रकारे काठावरच्या झाडाच्या सावलीचा आश्रय प्राप्त केलेले ते जीव सुखाने विश्रांती घेतात.।।३१।।

**उपदेशमवाप्यैवमाचार्यतत्त्वदर्शिनः।**
**पञ्चकोशविवेकेन लभन्ते निर्वृत्तिं पराम्।।३२।।**

**अर्थ :-** खऱ्या तत्त्वाचे ज्ञान झालेल्या श्रीसद्गुरूंकडून उपदेश प्राप्त करून घेतल्यानंतर व पंचकोशांचा अखंड विवेक अर्थात् विचार केल्यानंतर त्यांना अर्थात् साधकभक्तयोगिशिष्यांना श्रेष्ठ निर्वृत्तीची म्हणजेच मोक्षाची प्राप्ती होते.।।३२।।

साधकभक्तयोगिशिष्य तत्त्वाच्या विवेकाने परानिवृत्ती अर्थात् मोक्ष प्राप्त करतात आणि अशा प्रकारे सर्व प्रकारांनी कर्मरूप पाशांमधून मुक्त होतात. त्याच्या अभावी मात्र ते बंधात बांधले जातात आणि संवाह्य होतात.

**विवरण :-** संवाह्य या पदाचा अर्थ प्रमेय, ज्ञेय अथवा ध्येयाची अभिलाषा करणारा साधकभक्तयोगिशिष्य असा गृहित धरला पाहिजे. "श्रीशिवसूत्रविमर्शिनी" मध्ये संवाह्य याचा अर्थ जीव असा घेतला आहे. त्यामुळे साधकभक्तयोगिजीव-शिष्याला जीवत्व किंवा अणुत्व असल्याकारणाने त्याचे लक्ष्य ध्येयाभिमुख असते अर्थात् तो ध्येय किंवा ज्ञेय वस्तूंमध्ये सुखाची अभिलाषा करीत असतो.

असा साधकभक्तयोगिशिष्य आपल्याला इच्छित असणारा पदार्थ मिळविण्यासाठी सूक्ष्मदेहद्वारा बाह्यगती प्राप्त करतो. हे करणे अकल्पिता

वृत्तीच्या सिद्धीनंतरच संभव होते. अशा साधकभक्तयोगिशिष्याला परकाया-प्रवेशाची सिद्धीही प्राप्त होते. परकायाप्रवेशाच्या योग्यतेच्या आधी त्याचे जीवन नष्ट होत नाही. सूक्ष्म शरीराहून बाहेर गती झाल्यावरही त्याच्यामध्ये देहासक्ती उरलेली असते. श्रीव्यासऋषी यांनी **"श्रीपातंजलयोगसूत्रे"** या ग्रंथातील विभूतिपादातील त्रेचाळीसाव्या सूत्रावरील टीकेत असे म्हटले आहे की, "या अकल्पिता महाविदेहा नावाची वृत्ती सिद्ध केलेला साधकभक्त-योगिशिष्य परशरीरात प्रवेश करतो आणि त्याच्या प्रकाशस्वरूप बुद्धिसत्त्वावर जे तमोजन्य क्लेशकर्मविपाकाचे आवरण आलेले असते ते नष्ट होऊन जाते."।।४०।।

## सूत्र क्रमांक ४१

**संबंध :-** ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्य श्रीपरमेश्वराच्या शक्तिपाताने उदित अर्थात् उत्पन्न झालेल्या स्वरूपाचाच विमर्श करीत राहतो त्यावेळेला कोणत्याही प्रकारची व्यक्तिगत अभिलाषा न राहिल्याने तो बहिर्मुख न होता आत्म्यात नित्य रमणशील अर्थात् आत्मसुखात निवांत राहतो. या सूत्रात हेच सांगताना असे म्हटले आहे की -

**तदारूढप्रमितेस्तत्क्षयाज्जीवसंक्षयः।।४१।।**

**शब्दार्थ :- तदारूढप्रमितेः** - तत् = तुर्यापद किंवा तुर्यानंद दशेत. तुर्यावस्थेवर ज्याची संवित् म्हणजे ज्ञानशक्ती अर्थात् कुंडलिनी शक्ती किंवा सर्वश्रेष्ठ मीत्वाची जाणीव आरूढ झाली आहे. **तत्क्षयात्** - तत् = अभिलाषा. व्यक्तिगत अभिलाषेचा क्षय झाल्यामुळे. **जीवसंक्षयः** - ज्या पुर्यष्टकामुळे अर्थात् सूक्ष्म शरीरामुळे पशू या जन्मातून त्या जन्मात जातो त्या जीवाचा अर्थात् पुर्यष्टकाचा नाश होतो.

**अर्थ :-** ज्या साधकभक्तयोगिशिष्याची संवित् अर्थात् श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने अंतर्मुखाने जागृत झालेली कुंडलिनी शक्ती स्वतःच श्रीसद्गुरुरूपाने सिद्धयोगसाधन करून व सुषुम्नागामी होऊन सहस्रारात श्रीशिवांशी समरस झाली असेल अर्थात् तुर्यावस्थेत आरूढ होऊन स्थिरपद झाली असेल त्याच्या अभिलाषबुद्धीचा क्षय होऊन त्याच्या पुर्यष्टकरूपी प्रमातृभावाचा म्हणजे सूक्ष्मशरीररूप जीवस्थितीचा नाश होतो.।।४१।।

**विशेष व्याख्या :-** तुर्यदशेत संवित्धामात आरूढ झालेल्या साधकभक्त-योगिशिष्याच्या अभिलाषा क्षीण होत जातात. त्याच्या पुर्यष्टक प्रमातृभावाचे म्हणजेच कर्मांचे ओझे वाहणाऱ्या पशुभावाचे शमन होते. त्याचे सतत

चित्प्रमातृभावातच स्फुरण होत राहते; कारण तो कालग्रास करणाऱ्या समाधीत तत्पर असतो आणि संसारभावातून स्वतःची सुटका करून घेतो.

यासंबंधी "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यथा स्वप्नानुभूतार्थान्प्रबुद्धो नैव पश्यति।**
**तथा भावनया योगी संसारे नैव पश्यति।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे अत्यंत अल्पप्रदेश असलेल्या हृदयात, स्वप्नकाळातच व्यक्त झालेली विचित्र उपवने, नदी, पर्वत, नगर आदींना मनुष्य जागे झाल्यावर पाहू शकत नाही त्याप्रमाणेच सिद्धयोगी चिद्रूपतेच्या स्वतंत्र भावनेमध्ये चिन्मयतेव्यतिरिक्त संसारभाव पाहत नाही किंवा ओळखत नाही.

चिद्रूपभावात स्थिर होताच साधकभक्तयोगिशिष्याचा संसारभाव नष्ट होतो.

अशा प्रकारे कालग्राससमाधीत तत्पर असणारा सिद्धयोगी कैवल्यपदाचा उपभोग घेणारा होतो. त्याला इंद्रिये आणि तन्मात्रांच्या ओझ्याने त्रास होत नाही. त्याचे विकल्पच विमर्श बनतात. तो प्राणापानरूपी जीवकलेतून बाहेर पडतो.।।४१।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

ज्यावेळेला श्रीपरमेश्वराचा शक्तिपात झाल्यामुळे उन्मिषित झालेल्या अथवा व्यक्त झालेल्या स्वस्वभावाचा साधकभक्तयोगिशिष्य विचार करतो त्यावेळेला अभिलाषेचा अभाव असल्यामुळे तो बहिर्मुख होत नाही. उलट तो सतत स्वतःतच रममाण होतो असे "**तदारूढप्रमितेस्तत्क्षयाज्जीवसंक्षयः।।४१।।**" या सूत्रात सांगितले आहे.

**विवरण :-** अपूर्ण मानणाऱ्या आणव मलरूप अभिलाषेने कोणताही परिणाम न झालेल्या आणि बाहेर व आत स्वतःला म्हणजेच चिदानंदघन स्वरूपाला पाहणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्याला हे चित्प्रमात्याचे स्फुरण म्हणजेच स्वात्मारामता प्राप्त होते.

ज्याची संवित् अर्थात् कुंडलिनी शक्ती तुर्यपदावर आरूढ असून आत्मविचार करणारी आहे अशा साधकभक्तयोगिशिष्याची अभिलाषा क्षीण झाल्यामुळे संवाह्य जीवाचा म्हणजेच स्थूलसूक्ष्मादि शरीरांचा अभिमानी असलेल्या जीवाचा जीवभाव क्षीण होतो व त्याच्यात चित्प्रमातृता स्फुरण पावते.

याविषयी "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यथा स्वप्नानुभूतार्थान्प्रबुद्धो नैव पश्यति।**
**तथा भावनया योगी संसारं नैव पश्यति।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे एखादा मनुष्य स्वप्नात पाहिलेल्या गोष्टी परत जागे झाल्यावर पाहत नाही त्याप्रमाणेच आत्मविचार करणारा साधकभक्तयोगि-शिष्य हा संसार हा संसार म्हणून पाहत नाही.

**विवरण :-** ज्याप्रमाणे जीव झोपेच्या काळात हृदयात अत्यंत कमी प्रदेशात अनुभवाला येणाऱ्या विविध प्रकारच्या उपवन, नदी, पर्वत, नगरे आदि भव्य वस्तू वास्तविक जगात पाहू शकत नाही; मात्र प्रबुद्ध म्हणजे जागृत मनुष्य हा स्वप्नातील हे सर्व चिदात्म्याच्या स्वातंत्र्याचे ऐश्वर्य आहे असे मानतो. अशा प्रकारचे जागृतावस्थेत स्वातंत्र्याने पसरविलेले हे सर्व जगत् चैतन्याशिवाय व्यक्तच होत नसल्यामुळे चिदभिन्न व श्रीशिवमय आहे अशा भावनेची निष्पत्ती झाल्यामुळे त्या भावनेनेच या जगाकडे पाहणाऱ्या साधक-भक्तयोगिशिष्याची संसारदृष्टीच नष्ट होते. संवित् अर्थात् श्रीपरमेश्वराशी अविनाभावाने, अद्वयरीतीने, समवायसंबंधाने, संघट्टपणे, अनवच्छेद्यरीतीने, यामलभावाने, एकरसरूपतेने समरस व समव्याप्त असलेली कुंडलिनी शक्ती विचित्रविश्व अवभासित करण्याच्या इच्छेने ग्राहकत्वाचा आश्रय घेऊन ग्राह्यरूपाने स्फुरण पावते. त्यामुळे संवित्स्फुरणाच्या विपरीत किंवा विरुद्ध वागण्यामुळेच ही संसारदृष्टीही निर्माण होते, अविपरीत भावनेमुळे त्या दृष्टीचा नाश होतो व परत स्वात्मैश्वर्य अनुभवाला येते. असा याचा अर्थ आहे.

त्याचप्रमाणे पुढे असे म्हटले आहे की -

**निरस्य सदसद्वृत्तीः संश्रित्य पदमान्तरम्।**
**विहाय कल्पनाजालमद्वैतेन परापरम्।।**
**यः स्वात्मनिरतो नित्यं कालग्रासैकतत्परः।**
**कैवल्यपदभाग्योगी स निर्वाणपदं लभेत्।।**

**अर्थ :-** अस्तित्व आणि नास्तित्व किंवा चांगल्या आणि वाईट वृत्ती नष्ट करून, आंतरपदाचा आश्रय करून आणि अद्वैतविचाराने कल्पनांचा त्याग करून जो स्वात्म्यात रत किंवा मग्न होतो तोच काळाचा घास घेऊ शकतो आणि तोच कैवल्यपदाचा उपभोग घेणारा होऊन निर्वाणपद प्राप्त करतो.

**विवरण :-** नीलसुखादींनी युक्त अशा चांगल्या व वाईट वृत्तींच्या अविकल्प ज्ञानाने आणि पर-अपर दोषांचे प्रसरणनिरसन करून पूर्णा-हंतापदाचा आधार घेऊन स्वात्म्याच्या प्रकृष्ट ज्ञानाने कलायुक्त होऊन "मी जगतो" या कलेपासून आरंभ करून पृथ्वीपर्यंत स्थित असणाऱ्या स्थूल

काळाचा घास करण्यात तत्पर असल्याकारणाने साधकभक्तयोगिशिष्य निर्वाणपदाचा लाभ घेणारा होतो.

कैवल्यपदभाग म्हणजे इंद्रियतन्मात्रांनी कोठेही भटकू न दिला जाणारा अथवा एका योनीतून दुसऱ्या योनीत न नेला जाणारा जीव होय.।।४१।।

**विवरणात्मक टीप :-** आहे आणि नाही आणि भिन्न व अभिन्न या कल्पना म्हणजे मनाच्या विभाजनाच्या क्रिया आहेत. त्या विकल्पातून निर्माण झालेल्या आहेत. या संकुचिततेतून मुक्त झालेला सिद्धयोगी हा मनाने निर्माण केलेल्या भेद इत्यादींच्या पार्श्वभागी हे परमसत्य पाहतो. हे किंवा ते याच्या-मध्येच असलेले यथार्थतत्त्व जाणून घेतो.

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

कर्मात्मा म्हणजे जीव होय. दुष्ट अभिलाषेमुळे या जीवाला कर्मात्मता येते.।।१७५।।

या दृष्ट अभिलाषेच्या नाशानंतर आत्म्याचे काय होते हे "**तदारूढ-प्रमितेस्तत्क्षयाज्जीवसंक्षयः।।४१।।**" या सूत्रात श्रीशिवांनी सांगितले आहे अर्थात् जीवाची दुष्टाभिलाषा नष्ट झाली की, त्याला प्रमिती अर्थात् आत्मज्ञान होते व त्याच्या जीवत्वाचा नाश होतो असे या सूत्राचे सार आहे.।।१७५.५।।

अभिलाषा उत्पन्न झाल्यानंतर पूर्व भूमिका ही द्रष्ट्याची होते.।।१७६।।

त्यावेळेला या अवस्थेत असताना प्रबुद्ध जीव परमार्थज्ञानी होतो. ज्यावेळेला स्वबलाच्या उद्योगाच्या सामर्थ्याने द्रष्ट्याची भूमिका ओलांडली जाते।।१७७।।

त्यावेळेला ज्याच्यात विशेष ज्ञान आरूढ झालेले आहे असा हा प्रमाता प्रबुद्ध म्हणविला जातो. त्या प्रमात्याची ही प्रमिती म्हणजे ज्ञान म्हणजेच संवित् ज्ञान होय.।।१७८।।

त्या आरूढप्रमितीमुळे म्हणजेच ज्ञानामुळे अभिलाषेचा क्षय होतो. त्या क्षयामुळे जीव नामक कर्मात्म्याचाही क्षय होतो.।।१७९।।

**विवरण :-** अशा रीतीने दुष्ट इषणारूप मर्यादित अहंतेच्या संयोगाने येणाऱ्या मोहाच्या अनुभवामुळे कदाचित् पूर्वीच्या चांगल्या कर्मांच्या संचया-मुळे शक्तिपात झाल्यास हा जीव श्रीशैवशासनाचा ज्ञानी होतो. तो द्रष्ट्याच्या भूमिकेत जातो. तेथील ज्ञानाने खेचरी, गोचरी, दिक्चरी व भूचरी आदि सिद्धींनी पशुकार्य टाकून कंचुकांपासून तन्मात्रांपर्यंत बाह्यांतर स्वसंवित्-किरणांनी प्रकाशित असे स्वानंदरूप पाहत पाहत ज्यावेळेला ती पाशव

अभिलाषा टाकतो त्यावेळेलाच संवाह्ययुक्त पुर्यष्टकाचा नाश होतो.।।४१।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**तदारूढप्रमितेस्तत्क्षयाज्जीवसंक्षय:।।४१।।**" या श्रीशिवांनी प्रतिपादित केलेल्या सूत्राचा अर्थ असा आहे की, त्या तुर्यपदात ज्या साधकभक्तयोगि-शिष्याची विमर्शात मग्न असणारी प्रमिती म्हणजेच संवित् अर्थात् ज्ञानशक्ती आहे तिची अभिलाषा म्हणजे बाह्यवृत्ती ज्यावेळेला क्षीण होते त्यावेळेला पुर्यष्टकाचा ज्ञातृभाव, संवाह्यता व जीवभाव नाहीसा होतो. याचाच भावार्थ असा आहे की, तो साधकभक्तयोगिशिष्य चिन्मात्ररूपाने स्फुरतो.।।४१।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

ज्यावेळेला साधकभक्तयोगिशिष्याला म्हणजे त्या अपूर्ण जीवाला श्रीमहेशांनी केलेल्या शक्तिपाताच्या सामर्थ्यामुळे प्रकट झालेले आत्मरूप अर्थात् स्वस्वरूप दिसू लागते त्यावेळेला मात्र त्याची।।१७७।।

अभिलाषा नष्ट होते व त्यामुळे त्याची विषयांकडील गती बंद होते व त्याच्या "**तदारूढप्रमितेस्तत्क्षयाज्जीवसंक्षय:।।४१।।**" अर्थात् "ज्ञातृत्व-प्राप्तीने अभिलाषेचा क्षय आणि त्यामुळे जीवभावनेचा नाश होतो," असे या सूत्रात सांगितलेली स्वात्मारामता प्राप्त होते असे सांगितले जाते.।।१७८।।

त्यानंतर ज्ञातृस्वरूपात संलग्न झालेली संवित् अर्थात् बुद्धी आत्मविचारात तत्पर होते.।।१७९।।

त्याची म्हणजेच वरती सांगितलेल्या आणवमलयुक्त जीवाची अभिलाषा नष्ट होते. त्यामुळे पुर्यष्टकाचा अभिमानी असणाऱ्या जीवभावाचाही खराखुरा नाश होतो.।।१८०।४१।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

ज्यावेळेला परत हा योगिपुरुष श्रीमहेशांनी कृपा करून केलेल्या शक्ति-पातामुळे उन्मिषित झालेल्या किंवा प्रकट झालेल्या आत्म्याच्या स्वरूपाचा परामर्श करतो त्यावेळेला त्याच्या ठिकाणी कोणतीही अभिलाषा उत्पन्न होत नाही आणि त्यामुळे त्याची बहिर्गती होण्याचीही शक्यता उरत नाही. उलट तो स्वात्मस्वरूपात रमून जातो, असे "**तदारूढप्रमितेस्तत्क्षयाज्जीवसंक्षय: ।।४१।।**" या सूत्रात प्रतिपादन केले आहे.

पूर्वी सांगितलेल्या चिदानंदचमत्काररसामृत तुर्यातीत पदात म्हणजेच संवित्परामर्शात विश्वाच्या पलीकडे गेलेला व निजाहंतेत चित्त समाविष्ट झालेल्या सुप्रबुद्ध सिद्धयोग्याचा स्वत:ला अपूर्ण मानण्याच्या स्वरूपाचा असलेला

आणवमल म्हणजेच अभिलाषा संपल्यामुळे त्याची जीवभावना, संवाह्यरूप कर्मात्मता आणि पुर्यष्टक प्रमातृता या केवळ शांत होतात असे नसून तो नेहमी चिन्मात्ररूपानेच स्फुरण पावतो.

यासंबंधी "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यथा स्वप्नानुभूतार्थान् प्रबुद्धो नैव पश्यति।**
**तथा भावनया योगी संसारं नैव पश्यति।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे जागृत अवस्थेतला माणूस स्वप्नातल्या गोष्टींना खरे म्हणून पाहत नाही त्याचप्रमाणे त्याच भावनेने सिद्धयोगी संसारालाही सत्य म्हणून पाहत नाही.

ज्याप्रमाणे स्वप्नावस्थेत अत्यंत कमी अंशामध्ये चित्रविचित्र प्रकारे अनुभवलेल्या पर्वत, गुहा, नद्या, समुद्र, बागा, नगरे इत्यादि वस्तू परमार्थतः नसूनही त्या त्या आभासांना जागृत जीव चिदात्म्याच्या स्वातंत्र्य शक्तीचा विलास आहे असे मानतो त्याचप्रमाणे जाग्रतावस्थेत स्वातंत्र्याने उद्भासित केलेल्या चिद्रूपत्वाचे अवभासन न झाल्यामुळे चित्शी अभिन्न स्वरूपात असणाऱ्या श्रीशिवमय विश्वाचे भावनेच्या पूर्ण उत्पत्तीने पर्यालोचन करणाऱ्या साधकभक्तयोगिशिष्यपुरुषाच्या संसारदृष्टीचा विलोप होतो. संविच्छक्ती मात्र विश्ववैचित्र्याचा आभास निर्माण करण्याच्या इच्छेने ग्राहकरूपतेचा आश्रय घेऊन ग्राह्यरूपाने स्फुरण पावते. अशा प्रकारे संवित्स्फुरणाच्याच विपरीत किंवा विरुद्ध भावनेने संसारदृष्टी येते तर अविपरीतत्वाने भावनेचे आधिक्य होऊन त्याचा लोप होतो आणि पुन्हा स्वात्मैश्वर्यचमत्कार निर्माण होतो.

यासंबंधी शास्त्रात असे म्हटले आहे की -

**निरस्य सदसद्वृत्तीः संश्रित्य पदमान्तरम्।**
**विहाय कल्पनाजालमद्वैतेन परापरम्।**
**यः स्वात्मनिरतो नित्यं कालग्रासैकतत्परः।।**
**कैवल्यपदभाग्योगी स निर्वाणपदं लभेत्।।**

**अर्थ :-** सत् आणि असत् किंवा चांगल्या आणि वाईट अशा दोन्हीही वृत्तींचा त्याग करून, आंतरपदाचा आश्रय घेऊन व अद्वैताने परापर कल्पनाजाळ्याचा त्याग करून जो नित्य कालाचा ग्रास करण्यात तत्पर व स्वात्म्यात रत होतो तोच कैवल्यपदाचा उपभोग घेणारा सिद्धयोगी निर्वाणपद मिळवितो.

**विवरण :-** चाळीसाव्या सूत्रात असे सांगितले आहे की, जर साधकभक्तयोगिशिष्य इच्छासक्त असेल तर तो बहिर्मुख होतो आणि त्याच्या सूक्ष्म

शरीरात शिल्लक असलेल्या त्याच्या अभिलाषांच्या संस्कारांमुळे तो एका रूपातून अर्थात् जन्मातून दुसऱ्या रूपात अर्थात् दुसऱ्या जन्मात नेला जातो. सुखाच्या विषयांना चिकटून राहणे हे मुक्तीच्या शोधात असणाऱ्या साधकांच्या मार्गात विघ्ने आणणारे ठरते.

प्रस्तुतच्या सूत्रात हाच धागा पुढे नेताना असे म्हटले आहे की, साधकभक्त-योग्याच्या नशिबी असे एखाद्या चेंडूप्रमाणे एका जन्मातून दुसऱ्या जन्मात जाणे होत नाही. जर त्याने अभिलाषांचा त्याग केला आणि तो अलौकिक अवस्थेत मूळ धरून राहिला तर तो संकुचित अणुत्व अथवा जीवत्वाच्या स्थितीतून उच्च अवस्थेला येतो आणि निर्वाणाचा अधिकारी होतो. या तत्त्वज्ञानात निर्वाण म्हणजे श्रीशिवशक्तिसामरस्य होय. ही सामरस्यावस्था म्हणजेच जेथे विषय-विषयी अथवा ज्ञेय-ज्ञाता यांच्या द्वैताचा पूर्णपणे व कायमचा नाश होतो अशी अविभक्त अवस्था होय.

अशा रीतीने प्रमाण, प्रमेय व प्रमिती यांच्यामुळे योगारूढ सिद्धयोग्याची बहिर्गती होते आणि त्याच्या प्रमितीच्या कार्यरूप अभिलाषेचा क्षय झाला असता जीवभावाचाही पूर्णपणे क्षय होतो.।।४१।।

### सूत्र क्रमांक ४२

**संबंध :-** आता प्रश्न असा निर्माण होतो की, जीवभाव नष्ट झाला असता देह पडला पाहिजे; परंतु या सुप्रबुद्ध सिद्धयोग्याचा देह तर तसाच अस्तित्वात राहतो. अशा अवस्थेत तो संवित्धामात अर्थात् तुर्यावस्थेत आरूढ कसा काय राहू शकतो? याला उत्तर देताना श्रीशिव असे म्हणतात की -

**भूतकञ्चुकी तदा विमुक्तो भूयः पतिसमः परः।।४२।।**

**शब्दार्थ :- भूत-कञ्चुकी** - शरीर ज्याचे बनलेले असते ती महाभूते अथवा भूतात्मक शरीर ज्याला प्रावरण अर्थात् कञ्चुकासारखे अर्थात् आवरणरूप पोषाखासारखे असते म्हणजे जो शरीरापेक्षा निराळा असतो. **तदा** - तेव्हा म्हणजे अभिलाषेचा क्षय झाल्यावर. **विमुक्त** - निर्वाणपद प्राप्त झालेला किंवा मुक्त अर्थात् सिद्धयोगी. **भूयः** - अभ्यासाच्या बाहुल्याने बराचसा. **पतिसमः** - श्रीशिवांसारखा. **परः** - श्रेष्ठ किंवा पूर्ण होतो.

**अर्थ :-** ज्यावेळेला अभिलाषेचा नाश होतो त्यावेळी तो सिद्धयोगी आपले पंचमहाभूतात्मक शरीर प्रावरणासारखे वापरतो व विमुक्त झालेला तो सिद्धयोगी सिद्धयोगाचा दीर्घकाल, निरंतर व श्रद्धाभक्तिआदरसत्कारपूर्वक अभ्यास केल्याने बह्वंशी श्रीपरमशिवांसारखा होतो.।।४२।।

**विशेष व्याख्या :-** अभिलाषा नष्ट झाल्यावर अर्थात् जीवभावाचा लय झाला की, पुर्यष्टक अर्थात् पाच ज्ञानेंद्रिये, मन, बुद्धी व अहंकाररूप प्रमातृता नष्ट होऊन जाते. त्यावेळेला ज्याप्रमाणे एखादा साधारण मनुष्य आपल्या शरीरावर चादर ओढून घेतो त्याप्रमाणे सिद्धयोगी आपले शरीर राखून ठेवतो. या पुर्यष्टकालाच मग भूतकंचुकी असे म्हणतात. सिद्धयोगी पंचमहाभूतांपासून बनलेल्या शरीराला आवरणासारखे किंवा पोषाखाप्रमाणे धारण करतो. तो आपल्या शरीराबरोबर अहंता जोडत नाही. त्याचा कल्पित पुर्यष्टक आदि शरीरावर पशुजनांप्रमाणे असलेला परिमित अहंभाव नष्ट होतो. असा सिद्धयोगी मुक्तीचा भोग घेणारा बनतो; कारण त्याच्यामध्ये चिद्घनरूप श्रीपरमेश्वराच्या स्वरूपाचा आवेश झालेला असतो. त्यामुळेच तो पूर्णस्वरूप बनतो. श्रीशिवभावात स्थिर झालेल्या या जीवन्मुक्त सिद्धयोग्याच्या शरीरात जीवनाच्या सामान्य नियमांनुसारच स्थिती असते. या दृष्टीनेच या उन्मेषाच्या सव्विसाव्या सूत्रात असे म्हटले आहे की, "**शरीरवृत्तिर्व्रतम् ।।३.२६।।**"

ज्याप्रमाणे सापाला आपण टाकलेल्या जुन्या कातीची अहंता किंवा अभिमान आदि असत नाही त्याचप्रमाणे या श्रीशिवयोग्याने श्रीशिवस्वरूपाबद्दल गहन किंवा खोल अभ्यास केल्याने त्याचे फळ म्हणून त्याच्या ठिकाणी आपल्यापासून पृथक् अर्थात् वेगळ्या असलेल्या देहादींबद्दल प्रमातृतेच्या अभिमानाचा अभाव असतो अथवा असे म्हटले तरी चालेल की, ज्याप्रमाणे तलवार म्यान होत असूनही म्यान ही तलवारीहून वेगळी असते त्याप्रमाणेच देहभाव नष्ट झाल्याने सिद्धयोग्याला त्याचा प्रमातृभाव अर्थात् अभिमान कधीच स्पर्श करीत नाही. तो विश्वात्मा श्रीशिवांशी सामरस्य प्राप्त करतो.

अद्वैताचे प्रतिपादन करणाऱ्या "**श्रीभैरवतंत्र**" अर्थात् "**श्रीकुलरत्नमाला**" या ग्रंथात यासंबंधी असे म्हटले आहे की -

**यदा गुरुवरः सम्यक् कथयेत्तन्न संशयः।**
**मुक्तस्तेनैव कालेन यन्त्रस्तिष्ठति केवलम्।।**
**किं पुनश्चैकतानस्तु परे ब्रह्मणि यः सुधी।**
**क्षणमात्रस्थितो योगी स मुक्तो मोचयेत्प्रजाः।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला शक्तिपातयोगदीक्षेच्या वेळी श्रीसद्गुरू एखाद्या सच्छिष्याला आवेशापर्यंत श्रीशिवभावाची प्राप्ती करवून देतात त्यावेळेला निःसंदेह तो त्याच वेळेला मुक्त होतो आणि आपले शरीर केवळ यंत्राप्रमाणे

धारण करतो. मग जो परब्रह्मस्वरूपात अनन्यवृत्ती झालेला असतो अशा सुबुद्ध शिष्याबद्दल काय सांगावे? असा साधकभक्तयोगिशिष्य क्षणभर जरी स्वरूपात स्थित होईल तरी तो मुक्त होईल आणि सर्व प्रजेलाही मुक्त करील.

**"वेदान्त सिद्धान्त मुक्तावली"** या ग्रंथात असेच विचार बघावयाला मिळतात.

**स्नातं तेन समस्ततीर्थसलिले दत्ता च सर्वावनि-**
**र्यज्ञानां च कृतं सहस्रमखिलाः देवश्च सन्तर्पिताः।**
**संसाराच्च समुद्धृताः स्वपितरः त्रैलोक्यपूज्योऽप्यसौ**
**यस्य ब्रह्मविचारणे क्षणमपि स्थैर्यं मनः प्राप्नुयात्।।**

**अर्थ :-** ज्या कोणत्याही साधकभक्तयोगिशिष्याचे मन एका क्षणासाठीही परब्रह्माच्या विमर्शात स्थिरता प्राप्त करून घेते त्याने वस्तुतः समस्त पुण्यतीर्थांचे स्नान केल्याप्रमाणे आहे, सर्व पृथ्वीला दान दिल्याप्रमाणे आहे, हजारो यज्ञांचे कर्मफल प्राप्त केल्याप्रमाणे आहे, सर्व देवतांना प्राप्त केल्याप्रमाणे आहे आणि आपल्या पितरांना भवपाशातून उद्धरिल्याप्रमाणे आहे. असा सिद्धयोगी सर्व जगताला पूजनीय आहे.।।४२।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

अशा प्रकारे सिद्धयोग्याचा जीवभाव नष्ट झाला असता त्याचा देहपात मात्र होत नाही. स्वप्नातून जागृत झालेल्या मनुष्याचा अथवा ज्ञानी मनुष्याचा देहपात लगेचच झालेला आहे असे अनुभवावयाला येत नाही; मग या तुर्यारूढ ज्ञानी योग्याचे काय होते? या शंकेला **"भूतकञ्चुकी तदा विमुक्तो भूयः पतिसमः परः।।४२।।"** या सूत्रात उत्तर दिले आहे.

तेव्हा म्हणजे अभिलाषा अर्थात् आणवमल नष्ट झाला असता पुर्यष्टकप्रमातृतेचा अभिमान नष्ट होऊन जीवभाव नष्ट होतो आणि हा सिद्धयोगी पंचमहाभूतांचा कंचुकाप्रमाणे म्हणजेच पांघरुणाप्रमाणे उपयोग करतो; कारण ही पंचमहाभूते देहाला उत्पादन करणारी द्रव्ये आहेत. त्याचप्रमाणे ती पंचमहाभूते पुर्यष्टकांनी कल्पिलेल्या शरीरात पशुजनांप्रमाणे परिमित अहंभावनेचा किंवा मी संकुचित किंवा अज्ञानी आहे अशा विचारांचा नाश झाल्यामुळे अहंतापदाला स्पर्श करणारी नसतात. हा सिद्धयोगी अशा प्रकारचा होऊन तो विमुक्त किंवा निर्वाण भोगणारा होतो. तो बहुशः चिद्घन-पारमेश्वरस्वरूपात प्रविष्ट झालेला असल्यामुळे अर्थात् तो श्रीशंकरांप्रमाणेच असल्यामुळे पूर्णच असतो; कारण तो **"शरीरवृत्तिर्व्रतम्।।३.२६।।"** या

सूत्रात सांगितल्याप्रमाणे म्यानासारख्या या देहरूप कवचात राहूनही देहावरील प्रमातृतेच्या म्हणजे ज्ञात्याच्या संस्काराने एवढासाही स्पर्शिला जात नाही.

**विवरण :-** दल म्हणजे जुनी कात. ज्याप्रमाणे टाकलेल्या त्वचेत साप अहंताभिमान किंवा ही कात म्हणजे मीच आहे असा अभिमान ठेवीत नाही त्याप्रमाणे श्रीशिवज्ञानाच्या अभ्यासाने देह व मी म्हणजे आत्मा हे वेगळे आहेत असा विचार दृढ झाल्यामुळे ज्ञान्याला अहंताभिमान असत नाही. ज्याप्रमाणे म्यान ही तलवारीवाचून वेगळी असते त्याप्रमाणे वेगळ्या असणाऱ्या देहाच्या बाबतीत सिद्धयोग्याला अहंताभिमान स्पर्श करीत नाही.

या विषयी "**श्रीकुलरत्नमाला**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**यदा गुरुवरः सम्यक् कथयेत्तत्र संशयः।**
**मुक्तस्तेनैव कालेन यन्त्रस्तिष्ठति केवलम्।।**

**अर्थ :-** ज्यावेळेला उत्तम व श्रेष्ठ श्रीसद्गुरुदेव आपल्या शिष्याला चैतन्याविषयी संपूर्ण ज्ञान देतात अर्थात् शक्तिपातयोगदीक्षा देऊन ज्ञानरूप कुंडलिनी जागृत करून सहस्रारात प्राप्त होणाऱ्या श्रीशिवशक्तिसामरस्याचा सुषुम्नामार्ग मोकळा करून देतात त्यावेळेला तो निःसंशयपणे त्याच क्षणी मुक्त होतो आणि शरीरात एखाद्या यंत्राप्रमाणे स्थित असतो.

**किं पुनश्चैकतानस्तु परे ब्रह्मणि यः सुधीः।**
**क्षणमात्रस्थितो योगी स मुक्तो मोचयेत्प्रजाः।। श्रीभैरवतंत्र।।**

**अर्थ :-** जो ज्ञानी परब्रह्मात एकाग्र अर्थात् अनन्यवृत्ती होतो म्हणजे एका परब्रह्माशिवाय ज्याचे विचार इतरत्र जात नाहीत असा होऊन राहतो तो तेथे क्षणभर जरी स्थिर राहिला तरी तो सिद्धयोगी स्वतः तर मुक्त होतोच; पण इतरांनाही मुक्त करतो.

"**श्रीमृत्युजित्तंत्र**" या ग्रंथातही असे म्हटले आहे की -

**निमेषोन्मेषमात्रं तु तत्त्वं यद्युपलभ्यते।**
**तदेव किल मुक्तोसौ न पुनर्जन्म चाप्नुयात्।।**

**अर्थ :-** परमात्मतत्त्व एक निमेष अथवा उन्मेषभर अर्थात् डोळ्याची पापणी उघडणे अथवा मिटणे याला लागणाऱ्या काळाएवढे जरी प्राप्त झाले तरी तो जीव मुक्त होतो आणि त्याला परत जन्म मिळत नाही.

"**श्रीकुलसार**" या तंत्रग्रंथातही असे म्हटले आहे की -

**अहो तत्त्वस्य माहात्म्यं ज्ञातमात्रस्य सुन्दरि।**
**श्रोत्रान्तरं तु सम्प्राप्ते तत्क्षणादेव मुच्यते।।**

**अर्थ :-** हे सुंदरी! या तत्त्वाचे माहात्म्य केवढे तरी मोठे आहे. असे म्हणण्याचे कारण असे आहे की, जर कोणी ते पूर्णपणे आत्मसात् करून म्हणजे पूर्णपणे ज्ञात करून दुसऱ्याला नुसते ऐकविले तरीही तो मुक्त होऊन जातो.।।४२।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

जीवाला बध्य व संसारी पशू असे मानले आहे. पाशराशींचा नाश झाल्यानंतर हा जीव कशा प्रकारचा होतो हे भगवान् श्रीशिवांनी **भूतकञ्चुकी तदाविमुक्तो भूयः पतिसमः परः।।४२।।** या सूत्रात सांगितले आहे.।।१८०।।

पृथ्वी आदि पाच महाभूते म्हणजेच पाशरूप कंचुक होत. कंचुकी म्हणजे आवरण होय. या कंचुकाने म्हणजेच आवरणाने युक्त तो भूतकंचुकी होय.।।१८१।।

अविमुक्त म्हणजे बद्ध होय. तो जीव परत पूर्वोक्त प्रकाराने सर्वज्ञ आणि सर्वकृत् भूमीवर आरूढ झाला की, तो पतितुल्य म्हणजे श्रीशिवांसारखा होतो।।१८२।।

यात कोणताही संशय नाही. स्वानुभवाने हे ज्ञेय होईलच.।।१८२.५।।

**विवरण :-** अशा प्रकारे जरी अभिलाषात्मक मलाचा पूर्णपणे क्षय झाला, भौतिकदेहाच्या संबंधामुळे अविमुक्तता म्हणजेच बद्धता भासली व सर्वज्ञातृत्व आणि सर्वकर्तृत्व भूमिकेत रूढ होऊन निरंतरपणे अनुत्तर अर्थात् सर्वांपेक्षा श्रेष्ठ, चिदानंदाने परिपूर्ण अशी स्वात्मशिवता अनुभवीत बंधनात टाकणारा पशुभाव गेला तरीही देहकला न गळल्यामुळे हा जीव श्रीशिवांसारखा होतो. तो श्रीशिवच होत नाही; कारण देहपातानंतर त्याला तो भाव प्राप्त होतो.।।४२।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**भूतकञ्चुकी तदा विमुक्तो भूयः पतिसमः परः।।४२।।**" या सूत्राद्वारा श्रीशिव असे सांगतात की, "त्यावेळेला म्हणजे अभिलाषा नष्ट झाल्याने जीव-भाव नष्ट झाला की, म्हणजेच पुर्यष्टकयुक्त प्रमातृतेचा अभिमान विगलित झाला असता हा सिद्धयोगी केवळ भूतकंचुकी होतो." त्याला फक्त भूतनिर्मित देहावरणच शिल्लक राहते. त्या देहावरणाला तो अहम् अर्थात् मी अथवा माझे असे म्हणत नाही. तो तसा झाला की, मोक्षाचा अथवा मुक्तीचा अधिकारी होतो; कारण तो अधिकाराने चिद्धन अशा पारमेश्वरस्वरूपात प्रविष्ट झालेला असतो. त्यामुळेच तो पूर्ण होतो. "**शरीरवृत्तिर्व्रतम्।।३.२६।।**" या सूत्रानुसार

अंशरूप देहादिकात जरी सिद्धयोग्याचे वास्तव्य असले तरी त्या देहादींबद्दल प्रमातृता, ज्ञातृता व अहंता यांचा स्पर्श त्याला होत नाही.।।४२।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

अशा रीतीने जीवक्षय झाला की, त्या सिद्धयोग्याचा देहपातही होतो असे जरी वाटले तरी।।१८१।।

पण कोणत्याही सिद्धयोग्याचा तसा देहपात झाल्याचे दिसत नाही. मग साधक तत्त्वज्ञानी होतो का?।।१८२।।

या प्रश्नाला उत्तर देताना विश्वगुरू भगवान् श्रीशंकर "**भूतकञ्चुकी तदा विमुक्तो भूयः पतिसमःपराः।।४२।।**" या सूत्रात असे म्हणतात की, त्यावेळेला म्हणजे अभिलाषा नष्ट झाल्यामुळे जीवाचा क्षय होण्याची वेळ आली असताना।।१८३।।

म्हणजेच जरी पुर्यष्टकज्ञातृभावाचा अभिमान क्षीण झाला तरी हा सिद्ध-योगी अहंपदाला स्पर्श न करणाऱ्या देहारंभक भूतांना।।१८४।।

वरील कवचाप्रमाणे समजतो म्हणजे त्यापासून वेगळा असल्यासारखा राहतो अर्थात् तो निर्वाण म्हणजेच मोक्षाचा अधिकारी होतो. त्यामुळे तो बहु अंशाने श्रीपरमेश्वर श्रीमहादेवांशी तुल्यच समजावा.।।१८५।।

त्या श्रीपरमशिवरूपात समाविष्ट झाल्याने तो सिद्धयोगी चिदानंदघन-स्वरूप होतो म्हणजेच तो श्रेष्ठ व पूर्ण होतो व देहपातानंतर श्रीशिवांशी तन्मयत्वाला प्राप्त होतो.।।१८६।।४२।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

जर जीवभाव नष्ट झाला तर त्या सिद्धयोग्याचा देहपात होतो व तो परत कोणालाही दिसत नाही, असे असताना तुर्यारूढप्रमिती अर्थात् तुर्यपदात ज्ञान कसे काय होते? याला "**भूतकञ्चुकी तदा विमुक्तो भूयः पतिसमः-पराः।।४२।।**" या सूत्रात उत्तर दिलेले आहे.

तेव्हा म्हणजेच या आधी सांगितलेली अभिलाषा नष्ट झाल्याने प्राण नष्ट झाले असता पुर्यष्टक प्रमातृभाव नष्ट होतो. त्यावेळी ही भूतकुंचकी म्हणजेच देह उत्पन्न करणारी पंचमहाभूते आवरकवस्त्राप्रमाणे अर्थात् पांघरूण घालणाऱ्या कापडाप्रमाणे वेगळी होतात. मात्र ती अहंतापदाला स्पर्श करणारी असत नाहीत; कारण प्रकल्पितपशुजनांप्रमाणे मर्यादित अहंभाव विरून गेल्यानंतर तो सिद्धयोगी मुक्त होऊन निर्वाण भोगणारा होतो. त्यामुळे सिद्धयोगी पशुपती श्रीशंकरांप्रमाणेच होऊन सच्चिदानंदघन श्रीपरमेश्वराच्या स्वरूपात समाविष्ट

होतो. त्यानंतरच तो परिपूर्ण व योग्य प्रकाराने तन्मयत्वाला जातो. ज्याप्रमाणे आपण स्वतः टाकलेल्या त्वचेबद्दल म्हणजेच कातीबद्दल सर्पाला कोणताही अहंताभिमान नसतो त्याचप्रमाणे श्रीशिवपरामर्शाच्या अभ्यासाने देहादींमध्ये भिन्नत्वाने चिंतन होऊनही प्रमातृतेचा अभिमान निर्माण होत नाही. ज्याप्रमाणे तलवारीहून म्यान वेगळी असते त्याप्रमाणे वेगळ्या असणाऱ्या शरीरादींमध्ये असणारा प्रमातृभाव त्या सिद्धयोग्याला कधीही चिकटत नाही.

**विवरण :-** त्यानंतर म्हणजेच जीवभावाचा पूर्णपणे क्षय झाला असता पंचभूते आणि कंचुकी म्हणजेच काल, कला, नियती, विद्या आणि राग यांच्यापासून मुक्त होऊन सिद्धयोगी श्रीपशुपतींसमान श्रीपरशिव होतो. पंचविसाव्या सूत्रात हा सिद्धयोगी श्रीशिवतुल्य होतो असे म्हटले आहे; तर प्रस्तुतच्या सूत्रात श्रीशिवस्वरूप होतो असे म्हटले आहे.।।४२।।

## सूत्र क्रमांक ४३

**संबंध :-** आता परत असा प्रश्न निर्माण होतो की, या परमसिद्धयोग्याचे भूतकंचुक म्हणजे शरीररूपी आवरण सुद्धा स्वरूपलाभाच्या वेळीच का नष्ट होत नाही? याचे उत्तर देताना सूत्रकार असे म्हणतात की -

**नैसर्गिकः प्राणसम्बन्धः।।४३।।**

**शब्दार्थ :- नैसर्गिकः** - निसर्गापासून. श्रीशिवांच्या इच्छास्वातंत्र्यशक्तीमुळे अर्थात् कुंडलिनी शक्तीमुळे झालेला किंवा श्रीपरमेश्वराच्या स्वातंत्र्यशक्तीचा स्वभावच असा आहे. **प्राणसम्बन्धः** - प्राणाशी संबंध किंवा श्वासोच्छ्वासाचे वाहणे.

**अर्थ :-** वैश्विक प्राणशक्तीचा शरीराशी संबंध नैसर्गिक असून तो श्रीशिवांच्या इच्छास्वातंत्र्यशक्तीमुळे व त्या इच्छास्वातंत्र्यशक्तीवर अर्थात् त्यांच्याशी समवायसंबंधाने, अविनाभावाने, संघट्टपणे, अनवच्छेद्यरीतीने, यामलभावाने, एकरसरूपतेने, अद्वयपणे समरस व समव्याप्त असलेल्या प्राणशक्ती कुंडलिनीवर अवलंबून आहे अर्थात् अशा महासिद्धयोग्याच्या जीवनमुक्त शरीरात प्राणांचा संबंध असतो म्हणजे श्वास व प्रश्वासाचे गमनागमन होते; कारण तो श्रीपरमेश्वराच्या स्वातंत्र्यशक्तीचा स्वभाव असतो.।।४३।।

**विशेष व्याख्या :-** श्रीभट्टकल्लटांनी त्यांच्या **"तत्त्वार्थचिंतामणी"** या ग्रंथात अशी गोष्ट युक्तींनी सिद्ध केली आहे की, **"प्राक् संवित् प्राणे परिणता।।"** अर्थात् "संवित् भगवतींनी विश्ववैचित्र्याचे अवभासन करण्याच्या इच्छेने पहिल्यांदा प्राणांना निमित्त बनविले."

आपल्या सहज स्वातंत्र्याने श्रीसंविद्देवींनी प्रपंचाची विचित्रता प्रकट करण्याच्या इच्छेने संकुचितता अथवा मर्यादितपणा स्वीकारला. तिने श्रीशिवदशेतून विसर्गरूपात येऊन सृष्टी, स्थिती आणि संहाररूप जीव-दशेचे ग्रहण केले. अशा प्रकारे सर्व विश्वामध्ये प्राणनशक्तीचे ग्रहण करून ग्राह्यरूप जगतात ती भासमान होऊ लागली. आपल्या स्वातंत्र्यात प्रथम अवभासित झालेल्या संविद्देवींचा हा प्राणस्पंद आहे.

यासंबंधी "**श्रीवाजसनेय**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**या सा शक्तिः परा सूक्ष्मा व्यापिनी निर्मला शिवा।**
**शक्तिचक्रस्य जननी परानन्दामृतात्मिका।।**
**महाघोरेश्वरी चण्डा सृष्टिसंहारकारिका।**
**त्रिवहं त्रिविधं त्रिस्थं बलात्कालं प्रकर्षति।।**

**अर्थ :-** कल्याणस्वरूप, निर्मल, व्यापक, अत्यंतसूक्ष्म, परानंदस्वरूप, अमृतस्वरूप व पराशक्तिरूप श्रीसंविद्देवी शक्तिचक्रांना जन्म देते. ही देवी प्राणांमध्ये परिणत झालेली जीवनशक्ती आहे आणि ती तीन छाया अथवा सावल्यांमधून सर्वत्र प्रभुत्व ठेवते. त्या शक्ती पुढीलप्रमाणे आहेत.

**(क) १) अघोरा :-** परानंदअमृतस्वरूपा.

**२) घोरा :-** अंतर्मुख आनंदस्वरूपा.

**३) घोरतरी :-** बहिर्मुख संसारस्वरूपा अर्थात् महामाहेश्वरी.

**(ख)** आपल्या स्वरूपाला लपविणारी चातुर्यशक्ती अर्थात् चंडा.

**(ग)** तुटि आदि शक्तिरूप काळाचे मोजमाप करणारी कालकर्षिणी. ही शक्ती सृष्टी, संहार व स्थिती या रूपाने काळाचे आकर्षण करीत असते. हिला सृष्टिसंहारकारिणी असे म्हणतात.

शक्तिचक्रातील संविद्देवीच्या शक्तींच्या विकासाचा क्रम पुढीलप्रमाणे आहे.

**(१) खेचरी :-** अंतःकरणाच्या शक्तिचक्राचा विकास.

**(२) गोचरी :-** ज्ञानेंद्रियांच्या शक्तिचक्राचा विकास.

**(३) दिक्चरी :-** कर्मेंद्रियांच्या शक्तिचक्राचा विकास.

**(४) भूचरी :-** पंचमहाभूतांच्या शक्तिचक्राचा विकास.

पराशक्ती कुंडलिनी ही इडा, पिंगला आणि सुषुम्ना या मार्गांमधून वहन करीत असल्यामुळे ती त्रिवह, सोम, सूर्य आणि अग्निरूप असल्याने ती त्रिविध आणि अतीत, वर्तमान व अनागत अथवा भूतकाळात स्थित असल्याने त्रिस्थ म्हणविली जाते.

जोपर्यंत प्राणाशी संबंध असतो तोपर्यंत शरीररूप कंचुकही राहत असते; परंतु संवित्स्वरूपात स्थिर झालेल्या परमयोग्याचे श्वास व उच्छ्वास स्वभावानेच या ज्ञानक्रियारूप विश्वामध्ये संविन्मय असतात. प्राणांच्या साहचर्याने मित-प्रमाता अर्थात् जीव कर्मांचे पाश बनवितो आणि परत त्यांच्याच अधीन होतो. पहिल्यांदा केलेल्या संचित आणि मिश्र कर्मांनी प्रारब्ध कर्म उत्पन्न होते आणि ते भोगण्यासाठी घर अर्थात् शरीर उत्पन्न होते. प्रारब्ध कर्मांचा क्षय ती कर्मे भोगण्यानेच होतो अन्यथा नाही. त्यामुळेच ज्याप्रमाणे चाक फिरविल्यानंतर त्याचे शेवटचे फिरणे स्वतःचेच असते असे पाहण्याला मिळते त्याप्रमाणेच तत्त्वयोग्याचे शरीर हे प्रारब्धानुसार अशा प्रकारेच थांबते. हा सिद्धयोगी स्वतः कर्मपाशातून मुक्त होऊन स्वरूपसंविन्मय राहतो. तो आपल्या देहावर कधीही दृष्टी टाकत नाही.

या दृष्टीने "**श्रीमद्भागवत**" या ग्रंथात या सिद्धयोग्याचे वर्णन करताना असे म्हटले आहे की -

**देहं च नश्वरमवस्थितमुत्थितं वा**
**सिद्धो न पश्यति यतोध्यगमत् स्वरूपम्।**
**दैवादपेतमुत दैववशादुपेतं**
**वासो यथा परिकृतं मदिरामदान्धः।।**
**।। एकादश स्कंध १३-३६।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे मदिरा पिऊन उन्मत्त झालेला मनुष्य त्याच्या शरीरावर वस्त्र आहे अथवा नाही हे पाहत नाही त्याप्रमाणे ज्या सिद्धपुरुषाने शरीराच्या द्वारा आपल्या स्वरूपाचा साक्षात्कार केलेला असतो तो आपले शरीर प्रारब्ध-वशाने उठलेले आहे, बसलेले आहे किंवा दैववशात कोठे गेले अथवा आले आहे अशा नश्वर शरीरासंबंधीच्या गोष्टींकडे लक्ष देत नाही.

त्यामुळे स्वरूपलाभ होऊन सिद्धयोग्याचा प्राणांशी जो संबंध राहतो तो नैसर्गिक म्हणजेच संवित्स्वभावाने युक्त असतो.।।४३।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

असे असताना हे पंचमहाभूतांचे आवरण त्याचक्षणी का बरे नष्ट होत नाही? या शंकेला "**नैसर्गिकः प्राणसम्बन्धः।।४३।।**" या सूत्रात उत्तर दिले आहे.

निसर्गापासून म्हणजेच स्वातंत्र्यात्म्याच्या स्वभावामुळे आलेला हा नैसर्गिक प्राणसंबंध आहे. त्यामुळे तो निवारण करण्याला अशक्य आहे. संवित्

भगवती विश्ववैचित्र्य दाखविण्याच्या इच्छेने संकोचतत्त्वाचा स्वीकार करते व संकुचित जीवांच्या भूमिकेत शिरते. ती प्राणनरूपाची म्हणजेच जीवनरूपाची होऊन समाविष्ट होते. असा ग्राहकभूमिकेचा आश्रय करून ती ग्राह्यरूप जगताच्या रूपातही व्यक्त होते. त्यामुळे नैसर्गिक स्वातंत्र्यामुळे हिचा प्राण-संबंध प्रथम उद्भासित होतो किंवा व्यक्त होतो.

**विवरण :-** नैसर्गिकप्राणसंबंधामुळे जोपर्यंत देहकवच आहे तोपर्यंत सिद्धयोगी जिवंत राहणारच. त्यांचे साहचर्य संकुचित प्रमातृत्वातून म्हणजे ज्ञातृत्वातून निर्माण झालेल्या प्राक्तन व संचित अशा मिश्र कर्मांमधून उत्पन्न झालेले असून भोगांचे स्थान असलेले शरीर प्रारब्धकर्मे भोगून ते क्षीण झाल्यानंतरच क्षीण होते. अन्य कोणत्याही मार्गांनी ते क्षीण होत नाही. त्यामुळेच तत्त्वज्ञानी मनुष्याचे शरीर चक्र फिरल्याप्रमाणे प्रारब्धभोगांसाठीच फिरत राहते.

त्याचप्रमाणे "**श्रीवाजसनेय**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**या सा शक्तिः परा सूक्ष्मा व्यापिनी निर्मला शिवा।**
**शक्तिचक्रस्य जननी परानन्दामृतात्मिका।।**
**महाघोरेश्वरी चण्डा सृष्टिसंहारकारिका।।**
**त्रिवहं त्रिविधं त्रिस्थं बलात्कालं प्रकर्षति।।**

**अर्थ :-** जी परा अर्थात् सर्वश्रेष्ठ, सूक्ष्म, सर्वांना व्यापणारी, निर्मल, पवित्र किंवा शुभ, शक्तिचक्रांची माता, अमृतत्वाच्या श्रेष्ठ आनंदाने युक्त, महाघोरेश्वरी, चंडा म्हणजे भयानक आणि सृष्टी व संहार घडवून आणणारी शक्ती आहे ती तीन ठिकाणी वाहणाऱ्या तीन प्रकारच्या व तीन ठिकाणी राहणाऱ्या अशा काळाला बळेच खेचते.

**विवरण :-** प्राणात परिणत होणारी जीवनरूप पराशक्ती ही घोर-अति-घोरादि शक्तिचक्रांना जन्म देत असल्यामुळे साधकभक्तयोगिशिष्यांवर प्रभुत्व गाजविणारी असून स्वस्वरूपाला लपवून ठेवण्याला उद्युक्त झाल्यामुळे चंड-रूप अशी असते. तिच्याच त्रुट्यादिशक्तींपासून कालपरिमितिपर्यंत काळाला खेचण्याच्या सामर्थ्यामुळे सृष्टी व संहार हे कर्तृत्व तिच्या ठिकाणी आले आहे. त्रिवह म्हणजे इडा, पिंगला व सुषुम्ना या तीन नाड्यांमधून तो प्राण वाहतो. तीन प्रकारचा म्हणजे सोम अर्थात् चंद्र, सूर्य व अग्नी या रूपांचा असलेला व त्रिस्थ म्हणजे अतीत, वर्तमान व भविष्य या तीन काळांमध्ये तो प्राण राहणारा असतो.

**प्राणः प्राणमयः प्राणो विसर्गापूरणं प्रति।**
**नित्यमापूरयत्येष प्राणिनामुरसि स्थितः।। स्वच्छंदतंत्र।।**

**अर्थ :-** जीवन शक्ती ही प्राण व अपान यांनी श्वास व उच्छ्वासांच्या स्वरूपात व्यक्त होते. प्राण हाच सर्वांच्या हृदयात स्थिर राहून सतत जीवनाचे पोषण करीत राहतो. तो विसर्गमय असून आपूरण म्हणजे पोषण करतो म्हणूनच त्याला प्राण असे म्हणतात.

**विवरण :-** "**ह**"कार हाच प्राण आहे," अशा वचनाने जेथे वाच्य व वाचक असा कोणताही भेद नाही व जो विमर्शमय अर्थात् ज्ञानमय आहे असा प्राण सांगितला तोच स्वातंत्र्याने अवभासित किंवा व्यक्त केलेल्या संकोचाचा आधार घेऊन अवरोहक्रमाने ज्याचे प्रकृतरूप प्राणन अर्थात् जीवन देणे असे आहे अशा सामान्य प्राणाचे रूप घेतो. तो विसर्गापूर्णाप्रती अर्थात् सृष्टी व श्रीशिवरूप असून तोच सर्व पोकळ्यांमधून बाहेरील त्या त्या भावांना व्यक्त करणाऱ्या सृष्टिरूप विसर्गासाठी जबाबदार असतो. त्या अवभासांनी युक्त प्रवेशयुक्तीने त्यांचे आहरण करून व आत आपूरण अर्थात् पोषण करण्यासाठी प्रकर्षाने ध्वनी केल्यामुळे अर्थात् अनाहतनादयुक्त विमर्शा-मुळे त्याला प्राण असे म्हणतात. हेच तो नित्य स्पष्ट करीत असतो. सर्वांच्या देहात असूनही हा सर्व प्राण्यांच्या हृदयात स्पष्टपणे उपलब्ध असतो. तो त्यांचे नित्य आपूरण करीत असतो आणि प्राण्यांना व अर्थांना प्रवेश व निर्गम यांनी जीवन विमर्शमय म्हणजे शक्तियुक्त करीत असतो.

प्राण हा "**हकारस्तु स्मृतः प्राणः स्वप्रवृत्तो हलाकृतिः।।**" अर्थात् "**ह**"कार हा प्राण समजला असून तो स्वतःच हलाकृती क्रिया करणारा अर्थात् नांगराचा आकार अथवा स्वरूप असणारा असा आहे." या वचनानुसार श्रीस्वच्छंदभट्टारक प्राणमयरूप असल्यामुळे विसर्ग व आपूरण यांनी त्याचे सृष्टिसंहार करण्याचे कर्तृत्व सांगितले. त्यामुळेच "**नैसर्गिकः प्राण-सम्बन्धः।।४३।।**" हे योग्यच म्हटले आहे.

**विवरण :-** हा जो हल् आकृती असणारा, स्वरविरहित, अनाहतनादमय प्राण "**स्वयमुच्चरते देवि प्राणिनामुरसि स्थितः।।**" अर्थात् "प्राण्यांच्या हृदयात स्थित होऊन तो स्वतःच प्रवृत्त झालेला आहे." तोच "**नादाख्यं यत्परं बीजम्।।**" अर्थात् "नाद नावाचे जे श्रेष्ठ बीज .....।" अशा प्रकारे अन्य तंत्रांमध्येही सांगितले असून सर्वत्र तो प्राण स्वतःच आपण होऊनच स्फुरण पावतो. तो हा प्राण जीव म्हणून ओळखला जातो. त्याचे प्राणन हे

आणखी एक नाव आहे. त्याचे हे स्वरूप परंपरागत श्रीसद्गुरूंकडून अखंडित-पणे शिकविले जाते.

प्राण हा धूलिभेदानुसार **"हलाकृतिः"** म्हणजे सर्व विश्व स्वतःत सामावून कुंडलिनीचा आकार धारण करणारा, झोपलेल्या सापाच्या आकाराचा, स्वतःच प्रवृत्त होणारा व स्वतः नादामर्शात बुडून प्राणात्मक रूप धारण करून स्थित राहणारा आहे; कारण श्रीपरमेश्वराची बोध नावाची शक्ती विश्वाला गर्भात घेऊन परा कुंडलिका स्वरूपाची होत विमर्शरूपाने नादयुक्त वर्णकुंडलिका म्हणून व्यक्त होते असे आम्नायात सांगितले आहे. अशा प्रकारे व्याख्यान केलेला प्राणच हंस आहे; कारण तो खाली व वर आणि त्याग व स्वीकार या धर्मांनी युक्त "ह"कार व "स"कार यांच्या विमर्शरूपाने स्फुरण पावतो.

यासाठीच श्रीभट्टकल्लटाचार्यांनी **"तत्त्वार्थचिंतामणी"** या ग्रंथात प्राणकारणाचे दृढत्व सांगण्यासाठी **"प्राक् संवित् प्राणे परिणता।।"** अर्थात् "आधीची संवित् किंवा चैतन्य प्राणात परिणत होते अथवा ती शक्ती प्राणाच्या स्वरूपाची होते," असे म्हटले आहे.

अशा प्रकारे भगवती संवित्चे प्राणक्रमाने तीन प्राणांमधून वाहणाऱ्या चंद्र, सूर्य व अग्नी या तीन अवस्थांच्या आणि भूत, वर्तमान व भविष्य या काळांच्या अंगाच्या स्वरूपात बाह्यसृष्टी आणि अंतःसंहार होतो असे सांगितले.।।४३।।

**विवरणात्मक टीप :- "ह"** हा विसर्गशक्तीचे सूचन करणारा आहे. शारदा लिपीमध्ये **"ह"** हा नांगरासारखा लिहिला जातो. त्याचा वरचा भाग हा श्वास बाहेर टाकण्याचे सूचन करतो तर खालचा भाग प्रश्वास आत घेण्याचे चिह्नित करतो. तो अखंड आणि आपोआप प्रत्येकाच्याच आत अनच्क अर्थात् स्वररहित आणि अनाहत अर्थात् आघात न करता उत्पन्न झालेल्या नादाच्या स्वरूपात ऐकू येत असतो.

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्तिक :-**

या देहधारी जीवाला प्राणसंबंध कसा होतो? यासंबंधी भगवान् श्रीवृषा-कपींनी अर्थात् श्रीशिवांनी **"नैसर्गिकः प्राणसम्बन्धः।।४३।।"** या सूत्रात असे सांगितले आहे की,।।१८३,१८३.५।।

"या भौतिक शरीराचा जो प्राणसंबंध आहे।।१८४।।

तो निसर्गतः सिद्ध आहे;" कारण प्राण हा प्राणमय म्हणजेच जीवमय किंवा चैतन्ययुक्त आहे.।।१८४.५।।

**विवरण :-** पूर्वी सांगितलेल्या नीतीनुसार ज्ञानारूढ झाल्यामुळे म्हणजेच ज्ञानी झाल्यामुळे पुर्यष्टकाचा म्हणजेच देहाचा अभिमान गळून जातो. त्या देहाशी संबंधित असणाऱ्या भूतकंचुकांचा नाश झाला तरीही त्याच्या संबंधाला निमित्त होणाऱ्या प्राणाचा व देहाचा संबंध निसर्गसिद्ध अर्थात् कोणताही प्रयत्न न करता सिद्ध होणारा आहे. संवित् म्हणजे ज्ञानशक्तीच संकोच आणि प्रसरणपूर्वक विश्ववैचित्र्य भासविते. ती संवित्च प्राणनात्मकता घेते. ग्राह्यरूप जगद्रूपाने तीच स्फुरण पावते आणि स्ववैभवस्मरण करून देहाच्या जीवित-दशेत घडलेल्या शुभाशुभ मिश्र कर्मांनी पुण्यपापादि कर्मे करून मनुष्य-पश्वादि योनींमधून भ्रमण करते. कदाचित् निरपेक्ष शक्तिपाताचे अधिष्ठान लाभून श्रीशैवज्ञानाचे क्रमशः आचरण करून ती श्रेष्ठ अशा ऊर्ध्वमार्गाची अभिलाषा धरते. जरी ज्ञानरूप अग्नीने कर्मे दग्ध झाली तरी कुंभाराने दंड काढून घेतल्यावर चाक जसे फिरत राहते तसे प्रारब्धभोग भोगून संपेपर्यंत प्राण व त्याच्याशी संबंधित असणाऱ्या भूतकंचुकांपासून म्हणजेच देहापासून सिद्धयोगी निवृत्त होत नाही, असा याचा अर्थ आहे.।।४३।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

"**नैसर्गिकः प्राणसम्बन्धः।।४३।।**" या सूत्रानुसार "निसर्गामुळे म्हणजे स्वातंत्र्यात्मकस्वभावामुळे नैसर्गिक प्राणसंबंध असतोच." भगवती संवित् विश्ववैचित्र्य भासविण्याची इच्छा करते व संकोचावभासपूर्वक संकुचित अशा सर्व विश्वाच्या स्फुरत्तात्मक प्राणनारूप अर्थात् जीवनाच्या ग्राहकभूमिकेचा आश्रय घेऊन ग्राह्यरूप जगताच्या आभासाने स्फुरण पावते. अशा प्रकारे हा स्वातंत्र्याच्या अभिव्यक्तीमुळे समुद्भासित होणारा प्राणसंबंध नैसर्गिक आहे. ।।४३।।

**श्रीवरदराजाचार्य वार्तिक :-**

सिद्धयोग्याचे भूतांचे आवरण म्हणजे देह त्याचवेळी का गळून पडत नाही? या शंकेला उत्तर देताना श्रीशिव "**नैसर्गिकः प्राणसम्बन्धः।।४३।।**" हे सूत्र कथन करून असे सांगतात की,।।१८७।।

प्राणांचा नैसर्गिक संबंध असतो म्हणून देह गळून पडत नाही.।।१८७.५।।

पूर्वी सांगितलेल्या उपदेशामुळे प्राणात परिणाम पावलेली बुद्धी अथवा संवित् स्वतःच्या नैसर्गिक जन्मसिद्ध अनिवार्य स्वातंत्र्यामुळे।।१८८।।

चंचल प्रपंचाच्या वैचित्र्यात किंवा विलक्षणपणात अधिक भर घालण्याच्या इच्छेने संकुचितपणा घेऊन ही स्वतः भगवती संविच्छक्ती ।।१८९।।

संकुचित अशा प्राणग्राहक अर्थात् जीव अथवा देहधारी भूमिकांचा अवलंब करते. हाच अर्थ दृढ करण्यासाठी खालील संवाद पाहा.।।१९०।।

ही ती पराशक्ती कुंडलिनी सूक्ष्म, व्यापक, निर्मल व कल्याणकारिणी आहे. तीच पूर्ण शक्तिचक्राला किंवा शक्तिमंडलाला उत्पन्न करते. ती परमानंद-रूप अमृतयुक्त आहे.।।१९१।।

ती महाघोरांची नियामिका, प्रचंड व सृष्टिसंहाराची शक्ती असलेली अशी असून तीच तीन प्रकारे वाहणाऱ्या, तीन प्रकारच्या व तीन ठिकाणी राहणाऱ्या कालाला बलात्काराने खेचते.।।१९२।।

असे "**श्रीवाजसनेय**" या ग्रंथात सांगितले आहे. ही परा चैतन्यशक्ती अगोदर प्राणरूप प्रमात्यावर स्वातंत्र्याने आरूढ होऊन त्याला ताब्यात ठेवते.।।१९३।।

ही चैतन्यशक्ती चंद्र, सूर्य व अग्निरूपी तीन नाड्यांमधून वाहणाऱ्या, आत-बाहेर श्वासोच्छ्वासस्वरूपात जा-ये, ये-जा करणाऱ्या।।१९४।।

आणि भूत, वर्तमान व भविष्यरूपी तीन प्रकारांच्या काळाला आत व बाहेर म्हणजे देहात खेचते. यामुळे तिला कालाकर्षिणी असे म्हणतात.।।१९५।।

त्यामुळे तिचा प्राणांशी नैसर्गिक संबंध आहे. त्यामुळे सिद्धयोग्याचा देहसंबंध ज्ञान होताच लागलीच नष्ट होत नाही.।।१९५.५।।४३।।

**श्रीकृष्णानंदसागर शिवरंजनी :-**

या तुर्यपदात आरूढ असणाऱ्या सिद्धयोग्याची भूतकंचुकिता कशी काय नष्ट होत नाही? या शंकेला "**नैसर्गिकः प्राणसम्बधः।।४३।।**" या सूत्रात उत्तर दिले आहे.

निसर्ग म्हणजे सहजस्वभाव होय. तो स्वतःच्या स्वातंत्र्यात्म्यापासून येतो म्हणून नैसर्गिक होय. त्याचा व श्वासप्रच्छ्वासरूप प्राणांचा स्वाभाविकसंबंध असतो. भगवती संवित् विविध प्रकारच्या प्रपंचाला व्यक्त करण्याच्या इच्छेने संकुचितत्व स्वीकारून संकोचत सर्व विश्वस्फुरत्तायुक्त प्राणनारूप ग्राहक-भूमिकेचा आश्रय घेऊन ग्राह्यरूप जगताच्या आभासाने स्फुरण पावले. अशा प्रकारच्या या स्वाभाविक स्वातंत्र्याच्या बळामुळे प्रथम उद्भासित होणारा हा प्राणसंबंध आहे.

यासंबंधी "**श्रीवाजसनेय**" या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**या सा शक्तिः परा सूक्ष्मा व्यापिनी निर्मला शिवा।**
**शक्तिचक्रस्य जननी परानन्दमृतात्मिका।।१।।**

**महाघोरेश्वरी चण्डा सृष्टिसंहारकारिका।**
**त्रिवहं त्रिविधं त्रिस्थं बलात्कालं प्रकर्षति।।२।।**

**अर्थ :-** ही ती पराशक्ती कुंडलिनी सूक्ष्म, व्यापक, निर्मल व कल्याणकारिणी आहे. तीच पूर्ण शक्तिचक्राला उत्पन्न करते. ती परमानंदरूप अमृतयुक्त आहे.।।१।।

ती महाघोरांची नियामिका व प्रचंड सृष्टिसंहाराची शक्ती असलेली अशी असून तीन प्रकारे वाहणाऱ्या, तीन प्रकारच्या व तीन ठिकाणी राहणाऱ्या कालाला बलात्काराने खेचते.।।२।।

या वाजसनेयमार्गाला अनुसरून भगवती चिच्छक्तीचे प्राणक्रमाने तीन नाड्यांतून वाहणाऱ्या, चंद्र, सूर्य व अग्नी यांनी युक्त आणि भूत, भविष्य व वर्तमान यांच्या रूपाचे बाह्य काळाच्या उल्लासाने युक्त विलापनकारित्व सांगितले. त्यामुळेच हे श्रीभट्टकल्लटाचार्यांनी "**तत्त्वार्थचिंतामणि**" या ग्रंथात "**प्राक् संवित् प्राणे परिणता।।**" अर्थात् "प्रथम संवित् प्राणात परिणत झाली," अशा प्रकाराने सम्यग्रूपात प्रतिपादित केले आहे.

**विवरण :-** संवित् किंवा चैतन्यशक्तीच प्राणात परिवर्तित होते. या सूत्राच्या संदर्भात प्राण म्हणजे श्वासोच्छ्वास करणारा प्राण नव्हे. याचा अर्थ जो प्राण विषय आणि विषयी या दोघांनाही अस्तित्वात आणतो ते वैश्विक जीवन सामर्थ्य, बल किंवा शक्ती होय. तो प्राणच चैतन्य आणि मनुष्याच्या स्थूल, सूक्ष्म आदि विविध वाहनांमधला जोडणारा दुवा आहे. हा दुवा नैसर्गिक आहे. ज्या सिद्धयोग्याने आत्मज्ञान करून घेतलेले आहे आणि ज्याला चैतन्यशक्तीची सतत जाणीव आहे अशा वेळेलाही हा दुवा त्याच्या शरीराला राखतो. त्यामुळे चैतन्यात मग्न झालेल्या सिद्धयोग्याचे शरीर का पडत नाही अथवा त्याच्या शरीराचे का पतन होत नाही? असा प्रश्न अर्थहीन ठरतो. सिद्धयोगी आत्महत्याही करू शकत नाही.

ही वैश्विक प्राणशक्ती प्रत्येक व्यक्तीमध्ये प्रामुख्याने दोन स्वरूपांमध्ये अवतरित होते. १) प्राण अर्थात् उच्छ्वास म्हणजे वायू बाहेर सोडणे आणि २) अपान अर्थात् प्रश्वास म्हणजे वायू आत घेणे. प्राण म्हणजेच बाहेर जाणारा श्वास हा सृष्टी अथवा जगताचे प्रकट होणे सूचित करतो तर अपान हा संहाराचे म्हणजेच जगताच्या नाशाचे निर्देशन करतो. त्यामुळे प्राण अर्थात् वैश्विक जीवनशक्ती हीच दोन प्रकारांची असून तीच सृष्टी करते आणि मूळच्या स्वरूपात परत आणणारा संहार घडवून आणते.।।४३।।

## सूत्र क्रमांक ४४

**संबंध :-** प्राणनरूप ग्राहक भूमिकेत स्थिर असणारा हा स्वरूपविमर्शयुक्त सिद्धयोगी अलौकिक किंवा असामान्य असतो असे या सूत्रात सांगितले आहे.

**नासिकान्तर्मध्यसंयमात् किमत्र सव्यापसव्यसौषुम्नेषु।।४४।।**

**शब्दार्थ :- नासिका - (नसते - कौटिल्येन वहति इतिकृत्वा कुटिलवाहिनी)** कुटिलरूपाने वाहणारी प्राणशक्ती कुंडलिनी. **अन्तर्मध्य -** प्राणशक्तीच्या अर्थात् कुंडलिनी शक्तीच्या आत असलेली किंवा आतील संवित्. तिच्या मध्यभागी किंवा केंद्रात. **संयमात् -** स्मरणाने. **किमत्र -** या बाबतीत काय बरे म्हणावे? याचे वर्णन कसे करावे. **सव्य-अपसव्य-सौषुम्नेषु-** उजवी **(पिंगला),** डावी **(इडा)** व मधील नाडी **(सुषुम्ना)** - या नाड्यांमध्ये.

**अर्थ :-** इडा, पिंगला व सुषुम्ना या नाड्यांमध्ये जी प्राणशक्ती असते त्या प्राणशक्तीच्या अंतर्भागी असलेल्या सुषुम्नेतील संवित्च्या संयमाने म्हणजे त्या सर्वश्रेष्ठ "मी"त्वाच्या जाणीवेमध्ये राहणे अर्थात् इडा व पिंगला या नाड्यांमधून कुटिलरूपाने वाहणाऱ्या प्राणशक्ती कुंडलिनीची वक्रगती सिद्धयोगसाधनाभ्यासाने संपवून टाकून व तिला ज्यावेळी सुषुम्नेतील मध्यधामात अखंड धारण केले जाते अर्थात् तेथे ती स्थिर होते त्यावेळी या स्थितीपेक्षा कोणतीही स्थिती मोठी असत नाही. इडा व पिंगला या नाड्यांचा त्याग करून सुषुम्नामार्गाने सहस्त्रारात गमन करणारी कुंडलिनी शक्तीच श्रीशिवशक्तिसामरस्यरूप श्रेष्ठ अवस्था प्राप्त करते. अशा प्रकारे अंतिमतः सहस्त्रारात श्रीशिवांशी समरस होणे म्हणजे श्रीशिवशक्तिसामरस्य प्राप्त करणे यालाच निर्व्युत्थान समाधी असे म्हणतात.।।४४।।

**विशेष व्याख्या :-** नेत्र आदि रोमरंध्रांच्या शेवटापर्यंत बाहत्तर हजार नाड्यांच्या सर्व नाडीचक्रांमध्ये प्रधान असलेल्या इडा, पिंगला आणि सुषुम्ना यांच्यामध्ये कुटिलवाहिनी अर्थात् वाकडी वाहणारी प्राणशक्ती आहे. त्या आंतरी संवित्च्या अंतर्गत मध्यधामात अर्थात् सुषुम्नेत वारंवार अनुसंधान करण्याने परमयोगी स्वात्मसंविन्मय बनतो.

अशा महायोग्यासंबंधी "**श्रीकालिकाक्रम**" या ग्रंथात असे म्हटले आहे की

**तस्य देवादिदेवस्य परबोधस्वरूपिणः।**
**विमर्शः परमाशक्तिः सर्वज्ञज्ञानशालिनी।।**

**अर्थ :-** परबोधमय त्या श्रीदेवांच्या देवांची विमर्शमयता आणि सर्वज्ञतेच्या

ज्ञानाने शोभित झालेली अशी परमशक्ती कुंडलिनी आहे.

अशा विमर्शमय दशेत इडा म्हणजे प्राण, पिंगला म्हणजे अपान आणि सुषुम्ना म्हणजे मध्यनाडी यांच्यामध्ये अभ्यास केल्याने अशा सिद्धयोग्याला काय लाभ होऊ शकतात? त्याला आंतर आणि बाह्य अभ्यास करावे लागत नाहीत. तो अंतर्मुख आणि बहिर्मुख अशा सर्व दशांमध्ये स्वरूपविमर्शयुक्त राहतो. हीच त्याची निर्व्युत्थान समाधी आहे. यालाच परसमाधी असेही म्हणतात.

सामान्य जनांहून सिद्धयोगी कसा वेगळा असतो हे **"श्रीविज्ञानभैरव"** या ग्रंथात पुढीलप्रमाणे सांगितले आहे.

**ग्राह्यग्राहकसंवित्तिः सामान्या सर्वदेहिनाम्।**
**योगिनां तु विशेषोऽयं सम्बन्धे सावधानता।।१०६।।**

**अर्थ :-** श्रीसदाशिवांपासून किड्यापर्यंत सर्व देहधारी जीवांमध्ये प्रमाता व प्रमेयभाव सामान्य रीतीने असतोच; परंतु सिद्धयोग्याचे हे वैशिष्ट्य आहे की, तो त्यांच्या संधिकाळात सावध राहतो; कारण तो प्रमातृभावात स्थिती राखून ठेवतो.।।१०६।।

या सर्वांचे सार असे आहे की, सिद्धयोग्याला ध्यान, धारणा आणि समाधी यांची काहीही आवश्यकता नाही. तो या तिन्हींमध्ये प्रमुख असणाऱ्या अंतरतम मध्यधामात म्हणजे सुषुम्नेत संविन्निष्ठ अर्थात् संवित्मध्ये स्थिर असतो. ("**त्रयमेकत्र संयमः।।३.४।।**" अर्थात् "तीनही एकातच स्थित आहेत." **श्रीपातंजलयोगसूत्र विभूतिपाद**) तो सिद्धयोगी व्युत्थानदशेतही समाधिदशेप्रमाणे स्वरूपात समाहित राहत असतो. हीच त्याची निर्व्युत्थान समाधी आहे.।।४४।।

**श्रीक्षेमराजाचार्य विमर्शिनी :-**

त्यामुळेच नैसर्गिक प्राणसंबंध असतानाही जो त्याच्यावर आरूढ होतो अर्थात् प्राणनारूप ग्राहकभूमिकेचा आश्रय घेऊन व आंतरी कलेचा विचार करीत स्थिर होतो तोच लोकोत्तर योगी असतो असे **"नासिकान्तर्मध्यसंयमात् किमत्र सव्यापसव्यसौषुम्नेषु।।४४।।"** या सूत्रात सांगितले आहे.

सर्व नाड्यांच्या समुदायात मुख्य अशा सव्य, अपसव्य व सौषुम्न किंवा उजव्या, डाव्या व मध्यनाडीस्थानात वाकड्या गतीने वाहणारी अर्थात् वायूचे वहन करणारी म्हणून कुटिलवाहिनी म्हणविणारी प्राणशक्ती आहे. तिच्या आत जी संवित् आहे तिच्याही आतमध्ये असणारी व सर्वांमध्ये प्राधान्याने किंवा मुख्यत्वाने असणारी जी शक्ती आहे तिचे वर्णन **"श्रीकालिकाक्रम"**

या ग्रंथात पुढीलप्रमाणे केले आहे.

**तस्य देवातिदेवस्य परबोधस्वरूपिण:।**
**विमर्श: परमा शक्ति: सर्वज्ञा ज्ञानशालिनी।।**

**अर्थ :-** ज्याचे स्वरूप हे श्रेष्ठ ज्ञानरूप आहे अशा त्या देवांहून देव असणाऱ्या श्रीदेवांची विमर्श नावाची, सर्व काही जाणणारी व "**ज्ञान**" हाच स्वभाव असणारी एक अत्यंत उच्च किंवा श्रेष्ठ अशी कुंडलिनी शक्ती आहे.

हीच शक्ती विमर्शयुक्त होते. त्या विमर्शमय स्वरूपाचा संयम केल्यामुळे म्हणजेच आंतरिक स्वरूपाची धारणा दृढपणे केल्यामुळे म्हणजेच परत परत अंतर्मुखस्वरूपात दृढपणे चित्तधारणा केल्यामुळे काय होते याविषयी काय सांगावे? त्यामुळे सर्व अवस्थांमध्ये तेजाने झळकणाऱ्या व्युत्थानरहित अशा श्रेष्ठ समाधीचा लाभ होतो.

याविषयी "**श्रीविज्ञानभैरव**" या तंत्रग्रंथात असे म्हटले आहे की -

**ग्राह्यग्राहकसंवत्ति: सामान्या सर्वदेहिनाम्।**
**योगिनां तु विशेषोऽयं सम्बन्धे सावधानता।।१०६।।**

**अर्थ :-** ग्राह्य व ग्राहक हे ज्ञान सर्व जीवांना सामान्यपणे असतेच; परंतु सिद्धयोग्याच्या बाबतीत हाच विशेष आहे की, तो त्या संबंधांविषयी नेहमी जागरूक अथवा सावध असतो.।।१०६।।

**विवरणात्मक टीपा :-**

**१)** प्राण व अपानगतीने युक्त ग्राह्य व ग्राहक हे ज्ञान सर्व प्रमात्यांना म्हणजे जीवांना साधारण स्वरूपात असते. सिद्धयोग्यांच्या बाबतीत मात्र प्राण व अपान यांचा संचार होत असताना त्यात परप्रमात्याचा म्हणजेच परमात्म्याचा समावेश होत असतो हा विशेष आहे.

**२)** निर्व्युत्थान समाधी म्हणजे ज्यावेळेला सिद्धयोगी औपचारिक ध्यानधारणा करीत नसतो त्यावेळेला त्याच्या रोजच्या व्यावहारिक आयुष्यातही त्याचे मन सदैव परासंवित्‌मध्ये मग्न राहणे होय.।।४४।।

**श्रीभट्टभास्कराचार्य वार्त्तिक :-**

बिंदुनादात्मक अशा तीन मार्गात ये-जा करणाऱ्या या प्राणवायूचा जय स्वसिद्धीसाठी साधावा की नाही याविषयी भगवान् श्रीशिवांनी "**नासिकान्तर्मध्यसंयमात्किमत्र सव्यापसव्यसौषुम्नेषु।।४४।।**" या सूत्रात असे सांगितले आहे की, नासिकामध्यात म्हणजे सुषुम्नेत संयम होत असल्याने इडापिंगलादि नाड्यांची उठाठेव कशासाठी? अर्थात् सिद्धयोगमार्गात पूरकादि

क्रियांची आवश्यकता असत नाही.।।१८५,१८५.५।।

नासान्त ते द्वादशान्त म्हणजेच सहस्रारचक्र होय. त्या ठिकाणी ज्यांनी आपले चित्त ठेवले आहे।।१८६।।

त्यांचा प्राणजय निश्चित होतो. त्यामुळे आत्मस्थिती स्पष्ट होते. देहाचा मध्यभाग म्हणजे सुषुम्ना होय. तेथे प्राणांचा निरास केल्याने म्हणजेच प्राण स्थिर केल्याने।।१८७।।

चित्ताचा लय होतो आणि त्यामुळे श्रेष्ठ अशा आत्म्याचा उदय होतो. अशा प्रकारे प्राणजय सिद्ध होत असताना वाम, दक्षिण व सुषुम्ना या प्राण-वायू वाहणाऱ्या नाड्यांची म्हणजेच रेचकादि क्रियांची काय आवश्यकता आहे?; कारण प्राण हा प्राणांसारखाच समर्थ असून सर्व सिद्धी देणारा आहे.।।१८८,१८९।।

असे **"श्रीस्वच्छंदतंत्र"** या ग्रंथात श्रीशिवांनी स्वतः सांगितले आहे. रेचकादि कार्यासाठी वायुरूप प्राण सांगितला आहे.।।१९०।।

प्राणनाडीचा जय हा आनुषंगिक सांगितला आहे; कारण आत्मा हा श्रीशिवमय, शुद्ध, स्वच्छंद आणि स्वतंत्र असा सांगितला आहे.।।१९१।।

**विवरण :-** पतिभावाच्या म्हणजेच श्रीशिवभावाच्या लाभाकरिता स्वात्मसिद्धिसाधनाभ्यासासाठी प्राणात्म्याची अर्थात् अनाहतनादरूप शब्द-ब्रह्माची उपासना **"नासिकान्तरः"** या शब्दांनी निर्देशिली आहे. द्वादशान्तादीं-मध्ये म्हणजेच प्राणसूर्यलय नाडिस्थानांमध्ये मन स्थिर केलेल्या सिद्ध-योग्याच्या सतत अभ्यासामुळे इडादिमार्गात धावणाऱ्या व बिंदुनादाला सामावून घेणाऱ्या प्राणाचा लय केल्यामुळे नाडीजय साधतो. प्राणांच्या वृत्तींचा नाश झाला असता अनाहतनादब्रह्मामध्ये चित्तवृत्ती स्थिर होते. हे स्थैर्य आत्मानुभवरूप प्रवाहाने तन्मय होते व ध्यात्रादि भेद गळून जातात. त्यानंतर श्रीपरमस्वात्म-शिवांचा उदय होतो. अशा प्रकारे साध्यसिद्धींच्या बाबतीत आणवोपाय म्हणून सांगितलेले उच्चारादि प्रयत्न हे खालील सामान्य उपाय होत. संपूर्ण ऊर्ध्वपदप्राप्ती जर या वरील मार्गाने होत असेल तर इतर मार्गांची अपेक्षाच राहत नाही. असा या कारिकासमूहाचा आशय आहे.।।४४।।

**श्रीभट्टकल्लटाचार्य वृत्ती :-**

**"नासिकान्तर्मध्यसंयमात् किमत्र सव्यापसव्यसौषुम्नेषु।।४४।।"** या सूत्रात श्रीशिवांनी असे कथन केले आहे की, सर्व नाड्यांच्या समूहात प्रधानरूपाने असणाऱ्या इडा, पिंगला व सुषुम्ना यांमध्ये म्हणजेच दक्षिण,

**अन्त:स्थ :-** दोघांच्या मध्ये उभे राहणे. य, र, ल, व हे वर्ण अंत:स्थ वर्ण म्हणून ओळखले जातात. शिक्षा आणि व्याकरणानुसार हे चार वर्ण स्वर आणि व्यंजन यांच्यामध्ये आहेत. ते शुद्ध स्वरही नाहीत आणि व्यंजनेही नाहीत म्हणून यांना अंत:स्थ म्हटले जाते किंवा ते वर्ण स्पर्श (क ते म) आणि उष्म (श, ष, स, ह) यांच्यामध्ये असतात म्हणूनही त्यांना अंत:स्थ असे म्हणतात.

श्रीक्षेमराजाचार्यांच्या मते यांना अंत:स्थ म्हणण्याचे कारण म्हणजे ते मनुष्याच्या चित्तातून क्रियान्वित होणाऱ्या माया आणि तिच्या कंचुकांद्वारा निश्चित केले जातात.

परंतु श्रीअभिनवगुप्तपादाचार्य मात्र असे म्हणतात की, प्रमात्याने सिद्ध करून दाखविणाऱ्या व आंतरिक सामर्थ्य असणाऱ्या इच्छा आणि उन्मेष शक्तींच्या द्वारा अंतस्थ वर्ण निर्माण केले जात असल्यामुळे त्यांना "**अंतस्थ**" असे म्हणतात.

**अन्धतामिस्र :-** मरणाचा त्रास. अत्यंत गहन अंधकार.

**अपर :-** खालचा, दुय्यम दर्जाचा.

**अपवर्ग :-** मुक्ती.

**अपवेद्य सुषुप्ती :-** ज्या निद्रेत कोणत्याही प्रकारच्या विषयाची जाणीव नसते अशी गाढ निद्रा.

**अपशुशक्ती :-** ज्याचे बंधन नष्ट झाले आहे आणि जो श्रीसदाशिवांप्रमाणे मुक्त (पती) झालेला आहे असा.

**अपान :-** गुदद्वाराकडे खालच्या दिशेने जाणारा महत्त्वपूर्ण वायू. आत घेतलेली हवा.

**अबुद्ध :-** सामन्य मनुष्याच्या दृष्टीने जागृतावस्था; पण योग्याच्या दृष्टिकोनातून अबुद्ध अर्थात् अजागृतावस्था किंवा आत्म्याविषयीचे अज्ञान असणारी अवस्था.

**अभिलाषा :-** कामोपभोगाकांक्षाइच्छावासनातृष्णासंकल्पनादि.

**अमृत वर्ण :-** "**स**" हा वर्ण.

**अम्बा :-** पराभट्टारिका. श्रीपरमशिवांची सर्वश्रेष्ठ शक्ती. चंद्रकोरीच्या आकाराची शक्ती. श्रीपरमेश्वराची विशेष शक्ती. जी अप्ररूढभेदाने सामरस्ययुक्त द्वैताचा प्रसार करण्याला प्रवृत्त झालेली असते.

**अम्बिका :-** वर्णांचे तेजस्वी शरीर असणारी एक विशेष शक्ती.

**अमायीय :-** मायेच्या प्रभावाच्या पलीकडे. अमायीय शब्द म्हणजे जो रूढी अथवा परंपरेवर अवलंबून नाही. ज्यात पद आणि अर्थ एकच आहेत.

**अर्क** :- ज्ञानशक्ती. प्रमाण. प्राण. ही प्रभूंची ज्ञानशक्ती अत्यंत तेजस्वी अशा सूर्याच्या शरीराची आहे.

**अर्धचंद्रिका** :- वर्णांचे शरीर उल्लसित करणारी विशिष्ट शक्ती.

**अलंग्रास** :- **"अलम्"** या पदाचा या संदर्भातला अर्थ अत्यर्थ म्हणजेच पराकाष्ठेपर्यंत असा आहे आणि ग्रास म्हणजे खाणे, गिळणे होय. याचा अर्थ असा होतो की, आत्म्याशी सारखेपणापर्यंत क्षय होणे.

अलंग्रास म्हणजे ज्यावेळेला आत्म्याहून वेगळ्या संसाराचे कोणतेही संस्कार मागे राहण्याची परवानगी दिली जात नसते त्यावेळी अनुभवाला आलेल्या विषयाला आत्म्याच्या बरोबरीला आणणे.

**अवधान** :- अखंड सावधानपणा.

**अविकल्प (निर्विकल्प) ज्ञान** :- कोणत्याही मानसिक क्रियांशिवाय झालेले प्रत्यक्ष परमतत्त्वाचे ज्ञान.

**अविद्या** :- भेद प्रसार करणारा बंध, मोह, अज्ञान.

**अविवेक** :- परमतत्त्वाची जाणीव नसणे. मोह अथवा भ्रम. अज्ञान.

**अव्यक्त** :- जे व्यक्त अथवा दृश्य झालेले नाही ते.

**अशुद्ध विद्या** :- काही विशिष्ट गोष्टींचे ज्ञान. मर्यादित ज्ञान. वैयक्तिक ज्ञान.

**असत्** :- जे अस्तित्वात नाही ते.

**अहङ्कार** :- **"अहम्"** बनविणारे तत्त्व. मीपणाची जाणीव करून देणारे. खोटा "मी"पणाचा विचार. भाव. हे माझे, हे माझे नाही, अशी भावना बनविणारे अभिमानाचे साधन.

**अहन्ता** :- आत्मचैतन्य.

### आ

**आणव उपाय** :- ज्या योगात साधक त्याची इंद्रिये म्हणजेच प्राण आणि मन यांचा आत्मज्ञानासाठी उपयोग करते असा योग. त्यात सामन्यपणे उच्चार, करण, ध्यान, वर्ण आणि स्थानकल्पना यांचा समावेश आहे. यालाच आणवयोग, भेदोपाय व क्रियायोग अथवा क्रियोपाय असे म्हणतात.

**आणव समावेश** :- आत्म्याची वरील उपायांनी ओळख पटणे.

**आणवमल** :- मल किंवा अणूशी संबंधित असणारे मर्यादितत्व. जीवाचे तीव्र अज्ञान अर्थात् स्वत:विषयीची प्रमुख संकुचित उपाधी जी परमात्म्याला "जीवा"पर्यंत अध:पतीत करते. शक्तीचे हिरावत जाणारे चैतन्य व चैतन्याची हिरावत जाणरी शक्ती आणि अशा प्रकारे अपूर्णतेची जाणीव करून देणारा. हे संकुचितत्व दोन प्रकारांनी काम करते. (१) ज्यावेळेला कर्तृत्वतेची

जाणीव विद्यमान असते तेथे बोध किंवा प्रकाश यांचा अभाव असतो म्हणजेच शून्य, बुद्धी, प्राण किंवा देह यांसारख्या जड पदार्थांना आत्मा समजणे. (२) ज्यावेळेला बोध अथवा प्रकाश असतो त्यावेळेला क्रियाशीलतेचा किंवा कर्तृत्वाचा अभाव असतो.

**आत्मतत्त्व** :- शुद्धविज्ञानकेवल. "**समना**" पदापर्यंत व्याप्ती असणारे.

**आत्मविश्रांती** :- आत्म्यात विश्रांती किंवा आराम घेणे.

**आत्मव्याप्ती** :- सर्वसमावेशक श्रीशिवस्वरूपाच्या ज्ञानाशिवाय आत्म्याचे ज्ञान होणे.

**आत्मसात्कृ** :- आत्म्याशी सारखेपणाच्या रूपात रूपांतरित होणे.

**आदि कोटी** :- पहिली कड अथवा बिंदू म्हणजेच हृदय. यापासून श्वासाचे माप निश्चित केले जाते.

**आनंद** :- हर्ष. शक्तीचा स्वभाव. श्रीपरमशिवांचे चित्तासह असणारे परम स्वरूप. "**आ**" हा वर्ण. अपानशक्ती. आह्लादशक्ती.

**आनंद उपाय** :- कोणत्याही यौगिक प्रक्रियेशिवाय श्रीशिवस्वरूपाचे ज्ञान होणे. यालाच आनंदयोग अथवा अनुपाय असे म्हणतात.

**आवृत्ती** :- अविद्या किंवा विकल्प तयार होणे. भ्रम किंवा मोह.

**आपूरणी-आपूरणीय** :- विसर्गसंघट्टयुक्त कौलिकी शक्ती. इंद्राशी संबंधित शक्ती, योगिनीचे मुख.

**आनंदवृंद** :- "अ"पासून "क्ष"पर्यंतचा वर्ण समूह.

**आभोग** :- विस्तार, चमत्कार अथवा अध्यात्मिक आनंद.

**आसन** :- सामान्य अर्थ :- शरीराची एक विशिष्ट अवस्था. गूढ अर्थ :- आत्म्यात स्थिर अथवा प्रस्थापित झालेले. उदनाभिध प्राण. शाक्तबल.

### इ

**इच्छा** :- इच्छा. "**इ**" या वर्णाचे प्रतिनिधित्व करणारी.

**इच्छा उपाय** :- शांभवोपाय "उच्छोपाय" म्हणूनही ओळखला जातो.

**इच्छाशक्ती** :- सृष्टीत गुंगून गेलेली अथवा मग्न झालेली श्रीपरमशिवांची अविभाज्य आंतर इच्छाशक्ती. श्रीपरमशिवांची अशी अंतरावस्था की, ज्यात ज्ञान आणि क्रिया एकत्रित असतात. श्रीसदाशिवांची ठळक बाजू. श्रीपरप्रमात्याचा सृष्टी निर्माण करण्याच्या इच्छेने युक्त परामर्श किंवा विचार.

**इदंता** :- "**हे**" चैतन्य. वैषविक अथवा वस्तुविषयक जाणीव अथवा चैतन्य.

**इंदू** :- प्रमेय अथवा वस्तू (Object). अपान क्रियाशक्ती.

### ई

**ईशन** :- "**ई**" वर्णाचे प्रतिनिधित्व करणारा.

**ईशान :-** "**ई**" वर्णाचे प्रतीक. श्रीशिवांची पहिली आंतरिक शक्ती. ही श्रीशैवशास्त्राची उदेशिका आहे.
**ईशानी :-** इच्छिली जाणारी स्पष्ट समापत्ती अर्थात् ज्ञानाने युक्त क्षुब्ध न झालेली इच्छाशक्ती. श्रीपरमेश्वराची नियंत्रित करणारी शक्ती. श्रीवैष्णवी नावाची शक्ती.
**ईश्वरतत्त्व :-** मंत्रेश्वर. प्रेर्यत्व. कारण तोच भेदप्रथेमध्ये पाठविणारा असतो. श्रीशिवांपासून असलेले चौथे तत्त्व. "हे मी आहे" अशी जाणीव ठेवणारे तत्त्व. या तत्त्वात ज्ञान हे महत्त्वाचे असते.
**ईश्वरभट्टारक :-** श्रीईश्वर तत्त्वात स्थित असणारी. मंत्रेश्वरांच्या पूर्वीची देवता.

**उ**

**उच्चार :-** आणवोपायातील प्राणशक्तीवर एकाग्रता करण्याची एक विशेष पद्धत. या एकाग्रतेत अनुभूतीला येणारे आनंदाचे किंवा कृपेचे निरनिराळे पैलू.
**उच्छलता :-** दैवी आनंदाचे लहरींच्या रूपाने वर उसळणे. श्रीशिवत्व प्रकट करणारी व संसार नाहीसा करणारी कुंडलिनी शक्तीची क्रिया.
**उदान :-** कुंडलिनी शक्तीच्या रूपाने जागृत झालेला व सिद्धयोग साधनाने सुषुम्नामार्गाने उर्ध्वगामी होणारा महत्त्वाचा वायू.
**उद्धात :-** नादकलेच्या अनुभवाने युक्त शब्द.
**उद्धुभूषा :-** आद्यकोटी. प्रथम पातळी.
**उद्यम :-** स्फुरण पावणाऱ्या विमर्शयुक्त संवित्‌चे अचानक उसळून झालेले परप्रतिमेचे उन्मज्जन किंवा जागृत होणे.
**उद्योग :-** उन्मेष. उद्यम. सृष्टी. इच्छाशक्ती. प्रमाण.
**उद्वमन्ती :-** शब्दशः ओकणे असा अर्थ. शक्तीच्या द्वारा होणारी पिंड ब्रह्मांडाची निर्मिती.
**उन्मना :-** (१) समनाच्या वरती किंवा श्रेष्ठ असणारी शक्तिरूप मंत्रविषयी कला. (२) अभिव्यक्त होत असतानाच्या मुख्य क्रियेत असणाऱ्या श्रीपरम-शिवांची उच्च मानसिक शक्ती. जरी ती श्रीशिवांहून अभिन्न असली तरी ती उन्मना किंवा उन्मनी या नावाने ओळखली जाते. शब्दशः तिचा अर्थ मनाच्या पलीकडची असा होतो. ही शक्ती अमात्र अर्थात् मोजता न येणारी आणि कालातीत आहे. श्रीक्षेमराजाचार्यांनी "**श्रीनेत्रतंत्र**" या ग्रंथाच्या "**उद्योत**" या आपल्या टीकेत असे म्हटले आहे की, "**उन्मना मन उत्क्राम्य गता अनवच्छिन्न प्रकाश स्फुरत्ता।।**" अर्थात् "उन्मना म्हणजे मन ओलांडून गेलेली अखंड प्रकाशस्वरूपी शक्ती होय."
**उन्मेष :-** उद्योग. "उ" हे अक्षर. शब्दशः डोळे उघडणे असा अर्थ. (१)

इच्छाशक्तीचे बहिर्मुखाने उसळणे. पिंडब्रह्मांडाच्या उभारणीची प्रक्रिया करणारी. (२) श्रीसद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातयोगदीक्षेने आतून जागृत होणारी निद्रिस्त कुंडलिनी शक्ती. ही शक्ती सिद्धयोगसाधनाने सुषुम्नागामी होऊन सहस्रारात श्रीशिवांशी सामरस्य प्राप्त करते.

**उन्मेषदशा** :- उकाररूप शक्ती.

**उमा** :- श्रीपरमशिवांची इच्छाशक्ती. उ = श्रीशिव. मा = शक्ती. **"ओ:मा"** श्रीशिवांची शक्ती.

**उल्लंघनवृत्ति** :- शक्तीचा संकोच.

**ऊ**

**ऊनता** :- "ऊ" वर्णाचे प्रतीक.

**ऊष्म** :- श, ष, स व ह हे वर्ण.

**ऊष्माण** :- श, ष, स व ह ही उष्माक्षरे.

**ए**

**एकाणवा** :- पश्यंती वाणी.

**औ**

**औन्मनस धाम** :- श्रीशांभवसदन किंवा श्रीशिवांचे स्थान.

**औन्मुख्य** :- श्रीशिवांचा पिंडब्रह्मांडाची उभारणी करणारा स्वतःच्या आतील आनंद. इच्छाशक्तीची निर्मिती करण्याकडे होणारी प्रवृत्ती.

**क**

**करण** :- (१) अंतःकरण व बहिष्करण यांची ज्ञान व क्रियेची साधने. (२) साधकाने आपल्या शरीरावर आणि नाड्यांवर जगताच्या संक्षेपाने किंवा साररूपाने केलेल्या एकाग्रतेचा आणवोपायांतर्गत विचार.

**करणेश्वरी** :- खेचरी, गोचरी, दिक्चरी आणि भूचरी चक्र.

**कार्ममल** :- वासनांमुळे उत्पन्न होणारा मल. कर्मामुळे मनावर राहिलेले संस्कार किंवा कर्मामुळे प्राप्त झालेली गती.

**कर्मेंद्रिये** :- वाणी, हात, पाय, पायू व उपस्थ (गुदद्वार). अक्षांनी भिन्न असे कर्तृत्व.

**कला** :- एक विशेष तत्त्व. पुरुषाला काहीतरी करण्याला भाग पाडणारे तत्त्व. एक शक्ती **"कलयति स्वरूपमाविशतीति कला।"** अर्थात् "स्वरूपात प्रवेश करते म्हणून कला होय." वस्तूंमध्ये किंवा त्या त्या प्रमात्यात स्वकलन किंवा स्वचे ग्रहण म्हणजेच कला. तत्त्वे, तत्त्वांचे सामर्थ्य व "अ"पासून "क्ष"पर्यंत वर्णांचा समूह. निवृत्त्यादि कला. छत्तीस तत्त्वांचा समूह असलेली

जागृत शक्ती. भाग. अणू. पैलू. किंचित् कर्तृत्वसंपन्न शांत्यातीत, शांताविद्या, प्रतिष्ठा आणि निवृत्ती यांची इंद्रियग्राह्य सूक्ष्मता.
**कलाचक्र** :- मातृचक्र, शक्तिचक्र, देवीचक्र, रश्मिचक्र म्हणजे किरणांचे चक्र. "आ"पासून "क्ष"पर्यंत अक्षरे.
**कलातत्त्व** :- जीवाचे किंचित् कर्तृत्व करण्याचे सामर्थ्य.
**कलाशरीर** :- शरीराची नैसर्गिक कार्ये. कार्ममल.
**कल्पितप्रमाता** :- शून्यपुर्यष्टकादींचा अभिमानी जीव.
**काल** :- तत्त्वविशेष. भासन. आभासनयुक्त भावांचा क्रम-अवच्छेदक अर्थात् क्रमांचे विवेचन करणारा.
**काल-अध्वा** :- वर्ण, मंत्र आणि पँाद.
**कालतत्त्व** :- (१) "इदम्" या भावात आकलन किंवा ज्ञान होणे. (२) कालक्रमाच्या आकलनानुसार निश्चित होणारे भूत, वर्तमान आणि भविष्य.
**कालपद** :- कालपद म्हणजे उजव्या पायाच्या अंगठ्यापासून उत्पन्न झालेल्या कालाग्नीने स्वतःचे पुर म्हणजेच शरीर भाजत आहे अशी भावना केल्यास शांताभास उत्पन्न होतो किंवा सर्व आभास शांत होतो अर्थात् मर्यादित प्रमेयादि ज्ञान उत्पन्न होते.
**काल-पाद** :- उजव्या पायाचा आंगठा.
**काल-शक्ती** :- यशस्वी करणारी दैवी शक्ती किंवा सामर्थ्य.
**कालाग्नी** :- निवृत्तिकलेतला कालाग्निभुवनेश नावाचा विशिष्ट रुद्र संहार सुरू झाल्यानंतर प्रकोप झाल्यावर त्या उपक्रमात विश्व रममाण होते.
**कुल** :- परसंवित् तत्त्व. छत्तीस तत्त्वेसुद्धा. ती तत्त्वे पुढील प्रमाणे. श्रीशिव-शक्ती-श्रीसदाशिव-श्रीईश्वर-शुद्धविद्या-माया-कला-विद्या-राग-काल-नियती-पुरुष-प्रकृती-बुद्धी-अहंकार-मन-श्रोत्र(कान)-त्वचा-डोळे-जीभ-नाक-वाचा-हात-पाय-पायू-गुदद्वार-शब्द-स्पर्श-रूप-रस-गंध-आकाश-वायू-वह्नी-जल व पृथ्वी.
**कुलमार्ग** :- परसंवित् या तत्त्वाची प्राप्ती होण्याचा उपाय.
**कुलाचार** :- स्वशक्तिविकासाच्या वेळी विश्वावर व इंद्रियसमूहावर आरूढ होणे.
**कुलाम्नाय** :- "अ" ते "क्ष"पर्यंतच्या अक्षरांच्या शक्तिद्वारा स्व-स्वरूपाची प्राप्ती करण्याचा शाक्तोपाय.
**कूट बीज** : - "क्ष" हे अक्षर.
**केवली** :- आपल्या "मी"त्वाच्या शुद्धतत्त्वात, शक्तीत किंवा जणिवेत मग्न

झालेला साधक.

**क्रम** :- क्रियायोगाच्या द्वारा स्व-स्वरूप प्राप्तीचा क्रम.

**क्रियायोग** :- क्रियोपाय या नावाचा आणवोपाय.

**क्रियाशक्ती** :- विश्वाचे वैविध्य धारण करण्याची योग्यता.

**कंचुक** :- पाश. प्रवृत्ती. मायेपासून नियतीपर्यंतच्या तत्त्वांचा समूह किंवा कलेपासून नियतीपर्यंतची तत्त्वे. पुरुषाच्या स्वरूपावर आवरण घालते म्हणून कंचुक असे म्हणतात. शुद्ध संवित्‌वर आवरण घालणारे मायेचे आवरण किंवा झाकण. (१) कला, (२) अशुद्धविद्या, (३) राग, (४) नियती आणि (५) काल ही पाच कंचुके शुद्ध विद्येवर व श्रीशिवांवर आवरण घालून श्रीशिवांना जीव बनवितात.

**कंद** :- मूलाधार. बिंदुभ्रूमध्यस्थान. आत्म्याविषयीचे केंद्र.

**कुंडली** :- पारमेश्वरी विसर्ग अर्थात् निर्माण शक्ती. तीच सर्व विश्वाला आपल्यामध्ये सामावून घेतल्यामुळे निर्भर झालेली व म्हणून कुंडलिनी या नावाने ओळखली जाणारी. श्रीशिवांशी समरस असलेली ही शक्ती मूलाधारात साडेतीन वेटोळे घालून झोपलेली असते.

**कुंभक** :- प्राण हृदयात भरणे. प्राणायामाचा एक प्रकार.

### क्ष

**क्षेत्रज्ञ** :- पशुरूप प्रमाता. (ब्रह्मापासून स्थावरापर्यंत.)

**क्षोभ** :- अहम् असा प्रत्ययभाव. क्षोभ हा देहादि अहंच्या प्रत्ययाचे किंवा अनुभवाचे रूप आहे.

### ख

**खत्रय** :- "ख" = आकाश. जाणिवेची खूण. आज्ञाचक्रापासून ब्रह्मरंध्रापर्यंत असलेली शक्ती, व्यापिनी आणि समना नावाची मस्तकातील तीन आकाशे. सहस्रारात उर्ध्वगामी होताना साधक ही तीन आकाशे ओलांडून जातो.

**खेचरी** :- विशिष्ट मुद्रा. ज्यामुळे चिदाकाशभागात गती मिळते. श्रीशिवावस्था.

**खेचरीचक्र** :- खे म्हणजे ज्या ज्ञानरूप आकाशात संचार करतात त्या खेचरी. त्यांचे चक्र म्हणजे त्यांचा समूह. प्रमाता या भूमिकेचा आश्रय घेतलेल्या योगिनींचा समूह.

**खेचरीमुद्रा** :- आध्यात्मिक जाणिवेची विस्तृत कृपा, दिव्य मुद्रा किंवा श्रीशिवावस्था.

**ख्याती** :- ज्ञान. शहाणपणर. चातुर्य.

### ग

**गगनाङ्गना** :- चिच्छक्ती.
**गुणस्पंद** :- सत्त्वादि वृत्ती.
**गुण** :- सुख, दु:ख, मोह इत्यादि.
**गुरुवक्त्र** :- अनुग्राहिकाशक्ती.
**गुरू** :- श्रीशांभवी किंवा श्रीशंभूंची अनुग्रहशक्ती.
**गोचरी** :- वामेश्वरीची उपशक्ती. साधकाच्या अंत:करणाशी संबंधित. "गो" म्हणजे इंद्रिय. अंत:करण म्हणजे इंद्रियांचा आधार म्हणून गोचरी ही अंत:करणाशी संबंधित.
**ग्राहक** :- ज्ञाता, जाणणारा, विषय, साधक.
**ग्राह्य** :- ज्ञेय.
**ग्रंथी** :- पाश (गाठी). मानसिक गुंतागुंत. मानसिक गुंडाळा.

### घ

**घोरशक्ती** :- जीवाला बाह्य संसारोन्मुख करून भोगाकांक्षावासनातृष्णा-इच्छासंकल्पनादींमध्ये रमविणाऱ्या शक्ती.
**घोरतरीशक्ती** :- जीवाला संसारमार्गात खाली खेचणाऱ्या शक्ती.
**घंटिका** :- टाळूच्या खालचा भाग. टाळूचे मूळ.

### च

**चक्रे** :- कला समूह. शक्तीचा समूह.
**चक्रेश्वर** :- मातृगणांचा श्रीईश्वर. शक्तिसमूहांचा अधिपती अथवा मालक.
**चमत्कार** :- कलात्मक अनुभवाने झालेला आनंद. शुद्ध आत्मसंवित्‌चा हर्ष किंवा आनंद.
**चरमकला** :- शांत्यतीता नावाची कला. जी अभिव्यक्तीची सर्वोच्च पायरी आहे.
**चर्या** :- स्वरूपाचा साक्षात्कार होण्यासाठीच्या उपायाची स्थिती किंवा कर्तव्य.
**चित्** :- परिपूर्ण तत्त्व. मूळची जागृती. सर्व बदलणाऱ्या गोष्टींमध्ये कधीही न बदलणारे जागृत तत्त्व.
**चित्त** :- चेतन पदावरून खाली उतरून जीवरूपाने संकुचित झालेले चैतन्यमय श्रीशिवतत्त्व अर्थात् कुंडलिनी शक्ती.
**चिती** :- चैतन्ययुक्त कुंडलिनी शक्ती किंवा जाणीव. विश्वाची उभारणी व संहारणी करणारी शक्ती.
**चिदानंद** :- अंतिम सत्‌तत्त्वाची जागृती किंवा कृपा. आणवोपायातील उच्चारयोगामुळे प्राप्त होणाऱ्या आनंदाचा सहावा स्थर.

**चेतना** :- बुद्धी. त्राण नावाची शक्ती.
**चैतन्य** :- संपूर्ण स्वातंत्र्याची मूळ किंवा पायाभूत जाणीव. ज्ञान आणि क्रियाशक्तियुक्त तत्त्व.
**चंड** :- मध्यप्राण.
**चंद्र** :- प्रमेय किंवा ज्ञानाचा विषय. अपान नावाचा प्राण.

### ज

**जगत्** :- श्रीशिवांशी समरस असलेल्या कुंडलिनी शक्तीने धारण केलेले विश्वात्मक रूप.
**जगदानंद** :- आपण आणि जग हे श्रीशिवस्वरूप आहोत अशा अखंड अनुभूतीने होणारा आनंद.
**जागृतज्ञान** :- सर्व लोकांना जागृत अवस्थेत होणारे ज्ञान. मी श्रीशिव आहे व चैतन्यमय आहे अशी सर्व अवस्थांमध्ये व पातळ्यांवर राहणारी अखंड जाणीव.
**जाग्रत्** :- ग्राह्य, ग्रहण व ग्राहक म्हणजे ग्रहण करणारा याच्या स्वरूपातला ऐंद्रिय म्हणजे इंद्रियाशी संबंधित ज्ञानशक्ती.
**जाड्य** :- मोह. अज्ञानत्व.
**जीव** :- जीवात्मा. पूर्व संस्कारामुळे व श्रीशिवांनी आपल्याशी समरस व समव्याप्त असलेल्या कुंडलिनी शक्तीच्या द्वारा संकुचितता धारण केलेले स्वरूप.
**जीवनमुक्त** :- संकुचित प्रमातृत्वाला गुणीकार करून परसमावेश करण्याचा स्वभाव असणारा.
**जीवनमुक्ती** :- शरीर असतानाच प्राप्त झालेली स्वातंत्र्याची किंवा मुक्तीची अवस्था.
**ज्येष्ठा** :- संहारात्मक शक्तिविशेष. जिच्यामुळे सुप्रबुद्धयोग्यांना स्वातंत्र्याची अर्थात् श्रीशिवभावाची प्राप्ती होते. श्रीशिवमयी शक्ती.
**ज्येष्ठाशक्ती** :- उकारयुक्त चंद्रकोरीच्या आकाराचा वर्णसमावेश किंवा अनुग्राहिका शक्ती.

### ज्ञ

**ज्ञान** :- संकुचित ज्ञान अर्थात् अज्ञान. बंधाला कारण.
**ज्ञानयोग** :- शाक्तोपाय.
**ज्ञानशक्ती** :- संविच्छक्ती. आमर्शात्मता. कुंडलिनी शक्ती.

त

**तत् पुरुष :-** श्रीशिवांच्या पाचरूपांपैकी एक रूप.
**तत्त्व :-** विशिष्ट रूपाच्या वर्गाच्या एकीकरणाला कारण होणारी सामान्य संवित्.
**तत्त्वत्रय :-** नर, शक्ती व श्रीशिवात्मक तीन तत्त्वे किंवा आत्म, विद्या व श्रीशिव ही तीन तत्त्वे.
**तत्त्वे :-** श्रीशिवांपासून भूमीपर्यंतची छत्तीस तत्त्वे.
**तन्मात्रे :-** शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पाच तन्मात्रा. शब्दशः अर्थ :- केवळ तेच जाणिवेचे प्राथमिक घटक.
**तम :-** आत्म्याचा अभिमान. प्रकृतीचा एक घटक. भ्रम आणि जाड्य यांचे द्वैतात्मक तत्त्व.
**तामिस्त्र :-** कुंटुंबादि बाधा करणारे व आमर्षण अर्थात् क्रोध, कोप किंवा सहनशीलता.
**तुर्य :-** जाणिवेची चौथी अवस्था. उन्मनी. साक्षिभाव.
**तुर्यभू :-** स्व-स्वरूपाशी एकरस असा विमर्श किंवा ज्ञान.
**तुर्यातीता :-** मातृकाशक्ती.
**त्रिक :-** नर, शक्ती आणि श्रीशिव यांच्या तत्त्वज्ञान प्राप्तीचा मार्ग किंवा पद्धती. परा, परापरा आणि अपरा यांच्या ज्ञानाचा मार्ग. परा म्हणजे प्रकाश व विमर्श यांचे सामरस्य, परापरा म्हणजे इच्छा, ज्ञान व क्रिया आणि अपरा म्हणजे द्वैत किंवा द्वैतभाव.
**त्रिकोणबीज :-** "ए"कार. यालाच योनिबीज असे म्हणतात.
**त्रिपथा :-** इच्छा, ज्ञान व क्रिया यांचे आश्रय करणारी.
**त्रिराणवा :-** वैखरी वाणी.

द

**दक्षिणमार्ग :-** सूर्यमार्ग.
**दिक् :-** विश्वाची पोकळी.
**दिक्चरी :-** वामेश्वरीची जीवाला बहिर्मुख करणारी उपशक्ती. बाह्येंद्रियांशी जोडलेली किंवा संबंधित शक्ती.
**दिव्यदेह :-** परदेह किंवा श्रेष्ठ देह.
**दिव्यमुद्रा :-** खेचरी मुद्रा.
**दीक्षा :-** एक विशेष संस्कार. स्वरूपशक्तीचे दान आणि पाशांचे क्षपण

किंवा फेकून देणे यांनी युक्त.
**दृक्** :- प्राणशक्ती, प्रकाशशक्ती.
**दृष्टृता** :- शरीरातला अहंभाव.
**देव्य** :- शक्ती किरणे.
**द्रष्टृधरा** :- अभिलाषेतून उत्पन्न होणाऱ्यांची पूर्व कोटी. पहिली अवस्था.
**द्वादशांत** :- प्राण आणि अपान यांचे अंतर्बाह्य बारा अंगुलींपर्यंतचे विश्रांति-स्थान.

### ध

**धारणा** :- य, र, ल आणि व हे वर्ण. ही ज्ञानप्रवाहरूप असते. प्रवाह हा "मी वारा, मी शून्य" अशा प्रकारच्या अनुभवांनी युक्त असतो.
**धीतत्त्व** :- मंत्र कर्तृत्व.
**ध्यानयोग** :- आणवोपायातील प्रमाण म्हणजे ज्ञान, प्रमेय म्हणजे ज्ञेय व प्रमाता म्हणजे ज्ञाता हे तिन्ही संविच्छक्तीशी एकरूप आहेत या संबंधी करावयाची धारणा.
**ध्रुव** :- अनुत्तर किंवा सर्वश्रेष्ठ धाम किंवा स्थान किंवा "अ" किंवा अनुत्तर नावाचा वर्णपरामर्श अर्थात् वर्णविचार.

### न

**नक्षत्र** :- प्रमिती. ज्ञान.
**नववर्गक** :- अ, क, च, ट, त, प, य, श व क्ष या वर्णमालेतील अक्षरे.
**नाद** :- अपान वायू. एक विशेष ध्वनी. (१) श्रीशिवशक्तीचे विश्वनिर्मितीचे पहिले प्रकटीकरण. (२) अनाहतनाद. शक्तीची नादान्ताच्या रूपाने विश्व व्याप्ती. हेच श्रीसदाशिवतत्त्व होय.
**नासा** :- आतील द्वादशान्त.
**निमेष** :- शक्तिचक्राचे स्वात्म्यात विलीन होणे. जगताची संहारणी. स्पंदशक्तीच्या आतील क्रियेमुळे दृश्याचे द्रष्ट्यात होणारे विलिनीकरण. श्रीशिवांचे वस्तुमात्रात होणारे प्रकटीकरण.
**नियती** :- "मी पुण्य मिळविण्यासाठी हे केले पाहिजे," "मी पापी आहे म्हणून हे करू नये," अशा प्रकारच्या नियमांसाठी असणारी नियमितता. एक विशेष तत्त्व.
**निरानंद** :- प्रमात्याच्या सभोवती असणाऱ्या आनंदापासून बाहेर निघालेला एक अवस्था विशेष. ब्रह्मानंद. आणवोपायाने प्राणशक्ती शून्यात विलीन झाल्यावर होणारा द्वितीय पातळीवरील आनंद.

**निष्कलजप** :- प्राण व वाणी यांचा परामर्श.

## प

**पञ्चमंत्र** :- इशान, तत्पुरुष, सद्दोजात, वामदेव आणि अघोर.

**पञ्चकृत्य** :- सृष्टी, स्थिती, संहार, विलय आणि अनुग्रह किंवा आभासन, रक्ती, विमर्श, बीजावस्थापना व विलापना या न संपणाऱ्या क्रिया.

**पञ्चशक्ती** :- चिद्, इच्छा, आनंद, ज्ञान व क्रियारूपी वर्णसंनिवेश किंवा वर्णांमध्ये प्रवेश उल्लसित करणाऱ्या.

**पतिदशा** :- मुक्तीची अवस्था.

**पती** :- मंत्रादिरूप शुद्धप्रमाता. शक्तींकडून स्वभावावरील आवरण नष्ट झाल्याने मुक्त जीव. अणूपासून मुक्त झालेला. शक्तींनी ज्याचा स्वभाव अनावृत किंवा उघडा केलेला आहे असा परप्रमाता. मुक्त.

**पद** :- जाग्रदादि दशा किंवा अवस्था.

**पदार्थद्वय** :- श्रीशिव आणि शक्ती.

**पर** :- सर्वोत्कृष्ट परमेश्वर.

**परतेज** :- पराहंता. सर्व श्रेष्ठ अहंता.

**परदेह** :- परप्रमातृभाव. श्रेष्ठ प्रमात्याचा भाव किंवा विचार.

**परप्रमाता** :- सर्वोच्च अनुभव घेणारे श्रीपरशिव.

**परमशिव** :- उच्चतम सत्य. अखंड, निरंतर व परिपूर्ण तत्त्व. श्रीपरमेश्वर.

**परमार्थ** :- उच्चतम आवश्यक सत्य. जीवाचा अंतिम हेतू.

**परशरीर** :- मायेपासून नियतितत्त्वापर्यंत सहा कंचुकांचे शरीर.

**परानंद** :- श्रेष्ठ प्रमेयाने निर्माण केलेला विशिष्ट आनंद. आणवोपायातल्या उच्चारयोगामध्ये प्राण आणि अपान यांच्यावर मन स्थिर करून निर्माण होणाऱ्या तिसऱ्या अवस्थेतून मिळणारा आनंद.

**परापर** :- मधली अवस्था. साम्य व वैषम्य अशा दोन्ही प्रकारची विविधतेमधली एकता.

**परामर्श** :- मनाने व बुद्धीने ग्रहण करणे. अनुभव. स्मरण. आकलन. बोध.

**परावाक्** :- विमर्शशक्ती अर्थात् ज्ञानशक्ती कुंडलिनी किंवा इतर निरपेक्ष अहंपरामर्शाने युक्त पराशक्ती. दिव्यात्म्याची सृष्टी करविणारी स्पंदनात्मक हालचाल. वैश्विक काल्पनिकता.

**पराशक्ती** :- श्रीशिवांची सर्वोच्च चिच्छक्ती.

**परिस्पन्द** :- असांकेतिक पराहंपरामर्श. सांकेतिक नसणारे परमात्म्याचे ज्ञान.

**पवमान** :- मध्यमप्राणशक्ती.

**पशुमातर** :- घोरा नावाच्या शक्ती. माहेश्वर्यादि शक्ती.
**पशुशक्ती** :- बंधशक्ती. रौद्री नावाची शक्ती.
**पशू** :- अणू. जीव. कर्मात्मा. संवाह्य. आणवादि पाशांनी बांधलेला. अविद्या, अस्मिता आदि पाशांनी बांधलेला जीव.
**पश्यंती** :- वाक् शक्ती. वाच्य आणि वाचक यांची एकरूपता दाखवणारी शक्ती.
**पाञ्चभौतिकगण** :- भिन्न शब्दादींपासून उद्वृत्त अर्थात् वर उसळणारे होणारे तत्त्व.
**पाश** :- आणवादि मलांचे बंध. अविद्या, अस्मितादि.
**पाश्य** :- जीव. परिमितप्रमाता.
**पिधानकृत्य** :- विलय. स्वतःला लपविण्याचे कृत्य. संहारणी.
**पीठेश्वरी** :- ब्रह्मादि शक्ती.
**पुमान** :- पुरुषतत्त्व. संकुचितप्रमाता.
**पुर्यष्टक** :- पाच तन्मात्रा व मन, अहंकार आणि बुद्धी यांच्या संघाताने युक्त अष्टकांनी बनलेले सूक्ष्म शरीर किंवा सूक्ष्म देह.
**पूर्णाहंता** :- पूर्ण अहं चैतन्य. अन्वयविरहित आत्मचैतन्य. "मी"त्वाची जाणीव किंवा ज्ञान. तर्कापलीकडील सुसंवेद्य आत्मस्वरूप.
**पौद्गलजप** :- अजपापरामर्श. अजपाविचार.
**पौरुष अज्ञान** :- पुरुषांचे त्यांच्या त्यांच्या "स्व"च्या बाबतीत असणारे आंतरिक अज्ञान.
**पौरुष ज्ञान** :- एखाद्याच्या "स्व"चे अज्ञान नष्ट झाल्यानंतर होणारे श्रीशिवस्वरूपाचे ज्ञान.
**प्रकाश** :- शब्दशः अर्थ :- प्रकाश, उजेड. "स्व" अभिव्यक्तीचे किंवा स्वात्मप्रकटीकरणाचे तत्त्व. चैतन्य. सर्व गोष्टी ज्याच्यामुळे ज्ञात होतात ते मूळ तत्त्व.
**प्रकृती किंवा प्रधान** :- गुणसामान्यरूप प्रकृतितत्त्व. बुद्धीपासून पृथ्वीपर्यंतच्या तत्त्वाविष्करणाचा स्रोत.
**प्रक्रियादेह** :- अधिकारशरीर.
**प्रतिपत्ति** :- ज्ञान.
**प्रतिभा** :- नवनवीन स्वरूपे विस्तारित करणारी संवित् पराशक्ती कुंडलिनी. स्वयंस्फूर्त सर्वश्रेष्ठ अहंचैतन्य. चैतन्याची अखंड क्रियाशील वृत्ती.
**प्रतिमालोक** :- दृक्क्रियारूप श्रीशिवांची शक्ती.
**प्रतिमीलन** :- निमीलन आणि उन्मीलन या दोन्हीही चैतन्यांचे श्रीशिवांमध्ये

प्रवेश करणे आणि श्रीशिवांमधून बाहेर पडणे म्हणजेच श्रीशिवांची शक्ती होय. आत आणि वाहेर दोन्ही ठिकाणी दिव्यत्वाची प्रचीती येणे. श्रीशिवांचे अतर्बाह्य सामरस्य.

**प्रत्यभिज्ञा** :- स्मरण. आठवण. स्व-स्वरूपाचा पुनःप्रत्यय.

**प्रत्यहार** :- (१) योगार्थ :- विषयांपासून इंद्रिये मागे खेचणे. (२) व्याकरणातला अर्थ :- गिळून टाकणे. सर्व वर्णांना एकत्र करणे. (३) सर्व वर्णांचे "अ" मध्ये होणारे समरसीकरण बाह्येंद्रियांना आत वळवून त्यांना नाहीसे करणे.

**प्रत्यवमर्श** :- स्वस्मरण. स्वतःला ओळखणे.

**प्रथ** :- विस्तार पावणे. अभिव्यक्त होणे. चमकणे. प्रकाशणे.

**प्रथा** :- अभिव्यक्तीचा मार्ग. प्रकटीकरणाचा साचा.

**प्रधानतत्त्व** :- सुखदुःखादि ज्ञानाची साम्यावस्था.

**प्रबुद्ध** :- योग्यांची समाधिज्ञानाने युक्त सुषुप्ती किंवा झोप. सर्वोच्च आत्मिक चैतन्यापर्यंत जागा झालेला.

**प्रभुशक्ती** :- स्वातंत्र्यशक्ती. संविच्छक्ती.

**प्रमा** :- विशिष्ट किंवा परिपूर्ण व अचूक ज्ञान.

**प्रमाण** :- ज्ञान. ज्ञानाचे साधन.

**प्रमाता** :- ज्ञान होणारा. कर्ता. अनुभव घेणारा. जाणणारा.

**प्रमेय** :- ज्याचे ज्ञान होते तो पदार्थ. ज्ञेय. विषय. वाच्य.

**प्रलय** :- विश्वाची संहारणी.

**प्रलयाकल** :- मायातत्त्वात राहणारा. कोणत्याही गोष्टीचे ज्ञान नसणारा. शून्याचा ज्ञानी.

**प्रसर** :- पसारा. श्रीशिवांचे त्यांच्या कुंडलिनी शक्तिद्वारा जगताच्या स्वरूपात अभिव्यक्त होणे.

**प्राण** :- श्रेष्ठ नाद. जीवनावश्यक शक्तीचे नाव. अतिमहत्वाची शक्ती. जीवनशक्ती. उच्छ्वासातला महत्वाचा वायू.

**प्राण-प्रमाता** :- जीवाचा प्राणासंबंधीचा विषय. प्राण हाच "स्व" आहे असा वाचक.

**प्राणबीज** :- "ह" हे अक्षर.

**प्राणायाम** :- श्वास नियंत्रण. श्वास व प्रश्वास यांच्या गतीचे विच्छेदन.

**प्रासाद** :- नादयुक्त विशिष्ट मंत्र. "सौ."

**प्रोल्लासभूमी** :- महान् आनंद. आत्मचैतन्यावस्था.

ब

**बल** :- चिद् बल. वैश्विक चैतन्याची व स्वतःच्या सत्स्वरूपाची जाणीव.
**बहिर्मुखता** :- बाहेर लक्ष असणे. संसारमग्नता.
**बिंदू किंवा विंदू** :- प्राण. विशेष तेज. परप्रकाशात्मा. एकघन व अवियुक्त श्रीशिवप्रकाश. सतत ध्यानाभ्यास केल्याने उत्तरोत्तर वाढणारे विशिष्ट तेज. विश्वनिर्मितीसाठी घनीभूत झालेले शक्तीचे एकत्रित रूप. परप्रमाता. रूपाची उच्चतम जाणीव. अहंमधील "ह"वरचा अनुस्वार असून तो विश्वनिर्मितीनंतरही श्रीशिव हे अखंड आहेत हे दर्शवितो. ध्यानाच्या गहनगंभीर अवस्थेत डोळ्यांच्या मध्यभागी दिसणारा तेजाचा बिंदू.
**बीज** :- (१) चिदात्मा. चैतन्यात्मा. (२) **"विश्व कारणं स्फुरत्तात्मा पराशक्तिः।।"** अर्थात् "जी सर्व जगताचे कारण आहे अशा पराशक्तीचा क्रियाशील प्रकाश." (३) स्वर. (४) देवतेच्या मंत्राचा महत्त्वाचा भाग असणारे गूढ अक्षर. (५) मंत्राचे पहिले अक्षर.
**बुद्ध** :- द्रष्ट्रधरेवर आक्रमण करणारा प्रमाता. योग्यांना समजणारी धरणा. प्रत्ययाच्या प्रवाहाने युक्त स्वप्नावस्था.
**बुद्धी** :- निश्चय करणारे विकल्प किंवा विचारांचे प्रतिबिंब धारण करणारे अंतर्साधन.
**बुद्धीन्द्रियगण** :- अशेषपणे विशेष जाणावयाचा चैतन्यविशिष्ट आत्मा.
**बुद्धीन्द्रियाणि** :- श्रोत्र अर्थात् कान, डोळे, त्वचा, रसना अर्थात् जीभ व नाक ही ज्ञानेंद्रिये.
**बैंदवी कला** :- बिंदूशी किंवा ज्ञात्याशी संबंधीत कला. इच्छाशक्ती. बैंदवी ही श्रीपरमशिवांची अशी स्वातंत्र्य शक्ती आहे की, जिच्यामुळे ज्ञाता हा नेहमीच ज्ञाता राहतो आणि कधीही ज्ञेयापर्यंत पतित होत नाही. स्वातंत्र्य शक्ती.
**बौद्ध अज्ञान** :- बुद्धीमध्ये राहणारे अज्ञान. यातील अशुद्ध विकल्पांमुळे एखाद्याला असे वाटते की, त्याचा स्थूल किंवा सूक्ष्म देह हाच त्याचा आत्मा आहे.
**बौद्ध ज्ञान** :- शुद्ध विकल्पांच्या साहाय्याने स्वतःला श्रीशिव समजणे.
**ब्रह्म** :- श्रीशांकर वेदान्ताप्रमाणे क्रियाविरहित किंवा निष्क्रिय शुद्ध मूळ चैतन्य. क्रियारहित अमर्याद ज्ञान. श्रीशैव तत्त्वज्ञानाप्रमाणे स्वातंत्र्यशक्तीने पूर्ण असे शुद्ध मूळ चैतन्य. श्रीपरमशिव.
**ब्रह्मनाडी** :- सुषुम्ना किंवा प्राण वाहून नेणारी केंद्रिय नाडी.
**ब्रह्मनिर्वाण** :- विज्ञानाकल अवस्था. क्रिया किंवा हालचाल न करता शुद्ध

ज्ञानतत्त्वात स्थिर राहणे.
**ब्रह्मरंध्र** :- सहस्त्रारचक्र.
**ब्रह्मवाद** :- श्रीशांकरवेदान्त.
**ब्रह्मानंद** :- आणवोपायातल्या आनंदाची चौथी अवस्था. ही अनेकविध विषयांच्या एकत्रिकरणामूळे निर्माण होणाऱ्या समान प्राणावर मन स्थिर करण्यामुळे अनुभवाला येत असते.
**बंध** :- आवरण. मर्यादित ज्ञान. मूळ अज्ञानावर आधारलेले ज्ञान. हठयोग करताना शरीराला लावावयाचे मूलादिबंध.

**भ**

**भक्ती (अपरा)** :- झोकून देणे. श्रीशिवांशी समरस होण्याची तीव्र इच्छा व भावना.
**भक्ती (परा)** :- श्रीशिवांशी सामरस्यप्राप्तीची सतत जाणीव आणि त्या चैतन्याचा सर्व श्रेष्ठ आनंद.
**भाव** :- आंतरिक आणि बाह्य अस्तित्व विषय.
**भावना** :- विमर्शना अर्थात् विचार. स्वत:ला आणि इतर सर्वांना श्रीशिवस्वरूपात पाहण्याची किंवा चिंतन करण्याची सवय. ज्ञानयोग. शाक्तोपाय. क्रियाशील ध्यान. आंतरिक प्रकाशित दिव्य चैतन्याचे ज्ञान.
**भावशरीर** :- सृष्ट्यादिरूपी शरीर. शरीर दोन प्रकारचे असते. भावात्मक आणि भूतात्मक हे दोन प्रकार होत. त्यांपैकी मायाशक्तीच्या वैभवाने विस्तारलेल्या तात्त्विक स्वभावत्वाने वस्तूचे संवेदन होण्याच्या वेळी स्वरूपाचे अपरामर्शन झाल्यामुळे ज्याचे सामर्थ्य फुलले आहे असा हा जीव आहे. अविच्छिन्न अहंकारामुळे शिर किंवा डोके, हात वगैरेंनी युक्त अशा शरीरत्वाने जे समजते त्या याच्या सृष्ट्यादींनी युक्त असल्यामुळे ते शरीर भूतात्मक होय. जे शब्दादि विषयांच्या व्यतिरिक्त कशाने तरी समजते किंवा कळते ते भावात्मक शरीर होय.
**भुवन** :- होणे. अस्तित्वाची जागा. वसतिस्थान.
**भुवनाध्वा** :- तिसरा देशवास. म्हणजे जगत् नावाचा. अशी १०८ भुवने आहेत.
**भूत** :- स्थूल भौतिक तत्त्व.
**भूतकैवल्य** :- तत्त्वांपासून मन किंवा चित्त मागे घेणे.
**भूतजय** :- भौतिक तत्त्वांवर नियमन.
**भूतपृथक्त्व** :- तत्त्वांपासून आत्मा वेगळा होणे.
**भूतशरीर** :- स्थूल भौतिक देह हाच आत्मा आहे असे समजणे.

**भूचरी :-** वामेश्वरीची उपजाती. ही भावांशी जोडलेली असते.
**भैरव (अपर) :-** ज्याचे चैतन्य एकत्रित आहे आणि जे हे सर्व जगत् शात्म्यासमान आहे असे समजतात असे सिद्धपुरुष.
**भैरव (पर) :-** श्रीपरमशिव. सर्वोच्च सत्य हा एक शब्द आहे. "भ" म्हणजे भरण अर्थात् जगताचे पालन, "र" म्हणजे रवण अर्थात् जगताचा लय आणि "व" म्हणजे वमन अर्थात् जगत् निर्माण करणे.
**भैरव आगम :-** अद्वैत तत्त्वज्ञानाचा उपदेश करणारे ६४ श्रीशैव आगम.
**भैरव (उपदेशक) :-** जे एकत्रित चैतन्यात स्थिर आहेत आणि ६४ अद्वैत श्रीशैवागमांचा उपदेश करणारे आहेत असे मुक्त श्रीशिव.
**भैरवमुद्रा किंवा भैरवीमुद्रा :-** ही एक मनोशारीरिक अवस्था आहे जी पुढील सरावामुळे निर्माण होते. चित्त अंतर्मुख केले पाहिजे व डोळे न उघडता बाहेर वळवले पाहिजे.
**भैरवसंपत्ती :-** श्रीपरमशिवांशी समानता.
**भैरववृत्ती :-** शक्तींचा विकास.
**भैरवसमापत्ती :-** परम श्रीशिवांशी ऐक्य किंवा समानता.
**भोग :-** अनुभव. काही काही वेळेला "उपभोग" या संकुचित अर्थाने वापरला जाणारा शब्द.
**भोक्ता :-** अनुभव घेणारा.

## म

**मठिका :-** श्रीशैव पंथाच्या चार परंपरा.
**मत्सवलन :-** अध: अर्थात् खालची म्हणजे मूलाधारातील शक्ती.
**मध्य :-** केंद्रिय चैतन्य. सर्वश्रेष्ठ अहंचैतन्य. सुषुम्ना नाडी.
**मध्यधाम :-** प्राणमयकोषातली मधली नाडी किंवा ब्रह्मनाडी. सुषुम्ना नाडी.
**मध्यमक :-** बुद्धवाद. तो असे सांगतो की, यथार्थ तत्त्व हे मध्यात राहणारे असून ते इतर कोणत्याही ठिकाणी राहत नाही.
**मध्यमा :-** स्थूलरूपात अभिव्यक्त होण्यापूर्वीची शब्दाची अंतःकरणातली सूक्ष्मावस्था.
**मध्यशक्ती :-** संविच्छक्ती. केंद्रिय चैतन्यशक्ती कुंडलिनी.
**मन :-** इंद्रियांना प्रयुक्त करणारे व संकल्प करणारे साधन.
**मनस् :-** मनाचा भाग. हा पदार्थांचे ग्रहण करण्यात इंद्रियांना मदत करतो आणि प्रतिमा, कल्पना, उद्देश व विचारांचा सांधा यांची बांधणी करतो.
**मरीची :-** शक्ती. गुणस्पंद.

**मल** :- मळ. मर्यादा. आत्म्याच्या स्वतंत्र अभिव्यक्तीला विरोध किंवा अटकाव करणारे अज्ञान. संकोचाचा आभास.

**महानंद** :- जो सर्व प्रमाण आणि प्रमेयांना पूर्ण नष्ट करतो त्या उदान अग्नीवरती चैतन्य स्थिर झाल्याने निर्माण होणारी आणवोपायातली आनंदाची पाचवी अवस्था. प्रमाणादि अवस्थांवर राहणाऱ्या निरानंदादींपेक्षा वेगळा असल्याकारणाने महान्. उत्कृष्ट प्रमातृसंगामुळे अर्थात् प्रमात्याच्या सहवासामुळे होणारा विशेष आनंद.

**महामाया (अपरा)** :- विज्ञानाकल राहतात ती शुद्ध विद्येच्या खालची आणि मायेच्या वरची अवस्था. या अवस्थेत विमर्शरहित प्रकाश असतो.

**महामाया (परा)** :- शुद्धविद्येचा खालचा स्तर. जिथे स्वतःला शुद्ध चैतन्य-स्वरूप समजत असूनही जगत् आत्म्याहून वेगळे आहे असे मानणारे विद्येश्वर राहतात.

**महामोह** :- बायकामुले आदींच्या वर असणारी खोटी अहंबुद्धी. माझेपणाची बुद्धी.

**महामंत्र** :- शुद्ध चैतन्याचा किंवा सर्वश्रेष्ठ आत्मचैतन्याचा महान् मंत्र.

**महार्थ** :- सगळ्यात मोठा शेवट. सर्वोच्च मूल्य. शुद्ध संवित्. कौल परंपरा.

**महाह्रद** :- शुद्ध चिदात्मा. सर्व लहरी. प्रसरणांचा आश्रय. सर्वोच्च व शुद्धतर आत्मचैतन्य. त्याच्या खोली आणि स्वच्छतेमुळे त्याला महाह्रद अर्थात् मोठा डोह असे म्हटले आहे.

**महेश्वर** :- श्रीपरमशिव.

**मातर** :- योगिनींचा समूह. शक्ती. रश्मी अर्थात् किरणे. कला. देवी.

**माता** :- वाच्य आणि वाचकरूपी जगताला जन्म देण्यामुळे माता.

**मातृका** :- (१) सूक्ष्म किंवा लहान अशी माहीत नसणारी माता. अक्षर किंवा शब्दांचे सामर्थ्य जे सर्व ज्ञानाचा पाया आहे. (२) जगताला प्रेरणा देणारी परावाक् शक्ती. (३) ज्ञानाच्या आधारभूत शक्ती.

**मातृकाचक्र** :- मातृकांशी संबंधित शक्तींचा समूह. योगिनीगण. ज्ञानची आधारभूत शक्ती. विश्वनिर्माण करणारी परावाक् शक्ती.

**माध्यमिक** :- बौद्ध माध्यमिक तत्त्वज्ञानाचे अनुसरण करणारा.

**माया** :- अविद्या. स्वतःच्या अंगांपासून कल्पिलेल्या भावांमधली भेदबुद्धी. मारते म्हणून मायाशक्ती. कलादि तत्त्वांचा अविवेक. स्वस्वरूपाला लपवून ठेवणारी शक्ती.

**माया (श्रीशांकर वेदान्ताप्रमाणे)** :- अनादि कारण जे जगताचा भ्रम

उत्पन्न करते.

**मायाप्रमाता** :- संकुचित जीव. मायेच्या अधिकारात असलेला. सकल नावाचा जीव.

**मायातत्त्व** :- शुद्ध चैतन्यावरती पडदा टाकणारे आणि भौतिक अभिव्यक्तीचे उपादान कारण असणारे तत्त्व. पंचकंचुकांचा स्रोत.

**मायाशक्ती** :- एकात्मतेत अनेकता किंवा वेगळेपणा दाखवून देणारी व मायातत्त्वाला चालना देणारी श्रीशिवांची शक्ती. अमर्यादेला मर्यादित करणारी शक्ती. कोणतेही कार्य करण्याला अत्यंत अवघड असे काम करण्याची विशिष्ट शक्ती.

**मायीयमल** :- मायेमुळे येणारे असे संकुचितत्व की, ज्यामुळे आत्म्याला स्थूल व सूक्ष्म शरीर मिळते. मी, माझे असे भेदविस्तार करणारे ज्ञान. भिन्न ज्ञेयप्रथा. मायेपासून विद्यातत्त्वापर्यंतचे कंचुक.

**मालिनी** :- वर्णशक्ती. सर्व जगताला आपल्यात धारण करणारी व "न" ते "फ" अशी वेगळ्या स्वरूपात वर्णांची रचना असणारी. विश्वरूपाची. नादि-फांत अर्थात् "न"पासून "फ"पर्यंत वर्णांच्या रूपाची. मलते म्हणजेच विश्वाला आतील आरशाप्रमाणे धारण करते ती मालिनी. विश्वाला मोहविणारी शक्ती.

**माहेश्वर्य** :- श्रीमहेश्वरांची शक्ती किंवा सामर्थ्य.

**माहेश्वर्याद्या** :- माहेश्वरी आणि वर्णसमूहांवरती राहणाऱ्या इतर देवता. परादि भेदांनी वेगळ्या झालेल्या शक्ती. माहेश्वर्यादि वर्गादींमध्ये अधिष्ठान ठेवणाऱ्या शक्ती.

**मुक्तशिव** :- श्रीशिवचैतन्य प्राप्त केलेले भोक्त्यांचे वर्ग. मंत्र, मंत्रेश्वर, मंत्रमहेश्वर आणि श्रीशिव, रुद्र व भैरव या नावांनी ओळखले जाणारे भोक्ते. शुद्ध प्रमाता. श्रीपरमशिव. व्यापकत्वादि इतर धर्मांचे साम्य असल्याकारणाने इतर दर्शनां-मधून सांगितलेला श्रीशिवभावासह असणारा आत्मा. शुद्ध प्रमात्यांचा वर्ग.

**मुक्ती** :- मोक्ष. परम किंवा श्रेष्ठ पुरुषार्थ. अज्ञानरूपी गाठ फुटल्यामुळे होणारे स्वशक्तीचे प्रकटन किंवा प्रकाशन किंवा विश्वाच्या पलीकडचा श्रीपरमशिवभाव. बंधनातून स्वातंत्र्य. श्रीशिवचैतन्याची प्राप्ती होणे. जीवंत असताना मुक्त होणे म्हणजेच भौतिक, जैविक आणि मानसिक जीवन असतानाच श्रीशिवचैतन्याची प्राप्ती होणे.

**मुक्ती-विदेहमुक्ती** :- मर्त्यदेह विरून गेल्यानंतर श्रीशिवचैतन्यात स्थिर होणे.

**मुद्रा** :- "मुद्" म्हणजे आनंद व "रा" म्हणजे देणे. आध्यात्मिक चैतन्याचा

आनंद देते ती मुद्रा. काही अवयवांवर एकाग्रतेसाठी केलेले यौगिक नियमन.
**मुद्राक्रम किंवा क्रममुद्रा :-** अशी अवस्था की, जिच्यात समावेशाच्या सामर्थ्याने चित्त आत म्हणजे श्रीशिवांमध्ये आणि बाहेर म्हणजे श्रीशिवांचे रूप असणारे जगत् यांमध्ये हेलकावे खात असते.
**मुद्रावीर्य :-** ज्यामुळे सर्वश्रेष्ठ आत्मचैतन्याचा उदय होतो असे सामर्थ्य. मंत्रवीर्य. खेचरी अवस्था.
**मूर्च्छा :-** मोह. देहात्मता.
**मूर्तिक्रियायोग :-** भुवनादिरूप किंवा मंत्रादिरूप अध्वा किंवा मार्ग.
**मूर्ती :-** अत्यंत स्पष्ट क्रियाशक्ती. शलशक्ती. योगेशीशक्ती. सर्वात जास्त अभिव्यक्त झालेली क्रियाशक्ती.
**मेय (प्रमेय) :-** वस्तू. पदार्थ. विषय.
**मोह :-** देहात्मभाव अर्थात् देह हाच आत्मा आहे असा भाव. अज्ञान. अविवेक.
**मोक्ष :-** मुक्तीप्रमाणेच अर्थ घ्यावा.
**मौर्ख्य :-** देहात्मभाव.
**मंत्र :-** परप्रमाता. चिच्छक्तीचा स्व-स्वभाव. "मंत्र्यते" म्हणजे आंतरिक भेदाने. (या मंत्राने) श्रीपरमेश्वराला विश्यते म्हणजे वश करतो म्हणून तो मंत्र. (१) उच्चारणाचा पवित्र शब्द किंवा सूत्र. (२) शाक्तोपायातील असा पवित्र शब्द किंवा सूत्र. यामुळे परमात्म्याचे स्वरूप आत्म्याप्रमाणेच आहे असे प्रकाशित होते. याला मंत्र असे म्हणतात; कारण तो मंत्र परमात्म्याचे मनन किंवा विचार घडवून आणतो. "**मननात त्रायते।।**" म्हणजेच "मनन केल्याने या संसाराच्या चक्रातून जीवाचे रक्षण करतो" म्हणून याला मंत्र असे म्हणतात. शाक्तोपायात चित्त स्वतःच मंत्राचे रूप घेते. (३) शुद्ध विद्यातत्त्वाची ज्याला जाणीव झालेली आहे असा भोक्ता. (४) शुद्धविद्यातत्त्वात अवस्थित असलेला प्रमातृवर्ग.
**मंत्रमहेश्वर :-** श्रीसदाशिवतत्त्वाचे ज्याला ज्ञान झाले आहे असा भोक्ता. श्रीसदाशिवतत्त्वात राहणारे प्रमातावर्ग.
**मंत्रवीर्य :-** पूर्ण आणि निर्दोष अहं चैतन्य. श्रीशिवचैतन्य. परावाक्चा अनुभव. परावाणीचा परामर्श. विचार किंवा ज्ञान.
**मंत्रेश्वर :-** श्रीईश्वरतत्त्वाचे आकलन झालेला भोक्ता किंवा जीव. श्रीइश्वरतत्त्वात राहणारा प्रमातृवर्ग.
**मंत्रेंदता :-** मंत्रेश्वर नावाचा प्रमातृभाव.

**मंथानभैरव :-** जो सगळ्याचे आत्मचैतन्यात चर्वण करतो किंवा मिसळवून टाकतो असा भैरव. स्वच्छंदभैरव.

**य**

**योग :-** (१) अप्राप्त वस्तूची प्राप्ती. (२) संबंध किंवा संयोग. परमात्म्याशी आत्म्याचे जोडले जाणे. या संबंधापर्यंत नेणारी परंपरा. (३) श्रीपतंजलींप्रमाणे समाधी. ("**युजि समाधौ**" या अर्थाप्रमाणे.)
**योगिन्य :-** खेचरी, गोचरी, दिक्चरी, भूचरी इत्यादि शक्ती.
**योनी :-** (१) गर्भ. स्रोत. (२) अक्षरांच्या संदर्भात वर्णांचे नऊ वर्ग. शक्ती योनी असून श्रीशिव बीज आहेत. (३) अंबा, ज्येष्ठा, रौद्री व वामा अशा चार शक्ती. (४) मायाशक्ती.
**योनिवर्ग :-** माया आणि तिची पुढची तत्त्वे. मायीयमल.

**र**

**रज :-** प्रकृतीचा घटक. क्रिया, गती आणि अनेकता यांचे तत्त्व.
**रवी :-** प्रमाण. प्राण.
**रश्मी :-** शक्ती. चिद्भैरवाच्या वृत्ती.
**रस :-** सिद्धयोगसाधनाभ्यासात मुखात अमृतासारखा रस पाझरणे.
**राग :-** छत्तीस तत्त्वांच्या अंतर्गत एक तत्त्व. ज्ञानरूप पुरुषाचे वेद्यसंबंधाशिवाय काल्यकलन अर्थात् कालाचे ज्ञान यांचा संबंध लागत नाही. काहीतरी मला हवे इत्यादि वेद्य किंवा ज्ञेय अशा सामान्य अभिलाषांनी युक्त झाल्यामुळे ज्या विशिष्ट वस्तू आदि विषयरूप बुद्धीचा धर्म असणाऱ्या स्थूल रागाने किंवा आसक्तीने पुरुष रंगला जातो. तीव्र इच्छा. इच्छेमुळे येणारे मर्यादात्व जेथे आहे असे मायेच्या पाच कंचुकांपैकी एक कंचुक.
**रुद्र :-** प्रमातृ-प्रमेयरूप विश्वाची सृष्टी-स्थिती-संहार करणारे रुद्र. ते पतिरूप आहेत. क्षेत्रज्ञ, पशू, ब्रह्मादि. सृष्टी, स्थिती आणि लय यांना जबाबदार असणाऱ्या देवता. पतिपदापर्यंत उन्नत झालेले आत्मे किंवा श्रीशिवचैतन्याचे आकलन झालेले आत्मे.
**रुद्र (उपदेशक) :-** मुक्त श्रीशिव असणारे अठरा श्रीशैवागमांचे उपदेशक.
**रुद्र (कालाग्नी) :-** सर्वांना अंतकाळी रडवितो. रुक् म्हणजे तेज. तेजस्वी प्राणरूपाने स्वात्म्याची प्राप्ती करवून देतो. रुत म्हणजे शब्द. राति म्हणजे देतो. संसारातील दुःख पातळ करणारा. निवृत्ती कलेच्या शेवटच्या प्रतलात राहणारे रुद्र.
**रुद्र प्रमाता :-** मुक्त श्रीशिव.

**रूप :-** दाट काळोखातही पदार्थ दिसण्याचे सामर्थ्य येणे.
**रेखिणी :-** विशिष्ट वर्णाचा आधार घेतलेली एक विशिष्ट शक्ती. वर्णोत्पत्तीमध्ये सरळ रेष तयार करणारी. वर्णविशेषाधिष्ठित शक्तिविशेष.
**रोधिनी :-** रौद्री नावाची मोक्षमार्गात अडथळा आणणारी शक्ती.
**रोहिणी :-** मोक्षाला जाणाऱ्या वाटेत अडथळा आणणारी शक्ती.
**रौद्री :-** आनंद शोधित असणाऱ्या आत्म्यांच्या आनंदाला कारण स्थित्यात्मिका शक्ती. ज्यामुळे भुकेलेल्यांना श्रीशिवभावाप्रत नेण्याच्या उत्सुकतेनेच संसारात अवस्थान किंवा स्थान प्राप्त होते. जगताचा ग्रासविशिष्ट शक्ती.

**ल**

**लय :-** सर्व भावांचे अंतर्मुखी भावनेने आत्मतत्त्वात विलिनीकरण. भाव अंतर्मुख होणे. चैतन्यात मिसळून किंवा विरघळून जाणे.
**लाभभूमी :-** परानंद. पराशक्तीची अवस्था.
**लोक :-** वस्तूंचा समूह. ग्राहकवर्ग. शुद्ध चैतन्याचा प्रकाश. लोक्यते अर्थात् बघतात म्हणून लोक. लोकयति म्हणजे बघायला लावतात म्हणून लोक. अस्तित्वाचा स्तर. सर्व वस्तूंना पाहतो तो ग्राहकवर्ग.

**व**

**वर्ग :-** वर्णांचे वर्गीकरण. जसे कवर्ग, चवर्ग.
**वर्ण :-** अक्षर. आणवोपायातील ध्वनी नावाचा चित्त एकाग्र करण्याचा विषय. अनाहतनाद.
**वाचक :-** शब्द. सूचना दर्शक. मंत्र, वर्ण व पद.
**वाच्य :-** दाखविले किंवा सूचित केले गलेले. कलातत्त्व व भुवन.
**वाममार्ग :-** सोम अर्थात् चंद्र मार्ग.
**वामा किंवा वामेश्वरी :-** सृष्ट्यात्मिका शक्ती. तिच्यामुळे संसारी लोकांचे खाली खाली पतन होत राहते. संसाराचे वमन करते म्हणून वामा. संसाराचे वमन करणारी एक विशिष्ट शक्ती. विशेष जिज्ञासा केली जाणाऱ्या उन्मेषापासून छुरित अर्थात् यामल शक्ती. मल किंवा मलरहित शक्ती. अत्यंत स्पष्ट अशी श्रृंगाट शक्ती. शूल शक्ती. योगीशीशक्ती. एक दिव्य शक्ती. ही परमात्म्यातून हे जगत् बाहेर ओकते किंवा बहिर्मुख करते आणि भेदाची जाणीव निर्माण करते. वम् = ओकणे पासून वामा.
**वासना :-** मनात राहिलेल्या क्रिया आणि अनेक पूर्वजन्मांचे संस्कार.
**वाह :-** प्रवाह. इडा नाडीतून वाहणारा प्राण आणि पिंगला नाडीतून वाहणारा अपान या दोघांना वाह असे म्हटले जाते.

**विकल्प** :- ग्रहणातला भेद. फरक. दुसरा मार्ग. एका कल्पनेपासून वेगळी असणारी दुसरी कल्पना, विचार व रचना.
**विकल्प (शुद्ध)** :- मी श्रीशिव आहे हा पक्का विचार.
**विकल्पक्षय** :- सर्व विकल्पांचे नष्ट होणे.
**विकल्पन** :- मनाची वेगळेपणा करण्याची शक्ती किंवा क्रिया.
**विकास** :- कुंडलिनी शक्तीचा सुषुम्नामार्गाने सहस्रारापर्यंत होणारा.
**विग्रह** :- वैयक्तिक शरीर किंवा आकार. देह.
**विग्रही** :- ज्याने देह धारण केलेला आहे तो.
**विज्ञानदेह** :- जो विज्ञानदेहाने विशुद्ध संविनमात्र मूर्ती असलेल्या श्रीमहेश्वरांची प्रत्यभिज्ञा प्राप्त करतो तो.
**विज्ञानाकल** :- मायेच्या वर शुद्धविद्येच्या खाली राहणारा प्रमातृवर्ग. शुद्धविद्येच्या खालचा आणि मायेच्या वरचा भोक्ता. ज्याला शुद्ध जाणीव आहे; पण सुबुद्धता नाही. त्याला मायीय आणि कार्ममल नाहीत; पण आणवमल मात्र आहे.
**वितर्क** :- विश्वात्मा श्रीशिवच मी आहे असा विमर्श किंवा विचार.
**विदेहमुक्ती** :- मर्त्यदेह विरून गेल्यानंतर श्रीशिवचैतन्यात स्थिर होणे.
**विद्या** :- शुद्ध विद्यातत्त्व. उन्मना शक्ती. सहजविद्या. संकुचित ज्ञान. मायेचे कंचुक. किंचित् ज्ञानाचे कारण असलेले तत्त्व. आत्मा आदि तत्त्वत्रयाहून निराळे तत्त्व. हे शुद्धविद्यादि शक्त्यंत मार्ग व्यापणारे तत्त्व आहे. शुद्ध चिन्मात्राच्या आवेशाने विद्येचा उन्मेष होतो. स्वप्रकाश युक्त.
**विद्यातत्त्व** :- संकुचित ज्ञानाचे सामर्थ्य.
**विद्याशरीर** :- शब्दराशी. शब्दांचा समूह. (तिसरे सूत्र दुसरा उपाय.)
**विनायक** :- सिद्धी देऊन आध्यात्मिक प्रगतीत अडथळे आणणारी देवता.
**विमर्श** :- आत्मचैतन्य किंवा जगत् प्रक्रिया घडविणाऱ्या ज्ञान व क्रियेने परिपूर्ण असणाऱ्या श्रीपरमशिवांचे ज्ञान किंवा जाणीव.
**विवर्त** :- श्रीशांकर वेदान्ताप्रमाणे खऱ्या वस्तूचे दुसऱ्याच स्वरूपात अभिव्यक्त होणे.
**विश्राम** :- शेवटची अवस्था. अनंतकोटी.
**विश्रामभूमी** :- निरानंद. श्रीशिवावस्था.
**विश्व** :- हे सर्व जगत्.
**विश्वमय, विश्वात्मक** :- विश्वयुक्त.
**विश्वमातरः** :- माहेश्वर्यादि शक्ती.
**विश्वोत्तीर्ण** :- विश्वापलीकडचा.

**विसर्ग :-** उत्पत्ती. सर्जन.
**विसर्गभूमी :-** दोन बिंदू एकाच वेळेला देणे. शक्तीचे बाहेर जगताच्या रूपात अभिव्यक्त होणे व श्रीशिवांमध्ये ते सर्व सामावून जाणे हे एकाच वेळेला दर्शविणारी कौलिकी शक्ती.
**वीरेश :-** इंद्रियांचा अधिपती. जो सर्व प्रकारची भेदाची जाणीव दूर करण्याला तत्पर व समर्थ; कारण त्याने विश्वोत्तीर्ण अशा चैतन्याचा आनंद काय असतो हे लक्षात घेतलेले असते. त्या इंद्रियांना वीर म्हटले जाते; कारण ती इंद्रिये आता शक्ती बनलेली असतात. मृगजळाचा किंवा तत्स्वरूप किरणांचा ग्रास करणारा. गुणस्पंदांना आपल्यात सामावून घेणारा. पतिप्रमाता श्रीशिव. सर्व इंद्रियांचा स्वामी असलेला श्रीईश्वर.
**वीर्य :-** परा किंवा श्रेष्ठ विमर्शशक्ती. ज्ञेत्व अर्थात् ज्ञान. कर्तृत्वशक्ती.
**वेदक :-** भोक्ता. अनुभव घेणारा. जीव.
**वेद्य :-** जाणावयाचा विषय किंवा वस्तू. प्रमेय.
**वैसर्गिकी कला :-** "अ" वर्गापासून "आ" निर्माण करणारी कला.
**वृत्ती :-** जागृतावस्था.
**व्यान :-** व्यापक प्राण.
**व्यापकता :-** सर्वत्वाची जाणीव.
**व्यामोहितत्व :-** भ्रामकता.
**व्युत्थान :-** उठणे. समाधीनंतर सामान्य चैतन्यात परत येणे.

### श

**शक्ती :-** श्रीशिवांचे सृष्टी, स्थिती व लय करण्याचे सामर्थ्य. श्रीशिवांचा स्पंद किंवा क्रियात्मक हालचाल. विश्वभावाची बीजभूमी. किंचित् वर उसळणारी. संविच्छक्ती. कला. रश्मी म्हणजे किरण. अघोरशक्ती. स्वातंत्र्य. परापरशक्ती. चिच्छक्ती. पराशक्ती. मातृकाशक्ती. माहेश्वरादि शक्ती. चैतन्यशक्ती कुंडलिनी.
**शक्तिचक्र :-** बारा महाकालींचा समूह. सृष्ट्यादींना कारणीभूत असणाऱ्या देवता. इंद्रियसमूहांच्या देवता. मंत्रसमूह. खेचर्यादि देवतांचा समूह. सृष्ट्यादि देवतांचा समूह. विश्व, इंद्रियवर्ग, करणेश्वरीवर्ग, मुद्रागण, चिदादि शक्ती व खेचरी आदि योगिनीगण.
**शक्तितत्त्व :-** विमर्श. श्रीशिवांचे पायाभूत आत्मतचैतन्य. जगताच्या स्वरूपात व्यक्त होण्याचा श्रीशिवांच्या आत्मचैतन्याचे तत्त्व. छत्तीस तत्त्वांमधले दुसरे तत्त्व. दृक् क्रियाशक्तींचा समूह. आत्मदशाविशेष.
**शक्तिपंचक :-** श्रीशिवांच्या पाच मुख्य शक्ती. क्रमशः चित्, आनंद, इच्छा,

ज्ञान व क्रिया.

**शक्तिपात :-** दिव्य तेज. त्याच्यामुळे संसारात गुंतलेले जीव त्यांच्या आंतरिक दिव्य स्वरूपाकडे वळतात आणि ते स्वरूप जाणून घेतात. अनुग्राहकशक्तीचा शरीरावर संपात किंवा पडणे. यामुळे संसारात गुंतलेले अर्थात् संसारात मग्न झालेले जीव नित्यानित्य विवेकाकडे उन्मुख होतात. श्रीशिवकिरणांचा स्पर्श म्हणजे शक्तिपात. ज्याप्रमाणे सूर्याची किरणे पडल्यावर सूर्यकांत मणी पाझरू लागतो त्याप्रमाणे श्रीशिवरश्मींचा स्पर्श झाल्यावर अणुरूप जीव श्रीशिवशक्तिपाताने पवित्र होऊन ज्ञानक्रियासंपन्न होतो व त्याला श्रीशिवशक्तिसामरस्याची प्राप्ती होते.

**शक्तिमान् महेश्वर :-** श्रीशिव.

**शब्द :-** ध्वनी. अक्षर.

**शब्दब्रह्म :-** विचारांच्या कंपनांच्या स्वरूपातले अंतिम सत्य किंवा परम तत्त्व. या अवस्थेत विचार आणि शब्द एकच असतात.

**शब्दराशी :-** "अ"पासून "क्ष"पर्यंतचा वर्णसमूह.

**शाक्त जप :-** परमात्मचैतन्याचे सतत स्मरण.

**शाक्त जय :-** श्रेष्ठ अशा अहंभावाचा परामर्श.

**शाक्त समावेश :-** शाक्तोपायाद्वारा परमात्म्याशी साम्य पावणे.

**शाक्त योग :-** शाक्तोपायाप्रमाणे ज्ञानयोग.

**शाक्तोपाय :-** "मी श्रीशिव किंवा परमात्मा आहे," या विचारांचे सतत होत राहणारे ध्यान. विकल्पसंस्कारांच्या द्वारा उर्ध्वावस्थेवर आरोहण करण्याचा उपाय.

**शांभवोपाय :-** कोणत्याही विकल्पांशिवाय होणारा श्रीशिवसंवित्‌चा अचानक उदय. फक्त त्यासाठी एकच सूचना पुरेशी आहे की, एखाद्याचा आत्मा श्रीशिव आहेत. यालाच शांभवयोग, इच्छोपाय किंवा इच्छायोग असेही म्हणतात. उच्चारादि साधननिरपेक्ष सकृदुपदेश मार्गाने श्रीशिवधामाची प्राप्ती.

**शांभवप्रमाता :-** श्रीशिवचैतन्यात स्थिर झालेला श्रीशिवप्रमाता.

**शांभवसमावेश :-** शांभवोपायामुळे निर्माण झालेल्या बहुल अंतर्दृष्टीमुळे "मी श्रीशिव आहे," अशा प्रकारचे विकल्परहित ज्ञान.

**श्रीशिव :-** मंगल. देवाचे एक नाव. मूळ प्रकाश किंवा दिव्य प्रकाश.

**श्रीशिव (प्रमाता) :-** पूर्ण व विश्वोत्तीर्ण दिव्य तत्त्व.

**श्रीशिवतत्त्व :-** ३६ तत्त्वांमधील पहिले तत्त्व. मूळ दिव्य प्रकाश. सर्व अभिव्यक्तींचा मूळ स्रोत.

**श्रीशिवव्याप्ती :-** ज्यावेळेला सर्वज्ञता आदि गुण व्यापकत्वाने कल्पिले

जातात ती अवस्था.

**शुची :-** उदानवायू.

**शुद्ध अध्वा :-** श्रीशिवांपासून शुद्ध विद्येपर्यंतचा अभिव्यक्तीचा मार्ग.

**शुद्ध तत्त्व :-** श्रीपरमशिव.

**शुद्ध विकल्प :-** "आपण श्रीशिव आहोत," असा विचार.

**शुद्ध विद्या :-** श्रीशिवांपासूनचे पाचवे तत्त्व. या तत्त्वात अहम् आणि इदम् अशी दोन्हीही चैतन्ये बरोबरीने स्पष्ट होत असतात. जरी हे जगत् भिन्न प्रतीत होत असले तरीही त्याच्यातून अभिन्नत्व एखाद्या दोऱ्याप्रमाणे ओवलेले असते. या अवस्थेत भिन्नत्वामध्ये अभिन्नत्व दिसून येत असते. या तत्त्वामध्ये क्रिया कमी ठळक असते. या पातळीवरचे चैतन्य "मी मी आहे आणि मी हे सुद्धा आहे." कलादि तत्त्वाचा विवेक. स्वातंत्र्यशक्ती. भेदाभेदयुक्त तत्त्वदशा. मायेच्या वर असलेले तत्त्व.

**शून्य (बौद्ध) :-** सत्याची व्याख्या न करता येण्यासारखी अवस्था. ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय यांचे कोणतेही विशिष्ट चैतन्य या अवस्थेत स्पष्ट नसते.

**शून्य (श्रीशैव) :-** ज्या अवस्थेत एकही पदार्थ अनुभवाला येत नाही.

**शून्यप्रमाता :-** पदार्थ किंवा ज्ञेयरहित चैतन्याने ओळखला जाणारा भोक्ता किंवा जीव किंवा अनुभवकर्ता.

**श्रीशैव आगम :-** श्रीशिवांनी उपदेशिलेली दहा द्वैतशास्त्रे. भिन्नत्वामध्ये एकत्वाचा उपदेश करणारी अठरा शास्त्रे. ६४ अद्वैत शास्त्रे.

**श्रीशैवयोग किंवा साधना :-** आणवोपाय, शाक्तोपाय आणि शांभवोपाय.

### ष

**षडध्वा :-** अभिव्यक्तीचे सहा प्रकार. तीन वाच्यबाजूचे क्रमशः मंत्र, वर्ण व पद आणि तीन वाचकबाजूचे क्रमशः कला, तत्त्व व भुवन.

**षंढबीज :-** ऋ, ॠ, ऌ व ॡ ही चार अक्षरे. ती अन्य वर्णांना परत निर्माण करण्याला सक्षम असतात.

**षष्ठ वक्त्र :-** सहावे इंद्रिय किंवा मेढ्रकंद. मूळाजवळ अर्थात् मूलाधारा-जवळ असणारे.

### स

**सकल :-** संकुचित जीवात्मे. श्रीसदाशिव. मंत्रविशेष. समनेपर्यंतचा विस्तार. संकुचित जीव वर्ग अर्थात् देवांपासून स्थावरापर्यंतचे जीव.

**सत् :-** चैतन्य स्वरूपातील अस्तित्व.

**सत्त्व :-** अस्तित्वाचे तत्त्व. प्रकाश आणि प्रकृतीचा घटक. आंतरिक आत्मा.

**सत्यप्रमाता** :- प्रकाशयुक्त शरीराचे श्रीपरमशिव.
**श्रीसदाशिव** :- सादाख्यतत्त्व. श्रीशिवांपासून तिसरे तत्त्व. या अवस्थेत अहंचा अनुभव इदंच्या अनुभवापेक्षा जास्त ठळक असतो. या तत्त्वालाच सादाख्यतत्त्व असेही म्हणतात; कारण "सत्" या अवस्थेत प्रकट झालेले असते. इच्छा ही या तत्त्वात प्रमुख असते. महाशून्यातिशून्य नावाच्या शक्तीत श्रीमहेशांची अहमिदम् किंवा आत्मा म्हणजेच जगत् अशा अभेदाने आलेली पूर्णाहंतेच्या चमत्कारने युक्त अवस्थाविशेष.
**श्रीसदाशिवतत्त्व** :- सर्व ज्ञान व क्रिया यांची योग्यता असलेले तत्त्व.
**सद्विद्या** :- शुद्धविद्या.
**समना** :- शून्यापासून पृथ्वीपर्यंत स्वतःला जगताच्या रूपात प्रदर्शित करीत असताना उन्मनाशक्ती प्रमात्याच्या सर्वोच्च अवस्थेपासून खाली उतरत असताना तिला समना असे म्हणतात. अत्यंत सूक्ष्मतम तत्त्व. प्रपंचाचे मनन करण्याला आधार देणारे सर्व तत्त्वांचे प्रथम सूत्ररूप तत्त्व किंवा शक्ती.
**समरस** :- एखाद्याला तीच जाणीव किंवा चैतन्य असणे.
**समाचार** :- सम = सम्यक्, आ = ईषत्, चार = प्रसरण. योग्य तऱ्हेने उदित झालेल्या प्राणाचा बाह्य विस्तार.
**समाधिव्यक्तय:** :- योगभूमिका.
**समाधिसुख** :- ज्ञेयामध्ये किंवा प्रमातृपदामध्ये स्थिर झाल्याने मिळणारे सुख. मी व जग या दोन्हींमध्ये झालेल्या आत्मविकासाचा आनंद.
**समाधी** :- चित्ताचा एकाग्रपणा. यात चित्ताचे चढउतार संपून जातात. समापत्ती. ज्ञेय.
**समान** :- प्राण आणि अपान यांच्यात समतोल आणणारा आणि अन्नपचन घडवून आणणारा महत्त्वाचा वायू.
**समापत्ती** :- समाधीचा पर्यायी शब्द.
**समावेश** :- दिव्यत्वाने धारण केलेला. जीव चैतन्याचे दिव्यत्वात लय पावणे. संकुचित जीवभावाचे विस्तृतिकरण होऊन स्वतंत्र बोधाशी तादात्म्य पावणे.
**सर्वकर्तृत्व** :- सर्व करण्याची शक्ती.
**सर्वज्ञत्व** :- सर्व जाणणारा.
**सविकल्प ज्ञान** :- बुद्धीच्या निश्चयाने मिळविलेले ज्ञान.
**सहज** :- आतले स्वरूप.
**सहजविद्या** :- आंतरिक स्वरूपाचे ज्ञान. उन्मना. ज्यात मनोचैतन्य किंवा चित्चैतन्य लय पावते असे दिव्य पूर्ण चैतन्य. श्रीशिवव्याप्ती.

**सामरस्य** :- श्रीशिव आणि शक्तीचे मिलन. चैतन्याची ओळख. सर्व भेद नष्ट होतात अशी समरस अवस्था.

**सायुज्य** :- भेदांच्या मध्ये जीवाला अनुभवता येणारी दिव्यत्वाशी समरस असण्याची जाणीव.

**सारूप्य** :- परमात्म्याशी पूर्णपणे एकरूप असल्याची जाणीव.

**सालोक्य** :- जीवात्म्याने निवडलेल्या देवतेशी समपातळीवर राहण्याची अवस्था.

**साक्षात् उपाय** :- शांभवोपाय.

**साक्षात्कार** :- आत्म्याचा प्रत्यक्ष अनुभव.

**सुगत** :- बुद्ध.

**सुप्रबुद्ध** :- चैतन्याच्या विश्वोत्तीर्ण अवस्थेत जागा झालेला आणि ज्याच्यात चैतन्याची अखंड सत्ता असते असा. तुर्यावस्था.

**सुषुप्ती** :- गाढ व स्वप्नरहित झोप.

**सुषुप्ती (सवेद्य)** :- अशी गाढ झोप की, जिच्यात आनंद, हलकेपणा यांच्या जाणिवेचा थोडासा संस्कार शिल्लक राहतो.

**सुषुप्ती (अपवेद्य)** :- सर्व विषय संवित्तीचा अभाव असणारी पूर्ण गाढ झोप.

**सुषुप्तता किंवा सौषुप्त** :- मुख्य अज्ञानामुळे निर्माण झालेली भ्रामक अवस्था. ज्ञान-ज्ञेयशक्तीचा उदय न झाल्यामुळे चिद्रूपाचा अविवेक.

**सूक्ष्मशरीर** :- आंतरिक सूक्ष्म शरीर. पुर्यष्टक. तन्मात्रेपर्यंत साधनरूप.

**सूर्य (प्रतीकात्मक)** :- प्राण. प्रमाण. ज्ञानशक्ती.

**सूर्यनाडी** :- प्राण वाहून नेणारी इडा नाडी.

**सृष्टी** :- भावांची उन्मुखता. पदार्थ बाध्यरूपात येणे.

**सृष्टिबीज** :- मंत्रबीज. अभिव्यक्ती किंवा सृष्टी घडविणारे आत्मचैतन्य.

**स्तोभ** :- चित्तावरील आवरण.

**सोम (प्रतीकात्मक)** :- अपान वाहून नेणारी पिंगला नाडी.

**सोमनाडी** :- अपान वाहून नेणारी पिंगला नाडी.

**सोमांश** :- प्रमेय भाग. अपान.

**सौगत** :- बुद्धाचा अनुयायी. बौद्ध.

**सौषुप्त सृष्टी** :- प्रलयाकल राहणारी सृष्टी.

**सौषुप्त व्योम** :- हृदय.

**स्थानकल्पना** :- बाह्य गोष्टींच्या एकाग्रतेशी संबंधित असणारा आणवोपायाचा एक प्रकार.

**स्थिती** :- भावांचा अभिष्वंग म्हणजे भावांचे मिलन किंवा समरसीकरण.
**स्थितिकृत्य** :- सृष्टीचे रक्षण किंवा पालन.
**स्थूल भूते** :- स्थूल तत्त्वे. पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश.
**स्थूल शरीर** :- स्थूल भौतिक देह. पांचभौतिक शरीर. प्रधान अशा पृथ्वी-तत्त्वापर्यंत निष्फळ होणारे व षड्भावादि विकारांनी युक्त अतात्त्विक शरीर.
**स्पर्श** :- परसंवित्‌चा म्हणजे कुंडलिनी शक्तीचा साक्षात्कार.
**स्पर्शभू** :- आह्लाद. आनंदशक्ती. सुखादि संबंधीची पहिली जाणीवयुक्त शक्ती. त्यामुळे अनुत्तर शक्ती. परसंवित् साक्षात्कार.
**स्पंद** :- निष्क्रिय श्रीशिवांमध्ये होणारी हालचाल. ही जगताचे सृष्टी, स्थिती व लय घडवून आणते. स्वातंत्र्यशक्ती. क्रियाशील. "ह" कला. अचला-मध्ये चलिताचे आभासन निर्माण करणारा चमत्कार.
**स्फुरत्ता** :- स्पंद. आत्मिक प्रकाश.
**स्वच्छंद** :- पूर्णपणे स्वतंत्र असणारा. श्रीशिव. श्रीभैरव.
**स्वतंत्र** :- इच्छा.
**स्वप्न** :- स्वप्न. स्वप्न पडतानाची स्थिती. जीवापुरते मर्यादित असणारे विकल्प किंवा विचार. बाह्यार्थ विषयांच्या अभावाने अंतर्विकल्पांचा नवनवोदय.
**स्वप्नसृष्टी** :- अस्तित्वाचा असा प्रतल की, ज्यात भुवन, देह आणि विषय हे स्वप्नाप्रमाणे असतात.
**स्वरूपापत्ती** :- स्वरूपाची प्राप्ती.
**स्वलक्षण** :- आपल्या विशिष्ट देश व काळात मर्यादित असणारी वस्तू किंवा पदार्थ.
**स्वसंवेदन** :- अंतरिंद्रिये व बाह्येंद्रिये यांची मदत न घेता येणारी अंतरानुभूती.
**स्वाच्छंद्य** :- परमात्म्याचे पूर्ण स्वातंत्र्य. अभेदातील भेद. भेदाच्या पुन्हा केलेल्या अनुसंधानाने अभेदातील संयोजन व नियोजनाचे कर्तृत्व आणि स्वातंत्र्य. जीवाच्या स्वात्मरूपाचे श्रीशिवरूपाने होणारे सत्य अवभासन.
**स्वातंत्र्य** :- इच्छेची पूर्ण स्वतंत्रता. विमर्शशक्ती.
**स्वातंत्र्यशक्ती** :- साररूप विमर्शशक्ती. ऐश्वर्य. दुसऱ्याची अपेक्षा नसणारी स्वतंत्र शक्ती.
**स्वात्मसात्कृत** :- मिसळून जाणे. एकरूप होणे.
**स्वेच्छा** :- श्रीशिव किंवा शक्तीची इच्छा. स्वातंत्र्याचा समानार्थी.
**संकोच** :- मर्यादा.
**संधान** :- शब्दशः जोडणे, एकत्र आणणे. एकाग्रता किंवा एकाच बिंदूवर लक्ष्य एकाग्र करण्याच्या अथवा तीव्र व स्थिर जाणिवेच्या साहाय्याने जीवात्म्याचे

परमात्म्याशी मिलन होणे.

**संघट्ट** :- मिळणे. मानसिक मिलन. एकाग्रता.

**संबोध** :- सम्यक् बोध. परमात्म्याचे स्वरूप असणाऱ्या आनंद आणि चैतन्याचा गोळा यांचे पूर्ण किंवा निर्दोष ज्ञान.

**संवाह्य** :- जो एका जन्मातून दुसऱ्या जन्मात वाहून नेला जातो. कर्मात्मा. पशू.

**संवित्** :- जेथे प्रकाश आणि विमर्शज्ञानशक्ती यांचे पूर्ण एकत्रिकरण झालेले आहे असे मुख्य चैतन्य. स्वातंत्र्यशक्ती. मुख्य आत्मचैतन्य. पूर्ण अहंविमर्शात्मिका शक्ती.

**संवित् देवता** :- संवित् देवता म्हणजे खेचरी, गोचरी, दिक्चरी व भूचरी शक्ती. अंतरिंद्रिये आणि बहिरिंद्रिये ही संवित् देवता म्हणून ओळखली जातात.

**संवेदन** :- आद्य म्हणजे पहिला अनुभव.

**संसार किंवा संसृती** :- जगताची प्रक्रिया.

**संसारी** :- एका रूपातून दुसऱ्या रूपात म्हणजे जन्ममरमपरंपरेत फिरणारा.

**संहार** :- चैतन्याशी एकरूप होणे.

**संहारक्रिया** :- श्रीशिवांचे जगतामध्ये मिसळून जाणे किंवा लय पावणे.

## ह

**ह** :- शक्ती किंवा दिव्य सामर्थ्याचे प्रतीक.

**हठपाक** :- जीवाची चैतन्याशी एकरूप होण्याच्या अनुभवाची चिकाटीची क्रिया. शांभवोपाय. हठयोगादि क्रियांचा अतिक्रम करून नुसत्या सकृद्-उपदेशाने अर्थात् शक्तिपाताने होणारा चिदाग्नीचा म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या जागृतीचा साक्षात्कार.

**हार्दी** :- सिद्धयोगिनीरूप मेलापशक्ती. याम्याशक्ती.

**हेतू** :- कारण.

**हेतुमत्** :- परिणाम.

**हंस** :- जीव. आत्मा.

**हंसजप** :- नादकलेचे चैतन्य.

**हृदय** :- मुख्य् चैतन्य. सर्व अभिव्यक्तींचा पाया असणाऱ्या आत्मचैतन्याचा प्रकाश. चित्प्रकाश.

**हृद्बिंदू** :- नर नावाचा बिंदू. ज्ञानक्रियेत स्वतंत्र प्रमात्याला बिंदू असे म्हटले जाते.

**ह्रद** :- तलाव. डोह. श्रेष्ठ आत्मिक जाणीव. तिला ह्रद म्हणण्याचे कारण असे आहे की, ती स्वच्छ, आच्छादनरहित, खोल आणि अमर्याद आहे.



# श्रीशिवसूत्रे

## साररूप विषय

श्रीशिवांचा शक्तिपात कोणावरही कोणत्याही वेळेला होतो. असा शक्तिपात होण्यासाठी अधिकारी किंवा अनधिकारी असा कोणताही विचार नसतो. हा शक्तिपात होण्यासाठी व्यक्ती, वेळ आणि स्थान आदींविषयी काहीही वैशिष्ट्यपूर्णता नसते; कारण श्रीशिव कर्मनिरपेक्ष असतात. त्यांच्यामध्ये कर्माचा कोणताही विचार नसतो. त्यामुळे शक्तिपात निरर्गल अर्थात् कोणताही अडथळा नसलेला असा आहे. ज्या कोणत्याही जीवावर श्रीशिव शक्तिपात करीत असतात त्यालाच संसारावस्थेचा स्वयमेव तिरस्कार वाटतो. त्याच्यात विश्वाची निर्मिती आणि लय अर्थात् नाश करण्याचे सामर्थ्य येते. कुंडलिनी शक्ती हीच संसार आहे आणि ही कर्मसापेक्ष अर्थात् कर्माला अनुसरून आहे. जीव हा कर्म करण्याने मिळणाऱ्या फळांचा उपभोग घेणारा आहे. त्यामुळे संसार किंवा प्रपंचात कर्म केले असता त्यांची फळे मिळणे कर्मप्राप्तच असते; परंतु शक्तिपात झालेल्या साधकभक्तयोगिशिष्याला कर्मे करण्याची आवश्यकता असत नाही. जरी देहातला व्यवहार साधण्यासाठी त्याला कर्मे करावी लागत असली तरीही तो त्या कर्मांनी लिप्त होत नाही. तो साधारण जीवभाव आणि ज्ञेयभावाच्या पलीकडे जाऊन श्रीशिवरूपत्व प्राप्त करून घेतो.

